आजकालच्या गोष्टी—गोष्ट ७ वी

# भयंकर दिव्य !



हरि नारायण आपटे

पुणें

किंमत २। रुपये.

रावसाहेब विष्णु मोरेश्वर महाजनि एम्. ए.

यांचेवर असलेल्या आपल्या

परम भक्तीचें बाह्य चिन्ह म्हणून

हें कथाकुसुम

त्यांस अर्पिलें आहे.

# अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.



धांवरे राम राया ! किती अंत पहासी ॥ ( प्रकरण १ लें पहा. )

# भयंकर दिव्य !

## प्रकरण १ लें.

### उपोद्घात.

पद.

धांव रे रामराया । किती अंत पाहसी । प्राणांत मांडियेला । नये करुणा कैसी ॥ ध्रु० ॥
पाहीन धणिभरी । चरण झाडीन केशीं । नयन शिणले बा । आतां केधवा येसी ॥ १ ॥
मीपण अहंकारें । अंगीं भरला ताठा । विषयकर्दमांत । लाज न वाटे लोळतां ।
चिळस उपजेना । ऐसें झालें बा आतां ॥ या भवीं रामदास । थोर पावतो व्यथा ॥ २ ।
कौतुक पाहतोसी । काय जानकीनाथा । दयाळा दीनबंधो ! । भक्तवत्सला आतां ॥३॥



मनुष्य कितीही चिंतामग्न असो, किंवा एखाद्या दुखण्यानें गांजलेला असो; त्यास सुद्धां कांहीं कांहीं वेळीं कांहीं कांहीं देखाव्यांनीं व अनुभवांनीं आनंद व समाधान हीं होतात. द्वारकाबाई बिचारी चिंता आणि दुखणें दोहोंनींही अगदीं पिडून गेलेली होती. परंतु या वेळचा देखावाच असा होता, कीं त्यामुळें ती आपली सर्व चिंता व आपला तो दुर्धर रोग थोडा वेळपर्यंत अगदीं विसरून गेली. तिच्यावर जीवापलीकडे प्रेम करणाऱ्या तिच्या पतीनें आपल्या हातांनीं एक वेताची लांब इंजि-चेअर बाहेर आणून तीवर अगदीं मऊ असा बिछाना पसरून व तिची मान अवघडूं नये म्हणून अगदीं मऊ अशा उशा नीटनेटक्या ठेवून त्यांवर अलगत तिची मान ठेवली. नंतर तिच्या अंगावर अर्धे पांघरूण घातलें आणि आपण एक खुर्ची घेऊन ती जवळच बसून राहिला होता. तिच्या खुर्चीजवळच पायथ्याशीं तिचीं दोन अपत्यें-ज्यांच्यावर तिचें व तिच्यावर ज्यांचें अलोट प्रेम होतें, अशीं तिचीं दोन अपत्यें-एका हार्मोनिअम पेटीच्या सुरावर एक भक्तिरसपूर्ण असें पद गात होतीं. व्हरांड्याच्या पलीकडल्या बाजूस बंगल्यापुढल्या छोटेखानी बागेंत चंद्राचा प्रकाश फारच सुंदर पडला होता, यामुळें तेथील देखावा फारच मनोरम दिसत होता. सारांश, द्वारकाबाई जरी कांहीं एका असाध्य वाटणाऱ्या

रोगानें आजारी होती, आणि त्या रोगानें व दुसऱ्याही कांहीं चिंतेनें जरी ती फार ग्रासलेली होती, तरी यावेळीं बाहेर पडलेल्या शुभ्र व आल्हादजनक चांदण्यानें तिच्या डोळ्यांस, त्या प्रेमळ अपत्यांच्या कोमल व मधुर सुस्वरानें कानांस आणि आपल्यावर कायावाचामनानें प्रेम करणाऱ्या पतीच्या सान्निध्यानें मनास अतिशय आल्हाद होत होता. त्यांत आणखी आदलेच दिवशीं डॉक्टरांनीं तिच्या रोगाची पुनः परीक्षा करून बरें होण्याची आशा लाविल्याकारणानें तेंही एक तिच्या आल्हादाला मोठेंच कारण झालें होतें. अंगीं अतिशय क्षीणता आल्याकारणानें तिचा एक वेळां फार सुंदर असलेला चेहरा आतां अगदीं निस्तेज व रक्तहीन असा झाला होता. तिचे पाणीदार डोळे अगदींच मंद दिसूं लागले होते आणि त्यामुळें असें वाटे, कीं जणूं काय हिला आतां पापण्या मिटल्या असतां त्या उघडण्याची सुद्धां शक्ति नसावी; परंतु आज तो सर्व प्रकार थोडाबहुत बदललेला दिसला. तिच्या चेहऱ्यावर थोडीशी टवटवी व हुषारी दिसूं लागली होती आणि तें पाहून तिच्या पतीस व अपत्यांसही फार आनंद झाला होता. शेक्सपीअरनें एके ठिकाणीं म्हटलें आहे, "दुःखपीडितास आशेसारखें दुसरें कोणतेंही औषध नाहीं" तेंच खरें. तेंच औषध द्वारकाबाईस व तिच्या सर्व मंडळीस कालपासून मिळालें होतें. त्या आनंदामुळेंच कमला व तिचा धाकटा भाऊ गोपाळ परमेश्वराच्या धाव्याचें एक पद मोठ्या आनंदानें म्हणत होतीं. त्या पदाच्या कोमल व भक्तिरसपूर्ण शब्दांनीं त्या आजारी आईचें मनही भक्तिपूरित होऊन त्या मुलांकडे लागलें होतें.

कमला किंवा गोपाळ दोघेंही कांहीं शास्त्रीय पद्धतीनें गाणें शिकलीं होतीं असें नाहीं; परंतु जात्याच दोघांचेही आवाज गोड असल्याकारणानें व बळवंतरावांस संगीताचा नाद असल्यामुळें त्यांनीं त्या दोघांनाही सुंदर पदें वगैरे शिकविलेलीं होतीं आणि तीं मुलेंही अशा तऱ्हेनें गात कीं, ऐकणाराचें मन अगदीं तल्लीन होत असे. आज तर तीं मुलें विशेषच उल्हासानें गात होतीं, आणि श्रोतेमंडळी म्हणजे त्यांची आई आणि त्यांचा बाप या दोघांचीं मनें या वेळीं आशांकुरानें उल्हसित झालीं असल्यामुळें विशेष तल्लीन झालीं होतीं. कमलेचा सुस्वर त्या रात्रीच्या शांत वेळीं दूरवर ऐकावयाला जात होता आणि बंगल्याच्या कंपाउंडाच्या दरवाज्याच्या बाहेरून रस्त्यानें जाणारे येणारे लोकसुद्धां तटस्थपणें क्षणभर उभे राहून मग पुढें जात. एक तरुण गृहस्थ तर बंगल्याच्या आंत शिरतां शिरतांच काय त्याच्या मनांत आलें तो जेथल्या तेथेंच थबकून स्वस्थ चित्तानें तें गाणें ऐकत उभा राहिला.

परंतु हा गृहस्थ कोण व आंत कां येत होता हें सांगण्यापूर्वी त्याला जेथल्या तेथूनच तें गाणें ऐकण्यास सोडून व द्वारकाबाई व बळवंतराव यांसही आपल्या मुलांच्या गाण्यांत तल्लीन झालेल्या स्थितींत सोडून आम्हीं वाचकांस या कुटुंबाची थोडीशी माहिती सांगतों.

बळवंतराव हा गृहस्थ वयानें आज सुमारें पंचेचाळीस शेहेचाळीस—एखादें वर्ष अधिकच असेल.—इतक्या वयाचा होता. तो अंगानें चांगला सुदृढ, दिसण्यांत मोठा भव्य, सुस्वरूप असा होता. इंग्रजी अंमल थोडा बहुत पक्का होऊन इंग्रजी शिक्षणाचा

प्रसार होऊं लागतांच जी मंडळी समाज-सुधारणेच्या उद्योगाकडे वळली, त्या मंडळींतल्या दुसऱ्या संचांतले ते होते. त्यांच्याहून वृद्ध मंडळी होती. त्यांच्या विचारांनीं व शिकवणीनें, आणि उदाहरणांनीं ज्यांच्या मनावर विशेष परिणाम झाला अशा तरुण मंडळीपैकीं ते होते. पंचाहत्तर सालाच्या सुमारास ज्या कांहीं सुधारणेच्या चळवळी झाल्या त्या चळवळींत यांनीं प्रमुखत्वानें अंग होतें. कोणताही गोष्ट करावयाची म्हटली म्हणजे अगदीं पुढें होऊन करण्यास हे कधींही मागें घेत नसत. विशेषतः विधवापुनर्विवाहाच्या कामांत तर त्यांचें पाऊल अगदीं पुढें. स्त्रीशिक्षण व विधवापुनर्विवाह या दोन सुधारणा अगदीं जरूर झाल्या पाहिजेत असें प्रतिपादन करून अट्टाहासानें त्या गोष्टींचा प्रवेश आपल्या समाजांत करण्यासाठीं ज्यांनीं कायावाचामनानें प्रयत्न केला; त्यांच्यापैकीं तरुणांत बळवंतराव अगदीं प्रमुख असत. यामुळें त्या सुधारणांच्या वृद्ध पुढाऱ्यांचे आधारस्तंभ काय ते आमचे त्यावेळीं अगदीं तरुण असे बळवंतरावच होत. त्यांनीं कित्येक पुनर्विवाहांचे वेळीं फार खटपट व मदत केली. कित्येक घडवून आणण्याचे विलक्षण प्रयत्न केले. आणि स्त्रीशिक्षणासाठीं तर त्यांनीं किती प्रयत्न केले असतील त्याचा नेमच नाहीं. ते पूर्व रीतीप्रमाणें विवाहित होते आणि त्या अव्वल अमदानींत लवकर चाकऱ्या लागत असल्या कारणानें त्यांनीं कांहीं कारणानें मुंबईस नोकरीही धरली होती. त्यांचे घरची गरिबी होती, तथापि मुलगा होतकरू असल्यामुळें बापानें त्यास अधिक शिकण्याची तजवीज करून देण्याचें योजिलें होतें, युनिव्हर्सिटीचें शिक्षण त्यावेळीं आतां इतकें महाग नव्हतें यामुळें त्यानें उमेद धरली होती, परंतु बळवंतराव एफ्. ई. ए.च्या वर्गांत असतांनाच या नादीं लागल्या कारणानें व बापास त्याचा हा नाद अगदीं आवडत नसल्याकारणानें बापलेकांचें बनेनासें झालें. ज्या बापाचें व आपलें पटत नाहीं व आपल्या मतांमुळें ज्यांची अवज्ञा करण्याचा आपल्यावर प्रसंग येतो, त्यांच्यावर आपल्या शिक्षणाचा व आपल्या बायकोच्या पोषणाचा भार तरी आपण काय म्हणून घालावा? असें मनांत येऊन त्या तडफीबरोबर आपली एफ. इ. ए.ची परीक्षा होतांच त्यांनीं चाकरी धरली. त्या काळांत चाकऱ्या इतक्या दुष्कर व दुर्लभ झाल्या नव्हत्या. आणि ज्यांच्या पक्षाचा बळवंतराव आश्रय करून होते त्यांपैकीं पुष्कळ लोक मोठमोठाल्या अधिकारावर असल्यामुळें बळवंतरावांस तावडतोब पन्नास रुपये दरमहाची चाकरी लागण्यास मुळींच अडचण पडली नाहीं. लागलीच त्यांनीं मुंबईस आपलें निराळें बिऱ्हाड केलें आणि आपल्या अल्पवयस्क कुटुंबास घेऊन ते राहिले. त्यांची मोठी महत्वाकांक्षा ही होती कीं, आपण आपल्या बायकोस सुशिक्षण देऊन आपण स्वीकारलेल्या सुधारणेच्या कार्यांत तिच्याकडूनही चांगली मदत होईल असें करावयाचें. परंतु मनुष्य ज्या आशा किंवा महत्वाकांक्षा धरतो, त्या सर्वच त्याच्या इच्छेप्रमाणें सफल होतात असें नाहीं. त्यांतलीच बळवंतरावांची गोष्ट झाली. आपल्या वडिलांच्या मर्जीविरुद्ध वागणूक करून व कॉलेज सोडून, चाकरी धरून बिऱ्हाड वगैरे करून सुमारें दोन वर्षें झालीं नाहींत तोंच बळवंतरावांस पत्नीवियोग होऊन त्यांच्या आशेचा पूर्ण विरस झाला. आपल्या

पत्नीच्या समागमांत त्यांनीं कांहीं फार दिवस घालविले नव्हते; परंतु तेवढ्या अवकाशांत त्यांचें दोघांचें प्रेम अत्युत्कट झालें. आधीं तारुण्य आणि त्यांत बळवंतरावांचे मनांत नानाप्रकारचे विचार. यामुळें त्यांचें मन अगदीं विलक्षण प्रेमानें उंचंबळून असे व पत्नीचें आपल्या ठिकाणीं इतकें प्रेम पाहून त्या पत्नीच्याही अंतःकरणांत प्रेम व महत्वाकांक्षा यांस जागा मिळाली. दोघेंही नाना प्रकारच्या गोष्टी बोलत, नाना प्रकारचे बेत करीत; परंतु वर सांगितल्याप्रमाणें पहिल्या अपत्यास जन्म देण्याचे वेळींच ती त्यांची तरुण पत्नी त्यांस व त्यांच्या बेतांविचारांस अचानक सोडून परलोकीं गेली ! बळवंतरावांस अनोनात शोक झाला. आपल्या अल्पवयी पत्नीनें आजपर्यंत आपणांस फार धीर दाखविला. घरांतली सर्व मंडळी अगदीं नांवें ठेवीत असत, त्या कोणाकडे लक्ष्य न देतां तिनें आपल्या एकट्याकडे लक्ष्य देऊन प्रत्येक बाबतींत आपल्या सांगण्याप्रमाणें आचरण केलें. कधीं कोणत्याही गोष्टीत ना म्हटलें नाहीं. पुनर्विवाहितांच्या पंक्तीला बसण्यास; सभांना जाण्यास; वेळ प्रसंग पडला तर भाषण करण्याससुद्धां तिनें कधीं नाहीं म्हटलें नाहीं. ती बायको गेल्याबरोबर आपल्या संसारांत एकाएकीं मोठी थोरली उणीव पडली. आतां येथपासून पुढें आपल्याला सुखाचें वारें सुद्धां लागणें शक्य नाहीं असें वाटून तो शोक करूं लागला. पुनरपि आतां लग्न करावयाचेंच नाहीं असा त्यानें निश्चय केला. त्याची मित्रमंडळी त्याचें समाधान करूं लागली. शत्रुमंडळी "घोडथयांचीं लग्नें लावण्याचें विलक्षण साहस करणाऱ्या नरवीरांचे एक अग्रणी आतां रिकामे झाले असल्याकारणानें लवकरच एक पुनर्विवाह केल्याचा पराक्रम दृष्टीस पडणार आहे" असें लिहूं व बोलूं लागली. तो बिचारा सुतकांत व शोकांत असतांना दुसरे कीं तिसरेच दिवशीं एका विक्षिप्तानें जाऊन त्यास विचारलें कीं, "एखादी बिचारी चिखलांत रुतलेली गरीब गाय बाहेर काढण्याचें श्रेय घेतां येईल असा प्रसंग देवानें तुमच्यावर आणून दिला; याबद्दल तुम्हांला मोठा आनंद झाला असेल नव्हे ?" तो प्रश्न ऐकून बळवंतरावास अतिशय संताप आला. दुसरा एखादा माणस असता तर त्याचें संतापानें भान नाहींसें होऊन त्यानें त्यावेळीं त्या माणसास काय केलें असतें आणि काय नाहीं याचा सुमार नाहीं. परंतु बळवंतरावानें फार शांतपणें त्यास सांगितलें कीं, "तसले विचार येण्याची माझ्या मनाची स्थिति नाहीं, तेव्हां कृपा करून दुसरें कांहीं बोलाल तर पहा; नाहीं तर मला एकटेंच बसलें असतां विशेष समाधान होणार आहे."

बळवंतरावास वरच्याप्रमाणें कित्ती लोकांनी तरी लावून खोंचून भाषणें केलीं. सुमारें पंचवीस तीस तरी निनांवी पत्रें येऊन त्यांत वाटेल त्या तऱ्हेचा मजकूर लिहून कित्येकांनीं आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. परंतु बळवंतरावांनीं आपल्या मनाची शांति सोडली नाहीं. "ज्यांना बहुजनांविरुद्ध कांहीं गोष्टी करावयाच्या त्यांनीं चिडून संतापून उपयोगी नाहीं." हें तत्त्व त्यानें आपल्या मनांत पक्के बाणून घेतलें होतें व त्याप्रमाणेंच त्यानें त्या वेळीं वर्तन केलें. लोकांत अगदीं सुद्धां संताप दाखविला नाहीं, किंवा कोणी कांहीं उणीं उत्तरें केलीं

तर त्याबद्दल कांहीं सुद्धां प्रत्युत्तरें केलीं नाहींत.

कुटुंब वारल्यानंतर वडिलांनीं पुनः बळवंतरावास घरीं येण्याविषयीं व दुसरा विवाह करण्याविषयीं अत्याग्रह चालविला. बळवंतरावानें नाहीं ह्मणावें, आणि वडिलांनीं त्यांच्यासाठीं मुली पहातच रहावें. मुली त्याला दाखवाव्या, आपल्या बायकोकडून व मुलीकडून (बळवंतरावांच्या बहिणीकडून) त्यांस आग्रह करावा. परंतु बळवंतरावांनीं कोणासही दाद दिली नाहीं. वर्ष दीड-वर्षपर्यंत तर अगदीं आपला निश्चय कायम ठेवला; परंतु पुढें सृष्टीच्या नियमाप्रमाणें त्यांचें मनास प्रथम पत्नीचा विसर पडून "आपण खरोखरीच एखाद्या कुलशीलवती विधवेशीं विवाह करावा, ह्मणजे आपल्या मनाप्रमाणें आचरण होईल, आणि आपण पुनः संसारांत पडून आपल्या इच्छेप्रमाणें समाजसुधारणेचें गाडें पुढें ढकलण्यास हातभार लावूं. जन्मभर अविवाहित राहून काय करणार ? असा विचार त्यांच्या मनांत येऊं लागला. तो त्यांनीं आपल्या वृद्ध व तरुण मित्रमंडळीस सांगितलाही; अर्थातच पुष्कळांस तो पसंत पडला. कोणी त्यास आम्ही अमुक मदत करूं, आम्ही तुमच्या पंक्तीला बसूं, आम्ही आपल्या मुलास तुमची भावी मुलगी करूं व तुम्हांला मुलगा झाल्यास त्याला आमची भावी मुलगी देण्यास मुळींच मागें पुढें पहाणार नाहीं अशीं आश्वासनें सुद्धां दिलीं; परंतु अशा आश्वासनांनीं हुरळून जाणाऱ्या पढतमूर्खांपैकीं बळवंतराव नव्हता. पुनर्विवाह करावयाचा म्हणजे कुल, शील, गुण वगैरे न पहातां वाटेल तिच्याशीं एकदां लग्न उरकून घ्यावयाचें असा त्याचा विचार नव्हता. यामुळें वधू मिळण्यास फार त्रास पडेलसें दिसलें. शिवाय आपला मुलगा स्वतः पुनर्विवाह करण्याइतका बहकला असें बळवंतरावांच्या वडिलांस कळतांच त्यांनींही पुनः आपला तटस्थपणा सोडून त्याचें मन वळविण्याचा पराकाष्ठेचा यत्न चालविला. अशा विलक्षण स्थितींत बिचारा पडला होता. मनाचा तर निश्चय कीं, बोलल्याप्रमाणें करावयाचें आणि इकडे तर असा त्रास होऊं लागला. इतक्यांत त्यांची त्या कचाटींतून अचानक सुटका झाली. त्यांच्या एका वृद्ध मित्राची भाची एकाएकीं विधवा झाली. तिला मामाखेरीज दुसरें कोणी नव्हतें, आणि मामा या पक्षांतले असून त्यांस हा योग जुळून आल्यास बरा असें वाटलें, व त्यांनीं तो योग जुळवून आणण्याची खटपट चालविली. ही खटपट त्यांनीं चालविली खरी, परंतु त्यांच्या घरांतून त्यांस या कामांत मुळींच उत्तेजन मिळेना; तथापि त्यांनीं आपल्या भाचीचें मन वळविलें. बळवंतरावांनीं त्या मुलीस पाहिलें, त्यांच्याही मनांत ती भरली आणि ती खरोखरच तशी होती. स्वरूप सुंदर, गुण त्याच्याहून सुंदर आणि स्वभाव केवळ अमोल. लग्नाची तिथी ठरली. मुंबईंतच एका बाजूची जागा पाहिली, खरे मित्र तेवढेच बोलावले. द्वारकाबाई त्यावेळीं सतरा वर्षांची होती. बळवंतराव आणि द्वारकाबाई यांचा जोडा उत्तम जमला. दोनही माणसें धीराचीं, निश्चयाचीं आणि स्वमतासाठीं व सत्यासाठीं काय वाटेल तीं संकटें सोसण्यास तयार अशीं असल्यामुळें त्यांचें दोघांचें फार चांगलें जुळलें. बळवंतरावांस

पन्नास रुपये पगार होताच, यामुळें साधारणतः संसाराची त्यांस मुळींच काळजी नव्हती; परंतु लोकांकडून त्यांस फारच त्रास झाला. ज्यांनीं त्यांच्या भावी मुली करण्याचें व भावी मुलांस मुली देण्याचें कबूल केलें होतें, त्यांनीं त्यांच्या पंक्तीला बसावें लागेल. निदान "नाहीं चोआ बसतां येत" असे लाजिरवाणे शब्द उच्चारावे लागतील, या भीतीनें त्यांचे घरीं जाणें येणें सोडलें. अशा तऱ्हेनें मित्र म्हणविणाऱ्या लोकांपैकीं पुष्कळांचें खरें स्वरूप प्रकट झाल्याबरोबर बळवंतरावांस फार वाईट वाटलें आणि लोकनिंदेला जरी तो तयार होता; तरी अशा मित्रांच्या ढोंगी आचरणावर पांघरूण घालण्यास तयार नसल्यामुळें त्यानें आपल्या तारुण्याच्या धमकेंत वर्तमानपत्रांत त्या लोकांचें स्वरूपाविष्करण केलें. अर्थातच त्या लोकांचा त्याजवर रोष होऊन अन्य मार्गांनीं त्याला मिळण्याचा संभव असणारी मदत मिळेनाशी झाली. त्यांत एक त्याचे वरिष्ठच असल्या कारणानें त्याची बढतीही बंद झाली; परंतु त्यानें असल्या गोष्टींस भीक घातली नाहीं. त्यानें पन्नास रुपये दरमहांतच कित्येक वर्षे आपला संसार कोणास दैना न दाखविता व कोणाची करुणा न भाकतां चालविला. प्रथम कांहीं वर्षे त्यास अपत्य झालें नाहीं, यामुळें द्वारकाबाईस संसाराचीं कामें करून आपलें ज्ञान वाढविण्यास सवड सांपडली. त्यांस चांगलीं सहा वर्षे स्वतःच्या शिक्षणास सांपडलीं आणि बळवंतरावाच्या सहाय्यानें त्यांनीं त्या वर्षांचा चांगला फायदा करून घेतला. पुढें त्यांस एक मुलगी झाली. फारा दिवसांनीं अपत्य झाल्यावर त्यांच्या आनंदाला काय विचारतां ! मुलगी हुबेहूब आपल्या आईप्रमाणें दिसत असे. आणि ती जसजशी वाढत चालली तसतशी आपल्या आईची प्रतिमाच बनत चालली. तिचें नांव आईबापांनीं कमला ठेविलें. कमलेनंतर दोन वर्षांनीं एक मुलगा झाला. त्याचें नांव गोपाळ ठेविलें. मुलगा हुबेहूब जनकाची प्रतिमा होणार असें जो तो म्हणूं लागला. त्यानंतर सुमारें दहा वर्षांत कांहीं अपत्य झालें नाहीं. पुढें एक अपत्य अकालीं जन्मून तत्काळ मृत झालें व तेव्हांपासून द्वारकाबाईस बाळंतरोगाची भावना झाली. त्यावर बळवंतरावांनीं नानाप्रकारचे उपाय केले, परंतु रोग हटेना. डाक्टर म्हणत ते उपाय बळवंतरावांनीं करावयाचे, परंतु दोन दिवस बरें वाटलें, कीं पुन्हां चार दिवस प्रकृति बिघडावी. त्यांत एक मोठी काळजी द्वारकाबाईस लागली असल्यामुळें तर तिला कधींतरी गुण येईल कीं नाहीं याची शंका बळवंतरावास येई. आपल्या पोरीचें आतां लग्न कसें होणार, हा प्रश्न केवळ हृद्रोगाप्रमाणें तिला जाळीत होता. बळवंतराव त्या बाबतींत अगदीं निष्काळजी असत, आणि ते द्वारकाबाईस तसेंच निश्चिंत राहण्यास व परमेश्वरावर भार टाकण्यास सांगत.. परंतु तिच्या क्षीण चित्ताला तें शक्य नव्हतें. अलीकडे अलीकडे ती एवढें मात्र करी कीं, आपल्या पतीच्या समक्ष त्यासंबंधाचे उद्गार काढीत नसे. होतां होतां रोगाचा प्रादुर्भाव अधिक झाला; तेव्हां डाक्टरानें बळवंतरावास असें सांगितलें कीं, समुद्रकांठच्या हवेला अगदीं निवांत अशा जागेत बंगला घेऊन तेथें रहाल व तेहमीं यांना करमणूक होईल अशी तजवीज कराल तर यांच्या जिवास आराम होईल. बळवंतरावास आतां कोठें नव्वद रुपये झाले होते. कारण त्यांचे ते

जुने वरिष्ठ नुकतेच पेनशन घेऊन गेले होते त्यामुळें त्यांची प्रथमच बढती झाली. पण नव्वद रुपयांत समुद्रकांठीं बंगलाल वाडा कोठून येणार ! पण अशा मनुष्याची काळजी देवास असते. मुंबईचे एक भाटे त्रिकमदास गोवर्धनदास बळवंतरावाचे फार वर्षांचे स्नेही होते. डॉक्टरांनीं जेव्हां वरील उपाय सांगितला, तेव्हां ते गृहस्थ बळवंतरावाच्या कुटुंबाच्या समाचारास आले होते. त्यांनीं तेवढेंच ऐकून आपल्या घरीं गेल्यावर बळवंतरावास आपला एक समुद्रकांठचा बंगला वाटेल तितके दिवस देण्याचें लिहून तेथें जाण्याबद्दल अतोनात आग्रह केला. इतकेंच नव्हे, तर द्वारकाबाईस मी आपली बहीण समजतों आणि या वेळीं जर आपण माझ्या मदतीचा स्वीकार केला नाहीं, तर मला फार वाईट वाटेल असें लिहिलें. विनाकारण कोणाचे—मित्राचे सुद्धां उपकार घ्यावयाचे नाहींत हा बळवंतरावाचा स्वभाव त्रिकमदास शेटजींना पक्का माहित असल्यामुळेंच त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें लिहिलें. बळवंतरावाचा नाइलाज झाला, व त्यांनीं तें म्हणणें कबूल करून ते वर वर्णन केलेल्या बंगल्यांत येऊन राहिले. तेथें येऊन राहिल्यास त्यांना आज आठ दिवस झाले होते, व हें कथानक सुरू होण्याच्या आदलेच दिवशीं मुंबईच्या डाक्टरांनीं बाईच्या प्रकृतींत पुष्कळ सुधारणा आहे असें सांगितलें होतें. परंतु नवीन कथानक सुरू करतांना प्रारंभीं अगदीं अपरिहार्य अशी जी पूर्वकथा ती आतां सांगत बसण्यापेक्षां आपणही त्या बंगल्यांत, आंत येतां येतां कमलेच्या सुस्वर गायनानें मध्येंच थबकून उभा राहिलेल्या तरुणाप्रमाणें तिचें गाणें चित्त लावून ऐकूं व मग तो कोण, काय होता आणि आमच्या ह्या मंडळींचें पुढें चरित्र कसें झालें तें पाहूं.

# प्रकरण २ रें.

## दोन नवे गृहस्थ.



तीं दोघें तें आपल्या पित्याचें आवडतें पद आपल्या मधुर स्वरानें व आपलें सर्व अंतःकरण जणू काय त्यांत लीन करून म्हणत होतीं. पद कांहीं कोणत्या रागदारींत बसविलेलें नव्हतें, किंवा यावेळीं तीं गाणारीं मुलें कांहीं रागदारी शिकलेलीं व नाना मारण्यांत प्रवीण अशीं नव्हतीं. कमला जात्या हुशार, तिची ग्राहकशक्ति फार विलक्षण, यामुळें शाळेंत आठवड्यांतून तीनदां हार्मोनिअम वाजवून गावयास शिकवीत; तेवढ्यानेंच ती चांगलें गाऊं लागली होती. इतकी कीं, सुमारें महिन्यापूर्वींच तिची वार्षिक परिक्षा झाली तींत इतर सर्व विषयांत पहिला नंबर येऊन या विषयांत तिनें फारच उत्तम प्रतीचे

मार्क मिळविल्यामुळें शाळेच्या मुख्य शिक्षकिणीनें आपल्या पगारांतून पैसे खर्चून हार्मोनिअम विकत घेऊन तिला बक्षीस दिला होता. तो घरीं आला, तें दिवशीं मातापितरांस व तिच्या छोट्या भावास किती तरी आनंद झाला! तोच हार्मोनिअम आज ती वाजवीत होती. तो घरांत येण्याबरोबर तिनें पहिलें पद त्यावर बसविलें, तेंच तिच्या बापाचें आवडतें पद होय. तेंच आज ती वर सांगितल्याप्रमाणें फार प्रेमळपणें गात होती.

तो देखावा—तो एकंदर वेळच—फार विलक्षण आनंद देणारा होता. चांदणें फारच सुंदर पडलें असून असें वाटे, कीं जणू काय चंद्र आपल्या तेजःसागराच्या लाटा भराभर भराभर खालीं पृथ्वीवर लोटून देत आहे आणि त्या चांदण्यानें ज्याप्रमाणें डोळ्यांस त्याचप्रमाणें त्या बंगल्याच्या आसपास असणाऱ्या लोकांच्या कर्णांसही त्या वेळचें तें कमलेचें गाणें अत्यंत आल्हाद देत होतें यांत शंका नाहीं. मागील प्रकरणांत प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें तें श्रुतिमधुर गाणें ऐकून दूर रस्त्यावरून जाणारा येणारा तर क्षणमात्र थांबून लक्ष्यपूर्वक ऐकत असेच, परंतु शेजारपाजारच्या बंगल्यांतील मंडळीही तें ऐकण्यास आपआपल्या व्हरांड्यांतून उभी राहिली होती आणि एकाग्र चित्तानें ऐकत होती. असो.

त्या पदाचें शेवटलें कडवें कमलेनें ह्मटलें. तिच्या अत्यंत कोमल मधुर आवाजाचे तरंग हळूहळू कमी होत चालले, तेव्हां बंगल्याच्या दारांत थबकलेला तरुण गृहस्थ पुढें पावलें टाकून बंगल्याकडे येऊं लागला. याचें वय सुमारें एकोणीस किंवा वीस वर्षांचें असेल. त्याच्या चेहऱ्यावर फारच रमणीय असें स्मित दिसत होतें. त्याचा चेहरा फार भव्य व सुंदर होता. एकंदर शरीरच फार नीटस, डोळे मोठे व पाणीदार, अंगकांति गोरी, ओंठावर मिशी कोठें दिसूं लागते न लागते इतक्या बेतांत होती. प्रकृति फार सुदृढ, आणि हात पाय अगदीं अव्यंग असावेत असें स्पष्ट दिसत होतें. तो या वेळीं अगदीं सावकाश चालत होता. तरी पण तेवढ्यांतल्या तेवढ्यांत, त्याची चालण्याची ढब अगदीं ऐटबाज असावी, असें वाटण्यास कारण होतें. त्याचा पोषाख साधा होता, डोक्यास एक जरीचा रुमाल, अंगांत कोट व त्याजवरून एक उपरणें इतकें होतें. तो बंगल्यांत येत होता, तो अगदीं सावकाश येत होता हें वर सांगितलेंच आहे. जणूं काय, आणखी एखादें पद सुरू झालें, तर आपल्यास तेथल्या तेथेंच थबकून ऐकण्यास सांपडावें अशी त्याची मनापासूनची इच्छा असावी, कदाचित् तशी अपेक्षाही असेल; परंतु ती अपेक्षा पूर्ण होण्याचा कांहीं रंग दिसेना. तो अगदीं पायऱ्यांशीं येऊन ठेपला, त्याची चाहूल ऐकतांच बळवंतरावांनीं मागें वळून पाहून त्याच्या नांवानें हांक मारली. त्यानें ओ देतांच त्यांनीं गोपाळास एक खुर्ची आणण्यास सांगितलें आणि कमला आपल्या हार्मोनिअमच्या खुर्चीवरून उठून पदर सांवरीत उभी राहिली. पद्माकरपंतः 'खुर्ची कशाला? खुर्ची कशाला! मी इथेंच बसतों' असें ह्मणून इकडे तिकडे पाहतात, तों गोपाळानें एक खुर्ची आणून आपल्या वडिलांच्या खुर्चीशेजारीं ठेवलीही. तेव्हां त्यावरच हे गृहस्थ बसले आणि द्वारकाबाईस विचारतातः—

"आजची काय आहे हालहवाल? आज जरा बरी दिसते आहे प्रकृति!"

द्वारकाबाईः—कांहीं बरी वाटते आहे खरी, पण कायम गुण आला तर उपयोग नाहीं तर कोठेंही नव्यानें गेलं, कीं पहिल्या-प्रथम चार आठ दिवस आपलं बरं वाटतं. वाटतं कीं, आतां आपलं दुखणं गेलं. पण एकदां नव्याचे नऊ दिवस झाले कीं, पुनः येरे माझ्या मागल्या आहेच. तशांतलं न होवो म्हणजे झालं. बाकी मी तयारच आहे जायला......

"ताई हें काय हें असं बोलतां ? तयार काय तूं जातां कुठें ? तुम्ही गेल्यावर आमचं साऱ्यांचं कसं होणार ? तुम्हांला सांगूं का ? तुमचं दुखणं तुमच्या हातांत आहे. मला वाटतं, तुम्हीं मनांत भारी झुरतां. कांहीं तरी मोठी चिंता लागून जशी मनुष्याची स्थिति व्हावी, तसं हें तुमचं झालेलं आहे. ती चिंता मनाला काय असेल, ती सोडून द्या. पुनः एक महिन्यांच्या आंत तुमची प्रकृति अगदीं जशीच्या तशी न झाली, तर नांव बदलीन. बळवंतराव मी म्हणतों ही गोष्ट खरी का खोटी, तुम्हींच सांगा बरं. कमले, तूं अशी उभी कां ? हार्मोनिअम वाजवतांना बसून बसून थकलीस वाटतं !" पद्माकरपंतानें हंसत हंसत कमलेकडे पाहून हें शेवटलें वाक्य म्हटलें. तेव्हां कमळा लाजून दुसरीकडे पाहूं लागली व तिच्या तोंडावर स्मित दिसूं लागलें.

इतक्यांत बळवंतराव पद्माकरपंतास म्हणतात, " अहो, आज पुष्कळ बरं आहे बोवा, डॉक्टरांनीं सांगितल्याप्रमाणें कांहीं थोडासा गुण दिसतो आहे खरा. आधीं पहिली गोष्ट ही, कीं ती आज आपण होऊन मला क्षणभर बाहेरच्या बाजूस पडून चांदण्याची मौज पाहूं या असें म्हणाली. नाहीं तर तिला जागचं हलायचं म्हणजे मोठं जिवावर येतं. आज कांहीं नाहीं. आज आपण होऊन चालत येऊन इथें खुर्चीवर पडली. मी उगीच जवळ राहून हात दिल्यासारखं केलं इतकंच. "

पद्माकरपंतः—तें दिसतेंच. आज पांच चार दिवसांपेक्षां तजेला ज्यास्ती दिसतोच आहे. मला तर वाटतं बोवा कीं आणखी एक महिनाभर जर इथें राहिलांत तर यांची प्रकृति खात्रीनं सुधारेल. मला परवांच डॉक्टरनीं सांगितलं कीं, अजून वायूतल्या अंगिनमूनां कांहीं मुद्दां झालेलें नाहीं.

द्वारकाबाईः—बरं पण तें राहूं द्या. तुमची परीक्षा काय म्हणते आहे ?

पद्माकरपंतः—आमची परीक्षा काय म्हणते आहे तें आतां निकालाच्या दिवशीं समजेल. निकालाला आतां कांहीं फार दिवस नाहींत.

बळवंतरावः—अग, त्यांची परीक्षा काय म्हणणार ? आजपर्यंतच्या परीक्षांनीं जें म्हटलं. तेंच हीही परीक्षा करणार. कां पद्माकरपंत, मी म्हणतों असंच कीं नाहीं?

पद्माकरपंत नुसता हंसला. अधिक कांहीं बोलला नाहीं.

तेव्हां बळवंतराव त्यास आणखी म्हणतो, "पद्माकरपंत, तुमची जर आम्हांला मदत नसती, आणखी तुम्ही अगदीं नेमानं येऊन जर आमची विचारपूस करतां ना, तर आम्ही येथें काय केलं असतं, मला तर कांहीं समजत नाहीं."

तें एकल्याबरोबर मात्र पद्माकरपंत एकदम त्यास म्हणतो, "बळवंतराव, तुम्हीं हें असं बोलतां त्यानं मला चमत्कारिक वाटतं बोआ. मी जर तुम्हांला आपल्या काकांप्रमाणें मानीत आलों, आणखी ताईंच्या ठिकाणीं जर माझी अतिशय भक्ति आहे, तर मी रोज नुसता येऊन घटका दोन घटका बसतों यांत मोठंसं तें काय करणार !

माझी तर अशी इच्छा आहे, कीं यंदा आतां घरीं वडिलांकडे जायचंच नाहीं. मी काल त्याप्रमाणें त्यांना पत्र सुद्धां लिहिलें कीं, परीक्षा झाल्यावर मी यंदां घरास येणार नाहीं. इथेंच रहाणार आहे. अशा वेळीं जर तुह्मांला मित्रांनीं मदत करायची नाहीं, तर करायची तरी केव्हां ? मला तर असं वाटतं कीं, इथें तुमच्याजवळ येऊन राहून यांची शुश्रूषा करावी. माझी आई आजारी पडली तर तिची नाहीं का मी सेवा करणार ! तशाच या."

बळवंतराव क्षणमात्र मोठ्या आदरानें व मोठ्या प्रेमानें त्याच्याकडे पहात राहिले. व लागलेच त्याला म्हणतात," पण तुमची घरची मंडळी वाट पहातील. दादासाहेब काय म्हणतील ? आज इतके दिवस तुम्ही त्यांच्यापासून दूर राहिलांत तेव्हां त्यांना नसेल का वाटत सुटींत तुम्ही घरीं यावं म्हणून ? माईसाहेबांनाही तसंच वाटेल. तेव्हां तुम्हीं जावं हें बरं नव्हे का ? आमच्या-साठीं तुम्हीं त्यांचा मनोभंग करावा हें नाहीं बोआ आपल्याला बरं वाटत."

पद्माकरपंत कांहीं बोलला नाहीं. त्यानें तो विषयच बदलला आणि गोपाळाकडे वळून म्हणतो, " गोपाळ, मीं तुला दिलेलं पुस्तक कांहीं वाचलंस का ? त्यांत कुठें अडलं, तर मला विचार अं! मी तें तुला छान समजाऊन देईन. मला तें बुक मोठं आवडतं. त्यांतली एकंदर गोष्ट मोठी मौजेची आहे. म्हणूनच तुला वाचायला दिलं."

गोपाळानें लागलीच त्यास ह्मटलें, " मीं त्यांतलीं दहा पानं वाचलीं आणखी मला जिथें अडलं तिथें मला माईनं आ-णखी बाबांनीं समजावून सांगितलं. "

याप्रमाणें त्याच्या अगदीं साध्या दर-राजच्या अशा गोष्टी चालल्या होत्या. इत-क्यांत मध्येंच कोणाचीशी चाहूल लागली. पद्माकरपंत व बळवंतराव जरा वळून पहा-तात तों ज्याची चाहूल लागली तो गृहस्थ पुढें आला व बळवंतरावास एकदम मोठ्यानें म्हणतो, " काय बळवंतराव, कसं काय आहे ? मी आज पांच सहा दिवस येईन येईन ह्मणतों आहें, परंतु कांहींना कांहीं तरी मधें अडचण येई. त्यांत आणखी आमचे साहेब इथें आले आहेत, त्यामुळें ऑफिसांतच चांगलें दिवे लागेपर्यंत ब-सून काम करावं लागतं. सेवा ह्मटली ह्म-णजे मग तिथें कांहीं सुद्धां लटपट चालत नाहीं. याचा अनुभव तुम्हांला आहेच. आमच्या ऑफिसांत तर आतां नुसता चावटपणा झाला आहे. हेडक्लार्क पडले ब्रम्हद्वेष्टे, त्यांतून आमच्या स्नानसंध्या-शीलपणाचा तर त्यांना फार तिटकारा. तेव्हां आमच्या बोकांडी कामच काम लादून देतात.

हे नवीन आलेले गृहस्थ तेथें येतांच कमला आपली हार्मोनिअमची पेटी बंद करून ठेवून आंत जाऊं लागली. तेव्हां आपलें तें बोलणें तितकेंच ठेवून ते गृहस्थ तिच्याकडे पाहून म्हणतात, " वा ! वा ! आह्मी आलों ह्मणून पेटी लावून चाललीस का ? बस तिथं. एखादं गाणं म्हण. तूं फार चांगलीं गाणीं म्हणतेस असं मीं ऐकलं आहे. एकदा आह्मांला तर ऐकूं दे बरं कसं काय म्हणतेस तों. मी कांहीं कोणी परका नाहीं. "

परंतु कमलेनें तें ऐकलें न ऐकलेंसें क-रून तीं ठेवून निघालीच.

त्या गृहस्थास किंचित् वाईट वाटलें, किंवा त्याची निराशा झाली असें दिसलें; परंतु नुसती निराशा होऊन बसणारे ते

गृहस्थ नव्हते. ते आपल्या जागेवरून ति-च्यापुढें गेले व तिला आणखी म्हणतात, "तूं सुधारकाची मुलगी, तूंग काय लाजतेस ? आमच्या सारख्यांच्या मुलींसारखीच का तूं लाजतेस ? वा ! "

कमलेच्या मुद्रेवर किंचित् त्रासाची छाया दिसली. तिच्या कपाळावर एक आठीही उपजली, आणि "मी इतका वेळ वाजवीत आणि गाणें म्हणतच होतें. मला आतां कंटाळा आला," असें पुटपुटली. बळवंतरावांनाही त्या गृहस्थाचा हा लवलपणा आवडला नसावा असें दिसलें. कारण, त्यांच्याही चर्येवर किंचित् त्रासिकपणा दिसला व ते त्यांस म्हणतात, " पुनः एखादे दिवशीं म्हणेल ती, आतां कंटाळली असेल खरीच. " तेव्हां त्या गृहस्थाचा नाइलाज झाला, व किंचित् मागें सरून त्यानें कमलेस जाऊं दिलें. इतक्यांत गोपाळानें तिसरी खुर्ची आणून ठेवली, तिच्यावर बसण्याविषयीं बळवंतरावानें त्या नव्या गृहस्थास विनंति केली.

हा नवा गृहस्थ येथें आलेला पाहून पद्माकरपंतासही बरें वाटलें नसावें असें दिसलें. तो त्या गृहस्थाच्या बोलण्याकडे वगैरे मुळींच लक्ष्य न देतां द्वारकाबाईस म्हणाला, " ताई, तुम्हांला इथें पडून बराच वेळ झाला, आणखी आतां हवेंत थोडी सर्दीही उत्पन्न झाली आहे. आंत येत असलां तर मी तुम्हांला धरून हलकेच आंत नेतों. "

द्वारकाबाई जणूं काय, असें कोणी तरी म्हणेल काय, याची वाटच पहात असावी, असें दिसलें. कारण तिनें पद्माकरपंतांच्या म्हणण्यास तेव्हांच रुकार दिला आणि झटकन उठण्याचाही तिनें प्रयत्न केला. पद्माकरपंतानें लागलीच तिला हात देऊन सांवरलें व एकीकडून त्यानें आणि दुसरीकडून गोपाळानें तिला सांवरून आंत नेलें. कमलेनें आंत जाऊन आपल्या आईचा बिछाना साफसूफ करून ठेवलाच होता, त्यावर ती जाऊन पडली.

स्वच्छ चांदण्यानें रमणीय दिसणाऱ्या आकाशांतील शोभेला ज्याप्रमाणें एकाएकीं उपस्थित झालेल्या वादळानें दग आणून अगदीं नष्ट करून सोडावें, त्याप्रमाणें त्या लहानशा कुटुंबाच्या सुखस्थितीला या गृहस्थाच्या येण्यानें नष्ट करून टाकलें. बळवंतराव नाइलाजास्तव त्याच्याशीं बोलत बसला. बाकी सर्व मंडळी वर सांगितल्याप्रमाणें आंत गेली. न जाणों हा आला कशाला, असेंही प्रत्येकाच्या मनांत त्या वेळीं वाटत असेल. परंतु कोणी कोणापाशीं तसा उद्गार मात्र काढला नाहीं.

हा गृहस्थ सुमारें पसतीस वर्षांचा असावा. याचा वर्ण काळसर, तोंड अगदीं गांचरें असून नाक अगदीं बसकें होतें. मिशा खूप मोठाल्या, आणि त्यामुळें ओंठावर एक छप्पर बांधल्याप्रमाणें दिसत होतें. त्यांत आणखी त्यानें भले थोरलाले कल्ले ठेवलेले होते. डोळे बटबटीत असल्याकारणांनें तेही थोडेसे त्याच्या भेसुरपणास कारणच होते म्हटलें तरी चालेल. गृहस्थ अगदीं ठेंगणा होता, उंचीचा कमीपणा रुंदीनें पुष्कळच भरून काढला होता. त्यांत आणखी जर त्यांनीं आपल्या खिशांतून अग्निहोत्राची धमनी काढून ती फुंकण्यास सुरवात केली, तर कोठें कोठें नागपंचमीच्या दुसरे दिवशीं ज्यांची वर्षतिथी उत्सवली जाते, त्या शिराळशेटाचेंच स्मरण होई.

सर्व मंडळी आंत गेली,एवढ्या इशाऱ्यानें त्यानें समजावें कीं नाहीं, कीं आपलें आगमन या लोकांना कांहीं इष्ट नाहीं, पण तसें समजणारांपैकीं ती स्वारी नव्हती, मंडळी गेल्याबरोबर त्यांनीं आपल्या अंगरख्याच्या खिशांत हात घालून एक विडी व काड्याची पेटी तर काढलीच. आणि विडी पेटवून ओढण्यास सुरुवातही केली. आपल्या त्या छपरी मुखांतून धुराचा मोठा थोरला भपकारा सोडून ते बळवंतरावांस म्हणतात," कायहो बळवंतराव, तुमच्या बायकान मुली तर आमच्या बायकांमुळीं माराव्याच लाजतात, मुरकतात, मग तुम्ही सुधारक कसले? (दुसरा एक भपकारा बाहेर सोडून) आं! असें हो कसें? हें नाहीं बोआ आम्हांला पसंत. (आणखी एक भपकारा सोडून) अशानं आम्हीं तुम्हांला सुधारक म्हणणार नाहीं. (ह्यः ह्यः ह्यः ह्यः ह्यः करून आणखी हंसून व एक बुभुक्कार करून ) कां मी म्हणतों तें बरोबर आहे कीं नाहीं ! (मऽऽऽऽ करून हुऽऽऽऽऽऽऽ आणि खूपच मोठ्यानें हंसले व आचाराप्रमाणें व्हरांड्यांतच भिंतीवर थुंकले. )

बळवंतरावाच्या कपाळावर चार आंठ्या चढल्या. या गृहस्थास चुरचुरितसें उत्तर द्यावें असें त्यांच्या मनांत आलें, परंतु तो फार सज्जन व भिडस्त, आपल्या घरीं आलेल्या गृहस्थास टाकून बोलणें हें त्याचें ब्रीदच नव्हतें. " चाललेंच आहे. सगळे सुधारक तुमच्या कल्पनेप्रमाणें आणखी म्हणण्याप्रमाणें कुठें असतात. " एवढेंच त्यांनीं म्हटलें.

परंतु तेवढ्यानें आमच्या गृहस्थास उलट उत्तेजन आलें आणि ते बळवंतरावास म्हणतातः " बळवंतराव, तुमचं कांहीं मला ठाऊक नाहीं, तुमचा आमचा तुकताच परिचय, पण मी म्हणतों असे सुधारक तुम्हांला मी दाखवून देईन. बरं पण, तुमच्याजवळ कांहीं चिरूट निदान बर्डस् आय तरी असला तर काढा कीं; मला तो फार आवडतो. बाकी तुमचं तें दुसरं तिसरं कांहीं नको. हो, आम्हांला चिरूट चांगला त्रिचनापल्लीचा....... "

" मी तंबाखू मुळींच ओढीत नाहीं, विडी नाहीं. चिरूटही नाहीं. आणखी खातही नाहीं. अन दुसरं तिसरं काय म्हणतां त्याचं तर नांवसुद्धां या घरांत किंवा कुठेंही माझ्याजवळ काढूं नका. "

बळवंतरावांचें हें बोलणें ऐकून तो गृहस्थ आपली विडी खुर्चीच्या हातावर विझवीत अशा तऱ्हेनें हंसला कीं, त्यांच्या बोलण्यांतला एक शब्दही त्याला खरा वाटला नाहीं असें स्पष्ट दिसलें.

परंतु बळवंतराव त्यास अधिक कांहीं-एक बोलले नाहींत. फक्त आतां रात्र बरीच झाली असें त्यांनीं सुचवून त्यास आतां जाण्याची इशारत देण्याचा यत्न केला; परंतु व्यर्थ. त्या गृहस्थानें दुसरी विडी पेटविण्याचा उपक्रम केला. या गृहस्थाच्या हातून आपण सुटतों कसे, असें बळवंतरावांस झालेलें दिसलें. इतक्यांत आंतून पद्माकरपंत जाण्यासाठीं म्हणून बाहेर येऊन " मी आतां जातों. ताईचा किंचित डोळा लागला आहे. कमला जवळ बसली आहे. " असें म्हणून जोडा घालून पायऱ्या उतरूं लागला, तों " पद्माकर श्रीधर " कोणी इथें आले आहेत काय ? त्यांच्या नांवाची तार आहे असें मोठ्यानें म्हणत एक तारेचा शिपाई आंत आला.

" माझ्या नांवाची तार? " असें उद्गारून पद्माकरपंत खालीं वाटेंत त्या शिपायाजवळ गेला व त्यानें ती तार हातीं घेतली.

# प्रकरण ३ रें.

## सदूनाना.



पद्माकरपंतानें दोन वेळां ती उलटून सुलटून पाहिली. जणूं काय ती कोणाकडून आली असावी हें ती न उघडतांच समजलें तर पहावें असें त्यास वाटत असावें असें दिसलें. तारवाला शिपाई रिसीटीवर सही करून मागेपर्यंत त्याचें भानच ठिकाणावर नव्हतेंसें दिसलें. त्या शिपायानें शेवटीं रिसीट मागितली, तेव्हां स्वारीनें त्याच्याच जवळची पेन्सिल घेऊन तिनें रिसीटीवर सही केली. तरी तो शिपाई तसाच उभा होता. पद्माकरपंत तार उघडीपर्यंत उभें राहून आंतील मजकूर आनंदाचा असल्यास चिरीमिरी मागावी हा हेतु त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसतच होता. इतक्यांत बळवंतराव आपल्या खुर्चीवरून उठून "काय हो, कोणाची तार ? घरची मंडळी सर्व खुशाल आहेतना?" असें म्हणत म्हणत खालीं अंगणांत आले. तेव्हां ते दुसरे गृहस्थ "अं ! अं ! तार म्हटलं कीं आपलं तर धाबं दणाणतं !" असें म्हणत आपल्या त्या विडीचे झुरके मारीत व तिच्या धुराच्या लोटास बाहेर ढकलण्याकरितां तोंडाचें धुराडें करून तो धूर सोडीत अगदीं त्या मंडळीच्या जवळ येऊन उभे राहिले. पद्माकरपंत आपली तार फोडून त्या चांदण्याच्या उजेडांतच वाचण्याचा यत्न करीत होता. ती तार त्यानें वाचली व बळवंतरावापुढें धरली. तार वाचतांच पद्माकराचें चित्त अधिक बावरल्यासारखें झालेंसें दिसलें. त्याच्या तोंडावरची टवटवी नाहींशी झाली, त्याला चिंता उत्पन्न झाली असें स्पष्ट दिसलें. बळवंतरावांची दृष्टि चांदण्यांत वाचतां येण्याइतकी सूक्ष्म नव्हती, यामुळें त्यांस डोळ्यांस बराच ताण द्यावा लागला; परंतु शेवटीं त्यांनीं पद्माकरपंतास म्हटलें, "तसं काळजीचं कांहींच कारण दिसत नाहीं. तसं असतं, तर त्यांनीं परिक्षेचिरीक्षेपुरतें थांबण्यालासुद्धां सांगितलं नसतं. परीक्षा संपतांच तेच दिवशीं रात्रीं बुधवारीं निघून या एवढंच लिहिलं आहे. तसं कोणी आजारीबिजारी नव्हतंना घरीं !"

"परवां पत्र आलं, त्यांत तर कांहीं नव्हतं. मग काल परवां एकाएकी कोणी आजारी पडलं असलं तर सांगवत नाहीं. त्याचा काय नेम सांगावा ! पण या तारेवरून तसा कांहींच बोध होत नाहीं. मग परीक्षेच्या वेळीं मला विनाकारण काळजी वाटूं नये, म्हणून मुद्दाम लिहिलं नाहीं, असं असलं तर कोणास कळे. पण तशा हेतूनं लिहिलं नसलं तर दादासाहेबांचा हेतु अगदींच चुकला. आतां मुळींच सुद्धां माझ्या

मनाला स्वस्थता व्हायची नाहीं. आपलें विनाकारण वर्ष जाऊं नये, म्हणून मी परीक्षेला बसेन, पण माझ्या मनाजोगे आतां पेपरही लिहून होणार नाहींत,आणखी कांहींच नाहीं. आतां सगळं चित्त गांवीं लागणार. सोमवार, मंगळवार, बुधवार, हो, बुधवारीं शेवटला पेपर पांच वाजतां दिला, कीं रात्रीं नवाच्या गाडीला बसेन, नाहीं तरी बुधवारपर्यंत त्यांचं एखादं पत्र तरी खास येईलच. त्यांत कदाचित् खुलासा होईल. तोंपर्यंत विनाकारण मनाला तरी काय म्हणून त्रास करून घ्यावा ! "

हें बोलणें चाललें असतांना बळवंतरावांचे स्नेही [!] सदूनाना आपल्या विडीचे झुरके मारून धुराचे फूत्कार सोडीतच होते. ते पद्माकरपंताचे शेवटले शब्द ऐकून त्यास म्हणतात, " बस बस, हाच विचार चांगला. रिकामा मनाला त्रास काय करून घ्यावा ! कळेल काय असेल तें."

पद्माकरपंतानें आपल्या भिवयांचा संकोच करून त्रासानें त्याजकडे पाहिलें व त्यास मुळींच कांहीं उत्तर न देतां तो बळवंतरावांस म्हणतो, " उद्यांचा दिवस मधें आहे, परवां परीक्षा सुरू होणार, तीन दिवस परीक्षेचे आहेत. तेव्हां मग काय तो विचार. मी रोज रात्रीं येतोंच आहें, पत्रबित्र आलं, तर आपल्याला येऊन सांगेनच. मग करूं काय तो विचार ! माझा कांहीं यंदा परीक्षा झाल्यावर लागलींच घरीं जाण्याचा विचार नाहीं. आतां ' नव्हता ' म्हणायचा—पण, मधेंच हें काय उपस्थित झालं आहे कोण जाणे ! बुधवारपर्यंत पत्र येऊन जर विशेष काळजीचं कांहीं नाहीं असं ठरलं, तर मग मी आपला मूळचा न जाण्याचाच बेत कायम करणार. " असें म्हणून पद्माकरानें तार खिशांत घातली, आणि तो, बळवंतरावांस विचारून चालता झाला. ' तार ' हीं अक्षरें ऐकतांच काय आहे तें जाणण्याविषयीं उत्कंठित होऊन बंगल्याच्या दारांशीं आलेली कमळा पुढें येऊन बळवंतरावांस कांहीं विचारणार; तों त्यांच्याबरोबर सदूनाना आहेतच असें पाहून मागें वळली.

सदूनानांची एक विडी संपून, त्यांनीं दुसरी विडी काढली आणि ते बळवंतरावांस म्हणतात, " काय हो बळवंतराव, हा कोणाचा हो मुलगा ? आणखी कोणत्या परीक्षेला जाणार आहे ? "

बळवंतरावांनीं, जणूं काय नाइलाजास्तव उत्तर देतों अशा आवाजानें म्हटलें, "त्र्यंबकरावदादा म्हणून डेप्युटी कलेक्टर होते —जिल्ह्याला. हल्लीं त्यांनीं पेन्शनच्या आधीं दोन वर्षांची फर्लो घेतली आहे त्यांचे हे चिरंजीव. हे स्वतःही फार हुशार आहेत. यांच्या पहिल्या तीन परीक्षा होऊन आतां यंदा बी. ए.ला जाणार."

"त्र्यंबकरावदादांचा हा मुलगा ! काय, म्हणतां काय, बळवंतराव ? हा त्र्यंबकराव दादांचा, आमच्या त्र्यंबकराव दादांचा हा मुलगा! छे. छे. छे. छे. मला तर आश्चर्य वाटतं बोआ तुम्हीं सांगितल्यापासून. त्र्यंबकराव दादा म्हणजे कसले जुन्या काळचे नैमिष्ठ, कर्मिष्ठ, अगदीं आमच्या सारखे, आमच्या वळणांतले ! अन् हा त्यांचा मुलगा म्हणतां ! हा मुलगा कसा त्यांना आवडतो ! हा तर अगदीं पक्का सुधारक दिसतो आहे ! "

बळवंतराव त्यावर कांहींच बोलले नाहींत. हा गृहस्थ आतां जाईल केव्हां असें त्यांस झालें असावें असें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. परंतु त्यांचा स्वभाव फार

भिडस्त पडला. यामुळें तसें सुचविणेंसुद्धां त्यांचे हातून होईना. सदूनाना पुढें होऊन आपल्या खुर्चीवर येऊन बसले आणि म्हणतात:–

" त्र्यंबकरावदादांचा आणखी आमचा किती परिचय! ते–जिल्ह्यांत चिटणीस होते, तेव्हां मी त्यांच्या कचेरींत उमेदवार होतों, त्यांचा माझ्यावर फार लोभ. माझें अक्षर पाहून माझी त्यांनीं कितीदां शिफारस केली होती कायमची जागा देण्यासाठीं; पण कलेक्टरसाहेबांना पक्का ब्रह्मद्वेष. त्यांत कोंकणस्थ ब्राम्हण तर डोळ्यासमोर नकोत. त्यांनीं मला जागा दिली नाहीं तेव्हां हा मुलगा नुकता जन्मला असेल किंवा नसेल. तो आतां केवढा झाला हो! त्र्यंबकरावदादा फार उत्तम गृहस्थ, त्यांना माझ्याबद्दल फार कळकळ; पण करतात काय? साहेबापुढें त्यांचें कांहीं चालेना, त्यांत आणखी अशी मौज झाली कीं, लागलीच त्यांची बदली झाली. तुमची त्यांची इतकी कुठली ओळख? "

बळवंतराव:–[ जांभई देतो. ] माझी त्यांची ओळख नाहीं. मला ते पाहून व ऐकून मात्र ठाऊक आहेत. या पद्माकरपंताची व माझी ओळख आज वर्ष सहा महिन्यांतच झाली.

सदूनाना:–[पाय पसरून] हें मला वाटलंच तें. तुमच्यासारख्यांशीं ते बोलायचे सुद्धां नाहींत. ते कसले म्हणतां जुन्या काळचे आहेत! अगदीं वसिष्ठ वामदेवांपैकीं आहेत. तरुणपणांत कांहीं म्हणतात त्यांनीं... पण आतां अगदीं विचारूं नका. तुमच्या सारख्याची छाया पडूं देणार नाहींत छाया!

बळवंतराव तें त्यांचें बोलणें ऐकून बळेंच हंसले व म्हणाले:–" तें पडूं देणार नाहींत तर आम्हींही ती पाडायला जाणार नाहीं मग झालें कीं, नाहीं. ? "

सदूनाना:–मी बोलतों याचा राग नकोहो मानूं, पण आपली त्यांची मौज तुम्हांला सांगितली. काय पहा दुपारपासून एकसारखी तहान लागते आहे. तास दोन तास झाले कीं आपला शोष पडतो. चमत्कारिक हवा झाली आहे.

बळवंतराव:–मग काय, पेलाभर पाणी आणून देऊं का? कमळे एक तांब्यांत पेला......

सदूनाना:–छे. छे. छे. बळवंतराव हें काय भलतंच! तुमच्या इथें पाणी कसं प्यावं? अहो मी आपला येतों म्हणजे काय तुमची आमची ओळख झाली आणखी तुमचा स्वभाव मला फार आवडला, म्हणून येतों. बाकी पाणीबिणी...

बळवंतराव:– नाहीं. नाहीं. माझा आग्रह नाहीं हो. कोणाच्याही समजुतीच्या विरुद्ध कांहीं वागून विनाकारण त्रास करून घ्या वा, असं मुळींच कधीं मी म्हणणार नाहीं. तुम्हीं तहान लागते आहे असें म्हणालांत, शोष पडतो म्हणालांत, तेव्हां मला वाटलं, तुम्हांला पाणी हवं आहे वाटतं. म्हणून मुलीला आणायला सांगितलें.

सदूनाना:–त्यांत काय आहे पाणी घेतलं म्हणून? पण मनाला बरं वाटलं. तरी जनाच्या विरुद्ध असलं तर तें करूं नये असें म्हणतात. मग हें तर काय आमच्या मनालाच बरं वाटत नाहीं. तेव्हां नको झालं. पण या तहानेवर औषध सोडावाटर चांगलं मला वाटतं. तहान मोडून, मळमळ, जळजळ पार काढून टाकतं, ढेंकर येते, आणखी लख्ख होतं. तें असलं चांगलं राजसूचं तर आणा.

तें ऐकतांच बळवंतराव आश्चर्यचकित

झाले. हा गृहस्थ आपल्या घरचं पाणी नको म्हणून सोडावाटर मागतो याचा अर्थ तरी काय? परंतु बळवंतरावानें आपलें आश्चर्य बाहेर दिसूं दिलें नाहीं. व शांतपणें म्हणतो, "सोडावॉटर तुम्हांला पाहिजे असलं तर आहे. आमच्या कुटुंबाला मधून मधून द्यायला लागतं. डाक्टरनीं मुद्दाम सांगितलें आहे कीं, दुधांत तें घालून देत जा. म्हणून दोन बाटल्या आणून ठेविल्या आहेत. आतां रात्रीं कांहीं दोनही लागायच्या नाहींत, तेव्हां तुम्हांला पाहिजे तर एक देतों."

सदूनानाः—हां. जास्ती असलेंच तर आणा. पण तुह्मांला अडचण होत असेल तर नकाहो.

बळवंतरावः—अडचण कसली त्यांत! सकाळीं लागलं तर दुसरं आणूं.

असें ह्मणून बळवंतरावानें आंत जाऊन सोडावाटरची बाटली आणली व ती स्वतः फोडूं लागले. त्या बरोबर सदूनाना म्हणतात, "नका नका तुह्मीं नका फोडूं. मी आपली मीच फोडीन."

बळवंतरावः—जसं तुमच्या मर्जीला येईल तसं करा. आह्मी कांहीं ह्मणत नाहीं.

सदूनानाः—तुम्हांला रागं येऊं देऊं नका. परंतु मला आपलं......

बळवंतरावः—मला कांहीं राग येत नाहीं हो. कोणी आपल्या मताविरुद्ध जावं असं मला मुळींच वाटत नाहीं. आणखी मला कोणी कांहीं बोललं तरी मला राग येत नाहीं.

सदूनानाः—अहो तुमच्या सारख्यांनीं रागावून उपयोग काय ?

'काय' या शब्दावर जणूं काय जोर देऊनच त्यांनीं सोड्याचा बाटली फोडली बळवंतरावास ते म्हणतात, "एकून तुह्मीं घरचं दुसरं तिसरं ठेवित नाहीं वाटतं, मला मोठं आश्चर्य वाटतं कीं, तुह्मी असे सुधारक असून इतके अगदीं सोंवळे कसे? का आपलं आह्मांला नाहीं ह्मणून सांगतां? असलं, आणखी तुह्मीं आमच्या देखत घेतलं, तर आह्मांला कांहीं हरकत नाहीं हो! आमचं सोंवळं आपलं आमच्यापुरतंच असतं. आणखी त्यांत तरी काय आहे? हल्लीं सगळीच मंडळी तसल्या प्रकारची आहेत अन् आम्हांला तर मंडळींत गेल्या आल्यावांचून होत नाहीं, तेव्हां आमचा तरी नेम अगदीं असा कडक कुठून चालणार! खख खख खख......"

शेवटलें सदूनानाचें हास्य इतकें विस्तृत आणि तारस्वराचें होतें कीं, त्यांत त्यांच्या चर्येवरील निर्लज्जपणाची छाया अगदीं लुप्त होऊन गेली. ते हांसूनच तेवढें थांबले नाहींत. पुढें डोळे मिचकावून बळवंतरावास ह्मणतात, "कां बळवंतराव, आलं का ध्यानांत मी ह्मणतों तें! आपला आमचा नवीन परिचय म्हणून आपलें स्पष्टपणानं सांगून टाकलं. अहो, कोणीकडून बाहेर..." परंतु बळवंतराव त्यांस ह्मणतात, "तुमचा काय रोख आहे तो माझ्या ध्यानांत आला सदाशिवराव, पण तो ध्यानांत घेऊन कांहीं उपयोग नाहीं मीं तुह्मांला मघाशींच सांगितलं कीं, दुसरं तिसरं माझ्या इथें कांहींमुद्धां नाहीं. मी आपला साधा भोळा माणूस आहे."

सदूनानाः—अहो साधा भोळा नाहीं कोण! आह्मी काय साधेभोळे कमी आहों? बाहेरून प्रत्येक मनुष्य अगदीं साधाभोळा असल्याचा भाव करीत असतोच. साधेल त्याला साधतो. नाहीं त्याला नाहीं. खख खख खख खख खख...ह्यः ह्यः ह्यः कां मी

ह्मणतों तें खरं का खोटं! काढा आलें आतां. अहो, लोकाला कळेल ही भीति आह्मांला, तुम्हाला काय! हूं! होऊन जाऊंद्या."

बळवंतराव बिचारा अगदीं घचकळ्यांत पडला. त्या गृहस्थास आतां काय बोलावें व काय सांगावें म्हणजे तो जाईल हें त्यास कळेना. शेवटीं तो त्यास ह्मणतो, "सदाशिवराव, मीं जें तुम्हाला सांगितलं, तें अगदीं खरं आहे. माझ्या इथें तसा प्रकार असेल असं तुह्मांला वाटणंही साहजिक आहे. तसं कांहीं नाहीं. मला वाटतं, तुह्मीं माझी परीक्षा पाहण्यासाठींच असा एवढा प्रकार केला आणखी मला विचारलं नाहीं. तर तुह्मी अशा गोष्टी कुठून काढायलात् विचारायला! मी काय जाणत नाहीं!"

सदूनानांनीं तें ऐकल्याबरोबर "आपण भलत्याच जाळ्यांत सांपडलों, आणि चकलों" असें त्यांस वाटून चुकलें आणि त्यांचे चर्येवर खजीलपणाची झांक दिसूं लागली. परंतु बळवंतरावाच्या शेवटल्या बोलण्यानें त्यांस एकदम जीव आल्याप्रमाणें होऊन तो म्हणतो, "बळवंतराव, तर मग खरोखरीच मी तुमची केवळ परीक्षा पाहण्यासाठीं हें सारं बोललों. मला आपल्या एका स्नेह्यानं सांगितलं कीं, आपण पुनर्विवाह लावला आहे, एवढंच कायतें; बाकी आपल्या अंगीं कोणता सुद्धां सुधारकाचा ढंग नाहीं. मला तें मुळींच खरं वाटेना. निदान हें तरी असायचंच असायचं अशी माझी समजूत. आणखी तो तर तुमचा अगदीं निर्वाळा देऊं लागला, तेव्हां ह्मटलं, त्याबद्दल एकदां खात्रीच करून घ्यावी. ह्मणून हें अशा तऱ्हेनं बोललों. आतां माझी खात्री झाली. [सोडावॉटरची बाटली तशीच पलीकडे ठेवून] माझ्या या चतावणीखालीं तुमची एक बाटली बरीक वायां गेली, कारण मी तर कांहीं तें घेत नाहीं. बाकी औषध ह्मणून मला घ्यायला हरकत नाहीं हो. घेतोंच. औषध तें उगीच वायां कां दवडा! त्यानं अजीर्णाचा विकार अगदीं नाहींसा होतो ह्मणतात, त्याचा अनुभव तरी पहावा. [ढेंकर देऊन] आहा! आज तुमची खरी योग्यता समजून मोठा आनंद झाला बोआ. त्या आनंदाचाच ढेंकर हा! (पुनः ढेंकर देऊन) अरे या! काय शिचा गुण असतो हो यांत, असो. चला. आतां एक विडी ओढतो, आणखी जातों. विनाकारण तुह्मांला तरी कां जागरण? एक कुटुंबाच्या प्रकृतीमुळें जागरण होत असेलच, आणखी त्यांत हा आमचा एक आज ताप!"

इतकें बोलून सदूनानांनीं आपली पेटंट विडी काढली, ती शिलगावली, तिचें अगदीं थोटुक उरेपर्यंत ओढली आणि शेवटीं अगदीं निराश होऊन बळवंतरावांचा रजा घेऊन स्वारी बंगल्याच्या पायऱ्या उतरून गेली.

बळवंतरावही आंत गेले. त्यांचे पत्नीचा डोळा लागला होता. गोपाळास झोंप लागली होती. कमळा आपल्या आईच्या पायथ्याशीं स्वस्थपणें तिच्या प्रत्येक श्वासोच्छ्वासाकडे जणूं काय पूर्ण लक्ष्य लावून बसली होती. द्वारकाबाईची प्रकृति विशेष काळजी करण्याजोगी झाल्यापासून बाप किंवा लेक कोणीना कोणी तरी तिच्याजवळ अहोरात्र जागत बसत असे. बळवंतराव आंत येण्याबरोबर, त्यांनीं मोठ्या ममतेनें, दूध कमळेस हांक मारून ह्मटलें



3120

"बेटा, तूं आंत जाऊन नीज जा. मीही निजतों. आज जागत बसण्याची कांहीं जरूर नाहीं." कमळा प्रथम कां कूं करीत होती, परंतु बळवंतरावानें पुनः समजावून सांगितल्यानंतर ती जाऊन निजली. आणि तिला झोंपही लवकर लागली. बळवंतरावास झोंप येईना. कांहीं विचार त्याच्या मनास अस्वस्थ करीत असावे किंवा एक वेळां झोंप चावळल्याकारणानें ती येईनाशी झाली असावी. बराच वेळ ते अंथरुणावर पडले. शेवटीं उठले आणि आपल्या पावलांचा सुद्धां आवाज होऊं नये, म्हणून अतिशयच हळू चालून त्यांनीं दिवा लावला व तो अगदीं झांकल्यासारखा करून एका ईझिचेअरवर त्याचेजवळ वाचीत बसले. त्यांस ईश्वरी विज्ञानाचा नाद हल्लीं लागला होता. तारुण्यांतील उतावळेपणाबरोबर पुष्कळ अंशांनीं येणारा नास्तिकपणा त्यांचे अंगींही थोडाबहुत होताच. तो पूढें क्षीण होत जाऊन त्यासंबंधानें विचार करून ज्या ग्रंथकारांनीं किंवा महाजनांनीं कांहीं केवळ तर्कदृष्ट्या किंवा अनुभवानें सिद्धांत ठरविले आहेत, ते विचारपूर्वक वाचून त्यांचें मनन करणें हें केवळ निरुपयोगी नव्हे इतकेंच नव्हे, तर अवश्यक आहे असें वाटण्यापर्यंत मनाची स्थिति आली. त्यानंतर त्यासंबंधांत विचार व वाचन सुरू झालें, आणि होतां होतां त्याचें मन भक्तिपूर्ण होऊन परमेश्वर म्हणून कोणी तरी आहे, तोच सृष्टीचा उत्पन्नकर्ता आहे, त्याच्याच इच्छामात्रेंकरून सर्व विश्व चाललें आहे, त्याचे गुण काय आहेत, तो कसा आहे, वगैरे आपणांस कांहीं समजत नाहीं, समजणें शक्य नाहीं. परंतु जें जें कांहीं आपणांस स्वभावतःच चांगलें वाटतें आणि जें जें खरोखर चांगलें आहे, तें सर्व पूर्णरूपानें त्याचे ठिकाणीं आहे. तो परम न्यायी, परम कारुणिक, परम समर्थ, सर्वव्यापी, सर्वदर्शी असा आहे अशी त्यांच्या मनाची खात्री झाली व तेव्हांपासून त्यांचें मन परमेश्वरभक्ति व धर्मविचार यांनीं अगदीं पूर्णपणें भरलें. आणि अर्थातच तीच श्रद्धा आपल्या मुलांच्या अंतःकरणांत उपजेल, अशा रीतीनें त्यांनीं त्यांस शिकविलें. अलीकडे अलीकडे त्यांस फावल्या वेळांत वेदान्त म्हणजे काय तें समजावून घेण्याची इच्छा होऊन तत्संबंधीं वाचनाकडे त्यांचें लक्ष लागलें होतें. याचसंबंधाचें एक पुस्तक या वेळीं त्यांनीं वाचण्यास घेतलें होतें आणि त्यांत आपलें चित्त गढून जावें असा त्यांचा यत्न चालला होता; परंतु तो फारसा सिद्धीस गेल्यासारखें दिसत नव्हतें. ते मध्येंच आपल्या हातचें पुस्तक मिटीत आणि स्वस्थ पडत. कोणी म्हणेल, झोंप येण्यास औषध म्हणूनच त्यांस त्या पुस्तकाचा उपयोग झाला असावा. परंतु तसेंही दिसलें नाहीं, कारण त्यांचे डोळे अगदीं टकटकित उघडे असून कोणीकडे तरी अगदीं टक लावून पहात असत. कदाचित् पुस्तकांतील विचार त्यांच्या डोळ्यापुढें उभे राहून त्यांजकडे ते पहात असावेत, किंवा पुस्तकांतील विचारांकडे त्यांचें लक्ष्य मुळींच लागत नसून त्यांच्या मनांत आधींच असलेल्या कांहीं विचारांचें चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें असून त्यांच्याकडे ते पहात असतील. एकंदरींत एवढी गोष्ट खरी कीं, त्यांस कांहीं केल्या झोंप येईना. आणि त्यामुळें ते फारच अस्वस्थ चित्तानें इकडे

तिकडे पहात होते. मध्येंच पुस्तक वाचीत, पुनः इकडे तिकडे पहात. अशा तऱ्हेनें ते एकवार पहात असतां, पलीकडे एका खुर्चीखालीं एक पांढरा लखोट्यासारखा कागद पडला आहे असा त्यांस भास झाला. कसला कागद तो उचलून पाहतात, तों तो खरोखरच लखोटा असून त्यावर आपलें नांव आहे, असें त्यांस दिसलें लागलीच त्यांनीं तो फोडून पाहिला. पहिल्या चार ओळी वाचतांच त्यांस अत्यंत आश्चर्य वाटलें. ते त्याच्या वाचनांत अगदीं गर्क झाले.

---

# प्रकरण ४ थें.

## लखोटा.



ळवंतराव तो लखोटा वाचण्यांत अगदीं गर्क झाले होते. त्यांच्या चर्येवर मधून मधून गांभीर्याची व स्मिताची छाया दिसूं लागली. लखोट्यांतील पत्र थोडेंसें लांबच होतें. आणि तें समग्र वाचून झाल्यानंतर त्यांनीं तसेंच हातांत धरून हात असा लोंबत ठेविला, डोळे वर आढ्याकडे लाविले व बराच वेळपर्यंत कांहीं तरी विशेष विचारांत गर्क होऊन गेले. मधेंच ते आपल्याशीं म्हणत, " केवळ अनिष्टच नाहीं; इतकेंच नव्हे, तर इष्ट आहे. असा प्रसंग फारच क्वचित् मिळणार; परंतु पूर्ण विचार केल्याखेरीज आपण अशा कामीं कोणत्याही तऱ्हेनें उत्तेजन देऊं नये. त्याच्या घरचीं मंडळी काय म्हणतील कीं, थोरामोठ्याच्या मुलाला याप्रमाणें फसवून घेऊन त्याच्याकडून असा प्रकार करून घेतला. कुटाळ मंडळी याप्रमाणें टीका करण्यास कधीं चुकावयाची नाहीं; आणि कुटाळ मंडळीची अशी टीका सुरू झाली म्हणजे अर्थातच त्याच्या घरच्या मंडळीसही तसाच प्रकार वाटेल. व विनाकारण बिचाऱ्याचें नुकसान होईल. घरची श्रीमंती असून त्यामुळें जो काय अशा व्यक्तीला फायदा व्हावयाचा, तो होणार नाहीं. श्रीमंताचा मुलगा असून विद्येविषयीं इतकें प्रेम होतां होईतों नसावयाचें तें आहे. तेव्हां त्याचा जितका फायदा करून घेतां येईल, तितका त्यानें करून घेऊन आपली स्वतःची उन्नति करावी. परंतु मधेंच त्यानें अशी गोष्ट केली तर वडील म्हणजे कर्दनकाळ, ते का

करतील आणि काय नाहीं याचा नेमच नाहीं; याला बेवारस करतील, घर पारखं करतील, आणि खरोखरी दहा वीस रुपयांची नोकरी करण्याची पाळी येईल. " वेळ पडली तर मी काय वाटेल तें करीन, दारिद्र्यांत राहीन, पंधरा वीस रुपयांची नोकरी धरून दोघांचा उदरनिर्वाह करीन, परंतु तुह्मी माझ्या ह्मणण्याला अनुमोदन द्याल, तरच माझं हें सुखस्वप्न खरं होणार आहे. हा माझा कल्पनाप्रासाद अस्तित्वांत येणार आहे. " असं हा लिहितो. परंतु बिचाऱ्यास अजून या जगाचा अनुभव नाहीं. पुढें मरण्यासाठीं कोण धक्काबुक्की चालली आहे याचा अनुभव नाहीं, किंबहुना कल्पनासुद्धां नाहीं. आजपर्यंतची स्थिति कशी कीं, मनांत आली गोष्ट कीं पुढें तयार, परंतु एकदां का दारिद्र्याच्या तडाक्यांत स्वारी सांपडली, ह्मणजे मग मनांत कोणतीही गोष्ट न आणण्याबद्दलच किती तरी खटाटोप करावा लागतो. कारण ती मनांत येऊन मिळणं तर कधीं शक्य नाहींच, पण मनांत आल्यानं त्रास मात्र होणार. आतां यास उत्तर काय द्यावं ? सध्यां तुमचा अभ्यास पुरा होईपर्यंत या गोष्टीचा विचारच करूं नका. आणखी पांच वर्षांनंतर पहातां येईल असं उत्तर द्यावें. " असा मनांत विचार करून त्यांनीं तें पत्र पुनः त्याच्या पाकिटांत घातलें व ते जें पुस्तक वाचीत होते त्यांत घालून 'आतां पडावेंच जाऊन' असें आपल्याशींच पुटपुटून ते आंत गेले.

परंतु आजच्या रात्रीं त्यांना झोंप घ्यावयाला सवडच सांपडावयाची नव्हती असें दिसतें. ते आंत जाऊन आपल्या पत्नीच्या अंथरुणापासून कांहीं अंतरावर टाकलेल्या बिछान्यावर पडणार न पडणार, तों त्यांच्या पत्नीनें उच्चारलेले पुढील कोमल शब्द त्यांच्या कानीं पडले:—

" झोंप लागली का ? नसली तर मला कांहीं सांगायचं आहे. " ते शब्द ऐकतांच बळवंतराव उठून तिच्याजवळ गेले व " नाहीं, झोंप नाहीं लागली, जागाच आहें. तुला चांगली लागली होती दोन तीन तास. "

" हो लागली होती खरी, आणखी त्यांत मला एक चांगलं स्वप्नही पडलं. "

" हं ! स्वप्नावरन् तसल्या गोष्टीवर तुझा आहेच का अजून विश्वास? बरं पण काय स्वप्न पडलं ? "

" स्वप्न काय पडलं तें सांगितलं, म्हणजे माझी तुमती थट्टाच होईल आणखी म्हणायचं होईल कीं मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. "

" ती गोष्ट खोटी का ? तरी पण काय पाहिलंस स्वप्नांत तें सांग तर खरं. अस्वस्थ झोंप आणखी मनांत एकसारखे विचार असले म्हणजे कधीं चांगलीं कधीं वाईट स्वप्नं पडायचींच. "

" मीं असं पाहिलं स्वप्नांत कीं, एक मोठा थोरला वाडा आहे, आणखी त्या वाड्याच्या दाराशीं आपली कमला उभी आहे, इतक्यांत हे पद्माकरपंत तिथें आले ते थेट मजजवळ येऊन म्हणतात, 'या पदार्थसंग्रहालयाच्या दाराशीं कमळा उभी आहे, तिच्या मनांत आंत जायचं आहे असं दिसतं. तुमची जर हरकत नसली, तर मी तिला आंत घेऊन जाऊन सुखरूप परत आणतों. ' मी म्हटलं ' न्या. न्या. आमचा तुमच्या ठिकाणीं पूर्ण विश्वास आहे. तिला तुमच्या स्वाधीन करण्याला आमची मुळींच हरकत नाहीं. ' मी असं

म्हणण्याचाच अवकाश. ते इतक्या उल्हासानं धांवले कीं, कांहीं विचारूं नये. त्यांनीं लागलीच कमळेचा हात धरला व तिला घेऊन ते त्या मंदिरांत शिरले. कमळाही आपल्याकडे पहात लाजत व गालांतल्या गालांत हंसत त्यांचेबरोबर गेली."

"मीं म्हटलं नसंच झालं कीं नाहीं? कमळीच्या लग्नाचं कसं होईल काय होईल याचा तुला निदिध्यास लागलेला, तेंव्हां तेंच स्वप्नांत दिसलं. आणखी पद्माकरपंत जांवई मिळावा अशी एकसारखी इच्छा असेल, हजारदां मनांत येत असेल, दुसरं काय?"

"हो. असं मनांत कशाला येईल? आणखी मनांत येऊन काय उपयोग? ते आपल्या वांट्याला कसचे येतात. त्यांचे वडील कसचे कर्मठ? मुलगा असं कांहीं करतो आहे असं कानीं पडतांक्षणींच त्रागा करून त्याला त्राहि त्राहि करून सोडतील. हें काय मला ठाऊक नाहीं? आपल्या मताप्रमाणं करण्यासाठीं वडिलांचासुद्धां बेबनांव झाला तरी हरकत नाहीं, पण सत्याला सोडायचं नाहीं, असं धैर्य कांहीं साऱ्यांनाच असतं असं नाहीं. फारच थोड्यांना असतं." हें शेवटलें वाक्य किंबहुना हें सर्व भाषण तिनें अशा रीतीनें उच्चारलें कीं, तिच्या प्रत्येक शद्बांत आपल्या नवऱ्याच्या धैर्याविषयीं अभिमान दिसत होता. आपल्या नवऱ्यानें जसें धैर्य दाखविलें तसें धैर्य दाखविणारे व शद्बाला जागृत रहाणारे अगदीं विरळा असें तिच्या मनास किती निकरानें वाटत तें, हें तिच्या त्या वेळच्या त्या शद्बांनीं अगदीं स्पष्टपणें दिसत होतें.

बळवंतरावास ते शद्ब ऐकून व ते उच्चारतांना पत्नीच्या चेहेऱ्यावर झालेला फेरफार पाहून फार कौतुक वाटलें. आणि आपली पत्नी शरीरानें जरी क्षीण झाली असली, तरी मनानें चांगली दृढ आहे असें पाहून समाधानही वाटलें. नंतर ते तिला म्हणतात, "दुसरं कोणी या जगांत नाहींच कीं काय? हें पहा पद्माकरपंतांनींच मला पत्र लिहिलं आहे आणखी तसं त्यांत धैर्य दाखविलं आहे."

"पद्माकरपंतांनीं पत्र लिहिलं आहे!" द्वारकाबाई आश्चर्यानें म्हणते, "पत्र काय म्हणून लिहिलं आहे? प्रत्यक्ष बोलायला काय हरकत होती?"

"अग, प्रत्यक्ष बोलायला तितकी भीड वाटतेना? एखाद्याला म्हणायचं, कीं तुमची हरकत नसली, तर मी तुमच्या मुलीशीं लग्न लावतों, म्हणजे जरा अडचणींचीच गोष्ट नव्हे का?"

"बरं काय पत्र लिहिलं आहे? मला वाचून तरी दाखवायचं असतं."

"वा! आतां तीन साडेतीन वाजण्याची वेळ झाली, आतां झोंप घ्यावी, का हें असलं पत्र वाचीत बसावं? पहांटेची झोंप लागूं दे अंमळ."

"माझी झोंप पुरी झाली आतां. आतां कसची झोंप येते? आज किती दिवसांनीं तरी इतकी झोंप लागली. अन् आतां तें पत्राचं मला सांगून ठेवलं आहे, तर आतां हें मेलं द्वाड मन त्याच्याचबद्दल तर्कवितर्क करीत बसेल."

"आणखी पत्र वाचून दाखविलं म्हणजे मग आंतल्या मजकुराबद्दल विचार करीत बसेल, मिळून एकच कीं नाहीं? त्यापेक्षां काय तें कळलंच नाहीं म्हणजे बरं कीं नाहीं आपलं? तर्कवितर्क काय आपल्या हातचे असतात."

"तसं नाहीं, माझं मन आतांशा

फारच तर्कटी झालं आहे. त्याच्या विचारांना जे फांटे फुटत असतात, ते विचारूंच नयेत. त्यापेक्षां आतां पत्र काय आहे तें वाचून दाखवावं तेंच बरं. मला आतां झोंप यायची नाहीं. "

आपल्या परीक्षा अद्यापि एक निमिषभर सुद्धां झोंप नाहीं हें त्या बिचारीस मुळींच ठाऊक नव्हतें. आपण पत्र वाचून दाखविलें नाहीं तर ती खरोखरीच नाहीं नाहीं ते कुतर्क वितर्क करून मनाला त्रास करून घेईल, त्यापेक्षां आपण पत्र वाचून दाखवावें तें चांगलें. असें म्हणून त्यानें दिवा जवळ घेऊन पत्र वाचण्यास प्रारंभ केला. पत्र इंग्रजींत होतें, तें जसेंचे तसेंच येथें देत नाहीं, भाषांतर रूपानें देतों म्हणजे वाचकांस विशेष सोयीचें होईल.

प्रिय बळवंतराव बाबासाहेब यांसः--

"आजचें हें पत्र मीं आपल्या हातांत दिलें, म्हणजेच आपल्यास अतिशय आश्चर्य वाटेल. कारण मी प्रत्यक्ष येऊन काय बोलायचें तें न बोलतां पत्र लिहून हातीं देतों याचा अर्थ काय आणि पत्र फोडून वाचूं लागलां म्हणजे कदाचित् तें आश्चर्य दुणावेल; कदाचित् अगदीं नाहींसें होऊन माझें करणें अगदीं साहजिक आहे असें वाटेल. कारण पत्रांतील मजकूरच असा आहे, कीं सकृद्दर्शनीं जरी तो चमत्कारिक वाटला तरी अखेरीस पत्रद्वारें कळविण्यासारखाच खरा असें कोणासही वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्यक्ष बोलण्याइतका निर्भिडपणा करवला नाहीं, तरी स्पष्टपणें लिहिण्याइतका निर्भिडपणा केला आहे, याबद्दलही थोडेंसें आपणांस आश्चर्य वाटेल; परंतु आपल्या मनांत ती गोष्ट आली असली, तरी आपणही संकोच करीत असाल असें कशावरून नाहीं, असें एका परम मित्रानें सुचविल्यावरूनही माझ्या मनांत हें पत्र लिहावें असें आलें. आपल्यास माझी आतां पूर्णपणें माहिती झाली आहे, तेव्हां माझें लिहिणें आपल्याला वेडगळपणाचें जरी वाटलें तरी त्याचा विपरीतार्थ करणें आपल्या हातून होणार नाहीं, किंवा गैरजमज होणेंही शक्य नाहीं. असा सर्व विचार करून मी हें पत्र लिहीत आहें. त्याबद्दल आपण विचार कांहीं केला तरी मनःशुद्धतेनेंच केवळ पत्र लिहिलें आहे इतकें ध्यानांत धरावें म्हणजे झालें.

माझे मनांतून आपल्यापाशीं एक मागणें मागायचें आहे. एक देणगीच मागायची आहे, जी देणगी मी मागणार ती फार मूल्यवान् व आपल्याला अत्यंत प्रियकर अशी आहे. किंबहुना आपला जीव कीं प्राण अशीच ती आहे; तेव्हां माझ्या मागण्याबद्दल आपण मला काय म्हणाल तें म्हणा, परंतु ज्याप्रमाणें आपण त्या तिला जीव कीं प्राण समजतां त्याप्रमाणें मी समजतों, समजेन आणि जीवापलीकडे तिची जोपासना करीन. माझ्या स्वाधीन ती केल्याबद्दल आपणांस कधींही पश्चात्ताप होणार नाहीं असेंच माझें वर्तन राहील. ती स्वाधीन करण्याइतका योग्य मी आहें कीं नाहीं हें आपण ठरवावें; परंतु जर तसा ठरलों व आपण ती माझ्या हातीं दिली, तर मी तिचें संरक्षण अगदीं कायावाचामनानें करीन, याबद्दल आपण मनांत मुळींसुद्धां शंका धरूं नये. कदाचित् आपणास असें वाटेल कीं, मी जुन्या, श्रीमंत व कर्मठ घराण्यांतला मुलगा आणि बहिष्कृत पुनरूढ अशा आईबापांच्या अपत्यांशीं संबंध जोडण्यास कसा तयार होणार!

तेवढें धैर्य मला कोठून असणार ? परंतु ती काळजी आपल्यास नको. मी आजपर्यंत शिकलों व विचार केला, व त्यानें एवढें तत्त्व माझ्या मनांत पक्केपणें बिंबलें आहे कीं, जर कोणतीही गोष्ट, बहुजनसमाजाला असंमत अगदीं नवीन अशी करायची, तर तिच्यामुळें फार संकटें येतील, त्रास सोसावे लागतील, ते सर्व सोसले पाहिजेत त्याखेरीज कधींच कोणती गोष्ट व्हायची नाहीं. वेळ पडली तर मी काय वाटेल तें करीन, दारिद्र्यांत राहीन, पंधरा वीस रुपयांची नोकरी धरून दोघांचा उदरनिर्वाह करीन, परंतु तुम्ही माझ्या म्हणण्याला अनुमोदन द्याल तरच माझें हें सुखस्वप्न खरें होणार आहे. हा माझा कल्पनाप्रासाद अस्तित्वांत येणार आहे. हें तुमचें उदाहरण माझ्यापुढें आहे, तें टाकून मी उदाहरणासाठीं दुसरीकडे कशाला जाऊं ? जर शक्य असेल, तर आपल्या यत्नांची पराकाष्ठा करून मी आपल्या वडिलांचें मन या संबंधास अगदीं अनुकूल असें करून घेईन, नाहींच जुळलें, तर मी नाइलाजास्तव स्वमतासाठीं आणि सत्यासाठीं त्यांच्या मनाविरुद्ध वागण्यास मागें घेणार नाहीं, हेंही आपल्यास सुचवून ठेवितों. माझा निश्चयच असा ठरला आहे कीं, आतां विवाह करीन तर असा विवाह करीन, नाहींपेक्षां जन्मभर ब्रह्मचर्यांत राहून अन्य मार्गानें देशसेवा करीत राहीन, पण जुन्या पद्धतीप्रमाणें कसा तरी विवाह करून घेणें माझ्या हातून कधींही होणार नाहीं. आज दोन वर्षें दरसाल हा वाद चाललाच आहे. बी. ए. होईपर्यंत मी विवाह करणार नाहीं असें स्पष्टपणें वडिलांस सांगितलें आहे. ते माझें लग्न तेरावे वर्षींच करीत होते, परंतु वर्ष दोन वर्षें आमच्या चुलत्यांनीं, आणखी पुढें दोन वर्षें मीं स्वतः मोडता घालून आजपर्यंत दिवस काढले. आतां उद्यां परीक्षा झाली व निकाल अनुकूल असा लागला म्हणजे पुन्हां हा प्रश्न उभा राहणारच; म्हणून हें पत्र इतक्या जलदीनें मी लिहितों आहें. त्याचा विचार व्हावा. मी जर आपल्या देणगीस योग्यच नाहीं असें आपणास वाटलें, तर पुढें या बाबतींत विचार करण्याची जरूरच राहिली नाहीं, परंतु मी योग्य आहें असें आपल्यास वाटलें आणि आपली हरकत नसली, तर माझी इच्छा काय आहे हें आपणांस कळविलें आहे. कमळा म्हणजे एक सद्गुणांची खाण आहे. तिची बुद्धि अलौकिक आहे. मी खरोखर तिच्या योग्य नाहीं, हें मी जाणून आहें, परंतु तिला वरण्याची योग्यता मी अंगीं आणीन इतका आत्मप्रयत्न माझे अंगीं आहे. तर त्याचा आपण दोघांनीं विचार करावा. असलें हें चमत्कारिक पत्र लिहूं कीं नको असा विचार किती दिवस करीत होतों, परंतु ज्याचा विचार घेतल्याखेरीज मीं कांहींही करीत नाहीं अशा माझ्या मित्रानेंही मला पत्र लिहिण्यास हरकत नाहीं असेंच सांगितल्यामुळें, मीं पत्र लिहून तें आज तुमच्या हातीं देण्याचा निश्चय तर केला आहे. त्याप्रमाणें करणार आणि आपल्या उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत राहणार. आपलें कुटुंब आजारी आहे अशा स्थितींत या गोष्टीचा विचार करण्यास आपलें मन सुस्वस्थ नाहीं हेंही मला दिसतें आहे, परंतु त्या आजारीपणास या बाबतीच्या काळजीचाच विशेष भर नसेल कशावरून ! आणि मीं जर हें पत्र लिहिलें, तर ती

काळजी अंशतः तरी दूर होणार नाहीं म्हणून कशावरून? असेंही प्रभाकरानें सुचविलें, तेव्हां ती शंका दूर सारून आपल्यास पत्र देण्याचाच विचार कायम केला. अशा बाबतींत इतक्या निर्भिडपणें लिहिलें आहे, आपल्यांतील चालीरीतींच्या अगदीं विरुद्ध वर्तन केलें आहे, याबद्दल पुनः एकादां माफी मागून हें पत्र पुरें करतों. सेवेसी श्रुत होय हे वि०--

आपला,

**पद्माकर.**"

पत्र वाचून संपतांच दोघेही कांहीं वेळ अगदीं तटस्थपणें राहिलीं. एक शब्दसुद्धां कोणीं उच्चारला नाहीं. बळवंतराव आपल्या हातचें पत्र ठेवून आपल्या पत्नीकडे पाहूं लागले व त्यांची पत्नी शून्य दृष्टीनें समोर पहात राहिली. तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. पद्माकर सुमारें तीन वर्षांपासून त्यांचेकडे येऊं लागला होता, तो एल्फिन्स्टन कॉलेजांत आल्या वेळेपासून यांचे घरीं येऊं लागला. याचें कारण बळवंतरावांच्या एका स्नेह्याचा मुलगा होय. बळवंतरावांचा एक परम मित्र नागपुरास होता. त्याचा मुलगा त्याच सालीं मुंबईस कॉलेजांत जाण्यास आला. कित्येक माणसांचे ग्रह अति लवकर जुळतात आणि आपली मैत्री कायमही करितात. त्यांपैकीं पद्माकराची व प्रभाकराची गोष्ट होती. पहिल्यानें कांहीं संबंध नसतां मुंबईस दोघांच्या गांठी पडल्यानंतर स्नेह जमला, परंतु तो अगदीं परम स्नेह झाला. अर्थातच प्रभाकराबरोबर पद्माकरही बळवंतरावाकडे जाऊं येऊं लागला आणि त्याप्रमाणें प्रभाकरांचें त्याचप्रमाणें पद्माकरांचेंही वळण झालें. पद्माकराचा व कमळेचा विवाह व्हावा, असें प्रभाकरास वाटूं लागलें आणि त्यांचीं आपापसांत बोलणीं होऊं लागलीं. पद्माकर अगदीं नैमिष्ठ, कर्मिष्ठ अशा कुटुंबांतला. मुंबईस येईपर्यंत त्यानें सुधारणेचें किंबहुना त्या बाबतींतल्या विचाराचें वारेंसुद्धां घेतलेलें नव्हे, उलट सुधारकांची निंदा ऐकून द्वेष करण्यास शिकलेला. परंतु प्रभाकराच्या संगतीनें व भाषणानें, द्वारकाबाईच्या शुचिव्रतानें त्याचें मत अगदीं बदलून गेलें, इतकेंच नव्हे, तर द्वारकाबाईबद्दल त्याच्या मनांत अत्यंत आदर उत्पन्न झाला. आणि तो त्यांच्या येथें अधिकाधिक जाऊं येऊं लागला. पुढें प्रभाकर नसला, तरी त्यानें एकटेंच जावें यावें असें झालें आणि नंतर अगदीं फार वर्षांच्या स्नेहाच्या कुटुंबांतील लहानमोठ्या मंडळींस जसें परस्परांविषयीं प्रेम असतें, तसें त्याचें त्या मंडळीवर व मंडळीचें त्याच्यावर प्रेम बसलें.

कमळा जसजशी मोठी होत चालली तसतशी तिच्या लग्नाबद्दलची काळजी मातापितरांस–विशेषतः तिच्या मातेस–लागली. प्रभाकराच्या गोत्राची अडचण असल्यामुळें तो विचार अगदीं दूर सारावा लागला. पद्माकराबद्दल द्वारकाबाईच्या मनांत विचार येऊं लागला आणि तो तिनें एकदां दोनदां आपल्या नवऱ्याजवळ बोलूनही दाखविला. परंतु नवऱ्यानें नुसतें हंसून तिला तिच्या विचाराचा अशक्यपणा स्पष्ट करून दाखविला. अशा घराण्यांतला असा मुलगा मिळणें अगदीं अशक्य असें त्याचें त्याला दिसतच होतें, परंतु द्वारकाबाईस तितकें अशक्य वाटेना. ती केव्हां केव्हां म्हणे, त्याचा काय नेम आहे! मुलाच्या मनांत जर आलें तर सहज

होऊन जाणार आहे. परंतु लागलीच तिला असेंही दिसून येई कीं, सगळेच आपल्या पतीप्रमाणें स्वमतासाठीं वाटेल तीं संकटें सोसणारे नाहींत. तेव्हां ही गोष्ट नवरा म्हणतो त्याप्रमाणें अशक्यच खरी.

आज हें पत्र वाचून तिला अर्धवट आनंद झाला व गाडीवर येऊन तिच्या डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं.

# प्रकरण ५ वें.

## दादासाहेब.



परंतु या सर्व मंडळीस येथेंच सोडून आपण आतां दुसऱ्या एका गांवीं दुसऱ्या कांहीं मंडळींची माहिती करून घेण्यास जाऊं. ही मंडळीही आमच्या कथानकांत बऱ्याच महत्त्वाची जागा घेणार आहेत. दिगंबरपूर हा गांव क्षेत्राचा आहे. हा कृष्णानदीच्या कांठीं आहे. येथें दत्तात्रेयाचें स्थान आहे. गांवची वस्ती सुमारें तीस हजार असून पुष्कळ ब्राह्मणांची आहे. यामुळें याला ब्राह्मणांचा गांव असेंच म्हटलें तरी चालेल आणि सरकारी अधिकारी नेहमीं तसें म्हणतही असत. येथें मामलेदार, मुन्सफ, रजिस्टर, फॉरेस्टर वगैरे " टर " मंडळीही आहेत. इंग्रजी अमदानीच्या पहिल्या हप्त्यांतील विद्वान् लोकांच्या सुधारणांचें स्वरूप प्रथम बरें, परंतु पुढें किळसवाणें वाटून दुसऱ्या हप्त्यांतील जे कित्येक मोठे लोक सुधारणेस व सुधारकांस शिव्या देऊं लागले व त्यांचे ठिकाणीं एक प्रकारची सुधारणेविषयीं पराङ्मुखता आली आणि जुन्या रीतीभातींकडे किंवा धर्माकडे ज्यांचीं मनें जोरानें वळलीं, किंवा तत्संबंधीं अभिमान धरणें व तशा अभिमानाचीं भाषणें करणें ज्यांस अधिक श्रेयस्कर वाटलें, असे कित्येक मोठे सरकारी अधिकारी व वकील पेन्शनें घेऊन किंवा आपलीं कामें सोडून आपल्या आयुष्याचा शेषांश वेदांतपठनांत, तत्संबंधीं नुसत्या अभिमानाच्या भाषणांत, किंवा कर्मठपणांत घालविण्याकडे प्रवृत्ति होऊन येथें येऊन राहिले होते. वर सांगितलेंच आहे कीं, हा गांव क्षेत्राचा होता. अर्थातच येथें देवळें, घाट वगैरे अनेक बांधलेले असून त्यांस जोडून धर्मशाळा किंवा निदान मोठमोठाल्या ओवऱ्या बांधलेल्या होत्या. येथें अनेक तडीतापसी, यति, संन्यासी, गोसावी, बैरागी व भणंग भिकारीही येऊन राहत. गांवांत नेहमीं कोणीना कोणी तरी श्रीमंत यात्रेकरू येतच असल्यामुळें कोणी मुकद्वार, कोणी ब्राह्मणभोजनें वगैरे घाली; कोणी लघुरुद्र, महारुद्र, अनिरुद्र करी; कोणी अनुष्ठानें

करवीं; मिळून या लोकांस अन्नाची कधीं पंचाईत पडत नसे. शिवाय गांवांत वर सांगितल्या प्रकारचे सुखवस्तु गृहस्थ रहात असत यामुळें तसा कोणी विद्वान् नामांकित असा संन्यासी किंवा भिक्षुक अगर शास्त्री आला, तर त्याची पूजा, संभावना वगैरे उत्तम प्रकारें होतच असे. तसा योग्य पुरुष आला आणि अगदीं निराश होऊन गेला असें कधींच झालें नाहीं. गांवच्या पिढीजाद् भिक्षुकांकडून त्यांचा काय छळ होईल तेवढाच. " छळ होईल तेवढाच " असें म्हटलें हें वाचून वाचकांस थोडें आश्चर्य वाटेल. परंतु तसें आश्चर्य खरोखर वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. दिगंबरपुरासारखीं जीं सुप्रसिद्ध क्षेत्रें आहेत, तेथला प्रकार असाच. ज्या विभूतींच्यामुळें त्या क्षेत्रांचें महात्म्य वाढलें, त्या विभूति जाऊन त्यांच्या तीन तीन पिढ्यांत पुढें विद्वत्ता संकुचित होत होत गेलेली व सध्यां अगदीं संपुष्टांत आलेली. इतकी कीं, घरच्या पोथ्या वाण्याच्या दुकानीं आपल्या हातानें नेऊन देण्यास यांची स्वतःची तयारी; परंतु पूर्वपुरुषांच्या विद्वत्तेचा अभिमान मात्र कायम, किंबहुना विद्वत्तेच्या व्यस्त प्रमाणांत सडकून वाढलेला ! अर्थातच कोणीही विद्वान् येवो, यांनीं त्यास आमच्या अप्पाशास्त्रयांच्या, काका शास्त्रयांच्या, भिकंभटदादांच्या किंवा गजेन्द्रचार्यांच्या ( म्हणजे अर्थातच आजे, पणजे, निपणजे वगैरेंच्या ) पेक्षां हे अधिक काय असूं शकणार ? असें म्हणून त्याची पहिले दिवसापासून टवाळी करण्यास सुरुवात करावयाची. तो खरोखर विद्वान् असला तर यांच्यानें त्याची बरोबरी करणें किंबहुना त्याच्या विद्वत्तेचें यांस सम्यग्ज्ञान होणें तर अशक्यच. मग राहिली त्याची कुचेष्टा, अर्थातच गांवोगांवच्या भाविक लोकांनीं यांचे गांवीं येऊन केलेल्या महारुद्रांत, अतिरुद्रांत, अगर इतर कांहीं कर्मानुष्ठानांत दक्षणा मिळून नेहमीं भोजन पार पडत असलेले आमचे शालजोडी शास्त्री व तपकीरभटजी अन्यकुचेष्टशास्त्रांत अगदीं प्रावीण्य मिळविलेले. ते काय अक्षेत्रस्थ विद्वानांस हार जातात ? अमुक संन्यासी असा आहे, तमुक शास्त्री तसा आहे, अशा टवाळ्यांची पण रेलचेल. सायंकाळीं संध्येच्या निमित्तानें व प्रातःकाळीं स्नानाच्या निमित्तानें पवित्र नदीकांठीं येऊन यांचा कुचेष्टावाग्प्रवाह नदीच्या प्रवाहापेक्षां किती तरी मोठ्यानें चालावयाचा ! उन्हाळ्यांत वगैरे बिचाऱ्या नदीचा प्रवाह चालावयाचा नाहीं, परंतु यांच्या या सरस्वतीप्रवाहास कधीं म्हणून खळ नाहीं ! त्यांत जर का त्या क्षेत्रांत चार पोथ्या वाचून व पढून टुरटुर करणारे आणि चार दोन पुस्तकें इंग्रजीही शिकलेले पिढीजाद् वैदिक अगर शास्त्रीघराण्यांतले एखादे पंडित असले, तर मग त्यांच्या बडेजावास मुळीं पारावारच नाहींसा होतो. ते आपल्या मतें अपरशंकराचार्यच बनतात आणि त्यांच्याभोंवतीं मग त्यांच्या पूजकांचा घोळकाही जमतो ! ही जशी साधारणतः सर्व क्षेत्रांची तशीच दिगंबरपूर या क्षेत्राचीही गोष्ट होती आणि म्हणूनच वर असें म्हटलें आहे कीं, परकीय ग्रामस्थ विद्वानांचा काय छळ होईल तेवढा वर्ज्य करून त्याची या क्षेत्रांत योग्य संभावना होत असे. इतर महाक्षेत्रांप्रमाणेंच याही क्षेत्रांत एक वर सांगितल्या प्रकारचे अपरशंकराचार्य होते व यांच्या पूजकांच्या मतें त्यांची अगदीं

दिगंत कीर्ति झाली होती. परंतु त्यांचें वाचकांस लवकरच प्रत्यक्ष दर्शनच होणार आहे. तेव्हां आतांच नामादिकथन करून व स्वरूपादि वर्णन करून त्यांची मूर्ति वाचकांपुढें उभी करीत नाहीं. इतर सर्व क्षेत्रांप्रमाणें दिगंबरपुरास हल्लीं भिक्षुकघराणीं पुष्कळ होतीं हें वर सांगितलेंच आहे. आणि इतर क्षेत्रांतील घराण्यांत ज्याप्रमाणें प्राचीन विद्या नष्ट होत चालली, तशी येथल्या घराण्यांतूनही नष्टप्रायच झाली होती. पण तिच्या एवजीं इंग्रजी विद्येचा प्रसार फार वाढत चालला होता. विवक्षित विद्या जरी नष्ट झाली, तरी विद्यार्जनाची इच्छा व शक्ति जी पिढ्यानुपिढ्या रक्तमांसांत आलेली ती कोठें जाणार ? ती कोणत्याना कोणत्या तरी विद्येच्या अर्जनासाठीं उपस्थित होऊन ती साध्य करण्यास झटणारच; त्याप्रमाणें सध्यांचे काळीं वेदशास्त्रविद्या उदरपूरणाला निरुपयोगी झाल्याकारणानें अर्थातच इंग्रजीकडे ओघ वळला. यामुळें या गांवांतले मूळचे वैदिक अगर शास्त्री, परंतु इंग्रजी शिकून बी. ए., एम्. ए., एल्‌एल. बी. होऊन सरकारी अधिकारावर किंवा वकिली, डॉक्टरी वगैरे करून नांवारूपास आलेले बरेच लोक होते.

दिगंबरपुरास मुख्य स्थान दत्तात्रेयाचें होतें हें वर सांगितलेंच आहे. दत्तजयंति हा तेथला मुख्य उत्सव आणि दुसरा उत्सव कृष्णाबाईचा. या दोन्ही उत्सवांबद्दल घरटीस कांहींना कांहीं तरी वर्गणी घेतली जात असून तीतून सार्वजनिक उत्सव होत असे. त्या उत्सवाबद्दल आपणांस विशेष कांहीं लिहावयाचें नाहीं. यथावकाश त्याचें वर्णन वाचकांस मिळेल.

दिगंबरपुराच्या अंतरंगाचें हें वर्णन झालें. आतां थोडेंसें बहिरंगाचें वर्णन देऊन त्यांतील एका वाड्यांत आपण जाऊं. दिगंबरपुरचें भूगोलिक अधिष्ठान कृष्णानदीच्या कांठीं आहे हें वर सांगितलेंच. या ठिकाणीं नदीचें पात्र बेताबाताचेंच विस्तृत आहे. एका कांठावर गांव असून दुसऱ्या कांठापासून बऱ्याच अंतरावरून इतर लहानमोठ्या गांवांना जाणारे राजरस्ते आहेत. त्या रस्त्याच्या आजूबाजूला शेतें व मधून मधून दहा वीस साहेबी तऱ्हेचे बंगले आहेत. गांवाच्या उत्तरेच्या, पूर्वेच्या, दक्षिणेच्या बाजूस डोंगरांची रांग आहे, किंबहुना चारही बाजूंनीं डोंगर असून त्यांनीं वनविलेल्या खोऱ्यांतच हा सुंदर गांव वसलेला आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. डोंगरांच्या परिसरांनीं येणारी वनमाला या गांवास अत्यंत शोभा आणीत असे. कोणत्याही बाजूस पहा, भव्य असा डोंगर व त्याच्या उतरणीवर असणाऱ्या दाट राया दिसल्याकारणानें अंतःकरण गंभीर व उदात्त विचारांनीं अगदीं भरून जातें. सृष्टीची खरी शोभा या प्रदेशांत अर्करूपानें आली आहे असें सुद्धां वाटतें आणि विशेषतः एखाद्या डोंगरावर चढून जाऊन त्याच्या एखाद्या सुळक्यावरून खालीं पाहिलें, म्हणजे तर दिगंबरपुराचें सौंदर्य फारच मनोहर दिसतें. इतकेंच नव्हे, तर असेंही वाटतें कीं, ज्या नगराला सृष्टिशोभेचें इतकें आनुकूल्य, त्यांतील लोकांचे अंगीं पूर्वीं तरी निदान विशेष बुद्धि प्रकट झाली असल्यास नवल काय ? आणि ती बुद्धिमत्ता पूर्वकाळींच्या विद्यांत जरी प्रवेशली नाहीं, तरी कोणत्याही विद्येंत सहज प्रवेश करून प्रावीण्य मिळवील, यांत तरी नवल काय ?

दिगंबरपुराची मुख्य वस्ती नदीच्या काठानें असे आणि त्याला समांतर अशाच त्याच्या सर्व मुख्य आळ्या वसत गेल्या. सर्व जुन्या नदीतीरस्थ गांवांतून आळ्यांचीं व रस्त्यांचीं नांवें पडत जातात तशींच दिगंबरपुराच्याही रस्त्यांचीं व आळ्यांचीं पडलीं. कडची आळी, मधली आळी, खोल आळी; नंतर त्या गांवांत आठवड्यांतून दोन वेळां दोन ठिकाणीं बाजार भरे, यामुळें त्या ठिकाणच्या रस्त्यांस बाजारच्या दिवसावरून गुरुवार आणि मंगळवार अशीं नांवें पडलीं. एक हमरस्ता होता तो पेशव्यांच्या वाड्यावरून जाणारा होता म्हणून त्यास पेशवेआळी म्हणून नांव पडलें होतें. आणि कोणी पूर्वकाळच्या श्रीमंत गृहस्थांनीं फारच सुंदर आणि अवाढव्य असें महादेवाचें देऊळ बांधलें होतें, म्हणून त्या रस्त्यास "ओकांच्या महादेवाचा रस्ता" असें नांव पडलें होतें. दिगंबरपुरांत इतके काय ते अत्यंत मुख्य असे रस्ते होते. बाकी या रस्त्यांना एकमेकांशीं जोडणाऱ्या अनेक बारीक गल्ल्या होत्या. त्यांचीं नांवें बहुतकरून तेथें राहणाऱ्या कोणा तरी मोठ्या माणसाच्या नांवावरून किंवा कांहीं अन्य कारणांवरून पडलीं होतीं. तीं सगळीं देण्यांत तात्पर्य कांहींच नाहीं. यांतील एका आळींत आपणास काम आहे, तिकडे आपण जाऊं.

पेशवेआळी पूर्णपणें ब्राह्मण-आळी असून तींत मोठाले जुने वाडे होते. ते वाडे मूळचे पेशवाईंतल्या सरदारांनीं व सावकारांनीं किंवा इतर श्रीमंत लोकांनीं बांधलेले होते; परंतु आज मितीस मूळ घराण्याच्या ताब्यांतच वाडे आहेत असे अगदीं थोडे होते. बहुतेक नवीन आलेल्या पेन्शनरांनीं, किंवा पूर्वी दरिद्री, परंतु आतां पैसे मिळून श्रीमंत झालेल्या लोकांनीं विकत घेतलेले होते. कांहीं वाड्यांचीं नांवें मात्र आतां कायम राहिलीं होतीं व कांहीं नवश्रीमंत्यांनीं आपलें नांव वाड्याला मिळण्यासाठीं खटाटोप करून तें बरेंच प्रचारांत आणण्यासाठीं खटाटोपही चालविला होता. त्यामुळें कोणी त्यांच्या नांवानें त्या वाड्यांचीं नांवें घेत व कोणी मुद्दामच कुचेष्टेनें जुन्या नांवानेंच वाड्याबद्दल बोलत. असा एकंदर प्रकार होता. या जुन्या वाड्यांपैकीं एका वाड्यांतच आज आपणांस जावयाचें आहे.

हा वाडा दोन मजली असून दोन चौकी होता. थोरला दरवाजा चांगला प्रशस्त म्हणजे वेळ पडल्यास घोडेस्वार घोड्यावर बसून तसाच आंत जाईल असा मोठा होता. त्याची दिंडीच उंच पुरुष विशेष खालीं न वांकतां आंत जाऊं शकेल अशी होती. दरवाजा मसाला खाल्लेल्या जड लांकडांचा असून त्याला कड्या वगैरे सर्व कांहीं जेथल्या तेथें होतें. आंतले बाजूस जड जड दुव्याच्या सांखळ्यांच्या कड्या आणि भला थोरला जाडी व लांब असा अडसर होता. दरवाज्यांतून आंत शिरतांच दोनही बाजूंस देवड्या आणि दोनही बाजूंस त्या देवड्यांच्या कोंपऱ्यांतून वरच्या माडींत जाण्यास जिने असत. दोन्ही बाजूंस दालनें असत आणि समोर पायऱ्या चढून गेलें कीं, ओटी. ही ओटी मोठी थोरली विस्तृत असे. हिच्यावर एक मोठा झोंपाळा टांगलेला असे. शिवाय एक चांगलें मोठें जाजम पसरलेलें असे. त्यावर एक पानसुपारीचें तबक, एक तस्त, एक लिहि-

ण्याची पेटी, एक दप्तर, भिंतीस टेंकून एक लोड, दोन तीन तक्के, पेटी व दप्तर ज्या ठिकाणीं होतें तथेंच भिंतींत एक मोठें थोरलें फडताळ होतें. त्याला एक जंगी कुलूप होतें. जाजम पसरलें होतें त्याच्या उजव्या बाजूस देवघराची खोली होती. ही खोली विस्तृत असून देवाचा देव्हाराही फार मोठा होता. तेथें जवळ जवळ कमरेएवढी उंच व कमळाच्या पानाप्रमाणें विस्तृत अशा टवळ्याची, दोन बाजूंस वाती जळणारी आवळ्यांची एक भली थोरली समई तेवत होती. शेंडीच्या अग्रास गांठ देऊन ती गांठ टाळूवर ठेवून सर्व शेंडी डोक्याभर पसरून दिली आहे, खांद्यावर एक फडकें टाकलें आहे, आणि गुडघ्यापर्यंत पंचा नेसला आहे असा एक ब्राह्मण मोठ्या थोरल्या सहाणेवर चंदनाचें खोड उगाळीत होता व तोंडानें विष्णुसहस्रनामाचा पाठ चालला होता. पूजेचें सर्व साहित्य अगदीं तयार होतें. फक्त पूजा करणार केव्हां येताहेत अशी जणूं काय सर्व सामग्री वाटच पहात आहे असें दिसलें. ओटीच्या दोन कोंपऱ्यांस दोन दारें होतीं. तीं दोनही माजघरांत जाण्यासाठींच होतीं. आणि दोनही दारांच्या (एकाच्या उजव्या एकाच्या डाव्या) बाजूस वरच्या मधल्या माडींत जाण्यास जिने असत. माजघर फार विस्तृत, पण जुन्या वाड्यांच्या रीतिप्रमाणें अगदीं अंधारमय असे. माजघराला व माजघराच्या पलिकडल्या ओसरीला लागून एका बाजूस आडवें स्वयंपाकघर असे आणि दुसरे बाजूस सोंवळ्याची म्हणजे पापड, लोणचीं वगैरे जिन्नस ठेवण्याची खोली असे. त्यानंतर मागल्या बाजूस एक चौक असे तेथें पाणी सांठविण्याचीं मोठमोठाली भांडीं असत. कोठीची खोली असे त्याचप्रमाणें वर्षाच्या बेगमीच्या धान्याधुन्याच्या खोल्या असत. स्नानाचा वगैरे चौक हाच. जसा हा वाडा खालून, तसाच वरही असे. मोठमोठाल्या माड्या लागतील तितक्या. आणि त्या मजल्यावर गच्च्या. कवलाघर मुळींच नाहीं. गच्च्या केवढाल्या तरी होत्या.

हा वाडा दादासाहेब दिगंबरपुरकरांचा होय. ते असें म्हणत कीं, पूर्वीचा हा वाडा त्यांच्याच पूर्वजांचा निदान ज्या जागेवर तो वाडा बांधला होता, ती जागा तरी आपल्या मूळपुरुषाच्या ताब्यांत असलेल्या जागेची होय. परंतु तें कसेंही असो. दादासाहेबांनीं तो सुमारें पंधरा वर्षांपूर्वींच विकत घेतला. दिगंबरपुरास अशा वाड्यास किंमत कांहीं फारशी पडत नव्हती; कारण तेथें जागेला अजून तशी किंमत येऊं लागली नव्हती. दादासाहेबांचें कुटुंब फार मोठें होतें. आणि त्यांचा लवाजमाही बराच होता. परंतु एवढा थोरला वाडा त्याच्यायोगानें भरल्यासारखा दिसेल असा तो नव्हता. मूळचा वाडा सरदारी, त्यांत आतां हे नोकरीच्या पैशावर वगैरे श्रीमंत झालेले येऊन राहिले, तर सरदारी वाड्यास तितके कसे शोभावे! तथापि दादासाहेब बरेच शोभत. कारण सरदारी थाटाची त्यांस मोठी आवड असे. जुन्या काळचे थोर घराण्यांतले कर्ते पुरुष ज्या तऱ्हेनें वागत, त्या तऱ्हेनें, थाटानें व इतमामानें आपण रहावें अशी त्यांची मोठी इच्छा. ती इतकी कीं, त्यांचें जें मूळचें आडनांव होतें, तें त्यांस तितकें पेशवाई थाटाचें न वाटल्यामुळें त्यांनीं आपल्या त्या आडनांवांत बदल केला. ते आपली सही दिगंबरपूरकर अशी घा

लागले. आणि त्यांतच त्यांस भूषण वाटलें. जुनीपानीं कांहीं हत्यारें गोळा करून व त्यांबद्दल परवाना घेऊन त्यांनीं तीं आपल्या देवडीवर लावून दिलीं होतीं. आणि दोन शिपाई नेहमीं देवडीवर बसलेले असत.

---

# प्रकरण ६ वें.

## भावी व्याही.



अशा त्या आपल्या वाड्याच्या ओटीवर दादासाहेब फडताळाच्या जवळच लोडापासून कांहीं अंतरावर आडवे बसले होते. त्यांचे समोर त्याचप्रमाणें लोडापासून कांहीं अंतरावर चार गृहस्थ बसले होते. दादासाहेब भव्य पुरुष होता. वर्ण अगदीं गोरा. तोंडवळा किंचित् लांबट परंतु मोठा उमदा दिसे. नाक बहुतेक सरळ परंतु तोंडाशीं किंचित् चोंचीप्रमाणें. डोळे चांगले विशाळ, काळेभोर आणि तेजस्वी होते. ओंठाच्या ठेवणीवरून गृहस्थ मोठा दृढनिश्चयी, एकवचनी किंबहुना दुराग्रही असावा; त्याचप्रमाणें तामसवृत्तिही बहुत जागृत असावी असें स्पष्ट दिसे. त्यांच्या केंसांचा बहुतेक रंग फिरत चालला होता, आणि शरीर अद्यापि एखाद्या सरळ काठीप्रमाणें अगदीं सरळच असे. त्यांचें वय सुमारें साठ एकसष्ट वर्षांचें होतें, परंतु ते तितके दिसत नसत. सुमारें पन्नास बावन्न वर्षांपर्यंत असावेत असेंच त्यास वाटे. त्वचा किंचित् किंचित् चिमुळली होती, परंतु ती व केंसांचा रंग यांखेरीज जरेचें स्पष्ट चिन्ह दुसरें कोणतेंही नव्हतें. दांत अजून हरभरे कडाकड चावण्याजोगे होते. कान अगदीं तिखट होते. दृष्टि चांगली साफ होती. आवाज खणखणीत आणि रोज पांचसात मैलांची रपेट सहजगत्या करण्याइतकी अंगांत ताकद असे. अद्यापि गार पाण्याचें स्नान सुटलें नव्हतें. आणि तीन चार आवृत्त्या नमस्काराच्याही घालीत. दादासाहेबांच्या डोकीस या वेळीं थोडें लहान परंतु जरा सैलच बांधलेलें असें पागोटें होतें. ही मंडळी येण्याबरोबर, "अरे माझें पागोटें कुठें आहे आण," असें म्हणून त्यांनीं स्वतःच तेथल्या खुंटीवरून घेऊन घातलें होतें. त्यांचे अंगांत या वेळीं एक बाराबंदी होती, आणि अंगावर एक दुहेरी धोतर होतें.

त्यांचे समक्ष बसलेले गृहस्थांत एक अतिशय वृद्ध होते; साधारणतः वार्धक्यांत शरीरावर दिसून येणारे सर्व विकार त्यांचे अंगावर दिसूं लागले होते. त्यांच्या अंगावर चांगलें जाडीपैकीं दुहेरी धोतर हो

आणि नेसतें धोतर त्यापैकींच होतें. खांद्यावर एक फडकें असून त्यावर तपकिरीचे डाग स्पष्ट दिसत होते. डोक्यास कंदी पागोटें व तेंही अगदीं गचाळ्याप्रमाणें बांधलेलें होतें. धड असणाऱ्या पट्ट्यापेक्षां सैल पट्ट्याच विशेष होत्या म्हटलें तर चालणार आहे. यांचें नांव भिकंभटदादा वैशंपायन होय. त्यांचे शेजारीं आणखी एक भटजी होते. त्यांचें नांव सोनभट. न गच्छेत् ब्राह्मण त्रयं, म्हणूनच त्यांस भिकंभटांनीं बरोबर आणलें होतें. त्यांचे शेजारीं बसलेले गृहस्थ जरा ऐटबाज दिसत होते. वय सुमारें चाळीस पंचेचाळीस डोकीस अगदीं तलम अशा सुताचें मोतिया रंगाचें पागोटें. शेंडी मोठी असावी, कारण तिचा कांहीं भाग व खालचा संजाब हीं पागोट्याचे बाहेर स्पष्ट दिसत होतीं. अंगांत अंगरखा सरदारी थाटाचा पांढरा आणि इतक्या नाजूक कापडाचा कीं, त्यांतून आंतलें भरजरी जाकिट स्पष्ट दिसत होतें. अंगरख्याची गुंडी लाविलेली होती, परंतु आंतली पाकळी व वरची पाकळी यांतून सरासरीं एक बोट रुंदीची जाकिटाची जागा चांगली दिसत होती. बाह्यांना चुण्या होत्या. रुप्याच्या मुठीची काठी उजव्या हातांत व जरीकांठी उपरण्याचा बोळा डाव्या कांखेंत. नेसतें धोतर बाजीरावीच केवळ नाहीं, पण नितक्या बेताच्याच करवती कांठांचें होतें. वर्ण सांवळा. नाकडोळे मध्यम. या गृहस्थांचे शेजारीं एक सतरा अठरा वर्षांचा मुलगा बसला होता. त्याचे डोक्यास जरीचें काम खूप केलेल्या रुंद पट्टीच्या जांभळ्या मखमालीची अशी टोपी. शेंडी, घेरा वगैरे कांहीं नसून डोकीला अलीकडल्या तऱ्हेवर केंस ठेविलेले होते. मग आंत एक बोटभर शेंडी ठेवलेली असली तर कोणास ठाऊक! अंगांत उंची काळ्या बनातीचा एक पारशी फॅशनचा कोट. जरीकांठी धोतर नेसलेलें. अंगावर उपरणें मुळींच नव्हतें. वर्ण काळसर. अंगकाठी सडपातळ असावी. डोळे पाणीदार आणि तोंडावळा चारचौघांसारखा.

इतकें या मंडळींचें वर्णन झालें. आतां यांचें नांव, गांव वर्णन करून आणखी वेळ घालविण्यापेक्षां त्यांच्या व दादासाहेबांच्या भाषणाकडेच आपण लक्ष देऊं म्हणजे सर्व कांहीं आपणास समजणार आहे. ते येण्याबरोबर दादासाहेबांनीं आदरपूर्वक उठून अर्थातच त्यांस लोडाशीं टेंकून बसण्याबद्दल विनविलें होतें. परंतु रीतीप्रमाणें कोणीच लोडाशीं न टेंकतां डावे बाजूस दादासाहेब व उजवे बाजूस ही त्रयी अशी मंडळी बसून लोड तसाच मधें राहिला.

दादासाहेब किंचित् हंसतमुख करून भिकंभटदादा वैशंपायनांच्याकडे पाहून म्हणतात, "कां दादा, हा लोड अगदीं विशोभित दिसतो. आपण तिथें बसल्यानं तोही सुशोभित होईल, आणखी आम्हीही संतोषित होऊं."

"बरं आहे, बरं आहे. तें स्थान रिकामं असण्यानंच त्याला शोभा आहे." भिकंभटदादा मोठ्यानें म्हणतात, "आमचे गुरु-गुरु कसचे? परमगुरु म्हणावयाचे, अन्नंभट--ज्यांनीं धर्मसिंधूवर केवढी व्याख्या केली आहे, तिची एक फार सुंदर, त्यांच्या स्वतःच्या हातची प्रत आमच्या संग्रहीं आहे. ती कोणी छापून प्रसिद्ध करणारा भेटला, तर फार उत्तम होणार आहे. मी एकदां अलिबागेस अनुष्ठानाला गेलों होतों, तेव्हां खिवलकरांजवळ गोष्ट

काढली होती. पण आमच्या दुर्दैवानं सर्वच ग्रंथ आटपला. अहाहा! काय धर्मात्मे होते ते! या अलीकडल्या काळांत या प्रांतीं त्यांनीं जर या कर्माचा पुढाकार घेतला नसता, तर आजला यज्ञयागादिकांचें ज्ञान या दक्षिणेंतून पार नाहींसं झालं असतं असंच समजा. दादासाहेब, आपण कधीं अलीबागेकडे गेलां असाल, तेव्हां आपल्याला माहिती असेलच. आपल्यासारख्या अधिकाऱ्यांची बडदास्त ठेवायची, परिचय करून घ्यायचा ही त्यांना मोठी आवड. खरोखर सांगतों, दादासाहेब, या काळांत त्यांना अगदीं वैदिक कर्ममार्तंडच म्हणायला पाहिजे. आपण त्यांना पाहिलंच असेल. आम्हीं कशाला वर्णन करायला पाहिजे? पण आमच्यासारख्या भिक्षुकांचा त्यांनीं फार परामर्ष घेतला; तेव्हां त्याची आठवण आम्हांला पावलोपावलीं होते. म्हटलं म्हणजे ते कांहीं मोठे संस्थानिक नव्हेत. पण संस्थानिक काय करील असला त्यांचा धर्म आणखी अनुष्ठानाविषयीं भक्ति. नाहीं तर आतां तो...... अहो, गृहस्थानं लोकांच्या खिचड्या बंद केल्या. आमच्यासारख्यांच्या दक्षणा बंद केल्या. सगळ्या ब्राह्मणांना कार्ट आली कार्ट कीं, तुम्हांला यापुढें दक्षणा मिळायची नाहीं, बरं बाबा. नाहीं तर नाहीं मला चांगली सव्वाशें रुपये दक्षणा असे हो! ......"

भिकंभट दादा वैशंपायनांचें आणखीही असेंच चाललें असतें; परंतु दादासाहेब मध्येंच त्यांस म्हणाले: "आपल्याला सांगतों दादा, आतां हा असाच प्रकार व्हायचा. लोकांची मुळीं श्रद्धाच उडत चालली, आणखी कोणाला हें धर्मकर्म बिलकुल नको, असं झालं आहे. बरं पण आपण अन्नंभटजींचं काय सांगत होतां तें राहिलंच."

"हो. हो. तें सांगत होतों म्हणजे असं कीं ते नेहमीं असं म्हणत. आमचे तीर्थरूप राजारामभटजी, अहाहा! त्यांच्यासारखा विद्वान् ब्राह्मण या दिगंबरपुरांत तर दुसरा नव्हताच. अहो, एकदां संहितेचा पाठ सुरू झाला, म्हणजे नुसता गंधर्व गातो आहे असं वाटायचं. त्यांचा कंठ काय, त्यांची वाणी काय, अस्खलित अक्षरं. जशी कांहीं घटप्रभा उंचावरून खालीं पडते आहे. मुंबईस एकदां एक श्रीमंत भाट्यानं यज्ञ केला होता, त्यांत ऋत्विजांत होत्याचं काम त्यांना दिलं होतं. अहो, ज्यांना कांहीं यांतलं ज्ञान नाहीं, असले लोक तोंडांत बोटं घालून टकमकां पहात आणखी ऐकतना! फटाकडे उडत नुसते फटाकडे! आमचे वडील राजारामभटजी होते, आणखी हे आपले दिनकरभट आहेतना, आपले उपाध्ये, त्यांचे आजोबा विसंभट तात्या अध्वर्यु! मग काय विचारतां! जोडी पण जोडी होती! आणखी जेव्हां का हवामाहे...काय तें, नुसत्या आतां आठवणीच काढीत बसायचं झालं. विसंभट तात्या म्हणजे साक्षात् यजुर्वेदाचा अवतार म्हणत, आणखी त्यांनीं आमच्या वडिलांना म्हटलं, कीं राजारामभट! अग्निर्वै देवानां होता, तो तूं खरा आहेस. आह्मी तुझ्यापुढें कांहीं नाहीं. ते काय ते दोघेही परस्परांना अगदीं अतिशय मानीत. कोणी कांहीं शास्त्रार्थ विचारायला येऊं द्या, कीं आमचे वडील म्हणायचे कीं तात्यांकडे जा, आणखी तात्यांनीं सांगायचं राजारामभटजींकडे जा. अन् मग दोघांनीं मिळून बसून शास्त्रार्थ काढून द्यायचा. तो काय पण काशीपासून रामेश्वरापर्यंत वाटेल

तिथें जाना ! कधीं कोणीं त्यांत जर फरक सांगितला–पण तसं कधीं व्हायचंच नाहीं............"

" हो. हो. आह्मीं त्यांची ख्याति कुठें कुठें तरी ऐकली आहे ! पण दादा, अण्णासाहेबांनीं इथें येण्याची एवढी तसदी घेतली, त्याचं कांहीं कारण समजलं नाहीं. "

"हो. हो. तें राहिलंच त्या आपल्या लोडामुळं. हें मधें तिसरंच निघालं. मी सांगत होतों, तें इतकंच कीं, आमचे गुरु–म्हणजे परमगुरु म्हणायचे जे अन्नंभट्ट ते नेहमीं म्हणायचे कीं, पंडितसभेंत काय किंवा राजसभेंत काय, राजा असेल तर निराळं, पण त्याच्या अभावीं मध्यस्थान रिकामं राहणं हीच त्याची शोभा. ते कधींही मध्यस्थानीं बसत नसत. त्यांची योग्यता कांहीं लहान होती ? पण तें असो. अण्णासाहेब आपल्याकडे आले आहेत ते आपल्या इथें मुलगी पडावी या उद्देशानं आले आहेत, तेव्हां आपला काय मानस असेल तसं खरं. "

" वाहवा ! वाहवा ! वाहवा ! " दादासाहेब किंचित् आनंद व अभिमान यांनीं पूरित होऊन म्हणतातः " भिकंभटदादा, हें काय हें. यांच्यासारख्यांची मुलगी आमच्या गरिबाच्या घरीं ! हे संस्थानिक जहागीरदार. पिढीजादे सरदार. आणखी आम्ही आपले उगीच या इंग्रजसरकारची नोकरी करून पोट भरणारे. तेव्हां हें हो काय तुम्हीं यांच्या मनांत भरवून दिलं.वा ! वा ! वा ! यांची आमची कांहीं तरी बरोबरी ! पालखीपदस्थ मंडळी हीं, आणखी आम्ही आपले...! बाकी आमच्या घराण्यांतल्या मुली संस्थानिकांच्या इथें दिल्याही आहेत, आणखी केल्याही आहेत. खुद्द पेशव्यांच्या घराण्यांतली मुलगी आमच्या चुलत निपणजांना केलेली होती. आणखी मला वाटतं पटवर्धनांच्या घराण्यांत दोन तीन मुली आमच्या दिल्या आहेत. तेव्हां तसा कांहीं भाग नाहीं. पण आम्हांला आजमितीला हें तोलावं कसं ? हा विचार आहे. बाकी त्यांचंच जर म्हणणं आहे, तर ते आम्हांला संभाळून घेतील, आणखी काय पाहिजे ! किती झालं तरी सरदारी घराण्यांतलीं माणसं. एकदां त्यांनीं आम्हाला आपलं म्हटल्यानंतर का आम्हाला टाकतात ? काय अण्णासाहेब ! "

" दादासाहेब, हें काय आपण बोलावं. आम्हीच आपल्याकडे आम्हांला पदरांत घ्यावं म्हणून विनंति करायला आलों आहों. आणखी आपणच असं म्हणाल्यानंतर काय आम्हीं बोलावं ? "

" दादासाहेब, छे. छे. तसं नाहीं माझं म्हणणं. माझं म्हणणं खरं का खोटं भिकंभटदादा सांगतील. कां दादा ? बाकी दादा सांगतील, त्यांच्याबाहेर मी मुळीं सुद्धां नाहीं. भिकंभटदादा म्हणजे आमच्या या दिगंबरपुराचं केवळ नाक आहे. त्यांचा शब्द मोडील कोण ? यांच्या वडिलांची आणखी गुरुघराण्याची आम्ही नुसती कीर्ति ऐकतों. पण यांची विद्वत्ता आतां स्वतः पहातों आहोंत. सगळ्या दिगंबरपुरांत तर यांच्या पट्टीचा ब्राह्मण नाहींच. पण सगळ्या दक्षिणेंत मी या सरकारी नोकरीच्या योगानं हिंडलों, संस्थानांतही कारभार केले, पण असा विद्वान् भिक्षुक आणखी व्युत्पन्न ब्राह्मण कांहीं मला कुठेंसुद्धां आढळला नाहीं. दादा, काय आपलं म्हणणं ! आम्हीं नाहीं म्हणूं नये ! ठीक आहे. आपल्याबाहेर

कांहीं मी नाहीं. मी आपलं बोललों तें माघारीं घेतलं. "

" अहो, हे संस्थानिक काय न तुम्ही काय ? हे पेशवाईंतले जुने सरदार पण तुम्ही बडे बडे हाफसर म्हणजे इंग्रजी अमदानींचे सरदारच नव्हे का ? सरकारांनीं तुम्हांला जहागिरी, इनामं दिलीं नाहींत एवढंच कीं नाहीं ? इंग्रजसरकारच्या राज्यांत तें नांव काढूं नका. कुणाला रावसाहेब करतील, रावबहादूर करतील, चांद देतील, नाहीं तर साई कसाई करतील, दुसरं काय ? कां मी म्हणतों हें खरं का खोटं ? "

" अगदीं अक्षरशः खरं. भिकंभट, मला तें आवडत नाहीं. पण काय करायचं ? मला न विचारतां त्यांनीं रावबहादूर किताब दिला. आतां त्याला करायचं काय ? आणखी आतां म्हणताहेत ऑनररी मॅजिस्ट्रेट व्हा. आतां काय उत्तर द्यावं असं मला झालं आहे. "

" हं ? मला तुम्हालाय म्हणायला लागले का ' अन्नावारी ' मॅजिस्ट्रेट व्हा म्हणून ? "

दादासाहेब हंसून म्हणतात, " आहे, अन्नावारी कुठलें ? अन्नसुद्धां नाहीं. फुकटावारी व्हा म्हणताहेत. मी लिहिणार आहें माझ्यानें आतां दगदग व्हायची नाहीं म्हणून. पण...... "

" अहो, सरकाराला फुकट काम करून घ्यायला पाहिजे, लोकांना वाटतं इकडे हा मोठा मान झाला आपला ! बरं पण, आपण मॅजिस्ट्रेट झालां, तर लोकांना तरी पुष्कळ सुख होईल. तेव्हां एका दृष्टीनं पाहतां आपण जर ती गोष्ट कबूल केली तर सर्वांना आनंदच होणार आहे. "

" तेवढ्याचकरितां तर माझा जीव घुटमळतो आहे. आणखी एकदां वाटतं कीं, पतकरावं म्हणजे लोकांनाही बरं, आणखी सरकारचीही मर्जी मोडायला नको. अहो, आजमितीस दिवस असे आले आहेत कीं, सरकारची केवळ मर्जी मोडूनच चालायला येत नाहीं. कां अण्णासाहेब, मी म्हणतों ही गोष्ट आपल्या अगदीं पक्की अनुभवांतली असायची. अहो, आम्ही तरी जर सरकारला न जुमानतां वागूं म्हटलं तर चालणार आहे. पण आपलं मगळंच कांहीं निराळं. एजंटसाहेब म्हटले म्हणजे अगदीं राजेच......बरं चला, त्याचं काय आतां ! पण आपल्या म्हणण्याच्याबाहेर मी कांहीं नाहीं. गतवर्षीपर्यंत मुलाचाही हट्ट होता कीं, आपली बी. ए. ची परीक्षा पास होईपर्यंत लग्नाचं अगदीं नांव सुद्धां काढूं नका. तेव्हां म्हटलं, म्हणता आहे मुलगा, त्याच्या कां नादानं घेतलं नाहीं ? पण आतां यंदां तो पास होणार. आजपर्यंतच्या त्याच्या वहिवाटीप्रमाणं तो पास होणार यांत शंकाच नाहीं, न मग मी कांहीं त्याचं ऐकत नाहीं. घरांतून एकसारखं चाललं आहे कीं, बापूचं लग्न कधीं करून टाकायचं. आतां यंदां निश्चय कायम केला आहे-तेव्हां ती कांहीं अडचण नाहीं. "

अण्णासाहेबः—वा ! मग ठीक आहे. आपण मुलगी पहायला केव्हां यायचा विचार कराल तेव्हां......

दादासाहेबः—मुलीला काय पहायचं आहे ? आपल्या घराण्यांतली मुलगी पहायची काय ? तथापि आपलं शिष्टाचाराप्रमाणं पाहण्याला येण्याला माझी हरकत नाहीं.

अण्णासाहेबः—आतां आमच्या मुली

बद्दल आम्हींच काय बोलायचं आहे? भिकंभटदादांनीं तिला अनेकवार पाहिली आहे. त्यांनाच आपण विचारावं.

भिकंभटदादाः—दादासाहेब, मुलीबद्दल आपल्याला बिलकुल काळजी नको. दहा हजारांत मुलगी आहे. नुसना चिमखडा. आणखी हुशार, चाणाक्ष. कां सोनभट, मी म्हणतों तें खरं का खोटं?

सोनभटः—अगदीं अक्षरशः खरं. अहो अण्णासाहेबांच्या घराण्यांतली मुलगी अन्यथा असणार कशी? मुलीची काठी काय, तिचा वर्ण काय, तिचे डोळे काय, सर्व कांहीं जिथल्या तिथें.

अण्णासाहेबः—शिवाय हल्लींच्या काळीं मुलीला वाचायला ल्याहायला येतं कीं नाहीं ह्मणून पाहतात, तर तें सुद्धां थोडंबहुत येतं आहे. अगदीं घरीं मास्तर ठेवून......

दादासाहेबः—लिहिण्यावाचण्याची मला कांहीं मातबरी नाहीं. ते अलीकडे चार आहेत. बायकांना ट फ आलं कायनू नाहीं काय, त्याची काय किंमत? मुलगी कुलशीलवान्, स्वरूपवान् अशी असली, कीं मला दुसरं कांहीं पहायचं नाहीं. तेव्हां आतां आपण म्हणाल तेव्हां मी पहायला येतों.

अण्णासाहेबः—पण एक आपल्याला विनंति आहे. आजपयत आमच्या घराण्यांतली मुलगी लग्न होण्यापूर्वीं परगांवीं नेऊन कांहीं कोणाला दाखविण्याची वहिवाट नाहीं. आणखी ती आतां पाडण्याचा प्रसंग येऊं नये अशी फार इच्छा आहे. ती पुरवणं आपल्याकडे आहे. आपण खोपवलीला चलावं. आपला तेथपर्यंत जाण्यायेण्याचा बंदोबस्त उत्तम ठेवतों. मग बरोबर कितीही मंडळी असली तरी हरकत नाहीं. पण मुलीला इकडे आणायची, ह्मणजे जरा......

दादासाहेबः—छे. छे. छे. छे. मला काय हे रिवाज ठाऊक नाहींत कीं काय? मला तर असा हा गांवोगांव आपली मुलगी हिंडवण्याचा मोठा तिटकारा आहे. भलतंच एखादं! मी कधीं आपल्याला तसं म्हणणार नाहीं. अहो, हे आतां नवीन पैसे मिळाल्याकारणानं उंडारलेले लोक यांनीं या चाली पाडायचा आरंभ केला आहे. आणखी मोठ बायकांची स्थिति सुधारण्याच्या गप्पा मारताहेत! पण कित्येक मूर्ख तर आपल्या घरीं मुलीला दाखवायला आणा म्हणतात. काय त्यांच्या मूर्खपणाला म्हणावं! मीं आजपर्यंत तीन मुलींचीं कार्यं केलीं, पण मुलीला पहायला येणारांना आमच्या घरीं बोलावलं. अहो, मुलगी म्हणजे का विक्रीचा माल आहे, का आहे तरी काय? हे आतांचे सुधारलेले लोक. यांना नाहीं कांहीं रीत, नाहीं चाल, नाहीं व्यवहारज्ञान, नाहीं अक्कल. आपलं मनःपूतं समाचरेत् असं करायला पाहिजे. तुम्ही अगदीं बेलाशक मला सांगाल तेव्हां मी येईन. बरोबर आमचे उपाध्येबोआ, मुलाचे मामा आणखी भिकंभट इतकी मंडळी घेऊन येतों. आपली जेव्हां सोय असेल, तेव्हां कळवा. मी काय आतां कोणाचा चाकर नाहीं, नोकर नाहीं. स्वस्त आपली पूजाअर्चा, नैवेद्यवैश्वदेव करून काळ घालवितों. आणखी शेवटपर्यंत अस्सा काळ घालवायचा विचार केला आहे. मग ईश्वराच्या कृपेनं काय काय घडेल तें खरं.

अण्णासाहेबः–( हंसत हंसत ) आपण येणार त्याप्रमाणं घरांतली कांहीं मंडळी आणण्याचा विचार असता, तर पडद्याच्या

धमनीची वगैरे व्यवस्था करतां येईल. त्यांना तरी एकदां मुलगी पहाणं जरूरच आहे. कारण मुलगी नांदायची आहे त्यांच्या हाताखालीं. म्हणून म्हणतों, कीं तसाही विचार केला तर बरा.

भिकंभटदादाः–आणखी दादासाहेब, मुलगी एकदां नव्या रीतीप्रमाणं मुलाच्या नजरेला पडली तरी सुद्धां ठीक. नाहीं तर काय ? आयत्या वेळीं मुलगा म्हणायचा मी लग्नाला उभा रहाणार नाहीं. मला मुलगी पसंत नाहीं. अहो, आतां जीं थेरं थेरं झालीं आहेत तीं विचारूंच नका. आमच्या इथें पांच वर्षांपूर्वी मुन्सफ होते-ना ते ! शृंगारपुरे ! त्यांच्या मुलाचं ठरवलं लग्न. त्यांनीं स्वतः मुलगी पाहून तिथि-निश्चय केला. मुलाला गांवाहून आणला आणखी त्या मुलीबद्दल काय त्याला कोणीं सांगितलं, तो मुलगा चिथरला. इतका कीं, " वडिलांनीं पाहिलेली मुलगी आम्हांला पसंत नाहीं, आम्ही लग्नाला उभे रहात नाहीं, त्यांनीं पाहिजे तर स्वतःच लग्न करून घ्यावं. " अशीं उत्तरं त्यानं चालविलीं. मग काय त्या फाजिल्याला विचारतां ! अशीं मुलं म्हणूं लागलीं तर त्या बापानं करावं काय ! आपल्या इथें तसा प्रकार होईल, असं माझं मुळींच म्हणणं नाहीं हो, दादासाहेब, पण आपला आमच्या दिगंबरपुरांतच झालेला मासला सांगितला. बाकी आपली गोष्ट कोणी-कडे आणखी..........

भिकंभटदादाः–असले दाखले आम्हांला सांगूं सुद्धां नका. ते बापही तसलेच. आणखी त्यांची आपल्या मुलांवर कदरही तशीच. असला कारटा झाला, तर पुनः मी त्याचं मुखावलोकनसुद्धां करणार नाहीं. मग आणखी तर काय ? बरं तें असो. या भिक्षुकांच्या बोलण्याकडे विशेष लक्ष देण्यांत अर्थ नसतो. आपण कधीं सांगाल ते दिवशीं मी यायला तयार आहें.

अण्णासाहेबः—परवांचे दिवशीं प्रातः-काळीं गर्गाचार्यांच्या मुहूर्तावर आपण निघावें. आम्ही आज पुढें जातों. आप-ल्या गाड्या आणखी एक धमनी उद्यां रात्रींच इथें येऊन सुटतील.

दादासाहेबः—ठीक आहे. आमची त-यारी आहे. आपण सांगितल्या वेळीं निघतों.

इतकें बोलणें होतांच मंडळी उठण्या-च्या विचारास लागली. दादासाहेबांनीं पानसुपारी दिली. अण्णासाहेब व त्यांचे चिरंजीव–जे इतक्या सर्व प्रसंगांत केवळ मुखस्तंभवत् बसले होते ते उठले. त्यांच्या शिपायानें त्यांचे विजापुरी जोडे पुढें ठेवि-ले ते घालून मंडळी गेली.

---




दी बांबे बिग बबल ब्यांकिंग ब्यूरो. (प्रकरण ७ वें पहा.)

# प्रकरण ७ वें.

## दी बॉंबे बिग् बबल् ब्यांकिंग् ब्यूरो.



प्रकरणाचें नांव वाचतां
वाचक आश्चर्यानें
काय आहे तें समज
ण्यांच्या उत्सुकतेनें अ
गर्दी विस्तृत नेत्र
'आ' कृतवक्त्र होतील
परंतु वरील 'ब्यूरो' ऊर्फ ऑफि
ज्या दिवशीं उघडण्यांत आलें, त्या दि
वशीं मुंबईच्या दलाल स्ट्रीटमध्यें व शेर
बाजारांत जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक
इसमाची तीच अवस्था झाली. जो तो
आपापसांत कुजबुजून विचारूं लाग
कीं ही ब्यांक कोठून अस्तित्वांत आली
ब्यांकेचें ऑफिस उघडण्याच्या दिव
पर्यंत तिचें नांव किंवा तिचा ठाव
णाच्या स्वप्नांत सुद्धां नव्हता. परंतु उ
डली ते दिवशीं सर्व गोष्टी एकदम अ
त्वांत आल्या. ऑफिसाचा थाट का
प्रास्पेक्टस काय ! चेकबुकें काय ! आ
कल्स ऑफ् असोसिएशनचें पुस्तक का
सर्व पहिल्या प्रतीचें. बँकेचे एजंट अ
मोठ्या शहरीं नाहींत असें नाहींच
प्रास्पेक्टसवरून दिसत होतें. ब्यांकेचा
फार परोपकाराचा. एक तर गरीब लोक
रुपया दोन रुपयांपासून सुद्धां ठेवी ठे
व्याज मिळावें हा व थोड्या थोडक्या
रणावरसुद्धां सहज उसनवारी मिळ

माल आपमतलबी परकी व्यापारी आपल्या तिकडल्या भांडवलानें येथें खरेदी करून नफा व व्याज खातात, त्यापेक्षां आपलाच माल, परदेशांतलें भांडवल पण व्यापार करणारे आपण व आपलें हित पाहाणारे कांहीं साहेब असें असल्यानें नफा आपलाच, व्याज आपलेंच आणि भांडवल कांहीं येथलें पण मुख्य परदेशांतलें अशा श्रेष्ठ तत्त्वांवर व्यापार करण्याचाही एक मुख्य हेतूंपैकींच हेतु होता. त्याचप्रमाणें शेर विकून देणें, शेर विकत घेऊन देणें, हुंड्या विकणें, हुंड्या देणें, हुंड्या विकत घेणें, पटवून देणें वगैरे ब्यांकेचीं नेहमींचीं कामेंही केलीं जातील अशीं अभिवचनें प्रास्पेक्टसमध्यें होतींच. ब्यांकेचें नांव जितकें मोठें तितकाच ब्यांकेनें केला जाणारा व्यापारव्यवहार मोठा थोरला असणार, अशाबद्दल शब्दांनीं जितकें म्हणून वर्णन करणें शक्य तितकें त्या प्रास्पेक्टसमध्यें होतें. प्रास्पेक्टस सर्व इंग्रजींत होता त्याचा छोटेखानी नमुना खालीं देतों.

**दी बॉम्बे बिग् बबल् ब्यांकिंग् ब्यूरो.**

---

**ही ब्यांकिंग् ब्यूरो मूळची लंडनची**

लंडन येथील पत्ता १९२-१९३-१९४
लंडनडरिब्रिज क्रॉसलेन.

**मूळ लंडनमध्यें भांडवल**
**५०००००००० रुपये.**

मुद्दाम हिंदुस्थानांत शाखा काढली आहे.
शाखा काढण्याचा विचार प्रसिद्ध कर-
तांच सर्व हिंदुस्थातांत शेअर्स माग-
ण्याचा धडाका सुरू झाला आहे.
शेअरची किंमत फक्त २५ रु. तेही
एकदम द्यावयाचे नाहींत.

**डायरेक्टर्सची संख्या थोडी परंतु काम चोख.**

**डायरेक्टर्स—**

**लॉर्ड रोगह्यंडल नोवुईट** (प्रेसिडेंट)
**सर एम्प्टिहेड व्हाईसफुल** (व्हाइस प्रेसिडेंट)
**सर डॉंकिहेड ट्रिक्स्ले.**
**मि० हार्डप मर्नीमॅंगर**
**मि० एम. नोव्हेअर**
**मि० क्लोवनफूट ऑलबॉश**
(म्यानेजिंग डायरेक्टर)

एजन्ट्स अॅण्ड म्यानेजिंग डायरेक्टर्स.
मेसर्स **क्लोवन्फूट ऑलबॉश नोव्हेअर अॅण्ड को०**

या ब्यांकेच्या शाखा हिंदुस्थानांत कलकत्ता, मद्रास, लाहोर, अलाहाबाद, दिल्ली, आग्रा, लखनौ, कानपूर वगैरे सर्व शहरीं पसरल्या आहेत व आणखी कित्येक शहरीं लवकरच पसरणार आहेत.

*** विशेष माहिती खालील पत्त्यावर लिहिलें असतां मोठा प्रास्पेक्टस पाठविला जाईल त्यावरून मिळेल.

**पत्ताः**—दी बॉंबे बिग् बबल् ब्यांकिग् ब्यूरो—फोर्ट बॉम्बे.

या छोटेखानी प्रास्पेक्टसची छपाई कागद वगैरेपासून तों तहत आंतील मजकुरापर्यंत व एजंट्स, डायरेक्टर्स, सॉलिसिटर्सच्या नांवापर्यंत सर्व कांहीं अतिशय उंची असें होतें. नांवें इतकीं कानास बडीं बडीं वाटणारीं होतीं, कीं कोणी हीं नांवें कोणाचीं आणि या नांवांची मंडळी आहे कोठें, याची चौकशी करण्याची सुद्धां कोणास इच्छा झाली नसावी., जो तो त्या "दी बॉम्बे बिग् बबल् ब्यांकिंग ब्यूरो" या बकारप्रचुर नांव खोदलेल्या परंतु पॉलिश केलेल्या पितळी पाटीकडे, कांउटरच्यापुढील पितळी जाळीकडे व गंभीर चेहरे करून आंत बसलेल्या निरनिराळ्या क्लार्कांकडे टेहळून पाहात आणि कंपनीचें किती भांडवल असेल आणि किती नाहीं याबद्दल अचंबा करीत बरीच मंडळी ऑफिसपुढें इकडून तिकडे तिकडून इकडे हिंडत होती. त्यांत अर्थातच सर्व प्रकारची मंडळी होती.

कांउटरपलीकडे एका खोलींत ब्यांकेचे म्यानेजर व मुख्य काम करणारे एजंट मि० क्लोवन्-फूट ऑलबॉश् आपल्या ऑफिस् टेबलाजवळ बसून लिहितां लिहितां हातांतील कुइलपेन थांबवून कांहीं विचार करण्यांत गुंग झाले होते. सर्व 'बिझिनेस्' चे एजंट्स ऑल्बॉश नोव्हेअर आणि कंपनीचे हे म्यानेजिंग पार्टनर आणि ब्यांकचे एक्स्-ऑफिशिओ अर्थात् म्यानेजिंग डायरेक्टर होत. क्लोवनफूट ऑलबॉश हे अगदीं तरुण सुमारें पसतीस वर्षांचे असून नुकतेच इंग्लंडांहून आले होते, निदान असें ते ज्यास त्यास सांगत आणि मोठ्या प्रास्पेक्टसमध्यें यांच्या व्यापारी बुद्धीच्या तीक्ष्णपणाबद्दल जें वर्णन आलें होतें त्यावरून यांनीं यूरोपांतील बहुतेक मोठमोठ्या व्यापारी 'फर्म्स' (मंडळ्यांत) काम करून शिक्षण व शाबासकी मिळविली होती असें स्पष्ट होत होतें. त्यांचे नाकावर बसविलेला पिन्सर्स (चिमट चष्मा) व विशेषतः त्याची ती काळी रेशमी दोरी त्यांच्या

शहाणपणाबद्दल व हुषारीबद्दल विशेष साक्ष देत होती. त्याचे एके बाजूस, लट्ठ लट्ठ कातडी पुठ्ठ्याच्या लंबे चवडे पुस्तकांनीं भरलेलें एक शेल्फ होतें. त्या शेल्फाच्या डोक्यावरही तशींच दोन चार जाडीं पुस्तकें होतीं. टेबलावर पुस्तकांच्या एके बाजूस ल्याहावयाचीं सर्व साधनें आणि दुसरे बाजूस तसलींच लहानमोठीं पुस्तकें होतीं. त्याचप्रमाणें टेबलाखालीं पाय ठेवण्याच्या जागेजवळ अगदीं असलींच पाहिजे अशी जी " वेस्ट पेपर बास्केट " ( टाकाऊ कागदांची टोपली ) तीही होती हें सांगावयास नकोच. एकंदरीनं ऑफिसांत मुख्य ऑफिसरास साजेल असें जें जें म्हणून कांहीं पाहिजे तें तें सर्व अगदीं चकचक नवें, तेथें ठेविलेलें होतें. अमुक एक गोष्ट म्हणजे कमी होती, असें नाहीं. काउंटर म्हणजे देवघेवीचा व्यवहार चालवावयाचें टेबल व त्याचेवरील पितळी जाळीचा कठडा अगदीं चकचक करीत असून त्या कठड्याच्या मध्यें मध्यें देवघेवीचा व्यवहार चालविण्यासाठीं खिडक्या होत्या आणि संध्याकाळीं दिसेनासें झाल्यावर सुद्धां काम करावें लागलें असतां चक्क दिसावें, म्हणून प्रत्येक कारकुनाच्या खिडकीजवळ एकएक ग्यासचा दिवा होता. त्या खिडक्यांजवळ काउंटरवर काम करीत बसलेले कारकून बरेच होते आणि ते अमक्याच जातीचे होते असें नाहीं. एक वृद्ध असे मुंबईचे पाठारे परभू होते. यांचें नांव सोकरजी बाबुलजी. हे या ब्यूरोमधील अगदीं आधारस्तंभ. सोकरजी बाबुलजींनीं आपल्या तारुण्यापासून निरनिराळ्या कंपन्यांतून अगदीं लहान क्लार्कापासून तों क्याशिअरपर्यंत सर्व तऱ्हेचीं कामें केलीं. अमुक एका कंपनींत ह्मणजे ते वर्ष दोन वर्षांच्या वर कधीं राहिले आहेत असें झालेंच नाहीं. नवीन कोणती कंपनी मुंबईस झाली किंवा आली कीं यांनीं तिकडे मोठ्या जागेचा अर्ज करून व नाना प्रकारांनीं मिळविलेल्या आपल्या सर्टिफिकिटांचें भिडालें त्या अर्जासोबत पाठवून, त्या कंपनींत जागा मिळवावी. वर्ष दोन वर्षें तेथें चाकरी करावी, मग तेथें हे कंटाळले ह्मणून ह्मणा किंवा कंपनी यांना कंटाळली ह्मणून ह्मणा पण यांना नोकरी सोडणें अवश्य वाटून यांनीं पुनः इतर कंपन्यांकडे अर्ज फेंकण्याचें काम सुरू करावें. असा सोकरजी बाबुलजींचा क्रम असे. तुह्मी असे नेहमीं हिंडत कां असतां, कोठें तरी एके जागीं चिकटून कां रहात नाहीं असें कोणीं विचारलें, तर हे त्याला " अरे साला एजंट झाला तर काय मला लायरी दाखवील काय ? हा सोकरजी कधीं नाय अशी लायरी ऐकून घेल. काय खावाला मिळत नाय काय. ते सपात खाऊन काम करायला भट नाय लागला. " असें उत्तर मिळत असे. " दी बॉंबे बिग् बबल् ब्यांकिंग ब्यूरो " चा छोटा व मोठा प्रास्पेक्टस् बाहेर पडण्याबरोबर सोकरजीचा पहिला अर्ज मिस्तर क्रोवनफूट ऑलबॉश यांजकडे गेला. त्यावरून ऑलबॉशसाहेबांनीं त्यास बोलावून नेऊन आपल्या अगदीं खास ऑफिसांत घेऊन जाऊन त्याच्याशीं बराच वेळ संभाषण केलें, आणि त्या संभाषणावरून त्यांची त्यांच्या हुशारीबद्दल व आणखी कित्येक गोष्टींबद्दल खात्री होऊन त्यांस आपल्या नव्या हाफिसांत जागा दिली. ती जागा मिळाल्या दिवसापासून सोकरजींनीं ब्यां-

केचें महत्व फुगविण्यास विलक्षण आटो-काट प्रयत्न केले. त्यांच्या ओळखीचे जितके म्हणून स्नेही सोबती होते, तित-क्यांच्याकडून ११२ तरी शेअर्स घेवविलेच. शिवाय ठेवी तर किती लोकांकडून आणून ठेवविल्या. इतकें झाल्यानंतर सोकरजी ऑलबॉशसाहेबांचा अगदीं उजवा हात बनला. ऑलबॉशसाहेबांनीं एका पारशी गृहस्थासही आपल्या हितचिंतकांत सामील करून घेतलें होतें. त्यांचें नांव कर्सेटजी फर्दुनजी डल्लावाला. मि० डल्लावाला हे सोकरजीप्रमाणेंच सर्व कंपन्यांस महशूर होते; परंतु क्लार्क किंवा अकाउंटंट ( हिशेब-नीस ) या नात्यानें नव्हेत, तर कुत्र्याचा पाय मांजरावर व मांजराचा कुत्र्यावर ठेवून दलालीचें काम करण्यांत पटाईत व हरप्रकारच्या कमिशन एजन्सीज करण्यांत हुशार, म्हणून सर्वांस माहिती होते. इत-केंच कीं, आतां त्यांच्याशीं व्यवहार कर-ण्याला त्यांना फार विचार करावा लागे. मि. डल्लावाला आणि मि. क्लोवनफूट ऑलबॉश यांचा परिचय होतांक्षणीं ऑल-बॉशसाहेबांनीं त्यांस आपल्या घरीं चार वेळां व बाहेर हॉटेलांतून पांच वेळां चहा घेण्यास बोलावून आणि खाना देऊन तेथें संभाषण करून त्यांची मदत आपल्यास ठाम मिळेल अशी बळकटी करून घेतली होती. इतकेंच नव्हे, तर त्यांचा मुलगा मंचरजी यांस त्यांनीं आपल्या ऑफि-सांत एक मुख्य अशीच जागा दिली होती. त्याचप्रमाणें एक ब्राह्मण क्लार्कही ब्यां-केचे ऑफिसांत होते. त्यांचें नांव सोन्या-बापू खणखणे. हे सोकरजीच्या वशिल्यानें लागलेले होते. सोकरजींच्या घरीं प्रथमतः हे मुलांना व मुलींना शिकविण्याला मास्तर म्हणून जात असत. हे दिसण्यांत अगदीं पोरवयाचे दिसत, परंतु तसे नव्हते. यांच्या वयाला चांगलें सद्तीस किंवा अ-डतिसावें वर्ष असेल. परंतु एकेकाची अंग-काठीच अशी असते, कीं वय किती जरी झालें, तरी तरुणपणाच दिसावा. त्यापैकींच सोन्याबापूची स्थिति होती. सोन्याबापू सु-मारें अठरा एकोणीस वर्षांचे असतील, तेव्हांपासून सोकरजींकडे मास्तरकी कर-ण्यास जाऊं लागले त्या दिवसांत सोकर-जींची मिळकत बरी असे, त्यामुळें मास्त-रांना पगार वगैरे बरा मिळे. परंतु पुढें सोकरजी ‘ इन्सॉल्व्हन्सि ’ कोर्टाच्या एकेक पायरीवर आरोहण करूं लागले, तसतसा त्यांचा पगार आज मिळाला, उद्यां नाहीं, परवां अर्धाच मिळाला, तेरवां मुळींच नाहीं असें होऊं लागलें. तथापि सोन्याबा-पूंनीं आपली शिकवणी सोडली नाहीं. आणि पैशासाठीं सोकरजींस तसदीही दिली नाहीं. ते अगदीं एकटेच ( असें नि-दान ते ज्याला त्याला सांगत ) असल्या-मुळें त्यांना पैशाची इतकी तम्मा नव्हती पोटापुरतें कसेंही मिळवीत. शिवाय सो-करजींच्या सर्व लफड्यांत त्यांस शिरावेंसें वाटल्या कारणानें व ह्यांनींही तशा लफड्यांत याचा पांच चार वेळां फार चांगला उप-योग झाल्या कारणानें त्यांचाही याजवर लोभ जडला. इतका कीं, कोठें कांहीं पैसा मिळण्याचें संधान आलें कीं, सोन्या-बापूस पुढें करून त्यास पैसा मिळवून देण्याची संधि त्यांनीं कधीं वायां जाऊं दिली नाहीं. अर्थातच सोन्याबापूचें त्यांच्यावर व त्यांचें सोन्याबापूवर फार प्रेम जडलें. इतकें कीं सोन्याबापू त्यांच्या घरांत त्यांच्या लहान भावाप्रमाणें वापरूं लागला व घरांतील सर्व मंडळी मास्तर मास्तर ह्मणतां ह्मणतां सोन्याबापू गांव-

मास्तर बनला. साकरजाना हें नवीन खार्जे सांपडण्याबरोबर, त्यांनीं ऑलबॉश-साहेबांकडे त्याची फार उत्तम शिफारस करून, त्यालाही एक जागा देवविली. यामुळें सोकरजीप्रमाणें मास्तरांनींही ब-याच ठेवी या बँकेंत आणविल्या व शेअर्स घेण्याविषयीं पुष्कळ लोकांच्या मनांत भरवून दिलें. याशिवाय आणखी दहा पांच कारकून या नवीन बँकेंत होते, परंतु आजच त्यांची आपल्यास जरूरी नाहीं. या ब्यांकेचाही आमच्या या कथनकाशीं थोडाबहुत संबंध आहे, तेव्हां वेळोवेळीं आणि कारणपरत्वें या ब्यांकेंतील व "बिझिनेस हाऊस" मधील मंडळींशीं वाचकांचा परिचय आपोआपच होईल. आज 'सोकरजी बाबुलजी,' 'मंचरजी कर्सेटजी डह्लावाला,' 'त्यांचे वडील,' 'मास्तर' व खुद्द 'मि. क्रोवनफुट ऑलबॉश' इतक्या मंडळींचा परिचय पुरे. वर सांगितलेंच आहे कीं, या क्लार्कांखेरीज आणखीही क्लार्क या ब्यांकेंत होते; परंतु तेवढ्यानें संपलें नाहीं. मुंबईच्या दैनंदिन पत्रांत "Wanted" ( पाहिजेत ) या कॉलमांत एजंटाची जाहिरात असून, तींत असें लिहिलें होतें कीं, "कमींत कमी पसतीस चाळीस क्लार्क अजून पाहिजे असून त्यांचे पगार दरमहा रु. १५० पासून तर २५ पर्यंत असणार. ज्यास हिशेबाची माहिती असेल व ज्याचें अक्षर चांगलें असेल आणि इंग्रजी व हिंदुस्थानी, गुजराथी, मराठी, कानडी, कच्छी इत्यादि भाषांपैकीं कोणती तरी आणखी एक भाषा चांगली लिहितां वाचतां येत असेल, त्यांनींच अर्ज करावा." या जाहिरातीवरून चाळीस दाही चारशें अर्ज मि. ऑलबॉश यांचेकडे आले होते. त्यांस उत्तरें देण्याचें एक स्वतंत्र कामच होऊन बसलें होतें. म्हणून दुस-या एका खोलींत ऑलबॉशसाहेबांचें एक ज्यूडिअर पार्टनर मिस्तर एम् नोव्हेअर हे बसले होते. त्यांचे दाराशीं अर्जदारांच्या झुंडींच्या झुंडीच होत्या. नोव्हेअरसाहेब एका लाल अलवणाच्या पडद्याच्या आड टेबलाजवळ बसले होते. यांचें ऑफिस ऑलबॉशसाहेबांच्या ऑफिसाच्या बरोबर थाटलेलें होतें आणि त्यांच्या पोषाखाचा थाटही अगदीं हुबेहूब त्यांच्यासारखा होता. परंतु चेहरा पाहण्याबरोबर हे साहेबच आहेत काय ? कीं साहेबांची हुबेहूब नक्कल करणा-या कोणा तरी लुडबुड्या जातीपैकीं एक आहेत ? असें मनांत येई. एका विशिष्ट जातीच्या लोकांच्या नाकाप्रमाणें त्यांचें नाक असें चांगलें भंभाडें होतें आणि एकंदर चेह-यांतही पाश्चिमात्य वळणापेक्षां पौर्वात्य वळणच फार आहे असें स्पष्ट दिसे. परंतु आपण कांहीं मनुष्यरूपशास्त्राचें अध्ययन केलेलें नाहीं, तेव्हां त्याबद्दल विशेष चर्चा न करतां ते आपणास साहेब म्हणवीत होते, तर तसेंच ह्मणून चालूं. वर सांगितलेंच आहे कीं, ऑलबॉशसाहेबाप्रमाणेंच नोव्हेअरसाहेबांचाही थाटमाट होता. ऑलबॉशसाहेबांचें बोलणें वगैरे आपण मुळींच ऐकिलें नाहीं तेव्हां त्या बाबतींत त्यांचा थाट काय होता हें आज समजणें कठिण. परंतु नोव्हेअरसाहेबांचें या वेळीं आपल्या समोर येणा-या प्रत्येक अर्जदाराशीं बोलणें होत असे, ह्यामुळें त्यांच्या बोलण्यांत गुर्मी विशेष आहे, हें स्पष्ट दिसत होतें.

---

# प्रकरण ८ वें.

## प्रोफेसर ड्यांडी.



त्या दाराशीं ज्या अर्जदारांची गर्दी जमली होती त्यांत मुख्यतः दक्षणी ब्राह्मण, परभू व गुजर यांचीच भरती होती. एकंदर मंडळींत दहा पंधरा पार्शीही दिसले; नाहीं असें नाहीं. नोव्हेअरसाहेब पांच पांच उमेदवारांस शिपायाकडून आपल्या समोर आणीत. नंतर जवळचें एक इंग्रजी पुस्तक घेऊन त्यांस थोडें शुद्धलेखन घालीत. ते घेऊन पहात. दुसरी कोणती भाषा चांगली लिहितां वाचतां येते, ह्मणून प्रश्न करीत. मधून मधून माना डोलवीत अगर नाकाचा शेंडा वर करीत किंवा खांदा उंच करीत, अथवा आपला खालचा ओंठ बाहेर काढीत. केव्हां केव्हां कोणास " yes, you may do " असें ह्मणत आणि नंतर सांगत, " मी मोठ्या आनंदानें तुम्हांला जागा देईन. पण तुह्माला माहीत आहे कीं, हें ब्यांकेचें काम आहे. हजारों रुपये, नोटा, चेक, हुंड्या वगैरे तुमच्या हातून जाणार, तेव्हां कांहीं तरी ' सिक्युरिटी ' पाहिजे. ज्याला पंचवीस रुपयांची जागा पाहिजे असेल त्यानें हजार रुपयांची सिक्युरिटी दिलीच पाहिजे. तिसाचीला दीड हजार. चाळिसाचीला दोन हजार. आणखी त्याच्यावर शंभरांपर्यंत पांच हजार. तशी सिक्युरिटी तुह्मी आणूं शकाल, तर उद्यां घेऊन या. तावडतोब जागा मिळेल. "

असें त्यांनीं सांगितलें म्हणजे, कित्येकांनीं अर्थातच हिरमुष्टी होऊन उगीच ' हो उद्यां घेऊन येतों ' असें म्हणून निराशेनें जावें. कित्येकांना सिक्युरिटी मिळण्याची थोडीशी आशा असली, तर त्यांनीं म्हणावें 'आम्ही जामीन देऊं.'त्यावर साहेबांनीं म्हणावें, " मग दरमहा पगारही जामीनच देईल, तो घ्या. नुसता कोरडा जामीन काय उपयोगी ? "

या बोलण्यानें कित्येक तेथून परत जात. तरी आणखी कित्येक म्हणतातः " आम्हीं बॉम्बे ब्यांकेमध्यें असलेल्या ठेवीचें पासबुक आपणापाशीं ठेवूं. "

साहेबांनीं त्यावर गुरमीनें म्हणावें, " मग बॉंबे बॉंकेंतूनच पगार मिळेल; इथें कशाला आलां ? "

सरकारी प्रॉ० नोटस् ठेवतों म्हटलें, तरी त्यावर त्यांचें " सरकारपासून पगार घ्या" असेंच उत्तर यावायचें. तेव्हां पाहिजे तरी कशी सिक्युरिटी? असें कोणी विचारतां त्यांनीं म्हणावें, " आमच्या बँकेंत ठेव म्हणून रोख रुपये ठेवले पाहिजेत, किंवा प्रॉमिसरी नोटी असल्या तर त्या आमचेकडून विकवून ते रुपये ब्यांकेंत जमा करण्यास सांगितलं ·पाहिजे. आह्मी जर

दरमहा रोख पगार देणार, तर रोख सिक्युरिटी कां घेणार नाहीं ? अलबत घेऊं अन् त्यांत तुमचा तोटा नाहीं. बापाचं काकाचं काय सेव्हिंग असेल, तें कोणत्या तरी ब्यांकेंत ठेवायचं कीं नाहीं ? तें इकडे ठेवावं. आम्हांला सिक्युरिटी झाली, ठेव ठेवणाराला व्याज मिळणार. आमचा व्याजाचा दर चांगला आहे. फिक्स्ड् डिपॉझिटवर दोन वर्षांच्या पलीकडे आमच्या होम ऑफिसप्रमाणेंच आम्हीं सहा पसट (दरसाल दर शेंकडा ६ रुपये) देतों. इतकं व्याज शिवाय तुम्हांला नौकरी. आणखी काय पाहिजे ? तुम्हीं आमच्या ब्यांकेंत क्लार्क आणखी तुमच्या घरचा सेव्हिंग दुसऱ्याच्या ब्यांकेंत हें काय कोणाला तरी गोड वाटेल ? कधीं वाटणार नाहीं. जा, आपल्या बापाला काकाला म्हणावं चाकरी पाहिजे, तर आपलं सेव्हिंग या ब्यांकेंत ठेवायला पाहिजे. यांत तुमची काय नुकसानी आहे ?"

मिस्टर नोव्हेअर यांचे समोरून वर सांगितल्याप्रमाणें अर्जदार मंडळी जातां जातां अखेरीं शेवटीं एकच अर्जदार आला. हा सुमारें पंचवीस किंवा सवीस वर्षांचा असावा. इतर सर्व अर्जदार मंडळी गेल्यानंतर मग आपण एकट्यानेंच आंत जावें आणि नोव्हेअरसाहेबांची एकांतांत गांठ घ्यावी हाच त्याचा हेतु होता, व शेवटले पांच असामी नोव्हेअरसाहेबापुढें नेले, तेव्हां हा एकटाच मग नेला असतां साहेब रागावतील, त्यापेक्षां त्याला या पांचांबरोबरच न्यावें असें पट्टेवाल्याच्या मनांत आलें; परंतु ही स्वारी कांहीं केल्या जाईना. 'मी काल आलों होतों. मला साहेबांनीं अगदीं निराळंच भेटण्यास सांगितलं आहे. मी या सगळ्या अर्जदारांसारखा अर्जदार नाहीं' असें त्यानें पट्टेवाल्यास सांगितलें. पट्टेवाला प्रथम ऐकेना. तुम्ही या मंडळीबरोबर जात नसलां तर मी पुनः तुमच्या एकट्यासाठीं साहेबाला सांगण्याला त्याचें दार उघडून आंत जाणार नाहीं, असेंही त्यानें त्यास बजाविलें. परंतु आमचे तरुण उमेदवार पट्टेवाल्याच्या तशा सांगण्यानें गप्प बसणारे नव्हते. त्यांनीं हळूच तेव्हां "बरं, बरं, बसा. कांहीं हरकत नाहीं. ही मंडळी गेल्यावर तुम्हांला नेऊन आंत गुजरीन" असें त्यानें त्यास आश्वासन दिलें. शेवटली पांच मंडळी रीतीप्रमाणें साहेबापुढें गेली. त्यांची काय व्यवस्था व्हावयाची ती साहेबांनीं लाविली. नंतर पट्टेवाल्यास आणखी कांहीं मंडळी असल्यास बुलाव, ह्मणून हुकूम केला, तों त्यानें या एकट्याच शिल्लक राहिलेल्या गृहस्थास आंत नेलें. साहेबांनीं पाहतांच त्यास ह्मटलें, "Well Mr., What's your name ? I forget. काल तुह्मी आलां होतां नाहीं का ? मग काय ? आज सिक्युरिटी घेऊन आलां का ? Let me see. तुह्मीं काय शंभराच्या जागेकरितां अर्ज केला होता ना ? तुमच्या चेहऱ्यावरून तर मला वाटतं आहे कीं, ती तुह्माला द्यावी. पण काय करावं एकदां रूल झाला तो झाला. आतां कांहीं बदलतां येत नाहीं. पांच हजारांची सिक्युरिटी—हार्ड क्याश—पाहिजे. त्याखेरीज शंभर रुपयांची जागा कशी मिळणार ? एं; तुमच्या पोषाखावरून तर तुह्मांला तितकी सिक्युरिटी मिळायला बिलकुल हरकत पडूं नये. मग काय ? बोला. मला दुसरी पुष्कळ कामं आहेत. हा ब्यांकिंग ब्यूरो आहे. इथें एक एक क्षण ह्मणजे हजार हजार रुपये किंमतीचा आहे. Look at this heap. पहा, या सकाळपासून तारा आल्या

आहेत त्यांची रास पहा. आणि हें टपाल पहा. ही इतकी रास आजच्या आज वि-ल्हेला लाविली पाहिजे आहे........"

साहेबांच समोर उभा असलेला तरुण पुरुष चटकन् त्यास ह्मणतोः "साहेब, माझं इंग्रजी फार चांगलं आहे. आपण मला ठेवा, मी आपल्या पत्रांचीं उत्तरं वगैरे लि-हिण्याचं काम इतक्या जलद आणि उत्तम करून टाकीन कीं बा ! साहेब, पत्रांचीं उत्तरें लिहिण्याच्या कामाला सिक्युरिटी काय करायची आहे ? तुमचं क्याशचं काम मजकडे देऊं नका. मी शाळेंत म्या-ट्रिक्युलेशनच्या वर्गांत होतों, नेव्हां साहेब, एसे लिहिला ह्मणजे हेडमास्तर तर काय, पण आमचे प्रिन्सिपालसाहेबसुद्धां अचंबा करून तोंडांत बोट घालीत. आहां कुठें ? माझ्या इंग्रजीची ख्याति इंग्रजी पांचव्या यत्तेपासून झाली होती. मीं व्हिकार ऑफ वेक्फील्डवर नोट्स लिहिल्या आहेत साहेब. मी किती सुरेख इंग्रजी बोलतों आहें यावरूनच आपण पहा. या कॉर-स्पॉन्डन्सच्या—पत्रव्यवहाराच्या—कामा-कडे साहेब तुम्हांला पहावंसुद्धां लागणार नाहीं. केवळ मुकाट्यानं आपण सह्या ठोकाव्या. बस. ज्याच्या ल्यांग्वेजेस ( भाषा विषय ) चांगल्या, त्याचं म्याथे-म्याटिक्स् ( गणित ) कचं असायचं हें आपल्याला माहीत आहेच. त्यामुळं माझा युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत सरशी झाला नाहीं साहेब, नाहीं तर मी तेलंगां-प्रमाणं आणि रानड्यांप्रमाणं ॲडव्होकेट होऊन बसायचा एव्हांना ! "

नोव्हेअरसाहेबांना या तरुण वीराच्या बडबडीचें कौतुक वाटलें म्हणून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें म्हणा, त्यांनीं ती बडबड इतका वेळ ऐकून घेतली. परंतु त्यांच्या कौतुकाला सुद्धां कांहीं तरी परिसीमा होतीच. याचें हें चऱ्हाट थांब-ण्याची आशाच दिसेना. तेव्हां शेवटीं ते त्यास जरा त्रासाच्या आवाजानें म्हणाले, " वेल वेल. या तुमच्या बोलण्याचा आ-ह्मांला काय उपयोग आहे ? तुम्हांला त्यांकेत शंभराची जागा पाहिजे आहे. तुमचं अक्षर जरी चांगलं नाहीं... "

" पण साहेब, भाषाविषयांत फार उत्तम असलेल्या मोठ्या विद्वान् लोकांचीं अक्षरं चांगलीं नसतातच. अक्षराशीं काय करायचं आहे साहेब. आंतल्या मजकुराची जुळणी आणखी भाषा पाहून घ्या. आतां या घटकेस आपण मला हवा तसला ड्राफ्ट करायला सांगा. पार्ले-मेंटपुढें एकादं रेप्रेझेंटेशन ( अर्ज ) करा-यचं असलं, तरी तें सांग. ऐसा ठेवून देतों कीं वा ! हाऊस ऑफ कॉमन्समध्यें नुसती वाहवा होऊन जावी ! अक्षराला काय ? इतर पंचवीसांचेन चाळिसांचे क्लार्क आपण ठेवतांच आहां, ते करतील कॉपी सुरेख अक्षरांनीं. साहेब, मला तुम्ही द्याच नोकरी. मी कांहीं दीडशें दोनशेंची मागत नाहीं, फक्त शंभराची मागतों. ती आपण दिली, तर आपल्याला त्याच्या-बद्दल कधींसुद्धां वाईट वाटणार नाहीं. मी काम करीन तें आठशें रुपयांचा माणूस करणार नाहीं. द्या पाहिजे तर आज मज-कडे काम. आजचा माझा पगार आकारूं नका. मी तसंच काम करतों. एका चार तासांच्या आंत हा पत्रांची आपली रास अगदीं नाहींशी करतों. एकदां मीं पेन हातीं धरलं कीं, मानसुद्धां वर करायचा नाहीं. आणखी विचार वगैरे करायला मला वेळ लागत नाहीं. बसूं इथें ? "

या त्याच्या बोलण्यानें साहेब अधि

कच त्रासल्यासारखे दिसले, व लागलीच त्यास म्हणतात, " Don't talk nonsense. (चावटपणें बोलूं नको.) मला तुझ्याबरोबर घालवायला वेळ नाहीं. बोल, तुला तूं म्हणालास त्याप्रमाणें सिक्युरिटी मिळते आहे का? मिळत असली तर पांच हजार रुपये रोख तावडनोब घेऊन ये. मी तुला जागा देतों. नसली, तर " गुडबाय." शिपायाला सांगून तुला दरवाजा दाखवतों. मीं आपला कालपासून तुझं बोलणं मौजेनं म्हणून ऐकून घेतलं. पण तूं फाजील मोकळीकच घेऊं लागलास. होय कीं नाहीं, सांग. आहे तुझ्याजवळ पांच हजारांची सिक्युरिटी? चल जा तर मग. सिपाय, ये साबको दरोजा बताव. स्टुपिड फूल. तूं आतां सिक्युरिटी आणलीस तरी तुला आतां मी जागा देणार नाहीं. सिक्युरिटीच्या दुप्पट किंमतीचा वेळ तूं माझा खाल्ला आहेस. जाव्. जाव्. अबी कुच सुन्नेको नहीं मंगता. यू फूल."

साहेबांनीं इतक्या दरडावून त्यास वरील भाषण केलें कीं, आमचे तरुण उमेदवार आपल्या कोटपाटलोणींत चळचळां कापावयालाच लागले. परंतु तें त्यांनीं बाहेर दिसूं दिलें नाहीं. खुर्चीवरून उठून साहेबांस मोठ्या ऐटीनें म्हटलें, " असं आहे, तर मग साहेब, सिक्युरिटी वाटेल तें करून आणून देतों. मात्र आपण मला जागा द्यावी. आपल्याला थक्क करून सोडतों. मला शॉर्ट हँड येतं. मला टाईप रॉयटिंग येतं. मला अमुक उपयुक्त कला म्हणजे येत नाहींत असं नाहींच. मला आपण जागा मात्र द्याच."

" वेल् वेल्, तूं सिक्युरिटी घेऊन ये. मग पाहूं. मात्र आतां पुनः सिक्युरिटी न आणतां तसाच हात हलवीत आलास, तर पट्टेवाला तुला आंत सुद्धां येऊं देणार नाहीं. ही पक्की खात्री ठेव. मीं त्याला तसंच सांगून ठेविलं आहे असं समज. पुनः आलास, कीं तोच तुला विचारील पांच हजारांची क्याश आणली आहे? ती आणली असली, तर मी साहेबांच्या पुढें नेऊन ठेवतों आणखी मग साहेब तुम्हांला भेटतील, नाहीं तर भेटणार नाहींत. जा, आतां विनाकारण त्रास द्यायला आणखी नसते प्रश्न विचारायला पुनः येऊं नको. सिक्युरिटीवांचून बोलणं नाहीं इथं."

तरी आमचे तरुण उमेदवार डगमगले नाहींत. ते हलकेच साहेबांस म्हणतात: " साहेब, मी एकच प्रश्न आपल्याला अगदीं हलकें विचारतों. तो कोणाला ऐकूं जातां कामा नये. आपल्या कानांत विचारतों." इतकें म्हणून तो त्यांच्या कानाशीं जाऊन कांहीं पुटपुटला. तो फार हलकें पुटपुटला. तें कोणास ऐकूं गेलें नाहीं. परंतु साहेबांनीं त्याचें उत्तर कांहीं हलकें दिलें नाहीं. ते मोठ्यानेंच म्हणाले, " ठीक आहे. आमची कांहीं हरकत नाहीं. पण आह्मांला क्याश पाहिजे. ती तूं तशा तऱ्हेनें आणलीस तर आह्मी त्याची गहाणचिठ्ठी करून तुला तितके रुपये व्याजावर दिले असं समजूं. आह्मांला कांहीं हरकत नाहीं, पण लुक हिअर, आतां पुनः क्याश सिक्युरिटी असल्याखेरीज दाराजवळ सुद्धां कोणी उभें करणार नाहीं."

इतकें झाल्यानंतर उमेदवारसाहेबांची स्वारी तेथून बाहेर पडली. दाराच्या बाहेर येतात तों एका खिशांतून एक चिरूटकेस बाहेर काढली व दुसऱ्यांतून काड्यां-

ची पेटी काढली. केसमधून एक चिरूट काढून त्याचें एकवार निरीक्षण केलें. मग पाकिटनाईफ काढून त्याचें टोंक किंचित् कापलें. नंतर त्यांतून एक बारीक गवताची काडी उपसून काढली व तो पेटवून ओढण्यास सुरुवात केली. ताडानें धुराचे भपकारे सुरू झाले; आणि तोंडानें दर भपकाऱ्यास " डॅम सिस ओल्ड पेटर. " " मीं किती तऱ्हांनीं सांगितलं तरी कांहीं उपयोग नाहीं. " " ऑल्‌ अॅट वन्स हंड्रेड रूपीज म्हणजे काय झालं. " " नो नो. आय मस्ट अपील नाऊ टु मेटर. " अशा तऱ्हेचे कांहीं तरी उद्गार बाहेर पडतच होते. या तरुण उमेद्वार गड्यांच्या पोषाखादिकांच्या वर्णनाला आतांपर्यंत वेळच झाला नाहीं. परंतु आतां ते कोर्टाच्या रस्त्याला झुकत चालले आहेत. तोंपर्यंत त्यांचें वर्णन काय आहे तें पाहून घेऊं. यांचें वय पंचवीस सव्वीस वर्षांचें होतें म्हणून सांगितलेंच आहे. यांचा वर्ण अगदीं गोरा होता आणि नाकडोळे नीटस होते. डोळे पाणीदार परंतु त्यांत कावेबाजपणा किंवा हुषारी दिसत नसे. यांचा पोषाख अगदीं अगदीं अस्सल इंग्रजी. कोट काय, पाटलोण काय, शर्ट, कॉकर, नेकटाय, सगळें कांहीं जेथल्या तेथें पाहून घ्यावें. कोर्टांतील फार फ्याशनेबल अशा हेअर कटिंग सालूनमध्यें जाऊन डोक्यावरील केंस ठेविलेले होते. तेव्हां ते किती फ्याशनेबल तऱ्हेनें कापले वाढविलेले असतील. त्यांच्या निगेसाठीं किती हार्लीन, त्यांच्या वळणासाठीं किती पमेटम खर्च झालें असेल याचें वर्णन करणें अत्यंत कठिण आहे! याशिवाय स्वारी एकाच डोळ्यास एक आयग्लास लावी. आणि त्याची मोठ्या ऐटीनें खांद्यावर सोडून देई. इतक्या सगळ्या वर्णनावरून वाचकांस हे गृहस्थ कोण, यांचें नांव काय हें समजण्याची साहजिकच इच्छा झाली असेल. यांचें नांव धोंडोपंत असे, परंतु यांचे स्नेही व इतर कुचेष्टेखोर लोक यांस प्रोफेसर ड्यांडी ह्मणत असत. प्रोफेसर ड्यांडींनीं कोणत्या वंशांत जन्म घेऊन त्या वंशाचा उद्धार केला होता हें सांगण्याला व आपल्या जन्मानें कोणत्या आईबापांस पवित्र करून सोडलें होतें, हें एव्हांच सांगण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. प्रोफेसर ड्यांडींची व आपली संगत वर्ष सहा महिने तरी आहेच. तेव्हां कधींना कधीं तरी त्यांचें " ओल्ड पेटर " ( वृद्ध वडील ) कोण व ( मेटर ) जननी कोण हें सांगण्यास सांपडेलच. सध्यां आपण त्यांच्या शोधाच्या भानगडींत न पडतां त्यांच्याच मागें जाऊं ह्मणजे यांचें सर्व कांहीं समजून येईल. परंतु तसें करण्यापूर्वीं त्यांची थोडीशी आणखी हकीकत देतों. प्रो. ड्यांडी यांचें इंग्रजी अतिउत्तम असल्यामुळें यांची कोणतीही परीक्षा पास झाली नाहीं, आणि त्यामुळें युनिव्हर्सिटीला व हायकोर्टाला एक मोठें भूषण मिळावयाचें तें मिळालें नाहीं. त्यांत प्रोफेसर ड्यांडींचें कांहींच नुकसान झालें नाहीं. त्या दोन संस्थांचें मात्र फारचें मोठें नुकसान झालें. आणि त्यांतही मौज ही कीं, त्या संस्थांचें असें प्रचंड नुकसान झालें हें खुद्द प्रोफेसराखेरीज कोणालाच तें समजलें नाहीं. युनिव्हर्सिटी सेनेटच्या व एकंदर लोकांच्या अजागळपणाबद्दल प्रोफेसर ड्यांडींस फारच आश्चर्य वाटे. आणि तें आश्चर्य त्यांनीं आपल्या मित्रमंडळीस अनेक वेळां अनेक तऱ्हांनीं उच्चारूनही दाखविलें. परंतु तेही सर्व अरसिकच पडले.

त्याला त्यांचा तरी उपाय काय ? प्रोफेसर ड्यांडी यांचें इंग्रजी वाचन अतिशय विस्तृत, आणि तेंही लहानपणापासून. इंग्रजी चवथ्या पांचव्या यत्तेंत असत तेव्हांपासून मेकॉले ' कर्सरिला ' ( वरवर ) हा त्याचाच शब्द आहे—वाचण्याचा त्यांचा परिपाठ होता. आणि दरसाल रडून अगर वडिलांकडून मास्तराला सांगवून स्वारी जों जों वरच्या वरच्या यत्तांत जात चालली, तों तों, शेक्सपीअर, टेनिसन, बर्क, बेकन अशी मंडळी त्यांच्या हातांत फडकूं लागली. होतां होतां मॅट्रिक्युलेशनच्या वर्गापर्यंत स्वारी आली. तेथून कांहीं सुटका होईना. तेथें रडणें कांहीं उपयोगी पडेना. वडिलांची शिफारस युनिव्हर्सिटीच्या परीक्षकांकडे लागेना. यांच्या इंग्रजी पेपरांतला नुसता निबंध वाचून कोणी यांना सर्व विषयांत पास करून घेईना. असा त्यांचा व युनिव्हर्सिटीचा लढा पडून शेवटीं दरसाल " ओल्ड पेटर " परीक्षेच्या फीला पैसे देईना. तेव्हां युनिव्हर्सिटीचें तोंड पहावयाचें नाहीं असा यांनीं निश्चय केला आणि तो एका दृष्टीनें निर्धारानें चालविला. एका दृष्टीनें म्हणतों याचें कारण इतकेंच कीं, परीक्षेला बसण्याच्या दृष्टीनें मात्र त्यांचा तो निश्चय चालला. बाकी युनिव्हर्सिटीच्या बागेंत जाऊन बसण्याचा त्यांचा परिपाठ असे तो त्यांनीं सोडला नाहीं. तेथें ते जाऊन आपल्यासारखें भूषण ती स्वीकारीत नाहीं म्हणून त्या बिचाऱ्या संस्थेची कींव करीत बसत असत. आजही ते त्याचप्रमाणें जाऊन बसले.

---

# प्रकरण ९ वें.

## सोनवली व तेथील जहागीरदार.



अण्णासाहेब सोनवलीकर जहागीरदार यांनीं दादासाहेबांस सांगितल्याप्रमाणें नेमल्या दिवशीं, खरोखरीच सकाळीं उजाडलें नाहीं तों, एक पडद्यांची धमनी व तीन सुरेख जोडीचे टांगे, बरोबर एक कारकून व एक शिपाई इतकी मंडळी असा लवाजमा पाठवून दिला. दिगंबरपुरापासून सोनवली पश्चिमेच्या बाजूस सुमारें पंधरा कोसांवर होती. अण्णासाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें दादासाहेब व त्यांची मंडळी गर्गाचार्यांच्या मुहूर्तावर निघाली असतां सुमारें पांच तासांत सोनवलीस जाऊन पोहोंचली असती; परंतु तशी धांवपळ करीत जाण्याचें प्रयोजन मुळींच नव्हतें. कारण दादासाहेबांस तशा तऱ्हेची दगदग देणें अण्णासाहेबांस अगदीं योग्य वाटलें नाहीं. दिगंबरपुरापासून सुमारें दहा अकरा मैलांवर सोनवलीकरांचा एक मोठा बाग

होता. तेथें उतरून स्नानसंध्या, भोजन वगैरे उरकून पुनः विश्रांति घेऊन तिसरे प्रहरीं तांग्यास दुसऱ्या जोड्या लावून सायंकाळचे संधीस सोनवलीस मंडळींनीं येऊन पोहोंचावें, अशी सर्व व्यवस्था केलेली होती. " इतकी व्यवस्था करण्याचं कांहीं प्रयोजन नव्हतं. वीस वीस कोस एकसारखा प्रवास करीत जाण्याचा आम्हाला फार अभ्यास. थोडासा उशीर झाला असता म्हणून काय हरकत होती " असें दादासाहेबांनीं त्या कारकुनास बोलून दाखविलें. परंतु मनांतून त्यांस त्या व्यवस्थेबद्दल खास समाधानच झालें असावें असें स्पष्ट दिसलें. त्यांस अशा लव्याजम्याची व थाटमाटाची फार हौस असे. जोंपर्यंत ते बडे हापिसर होते, तोंपर्यंत तो थाट तर होताच. पण पुढेंही त्यांनीं तसाच थोडबहुत इतमाम आपल्याभोंवतीं बाळगला होता. तेव्हां अर्थातच त्यांस वरील व्यवस्थेचा संतोष वाटून स्वारींनीं जाण्याची तयारी चालविली. आपले उपाध्ये दिनकरभट, यांस पहांटे चार वाजले नाहींत तों तयार असण्याबद्दल बजावून सांगण्यांत आलें. त्याचप्रमाणें घरांतही बजाविण्यांत आलें होतें कीं, ज्या कोणी दोघीचौघी मुलगी पाहण्यासाठीं येणार असतील, त्यांनीं अगदीं वेळेवर तयार असलें पाहिजे. दादासाहेब स्वतः भिकंभटदादा वैशंपायन यांस आमंत्रण देण्यास गेले. भिक्षुकांना या दिवसांत कोणी तादृश मान देत नाहीं. त्यांना कोठें बोलवावयाचें, म्हणजे कोणाबरोबर तरी कसा तरी निरोप पाठविला म्हणजे झालें, असा दादासाहेबांचा परिपाठ नसे. त्या लोकांना आपण जर मान दिला नाहीं तर त्यांना कोठेंच कोणी मान देणार नाहीं. तेव्हां योग्य ठिकाणीं, योग्य तितका मान देणें अगदीं अवश्य आहे, असें समजून ते भिकंभटदादा वैशंपायनासारख्यांचा मान ठेवीत असत. या आपल्या रीतीस अनुसरूनच स्वारी घरून उठून भिकंभटदादांच्या घरीं गेली व त्यांस सन्मानपुरःसर सोनवलीस चालण्यास आमंत्रण केलें. त्याचप्रमाणें त्यांचे मेहुणे, दिगंबरपुरासच रहात असत त्यास ही त्यांनीं त्याच कार्याकरितां आपल्याबरोबर येण्याविषयीं आमंत्रण केलें. दादासाहेबांचीं सगळीं कामें ठेकीनें व वक्तशीर व्हावयाचीं असा नियम. त्याप्रमाणें निघण्याचे वेळांत यत्किंचितही चूक होऊं नये म्हणून त्यांनीं त्या दिवशीं रात्रीं आपल्याबरोबर सोनवलीस जाणाऱ्या मंडळीला फराळालाच बोलाविलें व रात्रीं तेथेंच निजण्याचा आग्रह केला. हेतु हा कीं, पहांटे झटकन् उठून नेमल्या वेळेला गाड्या निघाव्या. हा त्यांचा हेतु तडीस गेला आणि गाड्या तशा निघाल्या. नेमल्या वेळीं सोनवलीकर जहागिरदारांच्या बागेंत जाऊन पोहोंचल्या. तेथें अण्णासाहेबांनीं आचारी, पाणके, शागीर्द, शिपाई पाठवून सर्व व्यवस्था अगदीं जय्यत करून ठेविली होती. मंडळी गाड्यांतून उतरण्याचा अवकाश. साखरपाणी पुढें आलें. आणि थोड्या वेळानें कारकुनानें हात जोडून विनंति केली कीं, सर्व तयारी आहे. दादासाहेबांच्या दराऱ्यामुळें बहुतेकांनीं पहांटेस घरींच स्नानें केलीं होतीं. परंतु त्यांत ज्यांचीं राहिलीं होतीं, त्यांनीं तीं भरकन् उरकून घेतलीं. लागलीच पात्रांची सिद्धता होऊन सर्व पुरुषमंडळींचें भोजन झालें. नंतर दादासाहेबांची पत्नी व एक त्यांची विधवा भावजय

व त्यांच्या माहेरीं आलेल्या दोघी मुली यांचींही भोजनें झालीं. मंडळींनीं थोडीशी विश्रांति घेतली. आणि पुनः निघून सायंकाळचे सुमारास सोनवली गांवीं मंडळी जाऊन पोहोंचली. तेथें अण्णासाहेब वगैरे मंडळी त्यांची मार्गप्रतीक्षा करीतच होती.

अण्णासाहेब व त्यांची मंडळी दादासाहेबांचें आदरातिथ्य करीत आहेत, तोंपर्यंत आपण सोनवली गांवाचें व तेथील जहागीरदारांच्या वाड्याचें निरीक्षण करूं.

सोनवली गांवही कृष्णाकांठींच होता. तेथें कोंकणस्थ जहागीरदार असून त्यांचें उत्पन्न सुमारें पंधरा सतरा हजारांचें होतें. परंतु कांहीं कर्जबाजारीपणामुळें व कांहीं भाऊबंदांमुळें वांटप होऊन, आज मितीस वडील घराण्यास म्हणजे अण्णासाहेबांस सालीना उत्पन्न फारच थोडें राहिलें होतें. तथापि काय जरी गेले, तरी कानाचीं भोंकें राहतातच, या न्यायानें वडील घराण्याचा थाट अगदीं पूर्वींप्रमाणें हुबेहूब जरी नाहीं, तरी पुष्कळ अंशीं त्या पूर्वींच्या पद्धतीवर ठेविला होता व तसाच तो ठेविला जावा अशी अण्णासाहेबांची एकसारखी खटपट होती. यामुळें खर्च वाटेल तसा होत असे. जे खर्च अवश्य व्हावयास पाहिजेत ते अगदीं पूर्वींप्रमाणें ऐटीनें होत, आणि शिवाय अण्णांचे नवे नवे खर्च असत ते निराळेच. जहागिरदारांचा वाडा फार मोठा होता. मूळ पेशवाईत थोरल्या माधवरावांचे कारकीर्दींत त्यांच्या मूळपुरुषांनीं हा वाडा बांधला. त्या वेळीं त्यांचेकडे एक हजारी पागा होती. परंतु पेशवाईतल्या संकोचाबरोबर यांच्याही जहागिरीचा व महालयाचा संकोच होत जाऊन शेवटीं वर सांगितल्या उत्पन्नाइतकें उत्पन्न होत आलें. शेवटीं इंग्रजी अमलापासून त्यांतही संकोच होत चालला. आतां सांगितलेंच आहे कीं, वाडा फार मोठा होता व तो अगदीं कृष्णाबाईच्या कांठींच होता म्हटल्यास शोभेल. वाड्याचे मागल्या बाजूस जुना बाग असून त्यांतून मागें जाण्यास रस्ता असे. त्या बागेच्या मागल्या दरवाज्यानें बाहेर गेलें कीं, फारच रमणीय असा घाट बांधलेला असून सुमारें पन्नास पायऱ्या उतरून खालीं जावें लागे. त्या घाटावर नदीचा देखावा इतका सुंदर दिसे कीं, तेथे जाणाराने आपण कांहीं दिवस येथेंच वास करावा अशी इच्छा होई. घाटाचे वरचे बाजूस एक सुंदर शिवमंदिर बांधलें होतें. कृष्णाबाईला कितीही पूर आला तरी याचें शिखर त्यांत निमग्न होऊं नये अशा हेतूनें त्यास पुष्कळ पायऱ्या करून देवळाचा चवुतराच आधीं उंच बांधलेला होता. आणि देवळाचा कळस सोन्याचा होता. देवळांतील शंकरलिंगाची पूजाअर्चा यथासांग व्हावी या हेतूनें अण्णासाहेबांच्या निपणजांनीं त्यास उत्पन्नच तोडून दिलेलें होतें, यामुळें त्याचे उत्सव व कृष्णाबाईचा वार्षिक उत्सव हीं निर्यमित वेळीं अगदीं यथासांग होत असत. अण्णासाहेब आपला पूर्वींचा सर्व बडेजाव कायम राखण्याचा यत्न करीत असें म्हटलें आहे, परंतु तो त्यांचा यत्न सफल होत असे, असें मात्र कोणीं समजूं नये. तसा तो सफल होणें शक्यच नव्हतें. कारण तो वाडाच इतका मोठा होता कीं, नुसता केर काढून साफसूफ ठेवावयाचा म्हटलें तर तेथें निदान पांच चार फरास ठेवावयास पाहिजे होते. पुढल्या दरवाज्यापासून मागल्या कृष्णाकांठच्या दरवाज्या-



पर्यंत पांच चौक होते. पैकीं दोन चौकांचा जेमतेम केर निघे व बाकी सर्व वाड्याचा केरवारा मणावारीं झाला म्हणजे फार झालें. मागल्या मागल्या चौकांत तर कित्येक ठिकाणीं केर सांचलेला असे. बागेंतलीं जीं झाडें आपोआप जीव राखून होतीं तेवढींच आज कायम होतीं. बाकीच्यांनीं जणूं काय आपली जोपासना करणाऱ्या थोर पुरुषांच्या मागें राहण्यांत अर्थ काय असें पाहून कधींच प्रयाण केलें होतें. आज अण्णासाहेबांचे घरीं त्यांचे भावी व्याही—किंवा जे आपले भावी व्याही व्हावे अशी अण्णासाहेबांची फार इच्छा होती, ते आले असल्यामुळें पुढील दोन चौकांची मात्र आज उत्तरपूजा झाली होती. त्यांतही पुढल्या चौकांत व त्यावरील माडयांत आणि माजघरांत दिवे वगैरे लावून बराच चकचकाट झाला होता.

अण्णासाहेब सामोरे जाऊन त्यांनीं दादासाहेबांस वाड्यांत आणलें. प्रारंभींचें आदरातिथ्य झाल्यानंतर रात्रींची संध्या वगैरे सर्व झालें आणि फराळही झाले. रात्रौ उपाहारानंतर विडापानसुपारी घेणें चाललें असतां अण्णासाहेबांच्या पूर्वजांच्या गतवैभवाबद्दल बोलणें निघालें, आणि त्यावरून एकंदर महाराष्ट्राच्या गतवैभवाबद्दल बरेंच बोलणें झालें. आणि होतां होतां अर्थातच एकंदर देशाच्या गतवैभवाबद्दलही भाषण निघालें. सोनवलीसारख्या गांवीं जहागिरदारांच्या वाड्यांत असतांना कोणा अभिमानी गृहस्थाच्या मनांत आपल्या सद्यःस्थितीचा व गतवैभवाचा विरोध उभा राहणार नाहीं! त्यांतून दादासाहेबांस तर जुन्याचा फार अभिमान. भिकंभटदादा जुन्याचे केवळ अवशेष! अण्णासाहेब जुन्या वैभवाचे प्रतिनिधि, अशी त्रयी जमल्यानंतर तसलें पुराणाभिमानाचें संभाषण निघावें यांत नवल काय! शिवाय वर सांगितलेंच आहे कीं, सोनवलीच्या जहागिरदारांच्या त्या वाड्यांत शिरतांच, अगर तेथील नदीकांठचे ते सुंदर घाट, तीं सुंदर देवळें-विशेषतः तें कृष्णेश्वराचें देवालय—हीं पहातांच कोणीही हिंदु—त्यांत महाराष्ट्रीय—आणि त्यांत ब्राह्मणप्रेक्षकाचें अंतःकरण नानाप्रकारच्या दुःखद विचारांनीं अगदीं भरून आल्याखेरीज रहाणें शक्य नाहीं. तेथील प्रत्येक दगड, प्रत्येक खांब, प्रत्येक तुळई, प्रत्येक झाड, मागील काळच्या आपल्या ऊर्जित दशेचें स्मरण देत असे. वाड्याच्या कोणत्याही माडींत जा, प्रेक्षकाच्या मनांत असें यावयाचेंच कीं, या वंशाच्या मूळपुरुषानें केवढाली कारस्थानें, केवढाले मनसुबे, केवढाले बेत केले असतील! शत्रूस जिंकण्याकरितां केवढाल्या तयाऱ्यांचे विचार त्याचे मनांत या ठिकाणीं आले असतील; त्यानें आपल्या हाताखालच्या लोकांस कसल्या प्रकरणांत हुकूम पाठविले असतील, या बागेंत जाऊन त्यानें आपल्या विचारतप्त मस्तकास किती वेळां शांत केलें असेल! कृष्णाबाईचें तेथलें सुंदर पात्र पाहून किती वेळां त्यानें "या नदीप्रमाणेंच आपलें वैभव अजरामर राहील काय?" असा प्रश्न आपला आपल्यालाच विचारला असेल! एखाद्या मनसुब्यासाठीं पुण्यास जातांना किंवा धन्याच्या हुकुमानें एखाद्या मोहिमेवर जाण्यास निघतांना प्रातःकाळीं आपल्या त्या शिवमंदिरांत जाऊन त्या करुणाकर श्रीकृष्णेश्वरापुढें अत्यंत नम्रपणानें त्याचा कृपाप्रसाद व्हावा म्हणून प्रार्थना केली असेल! हे सर्व विचार

त्याच्या पूर्वी वैभवसंपन्न स्थानांत गेलें असतां प्रत्येक सहृदय व साभिमान पुरुषांच्या अंतःकरणांत आल्याखेरीज कधींहीं राहिले नसतील. तसें होणें शक्यच नाहीं. हा सर्वांचा स्वानुभव आहे ! आणि हा जसा अनुभव आहे तसाच हाही पण अनुभव आहे कीं, ते प्रश्न व ते विचार मनांत येऊन अंतःकरण अगदीं विषण्ण होतें. किंबहुना कंठ सद्गदित होऊन नेत्रांत अश्रु उभे राहतात, नकळत उसासे टाकले जातात, आणि मनुष्य खिन्न होऊन त्या सर्व देखाव्याकडे शून्य दृष्टीनें पहात स्वस्थ उभा राहतो ! नंतर त्यास या अवनतीचें आश्चर्य वाटूं लागतें. आणि कारणें शोधण्याकडे धांव जाते. परंतु तशी धांव घेणें ह्मणजे अंधःकारांत डोळे मिटून चांचपडण्यापैकींच नव्हे काय ? परंतु या वर्णनाचा काय उपयोग ? आपण आपल्या प्रस्तुत कथानकाकडे व जें प्रत्यक्ष पहावयाचें त्याकडे वळावें तेंच बरें.

बरीच रात्र होईपर्यंत वर सांगितल्याप्रमाणें दादासाहेबांचें, अण्णासाहेबांचें व भिकंभटदादा वैशंपायनांचें वर सांगितल्या तऱ्हेवर शोकमय भाषण झालें. भिकंभटदादांनीं अण्णासाहेबांचे मूळपुरुष जे कृष्णाजी बाळाजी त्यांचे वेळच्या व खुद्द त्यांच्या शौर्याच्या, चातुर्याच्या व दीर्घदर्शीपणाच्या गोष्टी सांगितल्या. त्याचप्रमाणें त्यांची धर्मबुद्धि किती जागृत होती, याबद्दलही कांहीं गोष्टी वर्णन करून सांगितल्याखेरीज ते राहिले नाहींत. कृष्णाजी बाळाजींनीं अनुष्ठानें किती केलीं, कोणकोणतीं केलीं, त्या अनुष्ठानांत आपल्या वंशांतले कोण होते, त्याचप्रमाणें दादासाहेबांच्या उपाध्यायांच्या वंशांतले कोण होते, अनुष्ठानें कोणकोणत्या प्रसंगीं कोठें कोठें केलीं, ब्राह्मणांस दक्षिणा काय दिली, त्याचें जणूं काय अगदीं लिहून ठेवलेलें टिपण वाचल्याप्रमाणें त्यांनीं पाढा चालविला होता. एकवार कांहीं अनुष्ठानास सुरुवात करण्याच्या वेळीं पुण्याहवाचनाला सुरुवात झाली असतां पेशव्यांकडून सांडणीस्वार आला. त्यानें लखोटा आणून दिला, त्यांत एक क्षणाचा सुद्धां विलंब न करतां त्या पावलीं त्यांस पाचारण केलें होतें. तेव्हां आपले निपणजे विसंभटतात्या यांनीं त्यांस तसें उठून जाऊं दिलें व त्यावरून त्यांचेवर इतर ब्राह्मणांनीं बहिष्काराची पाळी आणली तेव्हां विसंभटतात्यांनीं "क्षात्रियकर्म स्वीकारणाऱ्या ब्राह्मणांना कर्मविघाताचा दोष मुळींच नाहीं" असें म्हणून धुडकावून दिलें. सर्व ब्राह्मण अगदीं गप्प बसले. वगैरे स्वपूर्वजमहात्म्याच्याही कांहीं कुळकथा सांगितल्या. शेवटीं त्या कथा थोड्या कंटाळवाण्या झाल्या, तेव्हां दादासाहेबच उठून अंथरुणावर पडले.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं मंडळींचे पानीविधि झाल्यानंतर अण्णासाहेबांनीं त्यांस एकवार सोनवली गांव पहाण्यास नेलें व तेथले निरनिराळे घाट दाखविले. आपलीही घाट दाखविला. दादासाहेबांस तेथेंच स्नान करण्याची इच्छा होऊन, त्यांनीं स्नानसंध्यादि कर्म तेथेंच यथासांग केलें. नंतर सोंवळ्यानेंच मागील दरवाज्यानें मंडळी आंत गेली. इतक्यांत भिकंभटदादांनीं मुलगी पहाण्यास प्रातःस . चांगला असें सुचविल्यावरून मुलीला दादासाहेबांच्या जवळ आणून बसविलें. मुलगी खरोखरीच श्रीमंत घराण्यांत शोभेल अशी होती. नाकाडोळ्यांनीं अगदीं नीटस

फार उंच नाहीं, फार ठेंगणीही नाहीं. वर्ण चांगल्यापैकीं गोरा. मुलगी पहातांच दादासाहेबांचे मनांत भरली. तिला त्यांनीं नांव विचारलें, त्याबरोबर तिनें " कृष्णा " असें अगदीं खणखणीत आवाजानें सांगितलें. दादासाहेबांनीं तिला आणखीही कांहीं प्रश्न विचारले, त्यांचीही उत्तरें तिनें अगदीं नीटपणें दिलीं. तेव्हां आपल्या मेहुण्याकडून आपल्याबरोबर आणलेला खाऊ तिच्या हातांत देवविला. इतक्यांत मामास काय इच्छा झाली, आणि त्यांनी ती उभी राहिली होती, तिला खालीं बसवून, " कृष्णाबाई, तुला त्याहायला वाचायला येतं का कांहीं ? " असा प्रश्न विचारला. त्याबरोबर दादासाहेबांचें मस्तक थोडेंसें चिंवडलें आणि ते एकदम आपल्या मेहुण्याकडे तिरस्काराच्या दृष्टीनें पाहून म्हणतात, " कायहो, लिहिण्यावाचण्याचं काय आलं आहे, तें अलीकडलें चाळे मला बिलकुल नकोत. म्हणे ' तुला ल्याहाय् वाचायला येतं का कांहीं ! ' हो येतं आहे. देतां का तिला मामलतदारी ! या अशा लोकांनींच सगळं अलीकडे बिनसून टाकलं आहे. मुली, जा तूं आपली....मुलींना लिहिणं वाचणं आलं काय आणखी नाहीं काय ! तें का पहायचं ! मुलगी पहायची म्हणजे...... "

" पण दादासाहेब, अलीकडे असंच झालं आहे. " भिकंभटदादा त्या प्रक्षोधितामींत आपल्या भाषणरूप आज्याची आहुति देतातः–" मुलीला परकर नीट नेसतां नाहीं आला, तरी तिला ए. बी. सी. आलं पाहिजे. भांडं घासतां नाहीं आलं, तरी तिनं बुकं घेऊन घरांतून इकडून तिकडे फलकावे मारले पाहिजेत. एका भांड्यांत तीन भात झाले तरी हरकत नाहीं, पण तिला पावबिस्कुट करतां आलं पाहिजे sss समजलांत ! परवां त्या शृंगारपुऱ्यांच्या घरची मौज सांगितलीना तुम्हाला ? त्यांच्या मुलाला तशी बायको पाहिजे होती. बापानं पाहिलेली कांहीं तशी नव्हती, तेव्हां मामांनीं विचारला तो प्रश्न कांहीं वावगा नाहीं. "

या भाषणानें वर सांगितल्याप्रमाणें आगींत तेल पडल्याप्रमाणेंच झालें. दादासाहेबांस या शेवटल्या भाषणानें तर अगदीं संताप चढल्याप्रमाणेंच झालें. परंतु त्यांनीं त्या वेळीं विलक्षण आत्मसंयमन दाखविलें. ते वैशंपायनदादाच होते, आणि तेही दुसऱ्याच्या घरीं, यामुळें त्यांनीं इतकें आत्मसंयमन केलें असावें. तथापि थोडासा तिरस्कारयुक्त आवाज काढून ते लागलींच ते त्यांस म्हणतात, " दादा, मीही पण कालच तुम्हाला सांगितलं कीं, मला कांहीं दुसऱ्यांच्या गोष्टी सांगूं नका. माझ्या मुलाची माहिती मला पक्की आहे. तो माझ्या आज्ञेबाहेर इतकासुद्धां जायचा नाहीं. शृंगारपुऱ्यांचं उदाहरण मला काय उपयोगी ! परवां आपण याच बाबतींत मला तेंच उदाहरण दिलंत, आज पुनः तेंच देतां, तेव्हां आतां मला स्पष्टच आपल्याला सांगणं भाग आहे कीं, माझ्या बाबतींत दुसऱ्यांचीं उदाहरणं देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तीं उदाहरणं ज्यांच्या उपयोगी पडतील, त्यांना खुशाल द्या. पण मी तसा बापही नाहीं, आणखी माझा पोरगाही पण तसा नाहीं. "

परंतु भिक्षुकमंडळींना थोडें तारतम्य कमी असतें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. भिकंभटदादांनीं तेवढ्या त्या बोलण्यानें उमजावें कीं नाहीं ! निदान काळ, वेळ, स्थळ, प्रसंग हीं तरी मनांत [illegible]

कांहीं नाहीं. ते दादासाहेबांच्या बोलण्यावर लागलीच म्हणतात, " अहो, आपण म्हणतां तसं असलं, तर आमचं काय म्हणणं आहे ! परंतु ही अलीकडली प्रजा. हिचा निर्वाळा कोणी द्यावा ! तुम्हीं उद्यां ही मुलगी ठरवलीत. पण मुलाला जर पसंत झाली नाहीं, आणखी त्यानं म्हटलंन् कीं हिला ल्याहायला वाचायला येत नाहीं, ही मला नको, तर तुम्ही काय करणार ? हीं कॉलेजांत शिकून तयार झालेलीं मुलं. यांचं काळीज उलटं झालेलं, त्यांना वडिलांचा धाक गेला आहे तेव्हां आपण आतां कांहीं गडबड करूं नये, किंवा त्यांच्या आज्ञेबाहेर जाऊं नये असं कुठलं वाटायला !......"

" पुरे हो दादा. तुमच्या बोलण्याचा कधीं कधीं अगदीं तिरस्कार येतो बुआ. तुमच्यासारख्या ब्राह्मणाला असं आम्हीं म्हणूं नये, पण नाइलाज झाला म्हणजे मग काय करावं ! तुम्हाला अगदीं तारतम्य ज्ञान नाहीं. नुसतं हवामहे करावं आणखी घृतकुल्या मधुकुल्या खावं. दुसरं कांहीं सुद्धां नाहीं. " दादासाहेब संतापून तिरस्कारानें बोलले व अण्णासाहेबांकडे वळून म्हणतात, " अण्णासाहेब आम्हांला मुलगी पसंत आहे. आपण आतां मुलांचं टिपण मजजवळच द्या. मी तें दिगंबरपुरास गेल्याबरोबर पाहवतों, आणखी टिपण जुळत असलं, तर माझ्याकडून रुकार आहे असं समजा. "

इतकें बोलणें झाल्यानंतर जेवणेंखाणें होऊन तिसऱ्या प्रहरीं मंडळी निघाली.

वाटेनें भिकंभटदादांचा व दादासाहेबांची पुनः लहानशी चकमक झालीच.

दिगंबरपुरास आल्यानंतर टिपणें पाहिलीं आणि तीं जुळल्यामुळें विवाहनिश्चय होऊन हुंड्यापांड्याचें ठरविण्यासाठीं अण्णासाहेबांनीं अमुक दिवशीं दिगंबरपुरास यावें असें ठरलें.

---

# प्रकरण १० वें.

## सदूनानांचें कुटुंबसौख्य.



**सदूनाना** नुकतेच ऑफिसांतून येऊन कपडे वगैरे काढीत होते. आज त्यांस प्रदोष होता. सदूनाना फार नेमिष्ट व कर्मिष्ठ. एकादशी, प्रदोष हे उपास अगदीं कडक रीतीनें ते मोठे शिवभक्त असत. इतकेंच नव्हे तर आपण महाशैव असें ते आपणांस म्हणवीत. अर्थातच प्रदोष म्हणजे शिवभक्तांचा फार महत्वाचा उपास. त्यांत आज सोमप्रदोष. प्रदोषवेळा साधून शंकरावर बिल्वपत्रें वाहण्यास सांपडावीं म्हणून आपल्या ऑफिसांतील हेडक्लार्कास विचारून स्वारी अर्धा तास लवकर आली होती. त्यांनीं हेडक्लार्कास रजा विचारली तेव्हां ती त्यांस तावडतोब देण्यांत आली; परंतु ते तेथें असतांनाच, आणि त्यांच्या पू-

आलेही ऑफिसांतल्या क्लार्कांनीं जी त्यांची टवाळी केली, ती न भूतो न भविष्यति. परंतु सदूनाना फार शांत प्रकृतीचे. त्यांनीं तिकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. ते म्हणत, "निंदकाचें घर असावें शेजारीं." परंतु या वेळीं आपणास त्यांच्या घरीं काय चाललें आहे, तें पहावयाचें आहे. ऑफिसांत क्लार्कलोक काय म्हणतात व त्यांची आणि सदूनानांची गणगोत्र मैत्री कशा प्रकारची आहे हें पहाणें नाहीं. तें पुनः केव्हां तरी समजेल.

वर सांगितलेंच आहे कीं, सदूनाना नुकतेच ऑफिसांतून येऊन अंगातले कपडे काढीत होते. सदूनानांचे ऑफिसांत जाण्याचे कपडे अगदीं विशेष काळजीनें ठेवले जात असत. अंगातील अंगरखा, आंतील सद्रा, उपरणें, धोतर, पगडी, इतका सर्व सरंजाम अगदीं काळजीपूर्वक अंगांतून काढून नेमक्या जागीं उंचावर ठेवून द्यावयाचा. उंचावर ठेवण्याचें कारण घरातल्या पोरांनीं हात लावूं नये. कारण सदूनानांच्या घरचीं पोरें शोधण्या हुसकण्याच्या कामांत अशीं वस्ताद होतीं कीं, त्यांनीं दुसरी प्रतिमा पाहूं गेल्यासुद्धां सांपडणें कठिण, त्यांचे तडाक्यांतून कोणतीही जिन्नस सुरक्षित कसा राहील ही एक सदूनानांस व उमाकाकूंस कायमची काळजी असे. सदूनाना आपल्या पोशाखाची काळजी घेत याचें कारण त्यांस मळकट कपडे घालून ऑफिसांत जाण्याबद्दल एक वेळां अद्दल घडली होती, आणि एक महिन्याच्या आंत एकाच अंगरख्या किंवा सद्ऱ्याबद्दल धोब्यास उदार आश्रय देण्याचें त्यांच्या अगदीं जिवावर येई. इतर कित्येक वस्तूंप्रमाणें त्यांस धोब्याची धुलाई दुसऱ्याकडून काढतां येत नसे. त्यामुळें त्या कपड्यांची वर सांगितल्याप्रमाणें काळजी घेणें त्यांस अगदीं जरूरच पडे. तरी आपल्याकडून त्या 'उदार' आश्रयास सुद्धां "उधार" पणाचें स्वरूप ते देतच असत. सहा किंवा आठ महिने जेव्हां त्या धोब्यानें आपल्या धुलाईचे पैसे एकसारखे मागत असावें, तेव्हां एका वेळीं "हा अंगरखा फार मळलेलाच नव्हता, याला तुला इतकी मेहनत पडलीच नसेल." दुसऱ्या वेळीं "हा इथें डागच राहिला. तो तिथें उसवला त्याबद्दल दंड कापून घेतला पाहिजे," असें करून दिडकीच्या ठिकाणीं दुगाणी, तीन दमड्या त्या धोब्याच्या हातावर ठेवावयाच्या. तो धोबीही मग ते जें काय देतील तेंच घेत असे. कारण त्यांच्याच घरांतून दुसऱ्या कोणा व्यक्तीपासून त्यास इस्त्रीच्या कपड्यांबद्दल, कॉलरबद्दल, वगैरे किती तरी पैसे मिळत असत ! धोब्याबद्दल ही व्यवस्था पण न्हाव्याबद्दलची तजवीज सदूनाना याहीपेक्षां फार उत्तम प्रकारें करीत. सदूनाना मोठमोठ्या वकील, सालिसिटर, बॅरिस्टर वगैरे लोकांत वावरत असत. असल्या मोठ्या लोकांस कित्येक बाबतींत हरकाम्या व हजर जबाबी लोकांची त्याचप्रमाणें खुषमस्कऱ्यांची फार जरूरी असते. शनिवारीं रात्रीं व आदितवारीं दिवसा जे त्यांचे गोंधळ चालावयाचे, त्यांत दिवट्याची जरूरी फार. अशा लोकांच्या दर क्लबागणिक एक एक दिवट्या असावा लागतो. सदूनाना त्या कामास फार उपयोगी होते. यामुळें त्यांचा आदितवार बहुतकरून वर सांगितलेल्या त्यांच्या स्नेह्यांच्यापैकीं कोणाच्या तरी आश्रयानें जावयाचा. शनिवारीं रात्रींच स्वारी जी जावयाची, ती आदितवारीं दुपारचें जेवणखाण करून सा-

वकाश वामकुक्षी करून घरीं यावयाची; आणि आदितवार हा त्यांनीं ह्या आपल्या केशकर्तनकर्मास वाहून टाकला होता. त्या समारंभाबद्दलची नापितदादांची बिदागी अर्थातच ज्यांचे घरीं सदूनाना असावयाचे त्या यजमानांकडून दिली जावयाची; आणि तें कोणाच्या लक्षांतही यावयाचें नाहीं!

सदूनानांचा तिसरा ठराव असा होता कीं, वर्षांत लागणारा जोडा, धोतरें आणि उपरणीं हीं ज्यूरीला आमंत्रण आणवून त्याच्या भत्त्यांत काढावयाचीं. ह्यापिसांतील इतर कारकुनांस वर्षांवर्षांनीं किंबहुना दोनदोन तीनतीन वर्षांत ज्यूरीचें बोलावणें यावयाचें नाहीं आणि सदूनानांस वर्षांतून दोन वेळ! आणि अशा वेळीं जो भत्ता मिळेल त्यांत सदूनानांनीं आपला पुणेरी चर्मी जोडा व धोतरें—उपरणीं काढावयाचीं! आमंत्रणें कशीं येत असत, ती त्यांची त्यांनाच ठाऊक! स्पेशल ज्यूरींत आपलें नांव पडावें ह्मणूनसुद्धां सदूनानांची खटपट होती. परंतु तें लागीं लागलें नाहीं! परंतु सदूनानांचें नुसतें असें वर्णन देत बसलों, तर त्यांचेंच एक लहानसें पुराण होईल; तर तें न लिहितां जसजसा प्रसंग येईल, तसतसें वाचकांस सदूनानांचें चरित्रच दृग्गोचर करण्याच्या खटाटोपास लागतों.

सदूनानांनीं आपले कपडे काढून त्यांचें गांठोडें बांधून उंच खुंटीला टांगून ठेवलें आणि त्याच खुंटीवर असलेला बुधवारी पंचा कमरेस गुंडाळून "स्नानाला पाणी काढलं काय!" ह्मणून मोठ्यानें विचारलें. तों आंतून, "काढलं ह्मणजे हांक मारीन उगीच ओरडूं नका," असें त्रासून उत्तर आलें. त्याबरोबर सदूनाना फतकल मारून आपल्या चटईवर बसले आणि त्यांनीं "यत्र यत्र सदूनाना तत्र तत्र बिडी पिना" अशी त्यांची टवाळी करणाऱ्या एका थोर मित्राची कविता तोंडानें ह्मणून त्याच्याच घरच्या तबकांतून खिशांत भरलेल्या विड्या बाहेर काढून आपल्या डबड्यांतून घातल्या व त्यांतली एक काढून ती शिलगावली. नंतर बराच वेळ झाल्यानंतर पुनः एकदां "आज प्रदोष आहे तें विसरलीस कीं काय?" असें ओरडून विचारूं लागले, तों पुनः "मी मुलांना जेवूं घालतें आहे. त्यांचं झालं म्हणजे मग पाणी उपशीन. तितका वेळ नसला, तर वैलाकडलं तपेलं घेऊन जावं" असें उत्तर आलें. सदूनाना चडफडत उठले व आंत जाऊन ह्मणतात, "प्रदोषाच्या दिवशींसुद्धां आधींच पोरांना गिळायला घातलं पाहिजे का काय? काय कारट्यांचा दिमाख करून ठेवला आहे पहा! खबरदार उद्यांपासून त्यांना प्रदोषाची पूजा आणखी नैवेद्य झाल्याखेरीज भात घातला तर, माझ्या नाहीं कामीं पडायचं. कारट्यांना सडकून काढीन, ठाऊक नाहीं अजून?"

"कां बरं? त्यांना काय म्हणून सडकणार? आणखी कोण तुह्मी सडकणार? कांहीं पोरं वाटेवर पडलीं आहेत का काय? पोरांसाठीं तर सगळं करायचं. पाहूं बरं कोण कसं त्यांना सडकतं तें? दुसरं काय वाटेल तें मी ऐकून घेईन, पण पोरांच्या बाबतींत नाहीं बोलूं द्यायची. माझीं सोन्यासारखीं पोरं, त्यांना म्हणे सडकून काढीन, ठाऊक नाहीं अजून? अगदीं सडकेवरच पडलीं असतील माझीं पोरं सडकून काढायला?"

"बरं बरं, गप्प बस्! आतां मला आज उपास आहे, उगीच त्रासवूं नको. मला पाणी दे, एकदां प्रदोष सोडूं दे

आणखी मग तीं कारटींन् तूं आपल्या डोक्यावर घेऊन नाचत बैस, सगळ्या रात्र धिंगाणा घालीत बैस. ”

“ मग, मग तरी कशाला ? आतांच बसतें धिंगाणा घालीत. ही यांना घेऊन बाहेर जाऊन बसतें. तुम्ही पाणी घ्या, पूजा करा, प्रदोष सोडा, काय वाटेल तें करा. तुम्हांला एकदां असं होतं कीं, घराच्या बाहेर जाईन केव्हां ? जा. काय वाटेल तें करा. अगदीं मी आतां उठायची नाहीं. ज्या त्या वेळीं तुमचं हें असंच असतं. जेव्हां तेव्हां अगदीं घोड्यावर. अंमळ सबूरी, का दम कसं तें नांवसुद्धां नाहीं. संसाराकडे मन असेल, आपल्या पोराबाळांची काळजी असेल, तर कीं नाहीं ! जवळचा पैसा सोडायला नको, लागलं संवरलं पहायला नको, आणखी ऊठ पळ बाहेर जायला पाहिजे. हें मी तरी आतां किती दिवस सोसून घेणार ! पोरगा चांगला आतां हातातोंडाशीं आला आहे. त्याला आतां चाकरी लागली म्हणजे मी नांवसुद्धां घ्यायची नाहीं. नुसतं म्हटलं तो काय म्हणतो आहे, कुठें त्याला नौकरी आली आहे, तर तें ऐकूनसुद्धां घ्यायचं नाहीं. ”

“ घोडक्याचा आली आहे नौकरी गुलामाला ! नाहीं परीक्षा, नाहीं कांहीं, आणखी म्हणे मोठी नौकरी आली आहे. तो सांगतोन् तूं ऐकतेस. अशीं जाकिटंन् पगड्या चढवून, इस्तन्यान् फिरतन्या करून मोठाल्या नौकऱ्या येत्या, तर आणखी काय पाहिजे होतं ! कुठला कारटा जन्माला आला आहे. एकदांचा मेला असता म्हणजे........... ”

परंतु उमाकाकूंनीं पुढें त्यांस बोलूं दिलें नाहीं. “ पुरे. पुरे. बेळे ना वारी उगीच कांहीं तरी बोलून माझ्या अंगाचा संताप करूं नका, मी सांगतें आहे. तिन्ही सांजा, प्रदोषाच्या वेळीं असलीं अभद्र अक्षरं तोंडावाटे काढायला कांहीं तरी वाटतं का ? कोणी कोणाच्या नाशावर कांहीं जळमळं नाहीं. आणखी कोणी कोणाचं नशिब पाहिलं नाहीं. पण मला अगदीं पक्कं ठाऊक आहे कीं, त्याला या वर्षांत मोठी नोकरी लागणार. आपल्यापेक्षां मोठी नोकरी एकदम त्याला लागणार. त्याच्या मुळीं पत्रिकेंतच लिहिलं आहे. काय तो म्हणतो आहे सांगतो आहे तें ऐकून तरी घ्यायचं असतं ! ”

“ घेतलं. घेतलं. त्याचं ऐकून घेतलंन् तुझंयू घेतलं. त्याचं तोंडसुद्धां मला पाहायला नको, मग ऐकून कुठला मी घ्यायला ! त्याच्या त्या भुलथापांनीं आतां मी मुळींसुद्धां कधीं फसायचा नाहीं. झालं तितकं पुष्कळ झालं. नसतीच एखादी घोरपड गळ्यांत न आणो म्हणजे झालं. पण ही रिकामी कटकट किती वेळ चालायची ? मला पाणी देते आहेस का नाहीं ? उठारे उठा. आतां पुरे झालं जेवण. व्हा चालतीं बाहेर, नाहीं तर एकेकाचा कान धरून बाहेर फेंकून देतों. ” असें म्हणून त्यांनीं आपल्या हातच्या बिडीचा शेवटला सूत्कार व फूत्कार केला. आतां अगदीं कांहींसुद्धां तींत राहिलें नाहीं अशाबद्दल खात्री करून घेतली, व मग तें एका इंचाच्या दशांशाइतकें राहिलेलें थोटूक बाहेर फेंकून दिलें. तितक्यांत एका मुलानें “ का बलं ! आम्ही नाईं उतनाल दा. तुमनं ताय् दातं. आम्ही देवनाल, ” असें उत्तर दिलें आणि हातांत गडू होता तो मारण्यासाठीं त्याच्या अंगावर धावूं लागला. त्यांनीं

पाणी शेजारच्या मुलीच्या अंगावर सांडलें, ह्मणून ती मोठ्यानें भोकाड पसरून रडूं लागली. आणि तिकडे एक मूल पाळण्यांत निजलें होतें, तें या आरडण्याओरडण्यामुळें जागें होऊन किंचाळ्या फोडूं लागलें. असा एकच गोंधळ उडून राहिला. इतक्यांत एक सुमारें बारा तेरा वर्षांचा मुलगा उड्या मारीतच बाहेरून आंत आला. त्यानें त्या गडूवाल्या मुलाचा गडू हिसकून घेतला. त्याबरोबर तोही हातपाय आपटून व थयथयाट करून शंखवादन करूं लागला. पण सदूनानांची कांहीं छाती होईना, कीं त्या पोरांना गप्प करावें. किंवा त्यांना निदान गप्प राहण्याबद्दल दटावावें. सगळा गोंधळच गोंधळ उडाला. सदूनाना बिचारा लवकर घरीं येऊन त्याच्या येण्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. रात्रीं एके ठिकाणीं जावयाचें होतें म्हणून एवढी बिचाऱ्यानें गर्दी केली होती. परंतु सर्व व्यर्थ होतेंसें दिसलें. शेवटीं मनुष्य पिसाळून उठतो त्याप्रमाणें उठून त्यानें त्या बारा वर्षांच्या पोरास धरून दोन अशा श्रीमुखांत चढविल्या कीं, त्याचें तोंड अगदीं लाल होऊन तो तिरमिरी येऊन पडतोसेंच वाटलें. उमाकाकूंनीं तें पाहून त्यांच्या अंगाचा तिळपापड उडाला व तोंड सुरू झालें. " त्या हातांना एकदां कांहीं होईना तरी कसं ! उठल्या सुटल्या पोरांना मारायचं काय म्हणून ! त्याचे लाड करायचे तें राह्यलं एकीकडेच. आतां काय पाहिजे तें करा. मी आपली पोरांना घेऊन दुसरीकडे कुठें तरी जातें. " असें बडबडत बडबडत त्यांनीं आधणाच्या पाण्याचें तपेलें मोरीवर नेऊन आदळलें. सदूनानाही तितक्यांत " चांभाराच्या देवाला खेटराच्या पूजेशेरीज कधीं व्हायचं नाहीं. या कारट्यांना अस्संच पाहिजे. उठतां लाथ आणखी बसतां बुक्की, त्याशेरीज उपयोग नाहीं. असे भलभलते लाड करून तर त्या थोरल्याला असा करून ठेवला आहे. " असें ह्मणत मोरींत जाऊन बसले. पाण्यास हात लावून पहातात, तों हाताला चटकाच बसला. तथापि अधिक-उणें बोलण्याची ती वेळ नव्हे. तेव्हां तेथेंच घंगाळांतून पाणी ओतून घेऊन विसण वगैरे करूं लागले. इकडे उमाकाकूंची टकळी सुरू होतीच. चाळींतली वस्ती, परंतु उमाकाकू किंवा सदूनाना यांपैकीं एकही कोणी कधीं तशा प्रकारें गम खाणारें नव्हतें. सदूनानांचें स्नान सुरू होऊन त्यांनीं पुरुषसूक्त म्हणण्यास सुरुवात केली. इकडे त्यांच्या " सहस्रशीर्षा " बरोबरच उमाकाकूंचें " पोरांशीं, बायकोशीं धड बोलायचं नाहीं आणखी सहस्रशीर्षा काय चुलींत घालायचं आहे नेऊन ! हातावर पार्थिव घेऊन एकसारखं " चमे, चमे " संतत धार त्याच्यावर धरली, अन् एकीकडे पोरांना वाटतील तसल्या खांडगाळ्या शिव्या दिल्या, काय त्याचा उपयोग ! आहे झालं कांहीं तरी. कोण्या वेळेवर पदरीं पडलें त्याचीं फळं भोगतें आहे. दोन पोरं झालीं तर तींसुद्धां नीटपणीं पाहवत नाहींत. जें तें बाहेरचं चांगलंन् आपलं वाईट. माझा सोन्यासारखा सोन्या, पण त्याचं ह्मणे मी तोंड बघायचा नाहीं. असं काय त्यानं तुमचं केलं आहे ? तो म्हणे असंच करतोन् तसंच करतो. मी म्हणतें आतां पोराची जात आहे, करीत असेल. पण तुम्ही काय करतां आहां ? त्याला चाकरी लागूं याहो एकदांची, म्हणजे सांगतें. "

अशी व अशा प्रकारची चडबड सुरूच होती. उमाकाकूंस स्वागत भाषण करण्याची फार संवय. दोन घटका त्या आपल्याशीच चडबड करीत राहावयाच्या. त्यांतलेंच याही वेळीं आहे. असें धरून सदूनाना आपल्या पूजास्थानापन्न झाले. त्यांच्या पूजेअर्चेपेक्षां त्यांचें अवडंबरच फार असे. भालपट्टावर, बेंबीवर, कंठावर, बाहूवर, उरःप्रदेशावर, मनगटावर, प्रकोष्ठावर भस्माचें यथास्थित चर्चन करून गळ्यांत रुद्राक्षमाला चढवून स्वारींनीं रुद्राध्यायास सुरुवात मोठ्या तारस्वरानें केली; परंतु विवक्षित वेळ होत आली, असें पाहतांच पुढचें सर्व कर्म भराभर साम्रन स्वारींनीं एक वेळां दोनही गालांवर बोटें ठेवून बुबुःकार करून "हर ओम, हरोम शिवशंकर!" असा शब्द केला व पान वाढण्यास हुकूम केला. तिकडूनही उमाकाकूंनीं चडफडत चडफडत येऊन त्यांचे पुढें एकदांचें पान वाढलें. सदूनानास यावेळीं फार गर्दी असल्याकारणानें त्यांनीं तिकडे फारसें लक्ष्य दिलें नाहीं. नाहीं तर त्यांचीं तोंडातोंडी व्हावयाचीच, परंतु सदूनाना भराभर जेवून आपल्या रात्रीचा पोषाख करून खिशांत चार चिड्या कोंबून आपल्या चाळीच्या बाहेर पडले. इकडे उमाकाकू कोणाची तरी वाट पाहात बसल्या.

ही मंडळी अशा स्थितींत आहेत, तों आपण सदूनानांच्या कुटुंबाची थोडीशी हकीकत लिहूं. सदूनाना सरकारी नोकर होते, याबद्दलची माहिती वाचकांस आहेच. त्यांचें कुटुंब थोडेंसें विस्तृत होतें. एक स्वतः ते, दुसरी त्यांची पत्नी उमाकाकू, त्यांचीं अपत्यें सहा. तीन मुलगे व तीन मुली. थोरला मुलगा त्यांस फारच लौकर म्हणजे त्यांच्या वयाच्या अठराव्या वर्षी झाला. अर्थातच आजमितीस सुमारें सोळा सतरा वर्षांचा असेल. परंतु त्याचे यांनीं फार लाड केले असल्याकारणानें म्हणा, अगर घरांतल्या घरांतच दुसऱ्या कोणाची संगत लागल्याकारणानें म्हणा, किंवा सदूनानांच्या शिक्षणपद्धतीनें अथवा नवीन तालिमेंत-कशाहीमुळें म्हणा, पण मुलगा आजमितीस त्यांच्या कह्यांत नव्हता, दुसऱ्याच कोणाच्या तंत्रानें चालत असे. त्याच्या पाठीवर दोन दोन वर्षांच्या अंतरानें एक मुलगी झाली व तिच्या पाठीवरचा बारा वर्षांचा मुलगा धोंड्या, त्यानंतर एक मुलगी जेवीत असतांना रडली ती सुमारें आठ वर्षांची; त्यानंतर ज्यानें वडिलांचे अंगावर गडू फेंकण्यासाठीं उगारला तो व त्याच्या पाठीवर एक तान्ही मुलगी. इतका परिवार व संसार सदूनानांचा स्वतःचा होता. त्यांशिवाय त्यांचे एक बंधु होते, पण आतां सध्या आपण उमाकाकूंकडे पाहूं.

त्या ज्यांची वाट पाहात होत्या ती दोन मंडळी आली आहे.

# प्रकरण ११ वें.

## उमाकाकू व सोन्या.



उमाकाकू ज्यांची वाट पाहात होत्या, त्या दोन व्यक्ति आंत आल्या. त्या दोन व्यक्तींपैकीं एक त्यांचा स्वतःचा मुलगा सोन्या होय. सोन्यानें डोक्यास कॅस राखलेले होते आणि त्यांवर एक काळी स्मोकिंग क्याप ठेवून दिली होती. अंगांत एक सर्जचा छोटा कोट, आंत कडकडीत इस्त्रीचा शर्ट त्यावर वेस्टकट, गळ्याला कॉलर, नेकटाय वगैरे सर्व कांहीं अगदीं फ्याशनेबल होतें. त्यांचबरोबर त्यांचा एक मित्र होता. हा मित्र तर अगदीं नखशिखांत साहेबच! फक्त डोक्याला पगडी होती इतकाच काय तो हिंदुत्वाचा विटाळ त्यास होता. सोन्याबापू आंत येण्याबरोबर आईला मोठ्यानें म्हणतात, " काय! बाबा गेले काय जेवून? वाः फार छान झालें! बहुतकरून आज ते माहिमास गेले असतील. आज त्यांच्या मंडळींची पार्टी आहे. आय से, आई, हे माझे स्नेही जे माझ्या चाकरीकरितां इतकी खटपट करताहेत ते आले आहेत. तुला सकाळीं सांगितल्याप्रमाणें ते कांहीं कोणी परभु-बिरभु नाहींत हो, आपले ब्राह्मणच आहेत मग काय! तूं बाबांना विचारलेंस का सिक्युरिटीचें? यांनीं मला सांगितलें. नव्हे, आज हे अनुमानच आलें कीं, पांच हजार रुपये रोख ठेवावे, म्हणजे तात्काळच साठ रुपये दरमहाची चाकरी लागून दर वर्षाला वीस रुपये प्रमाणें वाढत जाणार. कांहीं काळा ऑफिसर असतील, तसले काळेच तर आईचा कांहीं हरकत नाहीं. आमची आई मुळींच हरकत घेणार नाहीं. दिवसानुदिवस आतां सोंवळेंओवळें कमी कमी होत जाणार हें तिला पक्केपणीं माहित झालें आहे, पोलक्या केल्या आहेतना, आई! यांना पोलक्यांशिवाय चालत नाहीं. यांनासुद्धां त्याच ऑफिसांत नोकरी मिळेल आहे, पण यांचें आणखी साहेबांचें फार वजन असल्यामुळें यांना एकदम दीडशेंची मिळणार आहे. आणखी मला तरी काय तुमच्या जामीनकीवर कांहीं चाकरी मिळणार नाहीं. केवळ यांच्या शब्दामुळें मिळणार आहे. जामीनकी केवळ नांवाला. इतरांच्याप्रमाणेंच माझ्याकडून घ्यायची इतकेंच......" अशी एकंदर चर्पटपंजरी सुरू झाली. उमाकाकू ताटांत भात घालीत घालीत म्हणाले, " त्यांच्या जवळ बाबा आतांशा बोलायची मुळींच सोय नाहींशी झाली आहे. तुझ्या त्या चाकरीचें नांव काढण्याचा अवकाश, कीं त्यांनीं लागलीच संतापायला नाहीं नाहीं तसलें बोलायला सुरुवात केलीच. तें कांहीं नाहीं बाबा. तूं आपला कांहीं पैसाचिसा खर्च न होतां जर चाकरी मिळत असली, तर बघ. नाहीं

तर तें तुला जामीनकीला पैसे देतील असं मला कांहीं वाटत नाहीं. मी तरी आतां त्याला काय करूं ! " इतकें उमाकाकू बोलत आहेत, तों सोन्या-बापू व त्याचे मित्र पाटावर येऊन बसले; आणि सोन्याबापू तें ऐकून एकदम आप त्या आईस म्हणतो, " आई, मला हें त्यांचं ठाऊक ह्मणून तर मी एकसारखं तुला म्हणत होतों कीं, जें काय करायचं तें आपलं मुकाट्यानं करूं म्हणून; पण तूं तरी कुठं ऐकतेस ! मला चाकरी लागून महिन्याच्या पहिल्या तारखेला छन् छन् पगार सुरू झाला की, मग त्यांना तेव्हांच वाटूं लागेल कीं आपण याला अगदीं नादान ह्मणून ठरवीत होतों, पण तितका नादान कांहीं तो नाहीं. आतां अजून तरी तूं त्यांच्या म्हणण्याकडे मुळींच लक्ष्य न देतां काय करायचं तें करून टाकूं दे मला. तुला अगदीं सुद्धां काळजी नको. हे माझे स्नेही आहेतना त्याच्याबद्दल हमी घ्यायला तयार ! आणखी काय पाहिजे ? कायहो प्रोफेसर ! आह्मी यांना प्रोफेसर ह्मणतों बरं का, आई. यांच्या विद्वत्तेमुळें यांना हें नांव दिलं आहे सगळ्यांनीं. "

प्रोफेसर डयांडी हे आमच्या सोन्या-बापूचे मित्र होत, हें वाचकांनीं ताडलेंच असेल. ते तेव्हांच ह्मणाले, " ओ यस्. तुह्मी ह्मणतां तें अगदीं बरोबर आहे. त्यांत मुळींच शंका नाहीं. काकू, तुम्हाला अगदीं शंका नको. सोन्याबापूला साठ रुपयांची नोकरी मी देतों. पण यांना जर कांहीं हमीखेरीज दिली, तर सगळेच माझे स्नेही माझ्या पाठीमागें लागतील कीं आम्हांलाही तशीच चाकरी लावून द्या. पण तसं कसं होणार ! वास्तविक ह्मटलं ह्मणजे जामीनकीची रक्कम पाहिजे पन्नास हजारांची, असं त्या साहेबांचं ह्मणणं होतं. कारण याला ते नगदीच्या कामावर ठेव-णार. तेव्हां याच्या हातून रोज पांच पन्नास हजार रुपये जाणार तेव्हां चांगला जाडा जामीन घेतल्याखेरीज दुसरा कांहीं मार्ग नाहीं. पण माझ्या सांगण्यावरून त्यांनीं याच्यापासून फक्त पांचच हजा-रांचा जामीन घेण्याचं ठरवलं आहे. तोही जर देण्याचं जुळलं नाहीं तर आह्मी तरी त्याला काय करणार ? अहो, बी. ए., एम्. ए. तिथें येऊन दाराशीं लोळ-कांड्या मारताहेत, तर त्यांना कांहीं मिळत नाहीं. साफ सांगताहेत पंचवीस हजारांचा, तीस हजारांचा जामीन आणा म्हणून. आणखी जागा कितीची ? तर पंधराची. तुमच्या मुलाला एकदम साठाची जागा देणार. नाहीं त्याची परीक्षा. नाहीं त्यास विद्या. पण माझ्या शिफारशीमुळें केवळ त्याला साठाची जबाबदारीची नोकरी मिळत आहे. आणखी जामीन मुचलका कितीचा ? तर सारा पांच हजा-रांचा. अहो काकू, त्याची तुम्हांला माहिती नाहीं. नाहीं तर काय सांगूं आज तुह्मीच पाहा. सदूनानांना हा इतका पगार मिळवूं लागायला किती दिवस लागणार ? आणखी जवळ जवळ तोच पगार याला एवढ्याशा वयांत एकदम मिळणार, तेव्हां आतां आणखी पाहिजे काय ? "

प्रोफेसरांच्या वक्तृत्वानें बिचारी उमा-काकू अगदीं थक्क होऊन गेली आणि त्यांच्या वर्णनानें तिचें मन अगदीं मोहित झालें. तिला अगदीं पक्कें वाटून चुकलें कीं, आपल्या सोन्याबापूला आज नोकरी मिळत असतां ती मिळण्याला लागणाऱ्या जामीनकीचा भरती न करणें, ह्मणजे विनाकारण साठ रुपये दरमाहाचें नुकसान

करून येणें आहे. शिवाय सोन्याबापूचें लग्न लांचनें तें निराळेंच. आतांपर्यंत सोन्याबापूस पांच सहा मुली सांगून आल्या, परंतु मुलाच्या परीक्षा झाल्या नाहींत असें ऐकून पुनः कांहीं कोणी त्या बाबतींत बोलण्यास आलें नाहीं. तोच जर त्याला साठ रुपयांची चाकरी लागली, तर मुलींच्या उड्या पडतील. आपल्यासारख्या स्थितींतल्या कुटुंबांत मुलगा एवढा मोठा होऊन अजून त्याचें लग्न होऊं नये म्हणजे काय ह्मणावें ! आपली गांवची मंडळी म्हणतील काय ! नवऱ्याजवळ पंचवीस वेळां या बाबतींत गोष्ट काढली, तर "त्या कारट्याचं कसचं आलं आहे लग्न ! दुसऱ्याच्या पोरीचें जन्मभर शिव्याशापच घ्यायचे की नाहीं !" असें बोलून ते तो विषय धुडकावूनच देत असत. त्यामुळें तर उमाकाकूस विशेषच वाईट वाटे कीं, आतां आपल्याला सून येण्याचा संभव कांहीं विशेष नाहीं. याची परीक्षा झाल्याखेरीज लग्नाची गोष्ट कोणी माझ्याजवळ चुकूनसुद्धां काढूं नये, असें सदूनानांनीं आजपर्यंत हजार वेळां बोलून दाखविलें होतें; आणि मुलगा परीक्षा देऊन आतां पास होईल, ही तर तिला मुळींच आशा नव्हती. परंतु प्रोफेसरांनीं आयती ही नोकरी आणली आहे, तेवढी साधून घेऊन एकदां तो मिळवता झाला, ह्मणजे मुलीसुद्धां लग्नाची काळजी नको. आपोआप मुली त्याच्या पायावर आणून घालतील, ही उमाकाकूंची दृढ समजूत व पुष्कळ अंशांनीं ती खरीही होती. मुलगा पैसे मिळवूं लागला असला, तर तो पुढें मिळवील अशा वरापेक्षांही फार इष्ट असें कित्येक मुलींच्या आईबापांस वाटत असतें. मुलगा परीक्षावान् असला तर तो पुढें चांगला मिरजेल, आपलें व आपल्या बायकोचें पोट भरील असें वाटून त्या आशेवर मनुष्य आपली मुलगी त्याला देतो. परंतु मुलगा किंवा वर आयताच मिळवणारा असला, ह्मणजे मग ती शंकाच राहात नाहीं. तो स्वतः आपलें पोट भरीतच असतो. आपल्या बायकोचें भरील याबद्दल शंका नसते. तेव्हां अशाच्या लग्नाची कधींच पंचाईत पडत नाहीं. हें सर्व ध्यानांत धरलें ह्मणजे "आपल्या मुलाला चाकरी लागल्याबरोबर मुली अगदीं त्याच्या पायावर लोळतील" असें उमाकाकूंस वाटूं लागलें होतें यांत नवल काय ? ती त्याचें लग्न होण्याबद्दल अगदीं हापापली होती आणि मुलानें अभ्यासास तर अजीबात फांटा देऊन केवळ रेनाल्डची नॉवेलें वाचण्यावर भिस्त ठेविली होती. आईला वाटे, मुलगा सारा दिवस वाचीत असतो, परंतु शाळेंत वर नंबर नसायचा, नेहमीं त्याच वर्गांत ठेवल्याबद्दल घरीं रडगाणें गात येऊन वरच्या वर्गांत चढविण्याबद्दल शिफारशी नेऊन लावायच्या ! तेव्हां वर घातला जायचा. असा तो जेमतेम मॅट्रिक्युलेशन परीक्षेपर्यंत येऊन तेथेंच थबकला. आपण परीक्षेला जावयाचेंच नाहीं, असा त्यानें नाचडतोब निश्चयच केला. एवढ्या थोड्या वयांत शाळा सोडून तूं करणार काय असा प्रश्न विचारला असतां, मी काय वाटेल तें करणार, असें उत्तर देई. सदूनानांनीं त्याच वेळीं निरनिराळ्या वेळां निरनिरीवर येऊन त्यास थोडासा खरपूस मारही दिला, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या माराचा उलटा एक वाईट परिणाम झाला. तो हा, कीं आई त्याची तरफदारी करूं लागली व त्यामुळें जे अनिष्ट तें हटकून होऊं लागलें.

सहूनानांनीं जे दिवशीं मुलास खरपूस मार द्यावा, ते दिवशीं उमाकाकूंनीं त्याचे फाजील लाड करून तो ह्मणेल तें त्यास द्यावें आणि नवऱ्यास निर्दयपणाबद्दल बोलावें ? अर्थातच घरांत त्यास दोन प्रकारचें शिक्षण मिळूं लागलें ! एक तर तो कोडगा बनत चालला आणि बापाचें मुळींच ऐकूं नये अशाबद्दल त्याचे मनाची फार प्रवृत्ति होऊं लागली. बापानें एखादी गोष्ट करायची नाहीं ह्मटलें, कीं यानें ती हटकून करून टाकावी, आणि आईकडून त्यास त्या कामांत चांगलीच फूस मिळूं लागली. अशा स्थितींत मग काय विचारतां ? तावडतोब मुलगा तरबेज झाला. आईपाशीं वाटेल तसा हट्ट करून त्यानें तिजपासून पैसेही काढावे ! तिनें नाहीं होय ह्मटलें तर खळीस येऊन, आरडून ओरडून तिला अगदीं नको नकोसें करावें ! आणि तिनें बिचारीनें मग एकदां त्याला काय पाहिजे तें द्यावें ! असा प्रकार आज वर्ष दीड वर्ष सूरू होता. तशांत प्रोफेसर ड्यांडींची आणि त्याची गांठ पडली ! मग काय विचारतां ! प्रोफेसर ड्यांडींनीं आपल्या चैना चालाव्या व स्तोम माजावें म्हणून जीं अनेक साळीं भोळीं कुळें पाहिलीं होतीं, त्यांपैकींच सोन्याबापू हें एक होतें. सोन्याबापूंनीं त्यांच्या कित्येक बारीकसारीक गरजा पुरविण्याचा जणूं काय मक्ताच घेतला होता. तो मक्ता अगदीं इमानें इतबारें पार पाडला जात असे, आणि त्याचा मोबदला सोन्याबापूस एवढाच मिळे कीं, प्रोफेसर ड्यांडीबरोबर वाटेल तेथें हिंडावयास व त्यांच्याबरोबर वाटेल तेथें जावयास सांपडे. एखादे वेळ त्या पोरापासून प्रोफेसर ड्यांडींना थोडेसे अधिक पैसे मिळाले असले, तर ते सोन्याबापूस गार्डीनून हिंडण्यास, अगर नाटक पाहाण्यासही नेत असत. प्रोफेसर ड्यांडी कोठेंही गेले, तरी पैसे वगैरे कांहीं खर्च न करतां अगदीं अग्रभागीं जाऊन बसायचे. एकदां तर ते एका इंग्रजी नाटकाला त्याला घेऊन गेले होते, परंतु त्यांस कोणी ' तुमचें तिकीट कोठें आहे ? ' असें विचारलें नाहीं, कीं तिकिट तपासलें नाहीं. तेथें असतांना त्यांचें कित्येक साहेबांशीं कानाशीं कान लावून भाषण झालें, आणि " काय हा प्रोफेसराचा मोठेपणा ? किती साहेबांशीं अगदीं सलगीनें बोलतात ! असें मनांत येऊन त्यांनीं प्रोफेसर ड्यांडी यांस " तुह्मी आतां ज्याच्याशीं बोलत होतां तो कोण ? " असें विचारावें, तों यानें त्यास झटकन् " तो जनरल थंडरचरी मुंबईइलाख्याचा कमांडर–इन–चीफ " असें सांगावें. दुसऱ्या कोणाबद्दल विचारलें कीं, " तो मुंबईचा कलेक्टर आहे किंवा पोलिस कमिशनर आहे, " अशी कांहीं तरी थाप द्यावी. काय बोलत होतां ह्मणून विचारलें तर त्यावर सुद्धां उत्तर ठेवलेलेंच. "मुंबईच्या पोलिसांत तीनशें रुपयांची नोकरी देतों, धरतोस का ह्मणून विचारीत होता. परंतु मी रोख उत्तर दिलें कीं, 'साहेब, आज मी आपला स्वतंत्र आहें, तोंपर्यंत तुमच्याशीं बरोबरीनें बोलतों चालतों, परंतु उद्यां मी तुमचा नोकर झालों कीं, तुमच्यापुढें मला उभें राहवें लागेल, तेव्हां मला कांहीं अशी नोकरी नको. " काल मला जनरल थंडरचरी ह्मणत होता कीं, माझ्याबरोबर टेनिस खेळायला येतोस का जिमखान्यांत ? पण मी त्याला साफ सांगितलें कीं, तुह्मी जिमखान्यांत नेटिव मेंबर घ्या म्हणजे मी येतों. नुसता एक अर्धा सेट् खेळायला येत नाहीं. हें पहा,

तुला सांगतों, सोन्या, या साहेबलोकांशीं फटकून वागलं, तरच ते जरा बेतानं असतात, नाहीं तर अगदीं गुर्मीत असतात. मला काल तो पी ॲण्ड ओचा क्याप्टन म्हणत होता, "आम्ही तुला इंग्लंडला घेऊन जातों." पण मीं साफ सांगितलं कीं, जाईन ते दिवशीं तुमच्या नाकावर दिडक्या टिचून जाईन, तुमचा ओशाळा होऊन कधीं नाहीं जाणार! यांना अशींच उत्तरं पाहिजेत." सोन्याबापूनें हे शब्द ऐकले, म्हणजे त्याला असें वाटे कीं, आपला व प्रोफेसर ड्यांडींचा परिचय झाला आहे, म्हणजे एक केवढी थोरली तरी महत्वाची गोष्ट झाली आहे, आणि या परिचयापासून आपल्याला काय काय प्रकारचे लाभ होणार आहेत त्याच्याबद्दल कांहीं त्यास कल्पनाच होत नसे. प्रथम प्रथम जेव्हां त्यांचा व या खुळ्याचा परिचय झाला, तेव्हां त्यानें घरीं येऊन आईला त्याच्या मोठपणाच्या किती तरी गोष्टी सांगाव्या. त्यानें त्याला आपल्या घरीं जेवणास वगैरे बोलवावें परंतु प्रोफेसर आपली योग्यता पूर्णपणें जाणून असल्यामुळें त्यांनीं कधीं आमंत्रण पतकरिलें नाहीं. कांहींना कांहीं तरी सबबी सांगून तें टाळलें. परंतु पुढें जेव्हां त्याची व आपली बरीच गट्टी जमली असें पाहिलें तेव्हां, किंवा नसेंच कांहीं कारण उत्पन्न झालें तेव्हां, स्वारींनीं आज हें आमंत्रण स्वीकारलें. सोन्याबापूस शर्टफर्ट, फ्याशनेबल पोषाख वगैरे घालण्याची चटक प्रोफेसरसाहेबांनींच लावून दिली होती. त्यानें आपली शेंडी संपूर्णांत आणून सर्व डोक्याभर केंस ठेविले, ते प्रोफेसर ड्यांडींच्या अनुकरणामुळेंच. हें म्हणजे कांहीं निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. अशा रीतीनें हें खुळें पोर, व त्याच्यामुळें त्याची भोळी बिचारी आई आतां आपल्या तावडींत सांपडल्याप्रमाणेंच झाली आहे, असें मनांत येऊनच काय प्रोफेसरसाहेबांनीं आज बऱ्याच दिवसांनीं सोन्याबापूचें जेवणाचें आमंत्रण स्वीकारलें. परंतु त्याच्या आधीं असें कबूल करून घेतलें होतें कीं, तुझा बाप जेव्हां घरीं असेल, तेव्हां येणार नाहीं. ते नसतील, कोठें जाणार असतील, अशा दिवशीं संध्याकाळीं येईन. सद्नानांच्या देखत न येण्याला कारण त्यानें असें दिलें कीं, ते फार जुन्या पद्धतीचे व कर्मनिष्ठ असे आहेत आणि मी तर बोलून चालून असा सुधारक. तेव्हां मला पाहून उगीच त्यांचें मन दुखवावयाला नको. त्यापेक्षां त्यांच्या अपरोक्षच आलेलें बरें म्हणजे त्यांना वाईट वाटावयाला नको. तुझा आणि उमाकाकूंचा आग्रह आहे म्हणतोस तरी त्याहीप्रमाणें केलें. सोन्याबापूनें हें कारण उमाकाकूंस सांगितलें. तेव्हां प्रथम जरी त्यांस आश्चर्य वाटलें, तरी शेवटीं असेंच वाटलें कीं, सोन्याबापूचा स्नेही आपला पति घरांत नसतांना जेवावयाल आला तरच बरें. नाहींतर उगीच एखादे वेळीं त्यांची कांहीं तरी लहर फिरून भलतेंच्या सलतेंच ते करावयाचे! तेव्हां तिनेंही तें कबूल केलें. तशांत आज सद्नानांनीं सकाळींच मी संध्याकाळीं लवकर येऊन प्रदोष सोडून जाणार आहें असें सांगितलेलें त्यांच्या चिरंजिवांनीं ऐकिलें. मग काय विचारतां! त्यांनीं लागलेंच आपल्या आईला आज मी आपल्या स्नेह्यांना जेवावयास बोलावतों म्हणून सांगितलें आणि आईनेंही त्याची ती आतुरता पाहून त्यास रुकार दिला. प्रोफेसर ड्यांडींनीं त्यांत काय साधलें तें पुढें कळेल.

# प्रकरण १२ वें.

## कमलेचे विचार.



**ब**ळवंतरावांनीं पद्माकरपंतांचें पत्र वाचून दाखविल्या दिवसापासून द्वारकाबाईची प्रकृति किंचित् सुधारल्याप्रमाणें झाली. तिची वृत्ति तर विशेषच उल्हसित दिसूं लागली. तिला असें वाटलें कीं, आपण आतां एका काळजींतून मुक्त झालों. कमलेचें लग्न अशा तरुण पुरुषाशीं झालें, तर आणखी काय पाहिजे ? कमलेच्या लग्नाविषयीं किती प्रकारानें तरी तिच्या मनांत चिंताविचार येत असत. योग्य वर न मिळाल्याकारणानें आपल्या पोरीस अविवाहित राहावें लागलें. आणि बळवंतरावांनीं कधीं विनोदानें किंवा कधीं मनःपूर्वक जर असें म्हटलें कीं, "न का होइना तिचें लग्न ! तिला मी विलायतेस किंवा अमेरिकेंत पाठवून डॉक्टर करून आणीन," तर तें तिला कसेंसेंच लागे. अविवाहित मुलगी राहणें ह्मणजे कांहीं एक भयंकर गोष्ट करणें आहे असें तिच्या मनानें घेतलें होतें. विवाह म्हणजे हिंदु स्त्रीचें जीवितसार्थक्य असा जो एक विचार आज कित्येक सहस्रकें आपल्या स्त्रियांच्या व पुरुषांच्याही मनांत अगदीं कायम होऊन बसला आहे, त्या विचारानें द्वारकाबाईच्या मनास सोडलें होतें असें नाहीं. त्याचा पगडा तिच्या मनावर पूर्णपणें होताच. मात्र यामुळें चांगलेंसें स्थळ आणि तुषारसा नवरा मिळून, पोरीचें लग्न व्हावें ही तिची फार इच्छा. त्यांतून तिला तो चमत्कारिक रोग जडून आपल्या जिवाचें केव्हां काय होईल याबद्दल तिला जेव्हां भय वाटूं लागलें, तेव्हां तर तिला त्यासंबंधानें फारच आतुरता झाली. बळवंतराव अगदीं धिम्मा होता. तो म्हणे, सध्यांचा काळ असा आहे कीं, कमलेसारखें रत्न अगदींच कोंपऱ्यांत पडून राहण्याची पाळी यावयाची नाहीं. कोणी ना कोणी तरी तिची पारख करणारा उत्पन्न होऊन आपल्याकडे येईल. पद्माकरपंतांचा व त्याचा परिचय झाल्यादिवसापासून हाच आपल्या कन्यारत्नाचा पारखी असून तिची वांछा करील, असेंही त्याच्या मनांत वाटत होतें. परंतु बळवंतराव घायकुत्या माणूस नव्हता. आणि मनुष्याची पारख क्षणार्धांत करून लागलीच तीच आपली पारख बरोबर असें समजून एकदम मनांत एखाद्या व्यक्तीविषयीं अत्यंत आदर किंवा अत्यंत प्रेम आणि एखाद्या व्यक्तीविषयीं अत्यंत तिरस्कार किंवा अत्यंत द्वेष उपजूं देत नसे. प्रत्येक मनुष्याची योग्य पारख करून व ती आपली पारख करून कांहीं दिवसांच्या अनुभवानें बरोबर कीं चुकलेली हें ठरवून नंतर कायतें पक्कें मत करी. पद्माकराविषयीं त्यांचें मत फार चांगलें होतें. तो फार इभ्रतीचा, नेकीचा व नेटाचा माणूस



कमलेचा विचार. (प्रकरण १२ वें पहा.)

आहे असें त्यास पक्कें दिसून आलें होतें व त्यामुळेंच त्याला त्यानें आपल्या कुटुंबांत प्रभाकराप्रमाणें वागूं देण्यास मुळींच हरकत घेतली नाहीं. केव्हांही घरीं यावें, आपल्या बायकोशीं व मुलांशीं बोलावें, हंसावें, खेळावें, येथपर्यंत त्याचा या घराण्याशीं स्नेह जमला. याचें कारण बळवंतरावाच्या मनाची ही खात्री कीं, पद्माकर कधींही अयोग्य किंवा असभ्य भाषण किंवा वर्तन करील हें संभवनीयच नाहीं. त्याच्या विनोदांत, भाषणांत, आचरणांत वगैरे यत्किंचित् सुद्धां कांहीं नांव ठेवण्याजोगें नसे. पद्माकर कमलेस योग्य असें त्यास पूर्णपणें वाटत असे तरी पण पद्माकरपंताचें तें पत्र वाचून त्यानें एकदम आनंदानें उडी मारली नाहीं. "या पत्राचें उत्तर लिहिणें ही विचार करण्याची गोष्ट होय" असें त्यानें आपल्या मनास सांगितलें. त्याचा स्वभाव अतिशय शांत व स्वस्थ. "उतावळीनें धांवला सावकाशपणीं पस्तावला" हें त्यास मुळींसुद्धां आवडत नसे. दुसरें असें कीं, पद्माकराच्या अंगीं उतावळेपणा फार आहे अशी अलीकडे अलीकडे एक त्याच्या मनास शंका येऊं लागली होती. ती शंका घेण्यास अमुक एक कारण होतें असें मुळींच नाहीं. परंतु अत्यंत बारीक बारीक गोष्टी, ज्या कांहीं बळवंतरावाच्या निदर्शनास आल्या होत्या, त्यांच्या समुदायिक परिणामानें बळवंतरावाच्या मनांत ती शंका उत्पन्न केली होती. तेव्हां पद्माकरपंताच्या पत्राचें उत्तर लिहिण्याबद्दल त्यास विचारच पडला. तो अगदीं तरुण आहे. अजून त्यानें जगाचा कांहीं सुद्धां अनुभव घेतलेला नाहीं. तेव्हां उतावळीनें त्याच्या मनांत एखादा विचार आला कीं, त्याचा आपण फायदा घ्यावा, कीं तो त्याचा विचार पक्का होण्याला कांहीं वेळ जाऊं द्यावा याचाच त्याच्या मनांत घोंटाळा चालला होता. पद्माकराचे वडील फार जुन्या चालीचे. त्यानें आपल्या मुलीशीं लग्न करणें म्हणजे घरांतून उठल्याप्रमाणेंच करणें होय. दादासाहेबांच्या करारीपणाबद्दल ज्या कित्येक गोष्टी त्यांनीं ऐकल्या होत्या, त्यांवरून त्यांच्या मनाची एवढी अगदीं दृढ समजूत झालेली होती कीं, पद्माकरानें त्यांच्या मनाविरुद्ध अणुमात्र वर्तन केल्यास तें त्या ह्मातान्यास क्षणभरसुद्धां सहन होणार नाहीं आणि तसें सहन झालेंही नाहीं, म्हणजे अर्थातच ते त्यास आपला मुलगा नाहींसा झाला असें म्हणून त्याचें नांव सोडून देतील. येथपर्यंत पाळी येईल, अशा प्रकारचें कृत्य त्याच्या हातून करविणें रास्त होईल काय? बरें, यदाकदाचित् त्यानें केलें, तरी शेवटपर्यंत त्याच्याकडून टिकाव धरवेल काय? जर टिकाव न धरवला, जर का त्या अल्पावकाशांतच पश्चात्ताप झाला, तर काय अवस्था होईल? आपल्या मुलीची स्थिति काय होईल? हे विचार त्याच्या मनांत एकसारखे येत होते आणि त्यामुळें त्यानें पद्माकरपंतास तावडतोब उत्तर पाठविलें नाहीं. "आपण पत्र लिहिलें तें मला पोंचलें पत्र वाचून मला समाधान झालें. तथापि पुष्कळ गोष्टींचा निकाल समक्षच होण्याजोगा असतो तेव्हां आजपासून आठवे दिवशीं आपण समक्ष भेटून त्या गोष्टीचा विचार करूं" असें छोटेंसें एक पत्र मात्र पाठवून दिलें.

बळवंतरावानें आपल्या पत्नीस पद्माकरपंताचें पत्र वाचून दाखविलें तें केवळ द्वारकाबाईनें मात्र ऐकिलें असें नाहीं, मुद्दाम लक्ष्य लावून कांहीं नव्हे, परंतु

अगदीं साहजिकपणें त्याच वेळीं कमला जागी झाली. तिच्या कानीं त्या पत्रां-तील कांहीं कांहीं शब्द पडले. तुटक शब्दांचा अर्थबोध तिला बरोबर होईना. आपले बाबा आईला कांहीं वाचून दाखवीत आहेत, पण तें काय आहे? कांहीं पुस्तक आहे काय! एखादे वेळीं आईला झोंप येईनाशी झाली, म्हणजे ती कोणाला तरी उठवून कांहीं पुस्तक वाचून घेत असे. त्याप्रमाणें कदाचित् ती आज मध्येंच जागी झाली असेल, तिला झोंप येईनाशी झाली असेल आणि त्यामुळें तिनें बाबांना कांहीं वाचण्याला सांगितल्यामुळें ते वाचीत असतील असा तिचा समज झाला. प्रारंभीं प्रारंभीं तें पत्र खरोखर कोणी कोणाला लिहिलें असेल, अशाविषयीं तिला शंकासुद्धां आली नाहीं. तिला पक्कें असें वाटलें कीं, एखाद्या गोष्टीच्या बुकांत कोणी कोणाला लिहिलेलें तें पत्र असावें; परंतु जों जों ती लक्ष्य लावून ऐकूं लागली, तों तों तिला तें आपल्याविषयीं तर नसेलना, असें वाटलें आणि अर्थातच ती अधिकच चित्त देऊन ऐकूं लागली. ती ऐकूं लागली म्हणण्यापेक्षां तिचें लक्ष्य तिकडे वेधलें असेंच म्हटलें पाहिजे. तें कांहीं केल्या अन्यत्र जाईना. वारंवार तिला असें वाटलें कीं, तें पत्र आपल्यासंबंधाचेंच आहे; परंतु आपल्यासंबंधानें लिहिणार कोण? शेवटलें नांव बळवंतरावांनीं कांहीं वाचलें नव्हतें. तें वाचायचें कारणच नव्हतें. द्वारकाबाईस तें ठाऊकच होतें. परंतु बळवंतराव व द्वारकाबाई यांचें जें बोलणें पुढें झालें तेंही अर्थातच तिच्या कानीं पडल्याकारणानें तिला त्याबद्दल कांहीं शंका राहिली नाहीं. ती मोठ्या विचारांत पडली. हा प्रकार आहे काय? कमला जाणती झाली होती. आपण म्हणजे आपल्या आईबापांना एक काळजीच आहों असें तिला कधींच कळून चुकलें होतें. आपली स्थिति कशी आहे, आपल्याला काय अडचणी आहेत, याचें तिला पक्कें ज्ञान झालें होतें आणि त्यामुळें तिच्या चर्येवर नेहमीं एक प्रकारची चिंता दिसत असे. वरील पत्रांतला मजकूर व त्यानंतरचें आईबापांचें भाषण यांनीं तिच्या मनांतील विचारांना एक प्रकारचें निराळें स्वरूप आलें. आपल्या जन्माबद्दलच्या अडचणींनीं उत्पन्न होणारी उणीव अंगच्या गुणांनीं पूर्णपणें भरून यावी अशाबद्दल जितका म्हणून प्रयत्न करणें शक्य तितका तिनें चालविलाच होता. बुद्धि आणि स्वभाव दोन्हींही उत्तम प्रकारचीं असल्यामुळें तिच्या त्या प्रयत्नास किती उत्तम यश आलें होतें, तें वाचकांस माहिती आहेच.

बळवंतरावांनीं वाचलेलें पत्र ऐकल्या वेळेपासून तिचें चित्त व्यग्र होऊन गेलें एवढी गोष्ट खरी. उरलेल्या रात्रींत तिला झोंप आली नाहीं. बळवंतराव व द्वारकाबाई तिच्या लग्नाबद्दल गोष्टी बोलत तेव्हां तिला असें वाटे कीं, आपलें लग्न करण्याचा विचार हीं मंडळी कशाला मनांत आणतात? त्यापेक्षां लग्न न करतां विद्याभ्यास करून डाक्तरींसारखा लोकांना उपयोगी पडण्याचा धंदाच शिकलें, तर काय होईल? तिनें कित्येक मोठमोठाल्या स्त्रियांचीं चरित्रें वाचलीं होतीं. त्यांपैकीं पुष्कळ स्त्रिया आजन्म अविवाहितच राहिल्या होत्या. त्यांचें अनुकरण आपण केल्यास काय हरकत आहे? असा विचार तिच्या मनांत नेहमीं येई. परंतु तो विचार

तिच्या आईस पसंत पडत नसे हे वर सांगितलेंच आहे. तथापि कसा तरी कोणी तरी नवरा मुलगा गांठून आणून आपली मुलगी एकदां उजवावयाची असाही पण आपल्या आईबापांचा विचार नव्हता हे ती पक्केपणें जाणून होतीच. वर सांगितलेलें पत्र ज्या रात्रीं तिनें ऐकलें, त्या रात्रीपासून मात्र तिचें चित्त किंचिन्मात्र बदललें. पद्माकरपंताची तिला आज कित्येक दिवसांची माहिती. शिवाय प्रभाकराच्या तोंडून तिनें त्याचे गुणानुवाद ऐकलेले होते. तेव्हां अशा वराशीं विवाह झाला, तर केवळ अनिष्टच आहे, असें तिच्या मनास वाटेना; इतकेंच नव्हे तर, हा विवाह घडून आल्यास आपल्या आईचा एक हृद्रोग तरी नाहींसा होईल असें तिच्या मनानें घेतलें. त्यांतून आणखी पद्माकरपंतांनीं आपण होऊन मागणी घातली हा विचार तिच्या मनावर विशेषच परिणाम करूं लागला. पद्माकरपंताविषयीं तिच्या मनांत फार आदर उत्पन्न झालेलाच होता. तेव्हां त्यांनीं आपण होऊन अशा तऱ्हेचें पत्र आपल्या बापास लिहिलें ही तरी केवढी गोष्ट होय! अशी गोष्ट व्हावी, हें जरी तिच्या मनास अनेक वेळां वाटलें होतें, तरी तसें होईल, असें तिच्या स्वप्नींही नव्हतें. तें खरोखर घडलें हें पाहातांच तिला किती आनंद व आश्चर्य वाटलें! अवशेष राहिलेल्या रात्रींत तिला अधिक झोंप आली नाहीं. दुसरे दिवशीं नित्य कृत्यें व मातृसेवा करीत असतांनाही तिच्या मनांत रात्रीच्या पत्रांतील मजकूर एकसारखा घोळत होता.

जी तिच्या मनाची स्थिति होती, तीच तिच्या आईच्याही मनाची स्थिति होती. तिच्याही मनांत रात्रीच्या त्या पत्रांतील मजकूर एकसारखा घोळत होता आणि कमला खरोखर कमले (लक्ष्मी) प्रमाणें घरांत वावरत असतां तिच्याकडे पाहून, तिला वारंवार असें वाटे कीं, आपल्या पतीनें आपणासाठीं घरदार सोडून थोड्याशा पगारावर संसार करण्याचें पत्करिलें, तेव्हां आपण त्यास सुखसमाधान व धीर दिला, हा कांहींच नव्हे, इतका धीर व इतकें सुखसमाधान आपली मुलगी आपल्या नवऱ्यास—पद्माकरपंतास खास देईल. तिच्या गुणांचें बीज मात्र त्याच्या हातून झालें पाहिजे. आईला—त्यांतून अशा मुलीच्या आईला—अगदीं नैसर्गिक अशा अभिमानानें भरलेल्या नेत्रांनीं ती कमलेकडे क्षणोक्षणीं पाहात होती आणि दर पाहाण्याला जणूं काय तिचा तो अभिमान दुणावतच होता. "पद्माकरपंत मोठा नशीबवान् कीं, त्याच्या मनांत ही आपली कमला आपल्याला पत्नी असावी असा विचार आला," असें तिला एकसारखें वाटत होतें आणि कमलेच्याही मनांत त्याबद्दलचेच विचार येत होते. मध्येंच क्वचित् बाबांनीं रात्रीं वाचलेलें पत्र पद्माकरपंतांचेंच काय! कीं कांहीं तरी कुठलें तरी वाचलें? असा संशयविचारही तिच्या मनांत येई व त्यामुळें ती केव्हां केव्हां अगदीं स्तब्ध होत असे. केव्हां केव्हां तिचें तिलाच वाटे, "आपण अविवाहित राहून डाक्तरीण होऊन लोकसेवा करण्याचा निश्चय करावा, तो एकीकडेच टाकून हें भलतेंच काय आपल्या मनांत येतें!" परंतु अशा वाटण्यानें त्या पत्राबद्दलचे व त्यावरून उत्पन्न होणारे विचार बंद होणार कसे?

अशा स्थितींत ती आईच्या जवळ जाऊन तिला आज तुळा मधल्या वेळीं

आयला काय करूं ! ह्मणून विचारूं लागली. तों आईनें तिला, " कमळे, आण्याचें काय तें मग सांगेन पण तूं आधीं जराशी माझ्याजवळ येऊन बस पाहूं," असें ह्मटलें. कमळा जवळ गेली. कांहीं वेळपर्यंत द्वारकाबाई तिच्याकडे अत्यंत आतुर दृष्टीनें पाहातच राहिली. नंतर किंचित् स्मित करून तीस ह्मणते, " कमळे, तुझ्याजोगा नवरा तर सांपडला आहे. आणखी त्यालाही तूं आवडतेस. पण तुला तो आवडतो का नाहीं तें कसं समजावं ? मी जर तुला त्याचें नांव सांगितलं, तर तुला काय वाटतं तें खरं खरं मला सांगशील का ! "

तें ऐकून कमळा गालांतल्या गालांत हंसली. तिनें मान खालीं घातली, आणखी हळूच ह्मणते, " या गोष्टी मुलीला का कुठें विचारायच्या असतात ! जें तुमच्या मनाला वाटेल तें ........." ती पुढें कांहींच बोलली नाहीं.

द्वारकाबाई तिला मध्येंच ह्मणाली, " बेटा, तूं ह्मणतेस तें खरं. पण आमचं सगळंच एकंदर जगाच्या विरहित आहे, तेव्हां हेंही असायचंच. या गोष्टी मुलीला विचारायच्या नसतात हें खरं, पण मुली मोठ्या झाल्या ह्मणजे काय झालं विचारायला ! बोल, मी जर तुला नांव सांगितल, तर सांगशील का मला काय तुझा विचार आहे तो ! "

" कमळा कांहींच बोलली नाहीं. तेव्हां द्वारकाबाई आपणच शेवटीं तिला ह्मणते, " पद्माकरपंतांनीं तिकडे पत्र लिहिलं आहे कीं, आपण तुमचे जांवई व्हायला. "

परंतु कमलेनें तीस पुढें बोलूं दिलें नाहीं. ती मध्येंच म्हणाली, " आई, यांनीं पत्र तुला वाचून दाखवलं तेव्हां मी जागी होते. मला वाटलं, बाबा कांहीं गोष्टींचं पुस्तक वाचीत असतांना त्यांतलं कांहीं पत्र आहे. म्हणून मी ... नाहीं तर कधीं असं आडून ऐकलं नसतं. असं कांहीं चोरून लपून ऐकूं नये म्हणून तूंच आम्हांला शिकवलं आहेस. आणखी आजपर्यंत कधीं कांहीं मी ऐकलेंही नाहीं, पण आज ही गोष्ट—हा गुन्हा केवळ नकळत झाला. त्याला मी काय करूं ! "

" ऐकलंस, तर ऐकलंस. गोष्टींतल्या एखाद्या प्रसंगासारखाच हा सर्व प्रकार आहे खरा. अग मला वाटतें ही एक भावी गोष्टच आहे. ऐकलंस तर फारच चांगलं झालं. आम्हांला आतां निराळं सांगायला नको. तुझ्या मनाला काय वाटतं, तें खरं खरं आणखी मनापासून सांग ह्मणजे झालं. "

द्वारकाबाई अर्धवट हंसत व अर्धवट गंभीरपणें हें बोलली व आपल्या लेकीच्या लज्जावनत मुखाकडे पाहूं लागली. कमलेनें आतां उत्तर देण्याची मुळींच आवश्यकता नव्हती. तिचें उत्तर तिच्या मुखावरून स्पष्टपणें दिसत होतें.

ती कांहीं वेळ—फारच थोडा वेळ—आपल्या आईच्या पुढें बसली. परंतु क्षणोक्षणीं तिची लज्जा वाढूं लागली तेव्हां एकदम तेथून उठून चालती झाली. आईनेंही तिला तेथें बसण्याचा आग्रह केला नाहीं. कन्येचें हृद्गत ती समजली. तिला आनंद झाला. आपल्या देखत आपले हेतु परिपूर्ण होतात असें तिला पक्केपणें वाटलें. आणि इतकें झाल्यावर आपल्याला जरी मृत्यु आला, तरी हरकत नाहीं, असें मनांत येऊन तिच्या डोळ्यांत कांहीं दुःखामुळें, कांहीं आनंदामुळें व कांहीं इतर अनेक विकारांच्या मिश्रणा-

मुळें अश्रु उमे राहिले. ती सद्गदित झाली आणि थोड्याच वेळांत तिचा डोळा लागला.

इकडे कमळा जी आपल्या स्थानें उठली. ती आपल्या व आपल्या भावाच्या लिहि-ण्यावाचण्याच्या खोलींत गेली. तिचा भाऊ त्यावेळीं तेथें नव्हता, हें एका अर्थी बरेंच झालें. आईनें आतां विचारलेल्या प्रश्नानें तिच्या मनाची अशी कांहीं स्थिति झाली होती कीं, त्या वेळीं तिला एकांतच पाहिजे होता. तो मिळाला हें फारच चांगलें झालें. ती आधीं आपल्या टेबला-पाशीं बसली. नंतर मन स्वस्थ व्हावें म्हणूनच जणूं काय, तिनें एक पुस्तक हातीं घेतलें व तें वाचूं लागली. परंतु मनाच्या अशा स्थितींत वाचण्याकडे तरी कोठलें चित्त लागायला! तें लागेना, म्हणून तिनें पुस्तक खालीं ठेविलें व मचि-तपणें ती कांहीं विचार करीत बसली. नानाप्रकारचे विचार तिच्या मनांत येऊं लागले. त्यांत आपल्या बाबांच्याप्रमाणेंच पद्माकरपंत दृढनिश्चयी असतील काय? आपल्या वडिलांचा आश्रय नाहींसा झाला त्यांनीं नांव मोडलें, तरी सुद्धां आपल्या निश्चयाला धरून आपल्या बाबांप्रमाणें नेटानें दिवस काढतील काय? लोकापवा-दाला मुळीं सुद्धां न भितां ते धीरानें राह-तील काय! असे प्रश्न तिच्या मनांत एक-सारखे येत होते. आपला विवाह झाला, तेव्हां आपल्यावर काय काय प्रसंग आले आणि आपण दोघेंही त्यांतून कसे निभा-वलों, याची हकीकत तिनें आईच्या तोंडून अनेक वेळ एकली होती, ती सर्व तिच्या मनांत उभी राहिली.

# प्रकरण १३ वें.

## गणपतराव.



किती वेळ तरी कमळे-च्या मनांत वर सांगि-तल्या प्रकारचे विचार चाललेले होते. तिचें मन कोवळें, परंतु आ-ईबापांच्या उदाहर-णानें आणि शिक्ष-णानें पूर्णपणें शिक्षित. आपल्या आई-बापांप्रमाणें निश्चयी व सद्गुणी अशीं माणसें क्वचितच असतात, असें तिच्या मनानें पक्कें घेतलेलें. तेव्हां त्यांच्या मेळाला जें माणूस उतरेल, तेंच माणूस खरें. इत-रांत कांहीं अर्थ नाहीं, ही तिची पूर्ण श्रद्धा. कोणीही गृहस्थ तिच्या नजरेस पडो, तो आपल्या बाबांप्रमाणें आहे काय, हें तिनें पाहाण्याचा यत्न करावयाचा आणि त्याप्रमाणें तो नसला कीं, मग तो तिच्या मनांतून उतरावयाचा. कोणीही स्त्री तिला दिसो, तिच्या बोलण्याचाल-ण्याची, वागण्यासंवरण्याची रीत तिनें आपल्या आईच्या बोलण्याचालण्याच्या

व वागण्यासंवरण्याच्या रीतीशीं तुलना करून पाहावयाची. त्या तुलनेला ती जर बरोबर उतरली, तर ती खरी चांगली, नाहीं तर तिच्यांत कांहीं अर्थ नाहीं. या तिच्या नेहमींच्या संवयीप्रमाणें तिनें यशा-करपंताची व आपल्या बापाची मनांतल्या मनांत तुलना करून पाहिली. आणि तिचें मन दुग्ध्यांत पडलें. ती योग्य विचार करण्याच्या मनःस्थितीपर्यंत येऊन पोहों-चली होती हें वाचकांनीं आतांपर्यंतच्या वर्णनावरून ताडलेंच असेल. ती अगदीं विचारांत गढून गेली होती. इतकी कीं, तिच्या खोलींत कोण आलें, आणि तिच्या जवळून कोण गेलें याचें सुद्धां तिला भान राहिलें नाहीं. गोपाळा, तिचा भाऊ, हलकेच आंत येऊन पुनः तेथून निघून गेला. शेवटीं ती बऱ्याच वेळानें भाना-वर आली आणि आपण काय अशाच बसलों, आई काय करीत असेल याचें तिला स्मरण झालें, आणि ती एकदम तेथून उठली. आपण किती वेळ अशा बसलों होतों याचें सुद्धां तिला भान राहिलें नव्हतें. अगदीं अल्पकाळपर्यंत, अगदीं निमिषभरच स्वप्न पडावें, परंतु जागें झाल्यानंतर जसें एखाद्यास वाटतें कीं, आपल्यास दोनचार तास झोप लागली असावी, याप्रमाणेंच तिची अवस्था झाली. जितका वेळ आपल्या विचारांत गेला असें तिला वाटलें होतें तितका वेळ खरोखर गेला नव्हता.

ती उठून बाहेर मात्र आली तोंच गो-पाळा तिला एकदम म्हणतो, 'ताई, ताई, मी तुला एक अगदीं आनंदाची गोष्ट सांगायला आलों होतों, परंतु तूं अगदीं विचार करीत बसली होतीस म्हणून मी तुझ्याजवळ जाऊ-न परत आलों. ताई आपले गणपतरावकाका आणखी काकू आज दुपारीं येणार आहेत. आतांच त्यांची तार आली. किती दिवसांत आले नव्हते नाहींग ? आतां किती मौज होईल! आईला तर असा आनंद झाला आहे, कीं कांहीं पुसूं नकोस. तिनें मी बाहेरून आल्यापासून तीनचार वेळां तरी किती वाजले, गाडीची वेळ झाली का, असें विचारलें. बाबा त्यांना आणण्यासाठीं स्टेशनावर गेले आहेत. आणखी अर्ध्या पाऊण तासांत येतील मंडळी. गोपाळाच्या सांगण्याच्या उत्साहावरून व तें एकल्या-मुळें कमलेच्या तोंडावर जो एकदम प्रफु-ल्लितपणा दिसला, त्यावरून कोणी तरी फारच प्रिय अशा व्यक्ति येणार आहेत हें तर सहजच दिसत होतें. कमला लागलीच आईकडे गेली, तों तेथें तिनेंही तिला तीच बातमी मोठ्या उल्हासानें सांगितली आणि विशेष उल्हासाला कारण हें सांगितलें कीं, गणपतराव काका पंधरा दिवस राहण्यासाठीं म्हणून येणार आहेत. आणखी ते पुढें गेले, तरी काकू ( गणपतराव काकांचें कुटुंब ) पुढें कांहीं दिवस राहणारच आहेत. मग कमलेच्या जिवाची अगदीं गर्दी उडाली. तिनें भरंकन् घरांत जाऊन चुलीवर आधण ठेविलें. काका आले नाहींत तों त्यांना चहा तयार करून ठेवायचा अशी तिची इच्छा. चहाची सर्व तयारी तिनें करून ठेविली, आणि ती व गोपाळ दोघें आळीपाळीनें पुढल्या दारापर्यंत फेऱ्या घालून गाडी आली कीं काय हें पाहात राहिलीं. मधून मधून त्यांच्या आईनेंही त्यांना तोच प्रश्न करावा, असें चाललें होतें. इतक्यांत एकदम एक गाडी दारापाशीं येऊन तर थडकली;

तिचा आवाज ऐकतांच हीं दोघेंही मुलें एकदम पुढें आलीं. गाडींतून बळवंतराव खालीं उतरले. त्यांच्या पाठोपाठ एक सुमारें चाळीस एकेचाळीस वर्षांची बाई उतरली. त्या बाईची शालजोडी बळवंतरावांचे हातांत होती. कमलेनें झट्कन् पुढें होऊन त्या कडेवरलें मूल घेतलें. तितक्यांतल्या तितक्यांत गोपाळानें व कमलेनें तिला नमस्कार केला. त्यांच्याकडे त्या स्त्रीनें व त्या स्त्रीकडे त्यांनीं अत्यंत प्रेमयुक्त अशा स्मितवदनानें पाहिलें. इतक्यांत गाडींतून दुसरे एक गृहस्थही खालीं उतरले. बळवंतरावां त्याच वयाचे व अंगापिंडानें अगदीं भव्य व प्रसन्नमुख असे होते. त्यांनीं गोपाळास पाहाण्याबरोबर त्याच्या पाठीवर हात ठेवून, "अरे गुलामा, तूं आह्मांला स्टेशनावर न्यायला आला नाहींस का? बरं पण, आईचं कसं काय आहे? कायग कमले, पोरी, इतकी अगदीं लाजून पळतेस काय? मोठी झाली तशी लाजायला लागली आह्मांला."

असें ह्मणत म्हणत सर्व मंडळीस आंत चालली. द्वारकाबाई अगदीं अशक्त झाली होती, परंतु ती तशी एकटीच भिंतीला हात देऊन तोल सांवरून बाहेर येऊन उभी राहिली होती. एकंदरीत त्या वेळीं त्या मंडळींपैकीं प्रत्येकाच्या चर्येवर अगदीं सुहास्य व प्रफुल्लितपणा हीं स्पष्ट दिसत होतीं; आणि गणपतरावकाकांनीं द्वारकाबाईस उद्देशून "वहिनी, आतां आतां मीं आलों आहें. आतां पंधरा वीस दिवसांत खडखडीत बरं झालं पाहिजे बरं का।" असें मोठ्यानें हंसून ह्मटलें. त्याबरोबर सर्व मंडळींचे चेहरे केवळ आनंद व हास्य यांनीं पूर्णपणें शोभित झाले. कमला झट्झट् आंत गेली व तिनें आधीं एक थंड पाण्यानें भरलेली तांब्या पंचपात्री त्या पाहुण्यांच्या पुढें ठेविली आणि गुळणा वगैरे करून टाकून चहा घेण्यासाठीं तयार होण्याची सूचना केली. एका मोठ्या थोरल्या ताटावर पांच सहा पेले चहा आणून ठेवलाही.

परम मित्रांच्या भेटीचा तो देखावा फारच हृदयंगम होता. प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत आनंदीआनंद झाला होता हें त्यांच्या चेहऱ्यांवरील प्रत्येक रेषेंत--दृष्टिक्षेपांत व कृतींत--स्पष्टपणें दिसत होतें. बळवंतराव व द्वारकाकाई यांचा आनंद त्यांच्या नेत्रांत स्पष्ट दिसत होता. कमलेचा आनंद त्या मुलाला घेऊन हिंडण्याच्या व खेळवण्याच्या विलक्षण उत्साहावरून दिसत होता. गणपतरावकाकांचा व गोपाळाचा आनंद दोघांच्याही बोलण्यावरून स्पष्ट दिसत होता आणि सरस्वतीकाकूचा आनंद आपल्या पतीकडून द्वारकाबाईकडे व द्वारकाबाईकडून बळवंतरावाकडे व बळवंरावांकडून पुनः आपल्या पतीकडे वारंवार पाहाण्यावरून व स्मित करण्यावरून दिसत होता. गणपतराव केव्हां बळवंतरावास, केव्हां द्वारकाबाईस, केव्हां गोपाळास, केव्हां कमलेस नानाप्रकारचे प्रश्न विचारून त्यांचीं उत्तरें मिळण्याच्या आधींच दुसरें कांहीं तरी बोलून अगदीं गर्दी करून सोडीत होते. दुसऱ्या कोणाला बोलण्याला अवसरच ते कधीं देत नसत, आणि मध्याच्या प्रसंगासारख्या प्रसंगीं तर त्यांच्या बोलण्याची गर्दी विचारूंच नका. दोघां मित्रांचा व मैत्रणींची गांठ पडल्यास सुमारें सहा वर्षें होत आलीं होतीं. तेव्हां सहा वर्षांत जें कांहीं झालें गेलें, तें जरी अगदीं बारीकसारीक

सुद्धां-पत्रांच्या द्वारानें एकमेकांस कळत असे, तरी जणूं काय सहा वर्षांत एकमेकांचें एकमेकांस एक कार्डसुद्धां गेलें नाहीं याप्रमाणें गणपतराव प्रश्न विचारीत होते. त्या प्रश्नांच्या उत्तरांची अपेक्षा त्यांना नव्हतीच. कारण ती येईपर्यंत ते कधींच थांबत नसत. एकदम पुढें आणखी प्रश्न करीत व आपणच त्यांचीं उत्तरें देत स्वारी एकसारखी बोलत होती. मधून मधून चहा घेण्याचाही उपक्रम चालू होताच. आणि कसलेला चहा उत्तम केल्याबद्दल व आधीं धोरण ठेवून तयार करून ठेवल्याबद्दल शाबासकीही देत होते. असा क्रम सुमारें अर्धा पाऊण तास जेव्हां चालला, तेव्हां शेवटीं स्वारींनीं दुसऱ्यास बोलण्यास थोडासा अवसर दिला. तो देखील पुढील वाक्य बोलून "कायरे, अरे गृहस्था तूं मघापासून कांहींच बोलत नाहींस, याला काय ह्मणावं ? मी मात्र एकसारखा बोलतों आहें."

बळवंतराव–" आम्हांला बोलण्याला आपण अवसर द्याल, तर आम्ही पुढें बोलणार कीं नाहीं ? गाडींतून उतरल्यापासून आपलीच तर एकसारखी 'वदंती' चालली आहे. आम्ही बोलावं केव्हां ! आपलं ऐकण्याचं काम करतों आहों. तुमचं होऊन तुम्ही अगदीं थकलां ह्मणजे मग बोलूं असा विचार केला होता. बरी पण लवकरच आपल्याला आठवण झाली, कीं दुसऱ्याही माणसांना बोलायला पाहिजे असेल, आणखी त्यांनाहीं पण थोडंबहुत बोलूं दिलं पाहिजे. वहिनी, मला वाटलं होतं कीं, स्वारींच्या स्वभावांत कांहीं तरी पांच सहा वर्षांत फरक पडला असेल, पण पाहातों तों कांहीं नाहीं. पहिले दिवशीं यांची आणखी आमची इथें मुंबईस गांठ पडली त्याला आज सत्तावीस वर्षें झालीं. पण त्या दिवशीं जो स्वभाव मला दिसला, तोच एकसारखा आजतागाईत स्वारींचा स्वभाव आहे. त्यांत कांहींसुद्धां फरक नाहीं. आतां तुह्मांला मी काय सांगायचं ! तुम्हांला तर आज मला वाटतं तीस पसतीस वर्षं झाऊक. गतवर्षींच नाना इथें आले होते, त्यांनीं हेंच सांगितलं कीं, स्वारींचा स्वभाव जसाचा तसा अगदीं उतावळा गडबड्या आणखी बडबड्या कायमचा कायम आहे."

सरस्वती काकू–नानांचं पुरे. नानाला स्वतःला कधीं फारसं बोलायला नको. तेव्हां त्याला कोणी जरा अंमळ अधिक बोललं तरी वाटतं त्यांचा फार बोलायचा स्वभाव. बाकी आपण म्हटलं तें कांहीं अगदींच खोटं नाहीं ह्मणायला येत, इकडे बोलणं सुरू झालं कीं, बाकीच्यांनीं स्वस्थ बसून ऐकावं. मग तिथें दुसऱ्याला बोलायला वाव सांपडायची मारामारच.

द्वारकाबाई–झालं. दोघांचं एकमत झालं बरंका भावजी. मला वाटलंच होतं तसं होणार ह्मणून. हवं असतं आपलं एकेकाला पुष्कळपणीं बोलायला–ज्यांना फारसं बोलायला–नको, तीं माणसं अशींच दुसऱ्याला नावं ठेवायचीं. तुम्ही सांगाहो मला सगळी सहा वर्षांतली हकीकत भावजी. या राजश्रींचं नांव काय राजहंस का कायसं ठेवलं आहे नाहीं का, पत्रांत लिहिलं होतं आपण ? भावजींचा आपला नांवापासून सुद्धां कांहीं तरी नवीनपणा. कसले, अंमळ हळूच त्याला धरा. अगदीं असा धांगडधिंगा घालूं नको त्याच्याशीं. गुलाम गेला बरा पण एकदम तिच्यापाशीं. बरा खेळकर दिसतो आहे !

सरस्वतीकाकूः—भारी खेळकर नू खोडकरयू पण आहे बाई. वाटेल त्याच्याजवळ जावी, वाटेल तें घेवी, त्याला कोणाचं कधींच भय वाटत नाहीं. आणखी एकदां एक घेऊन बसला कीं, तें झाल्याखेरीज कधीं तें सोडायचा नाहीं.

बळवंतरावः—मला कांहीं त्यांत नवल नाहीं वाटत. जस बीज तसच झाड व्हायचं. पण गणपतराव, तूं किती वेळेवर आला आहेस ह्मणून सांगूं! आज सकाळींच मी तुला एका बाबतींत विचारण्यासाठीं पत्र ल्याह्यला बसत होतों. इतक्यांत एकाएकीं असं मनांत आलं कीं, आपण पत्र लिहून हा विचार विचारण्यापेक्षां तुलाच इकडे एकदां बोलवावं. तुझी भावजयय् एकदां परवां म्हणाली होती कीं, इकडे येण्याविषयीं तुह्मांला दोघांना ल्याहा ह्मणून. तेव्हां आज नसं ल्याह्यचं म्हणून विचार करीत होतों. इतक्यांत तुझी तार आली. तारामैत्रक किंवा मेस्मेरिक् इफेक्ट ह्मणतात तो हा असाच. माझ्या मनांत यायलान् तुला बुद्धि व्हायला एकच गांठ पडली कीं नाहीं! आतां मला जो प्रश्न येऊन पडला आहे त्याचा निकाल तेव्हांच होईल.

गणपतरावः—एवढा तो काय प्रश्न आहे बोआ! सांगून टाक. मला आतां अगदीं उतावळी झाली ऐकायची.

बळवंतरावः—होय. पण मला सांगण्याची तितकीच उतावळी झाली पाहिजेना! तेव्हां तें जुळेल. मधेंच कसं जुळावं!

गणपतरावः—पण आहे तरी काय असं? मीं थोडासा तर्क केला आहे. आणखी तोच जर माझा तर्क खरा असेल, तर तुझ्यासारखा अविचारी कोणी नाहीं असं मी ह्मणेन. अतिविचारी अतिविचारी म्हणून जे असतात, ते असाच एखाद वेळ अविचार करतात.

बळवंतरावः—गणपतराव, आतां आपल्या वयाला उतार लागला. चाळिशी उलटली. तरी तारुण्यांतले जेवढे म्हणून दुर्गुण तितके जय्यत तुझ्या अंगीं आहेत. बाबा मी अजून तुला कांहीं सुद्धां सांगितलं नाहीं तोंच आपले तर्क करून मला अविचारी ठरवून पार मसलत. आतां आपलीं जेवणं खाणं झालीं ह्मणजे मग सावकाश सांगेन काय आहे तें. इतक्या सगळ्या मंडळींदेखत सांगण्याजोगं नसलं कांहीं तर जरा तरी सबुरी पाहिजे माणसाला.

गणपतरावः—इतक्या मंडळींच्या देखत सांगण्याजोगं नाहीं? इतकी मंडळी ती कोण? इथें तर कोणी कांहीं तसं न सांगण्याजोगं दिसत नाहीं. तुझ्या वहिनीच्या देखत सांगण्याजोगं नाहीं असं जर कांहीं असलं, तर मला सांगण्यांत मुळींच तात्पर्य नाहीं. कारण माझ्या कानांत पडल्यापासून क्षणभरसुद्धां तें तिच्या कानीं गेल्यावांचून राह्यचं नाहीं रे बाबा!

बळवंतराव त्याच्यावर नुसते हंसून म्हणतात, "बरं बरं, आतां जेवणखाण होईपर्यंत तर मी कांहीं सांगत नाहीं, जेवणखाण झालं ह्मणजे मग आपण स्वस्थपणानं बसूं, अन् मग तुलान् वहिनींना दोघांनाय् सांगेन."

आपला बाप गणपतरावकाकांना काय सांगणार, आणि त्यांचा विचार काय येणार, याबद्दल कमलेनें तर्क केलाच-बळवंतरावांनीं गणपतरावांस मला तुला कांहीं विचारायचं आहे असें म्हणतांच

लज्जेची छाया तिच्या तोंडावर दिसूं लागली. आणि ती अधोदृष्टि होऊन मुलाला खेळविण्याचा तिचा उत्साह किंचित् कमी झाला. तिचें चित्त तिकडे लागलें. गणपतरावकाका नेहमीं आपल्याबद्दल आपल्या बाबांना काय लिहितात तें तिला आठवलें. त्यांत त्यांनीं अनेकवार ज्या गोष्टी लिहिल्या होत्या त्याही तिच्या दृष्टीसमोर उभ्या राहिल्या, आणि त्यांजबद्दलच्या विचारांकडेच तिचें चित्त जाऊन ती पुनः सचित झाली.

इकडे मंडळींचा चहा झाला व वर सांगितल्याप्रमाणें गप्पागोष्टी झाल्या. कमला आंत जाऊन ब्राह्मणाकडून जेवणाखाण्याची तयारी करविण्याला लागली. सरस्वतीकाकू आपल्या मुलास निजवून लुगडें वगैरे बदलून द्वारकाबाईजवळ बोलत बसल्या. गोपाळा कांहीं जिन्नस आणण्यासाठीं म्हणून बाहेर गेला. गणपतरावास बळवंतराव काय विचारणार त्याबद्दल अगदीं उतावळा झाला होता.

त्यानें तर्क तर खास केलाच होता कीं, कांहीं तरी कमलेच्या लग्नाबद्दलचा विचार तो विचारणार असेल. यापूर्वी अनेक वेळां गणपतरावांनीं पत्रें लिहून सहा वर्षांपूर्वी समक्ष बोलावूनही बळवंतरावास असें सांगितलें होतें कीं, तुम्ही आपल्या पोरीचें लग्न लवकर करून टाकण्याच्या विचारांत कांहीं पडूं नका. कांहीं तरी करून तिला पुष्कळ विद्या शिकवून आणि तिच्याकडून डॉक्टरीची परीक्षा देववून मग तिच्या लग्नाचा विचार करावा. आपल्या सारख्याच्या ह्मणजे ज्यांनीं विधवाविवाह केला आहे अशांच्या मुलींच्या लग्नाला फार अडचणी पडणार. लग्न करून द्यावयाचें एवढाच निश्चय ठेवला, तर स्थळ चांगलें मिळेलच असें नाहीं. आणि वर जर चांगला नसला, तर त्या पोरीचे फार हाल होण्याचा संभव, तेव्हां आपल्यासारख्यांनीं (गणपतरावही बळवंतरावाच्या वर्गांतलेच होते) मुलींना कांहीं तरी उद्योग शिकवून ठेवावा व शहाण्या कराव्या, मग त्यांच्या स्वतःच्या मनांत लग्न करावयाचें आल्यास कोणी तरी त्यांच्या योग्य वर उभा राहतो असें त्यांचें मत होतें. व तें मत बळवंतरावास त्यांनीं वारंवार लिहूनही कळविलें होतें. परंतु गणपतराव केवळ उतावळा आहे, त्याला सगळ्याच सुधारणा एकदम कराव्याशा वाटतात. शक्य काय आणि अशक्य काय हें त्याला कांहीं समजत नाहीं, असें गणपतरावांच्या कांहीं स्नेह्यांचें मत असे; तसेंच बळवंतरावांचेंही असल्यामुळें त्यांनीं कधीं त्यांच्या बोलण्यालिहिण्याचा तादृश विचार केला नव्हता, परंतु पद्माकरपंतांचें पत्र आलें, तेव्हां तो प्रश्न पुढें उभा राहिला. पद्माकरपंतास काय तें उत्तर देण्यापूर्वी आतां कायतो विचार केला पाहिजे, अर्थातच आपल्या परम मित्रास विचारल्याखेरीज त्यांना कांहीं ठाम मत ठरवितां येईना. तो मित्र आयताच आला.

गणपतराव हा कट्टा सुधारक होता. त्याचा स्वभाव कसा होता हें वरच्या भाषणांतून वगैरे वाचकांस दिसून आलेंच आहे. बळवंतरावांचा व त्याचा फार स्नेह. दोनही कुटुंबांचा फार स्नेह. दोघांत दुजाभाव मुळीं नव्हताच तेव्हां त्यांच्या अशा प्रसंगीं येण्यानें सर्व मंडळीस अतिशय आनंद व्हावा यांत नवल काय? बळवंतराव व गणपतराव बंगल्याच्या पुढच्या वरांड्यांत एकटेच येतांक्षणींच

गणपतरावानें, "काय बोआ विचारणार तें सांग" असें म्हटलें. बळवंतरावानें हंसून त्याच्या हातीं तें पद्माकरपंताचें पत्र देऊन, "हें पत्र वाचल्यानंतर मग काय तें सांगतों" असें म्हटलें. गणपतरावानें पत्र उघडून वाचण्यास सुरुवात केली. बळवंतराव त्याच्या चर्येकडे पाहात राहिला.

# प्रकरण १४ वें.

## दुसरीकडे !



ज्या वेळीं गणपतराव बळवंतरावांनीं दिलेलें पत्र वाचीत होते त्याच वेळीं दुसऱ्या एका ठिकाणीं एका खोलींत दुसरे दोघे स्नेही अशाच कांहीं एका बाबतींत विचार करीत होते. त्यांच्यापैकीं एकाच्या हातांत असेंच एक पत्र असून तें पत्र त्यानें नुकतेंच वाचून हात खालीं केला होता, आणि दुसरा गृहस्थ त्यास म्हणत होता, "काय प्रभाकर, मी ह्मटलं त्याप्रमाणं हुबेहुब घडून आलं कीं नाहीं! पहिले दिवशीं तार आली त्या वेळीं जरी मला तावडतोब निघून जावं, परीक्षेलासुद्धां बसूं नये असं वाटलं, तरी पाठीमागून विचार करूं लागलों. तेव्हां आपोआप वाटूं लागलं, कीं हें कांहीं तरी निराळं आहे. ह्मणून मींही पण मुद्दाम पत्र लिहिलं कीं, तार पोहोंचली. खुलाशाचं पत्र यावं. तशीच जरूरी असली तर येईन. नाहीं तर परीक्षा आटोपल्यावर मला इथें काम आहे. तेव्हां हें पत्र आलं. त्यांत जरूरी काय आहेत कसली आहे, तें दिसतंच आहे. अरे, आमचीं माणसं आह्मांला पक्कीं ठाऊक. कोणीं तरी जाऊन कांहीं तरी चुगली केली, किंवा पत्र लिहिलं आणखी त्याच्यामुळें ती तार आली होती. याच्यापलीकडे कांहींसुद्धां नाहीं. लोक ह्मणजे असले विलक्षण असतात, कीं कांहीं विचारूं नये. त्यांना दुसरा उद्योग नाहीं. कुठें कोणाचं काय कमी दिसेल तें काढून कुटाळक्या करून वाटेल तें करून त्याची बदनाम करायची. अशा उपद्व्यापी मंडळीपैकीं कोणी तरी.तो उपद्व्याप केलेला आहे यांत मुळींच शंका नाहीं. पण मी सगळ्या गोष्टी अगदीं पक्केपणीं जाणून आहें. दादासाहेबांनीं जी गोष्ट मनांत आणली आहे ती तर माझ्या हातून कालत्रयीं सुद्धां व्हायची नाहीं. बळवंतरावांचं कांहींही उत्तर मिळो. आतां मला असं पत्र लिहिलं आहे, तर मी मुळींच गांवीं जाणार नाहीं. काय उत्तर ल्याह्यचं त्याचाही पण विचार मीं करून ठेवला आहे."

हें बोलणारा पद्माकरपंत अगदीं रागा-

वून बोलत होता. त्याचा स्नेही प्रभाकर हा तें ऐकून त्यास "तूं असा दुराग्रहांत पडूं नको. वेडंवांकडं कांहीं लिहूं नको" असें बजावीत होता. परंतु पद्माकरपंत तीन तीनदां त्या पत्राकडे पाहून उसासे टाकीत होता. मग त्याच्या मनांत काय विचार येत होते आणि काय नाहीं, व त्या पत्रांत काय लिहिलें होतें कोण जाणे. पद्माकर पहिल्यापासून अगदीं तडफीचा माणूस. त्याच्या अंगींही त्याच्या बापाचा करारी स्वभाव उतरलाच होता. त्याचप्रमाणें तारुण्यांत अगदीं साहजिक अंगीं येणारा उतावळेपणाही त्याच्या अंगीं पुष्कळ होता. यामुळें वडिलांचें तें पत्र वाचून तो अगदीं संतापून गेल्याप्रमाणें झाला होता. त्या पत्रांत दादासाहेबांनीं प्रारंभापासूनच थोडें उपरोधिक, थोडें रागानें व जरबीनें लिहिलें होतें. त्याच्या लग्नाचा निश्चय केल्याचें वर्तमान लिहिलें असून "आजपर्यंत या लग्नाच्या बाबतींत तुझं ऐकलं तें पुरें झालं, यापुढें मी ऐकणार नाहीं. यंदा लग्न झालंच पाहिजे आणि तेंही सर्व सुधारकी ढंग विसरून जाऊन माझ्या म्हणण्याप्रमाणं झालं पाहिजे" असें स्पष्ट लिहिलें होतें. मुलगी आपण पाहून पसंत केली आहे. रुकार दिला आहे. फक्त तिथिनिश्चय व्हावयाचा राहिला आहे. तो एक दोन दिवसांत होईल. तरी पत्रदर्शनीं निघून यावं. परीक्षा झाल्यानंतर तेथें राहण्याचं कांहीं कारण नाहीं. हल्लीं आपण कोणाच्या नादानं आहां आणि काय प्रकारांत गुंतलां आहां हें सर्व मला समजलं आहे. आपल्यासारख्या थोर कुळांतल्या माणसांना असल्या बाटग्या व टारग्या लोकांच्या नादीं लागणं अगदीं गैरशिस्त आहे. ती मंडळी आपण फसली असल्यामुळें तुझ्यासारख्या थोर व अब्रूदार घराण्यांतल्या तरुण मुलाला फसवून आपल्या जाळ्यांत ओढून घेण्याला काय वाटेल तें करतील. अमुक एक उपाय म्हणजे ते लोक करणार नाहींत असं मुळींच नाहीं. तुझ्यासारखीं भोळीं फसकीं मुलं, हीं तर त्यांची अगदीं शिकार. तीं कशी गांठूं? हा त्यांचा नेहमींचा विचार. तूं या अशांच्या नादीं लागून माझ्या आणि आपल्या वाडवडिलांच्या तोंडाला काळिमा आणूं नकोस. हे लोक आपल्याला मोठे धैर्यवान् म्हणतात, परंतु आयत्या वेळीं तुझ्यासारख्या भोळ्या पोराला तोंडघशीं देऊन आपण नामानिराळे राहून मौज पाहायाला तयार...." अशा तऱ्हेचा एकंदर त्या पत्रांतला मजकूर असून शिवाय सध्यांच्या सर्व मोठमोठ्या सुधारकांस शिव्या दिल्या होत्या. पुढें नानाप्रकारचे धाक घातले होते आणि शेवटीं कांहीं वाक्यांत तर अगदीं कमाल केली होती.

पद्माकराचें मन एका बाजूला पक्कें झालेलें. कित्येक व्यक्तींविषयीं त्याच्या मनांत अतोनात पूज्यबुद्धि. तेव्हां त्या उपदेशाच्या पत्रांत, त्यांना शिव्या दिलेल्या वाचून त्यास अतोनात वाईट वाटलें. त्याचा परिणाम असा झाला कीं त्यानें आपल्या मनाचा अगदीं दृढनिश्चय केला. कांहीं झालें, तरी आपण या वेळीं घरीं म्हणून जायचें नाहीं. बळवंतरावांचें इकडे काय वाटेल तें उत्तर येवो, आपल्याला दादासाहेबांनीं ठरविलेल्या मुलीशीं लग्न करायचें नाहीं, असाही व त्याप्रमाणें वडिलांस कळवा-

यचें असाही पण त्यानें आपल्या मनाचा निग्रह केला होता. प्रभाकर त्यास "वेड्यासारखं करूं नको, भलतं-सलतं कांहीं लिहूं नको" असा उपदेश करीत होता आणि पद्माकर त्यास "असं नाहींरे, एकदां काय तें स्पष्टपणें कळवून सोडावं ह्मणजे पुनः पुनः त्या कामांत आपल्या पाठीमागें त्रास राहणार नाहीं. येऊन जाऊन भय काय? तर म्हणतील पुनः तूं घरीं येऊं नको. ठीक आहे, नाहीं जाणार. आतां कांहीं मी लहान नाहीं. इतर अनेक लोक नाहींका परीक्षा वगैरे झाल्याबरोबर चाकऱ्या-चुकऱ्या पाहात? त्यांतला मी एक, असं समजून मी कामाला लागेन. वास्तविक तूंच विचार कर. आमच्या दादासाहेबां-सारखा एक गृहस्थ जर शांतपणानं विचार करून या बाजूला वळेल, आपल्या थोरपणाचा, कुलीनपणाचा, श्रीमंतीचा आधार या बाजूला देईल, तर हां हां म्हणतां या सगळ्या इष्ट गोष्टी घडून येतील. परंतु यांचा आधार मिळायचा तें लांबच राहून, उलट ज्या अनिष्ट गोष्टी त्या तशा राहाव्या म्हणून यांचा आग्रह असतो. त्याला काय करणार? माझा अगदीं निश्चय ठरला. आपण अगदीं आज स्पष्ट खुलाशाचं लांबलचक पत्र लिहून माझी इच्छा काय आणखी माझा काय निश्चय झाला आहे, हें त्यांस कळवणार. मग त्याचा पुढें काय परिणाम होणार असेल तो होईल. तूंच विचार कर पलीकडल्या सालीं मी "विलायतेला जातों, तुमच्याजवळ पैसे आहेत, मला धाडलेत तर मी सहज सिव्हिल सर्व्हंट होऊन येईन" असं त्यांना सांगितलं. परंतु त्यांच्या कुठें ती गोष्ट मनांत भरते आहे? "विलायतेस जाणं म्हणजे अगदीं वेडगळपणा आहे. तिकडे जाऊनच शिकलं पाहिजे असं तिकडे कांहीं नाहीं. इथल्या इथें वाटेल तितक्या परीक्षा देतां येतील. सिव्हिल सर्व्हंट होऊन येऊन पगार मिळेल, तितका आज घर बसल्या मिळेल इतकं उत्पन्न करून ठेवलं आहे. पैशाची ददात नाहीं. विलायतेला जाऊन मुलं बिघडतात, धर्म राहत नाहीं, तीं बाटतात, त्यांचीं मनं अगदीं बावच-ळतात." अशा शेंकडों सबबी सांगून त्यांनीं तें कांहीं कबूल केलं नाहीं. असा कांहीं त्यांचा स्वभाव आणखी मतं आहेत. तेव्हां तीं मतं आणखी आमचीं मतं हीं जुळावीं कशीं? आणखी आमचं एकंदर व्हावं कसं? त्यापेक्षां एकदां आपलं काय म्हणणं आहे, काय नाहीं तें स्पष्टपणानं सांगून सोडावं म्हणजे झालं. माझ्या मनांत तर लहान, अशिक्षित, लिहितां वाचतां येत नाहीं अशा पोरीशीं मुळींच लग्न करून घ्यायचं नाहीं. पण लिहिणं, वाचणं मुलींना येतं ह्मटलं, कीं दादासाहे-बांच्या कपाळाला तिडीक चढते. तेव्हां ते मला दृष्टीस नको अशीच एखादी मुलगी पाहाणार, असं मला वाटत होतं त्याप्रमाणं झालंच. त्यांचं सगळं पाहणं कशावर, तर मोठे जहागीरदार, इनामदार, दरक-दार, यांच्या घराण्यांतली मुलगी आपल्या मुलाला केली. हुंडा चार हजार रुपये घेतला. लग्न अगदीं पेशवाई थाटाचं झालं. दोन गांव-जेवणावळी झाल्या. हत्तिणीवर वरात निघाली होती, असा एकंदर लौकिक व्हावा. आमचं पाहाणं त्याच्या अगदीं उलट. हुंडा मुळींच घेऊं नये. लग्नांत तंटेबखेडे होऊं नयेत. पोकळ जहागीरदार असून त्यांनीं कर्ज काढून

लग्नाचा इतमाम करण्यापेक्षां कुलीन, सभ्य व गरीब अशांशींच सोयरीक जमून परस्परांच्या ऐपतीच्या बाहेर न जातां समारंभ उरकावे. आह्मालां वाटतं, मुली चांगल्या शिकलेल्या मोठ्या जाणत्या होऊं देऊन त्यांचीं लग्नं व्हावीं. त्यांना वाटणार मुलगी लहान असावी. शिकलेली असण्याची जरूर नाहीं. तेव्हां हें तरी असं किती दिवस चालणार ? दोनही पक्षांकडे हां हां करून कांहीं चालणार नाहीं. एकदांच स्पष्ट कायतें कळवून देऊन मोकळं व्हावं. पुनः म्हणून त्या बाबतींत त्रास नको. अरे प्रभाकर, गप्प बसून निभवून निभवून तरी तें निभणार किती दिवस ? शेवटपर्यंत निभायचं नाहीं तें. त्यांनीं ठरवावं, आपण हो म्हणावं, त्या जोरावर मग त्यांनीं सगळे बेत करावे, आणखी मग आपण कांहीं तरी सबबी सांगून तें टाळायला पाहावं यांत कांहीं अर्थ नाहीं. तें कांहीं नाहीं. तूं वेड्यासारखा उपदेश मला करूं नको. माझ्या मनांत आलं आहे तसं एकदां पत्र लिहून टाकूं दे मला. मला अगदीं निष्कांचन बनून घर विसरावं लागेल हें मी जाणून आहें, पण एक तर आपले विचार तरी सोडून दिले पाहिजेत, किंवा आपण आपल्या पायावर उभं राह्यला तयार झालं पाहिजे. मी कोणत्या गोष्टीला तयार आहें, हें तुला ठाऊकच आहे."

"हो. हो. मलाही पण ठाऊक आहे, पण तोच मार्ग खरा, अशी तुझी खात्री होण्याला तरी कारण काय बरं ?" हा प्रश्न ज्यानें विचारला, तो तरुण गृहस्थ बाहेरून आंत नुकताच आला. याचेंही वय वरील दोन मंडळींच्या इतकेंच होतें. चेहरा फार विचारी, शांत व सुशील असा होता, आणि त्यावर नेहमीं स्मितही दिसत होतें. तो पद्माकराच्या पाठीवर हात ठेवून म्हणतो, "पद्माकर, आपण इतकं शिक्षण या कॉलेजांतून घेतों. इतके विषय वाचतों. ज्यांचे प्रयोग करून सत्य सिद्धांत कोणते, आणखी असत्य कोणते हें सहज समजतां येईल अशा प्रकारचीं शास्त्रं शिकतों. त्याचप्रमाणं जीं शास्त्रं केवळ मन व त्यानंच जाणले जाणारे अनुभव यासंबंधाचीं तीं हीं शास्त्रं इथें आपल्याला शिकवितात, त्यामुळें आपल्या मनावर कांहीं एक प्रकारचे संस्कार उत्पन्न होतात, आणि कांहीं मतं बनतात. पण त्यांतलीं कोणतीं मतं सत्य आणखी कोणतीं असत्य, हें समजण्याला अगदीं अचूक असा मार्ग कोणता ? आपल्याला जें वाटतं तेंच खरं. तें ज्यांना खरं वाटत नाहीं त्यांची समजूत खोटी, त्यांत कांहीं अर्थ नाहीं, असं जें आपल्याला वाटतं त्याला आधार काय ? आपल्याला असा मताभिमान कां व्हावा ? याचा कधीं विचार केला आहेस ? त्याचप्रमाणं आपल्याला इथें नीतिशास्त्रही शिकवितात. पण सत्य कोणतं आणि शुद्ध कोणतं, तसंच असत्य कोणतं, आणखी अशुद्ध कोणतं, याचा निर्णय आपल्या हातून होण्याची कांहीं आशा आहे काय ! सत्याची व शुद्धाची खूण तरी काय सांगावी ! जर खूण सांगतां येत नाहीं, तर मग आम्ही सत्याला धरून राहून अमुक करूं, तमुक करूं असा बडेजाव करण्यांत तरी तात्पर्य काय ? मीं आजपर्यंत तुझ्यासारख्या कितीकांना तरी हे प्रश्न विचारले; परंतु मला कांहीं समाधानकारक असं उत्तर मिळालं नाहीं. बाकी सर्व सुधारक लोक असेच आग्रह

करून आपलीं मतं खरीं म्हणून मांडत असतात. असं कां? तुम्ही देत असलां दोघे कांहीं उत्तर तर द्या; बाकी मला कांहीं तसं उत्तर मिळण्याची आशा नाहीं."

"अरे बापरे! तूं तर अगदीं तत्वज्ञानच ओतूं लागलास. सगळीं नीतिशास्त्राचीं पुस्तकं पालथीं घालून अगदीं आमच्याशीं भांडायला आला ह्मणजे आम्ही हार जातों का काय?"

"असं नुसतं वितंडाचं भाषण करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुम्ही एक ह्मणतां, कारण तुह्मांला तें खरं वाटतं. आपले वडील दुसरंच म्हणतात, कारण त्यांना तें खरं वाटतं. आतां या दोहोंपैकीं खरोखर खरं कोणतं याचा निर्णय काय? नुसतं तुह्मांला वाटतं म्हणून खरं, तर त्यांना वाटतं म्हणून त्यांचं तरी खरं नाहीं कशावरून? याचं एक उत्तर पाहिजे. दुसरी गोष्ट अशी. यदाकदाचित् तुह्मांला वाटतं तेंच खरं असलं, तरी त्याचा अभिमान धरून तुम्हीं बसणं हें तुमचं कर्तव्य कीं, तुमच्याहून वृद्ध, तुमची आजपर्यंत ज्यांनीं सर्वतोपरी काळजी वाहिली, त्यांच्या आज्ञेबाहेर न जाणं हें तुमचं कर्तव्य? यापैकीं कोणतं कर्तव्य करणं जास्त श्रेयस्कर?"

पद्माकर त्याचें तें भाषण ऐकून हंसला व म्हणतो, "मला वाटतं आज मार्टिनोवरलं व्याख्यान अजून तुमच्या डोक्यांत फार घोळतं आहे. आजचा काय "कर्तव्य"-वरीलच भाग होता वाटतं आपल्याला? का 'सत्य व शुद्ध समजण्याच्या खुणा' हा विषय होता? इतकी वावदूकता त्याखेरीज नाहीं यायची."

"हेंच तें. तुमच्यासारख्यांची नेहमींची रीतच ही कीं, नीट उत्तर द्यायला सांपडलं नाहीं कीं, टवाळीला सुरुवात करायची! आपण कॉलेजांतल्या शिकल्यासवरल्या लोकांनीं याचा विचार नाहीं करायचा, तर कोणीं करायचा? मीं खरोखर अगदीं मनापासूनच तुला हा प्रश्न विचारला. दोन कर्तव्यांची लढाई जर उपस्थित झाली, तर आपण कोणत्या कर्तव्याला अधिक मानून तें करायला जावं, हा विचार नाहीं का? वरील मंडळींची–विशेषतः आईबापांची–आज्ञा मोडूं नये, त्यांचं मन दुखवूं नये हें आपलं कर्तव्य नाहीं का? बरं, इकडे 'सत्य' दिसेल तें व 'सत्' दिसेल तेंही सोडून जाऊं नये हेंही एक आपलं कर्तव्यच आहे. आतां यांतलं घ्यावं कोणतं या प्रश्नाचं उत्तर कोण देईल? मी आतां खोलींत पाय ठेवतों, तों तुमचीं बोलणीं चालली होतीं तीं ऐकून हा फार दिवसांचा प्रश्न सहज माझ्या मनांत उभा राहिला आणखी मीं विचारला. तूं जें असं करीन तसं करीन, ह्मणतोस, त्याच्यापूर्वी तुला हा विचार नको का करायला? कीं वडिलांचं मन न दुखविणं, त्यांची आज्ञा पाळणं हें आपलं कर्तव्य आहे कीं नाहीं? कीं जें आपल्या मनास वाटेल तें करावं; मग त्यांत कोणाचें मन दुखो, न दुखो त्याचा कांहीं विचार नाहीं असं ह्मणून वाटेल तसं वर्तन करावं? मला तर वाटतं हा विचार आपण मंडळी करीत नाहीं. आणि अद्वातद्वा वर्तनाला सुरुवात करतों. ह्मणूनच हे असे विलक्षण प्रकार होतात."

"तुम्हीं ज्याला अद्वातद्वा वर्तन ह्मणतां, त्या वर्तनाला तसं ह्मणण्याला तुह्मांला अधिकार काय बरं? तुमच्या मनाजोगतं जें वर्तन नाहीं, तें सगळं अद्वातद्वा वर्तन काय? कर्तव्यं जरी

अनेक प्रकारचीं असलीं तरी त्यांत कमी–अधिक योग्यता असतेच कीं नाहीं? आणि जर कर्तव्यांत श्रेष्ठकनिष्ठपणा आहे, तर मग कोणतं आधीं करायचं आणि कोणतं न केलं तरी चालेल हाही विचार आलाच. जें कर्तव्य केल्यापासून एखादं खरं सत्कार्य प्रारंभल्याचं किंवा लोकांनीं आरंभलं आहे त्यास हातभार लावल्याचं श्रेय व समाधान मिळतं, तें इतर कर्तव्यापेक्षां अधिक श्रेष्ठ व इष्ट होय अशी माझी समजूत आहे. शिवाय सत्याला धरून राहिल्याकारणानं काय वाटेल तें जरी झालं, तरी हरकत नाहीं. त्याचे परिणाम आपण सोसले पाहिजेत हाही एक विचार आहेच. सर्वच जेथें वादग्रस्त तेथें आपण अमुकच करावं आणि अमुक करूं नये असं सांगण्याचा अधिकार घ्यावा कोणीं? पण राहूं या. हे असले वाद करीत बसण्याला मला सध्यां वेळ नाहीं. पुनः केव्हां तरी आपण बसलों, म्हणजे मग वाद करूं."

असें बोलून पद्माकरानें तें भाषण तितकेंच ठेवलें. वादविवाद करण्याच्या मनोवृत्तींत तो त्या वेळीं नव्हता. त्याला आपल्या मित्राशीं हितगुज करण्याची व त्याचा एकट्याचा विचार घेण्याची इच्छा होती. परंतु त्या तिसऱ्या गृहस्थाच्या येण्यानें तें एकीकडेच राहिलें. तेव्हां तो उठला. प्रभाकरास त्यानें आपल्याबरोबर बाहेर जाण्याविषयीं आग्रह केला. प्रभाकर त्याचा हेतु समजला. याच्या मनांत आपल्याला बाहेर घेऊन जाऊन कोठेंतरी आणखी कांहीं बोलावयाचें आहे हें त्याच्या ध्यानांत आलें, व तोही त्याच्याबरोबर बाहेर जाण्यास निघाला.

पद्माकरास अशी इच्छा झाली कीं समुद्रकांठीं जाऊन तेथील सुंदर देखावा पहात व मजेचा वारा खात आपल्या जिवलग मित्राजवळ आपलें अंतःकरण उघड करावें. आपले अंतस्थ हेतु त्याला एकवार सांगावे. आणि त्याचेकडून बळवंतरावाचें उत्तर लवकर व आपल्याला इष्ट असें येईल असें करावें. या हेतूनें तो त्यास घेऊन चालला. ते समुद्रावर जाऊन पोहोंचले. ती वेळ फार मौजेची होती. क्षितिजाकडे सूर्य खालीं जाऊन पुष्कळच वेळ झाला होता. परंतु अद्यापि थोडासा संधिप्रकाश दिसत होता. आणि त्या प्रकाशापासून वरच्या बाजून थोडथोडे तारे दिसूं लागले होते. संध्याकाळीं हिंडण्यासाठीं आलेली मंडळी आतां घरोघर जाऊं लागली होती व कांहीं केवळ स्वस्थपणानें बसण्यासाठींच म्हणून आली होती अशीच तेथें अंतराअंतरावर असणाऱ्या बांकांवर बसून मौजेनें गोष्टी सांगत होती. हे दोघेही एका बांकावर जाऊन बसले. पद्माकराचें अंतःकरण विचारांनीं अगदीं ओथंबल्याप्रमाणें झालें होतें व तें आपल्या मित्राच्या अंतःकरणांत केव्हां एकदां ओतूं असें त्याला होऊन गेलें होतें. ते दोघेही बसले. पद्माकर आता आपल्या मित्रास कांहीं बोलणार.

परंतु तें बोलणें झालें नाहीं. कारण—कारण पुढें कळेल.

---

# प्रकरण १५ वें.

## कारण.



पद्माकर व प्रभाकर मागील प्रकरणांत सांगितल्यावेळीं व सांगितल्याप्रमाणें हितगुज करण्यासाठीं म्हणून चसले. पद्माकर आपले विचार जणूं काय सुव्यवस्थित करण्यांत गुंतला होता. प्रभाकर त्याचे ते विचार किंवा त्याचें काय बोलणें होईल तें ऐकण्यासाठीं अगदीं एकाग्र करावें म्हणून आकाशांत नुकत्याच किंचित् किंचित् दिसूं लागणाऱ्या ताऱ्यांकडे पाहात होता. इतक्यांत त्याचें लक्ष्य खालीं दगडांकडे व पलीकडे वाळवंटीकडे गेलें ह्मणण्यापेक्षां आपले कपडे उतरून ठेवून पाण्याकडे जाणाऱ्या एका इसमाकडे गेलें. वर सांगितलेंच आहे कीं, ज्याकुचेवर ज्या बाजूला हे गेले होते तिकडून मनुष्यांची वाग कमी कमी होत चालली होती. आधीं त्या बाजूस वाग फार नव्हती, म्हणूनच पद्माकरानें आपलीं पावलें तिकडे वळविलीं होतीं, आणि त्यांत आतां वेळ इतकी झाली होती कीं, साधारणतः तुरळक तुरळक माणसेंच तिकडच्या बाजूला असावयाचीं. शिवाय ती वेळ कांहीं स्नानाचीही नव्हे. अशा वेळीं हा इसम कपडे उतरून ठेवून समुद्राकडे कशाला जात असावा? असा प्रश्न प्रभाकराच्या मनांत एकदम उभा राहिला. समुद्रास त्या वेळीं भरती येत होती. दूर लाटेस वीत अर्धी वीत तरी पाणी वर येत होतें. आतांच्या लाटेनें जेथपर्यंत पाणी आणलें व आपण आल्याची खूण ठेवली, त्याच्या वरच्या बाजूस दुसऱ्या लाटेनें धांव घेतली व दोन अंगुळें वर अशी खूण ठेविली. असा प्रकार चालला होता. मध्येंच एखादी लाट अशी मोठी येई कीं, ती वीत दीड वीत नव्हे चार हात वर पाणी आणून मोडी. जणूं काय मनुष्यांचें नशीच चढतीवर असलें, म्हणजे त्याची भरभराट कशा तऱ्हेनें होत असते, याचें उदाहरणच त्या लाटा त्या वेळीं स्पष्टपणें दाखवून देत होत्या. परंतु प्रभाकराच्या मनास या वेळीं त्या भरतीपासून हा धडा दिसत नव्हता. त्याचें सर्व लक्ष्य त्या कपडे उतरून पाण्याकडे जाणाऱ्या इसमाकडे होतें. तो इसम कपडे काढून ठेवून उघडा होऊन पाण्याकडे गेला कां? हा विचार त्याच्या मनांत आला. त्याचे कपडे कोण्या प्रकारचे होते, हें अगदीं स्पष्टपणें दिसण्याइतका उजेड त्या वेळीं नव्हता व प्रभाकरांत व त्याच्यांत तितकें थोडें अंतरही नव्हतें. तथापि हा आपल्या ब्राह्मण, परभू, किंवा गुजराथी अशा इसमांपैकींच असावा अशी त्याच्या मनास खात्री वाटली. ही वेळ तर स्नानाची नव्हे. दिवसही असा नव्हे कीं, जे दिवशीं संध्याकाळीं भाविक लोक

स्नान करतील. मग हा या वेळीं असे कपडे उतरून काय ह्मणून पाण्याकडे जात असावा? असा आपल्याशीं विचार चालला असतां प्रभाकरास कांहीं एक चमत्कारिक कल्पना सुचली आणि तो त्या कल्पनेच्या आवेशांत एकदम उठून उभा राहून आपले विचार सुव्यवस्थित करून आतां कायतें बोलण्याच्या बेतांत आलेल्या अशा आपल्या मित्राच्या पाठीवर थाप मारून ह्मणतोः--"पद्माकर, बघ, समोर बघ. ह्या कपडे उतरून ठेवून पाण्याकडे जाणाऱ्या इसमाचें लक्षण बरोबर दिसत नाहीं. मला अगदीं विपरीत कल्पना येते आहे. मला वाटतें आपण खालीं उतरून त्याच्याजवळ जाऊन त्याला हटकून अशा वेळीं स्नानाला काय म्हणून चालला आहेस असें विचारावें. मला यांत कांहीं तरी फार विलक्षण प्रकार दिसतो आहे. चल आपण पाहूं." पद्माकराच्या मनाची वृत्ति या वेळीं दुसऱ्याच्या पंचाइती करण्यांत गुंतावें अशी मुळींच नव्हती. त्यानें प्रभाकरास ह्मटलेंः- "असेल आज उपास वगैरे कांहीं म्हणून समुद्रस्नान करीत असेल. त्यांत विपरीत कल्पना मनांत यायचं काय कारण? कोणी शनिवार, कोणी गुरुवार, मंगळवार असे करून संध्याकाळीं स्नानासाठीं पुष्कळ मंडळी येतात, त्यांतलाच तोही गृहस्थ असेल. दुसरें काय? करीना बिचारा स्नान! सावकाशपणें करूं दे."

समुद्राच्या पाण्याकडे जाणाऱ्या त्या मनुष्याचें लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं अशी प्रभाकराच्या मनास पक्की खात्री वाटली. प्रभाकरास वाटलें कीं, हा मनुष्य स्नानासाठीं जात नाहीं. बहुतकरून जलसमाधि घेऊन या संसाराचा पुरा निरोप घेण्यासाठीं जात असावा. हा कांहीं कारणानें आपल्या जिवास कंटाळला असावा आणि आतां जगण्यापेक्षां 'समुद्रास्पृष्यंतुच करून घेणें चांगलें असें त्याच्या मनानें घेतलें असावें.' असें वाटण्यास कारणें तरी काय, असें जर प्रभाकरास त्या वेळीं कोणीं विचारिलें असतें, तर त्याला तीं सांगतां आलीं नसतीं, किंबहुना आपल्या मनाशीं जरी त्यानें तीं कारणें काय याबद्दल विचार केला असता, तरीसुद्धां त्यास आपल्या मनाचें समाधान होण्याजोगीं उत्तरें देतां आलीं नसतीं. पण एवढें त्याच्या मनोदेवतेस वाटलें खरें कीं, हा माणूस सहजीं स्नानासाठीं म्हणून समुद्राकडे धांव घेत नाहीं, तर तो या जगाच्या त्रासापासून मुक्त होऊन समुद्राचे अंतर्यामीं शांति मिळेल या आशेनें त्याकडे धांव घेत आहे. असें एकदां मनास वाटल्यावर मग काय, त्यानें पद्माकरास स्पष्टपणें असें ह्मटलें कीं, "तो तुझ्या ह्मणण्याप्रमाणें सहज स्नानाला जात असो कीं कसा असो, मला तर असें वाटतें कीं, आपण जाऊन त्याला हटकून विचारावें. ही वेळ नुसता वादविवाद करीत बसण्याची नव्हे. जर माझ्या तर्काप्रमाणेंच असेल, तर आपण त्याला वांचवणें अगदीं जरूर आहे. आणखी मी आतां खालीं जाऊन तो कोण काय हें पाहतों."

असें म्हणून प्रभाकर समुद्राचे बाजूस खालीं उतरूं लागला. पद्माकराच्यानें तरी मग कसलें बसवतें! तोही उठून त्याच्या मागोमाग चालला. ते प्रथम त्या इसमाच्या कपड्यांजवळ गेले. कपड्यांवरून तर त्यांस असें दिसलेंच कीं, हा कोणी

तरी ब्राह्मण किंवा परभू, सोनार अशांपैकीं असावा. टोपी, पारशी तऱ्हेचा कोट, एक काठी, चढाव–स्लिपर हीं सर्व तेथें होतीं; परंतु कपड्यांची अधिक तपासणी करीत बसण्याची ती वेळ नव्हती. तो मनुष्य पाणी जिकडे चाललें होतें तिकडे जाऊन पोंचण्याच्या बेतांत आला होता. प्रभाकर पळत सुटला आणि सुमारें मिनिट दीड मिनिटांत त्या मनुष्याच्या अगदीं जवळ उभा राहिला. परंतु त्या मनुष्यास तें समजलें नाहीं. इतकें त्याचें मन अगदीं व्यग्र होऊन गेलें होतें किंवा विचारांत मग्न होतें. प्रभाकर अगदीं त्याच्यामागें त्याच्याजवळ जाऊन उभा राहतो न राहतो, तों पाठोपाठ पद्माकरही तेथें आला. दोन माणसांची चाहूल झाली, तरीसुद्धां त्या गृहस्थास समजलें नाहीं. त्याचें तोंड समुद्राकडे होतें. तेथील वाऱ्यामुळें म्हणा किंवा अंतःकरणांतील कांहीं विचारांमुळें म्हणा, त्याचें सर्व शरीर थरथर करीत होतें.

प्रभाकर व पद्माकर या दोघांचीही त्याच्याकडे पाहून अशी खात्री झाली कीं, हा सहजीं किंवा नैमित्तिक स्नानाकरितां आलेला माणूस नव्हे. त्याचा चेहरा त्या दोघांस अजून दिसला नव्हता. परंतु त्याच्या एकंदर बांध्यावरून व ठेवणीवरून असें स्पष्ट दिसून आलें कीं, तो आपल्याच वयाचा तरुण व सुदृढ माणूस असून गोऱ्या वर्णाचा असावा. ते अगदीं स्वस्थ उभे राहिले. हा काय करतो हें पाहाण्याची त्यांची इच्छा होती. जर आपल्या तर्काप्रमाणें त्यानें समुद्रांत उडी घालण्याचा प्रयत्न केलाच, तर त्यास मागें ओढावयाचें असा त्यांचा निश्चय. त्यांनीं आपले हात जणूं काय पुढें केलेच होते; परंतु तो काय बोलतो, करतो, तें पाहाणें होतें. त्या गृहस्थानें हात जोडले व आपल्याशींच तो कांहीं पुटपुटला. त्याचें सर्वांग शिरारल्याप्रमाणें थरथर कांपत होतेंच. एकवार आकाशाकडे पाहिलें, पुनः पाण्याकडे पाहिलें आणि तो पाण्यांत शिरला. बरेंचसें पाणी जेथें असेल तेथें जाऊन पाण्यांत पडावें असा त्याचा विचार झाला असावा. हेहीं दोघे आपलीं धोतरें वर करून त्याच्या मागोमाग चालले. यांच्या चालण्यानें वास्तविक त्यास आपल्या मागून कोणी तरी येत आहे असें समजावयाला पाहिजे होतें. परंतु त्याची पूर्ण तंद्री लागलेली. जों जों खोल खोल पाण्यांत तो जाऊं लागला तों तों यांच्या मनाची खात्री झाली कीं, हा आपण तर्क केला त्याचप्रमाणें जात असतां. यांना आपलें धोतर वर वर करीत जावें लागलें. शेवटीं त्यांनीं कांचा घातला. कमरेइतक्या पाण्यांत तो गेला. येणाऱ्या लाटांनीं यांचे कपडे भिजले, त्याचें अंग भिजलें. या दोघांस पोहायला उत्तमपणें येत होतें; परंतु कपड्यांची अडचण होईल हें जाणून त्यांनीं आतां येथूनच त्यास परतवायचें असा निश्चय केला. इतक्यांत त्याचा निश्चय होऊन तोही अंग लोटून देणार तों दोघांनीं दोन दंड धरून त्यास मागें ओढलें. तो घाबरून किंवा आश्चर्यचकित होऊन त्यांचेकडे पाहूं लागला. त्याचा चेहरा अगदीं अश्रुमलिन झाला होता. त्यावर चमत्कारिक कळा दिसूं लागली होती. त्यांनीं त्यास पकडून मागें ओढण्याबरोबर तो घाबरला. त्याचे तोंडून शब्द निघेना. यांनींही त्यास मुळींच प्रश्न न विचारतां मागें आणलें. केवळ एखादी जड वस्तु ज्याप्रमाणें दोन माणसांनीं ओढून आणावी, त्याप्रमाणें त्यास त्यांनीं

परत आणलें. त्याला बोलण्याची इच्छा होती किंवा नाहीं हें कांहींच सांगतां येत नाहीं, परंतु त्याच्या तोंडून एकही शब्द निघेना. त्यांनीं त्यास परत आणलें आणि ज्या दगडावर त्याचे कपडे ठेवले होते त्या दगडावर आणून बसविलें. तो अगदीं निर्जीव वस्तुप्रमाणें ज्यावर त्यास बसविलें, त्या धोंड्याप्रमाणें तेथें बसला, व एकदां एकाकडे, एकदां दुसऱ्याकडे असें पाहात राहिला. यांनीं आपले कपडे काढून पिळले, धोतरें पिळलीं आणि त्यासही आपलें धोतर पिळण्याविषयीं विनंति केली. त्यास दुसरें तिसरें कांहीं या वेळीं विचारण्याची सोयच नव्हती आणि विचारण्याची ती वेळ नव्हती. जसें एखादें पाळीव जनावर आपल्या मालकानें केलेला हुकूम बिनतक्रार नेहमीच पाळतें, त्याप्रमाणेंच त्याचें वर्तन होतें. प्रभाकरानें हात धरून त्यास उठविल्याबरोबर तो उठला. हूं कीं चूं सुद्धां त्यानें केलें नाहीं. आपलें धोतर पिळलें, प्रभाकरानें त्यास त्याचेंच उपरणें देऊन तें नेसण्यास सांगितलें; तो नेसला. नंतर प्रभाकरानें त्यास आपले कपडे चढविण्याबद्दल सांगितलें व लागलीच त्याचे कपडे उचललेही. त्यानें ते अंगांत चढविले आणि त्यांनीं आपल्याबरोबर चलण्याविषयीं सांगतांच तो एखाद्या पाळीव कुत्र्याप्रमाणें त्यांचेबरोबर जाण्यास निघाला.

प्रभाकरानें एक दिवसपर्यंत, त्यास कांहींमुद्धां विचारावयाचें नाहीं असा निश्चय केला होता. तो फार दूरदर्शी होता. आपल्या तर्काप्रमाणेंच हा आपला प्राण देण्यासाठीं जात होता, याबद्दल शंका नाहीं, हें त्यास अगदीं स्पष्ट दिसून आलें, आणि सध्या त्याच्या मनाची स्थिति प्रश्न विचारण्याची नव्हे हेंही त्यानें जाणलें. त्याचें मन अतिशय क्षुब्ध झालें असलें पाहिजे, किंवा पहिल्या क्षुब्धतेच्या अतिरेकामुळें पाठीमागून येणारी निश्चलता त्यास आली असली पाहिजे हें स्पष्ट दिसलें आणि म्हणूनच त्यांनीं त्यास प्रश्न विचारले नाहींत व तोही त्यांस कांहीं बोलला नाहीं. मुकाट्यानें ते तेथील तिकडे चालला होता. पद्माकर व प्रभाकर दोघे दोहों बाजूंस व तो मध्यें असे ते चालले. तिघांपैकीं कोणीही कांहीं बोलत नव्हते. ते आपल्या राहण्याच्या जागेकडे गेले. तेथें गेल्यावर सर्वांनीं आपापले ओले कपडे काढून ठेवून दुसरे कपडे घातले. नंतर तो गृहस्थ तेथें बसला. पद्माकरानें आपल्या हातानें आपल्या स्टो–वर ( लोखंडी चुलीवर ) चहा करून तो गरम असा त्यास पिण्यास दिला. त्यानें मुकाट्यानें तो घेतला व तो तसाच स्तब्ध बसला. एक शब्दही बोलेना. रात्रीं जेवणाचे वेळीं जेवण होऊन पुनः येऊन त्यांचे खोलींत बसला. त्या दोघांपैकीं एकानेंही त्यास प्रश्न विचारला नाहीं. अंथरूण घालून देऊन स्वस्थ निजण्यास सांगितलें. तोही पडून राहिला. त्यास झोंप लागली किंवा नाहीं हें समजणें शक्य नव्हतें. कारण तो अगदीं निश्चेष्ट पडला होता. मग त्याचें मन विलक्षण दुर्बळ व विचारहीन झालें असल्यामुळें तसें असो, किंवा आपण काय करीत होतों आणि काय झालें, असें मनांत येऊन तो विचारमग्न होऊन पडला असो. पद्माकर व प्रभाकर यांनीं त्यास यत्किंचितही त्रास होऊं नये म्हणून ते आपण होऊन आपल्या दुसऱ्या स्नेह्यांच्या खोलींत गेले. रात्रीं झोंप लागून त्याचें चित्त स्वस्थ झालें म्हणजे मग आपण स्वस्थ व साव-

काशपणें त्याला विचारून त्याची हकीकत ऐकून घेऊं असें त्यांनीं मनांत आणलें; परंतु त्यांच्या इच्छेप्रमाणें घडणें नव्हतें. तो गृहस्थ साऱ्या रात्र अगदीं निश्चेष्ट पडला होता तरी पहाटेच्या प्रहरीं कण्हूं लागला. प्रभाकरानें तें ऐकलें व तो असें कां करतो हें पाहण्यासाठीं त्याचेजवळ गेला. अंगास हात लावून पाहातो तों मनस्वी ताप, आणि डोळ्यांतून एकसारखे अश्रु वाहात होते. कांहीं तरी जबरदस्त मानसिक व्यथेमुळें या गृहस्थास हा ज्वर चढला असावा, अशी त्यांच्या मनाची खात्री झाली. न जाणों आपण परक्या ठिकाणीं असें पडलों, इच्छेप्रमाणें करायला सांपडलें नाहीं, उलट तापाच्या फेऱ्यांत पडून दुसऱ्याला त्रास उत्पन्न केला असें वाटून कदाचित् तो कष्टी होऊन अश्रु ढाळीत असेल, असें मनांत येऊन पद्माकर त्यास म्हणतो, "आपण येथें आजारी पडलां म्हणून आपण मुळींसुद्धां काळजी करूं नका. घरच्या माणसांत असल्याप्रमाणें आहां असें समजा. आपण आपल्या प्राणावर कां उदार झालां, हें मी विचारीत नाहीं किंवा माझा स्नेही प्रभाकरही विचारणार नाहीं. कोठें कोणाला पत्र पाठवायचें असलें, तर मला नांव गांव पत्ता कळवा. मी पत्र पाठवून आपलें कुशल कळवतों, कोणाला इकडे बोलवायचें असलें तर मी बोलावतों;" असें त्यानें पुष्कळ सांगितलें, परंतु त्या गृहस्थानें एक चकार शब्दही उत्तर दिलें नाहीं. केवळ कृतज्ञतापूर्ण दृष्टीनें याच्याकडे त्यानें वारंवार पाहिलें. यापलीकडे कांहींसुद्धां नाहीं. प्रभाकरानेंही त्यास पुढें कांहीं विचारलें नाहीं. ताप फार वाढत चालला तेव्हां मुकाट्यानें डॉक्टर आणून प्रकृति दाखवून औषध सुरू केलें. तापाचें नांव तीन दिवसपर्यंत ठेवतां येईना. परंतु पुढें तो मुदतीचा असें खास ठरलें. मात्र यांत कांहींसुद्धां भिण्याचें कारण नाहीं असें डॉक्टरांनीं पद्माकर व प्रभाकर यांस सांगितलें.

परकी मनुष्य, आपण विलक्षण स्थितींतून सोडवून आणला आणि त्यास असा ताप आला, याबद्दल दोघांसही फार वाईट वाटलें. परंतु शेवटपर्यंत त्याची शुश्रूषा करून त्यास चंगें करावयाचें असा त्यांनीं निश्चय केला आणि त्याप्रमाणें मनोभावानें त्याची त्यांनीं काळजी घेतली. इतर मित्रमंडळींनें हा गृहस्थ कोण, कुठला, असें विचारलें, तर आमचा एक स्नेही आहे असें सांगून वेळ मारून नेण्याचा त्यांनीं क्रम चालविला आणि त्याची जी त्यांनीं विलक्षण शुश्रूषा चालविली होती, यावरून सर्वत्रांस तें अगदीं खरें वाटलें. तीन, चार, पांच, सहा एकापाठीमागून एक याप्रमाणें दिवस चालले. तुमच्या कोणा माणसाला कोठून बोलवायचें आहे काय असें विचारिलें, तर तो कांहीं केल्या उत्तर देत नसे. नुसतें उसासे टाकी. शेवटीं त्यांनीं तो प्रश्न विचारण्याचेंच सोडून दिलें आणि खटपट मात्र पहिल्यापासून एकसारखी चालू ठेविली. होतां होतां अकरावे दिवशीं रात्रीं त्याचा ताप उतरला. त्यास घाम सडकून आला आणि दुसरे दिवशीं सकाळीं त्याचे तोंडावर निराळा रंग दिसूं लागला आणि एकदां ताप हटण्यास सुरुवात होतांच एक दिवसांत ताप नाहींसा झाला. तेरावे दिवसास तो अगदीं मोकळा झाला. पुढें सुमारें आठ दिवस त्यास शक्ति येण्यास लागले, परंतु इतक्या अवकाशांत पद्माकर किंवा प्रभाकर या दोघांपैकीं को-

णींही त्यास त्याच्या गृहस्थितीबद्दल प्रश्न ह्मणून विचारला नाहीं. सुमारें तेविसावे दिवशीं तो आपण होऊन प्रभाकराजवळ आला. प्रभाकर त्या वेळीं एकटाच होता. पद्माकर कोठें बाहेर गेला होता. तो प्रभाकराजवळ जाऊन उभा राहिला. खुर्चीच्या पाठीवर त्यानें हात ठेवला, त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले होते. त्याची छाती भरून आली होती. बोलण्यासाठीं त्याचा प्रयत्न चालला होता असें स्पष्ट दिसलें. परंतु त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडेना. तो स्तब्ध उभा राहिला. प्रभाकर त्याच्याकडे व तो त्याच्याकडे असे दोघेही पाहात राहिले. शेवटीं तो सद्गदित वाणीनें त्यास ह्मणतो......

परंतु ती हकीकत पुढें देऊं. सध्या आपण मध्यंतरीं गणपतरावांची काय हकीकत झाली, तें पाहूं.

---

# प्रकरण १६ वें.

## गणपतरावाचे विचार.



**गणपतरावानें** तें पत्र शांतपणें वाचलें.--शांतपणें ह्मटलें खरें, परंतु हा या शब्दाचा उपयोग येथें चुकीचा झाला ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. पत्र वाचतांना गणपतरावाच्या तोंडून आश्चर्यानें उद्गार निघतच होते. दोन चार ओळी वाचल्याबरोबर तो एखादा उद्गार काढी, बळवंतरावास कांहीं प्रश्न विचारी, त्याचें उत्तर पुरतेपणें आलें न आलें तरी पुढें दोन चार ओळी वाची, पुनः कांहीं तरी उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडे आणि पुनः तो कांहीं तरी प्रश्न विचारी. त्या प्रश्नांच्या उत्तरांची अपेक्षा त्यास असेच असें नाहीं. करितां त्यानें तें पत्र संपविलें आणि शेवटीं अर्धवट आपल्याशीं व अर्धवट बळवंतरावास उद्देशून तो म्हणतो, "बळवंतराव, अलीकडे अलीकडे माझ्या मनाला एक प्रकारची निराशा उत्पन्न होते कीं काय, असें भय वाटूं लागलें आहे, तें या अशा पत्रांनीं बरेंच कमी होतें. मला आतांशा असें वाटतें कीं, आमच्या तारुण्यांत आम्ही ज्या जोरानें वागलों तो जोर आजच्या तरुण मंडळींत नाहीं, आणखी तो उत्साहही पण नाहीं. इतकेंच नव्हे पण अमुक एक विचार ठाम धरून त्याच्याकरितां आपल्यावर काय वाटेल तें संकट आलें, तरी तें सोसून आपला विचार कायम करायचा, त्याचा उच्चार करून लोकांचीं मनं आपल्याकडे वळवून घ्यायचीं, जसा विचार, जसा उच्चार, तसाच आचार करायचा, मग त्याच्या पायीं काय वाटेल तें होवो, अशा तत्वाचीं आणखी

त्या तत्त्वाप्रमाणें वर्तन करणारीं माणसं–सध्याच्या तरुण पिढींत तरी निदान नाहींत अशी आपली माझी समजूत होत चालली आहे. पण हें पत्र वाचून थोडीबहुत तरी आशा वाटते कीं, अगदींच सगळं साहारा अरण्य झालेलं नाहीं. कुठें तरी रम्यारण्य आहे. पण बळवंतराव, तुझ्या पोरीचं लग्न लावून देऊन तिला एकदां कोणाची तरी गुलाम करण्याची तुला घाई काय झाली आहे ? नाहीं झालं तिचं लग्न, तर काय होतं ! अशा बुद्धीची, अशी हुशार, उद्योगी, सुंदर पोरगी कोणाच्या तरी गळ्यांत बांधून देण्यापेक्षां तिच्या हातून कांहीं तरी विशेष करवीन अशी महत्वाकांक्षा तूं कां धरीत नाहींस ? तशी अगदीं साधारण, रूप नाहीं, रंग नाहीं, बुद्धि नाहीं, शहाणपण नाहीं, अशी जर पोरगी असती, तर एक असो बोआ, हिचा जन्म कसा जावा ! जन्मभर आपल्याजवळ कशी राहावी ? हें असं मनांत येऊन कशीना कशी तरी उजवून टाकायची असं ह्मटलं असतंस तर शोभलं असतं. पण हें रे काय ? हें रत्न–याची किंमत किती विलक्षण ! असं असून तें कोणाच्याना कोणाच्या गळ्यांत घालून देऊन खुशाल अंधारांत पडून राहूं द्यायला मदत करायची ? एः ! तुला तितकं धैर्य नसलं, तर माझ्याबरोबर तिला मी नेतों. पण हें असलं उपयोगी नाहीं. तिला आपण डाक्तरीण करूं. तुला खर्चाची अडचण वाटत असली, तर ती दूर करणं माझ्याकडे लागलं; पण हें असलं वेड्यासारखं करूं नको बोआ. ज्या गृहस्थाचं पत्र आलं आहे, तो अगदीं उत्तम असेल, मी नाहीं ह्मणत नाहीं; परंतु एकदां लग्न करून टाकण्यांत आणखी संसार सुरू करण्यांत काय अर्थ आहे ? अशा या गोष्टी आतां तुह्मी आह्मी नाहीं साधायच्या तर कोणी साधायच्या ? या पत्रावरून मला दिसतं आहे कीं, या गृहस्थाच्या अंगीं कांहीं तरी पाणी आहे, पण तेवढं पाणी असून उपयोग काय ? करील, आपल्या इच्छेप्रमाणें लग्न करील. पण लग्न करून कुठें तरी पांचपन्नास रुपयांची नोकरी धरून आपलनू आपल्या बायकोचं पोट भरायचं, एवढाच का पुरुषार्थ साधायचा ? का आणखी कांहीं करायला पाहिजे आहे ? तूं या पोरीच्या लग्नाचा विचार इतक्या पल्ल्यापर्यंत आणून पोहोंचवला आहेस, असं जर मला याच्यापूर्वीं कळलं असतं, तर मी याच्यापूर्वीं केव्हांच इथें येऊन गेलों असतों, मला हें अगदींच ठाऊक नाहीं. द्वारकाताईचं पत्र आलं थोडे दिवसांपूर्वीं, त्या पत्रांत हा मजकूर होता, आणखी तो मला सांगितला तेव्हां मला वाटलं कीं, आपण अगदीं आतुरतेनें आणखी उत्कंठेनें वरशोधनाचं काम चालवलं आहे ! काय आश्चर्य आहे बोआ ! तुझ्यासारख्या माणसांनीं असा विचार करायचा, दुसरा कांहीं विचार करायचा नाहीं याचा अर्थ काय ? अगदीं आतां पोरीचं लग्न करून टाकलं, ह्मणजे तुम्हांला ही मंडळी–जुनी मंडळी मोठा शुचिर्भूत ब्राह्मण झाला, आतां याला परत घेऊन पंक्तिपावन करा असं म्हणतील नाहीं ? अगदीं सुद्धां मनांत गोष्ट आणूं नकोस. आणखी वेड्यासारखं कांहीं करूंही नकोस. आतां आपल्याला जितक्या गोष्टी करणं शक्य असतील, तितक्या केल्या पाहिजेत. कोणाची सुद्धां आतां भीति मनांत धरण्याचं कारण नाहीं. आणखी तशी भीति धरण्याचं

कारण नाहीं, म्हणूनच आपल्या हातून कांहीं झालं तर होईल, नाहीं तर कांहीं होणार नाहीं. तूं भलतेच विचार आणखी भलत्याच आशा मनांत धरून विनाकारण आलेली संधि वांया जाऊं देऊं नकोस. त्याचा नेम आहे, कीं हा मुलगा अगदीं मोठा दृढनिश्चयी निघेल ? पोरीला कोणाच्या तरी गळ्यांत आतांच बांधणं ह्मणजे तिच्या जन्माचं नुकसान करणं आहे. तिच्या हातून खरोखर किती तरी गोष्टी होण्याजोग्या आहेत. परंतु तुम्ही दोघांनीं तिला अशी बांधून टाकलीत, तर तिचा जन्म व्यर्थ घालविलात. तिच्या बुद्धीची, हुषारीची, चातुर्याची आणखी मेहनतीपणाची अगदीं माती केलीत असंच मला म्हणावं लागेल. या पत्रावरून मला हे विचार सुचले असं नाहीं. या पत्र लिहिणाराची माहिती मला मुळींच नाहीं, पण संसारांत पडलं कीं, मग इतर महत्त्वाकांक्षा अगदीं एकीकडे ठेवणं भागच होतं."

चर्येवर स्मित शोभून बळवंतराव अगदीं शांतपणें गणपतरावाचें भाषण ऐकून घेत होता. त्यानें मध्यंतरीं एक चकारशब्दसुद्धां उच्चारला नाहीं, किंवा गणपतरावानें बोलूं नये अशाबद्दल यत्नही केला नाहीं. त्याचें बोलणें त्यानें स्वतःच जेव्हां थांबविलें, तेव्हां बळवंतरावांच्या चर्येवरलें स्मित बरेंच अधिक झालें आणि मग तो गणपतरावास म्हणतो, "गणपतराव, मला जर कोणीं असं म्हटलं, कीं माणसांचा स्वभाव वयाच्या मानानें बदलतो; त्याची गडबड असते ती कमी होते, उतावळेपणा असेल तो कमी होऊन शांतपणा येतो, तर मी त्याला असं सांगेन, कीं महाराज, तुमच्या सगळ्या या सिद्धांताला हरताळ लावायला माझ्याजवळ फार उत्कृष्ट उदाहरण आहे. आणखी कुठं आहे तें उदाहरण असं विचारलं, तर तुला पुढें करीन. या उदाहरणानं त्यांनीं आपला सिद्धांत बदललाच पाहिजे. त्यांनीं नाहीं बदलला, तर ते हटवादी म्हणूनच सोडून दिले पाहिजेत. तुला नुसतं पत्र वाचायला दिलं, तें तूं वाचलंस, तेवढ्यावरून आम्हांला एवढं जें लांबलचक व्याख्यान दिलंस, त्याचा हेतु तरी काय ? बरं, आमचा काय विचार आहे ? तो विचार तसा कां आहे ? त्याच्याखेरीज दुसरे कांहीं विचार आमच्या मनांत आले होते कीं नाहीं ? याबद्दल विचारपूस तरी करायची ? का आपल्या कल्पनेचाच श्यामकर्ण करून त्याच्या पाठीवर आरूढ होऊन तो भरधांव काढायचा ? आणखी एक अर्धा किंवा पाऊण तास जरी तुम्ही बोलत राहिलां असतां, तरी आम्ही अगदीं स्वस्थ बसून खुशाल तुमचं बोलणं ऐकून घेतलं असतं. मौजेचं भाषण कोण ऐकून घेणार नाहीं ? आणखी कांहीं बोलायचं असलं, तरीसुद्धां चालूं द्या. पुष्कळदां माणसाला असं होतं कीं, बोलतच रहावं. दुसऱ्याला बोलायला सवडच देऊं नये. त्यांतलाच झटका आज बऱ्याच वर्षांनीं आलेला दिसतोय् राव. चालूं द्या. आज किती वर्षांनीं आपलं व्याख्यान ऐकायला सांपडतं आहे ! वाईट एवढंच वाटतं आहे, कीं आपली ती बाकीची मंडळी आज इथं नाहींत. तो जुना मेळ आतां कोणीकडच्या कोणीकडे गेला ! जवळ जवळ पंधरा वीस वर्षं होत आलीं नव्हे ?"

"ह्मणजे ?" गणपतराव एकदम त्याच्याकडे वळून ह्मणतो, "एकूण माझं हें सगळं बोलणं नुसतं व्याख्यानासारखंच धरून चालतोस कीं काय तूं ! तुम्हांला

सगळ्यांना ती संवयच पडून गेलेली आहे कीं, माझं बोलणं ह्मणजे उगीच वायफळ समजायचं ? "

"ह्मणतो कोण नाहीं ह्मणून ? बळवंतराव एकदम मोठ्यानें हंसून त्यास ह्मणाला. गणपतराव त्या थट्टेच्या उत्तरानें किंचित् त्रासल्याप्रमाणें झाला व लागलीच आपल्या मित्रास ह्मणतो, "तें तूं कांहीं जरी ह्मणालास तरी पोरीच्या लग्नाची घाई करण्याचा हा तुझा विचार अगदीं गैर आहे असं मला तर पक्कं वाटतं. याउपर तुझा तूं मुखत्यार आहेसच. पण आह्मांला जें वाटतं, तें सांगितल्या-खेरीज आमच्यानं राहवत नाहीं." गणपतरावाच्या बोलण्याचा स्वर बदलला. तो फारच मनःपूर्वक बोलत असतां आपण चेष्टा केली ह्मणून त्यास वाईट वाटलें आणि त्यामुळें तो आतां असें बोलूं लागला हें पाहून बळवंतरावानें आपलें हंसूं दाबून धरलें. चेष्टेचा स्वर बदलला. आणि गणपतरावास ह्मटलें, "गणपतराव, तूंच विचार कर. अमुक एक गोष्ट करायची असं आमचं ठरलं, असं तुला मी सांगितलं नाहीं. तुझा विचार घ्यायचा, ह्मणून मी तुझ्या येण्याची वाट पाहात होतों. ज्या कित्येक गोष्टी तुला सांगायच्या संवरायच्या, किंवा दाखवायच्या त्यांतलं हें एक पत्र तुला दाखवलं. अजून कांहीं तिथिनिश्चय झाला नाहीं. वाङ्निश्चय झाला नाहीं, कांहीं सुद्धां नाहीं. पण तुझं त्याच्यावर केवढं अकटोविकट व्याख्यान झालं ! पोरगी आपल्या पदरांत आहे. जुन्या चालीप्रमाणं तिचं लग्न करूं ह्मटलं तर होणं नाहीं, तेव्हां लग्न करून द्यायचं, तर असाच कोणी तरी नवरा मुलगा पाहिजे. हा आपण होऊन आला आहे. त्याचं ह्मणणं काय तें तुला दाखवून दिलं. तुझ्या भावजयी त्या मनांतून लग्न व्हावं असं फार आहे. तिचा एकसारखा आग्रह चालला आहे कीं, माझ्या देखत पोरीचं लग्न होऊन मला ती सुखानं संसार करते आहे असं दिसलं, कीं मी अगदीं सुखानं मरेन. तिची समजूत घातली पाहिजे. या सगळ्या गोष्टी ध्यानांत धरून काय करायचं तें केलं पाहिजे. या सगळ्या गोष्टी तुझ्यापुढं मांडून शांतपणानं विचार करायचा, म्हणूनच तर तुझ्या येण्याची इतकी इच्छा धरली होती. आतां ती आपली सगळी उतावळी सोडून मी सांगतें त्याचा नीट विचार करा. आपल्या भावजयीची समजूत घाला, आणखी काय करायचं तें अगदीं वाटेल तसं ठरवा. अमक्याच तऱ्हेनं तें ठरलं पाहिजे असा माझा तर कांहीं आग्रह नाहीं. तें सगळं आपल्याकडे सोंपवलं आहे."

बळवंतरावांनीं जेव्हां असं भाषण केलं, तेव्हां गणपतराव जरा थंड झाला. आणि नंतर आपल्या मित्रास म्हणतो, "माझ्या स्वभावापुढं माझा इलाज नाहीं बोआ. मला असं वाटलं कीं, तुमचं हें सगळं जुळलं. आतां फक्त मला तुम्हीं कळविण्यासाठीं म्हणून हें पत्र दाखवलं. या पत्रावरून मला जांवई वावगा तर दिसत नाहीं. चांगला निश्चयी दिसतो. थोर कुळांतला आहे, हें तर तुह्मी म्हणतांच. पण माझं म्हणणं एवढंच कीं, लग्न करून टाकून पोरीला अगदीं बांधून कां टाकतां ? ती खरोखर फार हुशार, तिची ग्राहकबुद्धि जबर, मेहनती तशीच. मग जर तिच्या हातून पुढं उत्तम विद्याभ्यास होण्याची उमेद असली तर ती कां तुम्ही नाहींशी

करून टाकतां ? लग्न लागल्यानंतर हें कांहीं शक्य नाहीं हें आपल्याला उघड दिसतं आहे. मग कां विनाकारण !..."

"पुनः आपलंच !" बळवंतराव गणपतरावास म्हणतो, "अजून कांहींसुद्धां मी ठरवलं नाहीं. या पत्राला उत्तरसुद्धां दिलं नाहीं. अजून सगळं कांहीं ठरायचं आहे. तर तूं इथें असेपर्यंत कायतें ठरवून जा. मग माझ्या पाठीमागें तें असंच केलं, तें तसंच केलं नाहीं ही भानगड नसावी. जुळलं तर कमळा मोठी थोरली डॉक्टरीण व्हावी, तिच्या हातून हजारों बायकांना उपयोग व्हावा असं मला नाहीं का वाटत ? वाटतंच आहे. पण आतां शक्य काय आहे ? जें काय आपल्याला व्हायला पाहिजे, तें लग्न होऊन तिच्या नवऱ्याच्या साहाय्यानं आणखी संमतीनं करणं शक्य आहे का नाहीं, हाही एक ध्यानांत घेण्यासारखा विचार नाहीं का ? आपली बायको अशा प्रकारानं विद्वान् व्हावी, तिच्या हातांनीं लाखों गरीब स्त्रियांना फायदा व्हावा हें त्याच्या मनांतसुद्धां वाटयचं नाहीं का ? वाटणारच. तेव्हां तुझ्या भावजयीच्या इच्छेप्रमाणं होऊन शिवाय आपल्या इच्छेप्रमाणंही होण्याचा फार संभव आहे. साधलं, तर दोन्ही तिन्ही तऱ्हांनीं साधेल. पोरीचं शिकणं, आणखी तिची बुद्धि वायां जाऊं नये अशी माझी अतोनात इच्छा आहे. तशी तिच्या नवऱ्यालाही असायला हरकत काय आहे ? मला तर कांहीं दिसत नाहीं. मग तुला काय भय वाटत असेल तें असो. माझा मुख्य मुद्दा तुझ्या भावजयीची समजूत हा आहे. तिची समजूत तूं घाल, मी हा विचारसुद्धां मनांत आणीत नाहीं."

बळवंतराव अगदीं गंभीरपणानें बोलत होते. त्यांची इच्छा ही कीं, गणपतरावानें उगीच कोणत्याही बाबतींत उतावळी करूं नये, किंवा शांतपणें विचार करण्याचें सोडूं नये. गणपतरावास कमळे-संबंधानें जी महत्त्वाकांक्षा होती, ती बळवंतरावास मुळींच नव्हती असें म्हणण्यास कांहींसुद्धां कारण नव्हतें. परंतु तो गणपतरावाइतका उतावळा नव्हता. शांतपणें व आपल्या परिस्थितीप्रमाणें काय करावयाचें तें करावें असा त्याचा विचार होता व त्याप्रमाणेंच कांहीं तरी विचार करावयाचा हा त्याचा निश्चय. गणपतरावाची वृत्ति तशी नव्हे. जें मनांत येईल तें तावडतोब करावयाचें, मग मागें पुढें पहावयाचें नाहीं, अशी त्याची तऱ्हा. त्यामुळें दोघांच्या भाषणांत वर सांगितल्याप्रकारची मजा उडाली.

गणपतरावानें द्वारकाबाईच्या मनाची समजूत घालण्याचें आपल्या अंगावर घेतलें, आणि मग सहजगत्या त्यानें तिच्या प्रकृतीविषयीं प्रश्न विचारले. तिची प्रकृति काळजी करण्याजोगी नाहीं हें त्यास मुळींच ठाऊक नव्हतें. कांहीं स्वभाव असे असतात कीं, त्यांत निराशेचा भाग लवकर शिरत नाहीं. कोणतीही गोष्ट कितीही निराशा करण्याजोगी बनत असली तरी तींत कोठें कोठें तरी आशेला जागा आहे असें वाटून ते त्या आशेवर आपली भिस्त ठेवीत असतात. गणपतराव दिवसानुदिवस एकंदर जगाच्या स्थितीसंबंधानें जरी फारसा आशासंपन्न नव्हता, तरी एकंदरींत त्याचा स्वभाव आशालोलुप खरा. आशा करण्यास कितीही क्षुद्र कारण असो, तें त्याच्या नजरेस पडलें, कीं तो आशादेवीच्या आधीन झालाच म्हणून समजावें. बळवंतरावानें आज-

पर्यंत आपल्या बायकोच्या प्रकृतीसंबंधानें अनेक प्रकारांनीं लिहून तिच्या जीविनाविषयीं आपण किती निराश झालों आहों हें गणपतरावास पुष्कळदां लिहिलें होतें, आणि आज प्रत्यक्ष सर्व हकीकत सांगितलीही. परंतु गणपतरावानें त्याच्या हताशपणाबद्दल उलटी त्याची थट्टा उडविली. असा हताशपणा करून करूनच तूं तिला मारशील, असें करूं नको, असें तो उलटें त्यास सांगूं लागला.

बळवंतराव त्यास त्यावर कांहीं बोलला नाहीं. नंतर गणपतराव आपण होऊनच पद्माकराच्या कुटुंबाविषयीं, त्याच्या विद्येविषयीं वगैरे माहिती विचारूं लागला. ती सर्व ऐकल्यानंतर आपणच ह्मणतो, "हा तरुण गृहस्थ आपल्याला मिळाला, तर एका दृष्टीनें आपल्या पक्षाचा थोडाबहुत फायदा होईल." नंतर लागलीच ह्मणतो, "तसा फायदा तरी काय होणार आहे? त्याचं सारं कुटुंब कांहीं आपल्या पक्षाला येऊन मिळणं शक्य दिसत नाहीं. फार झालं, तर बापाशीं वांकडा होऊन तो आपल्याला येऊन मिळणार. तशानं आपला फायदा काय होणार? आपण एक निराळी जात बनवल्याप्रमाणं मात्र होतं आहे. एक एक तरुण मुलगा तसा मिळून तादृश फायदा नाहीं. कुटुंबंचीं कुटुंबं मिळालीं पाहिजेत, तरच त्यांत फायदा आहे. कमलेसारखी मुलगी दादासाहेबांच्या घरांत सुखशांतीनं नांदूं लागली, तर त्यांत विशेष आहे. तुमच्या हकीकतीवरून तें तर कांहीं शक्य दिसत नाहीं. मग काय उपयोग?"

अशा प्रकारचीं भाषणें पुष्कळ वेळ झालीं. शेवटीं त्यांनीं असें ठरविलें कीं, दुसरे दिवशीं पद्माकरास मुद्दाम बोलावून आणून गणपतरावानें त्याच्याशीं वाटेल तितकें बोलावें, आणि स्वतः काय वाटेल ती माहिती त्याच्यापासून काढून घ्यावी. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं प्रभाकरास व पद्माकरास बोलावून आणून गणपतरावाचें व पद्माकराचें बराच वेळ बोलणें झालें. आदले दिवशीं रात्रीच्या विचित्र प्रसंगानें गळ्यांत पडलेल्या त्या मनुष्यासाठीं प्रभाकरास लवकर परत जावें लागलें. पद्माकर मात्र तसाच बसला होता.

तरुणपणीं आपण ज्या कोणा व्यक्तींना पूज्य मानजतों, त्या व्यक्तींचें दर्शन झाल्यास किती तरी समाधान वाटतें, आणि त्या व्यक्तींचा व आपला प्रत्यक्ष भाषणप्रसंग जर आला, तर आनंदास पारावारच नाहींसा होतो. प्रभाकराची व पद्माकराची स्थिति हीच होती. गणपतरावानें ज्या कित्येक सुधारणेच्या गोष्टी केल्या होत्या त्यामुळें त्याचें नांव पुढल्या पिढीच्या तरुण मंडळींत अत्यंत भक्तीस किंवा अत्यंत द्वेषास कारण झालें होतें. एका प्रकाराच्या विचाराच्या तरुणांत त्याजबद्दल फार भक्ति उत्पन्न झाली होती आणि त्याच्या उलट प्रकारच्या विचारांच्या तरुणांत द्वेष उत्पन्न झाला होता.

प्रभाकर व पद्माकर हे पहिल्यापैकीं होते.

# प्रकरण १७ वें.

## दादासाहेबांनीं काय केलें ?



दिगंबरपुरास आपल्या वाड्यांत नेहमींच्या बसण्याच्या जागीं दादासाहेब बसले होते. त्यांचे डोळे इंगळासारखे लाल झालेले होते. संतापानें सर्वांग थरारत होतें. त्यांस नुकतेंच एक पत्र आलें होतें. त्याच्या त्यांनीं चिंध्या केलेल्या होत्या. त्या त्यांच्यापुढें पडलेल्या होत्या. त्यांच्या त्या संतापाच्या आविर्भावानें घरांतील चाकरनौकरांपासून तों प्रत्यक्ष कुटुंबापर्यंत जिकडे तिकडे मंडळी घाबरून गेल्याप्रमाणें झाली होती. जेथलें माणूस तेथेंच थिजून गेल्याप्रमाणें उभें राहिलें होतें. दादासाहेबांचा संताप सर्व माणसांना विश्रुत होताच. अनेक प्रकारांनीं पुष्कळांच्या अनुभवासही तो आलेला होता. परंतु आजचा संताप कांहीं विलक्षण असल्याबद्दल जो तो आपापसांत कुजबुजे. प्रत्यक्ष त्यांचें कुटुंब, ज्यांचा व त्यांचा सहवास, कांहीं नाहीं तरी चाळीस वर्षें झालेला, त्यांनीं सुद्धां असा उद्गार काढला कीं, आजपर्यंत इतका संताप कधीं पाहिला नव्हता !

आणि दादासाहेबांना असा विलक्षण संताप येण्याला कारणही पण तसेंच झालें होतें. आजपर्यंत त्यांची अवज्ञा कोणीं कधींही केली नव्हती. त्यांनीं एक ह्मटलें तर तें तसें नाहीं असें ह्मणून त्यांच्या उलट कोणीं ब्रसुद्धां काढला नाहीं. कोणाची तसा शब्द काढण्याची छातीच होत नसे. मुलें काय, किंवा चाकरमाणसें काय, यांनीं 'हं!' ह्मटलें कीं, चळचळा कापावयाला लागून आपापल्या ठिकाणीं चुप असावयाचीं. अशा स्थितींत ज्यांचें सर्व आयुष्य गेलें, मी ह्मणेन तेंच खरें, दुसऱ्याचें ह्मणणें अगदीं निरुपयोगी, किंबहुना दुसऱ्याचें म्हणणें मुळींच नसलें पाहिजे, अशा स्थितींत ज्यांचें सर्व आयुष्य गेलें, त्यांना वयाच्या उत्तरार्धाच्याही उत्तरार्धांत प्रत्यक्ष मुलानें अगदीं मनाविरुद्ध असें लिहून पाठवावयाचें, ह्मणजे त्यांच्या स्वाभिमानाला केवढा धक्का ! त्यांस तो एकंदर प्रकार किती विचित्र, किती अनर्थावह वाटावा ! दादासाहेबांसारख्याच्या स्थितींत वाढलेल्या माणसांची ही तऱ्हाच. त्यांना आजन्मात् कधीं कोणी त्यांच्या विरुद्ध बोललेलें नसावयाचें. जें काय आपण करूं, किंवा जें काय करण्याचा कोणासही हुकूम करूं, तो माणूस विरुद्ध जाईल, आपल्या हुकुमाविरुद्ध कांहीं करील, ही कल्पनाच त्यांस नसावयाची. कीं कांहीं तसा अनुभव त्यांस कधींच नसावयाचा. त्यांचें सर्व आयुष्य वरिष्ठपणांत व हुकूम सोडून ते अमलांत आले कीं नाहीं हें पहाण्यांत मात्र गेलेलें. मग एकदम स्वतःच्या घरांत आपलाच मुलगा आपल्या विरुद्ध जाऊन आपली अवज्ञा करतो आहे, हें पहातांच त्यांची अवस्था काय होणार हें स

हज कल्पना करतां येण्यासारखें आहे. ज्यांस अवज्ञा ह्मणजे काय हें स्वप्नस्वप्नांतरीं ठाऊक नाहीं, त्यांची त्यांच्या स्वतःच्या अपत्याकडून फार महत्वाच्या बाबतींतच अवज्ञा झाली, ह्मणजे त्यांच्या संतापाला पारावार नाहींसा होईल, यांत नवल काय ? दादासाहेबांची हीच अवस्था होती. आजपर्यंत त्यांचें ह्मणणें ह्मणजे केवळ ब्रह्मलिखित असें मानलें जात असे. अमुक एक गोष्ट अशी करावयाची असें त्यांनीं सांगितलें ह्मणजे ब्रह्मदेवाच्यानें सुद्धां त्यांत बदल व्हावयाचा नाहीं. घरांत लहान पोरानें एखादा हट्ट घेतला, आणि यांनीं एकदां त्याचा तो हट्ट पुरवावयाचा नाहीं असें ह्मटलें, तर तें अगदीं यःकश्चित् गोष्टीचे बाबतींत सुद्धां कधीं फिरावयाचें नाहीं. ते नेहमीं इतर आईबापांना हंसत. लहान पोरांवर सुद्धां दरारा ठेवतां येत नाहीं, त्यांना इतर गोष्टींत इतरांवर कदर कशी राखतां येईल, असें म्हणून इतर स्नेहीमंडळींची चेष्टा करीत. उद्यां तुमचीं मुलें असें करतील, तसें करतील, असें जर कोणी त्यांस ह्मटलें, तर माझीं मुलें असें कधीं सुद्धां करणार नाहींत; कारण माझी त्यांचेवर कदरच तशी आहे. तीं माझ्या कैदेंतलीं मुलें, तीं जर वाह्यात् वागलीं तर माझा बाणा काय राहिला ! असें ज्याच्या त्याच्याजवळ त्यांनीं ह्मणावें आणि मुलें त्यांच्या धाकांत होतीं, ही गोष्ट अगदीं अक्षरशः खरी. नुसतीं त्यांच्यापुढें जाण्यास किंवा त्यांच्याशीं कांहीं बोलण्यास सुद्धां तीं कधीं धजत नसत. कांहीं मागणें झाल्यास तें आईच्या मार्फत मागावयाचें, आणि आईनें तरी वेळवखत व त्यांची मर्जी पाहूनच मागावयाचें. इतकी ज्या मुलांवर जरब त्यांपैकीं थोरल्यानें एकदम अगदीं विलक्षण अवज्ञा करावयाची आणि तीही अशा बाबतींत कीं, त्या बाबतींत त्याच्याकडून अवज्ञा होईल हें त्यांस स्वप्नांत सुद्धां कधीं वाटलें नाहीं. पण प्रत्यक्षास पुरावा काय असावयाचा ! खुद्द त्यानें स्वदस्तुरचें पत्र पाठवून अवज्ञा केली. तें पत्र वाचतांक्षणींच त्यांच्या अंगाचा तिळपापड उडाला. आणि त्यांनीं लागलींच त्या पत्राच्या चिंधड्या केल्या. परंतु आपल्यास अनिष्ट अशा मजकुरानें भरलेल्या कागदाच्या चिंधड्या केल्यानें तो मजकूर मनांत उतरलेला तर कांहीं निघून जात नाहीं. कागदानें आपलें काम जेव्हां केलें तेव्हांच त्याची व्यर्थता झाली. मग त्याच्या चिंधड्या केल्या काय आणि तो तसाच ठेवला काय ! भिकंभटदादांनीं त्यांस त्यांच्या मुलाच्या आज्ञाधारकपणाबद्दल संशय उचारून दाखविला होता त्या वेळीं त्यांनीं जे आढ्यतेचे उद्गार काढले होते, ते त्यांस त्या पत्राच्या वाचनाचे वेळीं आठवले. आपला मुलगा अशा तऱ्हेचा प्रसंग आपल्यावर आणील ही कल्पना सुद्धां त्यांस नव्हती. आपल्या आज्ञेबाहेर एक रेसभरसुद्धां जो मुलगा कधीं गेला नाहीं तो आपल्या पूर्वापार चालत आलेल्या रीतीला एकीकडे झुगारून देऊन आपल्या विरुद्ध वागेल, आपली अवज्ञा करील हें शक्यच नव्हे अशी त्यांची पक्की समजूत. परंतु त्या समजुतीस पक्का धक्का आज त्या पत्रानें बसला. इतका कीं, आतां काय करावें आणि काय नाहीं असें दादासाहेबांस होऊन गेलें. त्यांचें चित्त अगदीं उद्विग्न, निषण्ण व संतप्त झालें.

दादासाहेबांनीं केवळ आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर निर्धनिश्चयापर्यंत पाळी आणली. आपल्या इच्छेप्रमाणें सरदारी व खानदानीच्या घराण्यांतली मुलगी घरांत येऊन थोरामोठ्यांशीं सोयरीक होणार हें पाहून त्यांस समाधान झालें. मागें एकवार सांगितलेंच आहे कीं, जेवढें म्हणून जुनें तेवढ्याचें दादासाहेबांस फार प्रेम. आणि त्याचमुळें त्यांची मोठी महत्वाकांक्षा अशी होती कीं आपलें घराणें म्हणजे पूर्वीच्या खानदानी जुन्या घराण्याचा अगदीं अस्सल नमुना असें ज्यास त्यास वाटून तशी कीर्ति व्हावी. तशा कीर्तीची लालसा त्यांस फार मोठी, आणि ती तृप्त व्हावी म्हणून त्यांचा सतत प्रयत्न असे. सोनवलीकर जहागीरदारांच्या व आपल्या घराण्याचा संबंध व्हावा म्हणून जो त्यांनीं अट्टाहास चालविला होता तो याचमुळें होता. आणि तें सर्व परस्पर ठरल्यानंतर लग्नासाठीं अमुक मुहूर्त धरिला आहे, तूं ये म्हणून मुलास पत्र लिहून आपल्या ठिकाणीं संतुष्ट होऊन जों चार दिवस जातात, तों त्याचें मी एव्हांशीं तिकडे येत नाहीं असें साध्या उत्तराचें पत्र आलें. त्याबरोबर यांचा संताप होऊन यांनीं त्यास फारच रागाचें असें पत्र लिहिलें. त्यांत अलीकडल्या शिकलेल्या मुलांच्या ढंगांनीं चालणारा मी बाप नव्हें, माझ्या मर्जीप्रमाणें सर्व गोष्टी झाल्या पाहिजेत, असें अगदीं जबरीनें लिहून त्यास, अगदीं तांबडतोब मुक्काम्यानें निघून येण्याबद्दल हुकूम पाठविला. त्या हुकुमानें व हुकूम ज्या पत्रांत गेला त्यानें तुसनीं आगच लागली. मध्यंतरीं मुलाच्या मनावर आणखी कांहीं निराळ्या व्यक्तींच्या भाषणांचा व वर्तनांचा परिणाम झाला आणि त्याचा दृढनिश्चय पहिल्यापेक्षांही अधिकच जोरावला. शतपटींनीं जोरावला म्हटलें तरी शोभणार आहे. त्यानें अगदीं शुद्ध व स्पष्ट शब्दांनीं लिहून कळविलें कीं, " आपण जी माझ्या विवाहाची योजना केली आहे, ती मला मुळींसुद्धां मान्य नाहीं. या बाबतींत माझा विचार आपण आधीं घेतला असता, प्रत्यक्ष जरी नाहीं, तरी अप्रत्यक्ष रीतीनें माझी इच्छा काय हें जर आपण कोणाकडून तरी पत्र लिहवून माझ्याकडून काढून घेतलं असतं, तरी बरं झालं असतं. पण आपण तसं कांहींच केलं नाहीं, लग्नाची बाब म्हणजे सगळ्या जन्माच्या सुखाची बाब आहे. तेव्हां मला केवळ आपल्या इच्छेकरितां म्हणून आपल्या जन्माच्या सुखांत आजच माती कालवून टाकावी असं माझ्यानं करवणार नाहीं. यापरतं काय लिहूं? आपण घेत जमवून आणला, तसाच तो मोडूनही टाकावा. "

मुलानें कसेंही मऊ लिहिलें असतें, तरी जोंपर्यंत तें दादासाहेबांच्या मर्जीविरुद्ध होतें, तोंपर्यंत त्यांच्या संतापास कारण होणारच होतें. पण मुलानें त्यांत मार्दवही ठेविलें नव्हतें, अगदीं स्पष्ट व स्वच्छ अशा शब्दांनीं त्यानें आपलें मनोगत त्यांस कळविलें. तें एक त्यांचा राग शतगुणित होण्याला कारण झालें. वर सांगितल्याप्रमाणें त्यांची संतापानें स्थिति झाली. आतां कोणत्या तोंडानें हा लग्नाचा सर्व जम बिघडवावा हेंच त्यांस सुचेना. त्यांची इतकी दिवसांची जी काय मोठी मनीषा ती आतां अगदीं समूळ उलथली. आतां तींत कांहींसुद्धां उरलें नाहीं. प्रत्यक्ष पोरगा ऐकेना, तेव्हां

आपल्या तोंडानेंच आतां पुनः सोनवलीकरांना कांहीं तरी सबब सांगून टाळलें पाहिजे, किंवा त्या कारस्थाकडे जाऊन पुनः त्याला कांहीं समजुतीच्या, कांहीं धाकाच्या, दपटशाच्या अशा गोष्टी सांगून लग्नास अनुकूल व सिद्ध केलें पाहिजे. या दोहोंखेरीज तिसरा कांहींच मार्ग शक्य नव्हता. पोरास येथें आणलें असतां हें सर्व करणें अगदीं सुशक्य आहे. परंतु तो दिगंबरपुरास येतच नाहीं असें म्हणतो, त्यास काय करणार ? थोडेसें मन शांत झाल्यानंतर त्यांस असें वाटलें कीं, आपण स्वतः मुंबईस जाऊन त्यास भेटावें, आणि सर्व कांहीं समजून सांगावें, किंवा कांहीं धाकदपट करून येथें घेऊन यावें. पुनः एकदां असें वाटलें कीं, आपण स्वतः जाण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. त्यास एक चांगलें कानउघाडणीचें पत्रच पाठवून येथें आणावें आणि येथें आल्यावर त्यास तें काय सांगावयाचें तें यथास्थितपणें सांगून त्याचेकडून अनुकूलता घेऊन ताचडतोब कार्य उरकून घ्यावें. परंतु पुनः त्यांस असें वाटे कीं, तो तरी आपलाच मुलगा. आपलाच करारीपणा, आपलाच दृढनिश्चय त्याचे अंगीं उतरलेला, तेव्हां जरबीच्या गोष्टी सांगितल्यास कदाचित् त्याचा निश्चय अधिकच दृढ होऊन तो आपलाच हेका धरून बसणार नाहीं म्हणून कशावरून ? असें त्यांचें मन द्विधा झालें. आजपर्यंत कधीं न अनुभविलेला अनुभव येण्याबरोबर त्यांची वृत्ति गांगरली. आणि प्रसंगही तसाच चमत्कारिक होता. सर्व कांहीं आपल्या इच्छेप्रमाणें होतें आहे म्हणून मुहूर्त नेमण्यापर्यंत पाळी आली असतां आतां एकाएकीं असा प्रसंग यावा, आणि तोही स्वतःच्या पोराच्या अवज्ञेमुळें ! यापेक्षां अधिक लाजिरवाणें कांहीं नव्हतें. परंतु हा प्रसंग आतां टाळावयाचा कसा ? याला एकच मार्ग. पोराला भेटून त्याची समजूत घालावयाची. अगर त्रागा करून मन वळवावयाचें. त्रागा म्हणजे आतां असाच कीं आपण सर्व कांहीं धर्मादाय करून आपल्या पेन्शनावर काशीक्षेत्रीं वास करावयाचा. पोरगा आपल्यास झालाच नाहीं, आपण अगदीं निपुत्रिक आहोंत, असेंच समजून चालावयाचें. येथपर्यंत जेव्हां पाळी आणावी, तेव्हां तें कदाचित् सुधारलें तर सुधारेल, नाहीं तर सुधारण्याची आशा नको असें त्यांस पक्कें वाटलें. आणि त्याचप्रमाणें करावयाचें त्यांनीं ठरविलें. असला अवज्ञा करणारा कारटा आपल्या पोटीं असला काय, आणि नसला काय, सारखेंच. असे उद्गार कमींत कमी पंचवीस वेळां त्यांनां काढले असतील. आणि वेळप्रसंग पडल्यास म्हटल्याप्रमाणें करण्यास हे खरोखरींच कमी करणार नाहींत, सर्व चीजवस्त धर्मादाय करून टाकून मुलींबाळींची थोडीबहुत व्यवस्था लावून खुशाल काशीवास करण्यास जातील; पुनः पोराचें तोंड पहावयाचें नाहीं म्हटलें, तर अक्षरशः तसें करण्यास चुकणार नाहींत अशी प्रत्येकाच्या मनाची खात्री होती. आणि आपल्या मंतापाच्या भरांत जों जों त्यांचे तोंडून असे उद्गार निघत तों तों घरांतील प्रत्येक माणसाच्या काळजाचें पाणी होऊन ज्याला त्याला असें वाटे कीं, आपण मुंबईस जाऊन हा सर्व प्रकार आपल्या धाकट्या यजमानास सांगून, त्यांचें मन वळवून त्यांस येथें आणावें. चाकरांनौकरांच्या परीनें चाकरांनौकरांस असें वाटलें, घरां-

तील जवळच्या गोतापैकीं मंडळीसही तसेंच वाटलें. दादासाहेबांच्या पत्नीस तर असें वाटलें कीं, आपण पक्षिरूप असतों, तर केव्हांच भरारी मारून मुंबईस जाऊन आपल्या चोंचीत आपल्या मुलास धरून आणून चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या असत्या. होतो आहे हा प्रकार बरा नव्हे असें ज्यास त्यास वाटत होतें. दादासाहेब या संतापावर आपल्या मुलास अर्जाबाद बेवारस करून हांकून देतील. पुनः तोंड पहावयाचें नाहीं ह्मणाले, तर खरोखरीच पुनः तोंड पहाणार नाहींत, ही आपली ज्याच्या त्याच्या मनाची खात्री.

इकडे दादासाहेबांचा संताप कमी कमी होत त्यांचें मन शांत झालें आणि ते विचार करण्याच्या मनःस्थितीला येऊन पोहोंचले. त्यांचे मनांत विचार सुरू झाला. मुलगा जर आपलाच हट्ट घेऊन बसला, तर काय करावें ? ज्यांच्याशीं मुहूर्त ठरविण्यापर्यंत बोलणें केलें त्यांस त्याच तोंडानें आतां कांहीं तरी बहाणा करून जुळत नाहीं म्हणून कसें सांगावें ? आणि कोणीं सांगावें ? भिकंभट तीन-तीनदां आपल्यास मुलाचा विचार घेत-लांत का, त्याला विचारा, असें बजावीत असतां, आपण त्याची अवहेलना करून त्यास धिक्कारलें, आणि शेवटीं आतां त्याचेंच ह्मणणें खरें होऊन आपल्यास आपलें सर्व बोलणें माघारी घेण्याची पाळी आली आहे. तेव्हां आतां काय करावें ? त्यांनीं आपल्या मनांत इंग्रजी शिक्षणाला शिव्या दिल्या. सुधारकांस लाखोली वाहिली. त्यांच्याच–पाजी लोकांच्या–संगतीमुळें आपला कारटा नासला असें त्यांस पक्कें वाटलें. ही गोष्ट आपणास आधीं समजती, तर आपण आपल्या पोरास मुंबईसारख्या ठिकाणीं कॉलेजांत ठेविला नसता. आपल्या येथें कांहीं कमी नाहीं. आपण मिळविलेलें आहे, तें पोरानें सुखानें खालें, तरी मोठ्या सरदारी व खानदानी थाटानें राहतां येणार होतें. परंतु आपण त्यास या इंग्रजी शिक्षणाच्या भानगडींत घालून त्याचें मन बिघडवून टाकलें. असेही विचार त्या गृहस्थाच्या मनांत त्या वेळीं येत होते. परंतु असले वायफळ विचार करीत बसण्याचा त्यांचा स्वभाव नव्हे. जो काय प्रसंग आला आहे त्यांतून पार पडण्यासाठीं जें काय ताबडतोब करावयास पाहिजे तें आतांच केलें पाहिजे. आणि तें करावयाचें ह्मणजे आपल्या पोरास ताबडतोब दिगंबरपुरास आणावयाचें हेंच होय. आपण स्वतः जाऊन, न जाणों अपमान करून घेऊन येण्यापेक्षां दुसऱ्या कोणास तरी पाठविणें आणि त्यास येथें बोलावून आणणेंच शहाणपणाचें होणार आहे. आपण जाणें हा शेवटला रामबाण होय, असा मनांत विचार करून त्यांनीं आपल्या दिवाणजीस पाठविण्याचें ठरविलें व दिवाणजींची त्याच रात्रीं रवानगीही करून दिली. दिवाणजीस असें सांगितलें होतें कीं, "आपण दिगंबरपुरास ताबडतोब आलां नाहीं, तर कोणत्या भयंकर थराला गोष्टी जातील याचा नेम नाहीं" असें पद्माकरपंतांस बजावून सांगावें. दिवाणजी तसें करण्यास फार उत्सुक होतेच. आपण जाऊन आपल्या धाकट्या यजमानांची समजूत घालून त्यांस आणण्याचें यश मिळविण्याबद्दल त्यांस फार उत्साह होता व त्या ईर्ष्येनें त्यांनीं तरी जाण्याची सिद्धता केली.

दिवाणजींनीं जाऊन पद्माकरपंतांस

गांठलें. त्यांचें पत्र दादासाहेबांचे हातीं पडल्या वेळेपासून जो एकंदर प्रकार झाला, तो सर्व आपल्या इच्छेप्रमाणें जितका मीठमसाला घालतां आला तितका घालून पद्माकरपंतास निवेदन केला. आणि एकंदर वर्णन अशा प्रकारें केलें कीं, पद्माकरास त्यांचेबरोबर जाण्याचीच इच्छा व्हावी. दादासाहेबांच्या रागापेक्षां आईसाहेबांच्या शोकाचेंच वर्णन त्यांनीं अधिक केलें. त्यांनीं सगळ्या दिवसांत अन्न घेतलें नाहीं. त्यांस रडतां भुई थोडी झाली. आपल्याला मी घेऊन जाईपर्यंत त्या अन्नग्रहण करणार नाहींत असें त्यांनीं सांगितलें. या त्यांच्या सांगण्यांत असत्यपणा होता असें नाहीं, परंतु आपल्या पश्चात् काय होणें शक्य असेल व काय बहुशः घडत असेल, किंवा घडलें असेल, तें सर्व कल्पनेनें रेखाटून व शब्दांनीं त्यांत रंग भरून दिवाणजींनी त्यांचेपुढें मांडलें. पद्माकरास आपल्या वडिलांच्या कोपाविषयीं उद्गारांचें सादृश काहीं वाटलें नाहीं, परंतु आइच्या प्रेमामुळें तिनें उपास केला असेल व आपण जाऊन तिला भेटेपर्यंत ती खरोखरीच उपास करील, हें त्यांस कल्पनेनें चांगलेंच जाणतां आलें. उपासामुळें अगदीं निस्तेज व रडूनरडून दीन झालेल्या त्या माउलीचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें, आणि कांहीं झालें तरी आपला निश्चय सोडावयाचा नाहीं हा त्यांचा निश्चय डळमळूं लागला. आपल्या आईला अशा दुःखांत सोडावें हें त्यास अगदीं गैर वाटलें. तिच्याकडे काय आहे ? तिला आपण जर समजावून सांगितलें, तर ती समजेल. आपलाच हेका कधींही धरून बसणार नाहीं.

परंतु आपण तेथें गेलों, म्हणजे आपल्यावर दादासाहेबांचा भडिमार होईल. ते नाहीं नाहीं तें बोलतील, वाटेल ते धाक घालतील आणि त्यांतच आईनेंही आपल्या प्रेमयुक्त व दीनवाणीनें आपल्याजवळ तेंच मागणें मागितलें, तर आपलें मन बदलेल, आपला निश्चय जागचे जागीं राहील. तसें होऊं नये यास एकच मार्ग कीं आपण तिकडे जाऊं नये.

याप्रमाणें त्यांचें मन अत्यंत द्विधा झालें होतें.

---

# प्रकरण १८ वें.

## मन हेलकावे खातें.



साधारणतः कोणाच्याही दृष्टीनें पद्माकराच्यापुढें येऊन पडलेला प्रश्न अगदीं यत्किंचित् असाच दिसला असता. परंतु पद्माकरास त्याचें फार मोठें गूढ पडलें. या वेळीं आपणास आपलें सगळें नीतिधैर्य एकवटून घेतलें पाहिजे. यांत जर का कांहीं कच्चेपणा झाला, तर आपण आपल्या आजपर्यंतच्या ब्रीदाला टळलों असेंच होणार असें त्यास वाटलें. आजपर्यंत आपल्या मित्रमंडळीच्या देखत केलेल्या सर्व वल्गना अगदीं व्यर्थ जाणार. जो तो आपली छीः थूः करील. जो तो आपल्यास नाहीं नाहीं तें बोलेल. हे विचार मनांत येऊन तो अगदीं भ्रांत झाला. समुद्राच्या अगदीं मध्यावर नाव जावी; जिकडे तिकडे अफाट दर्याखेरीज कांहीं दिसूं नये; फक्त एके बाजूस दूर अशी सुंदर वनभूमि दिसावी; परंतु तिच्यांत आणि आपल्यांत नानाप्रकारचीं संकटें उभीं राहावीं; लाटा दोन पुरुष उंच उठून समुद्राचें स्वरूप फार रौद्र होऊन जावें, अशा वेळीं त्या नावेची व ती चालविणाऱ्या नाविकाची जी अवस्था होते, तीच अवस्था अगदीं हुबेहूब पणें पद्माकराच्या मनाची झाली होती! जर आज आपल्या वडिलांच्या सांगण्याप्रमाणें केलें नाहीं, तर काय काय संकटें आपल्यावर येऊन कोसळणार, आपल्यास दारिद्र्यांत दिवस घालवावे लागणार, घरांतील कोणाही मनुष्याचें मुखावलोकन सुद्धां पुनः होणें शक्य नाहीं, अशी स्थिति येणार. हें सर्व त्यास स्पष्टपणें दिसत होतें. परंतु या सर्वांच्या पलीकडे एक मोठें सुखस्थल त्यास स्पष्टपणें दिसत होतें. त्या स्थलाची रम्यता त्याच्या चित्तास आकर्षण करीत होती; आणि त्या आकर्षणाच्या तावडींत त्याचें मन पुरतेपणें सांपडलें होतें. वडिलांच्या नेहमींच्या कडक वर्तनामुळें त्यास त्यांचेबद्दल कधींही इतकें प्रेम वाटलें नाहीं. अर्थातच त्यांची आज्ञा मोडणें ह्मणजे आपण फारसा मोठा अपराध करतों आहोंत, असें त्यास वाटेचना. जें काय वाटत होतें, तें आपल्या अशा करण्यानें आपल्या आईस काय वाटेल हें होय. तिचें मन मोडणें ह्मणजे तिच्या सर्व आशांचा, सुखाचा व हृदयाचा भंग करणें होय. तर तो करणें चांगलें काय? एकवार त्यास वाटे, चांगलें नव्हे. परंतु लागलीच वाटे, त्यास कांहीं हरकत नाहीं. कारण तिचें मन म्हणजे दादासाहेबांच्या मनाप्रमाणें बनलेलें मन होय. तिची एकदाची गांठ पडेल, तर आपण तिचें मन सहज वळवूं. आपण ज्या प्रकारानें विवाह करावा, जशी वधू करावी असें म्हणतों, तो प्रकार तिला प्रथम जरी आव-

डला नाहीं, त्या वधूबद्दल प्रथम जरी तिला बरें वाटलें नाहीं, तरी आपण जर तिला समजावून सांगितलें, तर ती समजेल व आपल्या म्हणण्यास खास कबूल होईल. परंतु वडिलांच्या संबंधें तसें नाहीं. त्यांना समजावून सांगण्याचा यत्न केला किंवा त्यांच्याबद्दल त्या गोष्टींची चर्चा करण्याइतका धीटपणा केला तर तो त्यांस उद्धटपणा वाटणार. जें बोलावें त्याच्या अगदीं उलट त्यांचें बोलणें पडणार, आणि, "मी म्हणतों त्याचप्रमाणें झालें पाहिजे," असा त्यांचा दुराग्रह पडणार. त्या आग्रहाप्रमाणें झालें नाहीं, तर ते त्रागा करणार आणि त्याच्यापासून काय अनर्थ ओढवतील याचा मुळींच नेम राहाणार नाहीं.

अशा स्थितींत आपण काय करावें? हा प्रश्न नेहमींच त्याच्या मनास शून्य करी. त्यानें अनेक वेळां त्या प्रश्नाचें उत्तर आपलें आपल्यासच दिलें. वडिलांच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां आपल्या आजपर्यंतच्या विचारास, शिक्षणास, उद्गारांस साजे असेंच या वेळीं वर्तन केलें पाहिजे. वडिलांची त्यामुळें कितीही मर्जी नाखुष झाली, त्यांनीं आपणास आपल्यापासून अगदीं कायमचें दूर केलें, तरी हरकत नाहीं. आजपर्यंत आपण लहानपणीं करून घेणार नाहीं असा निश्चय केला तो कायम ठेवला. त्याचप्रमाणें उगीच चांगल्या मोठ्या कुळांतील सुस्वरूप म्हणूनच दुसऱ्या मुलीशीं आपण लग्न करावयाचें नाहीं, हा आपला दुसरा निश्चय. तो राखण्याची किंबहुना तो कायम राखून आपल्या मनायोग्य वधू मिळते आहे तिच्या ठिकाणच्या समाजदृष्ट्या दिसणाऱ्या वैगुण्याकडे यत्किंचित् लक्ष्य न देतां केवळ तिच्या गुणांवर व आईबापांच्या थोरपणाकडे लक्ष देऊन तिच्याशीं विवाह करण्याची संधि आली असतां पिछेहाट करणें हें अगदीं नामुष्कीचें काम आहे. वडिलांची आज आज्ञा मोडिली, तरी पुढें मागें केवळ आपल्या व आपल्या वधूच्या सद्गुणाचरणानें त्यांची मर्जी पुनः संपादन करणें शक्य आहे. परंतु या वेळीं जर का आपल्या औदास व निश्चयास ढळून आपण त्यांच्या म्हणण्याप्रमाणें केलें, तर सर्व कांहीं बुडालें. असा भित्रेपणा करूं नये. ही आपली परीक्षेची वेळ आहे. त्याच्या विचारांची ही एक दिशा; आणि दुसरी दिशा "आपण हें करितों हेंच चांगलें काय! आपल्याच हेक्याप्रमाणें करणें, अमक्या अमक्या बाबतींत वडिलांशीं आपलें कांहीं कर्तव्य नाहीं असें आपण धरून चालणें हें बरोबर आहे काय? कोणत्या बाबतींत त्यांचें आपण ऐकलें पाहिजे आणि कोणत्या बाबतींत ऐकणें आपलें कर्तव्य नाहीं, हें तरी आपण कसें समजावें?" हाही प्रश्न त्याच्या मनांत आपला शिरकाव करून घेत नव्हता असें नाहीं. परंतु ह्या प्रश्नानें मारलेल्या हांका त्यास स्पष्टपणें ऐकूं येत नव्हत्या. त्या अत्यंत क्षीण होत्या. किंबहुना ज्या ज्या वेळीं त्या प्रश्नानें हांका मारून त्याचें मन आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला त्या त्या वेळीं "नाहीं नाहीं, या बाबतींत माझें कांहीं कर्तव्य नाहीं. या बाबतींत माझें कर्तव्य मी आपल्या मनास व सुखास वाटेल तेंच करणें होय," असें अट्टाहासानें त्याचें मन म्हणे, आणि या स्थितींतच त्यानें आपल्या दिवाणजींस उत्तर दिलें. "आपण येथपर्यंत

येण्याची तसदी घेतलीत, हें एका दृष्टीनं फार चांगलं झालं. मी तिकडे तर येत नाहींच. पण दादासाहेबांना सांगा कीं, आपण जो संबंध ठरविला आहे तो मला अगदीं-मुद्धां मान्य नाहीं. ठरविण्याच्यापूर्वी जर मला विचारलं असतं, तर मीं तेव्हांच सांगितलं असतं. परंतु तुमचा विचार ठरून तिथिनिश्चय होऊन मग मला कळविलंत, तेव्हां आतां तरी स्पष्टपणें माझं मन सांगण्यापलीकडे मला कांहीं करतां येत नाहीं. मी तिकडे येत नाहीं. आपण मुलगा ऐकत नाहीं ही सबब सांगून संबंध मोडून टाकावा," असें त्यानें दिवाणजीस अगदीं निक्षून सांगितलें. हें सर्व सांगतेवेळीं पद्माकरानें जें काय आविर्भाव केले त्यांत, व त्याच्या चर्येवर दृढनिश्चय व कठोरता हीं पूर्णपणें प्रत्येक रेषेंत दिसत होतीं. तें पाहतांच दिवाणजीस दादासाहेबांच्या चर्येचें स्मरण झालें. ज्या बापाचा निरोप घेऊन मी आलों, त्या बापाचा हा मुलगा असें त्यास तेवढ्या त्या चर्येवरूनच मनांत आलें. आपण आणखी कितीही प्रकारांनीं कांहीं बोललों, तरी या दादासाहेबांच्या मुलाचा निश्चय ढळणें शक्य नाहीं. आपणास नन्नाचाच पाढा पढून परत जावें लागेल, हें त्यास पक्कें कळून चुकलें. परंतु आपल्याकडून जितकें कांहीं सांगणें शक्य तितकें आपण सांगावें, आणि मग जावें, असा निश्चय करून त्यानें आपल्या छोट्या यजमानांपुढें त्याच्या या कृतीमुळें थोरल्या यजमानांच्या मनाची काय स्थिति होईल, ते संतापाच्या भरांत काय करतील, त्यांचा जामदग्न्य स्वभाव किती भयंकर आहे, आधींच आतांपर्यंत त्यांच्या संतापास पारावार नाहींसा झाला आहे; ते मला धाडींत नव्हत, "पुनः त्याचं मुखावलोकनसुद्धां या जन्मांत करणार नाहीं," असें म्हणून त्यांनीं लागलीच कांहीं व्यवस्थापत्र वगैरे करण्याचा विचार बोलून दाखवून ते आपल्या खोलींत जाऊन बसले होते, परंतु हें प्रकरण—अगदीं यःकश्चित् गोष्ट—इतक्या विकोपास जाऊं देणें बरें नव्हे, असें पाहून मीच रदबदली करून इकडे आलों. आपण असा विचार करा, कीं एवढ्याशा बाबतींत आपल्या जन्माचें नुकसान कां करून घ्यावें ! दादासाहेबांनीं मनांत आणलें तर ते खरोखर एक कवडीसुद्धां आपल्या हातीं लागूं देणार नाहींत. "जें काय मिळवलं, तें मीं मिळवलं आहे, वडिलोपार्जित असा एक मुलखाचा तोडासुद्धां नाहीं. तेव्हां माझ्या मिळकतीची मी वाटेल तशी व्यवस्था लावून मी खुशाल आपल्या पेन्शनावर काशीवास करून दिवस काढीन. मला पुत्रसंतान झालंच नाहीं, किंवा होऊन मेलं असं म्हणेन." असे उद्गार त्यांनीं चार वेळां काढले. "रावसाहेब, आपल्याला शिकलेली बायको पाहिजे, तर हिला शिकवून तयार करतां येणार नाहीं का ! आपण विवाह करा, आणखी इकडे मुंबईसच पुढें अभ्यासाला रहा. आपलं कुटुंब घेऊन येण्याचा आग्रह धरा. मग शाळेंत पाठवा. काय वाटेल तें करा. त्याबद्दल त्यांना इतका राग यायचा नाहीं. पण, आतांचा हा प्रसंग खरोखरीच मोठा विचित्र आहे. आपण त्यांच्या आज्ञेबाहेर कधीं जाणार नाहीं, ही त्यांच्या मनाची निरंतरची खात्री असल्यामुळें त्यांनीं सोनवलीला जाऊन मुलगी पाहून सर्व कांहीं ठरविलं. तिथिनिश्चयसुद्धां केला. सोनवलीकरांनीं सर्व तयारी चालविली. सोय-

त्यांधायऱ्यांस पत्रें लिहिलीं आणखी आतां त्यांना सांगायचं कीं लग्नाचं जुळत नाहीं, ह्मणजे आपल्या हातानं वडिलांच्या अब्रूला काळिमा आणणं नाहीं का! आजपर्यंत त्यांनीं सगळ्या लोकांना किती आपल्या कह्यांत वागवलं! सर्वांवर त्यांची कदर किती करडी होती! त्यांच्याविरुद्ध नुसतं बोलण्याचीसुद्धां कोणाची छुदरत नव्हती, मग वागण्याचं तर नांव कशाला? आणखी त्यांनाच आज आपला मुलगा आपलं ऐकत नाहीं. त्याच्यापुढें आपलं कांहीं चालत नाहीं, असं म्हणून आपला वचनभंग करण्याची पाळी तुम्हीं आणावी, हें तुमच्या कुळाला, नांवाला, शिक्षणाला, कशाला तरी शोभतं काय? आपण ऐकत नाहीं, झालेला लग्ननिश्चय मोडण्याखेरीज दुसरा कांहींसुद्धां उपाय आतां नाहीं, असं मी सांगण्याला गेलों ह्मणजे त्यांची काय स्थिति होईल याचा विचार करा. दुसरं माझं कांहीं ह्मणणं नाहीं. आपण आमचे यजमान, आपल्याजवळ इतकं पाल्हाळानं बोलावं अशी आमची पद्वी नाहीं. परंतु दादासाहेबांची चाकरी करतां करतां ह्मातारा झालों, तुह्मांला अगदीं लहानपणापासून वाढविलं ह्मटलं तरी चालेल. तेव्हां जुन्या नोकराच्या हक्कानं मी बोलतों. आपण राग मानूं नका. पुष्कळदां असंही होतं कीं धन्याच्या रागाला न जुमानतां नोकरांनीं काय बोलायचं तें स्पष्टपणें व निःस्पृहपणें बोलणं जरूर असतं. आजचा प्रसंग त्यांतलाच आहे. असं जाणून मी स्पष्टपणानं बोलतों कीं, आपण केलेला विचार बदला. त्याच्यापासून आपलं कल्याण होणार नाहीं. आपल्या मनाप्रमाणं केल्याच्या समाधानापेक्षां आपल्या वडिलांना दुःख देऊन आपला हेका धरून चालल्याबद्दल पुढें होणारा पश्चात्ताप शतपट वाईट होय. आपण माझ्याबरोबर चला. दुसरा कांहीं विचार करूं नका."

दिवाणजी पोक्त मनुष्य आणि दादासाहेबांच्या ठिकाणीं व त्यांच्या कुटुंबाच्या ठिकाणीं त्याची पूर्ण निष्ठा व भक्ति. त्याचप्रमाणें त्यानें ह्मटल्याप्रमाणें जुन्या नोकराच्या निःस्पृहतेनें बोलण्याचा हक्कही त्यास पूर्णपणें पोहोंचत होता. तो बजावण्याची हीच फार महत्वाची संधि आहे, हें त्यानें या वेळीं ताडलें, आणि ती संधि वायां जाऊं द्यावयाची नाहीं असा त्याचा निश्चय झाला असावा असें दिसलें. त्यानें त्या निश्चयाप्रमाणें व आपलें कर्तव्य म्हणून जें त्यास वाटत होतें, त्याप्रमाणें स्पष्ट व निःस्पृहपणें काय बोलावयाचें तें बोलूनही सोडलें. दादासाहेब आपलें व्यवस्थापत्र करून टाकतील, आपलें सगळें द्रव्य दानधर्मांत खर्च करून टाकतील, या अर्थाचा मजकूर दिवाणजींच्या भाषणांत येईपर्यंत पद्माकर स्वस्थ चित्तानें त्याचें सर्व बोलणें ऐकून घेत होता. परंतु द्रव्याचा व तें सर्व दानधर्मांत देऊन टाकण्याचा, कारण तें दादासाहेबांचें स्वकष्टार्जित आहे, वडिलोपार्जित नाहीं, असा त्यांच्या बोलण्यांत भाग येतांच पद्माकराचें चित्त क्षुब्ध झालें. त्याच्या कपाळावर आंठ्या चढल्या, रागानें त्याचे ओंठ थरथरूं लागले. त्याच्या मनांत इतकें कांहीं बोलावेंसें वाटलें कीं, तोंडांतून एकही शब्द बाहेर पडेना. दिवाणजींचें भाषण संपल्यावरसुद्धां तो अत्यंत क्षुब्ध अशा स्थितींत क्षणमात्र स्तब्ध बसला. मनाच्या अत्यंत अस्वस्थतेमुळें बाहेर स्वस्थता दिसली. नंतर तो त्यांस ह्मणतो, "दिवा-

णजी, तुह्मी ह्मणालांत तें सगळं बरोबर आहे. पण मला त्या पैशांची जमा नाहीं, तेव्हां पैसा आपल्याला मिळणार नाहीं, या भयानं गांगरून मी आपल्या स्वतःच्या मनाच्याविरुद्ध कांहीं करीन अशी समजूत घेऊनच जर तुह्मी आलां असलां, तर तुह्मांला अगदीं व्यर्थ श्रम पडले. मी पैशाचा लोभी नाहीं. ज्या वेळीं मीं आपल्या मनाचा निश्चय करून इकडे राहण्याचा व लग्नासाठीं मी तिकडे येत नाहीं, असं दादासाहेबांना लिहून कळविण्याचा निश्चय केला, त्याच वेळीं मी वडिलांच्या इस्टेटीची आणखी पैशाची आशा सोडली; समजलांत ! मला त्याची जरूरी नाहीं. मी त्याच्यावर आतां पाणी सोडतों. मी दादासाहेबांचाच मुलगा. त्यांनीं ज्याप्रमाणं इतकी संपत्ति केवळ स्वकष्टानं मिळविली, तशीच मलाहीं मिळेल. किंवा तशी जरी मिळाली नाहीं, तरी मला तिची उणीव वाटून मी हाय घेऊन बसणार नाहीं, ही गोष्ट खचित तुम्ही मनांत बाळगा. आतांपर्यंत माझ्या मनांत थोडाबहुत अनमान होता, तो आतां तुमच्या या बोलण्यानं अजीबाद् गेला. तुम्ही परत जाऊन बेलाशक दादासाहेबांना असं सांगा कीं, आपण जमविलेला विवाहसंबंध करून घेण्याला मी अगदींसुद्धां राजी नाहीं. तेव्हां तुम्ही या आग्रहांत न पडतां सोनवळीकरांना बेलाशक दुसरं स्थळ पहा म्हणून लिहा. आतां या बाबतींत अधिक बोलणं वगैरे कांहीं नको. तुम्ही कांहीं बोललांत, तरी त्याचा उपयोग कांहींसुद्धां होणार नाहीं. आपण जितक्या लवकर परत जाऊन हा निरोप सांगाल, तितकं सर्व दृष्टीनं बरं. दादासाहेबांना माझं हें करणं केवळ पोरखेळ आहे, असं वाटत असेल. त्यांनीं सोनवळीकरांस अजून कांहींसुद्धां कळवलं नसेल; आणि मग आयत्या वेळीं विनाकारण लोकांचं हंसूं होईल. माझा विचार ऐकाल तर तुम्ही आतांच्या आतां आधीं तार करा कीं, मी कांहीं केल्या ऐकत नाहीं आणखी येत नाहीं. बेत रहित करण्यावांचून दुसरा उपाय नाहीं. आणखी तुम्ही जाल तेव्हां स्पष्टपणें, तुमचं माझं काय बोलणं झालं तें त्यांना सांगालच. तुम्हाला विनाकारण त्रास पडला. माझा कांहीं त्याला इलाज नाहीं."

दिवाणजी त्या बोलण्यानें बहुतेक निराश झालाच होता, परंतु त्यांतल्या त्यांत म्हणतो: "इलाज कां नाहीं ? आपण करायचं मनांत आणलं तर सहज होणार आहे. आपण मजबरोबर चला तिथें मुक्कामानं एकदां लग्न लागूं द्या, आणखी मग काय वाटेल तें केलंत तरी कोणी आपल्याला बोलायला येत नाहीं. आज नाहीं कोण तसं वागत ?"

# प्रकरण १९ वें.

## खाण तशी माती.



दिवाणजींच्या या बोलण्यानें विशेषतः त्यांच्या शेवटल्या उद्गारानें, त्या नशा वेळींही पद्माकरास हंसूं आलं. " आज नाहीं कोण तसं वागत ! "

' तसं ' ह्मणजे कसें ? तर उघडपणें नव्हे असें. परंतु पद्माकर त्याबद्दल त्यास कांहीं बोलला नाहीं. त्यानें फक्त ह्मटलें:– " तुम्ही ह्मणतां तें सर्व खरं, परंतु मला त्या मुलीशीं लग्न करायचंच नाहीं. मग काय ह्मणतां ? मी तुह्मांला सांगितलंना कीं, सोनावळीकरांना दुसरं स्थळ पहाण्याविषयीं लिहा म्हणून. "

एकवार जें मागितलें, तेंच पुनः एकदां जास्त स्पष्टपणें सांगावें व कांहीं वळलें तर पाहावें. असें वाटून दिवाणजी थोडा निक्षून म्हणतो:– " यजमानसाहेब, दादासाहेब फार करारी. ते सोनवळीकरांस ' हो ' म्हणून चुकले आहेत. त्यांनीं तिथिनिश्चयसुद्धां करून सोडला आहे. आतां जर आपण आलां नाहींत, तर आपल्यावर त्यांचा फार इतराजी होईल. आणि त्यांनीं आजन्मात् जें केलें नाहीं, एकदां जें ह्मटलं तें परत घेतलं नाहीं, तें करण्याची जर त्यांच्यावर पाळी आणलीन, तर ते आपलं फार नुकसान करतील. त्यांना कधींसुद्धां तें खपायचं नाहीं. ते काय प्रतिज्ञा करतील आणि काय नाहीं याचा नियम नाहीं. ते अधिकारावर असतांना अमुक प्रसंगीं अमक्या गृहस्थानें त्यांच्या मर्जीविरुद्ध असं केलं, तेव्हां संतापून त्यांनीं त्याचं असं असं नुकसान केलं. अमक्या माणसास त्यांनीं तझं पुनः मी तोंडसुद्धां पाहाणार नाहीं असं बोलून आपलं वचन आजतागाईत खरं करून दाखविलं आहे. " अशीं उदाहरणं देण्याचा सपाटा दिवाणजींनीं चालविला. " ते, आपण त्यांचे चिरंजीव म्हणून आपल्याला कांहीं गय करतील हें स्वप्नांतसुद्धां आणूं नये. तसला प्रसंग आणूं नये तेंच चांगलं. कांहीं करा, पण असा भयंकर प्रकार होऊं देऊं नका. आपण या वेळीं आपला हेका सोडून जर मजबरोबर आलां नाहींत, तर सर्व ग्रंथ आटपलाच. ते सर्व कांहीं दानधर्म करून टाकून, तुह्मांला एक कवडीसुद्धां ठेवणार नाहींत. इतका त्रागा करायला ते चुकायचे नाहींत. आपल्याला माहिती नाहीं असं नाहीं. पण मी आपलं उगीच सांगतों, कारण मी आपला जुना नोकर. तेव्हां जुन्या नोकराच्या नात्यानं सांगावं असं वाटतं, आपण आपला विचार करा. पण मी सांगतों हें ध्यानांत घ्या. आपल्यासारख्यांना त्यांनीं घरांतून हांकून द्यावं यासारखी संतापवृत्तीच्या अतिरेकाची गोष्ट कोणती ? ती आपल्या बाब-

तींत त्यांच्या हातून घडून येऊं नये अशी फार इच्छा आहे. याउप्पर आपली इच्छा. आम्ही नौकरमाणमं दुसरं काय सांगणार ? आपल्या ध्यानांत आलं तर बरं."

दिवाणजी अधिक कांहीं बोलले नाहींत. काय बोलतो बिचारा ! अधिक बोलणें कांहीं त्यांस शक्य नव्हतें. एक तर ते बोलले तेंच पद्माकरास रुचलेसें किंवा त्यांच्या मनावर त्याचा कांहीं परिणाम झालासें दिसलें नाहीं. उलट पद्माकराचे मनावर त्यांच्या इच्छेहून विपरीत असाच परिणाम झाला असें दिसलें. कारण पद्माकर अगदीं तिरस्कारानें त्यांस म्हणतो, " होय, होय. तें सारं मी जाणून आहें. त्याचा विचार मी आधींच केला आहे. त्यांची भीति मला दाखवून कांहीं उपयोग होईल असं तुम्हाला वाटलं तरी कसं ? मघाशीं एकवार तुम्हीं या सर्व गोष्टी जितक्या तऱ्हेनं सांगायच्या तितक्या तऱ्हेनं सांगितल्यात. त्याच्यावर मलाही काय तुम्हाला उत्तर द्यायचं तें दिलं. आतां तेंच तें पुनः बोलण्यांत काय अर्थ आहे ? पहिल्यानं तुम्हीं या सगळ्या गोष्टी नाहीं का सांगितल्यात ? सांगितल्यातच. दादासाहेब आपलं सगळं द्रव्य दानधर्मांत वेंचून काशीस जाऊन राहाणार. माझं नांव वर्ज्य करणार. ठीक आहे. मी त्यांच्या निवडीच्या लग्नाला कबूल नाहीं, एवढ्याकरितां इतकी शिक्षा जर करणार तर ती मला सोसणं भाग आहे आणखी मी सोशीन. माझं आतां तुम्हाला सांगणं इतकंच आहे कीं, तेंच तेंच वारंवार बोलून वेळ घालविण्यापेक्षां मी जें काय सांगतों आहें, तें नीट ध्यानांत घेऊन त्यांना जाऊन सांगा, अगर लिहून कळवा. मी आपला निश्चय बदलीन अशी आतां मनांत कल्पनासुद्धां आणूं नका. जों जों अधिक वेळ जाईल तों तों सोनवळीकरांना विनाकारण फसविल्यासारखं होईल. त्यापेक्षां एकदां स्पष्ट काय तें सांगून कां नाहीं टाकलं कीं, आम्ही ठरविलं पण आमचा मुलगा आमचं ऐकत नाहीं. तेव्हां तें मोडलं म्हणून समजून दुसरं स्थळ पाहावं."

दिवाणजी जुना नौकर खरा, त्याला पद्माकराची पुष्कळ माहिती खरी, परंतु पद्माकराचें इतकें निश्चयोत्तर येतांच त्यालासुद्धां आश्चर्य वाटलें व तो त्यांस म्हणतो, "काय म्हणतां, जें आजपर्यंत दादासाहेबांनीं केलं नाहीं तें त्यांना लाचार होऊन आज तुम्हीं करायला लावणारच ?"

दिवाणजीनें हा प्रश्न फार त्रासून केला. धाकाचा उपाय दोन वेळां व सामाचे उपाय दोन वेळां योजिले, पण एकदांही उपयोग झाला नाहीं, तेव्हां आतां निर्भर्त्सना करून तरी कांहीं जुळलें तर पाहावें, असें दिवाणजींनीं मनांत आणलें व वरील प्रश्न विसरून ते किंचित् स्तब्ध राहिले आणि पुढें म्हणतातः—"विचार करा, अगदींच बहकूं नका. आजपर्यंत ज्यांनीं तुम्हाला वाढवलं, वर्तवलं, तुम्हाला अन्नदान, विद्यादान दिलं, जन्मभर तुमच्या खस्ता खाल्ल्या, त्यांना अगदींच धाब्यावर बसवून कृतघ्न होऊं नका. तुम्ही विद्वान् झालां ते वडिलांची अवज्ञा करण्याकरितां झालां नाहीं. विद्येचा हाच जर परिणाम असला, तर आग का लागेना त्या विद्येला ! कांहीं तरी माणुसकी धरा. माझ्यासारख्या दीड दमडीच्या नौकरानं तुम्हाला असं कांहीं सांगावं असं नाहीं. पण काय करूं ? आपण अशा तऱ्हेनं वागतां यामुळं मला दादासाहेबांबद्दल वाईट वाटतं. ज्या पुरुषानं

आजपर्यंत एकदां उच्चारलेला शब्द परत म्हणून घेतला नाहीं, त्याच्यावर या लग्नासारख्या बाबतींत आपला शब्द परत घ्यायची पाळी यावी, यासारखी लाचारीपणाची दुसरी गोष्ट कोणती? आणखी तीही पाळी कशामुळं तर मुलगा आज्ञा पाळीत नाहीं म्हणून! अरेरे! बिचाऱ्या दादासाहेबांना मरणप्राय दुःख होईल. त्यांची पुण्याई आतांपासून संपली म्हणूनच असा प्रसंग त्यांच्यावर यावा, यापेक्षां अधिक दुःखाची गोष्ट काय! दुसरं कांहीं कारण जरी झालं असतं, तरी दादासाहेब कधीं गडबडतेना. कशाचीही त्यांनीं परवा केली नसती. पण लग्नाच्या बाबतींत आपण स्वतः येतच नाहीं म्हटल्यानंतर त्यांनीं तरी काय करायचं? दुसरा मुलगा जरी असता, पुतण्या भाचा जरी कोणी असता, तरी त्यांनीं त्याला मुलगी द्या, मी आपला सगळा पैका त्याच्या नांवानं करून देतों ह्मणून सांगून त्यांनीं त्याचं लग्न केल्याखेरीज ठेवलं नसतं. आणखी बोलल्याप्रमाणं केल्याखेरीजही ते कधीं राहिले नसते. पण आजमितीला तेंही कांहीं नाहीं. करा, करा, कांहीं तरी विचार करा. अगदींच असा निःसंगपणा करूं नका. तुमच्यासारख्याला तो शोभत नाहीं. इतक्याउपर तुमचा हेका असला तर तुह्मी वाटेल तें करा. ज्या ज्या मार्गानं ह्मणून कांहीं उपाय आह्मांला सुचला तो मार्ग पतकरला. आतां तुह्मांला जें काय करायचं असेल तें करा. मी जातों. यापलीकडे मी काय करणार? ज्या ज्या प्रकारांनीं जें जें सांगायचं, तें सांगितलं. आतां तुम्ही जाणे, ते दादासाहेब जाणे. त्यांना आतां मी झालेली हकीकत सांगण्यापलीकडे काय करणार? पण तुह्मांला सांगतों कीं, तुम्ही हें करतां हें चांगलं नाहीं. वडिलांचे तळतळाट घेऊन या सुधारणा करतां यांत तुह्मांला कधीं यश यायचं नाहीं. उलट थोडे दिवसांनीं तुमचा तुह्मालाच खेद होईल, पश्चात्ताप होईल, आणखी मग आमच्यासारख्यांच्या या बोलण्याचं स्मरण होईल. दादासाहेब तळतळतील, आईसाहेब तळतळतील, घरांतलं माणूसनमाणूस तळतळेल, आणखी आपण काय मिळवाल, तर आपल्या लहरीप्रमाणं केल्याचं समाधान. तारुण्याच्या भरांत हजारों लहरी येतात, पण त्या लहरीप्रमाणं करीत गेलं, तर तें समाधान पुढें निरंतरच्या दुःखाला कारण होतं. तुम्ही कोणाच्या पोरीशीं लग्न लावणार आहां हें आह्मांला सगळ्यांना समजलं आहे. पण कुलहीन पोरीशीं—पाटापासून झालेल्या पोरीशीं—लग्न लावून तुम्हांला अखेरीस पश्चात्ताप होईल हें पक्कं ध्यानांत धरा. याचा विचार आज तुह्मांला होत नाहीं. पुढें झाला, तर वेळ निघून गेल्यावर उपयोग काय होणार? ठीक आहे. मी येतों. आतां अधिक कांहीं मला सांगायचं राहिलं नाहीं."

असें ह्मणून दिवाणजी अगदीं तळतळतच तेथून निघून गेले. आपण यशाकराचें चित्त वळवूं, अशी त्याला मोठी आशा होती; परंतु ती आशा पार नाहींशी झाली. जो करारीपणा बापांत तोच करारीपणा मुलाच्या अंगीं उतरला आहे अशी त्यांची खात्री झाली आणि ते निघून परत दिगंबरपुरास आले.

दिगंबरपुराहून दिवाणजी गेल्यापासून दादासाहेबांस असें वाटत होतें कीं, पोरगा केवळ आपलाच हट्ट धरून बसणार नाहीं, दिवाणजींनीं त्यास येथली हकीकत सांगि-

तली व आपण पुन्हां मुखावलोकनसुद्धां करणार नाहीं असा कृतनिश्चय केल्याचें त्यास त्यांनीं सांगितलें, कीं तो वठणीस येईल. असें जरी वारंवार त्यांचे मनांत येई तरी मधून मधून असेंही त्यांस वाटे कीं, न जाणों आपलाच मुलगा तो, आपण ज्या प्रकारें वागत आलों, तीच शिक्षा त्याला आहे, तेव्हां तो तरी अशा तऱ्हेनें वागणार नाहीं ह्मणून कशावरून ! त्यानें मला अशा प्रकारें पत्र लिहिण्याचा धीटपणा व निर्भीडपणा केला, तो अगदीं शेवटपर्यंत तसाच करारीपणानें टिकाव धरणार नाहीं ह्मणून कशावरून ? हा विचार त्यांच्या मनांत येई पण क्षणभरच राही. परंतु तेवढ्यांत त्यांस दिवाणजी पद्माकराला घेऊन येतील याबद्दल अगदींसुद्धां आशा राहूं देत नसे. लहानपणापासून त्या पोराला आपण असा कित्ता घालून दिला; कित्येक वेळां आपल्याला घरांतली सर्व मंडळी अमुक करूं नका ह्मणून सांगत असतां आपण त्यांच्या कोणाच्याही बोलण्याकडे अणुरेणु मात्र लक्ष्य न देतां, आपण किती दुराग्रहानें आपलेंच ह्मणणें शेवटास नेलें; आपल्या दुराग्रहीपणामुळें आपली मंडळी आपल्यास किती भीत असतात; आपल्या कुटुंबाला आपण किती प्रसंगीं अश्रु गाळण्यास लाविलें; तिनें अमुक करावयाचें असें ह्मटलें असतां आपण तें नाहींच करावयाचें असा हट्ट धरून तिचा चाकरमाणसांच्या देखत किती पाणउतारा केला; ज्यांना तिनें कांहीं करण्याचें अभिवचन दिलें, त्यांचेजवळ तिची किंमत राहावयाची नाहीं, हा विचारसुद्धां मनांत न आणतां केवळ आपल्याला न विचारतां तिनें तें वचन दिलें एवढ्याच कारणानें तें तिला पाळूं दिलें नाहीं, इत्यादि अनेक प्रसंगांचें त्यांना स्मरण होऊन तोच प्रसंग आपला पोरगा आज आपणावर खास आणतो असें वाटून त्यांस वाईट वाटलें. परंतु हें वाईट वाटणें त्यांनीं एक क्षणभरसुद्धां आपल्या चर्येवरून किंवा आपल्या शब्दावरून कोणास दिसूं दिलें नाहीं. जें काय वाटलें, तें त्यांच्या मनालाच वाटलें. बाहेर मुळींसुद्धां उमटलें नाहीं. "मी फक्त दिवाणजींच्या येण्याची वाट पाहातों आहे. तो गेला आहे तो येईपर्यंत उगीच उतावळी करूं नये म्हणून. बाकी मला त्या कारट्याचा आतां मुळींच भरंवसा येत नाहीं. पत्रं पाठवून तारा करून जेव्हां त्यानं तसं पत्र लिहिलं, तेव्हांच मी समजलों, कीं आतां या कारट्यांत अर्थ नाहीं. हा बहकला. त्याचे आतां हात पोंचले असं त्याला वाटूं लागलं. मला आणखी माझा पोटचा मुलगा असं पत्र लिहून शहाणपणा शिकवील ही कल्पनासुद्धां नव्हती. असं होईल असं जर मला कोणीं सांगितलं असतं, तर मीं कधींसुद्धां त्यावर भरंवसा ठेवला नसता. पण त्या मुंबईच्या सुधारकांनीं त्याला घेरला. या लेंकांनीं असलीं पोरं गांठून त्यांना फसवायचाच धंदा आतांशा आरंभला आहे. मिशनरी लोक ख्रिस्ती करण्याकरितां जशी वाटेल ती खटपट करतात, त्यांचीच नक्कल यांनीं चालवली आहे. तमासगिरांनीं तमाशांत अगर नाटकमंडळ्यांनीं नाटकांत पोरं काढून न्यायचा जसा एक धंदा, तसाच हा या लोकांचा एक धंदा. लेंकांनीं आपल्या पोरी मोठाल्या कराव्या आणखी मग अशीं अजागळ कारटीं गांठावीं आणखी आपलं काम साधावं. कोण्या वेळेवर मीं

आपल्या या कारट्याला मुंबईस पाठवला कोणास कळे." अशा तऱ्हेचे उद्गार एकसारखे त्यांच्या तोंडून निघत होते. कांहींचा संताप आंतल्याआंत असतो, कांहींचा बाहेर पडतो, आंतल्याआंत राहत नाहीं. दादासाहेबांचा संताप आंतल्याआंत मावणारा नव्हता, तो बाहेर पडल्याखेरीज राहणें शक्यच नव्हतें. साप अतिशय संतापला म्हणजे फडा उचलून फत्कार करतो. वाघ अतिशय संतापला ह्मणजे फुत्कार करतो व शेपटी हापटतो. सिंह आयाळ सडसडावून गर्जना करूं लागतो, तशीच मनुष्याचीही स्थिति असते. दादासाहेबांस आजपर्यंत कधींही कोणीं स्वतःच्या मर्जीविरुद्ध वागल्याचा अनुभव नव्हता आणि तसें कोणी वागल्याकारणानें आपण दिलेलें वचन मोडण्याचा किंवा एखादें करूं म्हणून आरंभलेलें कृत्य तसेंच सोडून देण्याचा तर अनुभव कधीं म्हटल्या कधींही नव्हता; तो अगदीं एकाएकीं स्वतःच्या मुलाच्या अवज्ञेनेंच अंगावर आला, तेव्हां त्यांच्या मनाची काय स्थिति झाली असेल! त्यांस काय वाटलें असेल! जर पोरानें ऐकलें नाहीं, जर सोनवलीकरांस 'लग्न करतां येत नाहीं' असा निरोप पाठविण्याचा प्रसंग त्यानें आपल्यावर आणला, तर आपण खरोखरीच त्याचें मुखावलोकनसुद्धां पुनः करणार नाहीं. आपल्या इस्टेटीपैकीं एक तनसडीसुद्धां त्याच्या हातांत जाऊं देणार नाहीं. असा त्यांनीं आपल्या मनांत निश्चय केला. इतकेंच नव्हे, तर आपल्या सगळ्या इस्टेटीची कोणत्या प्रकारें व्यवस्था लावून टाकावयाची याचा विचार त्यांनीं कायम करून ठेविला. दिवाणजी आले आणि त्यांच्याबरोबर चिरंजीव नाहींत असें दिसलें कीं, व्यवस्थापत्र लिहून दिगंबरपूर सोडून काशीवास करावयाचा हा त्यांनीं आपल्या मनाचा निर्धार केला आणि दिवाणजींची वाट पाहात स्वारी बसली. या वेळीं आपल्या घरांत एखादा माधुकरी पोरगा जरी बाळगलेला असता, तरी त्याला आपली सगळी इस्टेट देऊन सोनवलीकरांनीं त्याला मुलगी द्यावी अशाबद्दल गळ घालून लग्नाचा बार उडवून दिला असता, असें त्यांच्या मनास वाटलें. परंतु तसा कोणी माधुकरी घरांत नव्हता किंवा दुसरा कोणी लग्न करून देण्याजोगा आश्रितही नव्हता. त्याला त्यांचा इलाज नव्हता.

वाट पाहातां पाहातां शेवटीं दिवाणजी परत आले. ते कितीवेळ तरी इकडे तोंड चुकव तिकडे चुकव. असेंच करीत होते. काय करणार बिचारे! कोणत्या तोंडानें यजमानापुढें जाणार आणि काय सांगणार? "दिवाणजी आला तो माझ्यासमोर कां येत नाहीं! मला आतां मुंबईची हकीकत मुळींच ऐकायला नको आहे. सगळं मी समजून चुकलों. पण त्याला ह्मणावं मी सांगतों तीं पत्रं ल्याहायचीं आहेत. तीं लिहून घेऊन जा." असें दरडावून दादासाहेबांनीं म्हटलें तेव्हां बिचारा त्यांचे समोर आला. त्यांस पाहातांच दादासाहेबांस अधिकच अवसान येऊन ते एकदम म्हणतात, "तूं जायलाच नको होतं. मला एक पोरगा होता तो मेला असेंच मी समजतों. आतां पुनः त्याचं नांव जर या घरांत निघालं, तर माझ्या कामीं पडणार नाहीं. बस्‌ संपला त्याचा आणखी आपला सगळ्यांचा संबंध. लिही, आतांच्या आतां सोनवलीकरांना पत्र लिही कीं, आपली कन्या

आम्ही आपल्या पुत्राला करणार होतों, परंतु तो पुत्र एकाएकीं निवर्तला. यामुळें आमचा शब्द आम्हांला खरा करतां येत नाहीं. आपण आपल्या कन्येला दुसरा वर पहावा. लिही, आतां लिही. या घटकेस, या पळास लिही आणि गाडी जोडून स्वतः सोनवलीस जाऊन तें पत्र दे."

हें सर्व भाषण दादासाहेबांनीं इतक्या संतापावेशांत केलें कीं, त्यांचें शरीर तर काय, परंतु ते बसले होते ती सर्व जागा त्यांच्या त्या आवेशानें किंचिन्मात्र हादरल्याप्रमाणें झाली. त्यांच्या त्या गर्जनाकल्पशब्दांनीं तो ओटा थोडीशी घुमली आणि "आमचा पुत्र एकाएकीं निवर्तला" असे शब्द त्यांनीं अशा कांहीं चमत्कारिक आवाजानें उच्चारले कीं, संतापानें त्यांचें मस्तक ठिकाणावर नाहींसें झालें असावें, असें प्रत्येकास वाटलें. त्यांचे ते शब्द ऐकणाऱ्या प्रत्येक माणसाच्या अंगावर शहारे उभे राहिले. प्रत्येक मनुष्याला कसेंसेंच झालें. बापानें अशा तऱ्हेनें आपल्या पोरांविषयीं बोलावें आणि दुसऱ्याला पाठविण्याच्या पत्रांत लिहिण्यास सांगावें, याच्यापेक्षां विलक्षण आणखी काय असणार? दादासाहेबांची पत्नी ढळढळां रडूं लागली. घरांतली इतर सर्व मंडळी अतिशय उदास होऊन बसली. दादासाहेबांच्यापुढें जाऊन "हें आपण काय बोलतां?" असें म्हणण्याचें धैर्य एकासही होईना. दिवाणजी मात्र भीत भीत म्हणतो:—"पत्र कशाला ल्याहायला पाहिजे? मी समक्ष जाऊन त्यांना सर्व समजावून सांगून येतों. झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. मी आपली पराकाष्ठा केली."

"बस्, बस् जास्त बोलूं नको. मी सांगतों तसं पत्र लिही. लिही, घे कागद, आहे वरच काळीकुळकुळीत रेघ. लिही, माना लिही."

"'श्रीमंत रा. रा....' लिही. तोंडाकडे काय पाहातोस? माझ्या तोंडाला आतां काळोखी लागली, तेव्हांच तुम्हांला पाहायला सांपडलं. नाहीं तर वर मान करून पाहायची तुमची छाती होती का? लिही, लिही. 'आपल्या गांवीं येऊन मुलगी पाहून आमचे पुत्राला ती मुलगी करण्याचं ठरविलं, पुढें आपण येऊन देण्याघेण्यासंबंधाची बोलणी होऊन तिथिनिश्चयही झाला, परंतु आमचा पुत्र काल आम्हांला एकाएकीं मेला. आतां तो विवाह होणं शक्य नाहीं.' लिही, लिही. माझ्या तोंडाकडे पाहूं नकोस. तोंडाकडे काय पाहातोस? बरोबर चांगलं काजळ फासलं गेलं आहे कीं नाहीं तें पाहातोस होय? पाहा, पाहा. नीट पहा. मुरकुटांनो, आतांच तुम्हांला पाहायला तर काय, पण त्याच्यावर येऊन बसायला सुद्धां दिक्कत नाहींशी झाली आहे. त्याला तुम्ही काय कराल? लिही. मी काय सांगतों? लिही. पुत्रविचित्र शब्द नरी कशाला पाहिजे? लिही, आमचा कारटा मला." या दर शब्दागणिक त्यांचें एक प्रकारें तिरस्कारपूर्ण हिसणें चाललेंच होतें, आणि दिवाणजी बिचारा, हा काय आपल्यावर भयंकर प्रसंग आला आहे असें वाटून कांहीं तरी लिहीत होता. "लिही, लिही" असा त्यांचा एकसारखा जप चाललाच होता. दादासाहेबांची प्रकृति संतापानें फारच बेताल झाली आहे, आपण या वेळीं त्यांचेविरुद्ध एक अक्षरसुद्धां बोलण्याची सोय नाहीं, हें त्या बिचाऱ्यानें जाणलें आणि मुकाट्यानें त्यांनीं सांगितलेला मजकूर खरडला. दादासाहेबांनीं तो त्यास पुनः वाचण्यास

सांगितलें. त्या बिचाऱ्याचे ओंठ थरथरां कांपूं लागले, त्यास वाचणें अशक्यच झालें. लिहितांना ज्याप्रमाणें "लिहीं, लिहीं" असें त्यांचें चाललें होतें, त्याप्रमाणेंच आतां "वाच, वाच" असा त्यांचा जप चालला होता. तो वाचीना तेव्हां "आण, तुला वाचवत नसलं, तर मी वाचतों. 'आमचा कारटा मेला,' हें त्यांत लिहिलं आहे कीं नाहीं तें मला पाहूं दे. तीं अक्षरीं लिहिलेलीं पाहिलीं म्हणजे माझें समाधान होईल. त्याखेरीज होणार नाहीं." असें म्हणून त्यांनीं त्याचे हातांतून तो कागद हिसकावून घेतला आणि तो पाहून ह्मणतातः—

"अरे, मी सांगितलेले शब्द यांत लिहिले नाहींस. "माझा कारटा मेला" हीं अक्षरें कुठें दिसत नाहींत."

हें त्यांनीं बोलण्यास आणि भिकंभटदादा चौकांत येण्यास एकच गांठ पडली.

आगीवर तेलच झालें!

---

# प्रकरण २० वें.

## भडका.



**चकांस** आठवत असेलच कीं, प्रथमतः लग्नाची गोष्ट निघाली व पुढें मुलगी पाहण्यास वगैरे मंडळी गेली, तेव्हां भिकंभटदादांनीं एक दोन वेळां अलीकडल्या मुलांच्या छांदिष्टपणाचा उल्लेख करून आपल्या चिरंजिवांचीं सल्ला घेतल्याखेरीज तुम्ही या वाङ्निश्चयाच्या भानगडींत पडूं नका, असें त्रिंबकरावदादांस सुचविलें होतें; परंतु त्या वेळीं त्यांस भिकंभटदादांच्या त्या बोलण्याचा संताप येऊन त्यांनीं त्यांची टर उडविली. तेच भिकंभटदादा आज अशा वेळीं दूत म्हणून उभे राहून आपली फजिती पाहण्यास आले हा विचार, तो प्रसंग आणि ती प्रत्यक्ष मूर्ति पाहण्याबरोबर स्वारींच्या चित्तांतील कोपाग्नि अधिकच भडकला. "भिकंटदादा, तुमच्या इच्छेप्रमाणं झालं. जशी तुम्हीं इच्छा केलीत तसं झालं. त्यांत तुह्मांला समाधान आहेना? घ्या; आतां अगदीं मनसोक्त समाधान करून घ्या, आणखी या अशा स्थितींत तुह्मी माझी हेटाळणी करा. दुसरा प्रसंग तुह्मांला आतां यावज्जन्मांत मिळणार नाहीं. या, या. अगदीं मनसोक्त हेटाळणी करून घ्या. भिकंभट, कारटा नवज्वरानं किंवा दुसऱ्या कांहीं आकस्मिक कारणानं अपघात होऊन मेला असता, तर मला इतकं वाईट वाटलं नसतं. पण अशा तऱ्हेनं मेला—मला मुकला—याबद्दलच मला फार खेद होतो. ज्या मीं तोंडांतून शब्द काढला तो पाळल्यानं वाटेल तें नुकसान झालं तरी हरकत नाहीं. म्हणून आपला शब्द खरा करण्याकरितां

प्राण टाकीत होतों, त्याच मला आज अगदीं लाचार होऊन मुठींत नाक धरून बसण्याची पाळी आली आहे. ज्या तोंडानं 'हो' म्हटलं त्याच तोंडानं 'ना' म्हणण्याइतकी माझी स्थिति झाली आहे. तेव्हां जगून तरी काय करायचं आहे? जाणार, मी अगदीं कृतनिश्चय केला आहे. अगदीं माझी खात्री झाली कीं, आतां आपण इथें राहाण्यांत मुळींच अर्थ नाहीं. त्यांत अर्थ काय? आपल्या कारट्यांनीं आपल्यावर असा प्रसंग आणला, तर आपण काय करणार? त्याचं पुनः मुखावलोकनसुद्धां करणार नाहीं. त्याच्या पलीकडे आपल्या हातांत काय? भिकंभटदादा, तुम्हांला मोठं समाधान झालं असेल नव्हे हें सारं ऐकून? व्हायचंच तें. मी आंधळा तुम्ही डोळस. मला दिसलं नाहीं, तुम्हांला दिसलं. तुम्ही मला बजावलंत, तेव्हां मी तुमची अगदीं हेटाळणी केली, पण त्याच माझी आतां तुम्ही हेटाळणी करणार. अलबत करा. काय म्हणून करूं नका म्हणेन? मला आज कित्येक दिवस लोक सांगत आले कीं, तुमच्या कारट्याची अवस्था ठीक नाहीं; तो अगदीं बहकला. मुंबईला राहून त्याचं मन अगदीं बहकलं. तो ज्या त्या परीक्षेंत वर आला, मी म्हटलं माझा मुलगा तसा यायचाच. त्याबद्दल शंका काय? त्यांत नवल काय? पण गाढवाचे कान लहानपणीं अगदीं लहान व गोजिरवाणे असतात, ते मोठेपणीं जेव्हां का आपलं स्वरूप दाखवतात तेव्हां खरं स्वरूप दिसतं. काय दादा! गप्प काय बसलां? तुम्ही आलांत ते कांहीं गप्प बसायला आलां नाहींत, हें खास. सडकून बोला अगदीं, बोलाल तेवढं आतां कमीच होणार आहे. झाली खरी तशी स्थिति! मग तुम्ही तरी कमी कां करावं?"

ज्याप्रमाणें फार उंचावरून पडणाऱ्या जलप्रवाहाचा धो धो धो असा आवाज होत असतो, त्याप्रमाणें दादासाहेबांच्या मुखांतून वर सांगितल्याप्रमाणें कठोर असा वाक्प्रवाह चालू झाला होता. कांहीं मंडळी अशी असतात कीं, त्यांचा संताप आंतल्याआंत धुमसत राहून मनाची राखरांगोळी करतो. कांहीं अशी असतात कीं, त्यांचा संताप आंतल्याआंत कधींच राहूं शकत नाहीं. गोवऱ्यांच्या खांडाला अग्नि लागला कीं, ज्वाला बाहेर पडण्याच्यापूर्वी नुसतें धुमसणें सुरू होऊन ती आंतआंत धुमसत जाते; परंतु कागद किंवा कपडा यांस अग्नि लागल्याबरोबर किंचित् वारा लागतांच त्यांचा भडका उडतो. दादासाहेब या दुसऱ्या प्रतीच्या मंडळीपैकीं होते. त्यांच्या पोटांत कधींच कांहीं राहावयाचें नाहीं. संताप झाला कीं, त्यांचा भडका उडालाच. मग तेथें तो दडून राहाणें शक्यच नाहीं. आधींच त्रिंबकरावदादांच्या अंगाचा भडका उडाला होता आणि त्यांत भिकंभटदादा पुढें आले. मग काय? पण त्यांच्या त्या वर्षावानें भिकंभटदादा नुसते चकित झाले. भिक्षुक मंडळींना गांवांत कोणाच्या येथें काय झालें आहे, चाललें आहे किंवा होणार आहे, हें माहीत नाहीं असें कधींच शक्य नाहीं. त्यांतून भिकंभटदादांसारख्या भिक्षुकाग्रणीस तर काय अगदीं चित्तंबातमी असावयाची. परंतु ते सुद्धां तो वरील प्रसंग पाहून अगदीं थक्क झाले. त्यांनासुद्धां इतक्या थरावर गोष्टी गेल्या असतील असें वाटलें नव्हतें. या वेळीं आपण काय बोलावें हें त्यांस

सुचेना. ते केवळ आपलें तटस्थपणें ऐकत उभे राहिले. तपकिरीच्या डबीचें झांकण काढून त्यांनीं चिमूट डबींत घातली होती ती तशीच्यातशीच तेथें थबकली होती. त्यांचें तें पांढरें मळिन पट्ट्यांचें गयाळी पागोटें डोक्यावरून किंचित् मागें सरलें होतें तें सांवरून पुढें ओढण्याचेंसुद्धां त्यांस भान राहिलें नाहीं. आश्चर्यचकित होऊन वरेंचसें उघडलेल्या त्यांच्या मुखांत त्यांची पांढुरकी जीभ किंचित् अधर अशीच दिसत होती. डबी उघडण्यासाठीं उजव्या हातची काठी डाव्या काखेंत त्यांनीं मारली होती, ती अर्धवट गळून आतां अगदीं पडण्याच्या बेतांत आली होती. तितक्यांत दादासाहेबांच्या भाषणाचा तो धो धो वर्षाव जरा बंद झाला, यामुळेंच भिकंभटदादा थोडे शुद्धीवर आले. त्यांनीं आपली चिमूट बाहेर काढून तपकीर नासिकारंध्रांत कोंबली. फडकें घेऊन नाकावरून फिरविलें. फडकें फिरवितांना अगदींच गळून पडलेली काठी उचलली. नंतर त्या काठी धरलेल्या हातानें आपली डोक्यावरली चुंबळ मांवरली आणि स्वारी डबी कनवटीस खोंवीतखोंवीत दादासाहेबांच्या जवळ येऊन खालीं बसली. दादासाहेब जणूं काय इतक्या वेळच्या बोलण्यानें अगदीं थकूनच जाऊन अगदीं स्वस्थ बसले होते. भटजी जवळ जाऊन आपली काठी आधीं आपल्यापुढें आडवी टाकून बसतांच ह्मणतात, “ दादासाहेब, माझ्या त्या बोलण्याची काय आपण किंमत धरतां ! आजकाल दिवसच असे आले आहेत कीं, लहान पोरें आह्मांला शहाणपणाच्या गोष्टी शिकवितात. अहो, आह्मी विद्यार्थी होतों, गुरुघराण्यांत पढत होतों. पण वडिलांच्यापुढें उभं राहण्याची कीं, गुरुजींच्यापुढें एक चकार शब्द काढण्याची सोय नव्हती. पण आतां पोटचीं पोरें ह्मातार्‍यांची टर उडवूं लागलीं आहेत. आह्मांला न विचारितां तुह्मी अमुक गोष्ट कां केली ह्मणून दरडावून विचारतात. आपल्या चिरंजिवांनीं असाच कांहीं वेडेपणाचा निरोप पाठवला आहे. खरं असलं, तर आतां आपण काय करणार ! मीं आपल्याला आधीं बजावलं होतं तें एवढ्याकरतांच. अहो. कलियुगमहात्म्यांत हेंच सारं लिहिलं आहे. या यवनांचं राज्य झालं ह्मणजे हाच सगळा अनाचार, भ्रष्टाकार व्हायचा, असं स्पष्ट त्यांत लिहिलं आहे. मुलांनीं आईबापांचा अपमान करायचा. शिष्यांनीं गुरूला शहाणपणा शिकवायचा. गुरूवर फिर्यादी करून त्याला वेळ पडली तर तरुंग दाखवायचा. आपल्याला स्वतंत्रपणानं वागायचं ह्मणून आईबापांना वाटेल तसं बोलायचं. त्यांचा अपमान करायचा, त्यांची हेटाळणी करायची, हें सगळं त्यांत लिहिलं आहे. कलिराजाच्या राज्यांत हें असंच चालायचं. आतां आपण आपलं यापासून दूर राहावं हेंच उत्तम. दादासाहेब, आपल्या सारख्यावर आला प्रसंग खरोखर शत्रूवरसुद्धां येऊं नये. ही गोष्ट अगदीं खरी. अहो ! आपल्या सारखे गृहस्थ एकीकडे, सोनवलीकरांसारखे गृहस्थ दुसरीकडे. त्यांचीं आपलीं बोलणीं झालीं. सगळ्या गोष्टी ठरल्या. आणखी आतां कांहो असा प्रसंग यांनीं आपल्यावर आणावा ! लोकांत जिकडे तिकडे काय होणार ! पण त्याला आतां आपण काय करणार ! कांहीं लहान पोर नव्हे, तर दोन तोंडांत भडकावून हातांत धरून काम करून घेतलं असतं. हें ह्मणजे काय !

उलट आपणां वडील माणसांनाच भय वाटायचं. ह्मटलंच आहे कीं, 'प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्!' तसा प्रकार नाहीं झाला, म्हणून त्यांनीं आपल्याला काय हें प्रायश्चित्त द्यावं काय? पण सगळाच मनु फिरला. आपल्याला सांगतों, मी अगदीं लहान होतों. आणखी आमचा नारायण दीक्षित असाच माझ्या वयाचा होता, तर वडिलांच्यापुढें जाईल कोण? 'भिक्या, नान्या' असं आमच्या वडिलांनीं दरडावून ह्मटलं पुरे, कीं आमची अगदीं त्रेधा झालीच. मग कांहीं त्यांच्यासमोर तुसतं जाण्याची मुद्दां छाती नाहीं. पण आतांची ही पिढीच जे आहे ते अगदीं निराळी. मुलं धिटाईनं बोलतात काय? पत्रं लिहितात काय? आपली "मत्तं" "मत्तं" आम्हांला सांगतात. म्हणतात आमचं "मत्तं" तुमच्यासारखं नाहीं. दादासाहेब, या तुमच्या या सभा, हे तुमचे धांगडधिंगे, आणखी मागल्या सगळ्या आचारविचारांची हेटाळणी या गोष्टींमुळं हा सगळा प्रकार झाला आहे. पण या लोकांचे डोळे कुठें उघडताहेत? त्यांना वाटतं आहे सुधारणा चालली आहे. अहो ही कसली सुधारणा! कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहाणार नाहीं, ही सुधारणा कसली! पण समजतं आहे कोणाला? आतांपर्यंत झालं हें, दादासाहेब, कांहींच नाहीं. याच्यापुढें तर फार फार विलक्षण प्रकार होणार आहेत."

दादासाहेबांच्या अस्वस्थ चित्तास समाधान देण्याच्या बुद्धीनें जर भिकंभटदादा हें सर्व बोलले असले, तर आपला हेतु अगदीं निरर्थक करण्याला दुसरी कोणती युक्ति त्यांस इतकी उपयोगी पडली नसती. दादासाहेब एकदम संतापून म्हणाले, "अहो, नाहीं कोण म्हणतो? मी तर या पाजी लोकांना अहोरात्र शिव्या देत आलों. 'तुझे हे सुधारणेचे ढंग मोडून दे.' सुधारणेच्या नांवाखालीं स्वार्थ साधणाऱ्या लोकांबद्दल त्याला मीं किती प्रकारानं सांगितलं. भिकंभटदादा, हे लोक आपलं जाळं टाकून माझ्याच कारट्याला पकडतील ही कल्पना मुद्दां मला नव्हती. किती झालं तरी माझ्या शिक्षेचं पोर, ते कधीं वावगं जाणार नाहीं, ही माझी खात्री. पण त्याला-त्याला या पाजी लोकांनीं फुसलावून घेतला. अहो, यांचे धंदेच हे. स्वतःच्या अंगाला यत्किंचित्‌मुद्दां धक्का लागूं यायचे नाहींत. स्वतःवर प्रसंग आला, तर कधीं पुढें पाऊल टाकतील तर शपथ. पण सभेंत लांचलांब जिभा काढून बोलतील आणखी अशीं माझ्यासारख्यांचीं भोळीं-भाबडीं पोरं फुसलावतील. माझ्यासारख्यांचीं बरं; माझ्यासारख्यांचीं. कारण काय, तर मी जेव्हां तेव्हां यांचीं टाळकीं सडकतों. आतां आलाच आहे कीं नाहीं माझ्यावर प्रसंग! आलाच आहे. बरं, कारट्याला इतकं सांगत, शिकवीत असतां जर त्यानं ऐकलं नाहीं, तर त्याचीं फलं तो भोगील. मी तर आतां त्याचं मुळीं-मुद्दां तोंड पाहाणार नाहीं. तो मला मेला आणखी मीही त्याला मेलों."

"हः हः दादासाहेब, हें काय हें आपण बोलतां! असं भलतंच बोलूं नये. आपण विचार करावा कीं, किती झालं तरी तो आपला मुलगा. आज नाहीं उद्यां त्याचे डोळे उघडतील. अजून तो लहान आहे. चार परीक्षा झाल्या ह्मणून काय जगाचा अनुभव येत असतो? उद्यां जगाचा

थोडासा अनुभव आला कीं, शहाणपण येईल. जे आहे ते आमचे एक चुलतबंधु होते. म्हणजे आमच्या बाबादीक्षितांचे मधले चिरंजीव. ते आपल्या कर्मांत फार उत्तम, अगदीं प्रतिबृहस्पति. त्यांनीं एकंदरीं सांगलीस अग्निष्टोमांत सामगायनसुद्धां जे आहे ते केलं. वय उगीच बावीस वर्षांचं असेल नसेल. आणखी कांहीं कारणानं वृत्ति फिरली. वृत्ति फिरण्याबरोबर वडिलांच्या अवज्ञेला सुरुवात झाली. पुढें आपल्याला सांगतों. म्हारीची इतकी वृत्ति फिरली कीं, आतां याला घरांत येऊं सुद्धां देण्याची सोय नाहीं अशी अवस्था झाली. तेव्हां घरांतून जाण्याविषयीं सूचना करून त्याला घालवून द्यावं लागलं. परंतु, दादासाहेब, सांगायचं तात्पर्य इतकंच कीं, शेवटीं आमच्या बाबादीक्षितांनीं त्याच्या पायीं दिगंबरपूर सोडलं. दहा वर्षपर्यंत पितापुत्राचं दर्शन नाहीं. शेवटीं त्याची वृत्ति पुनः ताळ्यावर येऊन त्यानं काशीस जाऊन त्यांचे पाय धरले. पण बाबा कांहीं कमी करारी नाहींत. 'तूं स्थितीवर आलास एवढ्यांतच मला आनंद आहे.' असं ह्मणून त्यांनीं त्याला परत लावलं."

भिकंभटदादाच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें त्यांनीं ही कथा सांगण्याचा हेतु काय असेल तो एकीकडेच राहून दादासाहेबांच्या मनावर त्याचा अगदीं विपरीत परिणाम झाला. ते तावडतोब त्यास ह्मणाले: "बरोबर, बरोबर. तुमच्या बाबा दीक्षितांनीं जें केलं तें अगदीं यथायोग्य केलं. त्याला भेटले, हीसुद्धां त्यांची चूकच झाली. मुखावलोकन करायचं नाहीं तर आमरणान्त करायचं नाहीं. मग निश्चय तो काय? आपल्या गाढवपणाच्या अवज्ञेनं आपण आपल्या बापाला कोणत्या विलक्षण प्रसंगांत घालतों आहोंत, हें समजण्याइतकी ज्याला अक्कल नाहीं, आणखी बापाची फार फजिती होईल, नामुष्की होईल, त्याला जगांत तोंड दाखवायला जागा राहायची नाहीं, इतक्या सगळ्या गोष्टी स्पष्टपणानं सांगून विनवण्या करून जो काय्टा ऐकत नाहीं. त्याच्या पश्चात्तापांत काय अर्थ आहे? तो आह्मांला मेला आह्मी त्याला मेलों. आतां त्याची क्रियाच नेवळी करायची राहिली, दुसरं कांहीं उरलं नाहीं."

प्रत्येक गोष्टीला कांहीं तरी मर्यादा असते. त्याप्रमाणें प्रत्येक व्यक्तीच्या नम्रपणालाही कांहीं तरी मर्यादा असते. दादासाहेबांच्या कुटुंबांतील मंडळी त्यांचें सर्व भाषण ऐकतच होती. ते दिवाणजीस "माझा कारटा मेला. लिही, लिही" असें आरडून ओरडून कंठशोष करून सांगत होते, त्या वेळीं प्रत्येकाच्या अंगाला अगदीं शिरशिरी बसे. त्यांच्या पत्नीची तर काय अवस्था झाली असेल याचें वर्णन करणेंच शक्य नाहीं. परंतु ती माउली स्वस्थपणें ऐकून घेत होती. हजार वेळां तिच्या मनांत आलें कीं, आपण मध्येंच बोलून नवऱ्यास कांहीं तरी द्यावें. परंतु एवढा धीर त्या बिचारीस कोठला? दादासाहेब कोण कर्दनकाळ! त्यांच्यापुढें आजपर्यंत बोलण्याची शिरशिरी होती कोणाची? आतां उतारवयांत एखादा दुसरा शब्द बोलूं लागण्यास सुरुवात झाली होती. त्यांत देखील एकंदर तालामाला पाहूनच सर्व चालावयाचें. परंतु आज तिचासुद्धां आळा सुटण्याची वेळ आली. स्त्रिया सर्व कांहीं सहन करतील. प्रत्यक्ष स्वतःला मार बसला तरी तो त्यांना सहन

होतो. परंतु पोटच्या पोराला कोणी नाहीं नाहीं तें बोलूं लागलें, तर त्यांना तें क्षणभरसुद्धां खपत नाहीं. त्यांतून भरल्या सरल्या घरांत त्याच्या मरणाची गोष्ट वेळेनावारीं काढणें, तो मेला असें एका पांच मिनिटांत पन्नास वेळ ह्मणणें हें कसें सहन व्हावें ? त्यांतूनही त्या माउलीनें आतांपर्यंत सहन केलें. आतांपर्यंत जें काय चाललें होतें तें घरांतल्या घरांत मंडळीजवळ चाललें होतें. इतर परकी कोणी तेथें नव्हतें. परंतु आतां भिकंभटदादासारख्या परक्या माणसाच्या देखसही तोच उच्चार झाल्याबरोबर तिचा आपल्या मनावरचा दाब नाहींसा झाला आणि ती उभी होती तेथून दोन पावलें पुढें येऊन कठोर व तीक्ष्ण शब्द काढून ह्मणालीः—"आजपर्यंत मी कधीं अशी समोर येऊन उभी राहून बोललें नाहीं. पण आतां हें फार झालं. पोरानं करूं नये एखादी गोष्ट; केली म्हणून एकसारखं हें असलं बोलायचं का काय ? आणखी परकी लोकांच्या देखत ? आहे काय ? नसेल त्याच्या मनाला मुलगी आली, नाहीं तर नसेल त्याच्या मनांत एव्हांशीं लग्न करायचं, म्हणून कांहीं हें असलं बोलणं ! तें बोलणं ऐकूनच मघापासून मला हींव भरल्यासारखं झालं. झाली ती झाली गोष्ट. पण कांहीं तरी विवेक मनाला ? शब्द उच्चारतात तरी कसे, हेंच मला समजेना."

आजन्मात् जो अनुभव आला नाहीं, तो एकदम आला ह्मणजे मनुष्याला अगदीं विलक्षण होतें. स्वतःच्या पत्नीनें आपल्यासमोर येऊन अशा तऱ्हेनें आपल्याला बोलणें दादासाहेबांस आज इतक्या वर्षांत कधीं ठाऊक नव्हतें. ज्याप्रमाणें मुलाकडून कधीं आपली अशी अवज्ञा होईल, ही त्यांस कल्पना नव्हती, त्याचप्रमाणें कधीं पत्नी असें बोलेल हीही पण कल्पना नव्हती. परंतु आज तो प्रत्यक्ष अनुभव आला, आणि कधीं न घडणारा एखादा चमत्कार घडल्याबरोबर मनुष्य जसा अगदीं चकित होऊन स्तब्ध बसतो तद्वत् त्यांची अवस्था झाली. डोळे विस्फारले, काळिजाचे ठोके बंद झाले, तोंड अगदीं मिटलें आणि अगदीं शून्य दृष्टीनें ते वर पाहूं लागले. हा प्रकार आहे तरी काय ? एका आठा दिवसांत—नव्हे एका दिवसांत—आपलें वजन नाहींसें झालें काय ? आपला दरारा कोठें गेला ? मुलगा ऐकेना, बायको पुढें येऊन जरबीनें बोलूं लागली. सुमारें दहा मिनिटेंपर्यंत स्वारी वर सांगितल्याप्रमाणें स्तब्ध बसली. नंतर एकदम दिवाणजीस हांक मारून त्यांनीं त्यास लवकर कागद, दऊत व लेखणी आपल्याजवळ आणण्यास सांगितलें. आपल्या हातानेंच कांहीं कागदावर लिहिलें. त्याचा लखोटा करून तो बंद केला. आतांच्या आतां हा सोनवलीस सोनवलीकरांस नेऊन देण्यास सांगितलें. तो गुळमुळूं लागला. 'गुळमुळण्याचं कारण नाहीं, आतांच्या आतां मी सांगतों तें झालं पाहिजे,' असें दरडावलें. दिवाणजी गुळमुळून दूर झाला. भिकंभटदादा आतांपर्यंत गप्प बसले होते, ते मधेंच ह्मणतातः—"रागाच्या सपाट्यांत बोललेलं भाषण आणि लिहिलेलं पत्र पश्चात्तापाला कारण होतं. तें दुसऱ्या कोणाला दाखवून मग पाठवा." परंतु दादासाहेबांनीं एका शब्दानेंसुद्धां त्यांस उत्तर दिलें नाहीं. ते आपले आणखी कांहीं लिहिण्याच्या भरांत होते.



सोन्याबापू व प्रोफेसर ब्रांडी. (प्रकरण २१ वें पहा.)

# प्रकरण २१ वें.

## प्रोफेसर ड्यांडींचें साधलें !




हऱ्यावर संतोषाची लकेर स्पष्टपणें दिसत होती आणि अत्यंत उल्हसितपणेंच प्रोफेसर ड्यांडी आपल्या लहानग्या मित्राशीं बोलत होते. " आय् से, सोन्या, **यू आर** आ ब्रिक—तूं इतका हुशार असशील ही कांहीं बोआ मला कल्पना नव्हती. बराबर काम केलंस तूं. आतां तुला पैशाची बिलकुल काळजी नको. जनरल **थंडरबरी**कडे तुला घेऊन जातों. त्यांची तुझी ओळख करून देतों. पण तुला नीट इंग्रजी बोलायला येत नाहीं. याला काय करावं ? कांहीं हरकत नाहीं. तुझं काम मीच करीन. तो परवां आपल्याला बोरीबंदरवर भेटला नाहीं का, मी सलाम करण्याच्या आधींच त्यानं टोपी काढलीन् तो ! तो **सर क्लॉपट्राप हमुड्रम्**—तो त्या दिवशीं गर्दी होती, नाहीं तर त्यानं मला आग्रह करून आपल्या फर्स्ट क्लासांत ओढून घेऊन सिमल्याला नेलं असतं. टोपी काढलीन् मीं सलाम केला, आणखी मी पट्कन् त्याच्याकडून दुसरीकडे तोंड वळवलं म्हणूनच मी वांचलों, नाहीं तर माझ्यावरं त्या दिवशीं सिमल्याला जाण्याचा प्रसंग यायचा. अरे, हे साहेब लोक मोठे वाईट ! एकदां त्यांना आपली खरी योग्यता कळून त्यांनीं आपल्याला स्नेही म्हटलं कीं, मग पैशाकडे किंवा कशाकडे पहायचे नाहींत. मग तो स्नेहीच तो. ही आंगठी पहा, ही सापाच्या आकाराची आहे, आणखी वर ही हार्टच्या (हृदयाच्या) आकाराची टिकली आहे ही, ही मला **इथें** तो **कर्नल शॅम्टॉक्** नांवाचा मिलिटरी ऑफिसर होता, त्याच्या मुलीनं दिली. ही चिरूट केस् मोठा एंजिनियर पब्लिक्वर्क्सकडला **डबलडील** यानं दिलेली. ही सिल्व्हर कार्डकेस्...पण तुला मी उगीच कशाला सांगत बसूं ! हलके हलके या सर्व मंडळींची आणखी तुझी प्रत्यक्ष ओळखच घालून देतों म्हणजे मग तुझी तुलाच सारी माहिती होईल. तें राहूं दे. आतां आपण त्या बांकावर जाऊन बसूं. इथें सध्यां कोणी नाहीं. तेव्हां आपल्याला स्वस्थपणानं बोलून काय करायचं, काय नाहीं, कसं करायचं, तें ठरवायला मुळींच हरकत नाहीं. तुला सांगतों सोन्या, मला तुझ्याबद्दल जें काय वाटतं, तें कांहीं मला शब्दांनीं सांगतां येत नाहीं. बस् बस्, तूं माझा खरा मित्र. जें काय मी करीन तें आजपासून दोघांसाठीं करीन. मला इंग्लंडला जायची महत्त्वाकांक्षा आहे. कालच तो पी. ॲण्ड को. चा एजंट पुनः म्हणत होता कीं, तूं येत असलास तर मी आपल्याबरोबर तुला नेतों. तो जातो आहे वाटतं रजेवर—मला कायरे, मीं आतां म्हटलं तर आतां जाईन उद्यांच्या मेलनं. पण आतां

तुझ्यावांचून कुठें मी एकटा जाणार नाहीं. तूं माझ्या जीवापेक्षां मला अधिक झाला आहेस. हां माझं असंच साहेबलोकां-सारखं आहे बोआ. एकदां आपला स्नेही झ-टलं कीं, मग त्याच्याकरितां वाटेल तें करा-यचं. तूं आतां मला सांग पाहिजे तें करा-यला. सांग, तावडतोच करतों का नाहीं बघ. समुद्रांत उडी टाकायला सांग पाहिजे तर. एकदां जिवलग स्नेही म्हटला कीं, मग मी कधीं कोणत्याही गोष्टींत मागें म्हणून घेणार नाहीं समजलास ! अरे, एकदां जा-नीदोस्त झालोंना आपण !"

सोन्या तें ऐकून इतका आनंदला कीं आपण ब्याक्बेवर उभे आहोंत कीं स्वर्गांत उभे आहोंत याचेंच भान राहिलें नाहीं. तो प्रोफेसर ड्यांडीस लागलीच ह्मणतो, "हें सगळं मी पक्कं जाणूनच तर तुमच्याकडे आलोंना ! मला आतां एकदां ती साठ रुप-यांची चाकरी लावून द्या, मी नानांची पण अगदीं खात्रीच करून टाकतों कीं नाहीं पहा. ते असं समजतात कीं, आह्मांला कांहीं समजत नाहीं, आमचं कुठें वजन नाहीं. आम्हांला कुठें चाकरीचुकरी मिळा-यची नाहीं. तरी बरं, आपणच आज पंधरा वर्षेपर्यंत एकसारखे एका पगारावर बसले आहेत, फार तर चार दोन रुपये वाढले असले केव्हां तर कोणास ठाऊक ! आणखी मला एकदम हे असे साठ रुपये झाले कीं, आतां ते अगदीं थक्कच होऊन जातील. आईकडून त्यांना मी सगळं कांहीं सांगवलं पण ते ऐकताहेत कुठें ! , ते आपले तिलान् मला शिव्या देतात. तेव्हां त्यांची एकदां या कामांत चांगली सोळाआणे झाली पाहिजे, दुसरं कांहीं नाहीं. आईचं मन वळवायला मला फार त्रास झाला ! आज किती दिवस मी एक-सारखा तिच्या पाठीस लागलों आहें कीं, तूं मुकाट्यानं दे आपले दागिने, पण मी म्हणे त्यांना कळलं, तर ते काय म्हणतील ? शेवटीं काल जेव्हां अगदीं खणपटीस बस-ल्याप्रमाणं केलं, तेव्हां तिनं आपले आ-णखी...पण तें सगळं तुह्मांला काय सांगून करायचं आहे ? हे एकदां तुमच्या स्वा-धीन घेऊन उद्यां नेऊन भरा कसे, म्हणजे एकदांची माझी काळजी निवारण झाली."

"तें असूंदे. दागिन्याचं इतकं काय मला आहे ! आणलेस तरी तुझी तुलाच त्यांच्यामुळं चाकरी मिळणार. मला काय त्यांत आहे !"

प्रोफेसर ड्यांडी यांनीं तोंडानें हें सर्व म्हटलें, परंतु त्यांचे डोळे सोन्याच्या फुग-लेल्या खिशांकडे फार आशाबद्धपणें लागले. वरून मात्र आपण त्या संबंधांत अगदीं तटस्थ आहों असें दाखविण्याचा त्यांनीं यत्न केला व स्वारींनीं हलकेच चिरूट का-ढून तो पेटवून सोन्यास म्हटलें, 'हा बांक छान आहे. आपण याच्यावर बसून काय काय तूं आणलं आहेस तें पाहूं. म्हणजे एकंदर रक्कम तरी तुला जितकी भरायला पाहिजे तितकी भरते कीं नाहीं हें समजेल. पांच हजार रुपयांला ते एक दिडकीसुद्धां कमी घेणार नाहींत, ही गोष्ट ठरलेली. साठ रुपयांची नोकरी देणार ती पुरी रक्कम घेतल्याखेरीज ते कसे देतील ! कधीं देणार नाहींत. माझी तरी काय त्यांनीं रक्कम घेतली नाहीं ह्मणजे काय ! त्यांचा तो म्याने-जिंग डायरेक्टर कुवनूफट ऑलचोंश माझा स्नेही,—फार स्नेही, तो आणखी मी फ्रीमे-सन्, एकाच लॉजूचे म्हणून त्यानं माझ्या-पासून कांहीं जामीन किंवा हमी न घेतां दोनशें रुपयांची हेड अकाउंटंटची जागा

दिली. अकाउंटच्या बाबतींत त्यांचं माझं बोलणं झालं आणखी जेव्हां का मी त्याला त्या एन्ट्रीज् कशा कराव्या? आणखी इकडील आमची ओल्ड ओरिएंटल सिस्टिम् ऑफ अकाउंट्स् कशी आहे, तिकडली त्यांची इंग्लिश् सिस्टिम् कशी आहे- दोहोंत फरक काय आहे, आमची सिस्टिम् सुपीरिअर की त्यांची सुपीरिअर याच्याबद्दल एक लेक्चर दिलं, तेव्हां त्यानं पण अचंब्यानं नुसतं तोंडांत बोट घातलं, की बा! आणखी सांगितलंन् की मला तूं पाहिजेस बस्. आह्माला नेटिव्हलोकांत एकंदर व्यवहार वाढवायचा आहे. तुझ्यासारख्या दोनही सिस्टम जाणणाऱ्या माणसाची फार जरूरी आहे. दुसरं तिसरं कांहीं मी ऐकणार नाहीं. तुला वाटेल तो पगार घे. पण आय मस्ट् हॅव यू. मी सांगितलं, मला तुमच्या ब्यांकेंत नोकरी करायची जरूर नाहीं. माझं उत्पन्न मला पुष्कळ आहे. मी आज मितीला कोणाचे अर्ज लिहून देतों, अपिलं लिहून देतों, ऑडिटरशिप् पतकरतों. तर कमींत कमी पांचसहाशें रुपये मला पडताहेत. मग दुसऱ्याच्या ताबेदारीची मला जरूरी काय! पण तो कुठें ऐकतो आहे! ' आमचं नवं कन्सर्न आहे. तूं नियमितपणानं येऊं नको, पण दिवसांतून एकदां केव्हां तरी येऊन नुसते आदले दिवसाचे अकाउन्टस् पाहून जात जा.' अशा त्यानं विनवण्या केल्या. शेवटीं मला कबूल करणं भाग पडलं. करायचं काय, आह्मी फ्री मेसनरीच्या एका लॉजचे बद्रना? एकमेकांला मदत केलीच पाहिजे. नाहीं ह्मणण्याची सोयच नाहीं. असे माझे तिथें रिलेशन्स् आहेत, बाबा, म्हणून तुला एवढ्याशा पांच हजार रुपड्यांच्या ठेवीवर दरमहा साठ रुपयांची नोकरी मिळणार आहे, नाहीं तर कोण देतो आहे?"

मोन्याबापूस फ्री काय, मेसन काय, लॉज काय, आणखी एन्ट्रीज् काय, कांहीं मुद्दां समजेना. एवढें मात्र वाटलें कीं हें सर्व कांहीं तरी विलक्षण प्रकरण आहे; आणि प्रोफेसर झ्यांडी हे फारच मोठे व वजनदार ह्मणूनच केवळ आपल्याला ही चाकरी मिळणार आहे. नाहीं तर असली संधि आपणांस कधींच मिळती ना; हें मनांत येऊन त्यानें कृतज्ञता व आदर या दोहोंनीं युक्त अशा दृष्टीनें त्यांजकडे पाहिलें. त्यास असें वाटत होतें कीं आजकाल सन्माननीय व अनुकरणीय पुरुष सगळ्या मुंबईत असेल, तर तो प्रोफेसर झ्यांडीच होय.

प्रोफेसर झ्यांडींनीं त्याच्या नजरेंत कृतज्ञता भरलेली पाहिली व तिच्यामुळें त्यांस जास्तच उत्तेजन व स्फुरण येऊन ते म्हणतात, "आण, आण पाहूं काय काय आणलं आहेस तें, नाहीं तर आणले असशील हजार पांचशांचे दागिने आणखी ह्मणशील आहेत पांच सात हजारांचे. तुला कांहीं त्यांत समजत नाहीं, तुझ्या आईलाही समजत नाहीं, म्हणून ह्मणतों."

"नाहीं, नाहीं, प्रोफेसरसाहेब, तुम्ही मला अगदींच खुळा समजूं नका. पांच हजारांच्यावर किमतीचे दागिने आहेत. अहो, आमच्या आईचे दागिने कांहीं इतके नमतीचे पण आतां नाहं आली आहेना! तिचे आणखी सुद्धां......पण करायचं काय त्यांच्याशीं! हे पांच हजार रुपयांचे दागिने आहेत कीं नाहीं पहा, ह्मणजे तुमचं काम संपलं."

"बरं पाहूं, पाहूं, काय आहेत तुझे दागिने!" चिरूट तोंडांत तसाच धरून बो-

बडथा बोबडया तऱ्हेनें डयांडीसाहेब म्हणाले, आणि सोन्यानें तुमानीच्या डाव्या खिशांत हात घालून एक दागिना काढून त्यांच्यापुढें धरला. हा दागिना म्हणजे एक लठ्ठशी सरी होती. 'ही सरी' दीड शेराच्यावर आहे, असं आई म्हणत होती.' असें त्यानें म्हटलें.

आपल्या कुर्शावर डावा हात एटीनें धरून व उजवा हात पुढें ठेवून पुनः तोंडांतल्या चिरुटामुळें बोबडा बोबडा उच्चार करीत प्रोफेसर डयांडी म्हणतो, "काय! ही शरी दीड शेर वजन आहे! व्हॉट् नॉन्सेन्स्! अरे, ही तर माझ्या दृष्टीनं बाग तोळेसुद्धां भरणार नाहीं. फार झालं तर पंधरा तोळे भरेल."

"काय पंधरा तोळे म्हणतां? वाहवा! आई म्हणाली छत्तीस तोळे, आणखी तुम्ही म्हणतां पंधरा तोळे. आई कधीं खोटं सांगायची नाहीं," सोन्याही एक सिगोरेट् ओढीत होता ती पटकन् बाजूस धरून बावऱ्या दृष्टीनें प्रोफेसर डयांडीस म्हणाला.

"अरे, तुझी आई खोटं बोलते असं कोण म्हणतो, पण तिला वजनाचिजनाच्या भानगडी समजत नसतील. दीड शेर ह्मणजे काय आणखी शेर ह्मणजे काय! अरे, दीड शेर सोनं म्हणजे झालं काय, याचा विचार कर. ही सरी फार फार तर सोळा तोळ्यांची असेल याहून अधिक नाहीं, हें आपलं पक्कं ध्यानांत धर. आणखी आज सोन्याचा भाव फार तर वीस एकवीस रुपये आहे. मिळून तीनशें साडेतीनशें रुपये झाले फार तर. एवढ्यानं रे तुझे पांच हजार रुपये कसे भरणार मूर्खा! आणखी काय आणलं आहेस! आहे का कांहीं? का एवढंच?"

"एवढंच नाहीं हो, पण तुह्मी दर काय धरतां वीस रुपये? आणखी आई ह्मणाली, आतांशा अठ्ठाविसाचा भाव आहे. तेव्हां खरं काय आहे?"

"अगदीं लाडवेडं पोर आहेस तूं सोन्या. लेका, आईला या सोन्यानाण्याची, त्याच्या भावाची माहिती काय असायची? आई काय म्हणते आज अठ्ठाविसाचा भाव आहे का! तिच्या मतं एकटी सरीच तर हजार रुपयांची झाली. शाबास, बरं आणखी काय आणलं आहेस पाहूं. मोत्याचित्यांचे दागिने आहेत का काय, ते नाहींं हो उपयोगी. त्यांना त्या बँकेंत कोणीसुद्धां विचारणार नाहीं. सोनं बस. अस्सल शंभर नंबरी सोनं पाहिजे. सोनं पाहिलं कीं तें किती क्यारटचं आहे हा प्रश्न पहिल्यानं करतात. त्याखेरीज कांहीं नाहीं. काढ काय असेल तें!"

सोन्यानें ती सरी ठेवून पुनः एकदां मागें हात नेऊन तुमानीच्या खिशांत घातला; इतक्यांत प्रोफेसर डयांडींनीं सरी उचलून आपल्या तुमानीच्या खिशांत दडपली. "दुसऱ्या कोणाच्या नजरेस पडल्यास उगीच संशयावरून आपल्याजवळ येऊन आपल्याला त्रास देतील," असें सबळ कारण आपल्या त्या करण्याबद्दल सांगितलें. इतक्यांत सोन्यानें एक वांकीचा जोड काढला तो असाच चांगला लठ्ठ होता. त्याच्या किंमतीबद्दल व वजनाबद्दल सरीप्रमाणेंच भाषण होऊन तो जोड फक्त दहा तोळ्यांचा ठरला. वांकीच्या खिळींवर एकएक हिरा आहे असें सोन्यानें सांगितलें आणि डयांडीसाहेबांनीं नीट न्याहाळून पहाण्याचा बाणा करून, "छत्, छत्! अरे हे निवळ कांचेचे तुकडे आहेत. काय शिचं, आतांशा नकली काम निघालं आहे हो, मी त्यांतला दर्दी म्हणूनच मीं तेव्हांच ओळखलं, नाहीं तर दुसरा एखादा हे अगदीं खरे हिरे समजून किंमत करता. मला या कामांतली फार माहिती.

हजारों जिनसा माझ्या हातांतून गेल्या आहेत. परवां त्या बकबकपूरच्या नबाबाला ती गोल्डन ग्यांगची मंडळी फसवू पाहात होती, पण मी त्यांच्याबरोबर होतों, म्हणून तो फसला नाहीं, नाहीं तर अशी मोठी भाणें झाली असती कीं वा! गुलामांनीं तीन चांगलीं सुपारीएवढालीं माणकं आणलीं होतीं. नबाबसाहेबांच्याजवळ इतकीं माणसं, पण सगळ्यांनीं अगदीं वाहवा वाहवा करून त्या माणसांची तारीफ केली. पण मी जाण्याबरोबर माझ्यापुढें त्यांनीं आणलीं मात्र, जेव्हां का तीं अगदीं खोटीं आहेत म्हणून सांगून दिलं, तेव्हां ते जवाहिरे चिमणीएवढालीं तोंडं करून चालते झाले. पुनः त्यांनीं तोंड दाखवलं नाहीं. नबाबसाहेबांनीं मला शाबासकी देऊन आपल्या तिकडे बोलावलं. पण मीं साफ सांगितलं कीं, मी मुंबई सोडून कुठें येणार नाहीं. अरे, आपल्याला हे नबाबन् हे काय करायचे आहेत! आपण काय आपल्या घरचे नबाब नाहीं? नबाबच आहोंत! बरं, या वांकी झाल्या, आणखी काय आणलं आहेस! वांकीन् सरी मिळून झाले सरासरी पांच सहाशें रुपये!"

"पांच सहाशेंच रुपये!" सोन्यानें फार आश्चर्यानें त्यांस विचारलें. "काय, ह्मणतां काय तुह्मी! आईच्या म्हणण्याप्रमाणं तर या दोन जिनसा मिळून कमींत कमी दोन हजार रुपये झाले. आणखी तुम्ही म्हणतां पांच सहाशें रुपये. इतकं हो कसं अंतर पडणार? आई मला म्हणाली कीं..."

"आली पुनः तुझी आई. अरे, तुझ्या आईनं नुसते दागिने घालावे, तिला त्यांच्या किमतीसंबंधानं काय समजतं आहे वेड्या! बायकांना कांहीं तरी यांत समजतं का! त्यांना आपलं वाटतं, कीं पिवळं असलं ह्मणजे झालं सोनं. अरे, हें अगदीं हीणकस सोनं आहे. याची किंमत कोण देईल उत्तम शंभर नंबरी सोन्यासारखी? सोन्या लेका, तुझी आई तुला सांगते, आणखी तूं ऐकतोस? तुला स्वतःला कांहीं तरी समजतं का? बरं चल, आणखी काय आणलं आहेस तें काढ." असें ह्मणत ह्मणत त्या वांकीही ड्यांडीसाहेबांच्या पाटलोणीच्या खिशांत अटकन् गेल्या. पाठीमागून गोट निघाले. त्याच्या वजनाबद्दल व किंमतीबद्दल तसलीच बाटाघाट होऊन तेही आधींच्या दोन दागिन्यांच्या सोबतीस गेले. मागून एक तोड्यांचा जोड खिळीवर माणकें बसविलेला आला, तोही तिकडेच धांवला; आणि आपल्या सोबत्यांजवळ जाऊन बसला. सोन्याची मोटकुळी रिती झाली आणि त्याच्या परम मित्राची भरली. 'आतां आणखी कांहीं नाहीं' असें ह्मणतांच प्रोफेसर ड्यांडी त्यास ह्मणतात, "अरे, एवढ्यानं काय होणार बाबा! यांत दोन हजार रुपयेसुद्धां भरणार नाहींत."

सोन्या ह्मणाला, "आईनं सांगितलं आहे कीं, दागिने पांच सहा हजारांच्यावर आहेत." प्रोफेसर ड्यांडी नुसते हंसले आणि ह्मणाले, 'तुझी आई वेडी, ह्मणूनच तूं असा वेडा. बरं! असूं दे. तुमच्याजवळ कांहीं दागिने आणखी असले, तर मला सांग, नव्हे आणूनच दे. नाहीं तर एवढं तर मी उद्यां नेऊन देतों आणखी ड्यांकेंत सध्यां तुला तीस पसतिसांचीच जागा देववतों. आणखी दागिन्यांची भरती झाली तर तावडतोब प्रमोशन. त्याला काय उशीर आहे? मीच मुळीं तिथें राजा आहें ह्मटलं तरी

चालेल. मग तर हरकत नाहीं ? मीं आपली आज तुला अजमासानं किंमत सांगितली. बाकी आतां नक्की करून तुला उद्यां ब्यांकेंतली पावती, आणखी हुकूम पाठवून देतों. बोल घरच्या पत्त्यावरच पाठवून द्यायला सांगूं ना ? पण पावती घरच्या पत्त्यावर नाहीं पाठवून उपयोग. मदनानांना माहिती नाहींना हे दागिने असे आणल्याची ? मग त्यांच्या दृष्टीस पावती जर पडली, तर पंचाईत नाहीं का होणार ? पावती मीं आपल्याजवळच ठेवीन. हुकूम मात्र मुद्दाम टपालानं तुला उद्यां संध्याकाळाला फार तर परवां सकाळाला पोंचेल अशा बेतानं टाकवीन. कारण मीं उद्यां संध्याकाळीं जेव्हां अकाउंट ऑडिट करायला जाईन, तेव्हांच काय तें करणार कीं नाहीं ? चला आतां जाऊं. आतां एकदां तुला जागा मिळाल्याबद्दल कोटांत व्हिएन्नामालूनमध्यें जाऊन थोडा टी आणखी आईस्क्रीम घेऊं. आणखी मग तूं आपल्या घरीं जा. मीं आज तुला पार्टी देणार. मीं सगळा खर्च करणार. माय् लिटल् फ्रेंड. तुला ठाऊक नाहीं मी तुझ्यावर किती प्यार आहे तो. कम् , लेट अस् गो." .

असें ह्मणून स्वारींनीं आपली टोपी उचलून डोक्यावर चढविली, आणि छत्री घेऊन निघण्याची तयारी केली. तोंडांतला चिरूट विझला होता, तो पुनः पेटविला. सोन्याही उठला आणि त्यांच्याकडे पाहून ह्मणतो, "आतां मी आईला सांगूं ना मला उद्यां हुकूम येतो ह्मणून ? पण प्रोफेसरसाहेब, तिनं जर किती रुपयांची ह्मणून विचारलंन् तर काय सांगूं ? आतांपर्यंत तर आपण तिला सांगत आलों कीं, साठ रुपयांची नोकरी मिळणार ह्मणून पण आतां तुह्मी ह्मणतां तीसपसतीस रुपयांची. तेव्हां ती काय ह्मणेल ?"

प्रोफेसर स्वारींनीं तें ऐकून एकदां मोठ्यानें हास्यसमारंभ केला व ते त्यास म्हणतात, "पुनः पुनः तेंच तेंच बोलण्यांत काय अर्थ आहे ? तुला मीं केव्हांच सांगितलं कीं, तिथें पुरे पुरे पांच हजार रुपये पडल्याखेरीज कांहींमुद्दां उपयोग होणार नाहीं. तुझी आई तुला सांगते, आणखी तूं ऐकतोस. वेड्या हे दागिने पांच हजारांचे झाले असं तुला वाटतं तरी कसं ? हे फार फारअगदीं झाले तर सुमारें अडीच हजारांचे झाले. शिवाय जुने दागिनेना ? मोडींची भांडीं जशीं कोन्या भांड्यांच्या किंमतीनं कधीं जायचीं नाहींत, त्यांतलंच जुन्या दागिन्यांचं असतं. कोन्या दागिन्यांच्या निम्मे भावानंसुद्धां कधीं कधीं जात नाहींत. इकडे बघ, माझ्यावर तुझा विश्वास आहे का नाहीं ? नसला, तर हे आपले दागिने घे. अगदीं बेलाशक घेऊन जा. मला तरी रिकामी उठाठेव कशाला ? माझे उद्योग मला काय कमी आहेत ? तुझ्याकरितां ह्मणून मी यांत पडणार. हं पहा. स्नेहीं म्हटला, म्हणजे मग आपलं असं तसं नाहीं. त्यांत इतकासुद्धां दुजाभाव ठेवायचा नाहीं. जें आपलं तेंच त्याचं आणखी जें त्याचं तें तर आपलं आहेच. पण, बाबा, विश्वास पाहिजे. तुला असं का वाटतं, कीं मी कमी किंमतीला हे दागिने देऊन टाकीन ह्मणून ? अरे, सगळ्या दलाल स्ट्रीटमधल्या दलालांची पागडी घेणारा मी. मी तुझे दागिने दिढीनं विकीन, दिढीनं, आहेस कुठें ! त्यांतून तुझा विश्वास नसला, तर माझ्यासारखा मग फटिंग कोणी नाहीं. हिअर यू आर, चल. घे आपलं काय आहे तें आणखी हो चालता कसा;

पुनः तुझा आमचा अगदीं संबंध नको. जिथें विश्वास नाहीं, तिथें स्नेही स्नेही म्हणून कवटाळण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अगदीं अर्थ नाहीं. बोल, येऊन परत जायचं असलं, तर तसं सांग."

प्रोफेसरांच्या या चपटपंजरानें बिचारा सोन्या अगदीं गांगरून गेला. प्रोफेसरांचा स्नेह जाणें म्हणजे आपल्या सगळ्या आयुष्याचा पुरा नाश होणें अशी त्याची समजूत. आणि प्रोफेसर म्हणजे विश्वासूपणाचें केवळ निशाण. त्यांनीं असें झाडल्यानंतर तो बिचारा काय बोलणार !

"पुनः म्हणून त्या दोरगन्यांचे चार्चर्तीत मी एक चकारशब्द काढणार नाहीं. काढला तर पहा." असें म्हणून तीन तीनदां नाकदुऱ्या काढून त्यानें आपल्या पूज्यदेवतेचा कोप शांत करून तिला सुप्रसन्न केलें.

तरी पण, "तुला कळत नाहीं, मूर्खा, त्याला मी काय करूं ? बरं, एव्हांचा वेळ गय करतों." असें कांहीं हंसून, कांहीं गुरकावून व आढ्यतेनें म्हणून झ्यांडोसाहेबांनीं त्या पोरास अगदीं चूप केलें.

नंतर कोटांत साहेबी मिठाईवाल्याच्या दुकानीं जाऊन चहाकॉफी, आईस्क्रीम वगैरेंची 'फीस्ट' सोन्यास देण्याच्या हेतूनें स्वारींनीं ठाकुरद्वाराजवळ ट्राम गांठण्यासाठीं प्रयाण केलें. परंतु ट्राम येण्यास उशीर असल्यामुळें म्हणा किंवा ट्राममध्यें बसून जाणें म्हणजे मोठेपणाचें लक्षण नव्हे, आपल्यासारख्याला योग्य नव्हे असें वाटून म्हणा, त्यांनीं लागलीच एक पलीकडून जाणारी व्हिक्टोरिआ खुणावली आणि ती जवळ येतांच आंत बसून व सोन्यास आपल्याजवळ बसवून घेऊन त्या व्हिक्टोरिआवाल्यास "कोट! कोट!" असें जरा दरडावून सांगितलें.

वाटेनें जातांना दोन दिवसांत मिळणाऱ्या चाकरांचें व एकदां तेथें चिकटला म्हणजे चढतां होत होत कोणत्या जागेपर्यंत सोन्या जाईल त्याचें चित्र प्रोफेसरांनीं असें रेखाटलें, कीं वा ! तो बिचारा अगदीं आनंदांत गर्कच होऊन गेला. शिवाय प्रोफेसरसाहेब नानाप्रकारांनीं आपला मोठेपणा वर्णन करून त्या पोराच्या नजरेस आणून देतच होते. वाटेनें जातांना कोणी मोटारगाडींत बसून जाणारा पारशी, खोजा किंवा साहेब यांनीं पाहिला कीं, झ्यांडोंनीं त्यांस सलाम करावयाचा व तो कोण याच्याबद्दल सोन्यास समजावून सांगावयाचें; आणि त्या दिवशीं बडी बडी मंडळी इतकी कांहीं त्या दोघांस भेटली कीं, कांहीं विचारूं नये. सर जमशेटजी, सर दिनशा, ही मंडळी, सगळे कौन्सिलर, सगळे हायकोर्ट जज्ज, सगळे परदेशचे कॉन्सल, हे तर भेटलेच, पण मोठमोठाल्या कंपन्यांचे मुख्य एजंट, मोठमोठाल्या गिरण्यांचे मालक हेही मधून मधून भेटत होते. तो यांच्या व्हिक्टोरिआच्या डाव्या किंवा उजव्या बाजूनें गेला, तो कोणी ना कोणी तरी मोठा होता. ते दिवशीं गाडींतून कोणी लहान माणूस त्या रस्त्यानें फिरकलाच नाहीं. तीं नांवांची मालिका व सलामांची झडती पाहून सोन्या तर अगदीं थक्कच झाला. त्यास असें वाटलें, कीं आपण आहोंत तरी कोठें ? आजपर्यंत प्रोफेसर झ्यांडोंच्या मोठेपणाची कल्पना त्यास इतक्या स्पष्ट रीतीनें निदर्शनास आली नव्हती. आज मुंबईंत झ्यांडोंच्या ओळखीचा नाहीं असा मोठा माणूस अस्तित्वांत असणेंच शक्य नाहीं अशी त्याची पूर्ण खात्री झाली.

एक दोन साहेब बाजूनें गेले. रीती-

प्रमाणें प्रोफेसरांनीं त्यांस टोपी काढून सलाम केला. त्यांनीं तो पाहिला नाहीं किंवा पाहून घेतला नाहीं. त्याबरोबर ड्यांडीसाहेब मोठ्यानें हंसून व सोन्यास कोंपरानें डंवचून म्हणतात:—" पाहिलीस का मौज ! या सर लॉंगूईअर ॲम्प्रेटकडून मला दोन वेळां डिनरचें आमंत्रण आलें होतें, पण मीं कांहीं कारणानें नाकारलें. तेव्हां-पासून त्याचें आमचें बिनसलें आहे. रस्त्यांत भेटला तरी पहात नाहीं माझ्या-कडे. परवां क्लबांत गांठ पडली. तेव्हां त्यानें मला निक्षून सांगितलें, कीं तूं घरीं येऊन जेवून जाईपर्यंत मी कांहीं तुझ्याशीं बोलणार नाहीं, किंवा रस्त्यांत भेटलास तर ग्रीटिंग् करणार नाहीं ! असे हे साहेब लोक मोठे एककल्ली असतात. आतां मला जाणं भाग आहे. मला वाटतें आजच जावें. बहुतकरून तो आज घरींच असेल. चल तूं येतोस ? माझ्याबरोबर आलास तर कांहीं हरकत नाहीं. आयतीच तुझी ओळख होईल. मोठा छान आहे गृहस्थ अगदीं. चल येत असलास तर. "

तें आमंत्रण ऐकतांच सोन्याचे नेत्र हिऱ्यासारखे लकलकूं लागले. साहेबांच्या घरीं जाऊन त्यांच्याबरोबर त्यांच्या टेबलावर जेवण जेवावयाचें, म्हणजे एक अतिशय विलक्षण मान—जो कधीं कोणासही लाभावयाची शक्यता नाहीं, तो आपल्याला आपल्या स्नेह्यामुळें अगदीं अनायासें मिळणार, हा विचार नुसता मनांत येतांच स्वारी अगदीं आनंदनिमग्न झाली व " हो !! आपली कांहीं हरकत नाहीं चल " असें म्हणाली.

"ठीक आहे, चल. आतां तुझ्या माझ्यांत दुजाभाव मी समजत नाहीं, तेव्हां माझ्या ओळखी आहेत त्या ठिकाणीं तुझ्या ओळखी करून देतों म्हणजे ठीक होईल. पण पोरा तुला माझ्यासारखं इंग्रजी बोलतां येत नाहीं, लिहितां येत नाहीं, तेव्हां तुझा उपयोग काय व्हावा ! माझं पाहिलं, तें आपलं अगदीं लहानपणापासूनच इंग्रजी भाषेकडे लक्ष्य. पण आतां मी तुला करतों तयार बघ. तूं कां असा बावरतोस ? तुला असा तयार करतों, कीं हा मी का तूं मी, असं होऊन जावं सगळ्या लोकांचं. "

इतकें भाषण होतें आहे तों हॉर्नबीरोड्-वरून आडव्या रस्त्याला स्वारींची व्हिक्टोरिया वळली. तेथें एका इंग्रजी चहा-कॉफीच्या दुकानाजवळ गाडी उभी करून दोघेही खालीं उतरले व आंत गेले. गाडी तशीच तेथें उभी होती. सोन्या व प्रोफेसर आंत जाऊन एका सुंदर संगमरवरी टेबला-जवळ बसले, तों एक मडम अनावृतार्धांगी अशी मानेनें व चेहऱ्यावरील स्मितानें त्यांचें स्वागत करीत त्यांचेपाशीं आली. सोन्या याचेपूर्वी अशा कॉफी-हाऊसमध्यें कधीं आलेला नव्हता. त्याची एकट्याची मजल इराणी दुकानापलीकडे गेली नव्हती आणि प्रोफेसर ड्यांडींनीं त्याला आपल्याबरोबर इराण्यापेक्षां वरिष्ठ प्रतीच्या पारशी दुकानापलीकडे कधीं नेलें नव्हतें. प्रोफेसर ड्यांडी त्या बाईशीं कांहीं हलके हलके कुजबुजत इंग्रजींत बोलले. तिनें आपल्या नोकरास कांहीं हुकूम करून ती सोन्याच्या शेजारच्या खुर्चीवर बसली व त्याच्याकडे स्मित करून पाहून त्यास उद्देशून कांहीं बोलली. सोन्या आनंदांत तल्लीन झाल्यामुळें किंवा आपण हे कोठें येऊन पडलों असें होऊन गांगरून गेल्यामुळें अगदींच कांहीं बोलेना. मुकाट्यानें इकडे-तिकडे पहात होता. त्या बाईनें पुनः त्यास

कांहीं विचारलें. यास तें कांहींच समजलें नाहीं, आणि हा बावळ्यासारखा तिच्याकडे व आपल्याकडे व आपल्या गुरुवर्याकडे पाहूं लागला. तें पाहून गुरुवर्य पोट धरधरून हंसले व त्या मडमेस कांहीं ह्मणाले, तेव्हां तीही हंसली. ही मंडळी कां हंसताहेत हें त्या बिचाऱ्या पोरास समजेना. इतक्यांत चमचे, काटे, न्यापूकिन् वगैरे सर्व जिन्नसा येऊन त्या उभयांच्यापुढें मांडले गेले; आणि जिन्नस येण्यास सुरुवात झाली. सोन्यानें एकाही जिन्नसेला हात लावला नाहीं. फक्त आइस्क्रीम आलें तेव्हां एक चमचा भरून त्यानें तोंडांत घातला; परंतु त्यास जो वास दिला होता तो न आवडल्याकारणानें त्यानें पुनः चमचा भरून घेतला नाहीं. प्रोफेसर ड्यांडींनीं त्या बाईशीं बोलत हंसत विनोद करीत असा प्रत्येक पदार्थावर आडवातिडवा हात मारला कीं, वा! तें पाहूनच त्या बिचाऱ्या सोन्यास असें वाटलें कीं, आपण प्रोफेसरसाहेबांच्या किती तरी मागें आहोंत. यांच्यासारखें पूर्णपणें व्हावें ही त्याची महत्वाकांक्षा. परंतु ती परिपूर्ण होण्यास आपल्याला किती गोष्टी शिकल्या पाहिजेत हें आज पूर्णपणें त्याच्या लक्ष्यांत आलें.

वर सांगितल्याप्रमाणें जवळ जवळ दीड तास सोन्यास मेजवानी झाल्यानंतर प्रोफेसरसाहेब उठले व जावयास निघाले. सोन्यानें आज कांहींच घेतलें नाहीं, परंतु "पुढच्या खेपेस असं केलं तर खपणार नाहीं, या जेवणाची उत्तम संवय करून घेतली नाहीं, तर तुझ्या साहेबांशीं ओळखी व्हाव्या कशा? आणखी आमचा तूं पट्टशिष्य बनणार कसा?" असें पुष्कळ तऱ्हेनें गुरुवर्यांनीं प्रिय शिष्यास व्याख्यान दिलें. नंतर भाडीं नेणाऱ्या इसमास एक त्रिचनापल्ली चिरूट व बील एवढेंच ह्मटलें, त्याबरोबर त्यानें एका बशीवर दोन चिरूट व एका बशीवर बील आणलें. सोन्याबापूंनीं चिरूट शिलगावून एक दहा रुपयांची नोट काढून त्या बशीवर ठेवली व त्या मडमेकडे पाहून किंचित् स्मित केलें. तिनेंही डोळ्यांत मान लववली तेव्हां स्वारी तेथून निघाली. एवढ्या जेवणाकरितां दहा रुपयांची नोट दिली हें पाहतांच त्या पोराला फारच आश्चर्य वाटलें; परंतु तें आश्चर्य फार वेळ टिकलें नाहीं. कारण बाहेर अजून उभ्या असलेल्या व्हिक्टोरियांत प्रोफेसरांची स्वारी शिरल्यावर त्यास ह्मणते, "आय् से, यंग् च्याप्, माझी वहिवाट आहे अशी समजलास कीं नोट देऊन त्यांतून चार आठ आणेच जर परत यायचे असले, तर ते घ्यायच्या भानगडींत पडायचें नाहीं. नोट फेंकून देऊन निघून यायचं. त्याखेरीज मोठेपणा दिसत नाहीं, आज आतां तुला इथें आणला. आतां पुष्कळदां आणीन. हें आमचं नेहमींचं ठिकाण. रोज पांच दहा रुपये दुपारीं इथें उडायचे. सगळे जेवढे मिल् एजंट आहेत, ते सारे दुपारीं तीन वाजतां लंचला इथें यायचे. आणखी माझ्याशीं काम असो नसो. मलाही हटकून बोलावून इथें आमचे व्यापाराच्या संबंधाचे वादविवाद चालायचे. हा नेहमींचा क्रम. अरे, त्यांना माझ्यापासून फायदा होतो, माहिती किती मिळते! त्यांना एका त्यांच्या धंद्याची माहिती, पण मला अगदीं सगळ्या धंद्यांची माहितीना! तुला कांहीं पोरा यांत आतांच समजणार नाहीं. चल तुला आतां घरीं नेऊन पोहोंचवितों. पण नको, आतां तसं नको. तुझ्या घरीं मी

येणार नाहीं. इथें हा व्हिक्टोरिया स्टँड आहे, मी आतां इथेंच उतरतों. मला आज थोड-क्यांत कांहीं कामाला जायचें आहे. तूं याच व्हिक्टोरियांत घरीं जा, " असें ह्मटलें. नं-तर हलकेंच त्याच्या कानांत " याला भाडें बिडें कांहीं देऊं नको, तो मागणारच नाहीं. माझा नेहमींचा आहे. माझ्याकडे यायला सांग." असें गुणगुणून व सोल्याने त्या गा-डीवाल्यास " हिला घरीं पोंचव बरें का," असें ह्मणून स्वारी खालीं उतरून दुसऱ्या व्हिक्टोरियांत शिरलीही. सोन्यास विचा-ऱ्यास कांहीं बोलण्यास फुरसतसुद्धां झाली नाहीं, तों ती दुसरी व्हिक्टोरिया कोणीकडे गेलीही, व्हिक्टोरियावाल्यानें सोन्यास कुठें जायचें ह्मणून विचारलें. त्यानें आपल्या घराचा पत्ता दिला आणि गाडी तिकडे चा-लली, घराजवळ पोंचतांच हा उतरला व घरांत जाऊं लागला, तेव्हां गाडीवाल्यानें भाड्यासाठीं हटकलें. सोन्या त्यास अर्थात-च प्रोफेसराकडे जाण्यास सांगूं लागला. पण तो गाडीवाला ऐकेना. भाडें सोन्याजवळेंच मागूं लागला. मला दुसऱ्या गृहस्थाचें घर माहित नाहीं, मला इथें भाडें पाहिजे असें ह्मणून तंटा करूं लागला रस्त्यावर ही मं-डळी असली, आणि एकच गोंधळ उडाला इतक्यांत सदूनानाही तेथें आले.

# प्रकरण २२ वें.

## वैमनस्य.



"मी पाऊल तर घातलें खरें, आतां काय उप-योग ! जें होणें असेल तें होईल, एका पाठी-मागून एक प्रसंगच असे आले, कीं मला एक प्रकारचा विल-क्षण आवेग येऊन केलें तेंच, करावेंसें वाटलें. आणखी मला त्याबद्दल मुळींसुद्धां पश्चात्ताप होत नाहीं, इतकेंच नव्हे तर उलट आनंद होतो आहे." पद्माकर मोठ्या आवेशानें व हातवारे करून हे शब्द बोलला. जवळ आणखी दोन मंडळी होतीं. एक त्याचा जिवलग स्नेही प्रभाकर आणि दुसरा त्यांचा—त्यांनीं जीवावरल्या दुखण्यांतून सोडविलेला—स्नेही राजाराम. भाषण चाललें होतें, तें प्रभाकर आणि पद्माकर यांचेंच. प्रभाकर त्यास ह्मणत होता, " तूं आपल्या वडिलांस इतक्या निकराचे जबाब पाठविलेस हें अगदीं गैर केलेंस आणि यदाकदाचित् त्यांत गैर-पणा तुला वाटला नाहीं, तरी फाजील घाई तर खास केलीस. आजच नसलीं उत्तरें पाठवून विनाकारण घरच्या मंड-ळींची गैरमर्जी करून घेण्याचें कारण नव्हतें; " आणि पद्माकर त्यास प्रत्युत्तर देऊं लागला कीं, ' मी जें केलें आणि जेव्हां केलें तें योग्य व योग्यकालींच केलें.'

दादासाहेबांचें पत्र त्याच दिवशीं सकाळीं त्याचे हातीं आलें होतें. त्या पत्रांतील मजकूर अतिशय उद्वेग उत्पन्न करणारा होता–निदान तो वाचतांच पद्माकराच्या नळपायाला तिडीक येऊन ती मस्तकांत जाऊन मिनली, आणि तिच्या तिरमिरी-तच त्यानें सोक्षमोक्ष करणारा जबाब दादासाहेबांस पाठविला. तो जबाब आपण काय पाठविला हें त्यानें प्रभाकरास सांगि-तलें आणि त्यावरून वरील संभाषण झालें. दादासाहेबांचें पत्र संताप उत्पन्न करणारें होतें याबद्दल मुळींच मतभेद नव्हता; परंतु त्या पत्रास पद्माकरानें इतका जहालीचा जबाब पाठविणें अगदीं-सुद्धां रास्त नव्हतें. इतकेंच दोघांचें भाषण पद्माकर प्रथम अगदीं सौम्यपणें बोलत होता; परंतु पुढें पुढें तो चिरडीस गेल्या-प्रमाणें झालें आणि पटकन प्रभाकरास ह्मणतो, "तुम्ही अशींच, जें वेळेला तोंडीं येईल किंवा वेळेवर बरें दिसेल, तें भक-णारीं माणसं. आपला निश्चय कायम ठेवायचा. दादासाहेबांचं ऐकण्याचं कारण नाहीं, अशी भर पहिल्यापासून तूंच मला देऊन पुनः आज असं बोलतोस तेव्हां तुझ्या या वागणुकीबद्दल जेवढं न बोलावं तेवढं बरं. तुझ्यासारख्यापासून अन्य नव्हेच्या वर्तनाची अपेक्षा करणं ह्मणजेच मोठी चुकी होय. तुला असं वाटत असेल कीं, मी कमळेच्या आशेनं दादासाहेबांस असं पत्र लिहिलं, आणि कमळा मला देण्याचा तर बळवंतरावांचा विचार नसेल. तेव्हां आपल्यावर पुढें मागं कदाचित् दोष येईल, तर त्याची आतांपासूनच आपली संपादणी करून ठेवावी, पण तशी तुला बिलकुल भीति नको. मी तुला मुळीं-सुद्धां दोष देणार नाहीं."

पद्माकराचें हें बोलणें इतकें उपरोधिक-पणाचें होतें कीं, तें ऐकून प्रभाकरास चमत्कारिक वाटलें, आणि त्याला खेदही झाला. आजपर्यंत पद्माकर अशा तऱ्हेनें कधींच बोलला नव्हता. प्रभाकरही त्या बोलण्यानें थोडासा रागावला व एकदम म्हणाला: "हो. हो. पुढं मागं तुझी इष्ट गोष्ट साध्य झाली नाहीं आणि आपण विनाकारण आपल्या बापाच्या कृपेला व सर्व घरादाराला मात्र मुकलों, असा पश्चा-त्ताप होऊन तूं आम्हाला दोष देऊं नयेस, ह्मणूनच मी असं बोलतों असं कां म्हणे-नास! तुझा काय नेम आहे? आजपर्यं-तच्या तुझ्या स्वभावाच्या एकंदर अनुभवा-वरून मला असं वाटतं, कीं तूं मागंपुढं आमच्यावर दोष देणार, यांत मुळींसुद्धां शंका नाहीं."

दोघेही अत्यंत स्नेही. परंतु बोलण्या-वरून बोलणें वाढत गेलें. एक एक परीनें बोलला, तर दुसरा त्याच्याहून चढीनें बो-ललाच, असा प्रकार सुरू झाला. इतकेंच नव्हे तर त्यांची एकमेकांची खोटीनाटीं उणीं काढून एकमेकांस बोलण्याची अगदीं शिकस्त होते कीं काय, अशी भीति त्या त्यांच्या नव्या स्नेह्यास पडली.

अगदीं जीवश्चकंठश्च स्नेही. बोलण्यास सुरुवात झाली ती अगदीं सहजपणें, पण त्याचा अखेर परिणाम कांहीं तरी विचित्र व अनिष्ट होणार, असें वाटण्यास कारण झालें. शेवटीं पद्माकर प्रभाकरास एक फा-रच दुरुत्तर बोलला. तें इतकें मर्मभेदक होतें, कीं तें ऐकण्याबरोबर प्रभाकरास फार वाईट वाटलें. आणि तो अगदीं का-वराबावरा होऊन आपल्या मित्राकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहूं लागला. जो आतां बोलला तो आपला मित्र पद्माकरच काय!

अशी शंका मनांत येऊनच काय त्यानें त्याच्याकडे टक लावून एकवार पाहिलें आणि नंतर एकदम एक सुस्कारा टाकून अगदीं शांतपणें पद्माकरास म्हणतो, "पद्माकर, तूं बोलतो आहेस हें कांहीं नीट शुद्धीवर असतांना बोलत नाहींस. तसं बोलतो आहेस असं मला वाटलं असतं तर मी खरोखर तुझ्याशीं पुनः एक शब्दसुद्धां बोलूं नये. परंतु दादासाहेबांचं पत्र वाचून तुझं माथं फिरलं, त्या भरांतच तूं अजून बोलतो आहेस, असं धरून मी चालतों आणि तुझ्या या आतांच्या बोलण्याचा विषाद मी मानीत नाहीं. याहून दुसरं काय बोलूं!" प्रभाकराच्या शांतपणानें जणूं काय चिडून पद्माकर एकदम म्हणतो, "हें पहा नकळत भान कापून पुनः साळसूदपणाचीं भाषणं करायला तयार, अशांतला मी नाहीं. तेव्हां मला आंत एक बाहेर एक असला प्रकार मुळींच येत नाहीं. मी अगदीं चांगला शुद्धीवर आहें. जें बोललों तें अगदीं पूर्ण विचार करून, प्रत्येक शब्दाचा मराठी भाषेत अर्थ काय, तें पक्केपणीं जाणून मगच त्या शब्दांची योजना करून बोललों. आणखी काय. आणखी कसं स्पष्ट बोलूं म्हणजे तुला माझं म्हणणं बरोबर वाटेल ? "

या बोलण्यानें तर प्रभाकर अगदीं चकित नव्हे, विजेच्या धक्क्यानें निश्चेष्ट व्हावा तसा झाला. आपण जागे आहोंत हें त्यास खरें वाटेना. जें काय ऐकलें तें पद्माकराच्या तोंडून खरोखरींच निघालें असून आपल्या कानीं खरोखर पडत आहे, असा त्यास भरंवसा वाटेना. तो कितीं वेळ तरी संशयपूर्ण दृष्टीनें आपल्या मित्राकडे पाहूं लागला. शेवटीं पुनः शांतपणानें पद्माकरास ह्मणतो, "तूं इतकं मला निक्षून सांगतो आहेस, तरी मी असंच समजतों, कीं तुझं डोकं ठिकाणावर नाहीं, तुझं मन तुझ्या ताब्यांत सध्या नाहीं. यामुळं तुला आपण काय बोलतों आहोंत याचं भान नाहीं, आणखी ज्ञानही नाहीं. तेव्हां तूं बोलतो आहेस त्याच्याबद्दल तूं जबाबदारही नाहींस. मी तें ऐकलं नाहीं असंच समजतों."

पद्माकर त्यावर त्यास आणखी मर्मभेदक आविर्भाव करून व स्वर काढून म्हणतो, "आपल्याला इष्ट व सोईस्कर असेल तेवढंच ऐकायचं नि तेवढंच समजायचं, हा तुझा स्वभाव मी पूर्वीपासून ओळखून आहें. मी धडधडीत म्हणतों आहें, कीं माझा विश्वासघात केलास, तूं आपला डाव साधण्यासाठीं मला तोंडघशीं दिलेस, हें मी सारं जाणलं. माझ्या डोळ्यांत चांगलं अंजन बसलं. इतकं असून तूं पुनः वेड घेऊन बसत असलास तर खुशाल बस. मी तर कांहीं कधीं फसणार नाहीं. माझी अगदीं बालंबाल खात्री झाली आहे, कीं हा सर्व करणी तुझी आहे. मी इतकेंही सगळं विसरून गेलों असतों, पण साळसूदपणानं तूं आपला मला दोष द्यायलाच उपदेश करायला तयारच ! तेव्हां आतां तुला काय ह्मणावं ! पुनः तुला सांगतों, जें मी बोललों तें जाणून सवरून अक्कलहुशारीनं शुद्धीवर असतांना असंच बोललों. आणखी स्पष्टपणानं मला मुळींच सांगतां येत नाहीं, याला माझा इलाज नाहीं. माझं असं मत व्हायला मला सबळ पुरावा आहे. आणखी साक्षी आहे; परंतु तो पुरावा मी तुझ्यापुढं आणूं इच्छीत नाहीं, आणखी साक्षी कोण आहे, तें सांगूं इच्छीत नाहीं. आज बोलण्याचा ओघ आला, म्हणून मी स्पष्टपणानं बोललों तरी, बाकी माझी

बोलण्याची मुळींच इच्छा नव्हती. पण माझा स्वभाव पडला भडभड्या. तेव्हां पोटांत राहाणार किती दिवस!"

पद्माकराचा प्रत्येक शब्द प्रभाकर जणुं काय आपल्या कानांनीं शोषून घेत होता आणि डोळ्यांनीं त्याच्या प्रत्येक हावा-भावाचें निरीक्षण करीत होता. पद्माकरानें इतकें स्पष्टपणें सांगितल्यानंतर आतां त्यास त्याचा अर्थ समजला नाहीं, हें तर कांहीं शक्यच नव्हतें. त्याला चांगलें समजलें-नव्हे-प्रत्येक शब्द जणुं काय त्याच्या कर्णावाटे जाळीत जाळीत जाऊन त्याच्या अंतःकरणांत उतरत होता. त्यास आतां उत्तर देण्याची मुळींच ताकद राहिली नाहीं. तो अगदीं निस्तेज, निरुत्साह, निःशक्त झाला, त्यानें आपल्या हातांनीं आपलें डोकें धरलें. एक फारच दीर्घ, निराशादर्शक असा उसासा टाकला आणि तो मागें टेंकून बसून शून्य दृष्टीनें खालीं पाहूं लागला.

त्याचा स्तब्धपणा, निश्चेष्टपणा व शून्यता हीं कोणत्या कारणानें उत्पन्न झालीं, त्याबद्दल पद्माकराचे मनांत गैरसमज उत्पन्न झाला आणि तो लागलींच त्यास ह्मणतो, "तुला असं वाटलं काय, कीं तुझं कौटिल्य मला समजल्याखेरीज फार दिवस राहील! तुझं काम साधेपर्यंत फार तर तुझं सगळं छपलं असतं. आणखी किती छपणार होतं? पण त्याच्यापूर्वीं कांहीं बाहेर पडेल अशी तुला शंकासुद्धां आली नाहीं. अर्थातच तें बाहेर पडलं. भरंवशाचं भांडं फुटलं असें पाहाण्याचगोचर तुझी निरपीट उडाली. हा असा हताश होऊन पडलास, तरी पण तुझ्या मनांत जें काम व्हायचं होतं तें झालंच. माझा पुरापुरा फजीतवाडा व्हावा. इकडे नाहीं आणखी तिकडे शंख, असें होऊन मी पुरं तोंडघशीं पडावं अशी तुझी इच्छा होती, ती झाली. मी दादासाहेबांना निक्षून पत्र ल्याहायचं तें लिहून चुकलों. आतां प्राण गेला तरी 'तें पत्र चुकून लिहिलं गेलं, मला क्षमा करा. मी आतां शुद्धीवर आलों.' असं म्हणायला कांहीं कधीं जाणार नाहीं. आणखी हा माझा स्वभाव तुला पक्का माहीत आहे ह्मणूनच तूं तरी तें माझ्याकडून करवलंस. इकडून माझी फजिती व्हावी, आणखी चांगलं मी तोंडघशीं पडावं इतकंच नाहीं, तर असं झालं म्हणजे माझ्या नांवाचा चांगला फजितवाडा करावा, इतकी तुझी इच्छा मला पुरतेपणीं आतां समजली. तीचा, बोलून चालून शत्रु म्हणून सामन्याला उभा राहणारा शत्रु तुझ्यासारखा मित्र म्हणून गळा कापणाऱ्या मित्रापेक्षां किती तरी पटीनें श्रेष्ठ! बस. पण आतां वारंवार वारंवार तेंच तेंच बोलून मी आपली जीभ तरी कशाला विटाळूं? तूं विश्वासघातकी झालास, पण मी कशाला होऊं? तुझा आमचा आतां आजपासून स्नेह तुटला. एवढंच पुरे, मी तुझा शत्रु होणार नाहीं." असं म्हणून पद्माकर तेथून फार जोरानें उठला व एकदम निघून गेला.

जेव्हां ते दोघे त्या संध्याकाळीं जेवण जेवून बोलत बोलत आपल्या खोलींत आले, तेव्हां आणखी अर्ध्या पाऊण तासाच्या आंत आपलें दोघांचें असें निकराचें भांडण होईल आणि असला प्रसंग येईल, असें कोणी त्यांना सांगितलें असतें, तर तें दोघांनाही खरें वाटलें असतें कीं नाहीं याची शंकाच आहे. पद्माकराच्या मनांत कांहीं तरी डांचत होतें, हें तर उघड होतें. परंतु तें डांचत होतें त्याची ओकारी इतक्या जोरानें येईल आणि असा प्रकार होईल, हें

क्षण व तो प्रश्न हीं दोन्ही बरोबरच काळाच्या खाईत गेलीं. आपल्या हातून झालें आहे काय तर हा सांगणार? आणि यदाकदाचित् कांहीं झालें असलें तरी हा ज्याला आपण इतक्या संकटांतून वांचवून जवळ बाळगला, तो सांगेल! छे. छे. आपल्याला हा भलताच संशय! तर मग पद्माकराचा साक्षी कोण? आणि त्यानें माझ्याविरुद्ध कशा प्रकारची साक्ष दिली असेल? कशा प्रकारचा पुरावा जमवून त्याच्यापुढें ठेवला असेल. तें सर्व एक विलक्षण गूढच त्यास वाटलें. कदाचित् त्याच्या त्या बोलण्यांत कांहींसुद्धां अर्थ नसेल, रागाच्या सपाट्यांत कांहीं तरी जें तोंडाला आलें, तें तो भकला असेल, असेंही त्यास क्षणभर वाटून त्यानें आपलें समाधान करून घेण्याचा यत्न केला. पण अशानें कोठें समाधान होतें? पद्माकरानें तीन तीन वेळां निक्षून निक्षून ज्या अर्थी आपणांस सांगितलें, त्या अर्थी तो जें काय बोलला, तें त्याच्या मनांत अगदीं पक्कें ठसलेलें, खरें वाटलेलें खाचित्. त्याखेरीज तो इतका जहाल जाऊन एकदम अशीं दुरुत्तरें बोलून जन्माचा स्नेह तोडून टाकील, हें संभवनीयच नाहीं. अशा स्थितींत करणार काय? त्यास मुळींच उत्तर सुचेना आणि तो अगदीं हताश होऊन एका दगडावर जाऊन बसला. त्याचे उसासे आणि त्या दगडांच्या राशींवर हापटणाऱ्या समुद्राचे व जोरानें वाहणाऱ्या वाऱ्याचे उसासे एकसारखेच भासत होते.

---

# प्रकरण २३ वें.

## विषबीज.



ला आपण आपला जन्मस्नेही ह्मणून समजत आलों, त्यानें एकाएकीं कांहीं तरी दुरुक्ति बोलून एकदम आपला परित्याग करणें यासारखें तारुण्यांत दुसरें कोणतेंही दुःख नाहीं. सर्व प्रकारच्या मनोविकारांचें प्राबल्य तारुण्याच्या आरंभीं फार असतें; त्या वेळीं होणारे स्नेह अजरामर राहतील अशी आपली समजूत असते. त्या वेळीं होणारीं वैमनस्यें कधींही पुनः दुरुस्त होणार नाहींत असेंच आपण धरून चालतों; आणि यावज्जीव राहणारे उत्कट स्नेह त्याच वयांत आपण संपादतों. स्नेहाचा, प्रेमाचा, द्वेषाचा किंवा वैमनस्याचा उत्कटपणा त्या वेळीं जितका असतो, तितका दुसऱ्या कोणच्याही वयांत नसतो. बाल्यांतले स्नेह केवळ तात्कालिक व अज्ञानांत जुळलेले असतात. स्नेहस्थान जोंपर्यंत आपल्या दृष्टीसमोर असतें, तोंपर्यंत त्यावरील प्रेम जागृत असतें. त्या

स्थानापासून आपण दूर झालों, तें स्थान आपल्या दृष्टीच्या आड झालें, ह्मणजे दृष्टी-आड पडलेल्या खेळण्याचा जसा मुलाला विसर पडतो, तसाच त्या स्नेहपात्राचाही विसर पडतो. त्याचप्रमाणें तारुण्यानंतर उतारवयांत संपादित झालेल्या स्नेहाचेंही असतें. तो स्नेह अकारण नसतो. स्नेहस्थानापासून आपणास उपयोग किती—व कसा होतो यावर त्या स्नेहाचा कमी अधिकपणा अवलंबून असतो. त्या वेळच्या स्नेहांत उपयुक्ततेचा भाग विचारांत घेतला जातो. कोणता स्नेह ठेवावा, कोणता आदरानें संपादन करावा, कोणता तुच्छ करावा, कोणता टाळावा, याविषयीं विचार करून कोणाशीं किती स्नेह संपादावा याचें प्रमाण ठरविलें जातें. ही स्थिति ऐनतारुण्याच्या प्रारंभीं नसते. त्या वेळीं आपण मनोविकारांच्या स्वाधीन असतों. ते आपल्या स्वाधीन नसतात. समानशील स्वभावादि परस्परांच्या सन्निध आलीं म्हणजे स्नेहभाव उत्पन्न होतो आणि तो एखाद्या जोमदार वृक्षाप्रमाणें वाढत जाणार, असें वाटतें. त्यांत कृत्रिमपणा नसतो. आपल्या स्नेह्यावर केव्हां कसेंही संकट आलें, तरी आपण त्याच्या खांद्याशीं खांदा भिडवून त्या संकटाचा परिहार करण्यास झटूं, कधींही मागें घेणार नाहीं, त्या संकटाचा परिहार झाला नाहीं तरी आपण त्याच्या दुःखांचा समविभाग घेऊं. त्यास एकाकी सोडणार नाहीं, असले निश्चय आपण करतों व ते निश्चय आपण खचित पाळूं असे आणखी निश्चय होतात. हा स्नेह, हे निश्चय कायम राहणार नाहींत अशी कोणी शंका घेतल्यास आपल्याला त्या शंका घेणाराचा राग येतो. आपला स्नेह त्यास पाहवत नाहीं आणि म्हणूनच तो असल्या कुशंका घेऊन तो त्यांत बिघाड करण्यास पाहतो अशी आपली समजूत होते. नव्हे, आपण तसें स्पष्ट बोलून दाखवून आपला स्नेहबंध अधिक दृढ झाल्यास यत्न करतों. हें साधारणतः तारुण्यांतील स्नेहाचें झालें.

परंतु त्यांतही कित्येक स्वभावांची गोष्ट निराळी असते. कित्येक लोक फारच स्नेहाभिलाषी असतात. त्यांचा एखाद्या ठिकाणीं स्नेह जडला, ह्मणजे, ते आपल्या स्नेहस्थानाच्या वैगुण्याचे संबंधांत अंध बनतात. तुम्ही ज्यावर इतकें प्रेम करतां, तो तुमच्या असल्या स्नेहास पात्र नाहीं, असें त्यांस कोणी सांगितल्यास, त्यांस तें खपत नाहीं. त्यांस तें खरें वाटत नाहीं. आपण ज्याला स्नेही ह्मटलें, त्याचे अंगांत कांहीं अवगुण असले, तरी ते त्यांना दिसत नाहींत, दिसले तरी ते पाहत नाहींत. ते पाहात नाहीं म्हणून कोणी ते मुद्दाम त्यांच्या नजरेस आणले, तर तें त्यांस खरें वाटत नाहीं. इतकेंही करून ते अवगुण त्यांच्या नजरेस आले तरी त्यांजकडे दुर्लक्ष्य करावें, त्यांचें महत्त्व मानूं नये, अशी त्यांची प्रवृत्ति होते. ज्याप्रमाणें स्नेहसंबंधानें हे इतके उत्कट असतात, त्याचप्रमाणें द्वेषादिसंबंधांतही त्यांचा उत्कटपणा तितकाच विचित्र असतो.

प्रभाकर अशा मनुष्यांपैकीं होता. पद्माकराच्या ठिकाणीं त्याचा अगदीं अकृत्रिम स्नेह होता. जर जगांत कोणी जीवश्चकंठश्च स्नेही असतील, तर ते आह्मी दोघे आहोंत असें त्यांस वाटे आणि पद्माकरही तसें ह्मणत असे. अशा स्थितींत अगदीं अकस्मात् पद्माकरानें त्यास मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें दुरुत्तरें केलीं, फार विलक्षण असा आरोप त्याजवर

घातला. यामुळें त्याचें चित्त अतिशय दुखावलें. त्यानें आपल्याकडून त्या एकांत स्थळीं पुष्कळ अंतःशोध चालविला. आपल्या हातून अशी कोणती गोष्ट झाली असावी कीं, जिच्यामुळें यानें आपला इतका संशय धरावा, हें त्यास समजेना. किती वेळ तो आपल्याशींच विचार करीत बसला. इतक्यांत त्याचा स्नेही आपल्या जागेवरून उठून त्याचे जवळ आला. त्यानें त्याच्या खांद्यावर हात ठेवला आणि त्यास अतिशय मार्दवानें ह्मटलें, " प्रभाकरपंत, आपण इथं आल्याला वेळ किती झाला, याची कांहीं कल्पना ? मी इतका वेळ आपल्याला कांहीं बोललों नाहीं, कारण माझा तसा अधिकार पोंचतो, असं अजून मला वाटत नाहीं. आपलं मन अतिशय दुःखित झालं आहे, परंतु त्याचं समाधान करण्याचा अधिकार मला अजून आला नाहीं, अशी माझी समजूत आहे. पण दुसरा अधिक अधिकार पोहोंचणारा स्नेही येईपर्यंत तुह्मांला असंच बसूं देण्यापेक्षां मींच कांहीं तरी बोलावं असं मला वाटतं. तुमचा ..."

" नको, नको. मला जर चार घटका असाच बसूं द्याल, तर माझ्यावर फार उपकार होतील, " प्रभाकर थोडा तुटकपणानें व कठोरपणानें त्यास म्हणाला. परंतु पुढच्याच क्षणीं आपल्या तुटकपणाबद्दल त्यास वाईट वाटून तो त्यास म्हणतो, " कांहीं दुःखाचे वेळ असे असतात कीं, त्या वेळीं दुःखी मनुष्याला स्वतःच्या मनाशींच विचार करण्याला सोडून देणं हें हिताचं असतं. सध्यांची माझी वेळ अशी आहे. तेव्हां मी आतां बसलों आहें, तसाच मला आणखी कांहीं वेळ बसूं द्या. झाली ही गोष्ट फार वाईट झाली, हें तर खरंच; परंतु तीही आपल्या देखत झाली–तिऱ्हाइताच्या देखत झाली–याबद्दल मला वाईट वाटतं. तरी पण तुम्ही त्यासंबंधानं आणखी कांहीं बोलून, झाल्या त्या दुःखद गोष्टीला आणखी कोणी साक्षी होता, याची आठवण देऊं नका. मला विचार करूं द्या. विचार करून करून तें माझ्या मनांतून घालवून टाकूं द्या. कोणाच्या समाधानाच्या शब्दांनीं माझं आतां समाधान होणार नाहीं. उलट आपण आतां दुसऱ्यानं समाधान केलं पाहिजे अशा केंविलवाण्या स्थितीला आलों असं वाटून मला अधिक दुःख होईल. ज्या स्नेहाचं सुख आज मी इतके वर्षं भोगलं, त्याचा अकस्मात् नाश झाला, तर चार घटका तरी शोक केला पाहिजे."

त्याचा तो ऋणी स्नेही, तें त्याचें भाषण ऐकत अगदीं तटस्थपणें उभा राहिला. अशा तऱ्हेचीं उत्तरें येतील अशी त्याची आधींच अपेक्षा असावी आणि अशा उत्तरांना काय प्रत्युत्तर द्यायचें, याचा त्यानें पूर्वींच विचार केला असावा, असें त्याच्या शांतमुद्रेवरून दिसलें. प्रभाकराचें वरील भाषण झाल्यानंतर तो मुद्दामच कांहीं वेळ स्वस्थपणें उभा राहून त्यास ह्मणतो, " मी पहिल्यानंच सांगितलं कीं, तुह्मी मला अविचाराच्या मृत्यूपासून सोडवून पुनः रस्त्यावर आणलंत, यामुळं मी जरी एका दृष्टीनं तुमचा कृतज्ञ बंदा बनलों आहें, तरी वाटेल त्या बाबतींत तुमच्याशीं लगट करण्याचा भलत्याच गोष्टींत तुम्हांला उपदेश करण्याचा मला अधिकार नाहीं, हें मी पुरेतेपणीं जाणून आहें. आपल्या दोघांचा तो अनिष्ट प्रसंग चालला असतां मी तिथें होतों, परंतु आपण त्यांत बोलूं नये, आपला त्यांत काहीं संबध नाहीं हें मी जाणून

होतों. म्हणून तर मी खोलींतल्या कपाटाप्रमाणें, टेबलाप्रमाणें अगर दुसऱ्या एखाद्या निर्जीव वस्तूप्रमाणें अगदीं तटस्थ बसलों होतों. वास्तविक मी तेथें बसणं देखील उक्त नव्हे, परंतु हा प्रसंग कोण्या थरावर जाईल याचा नेम नाहीं, असं भय वाटून मी तेथेंच बसलों. न जाणों हातघाईवर प्रसंग येता तर!"

"काय ह्मणतां, आमचा दोघांचा वाद हातघाईच्यापर्यंत आला असता असं तुम्हाला वाटलं?" प्रभाकर अतिशय तिरस्कार व आश्चर्य यांनीं भरलेल्या आवाजानें म्हणाला.

"तुमच्याकडून नाहीं, पण दुसऱ्या पक्षाकडून तितकी तयारी नसेलच असं मला वाटत नाहीं, त्याला इलाज नाहीं. त्याचा रंग अगदीं निराळा दिसला. आपल्याला तो दिसला नसेल, आणखी दिसणं शक्यही नाहीं. पण आपल्याला दिसला नाहीं, म्हणून इतरांना दिसणार नाहीं असं थोडंच आहे! इतरांची दृष्टि तुमच्यासारखी मंद झालेली नाहीं." तो गृहस्थ किंचित् अधिक निर्भीडपणानें बोलला आणि स्वस्थ उभा राहिला.

"पद्माकर मला मारायला उठला असता म्हणतां त्या भांडणांत?"

"नाहीं, असं जर मला वाटतं तर मला ती शंका तरी कां येती?"

"छत्. छत्! अशी गोष्ट कधींच होतीना. अविचाराच्या भरांत तो कांहीं तरी बोलत होता इतकंच. त्याच्या वडिलांच्या पत्रानं त्याचं डोकं फिरलं होतं, त्यांत मी सांपडलों, मलाही तो बोलला इतकंच. तिथून उठून गेल्यावर त्याचं त्यालाच अतिशय वाईट वाटलं असेल."

"पुष्कळ दिवस विचार करकरून जो अविचार करायचं ठरवलेलं असतं, त्याचा परिणाम कोठपर्यंत न्यायचा याचाही विचार झालेलाच असतो."

"पुष्कळ दिवस विचार करकरून? ह्मणजे काय तुमचं ह्मणणं असं का आहे कीं, पद्माकराच्या मनांतून माझ्याशीं असं भांडण करण्याचं पुष्कळ दिवसांपासून ठरलं होतं?"

"नुसतं म्हणणंच काय, मला तशी माहिती आहे. मी तुमच्या दोघांच्या मध्यें कधीं पडत नसें, कारण मी असा निश्चय केला होता कीं, आपण कान असून ऐकायचं नाहीं, डोळे असून पाहायचं नाहीं. दोन फार दिवसांचे स्नेही. एकाचा दुसऱ्यावर अगदीं अकृत्रिम स्नेह. परंतु दुसरा कार्यसाधु. पण पहिल्याला जर तें दिसत नाहीं, तर माझ्यासारख्या तिऱ्हाइतानें विनाकारण मध्यें कां पडावें? व पडण्यापासून फायदा काय? कांहीं नाहीं. उलट एखादे वेळीं भलतंच कांहीं तरी व्हायचं, त्यापेक्षां 'रामाय स्वस्ति' 'रावणाय स्वस्ति' असं कां केलं? प्रभाकरपंत, बोलायचं नाहीं, इकडचं तिकडे आणखी तिकडचं इकडे असं करायचं नाहीं, हें माझ्या स्वाधीनचं होतं, पण तुम्ही माझ्या देखत एखादी गोष्ट केली, तर ती पाहायची नाहीं, तुम्ही कांहीं आपण होऊन सांगू लागलांत तर ऐकायचं नाहीं हें तर माझ्या हातचं नाहीं? मीं ज्या गोष्टी पाहिल्या, ज्या ऐकिल्या, ज्या तर्कावरून जाणल्या, त्या कोणाजवळ बोलायच्या नाहींत, हें माझं चाललं. बाहेर मी त्यांचा उच्चार ... त्याचा तो केला नाहीं, म्हणून माझ्या मनाला वाईट वाटायचं तें वाटल्याखेरीज राहतं का काय? वाईट वाटलं तें मी मनांत ठेवलं आणखी त्या गोष्टीचं पर्यवसान पुढं काय होणार'

हें मनांत अगदीं तर्कून ठेवलं होतं. त्या माझ्या तर्कावरहुकूम सर्व गोष्टी घडल्या ! पण बोलून काय उपयोग ! "

प्रभाकर त्याचें तें बोलणें अगदीं स्वस्थपणानें ऐकून घेत होता. त्याला त्या बोलण्याचा नीटसा अर्थच कळत नव्हता.त्याच्या सभोंवतालीं पसरत व वाढत चाललेल्या अंधारांत जसे कोणतेही पदार्थ आतां त्यास स्पष्टपणें दिसेनासे होत चालले होते, तसाच या त्याच्या मित्राच्या बोलण्याचा अर्थही त्यास अगदीं अगम्य वाटला. यानें काय गोष्टी पाहिल्या ? याला कोणीं काय सांगितलें ? याला काय दिसलें ? यानें काय ऐकलें ? आणि यानें तर्क कसले केले ? कांहींसुद्धां त्यास समजेना. सर्व कांहीं तमोगुढ झाल्याप्रमाणें झालें, तथापि तो तसाच त्यास म्हणतो, "एकून झाल्या या गोष्टी सहजगत्या झाल्या नाहींत, असं का तुमचं ह्मणणं ? काय असेल तें स्पष्ट बोला."

" स्पष्ट बोलून खरं वाटेल, तर स्पष्ट बोलायला काय हरकत आहे ? आणखी मघाशीं बोललोंही."

" काय बोललांत स्पष्ट ? स्पष्ट काय बोललांत सांगा आतां. तें तरी ऐकूं द्या."

" मी मघाशींच ह्मटलं, कीं माझी माहिती, तेंच माझं ह्मणणं. उगीच पदरचं ह्मणणं थोडंच आहे ! "

"काय तुमची माहिती ? पद्माकराविषयीं तुम्हांला माहिती काय आणखी कुठली ?"

" कुठली ? तुम्ही मला सोडवून आणल्यापासूनची इथलीच. जी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिली, कानांनीं ऐकिली, तीच माहिती. दुसरी कुठली ! आमच्या देखत झालेल्या गोष्टींची माहिती आह्मांला नाहीं. तर कोणाला असायची ? कांहीं गोष्टी तुमच्या पश्चात् पण माझ्या देखत झाल्या ! "

" अशा गोष्टी झाल्या तरी काय ? एकदां मला कळूंच द्या. सांगा, सांगा."

" ज्याचं पर्यवसान झालं, असं व्हायचं असा माझा तर्क होता, अशाच गोष्टी झाल्या, त्या तुह्मांला ऐकून काय करायच्या ? आतां त्या झाल्या नाहींत असंच धरून चाला परिणाम व्हायच्या आधीं जर त्या तुझ्या कानीं आल्या असत्या, तर–पण तर काय? त्याचा कांहीं उपयोग झाला नसता. झाला हा प्रकार चार दिवस आधीं झाला असता पण एका बाजूनं त्याची तयारीच होती."

"तुम्ही काय बोलतां, मला कांहीं समजत नाहीं," प्रभाकर अगदीं गोंधळून म्हणाला.

"समजण्याची ताकद या वेळीं तुमच्या मनांत नाहींच. पण त्या गोष्टी झाल्या, घडल्या. हें तर खचित."

"काय म्हणतां ! पद्माकराच्या मनांतून माझ्याशीं असं भांडण करायचं बरेच दिवस होतं ?"

" असं वाटण्याजोग्या गोष्टी माझ्या दृष्टीस पडल्या. तसलीं बोलणीं माझ्या कानीं आलीं."

"कानीं आलीं ह्मणजे काय ? तो दुसऱ्या कोणाजवळ तसं कांहीं बोलला होता ? "

" हो, कानीं आलीं ह्मणजे माझ्याच कानीं, त्याच्याच तोंडून आलीं. ह्मणून तर... "

" इतके दिवस कां नाहीं बोललां ? " प्रभाकरानें कठोरपणानें विचारलें.

" कोणच्या आधारावर बोलायचं ? त्यांची ताकीद बोलूं नका म्हणून. तुह्मांला ऐनजिनसीं पकडावें ही तर त्यांची इच्छा. बरं मी बोललों असतों, तर त्याच्या पासून निष्पन्न कांहीं न होतां, मी खोट्यानाट्या लावालाव्या करणारा म्हणून तोंड-

घर्शी मात्र पडलों असतों. आतां सुद्धां मी बोलणं रास्त नाहीं, पण झाला हा प्रसंग पाहून मला आपली खरोखर कींव येते. प्रभाकरपंत, आपण या जगांतले नव्हे, देवलोकांतले आहांत. तुम्हांला सगळं कांहीं सोनं दिसतं. पण तें खरं सोनं नाहीं. ठकवायू पुरता वर मुलामा देऊन आंतलं तांबं, लोखंड हीं झांकून टाकलीं आहेत, हें तुमच्या लक्ष्यांत येत नाहीं. कोणी दाखवून दिलं तरी सुद्धां तुम्हांला खरं वाटायचं नाहीं. 'आतां तरी फसूं नका, माझ्या तंत्रानें चाला,' असं ह्मणावं असं मघापासून पंचवीस वेळां माझ्या मनांत आलं, पण माझा व आपला संबंध किती, ज्यांच्या बाबतींत मी आपल्याला सांगणार त्यांचा आपला संबंध किती! हें मनांत येऊन मी गप्प बसलों. माझा अधिकार नाहीं, एवढीच गोष्ट मनांत धरून मी अगदीं आपला गप्प बसलों. तुमची मर्जी असली, तर सांगेन नाहीं असं नाहीं, पण आतां नाहीं सांगणार. आतां तसल्या गोष्टी ऐकण्याजोगी तुमच्या मनाची शांत स्थिति नाहीं. तेव्हां तें अगदीं मनांतून काढून टाका. जसा तुमचा त्यांच्या ठिकाणीं अकृत्रिम स्नेह तसाच माझा तुमच्या ठिकाणीं आहे, पण तो तुमच्या अनुभवास येईल तेव्हां खरा. मी आपल्या तोंडानं सांगून त्यांत काय अर्थ आहे! जसं तुम्ही नको असतां, माझे प्राण वांचवून शुद्धीवर आणलेत, तसाच कधीं प्रसंग आला, तर माझी खरी किंमत आपल्यास समजणार आहे. पण परमेश्वरकृपेनं तसा प्रसंग न येवो, आणखी माझी किंमत तशीच गुप्त राहो. आज आला आहे हा प्रसंग काय थोडा आहे! याचेच काय काय परिणाम होतात ते पाहा आतां. पहिल्यासारखे डोळे मिटून बसं नका ह्मणजे झालं. तुह्मी जरी आतां मिटलेत, तरी मी आपले अगदीं नाठ उघडे ठेवून तुमच्यासाठीं पाहणार आहे! तुम्ही अगदीं अकृत्रिमपणाचे सागर आणखी तुमचे स्नेही अप्पलपोटेपणाचें आगर! तेव्हां हें कोठवर चाललं असतं!"

"तुम्ही काय म्हणतां तें खरोखर मला कांहीं समजत नाहीं. काय म्हणतां? पद्माकर माझ्याशीं पहिल्यापासून कपटीपणानं वागतो आहे? आणखी तें कपट मला दिसलं नाहीं. तो माझ्याशीं कपट करील हें तर अशक्यच. मी त्याच्याशीं कपट करतों आहें, असा त्याच्या बोलण्याचा रोख मला दिसला, पण मी त्याच्याशीं कसलं कपट केलं बोआ! त्याच्याशीं आणखी मी कपट करणार! उद्यां मी आपल्या स्वतःशींच कपट केलं, असं जर कोणी म्हटलं, तर तें एकवार मला संभवनीय वाटेल. पण मी त्याच्याशीं कपट केल्याचं कधीं मनांत सुद्धां यायचं नाहीं. पण तो स्पष्ट बोलला. आणखी कोणच्या बाबतींत कपट केलं, हें जरी त्यानं मला स्पष्ट बोलून दाखवलं नाहीं, तरी त्याचा तर्क करण्याची नुसती मला भीति वाटत, इतकं कांहीं माझं मन अधु झालं आहे. तर्क करून तें माझ्या ध्यानांत येईल, यांत शंका नाहीं, पण नको. तसा संशय माझ्या मित्राच्या मनांत आला असेल असा तर्कसुद्धां या माझ्या मनानं करूं नये. आणखी तर काय!"

"त्यांनीं एखाद्या निष्ठुर पशूप्रमाणें स्पष्ट काय तें बोलून दाखविलं नसतं, तर तुमच्या तर्काला जागा न् कारण कीं नाहीं!—तुमच्या जीवश्च कंठश्च स्नेह्याला मी निष्ठुर पशूची उपमा दिली ह्मणून तुम्हांला कदाचित् राग येईल, पण माझा नाइलाज आहे.

ज्या तऱ्हेचा आरोप तुमच्या कट्ट्या दुस्मानांनींसुद्धां तुमच्यावर करूं नये, त्या तऱ्हेचा आरोप, तुमचा जिवलग मित्र म्हणवून घेणारा जर करूं लागला, तर संताप आल्याखेरीज आणखी असे शब्द बोलल्याखेरीज कसं मला राहवणार ? नाहींच राहवत. फार तर तुमच्या देखत मी तोंडाला आळा घालीन, म्हणून कांहीं माझ्या मनांत जें विचलं आहे तें जातं आहे का काय ? अर्थातच नाहीं, नाहींच. तुमचं मन जरा शांत होऊं द्या. आतां या वेळीं तुह्मी माझ्याबरोबर चला. झाल्या गोष्टी स्वप्नवत् विसरा. कारण ज्या गोष्टी कधीं काळीं तुमच्या कानीं येतील, त्या कदाचित् याच्याहीपेक्षां भयंकर असतील. तुह्मी देवलोकचे खरे, पण देवलोकीं नाहींत. इथें या मृत्युलोकीं, या लुच्चांनीं भरलेल्या जगांत आहांत, हें ध्यानांत आणा. ज्याचा प्राण वांचवायला जाल, तोच तुमचे प्राण घेण्याला कधीं कमी करणार नाहीं, असलं विचित्र हें जग आहे. यांत तुमचा निभाव, अशा या भोळ्या वर्तनानं लागावा कसा ? बस झालं. चला आतां आपल्या जागीं. आजपासून मी अधिक अधिकार घेतला. मी आतां—पण आतां आपण दुसरंच कांहीं बोलूं, " असें म्हणून त्यानें प्रभाकरास उठविलें आणि प्रभाकर उठून अगदीं एखाद्या कोंकराप्रमाणें त्याचेबरोबर गेला.

# प्रकरण २४ वें.

## सोन्याची चाकरी.



प्रोफेसर ड्यांडींच्या करामतीमुळें सोन्याबापू त्या विक्टोरियावाल्याशीं हुजत घालीत उभा असतां, सदूनानांस तेथें आणून सोडल्यापासून बराच वेळ झाला, तेव्हां वाचकांची "पुढें काय झालं असावं ? " याबद्दलची जिज्ञासा थोडीबहुत अनावर झाली असेल यांत शंका नाहीं. गाडीवाला कांहीं केल्या ऐकेना आणि सोन्याबापूस सोडीना. सोन्याबापू आपल्याकडून जीव तोडतोडून त्यास सांगत होता कीं, "तुझी गाडी मीं ठरवली नाहीं. ज्यांनीं ठरवली, ते रावसाहेब अमुक ठिकाणीं राहतात, तेथें तूं जा, तुझे पैसे बुडायचे नाहींत. ते मला ह्मणाले, तूं आमचा नेहमींचा आहेस. " परंतु तो गाडीवाला कांहीं केल्या ऐकेना, "अरे शेट, असा पुष्कल आमाला मिलाला आजपरन. ते काय़ बी ऐकाचा नाय़, मला साडेतीन रुपी देवा. आतां कुठें जावा तो शेट बघाला ! गाडी केली तवा तुमी बी होता. ते बी होता, तेनी तुमचेपाशीं भाडा मला मिलल असा सांगूनशी दिला. बस खालीं कटकट नको करूं. साडेतीन रुपीआ आन "

परंतु सोन्याबापूजवळ साडेतीन रुपये कुठले ? तो हलके हलके पाय मागें घेऊन

त्या गाडीवाल्यास अकांडा देण्याच्या विचारांत होता. पण गाडीवाला काय कमी होता ? त्यानें या शेटचें तें लक्षण चटकन् जाणून धिटाईनें पुढें होऊन त्याच्या बाहीचा फुगा धरला व " अरे शेट, खाली पीली खटखट करनर्शी काय फायदा ? भाडा गेतला नाय् तर काय तुला आमी जाऊं देल ? " असें म्हणत त्यास खेंचत ओढलें. याच बेतास सदूनानांची स्वारी मागें सांगितल्याप्रमाणें येथें आली. मुंबईसारखें शहर आणि चाळीच्या पुढची जागा. तेव्हां काय विचारतां ? तो तमाशा पाहाण्यास मंडळींची पण खूप गर्दी जमली. सदूनाना आल्याकारणानें सोन्याबापूस फारच लाजल्याप्रमाणें झालें. परंतु नुसतें तसें होऊन उपयोग काय ? त्या प्रसंगांतून सुटणार कसा ? गाडीवाल्यानें कोटाची बाही अगदीं घट्ट धरली होती आणि हिसकाहिसक करून तो कदाचित् हातांतून सुटून जाईल व स्वारी 'यःपलायते' करील, या भयानें त्यानें आतां दंडच पकडण्याचा उपक्रम केला, तेव्हां तर सोन्याबापू फारच हिसकाहिसकी करूं लागला. इतका वेळ सामोपचारानें त्यास 'तूं अमुक ठिकाणीं जा. तिथें ते दुसरे शेट राहतात ते तुझे पैसे देतील,' असें तो सांगत होता, परंतु आतां तो सामोपचार जाऊन त्यांत बराच उर्मटपणा आला. आपल्या वडिलांच्या देखत आपण या अशा विलक्षण प्रसंगांत सांपडलों यासारखी कोणतीच दुःखाची गोष्ट नव्हे. तेव्हां आपण सयावया न करितां गुर्मीनें बोलण्यांतच पुरुषार्थ आहे, असें त्याच्या मनानें घेतलें. " तुझं मी काय लागतों आहे ! मी तुला ठरवला नाहीं. ज्यानं तुला ठरवलं त्याच्याकडे जा. अंगाला हात लावशील तर आतां पोलिस स्टेशनांत जाऊन वर्दी देऊन तुझा बकल अन् तुझं बक काढून घेईन. चल सोड बन्याचोलानें जंटलमनशीं ... ... " परंतु तो गाडीवाला कोठें त्यास बोलूं देत होता ! ' जंटलमनशीं ' एवढा शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडतांच ' अरे वारे जाटिलमन् ! अरे असा जाटिलमन्. अरे असा जाटलिमन् लई पायला आम्ही. मोफतचा गाडीत बसाला पायजे ! आपले बापाची गाडी आतनूशेनी मंग त्यांत मोफत बसावा. " असें म्हणण्यापर्यंत त्याची मजल येऊन ठेपली.

सदूनानांस असें झालें कीं, आतां आपण या भानगडींत पडावें कीं आपलें मुकाट्यानें आपल्या चाळींत शिरावें आणि चिरंजीवांची गत पाहावी; परंतु सदूनाना जरी झाले, तरी काय आलें ? स्वतःच्या बचड्याला अशा विलक्षण स्थितींत पडलेला पाहून तेथून कसें जाववणार ? त्यांनीं पुढें होऊन चौकशी केली, तेव्हां गाडीवाल्यानें सांगितलें कीं, हे शेट आणखी दुसरे एक शेट चौपाटीवर माझ्या गाडीशीं येऊन ठराव न करतां आंत बसले. तीन तास मला घुमवलें, मग तो दुसरा निघून गेला. मला सांगितलें या शेटला पोंचवून यांच्याचपासून भाड्याचे पैसे घे. अन् हे शेट इथें घरीं आल्यावर बोलतात, तिकडे जाऊन त्यांच्यापासून भाड्याचे पैसे घे. मग काय, आह्मी आतां काय हिंडत बसावें ?

आपल्या चिरंजीवांचे दुसरे स्नेही कोण असावेत याबद्दल सदूनानांस शंका नव्हतीच. कोण असणार तें त्यांस पक्कें ठाऊक होतें. परंतु नुसतें ठाऊक असून उपयोग काय ? मुलाला सोडविण्यास साडेतीन रुपये देण्यापलीकडे दुसरा कांहीं मार्ग

नव्हता आणि साडेतीन रुपये तर देण्याच्या इच्छेचा पूर्ण अभाव. गाडीभाड्याबद्दल साडेतीन रुपये! आजन्मांत त्यांनीं गाडी-भाड्याप्रीत्यर्थ साडेतीन रुपये खर्च केले नव्हते, ते आज एकदम देणार! त्यांनींही त्या गाडीवाल्याशीं हुजत घालण्याचाच विचार केला आणि त्याप्रमाणें सुरुवात केली. एकीकडे त्यांनीं मोन्यास शिव्या देण्याचा व दुसरीकडे त्या गाडीवाल्यास 'तुला त्या मुलाला धरून ठेवण्याचा अधि-कार नाहीं, तूं पाहिजे तर फिर्याद कर,' असें सांगण्याचा सपाटा चालविला. चाळी-तील मंडळींपैकीं कांहीं मंडळी तेथें आली होती, त्यांनीं त्यास तुम्ही त्या हलक्या माणसाच्या नादीं लागूं नका ह्मणून सांगि-तलें, परंतु साडेतीन रुपये देणें सदूना-नांच्या हातून होतें कसें? आणि त्या बाच-तींत ते कोणाचें ऐकतात कसेचे! त्यांनीं भांडणाचाच तडाखा चालविला. कर्मधर्म-संयोगानें त्यांच्या कंपूंतील एक श्रीमंत गृहस्थ त्याच सुमारास तेथें सदूनानांस कोठें जाण्याकरितां बोलावण्यास म्हणून आले, त्यांनीं तो प्रकार पाहिला आणि सर्व हकीकत ऐकून आपल्या पदरचे साडे-तीन रुपये त्या गाडीवाल्यास देऊन सदू-नानांस व त्यांच्या मुलास त्यांनीं त्या प्रसंगांतून सोडविलें. सदूनानांस एका अर्थी अर्थातच आनंद झाला; परंतु त्यांचें तोंड–एकदां आपल्या मुलास व एकदां त्या गाडीवाल्यास शिव्या देण्यांत गुंतलेलें तोंड–कांहीं केल्या बंद होईना. गाडीवाल्याचे हातीं पैसे पडतांच तो मात्र त्या दोघांसही शिव्या देत देत तेथून चालता झाला. त्याचा वेळ गेला तो कांहीं थोडा नव्हता. त्यास उभें राहण्यास मुळींच फुरसत न-व्हती. मुंबईतील धंदेवाल्यांस रिकामें भांडत बसण्यास वेळ कोठला?

आपल्या पदरचे पैसे गेले नाहींत, यामुळें आनंदलेले सदूनाना आपल्या मु-लास शिव्या देऊन कंटाळले, व विनाका-रण आपण मध्यें पडून पैसे भरले, नाहीं तर अजाण पोरांना फसवून पैसे काढ-णाऱ्या त्या हरामखोर गाडीवाल्यास आपण चांगलाच बनवला असता, असें ह्मणत ह्मणत त्या आपल्या श्रीमंत मित्राबरोबर ते त्याच्या गाडींत बसून कोठें गेले. जातांना मुलास, "मी आतां आजपासून घरीं येतच नाहीं. तुह्मांला काय करायचं तें करा. मी आतां आजपासून रावसाहे-बांच्याच घरीं चार दिवस जाऊन राहणार. मला तुझं तोंड पाहायला नको." असें बजावल्याखेरीज त्यांनीं राहवलें नाहीं.

मोन्याबापू आपल्या बिऱ्हाडीं गेला. रस्त्यांत मोन्याबापूची व एका गाडीवाल्याची मारामारी चालली आहे आणि ती कांहीं भाड्याच्या पैशासाठीं चालली आहे, ही बातमी त्याच्या आईस केव्हांच जाऊन पोंचली होती आणि ती आतां काय होतें या विवंचनेंतच होती. किती रुपये भाडें द्यायच्याबद्दल मारामारी चालली होती, हें तिला कांहींच ठाऊक नाहीं, परंतु काय रुपया दोन रुपये देणें असेल, तें आपल्या-पासून मुकाट्यानें घेऊन जाऊन पोरगा कां देऊन टाकीत नाहीं, असें तिला वाटलें. त्यांत आपले यजमान तेथें आले आहेत, असें कानीं येतांच तिला फारच काळजी लागली होती; परंतु, "दुसऱ्यांनीं मध्यें पडून भाडें देऊन त्याला घालवलं, त्याला माझा इलाज नाहीं, पण मीं एक छदाम-सुद्धां दिला नसता. पोलिस स्टेशनवर गेलों असतों, साहेबाला सांगितलं असतं, आ-णखी त्या हरामखोर व्हिक्टोरियावाल्याची पण अगदीं खोडकीच मोडून टाकली अ-

सतो, " असें आपल्याशींच परंतु मोठमोठ्यानें पुटपुटत सोन्याबापूंची स्वारी आपल्या आईपुढें आली, तेव्हां त्या बिचारीचा जीव एकदांचा खालीं पडला. तोंपर्यंत तिच्या मनांत हजार शंका आल्या. त्या पोराला तो गाडीवाला मारील कीं कुठें अटकेंत घेऊन जाईल कीं काय करील, कोण जाणे! अशिक्षित व भोळ्या आणि पुत्रप्रेमानें अगदीं वेडगळलेल्या बायकांची स्थिति मोठी विलक्षण असते. पोराची मर्जी जाऊं नये, त्यानें आपल्यावर ममता करावी, त्यास यत्किंचित्सुद्धां दुखापत कोठें होऊं नये किंवा त्याचें अकल्याण होऊं नये म्हणून त्यांचा एकसारखा यत्न असतो. अहोरात्र त्यांची काळजी ती, त्यांचा विचार तो, त्यांचें लक्ष्य त्या मुलाचे ठिकाणीं असतें. उमाकाकू अशा बायकांपैकींच होती. यत्किंचित् कांहीं झालें कीं, आपल्या मुलास त्यापासून कांहीं त्रास होईल कीं काय, हा विचार तिच्या मनांत उभा राहावयाचाच. या तिच्या स्वभावामुळेंच ती आपल्या मुलाचें वाटेल तसे लाड पुरवीत असे. तिच्या मुलाचें लग्न वर्ष दोन वर्षांच्या पूर्वींच, अगदीं तिच्या मनाप्रमाणेंच नव्हे, परंतु बऱ्या स्थितींत झालें होतें. मुलीस खाण्यापिण्याची किंवा डागदागिन्यांची मुळींच वाण नव्हती. दुसऱ्या कांहीं बाबतींत...परंतु त्या मुलीची माहिती वाचकांस लवकरच होणार आहे. सबब येथेंच तो उल्लेख आणीत नाहीं.

सोन्याचें लग्न होऊन सुनमुख केव्हां एकदां पाहीन, असें तिला झालें होतें. त्या लालसेवरूनच सदूनानांचें व तिचें कित्येक वेळां भांडण झालें होतें. परंतु सदूनाना कधीं चुकूनसुद्धां तिच्या ह्मणण्यास हुकार देत नसत. मग रुकार तो कोठला मिळायला! असो; सोन्याबापू गाडीवाल्याच्या तडाख्यांतून सुटून उमाकाकूंच्या नजरेस पडतांच त्यांस अगदीं धन्यता वाटली. सोन्याबापू आपला जामानिमा उतरीत उतरीत तोंडानें वटवट करीतच होते. त्यांची वहाण तेथें जवळच उभी होती, तिला त्यांनीं दुरडाखून वारा घालण्यास सांगितलें, कारण स्वारी अगदीं मोठा पराक्रम करून येऊन घामाघूम झाली होती!

इतक्यांत उमाकाकूंनी " झालं का जिकडच्या तिकडे नीट. आतां कांहीं राहालें नाहींना! केव्हां आतां हुकूम येईल? यंदांच्या वैशाखांत नाहीं तर ज्येष्ठांत तुझं एकदां लग्न करून टाकूं दे. म्हणतोस तो चाकरी तुला एकदां लागली कीं मग काय कोण ह्मणणार आहे, एव्हां नाहींतर आतां नाहीं तें मी पाहीन? मुलगा केवढा थोरला झाला, लोकं हंसायला लागलीं, आणखी ह्मणे त्याच्या लग्नाची गोष्टसुद्धां काढूं नको. कां! तर ह्मणे त्याला अजून दमडी मिळवायची अक्कल नाहीं. सोन्या एकदां होऊंच दे. एक महिनाभर अगदीं तिकडे अक्षरसुद्धां काढूं देऊं नको बरंका! महिना होऊन पगार एकदां हातांत आला कीं मग मीच ते पैसे दाखवून काय बोलायचं तें बोलेन. आपल्या पोराचं आपण कौतुक करायचं नाहीं, तर करायचं तरी कोणी!"

" आई, " सोन्याबापू मध्येंच म्हणतो, " आई, तूं सध्या अगदीं कांहीं बोलूं नको. माझाच मुळीं निश्चय झाला आहे कीं, चांगला पगार मिळेपर्यंत लग्न करायचं नाहीं. मला आतां पगार मिळायला लागूं दे मग हेच उद्यां माझ्या पुढें पुढें करताहेत कीं नाहीं पाहा. "

" सोन्या! अरे असं बोलूं नये " उमाकाकू मलाची धन्य वाटून म्हणतात,

" बाकी तूं ह्मणतोस तें कांहीं खोटं नाहीं. पण लहान माणसांनीं असं बोलूं नये तें चांगलं."

" बोलूं नये तर नाहीं बोलत, पण माझं त्यांना अगदीं कांहींच वाटत नाहीं. आतां रस्त्यांत त्यांनीं मला ज्या अद्वातद्वा शिव्या दिल्या त्या जर तूं ऐकल्यास, तर तुझ्या डोळ्यांतून टिपं निघतील. असं जर ते बोलूं लागले, तर आपण या घरांत क्षणभरसुद्धां राहाणार नाहीं बोआ!"

" देतील बाबा ते शिव्या, त्यांना तुझ्याबद्दल कांहींसुद्धां वाटत नाहीं, हें अगदीं खरं. पण करायचं काय! आपलेच दांत आणखी आपलेच ओंठ. बरं पण, मीं काय तुला विचारलं: झाली का नीट व्यवस्था! उद्यांपासून तुला जावं लागणार का हापिसांत? मला तें सांग आधीं."

" आई, तूं तरी भारी बोआ उतावळी. अग, आज तर मीं प्रोफेसरांच्या स्वाधीन तें सगळं केलं, उद्यां त्याची किंमत होणार आणखी जितकी किंमत होईल, त्या मानानं मला नोकरी मिळणार. पांच हजार किंमत कांहीं होत नाहीं, असा प्रोफेसरांचा अंदाज आहे. त्यांना त्यांतली चांगली माहिती आहे. तूं तर म्हणतेस कीं तो सरी अमुक भार आहे, आणखी तिची अमुक किंमत होईल–चंद्रे, इथून जा तूं. इथें नको बसूं जा. मोठ्या माणसांचीं बोलणीं ऐकत बसूं नये आपण–आणखी ते म्हणतात तितकी कांहीं भरणार नाहीं. तें सोनं अगदीं हलक्या दराचं आहे, तेव्हां आतां एकंदर दागिने पांच हजारांचे कसे भरणार? जर पांच हजार भरले नाहींत, तर कांहीं साठ रुपयांची नोकरी नाहीं मिळणार. कमीचा मिळेल."

" म्हणजे?" उमाकाकू ताडकन् उसळून म्हणतात: " ते दागिने पांच हजारांचे नाहींत म्हणून तुला कोणीं सांगितलं? मला तर मग वाटतं, कीं तो तुझा स्नेही मोठा लफंग्याच दिसतो."

" भलतंच!" सोन्या अगदीं निराकरण-दर्शक आवाज काढून म्हणतो: " त्यांच्या-बद्दल अगदीं शंकासुद्धां घेऊं नकोस. तुम्हांलाच बायकांना या सोन्यानाण्याच्या कामांत समजत नाहीं, त्यामुळं तुला वजनाची भ्रांति पडली असेल. ते कोणाची कधीं एक ततसडीसुद्धां उचलणार नाहींत. त्यांच्या इमानीपणाबद्दल अगदीं मुद्धां तूं शंका घेऊं नको. बाजारांत जें काय वजन होईल, आणखी जो काय भाव होईल, तो अगदीं बरोबर करून ते आपल्याला सांगतील, आधीं ते दागिने जमेच्या तसेच ब्यांकेंत राहाणार आहेत. फक्त त्यांची किंमत काय ती व्हायची. तेव्हां त्याची काय आपल्याला भीति, तूं अगदीं काळजी करूं नको!"

भावानं जरी चंद्रीला उठून दुसरीकडे जाण्याबद्दल सांगितलं होतं, तरी पण ती त्याचीच बहीण असल्यामुळे तेथून उठून गेली नव्हती. ती मध्येंच आईला ह्मणते, " आइ, कुठलग दागिने? आणखी कसली किंमत करायची?"

सोन्याबापू एकदम उसळून तिच्या अंगावर येऊन म्हणतो, " कायग, तुला इथून उठून जा म्हणून मघाशीं सांगितलं होतंना! कां नाहीं गेलीस? आणखी मोठ्या माणसांच्या बोलण्यांत लुब्रेपणानं बोलतेस का? चल ऊठ, जा."

चंद्री कशाला उठते आहे! तशीच बसून राहिली.

उमाकाकू तिला एवढेंच ह्मणाल्या, " चंद्रे, त्यांतलं तें तुला कांहीं ठाऊक

नाहीं. तूं अगदीं बोलूं नको. ते दुसरे दागिने आहेत, पण काय रे सान्या, तुला हुकूम कधीं मिळणार? मला मोठी होस आहे, कीं तूं एकदां त्यांच्याबरोबर दहाला जेवून कचेरींत जावेस."

"होईल, होईल, आई! तूं अगदीं त्याची काळजी करूं नको. आपण अगदीं स्वतंत्र बंगल्यांत राहायला लागून स्वतःची घरची गाडी ठेवून, इतक्या थाटापर्यंत गेल्याखेरीज काहीं कधीं राहाणार नाहीं, समजलीस? अग, एकदां मला या क्यांकेंत चिकटूं दे, मी एक स्वतःची क्यांक घालून गाडी घोडा उडवीन. मी आतां उद्यां सकाळीं उठलों कीं, आमच्या प्रोफेसरांकडे जाऊन पुढली तजवीज करतो. मी त्या ऑफिसांत जाऊन बसेपर्यंत, त्यांना चैन कुठलं पडूं द्यायला!"

इतकें मायलेकरांचें बोलणें होऊन थांबलं असं नाहीं. वारंवार वारंवार त्याच त्याच बाबतींत बोलणें चाललेंच होतें; परंतु आतां तें सर्व येथें सांगण्याची कांहीं जरूरी नाहीं. सोन्या सकाळीं उठला नाहीं, तो उमाकाकूंनीं त्याच्या पाठीमागें लकडा लाविला कीं, जाऊन आधीं आपल्या त्या रस्त्याला गांठून बाजारभाव, व जन वगैरेची काय व्यवस्था आहे तो पाहा. त्याप्रमाणें सोन्यानें चहा वगैरे घेऊन व ट्राम भाड्यासाठीं रुपया दोन रुपये घेऊन प्रोफेसर ड्यांडींच्या घराचा रस्ता धरला.

प्रोफेसर ड्यांडींचें अमुक एक कायमचें असें घर असें कोणीच कधीं सांगूं शकत नाना, कारण तसें त्यांस घर नव्हतेंच. सर्व वसुधा हेंच त्यांचें घर. त्याचप्रमाणें आपपर भेदही त्यांस नव्हता. जें दुसऱ्याचें तें आपलेंच, अशी त्यांच्या मनाची पूर्ण भावना झाली होती. अर्थातच ते अमुक एक जागा भाड्यानें घेऊन आणखी तेथें राहात व नियमित वेळीं तेथें असावयाचेच, असें कोणासुद्धां कधीं आढळलें नाहीं. यामुळें आमच्या सोन्याबापूसही अडचण हीच आली कीं, आतां प्रोफेसरसाहेबांस भेटण्यास जावें कोठें! जितक्या ठिकाणीं म्हणून यांची व त्यांची वेळोवेळीं गांठ पडली होती, तितक्या ठिकाणीं बिचाऱ्यानें चौकशी केली, परंतु व्यर्थ. कोठें त्यांचा पत्ता लागेना. मग जितक्या ठिकाणचीं नांवें त्यांनीं वेळोवेळीं घेतलीं होतीं, तितकीं ठिकाणें हुडकून काढण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु तेथें जाऊन विचारावें काय? एक दोन श्रीमंत पारशांच्या घरीं प्रोफेसर इथें आले आहेत काय, म्हणून त्या भोळ्या बिचाऱ्या पोरानें विचारलें व कोणी, कोण प्रोफेसर म्हणून विचारलें असतां हा 'प्रोफेसर ड्यांडी' असें उत्तर देई त्यामुळे इष्ट गृहस्थांचा शोध लागण्याचें दूरच राहून त्याची चेष्टा मात्र झाली. दोन चार ठिकाणीं अशी ठोकर बसल्यानंतर स्वारी थकली व जवळचे पैसेही संपले' तेव्हां घरीं जेवणासाठीं आली. उमाकाकू मोठ्या उत्सुकतेनें वाट पाहातच होत्या. मुलगा येण्याबरोबर त्यांनीं त्यास "काय झालं!" असा प्रश्न केला. सोन्याबापूजवळ समर्पक उत्तर नव्हतें आणि तो भुकेनेंही त्रासला होता. तेव्हां एकदम वसकन आईच्या अंगावर येऊन ह्मणतो, "हो. हो. तुला तरी आई अगदीं धीरच नाहीं. मी आतां हा घरांत पाऊल घालतों आहें एवढाचना? तों तुझं आपलं झालं सुरू. बाबा असं करायचं असेल, तर मला तो मुळींच त्रास नको. अमक माणूस येतो बसतो, तों लागलीच "काय झालं!" "काय झालं" हें काय हें! कामाला

गेलों होतों. सावकाशीं सावकाशानं होतंच आहे."

"बरं बाबा, नाहीं, मी कांहीं विचारीत नाहीं, मग तर झालं. आपले माझे डोळे सगळे तिकडे लागले होते ह्मणून विचारलं. नको तुला तर नाहीं विचारणार. तुला वाटेल तेव्हां सांग."

"नाहीं, विचार तूं. पण त्या विचारण्याला कांहीं धार ! होतं आहे. चाललं आहे. प्रोफेसर त्याच उद्योगाला गेला आहे. तो असा उगाच बसायचा नाहीं आतां. स्नेह्याकरितां तो अगदीं नुसता प्राण देतो. त्याला पुनः कांहीं ह्मणून सांगावं लागत नाहीं. आपलं काम आतां अगदीं झालं ह्मणून समज. आतां त्यांना जेवण नाहीं, खाण नाहीं, झोंप नाहीं, कांहींसुद्धां नाहीं. सकाळपासून–कां ! काल रात्रींपासून–एकसारखा हिंडतो आहे सारखा. आणखी काय पाहिजे ! बरं पण मला आतां आधीं जेवायला वाढ कसं ? म्हणजे मी पुनः जातों त्यांच्या तपासाला."

"म्हणजे ! सकाळीं नाहींच का त्यांचा तपास लागला ?" उमाकाकूंनीं आतुरतेनें विचारलें.

"हेंच तें ! जें मीं मघाशीं ह्मटलं तें हेंच. मघाशीं ह्मणालीस कीं 'नाहीं बाबा मी विचारीत,' आणखी पुनः विचारते आहेसच. तेव्हां आतां त्रासूं नये, तर काय करूं ? मला जेवायला वाढ आधीं आतां."

बिचारीनें त्याला जेवावयाला वाढलें. तो यथास्थित जेवला. पुनः आई कांहीं सांगायाला गेली तर तिच्या अंगावर आला आणि पुनः पोषाख वगैरे चढवून चालता झाला.

संध्याकाळपर्यंत सगळ्या गांवभर हिंड हिंड हिंडला, बिचाऱ्यास त्याच्या त्या परम स्नेह्याचा पत्ता कोठेंही लागला नाहीं !

# प्रकरण २५ वें.

## पावती व हुकूम.



परंतु अगदींच निराशा होण्याचें कारण नव्हतें. एका ठिकाणीं आपल्या मित्राची गांठ खास पडणार अशी त्याला पक्की खात्री होती. संध्याकाळीं त्या नव्या क्यांकेंत स्वारी अकाउंट ऑडिट् करण्याला खास जाणार, असें त्यांनीं स्वतःच सांगितलें होतें. तेव्हां इतका वेळ आपण जितक्या ठिकाणीं हिंडलों तितक्या ठिकाणीं जरी त्यांची गांठ पडली नाहीं, तरी त्या ऑफिसांत संध्याकाळीं स्वारी खास सांपडणारच. तें स्मरण होतांच आमच्या सोन्याबापूच्या डोळ्यांत आशा तळपूं लागली. सगळ्या दिवसभर बिचारा जरी धडपड करून थकला होता, तरी आतां खात्रीनें मित्राची भेट होण्याचें ठिकाण अंतःचक्षूंसमोर उभें राहतांच स्वारी हुशारली व प्रोफेसर ड्यांडीच्या लांबटांगी

चालीचें अनुकरण करून नवीन क्यांकेच्या ऑफिसाकडे स्वारी चालली. मनांतला हेतु हा कीं, प्रोफेसरसाहेब तेथें भेटतांच त्यांचेकडून क्यांकेच्या मुख्याची व आपली मुलाखत करून घ्यावी आणि त्यांच्याकडून लागलीच निदान साठ रुपये दरमहाच्या जागेचा हुकूम घ्यावा. टपालांत तो पडून मग आपल्याला दुसरे दिवशीं मिळावयाचा, त्यांत काय अर्थ आहे ? त्यापेक्षां आपण प्रत्यक्ष जाऊन आजच्या आज हातीं मिळाला तर काय बहार होणार आहे ! आईला तर असा कांहीं आनंद होईल कीं, ती अगदीं लिंबलोण करील. आणखी नानांना तो हुकूम दाखवला कीं. त्यांचें तोंडच बंद होईल. पुनः म्हणून आपल्याला कोणत्याही प्रकारानें लावून किंवा टाकून बोलणार नाहींत. बोलतात काय ! त्यांच्यापेक्षां मोठा पगार होणारना !...

या प्रकारें स्वारीचें मनोराज्य चाललें होतें. मनोराज्य जितक्या जलद चाललें होतें, त्याच्यापेक्षां अर्थातच त्याचे पाय फारच सावकाश चालले. मनोराज्यांत तो जितक्या लवकर ऑफिसांत येऊन हुकूम घेऊन जाणार होता, त्याच्यापेक्षां किती तरी वेळ लागून तो खरोखर ऑफिसापाशीं आला.

आल्याबरोबर क्यांकेच्या दारांतच त्यानें शिपायास विचारलें, "प्रोफेसर इच्यांडी इथें येऊन गेले काय ?"

शिपाई बिचारा काय सांगतो ! प्रोफेसर इच्यांडी म्हणजे कोणी तरी साहेब असला पाहिजे अशी त्याची समजूत होऊन तो सोन्यास म्हणाला, "अरे, आह्मांला ठाऊक काय ? इथें तर रोज पांचपन्नास साहेब लोक, पारशी लोक, मोठमोठे शेटे लोक येतात जातात. आपल्याला काय प्रत्येकाची नांवं ठाऊक आहेत ? पाहिजे तर साहेबांला जाऊन भेटून विचारा. आपल्याला तर कांहीं सांगायला येत नाहीं. आपण मला जर कांहीं बक्षिशी द्याल, तर आपली भेट करून देऊं साहेबांशीं. नाहीं तर, आपला रस्ता धरावा. साहेब फार कामांत आहेत, त्यांची तशी भेट व्हायची नाहीं."

हवालदारसाहेबांचें भाषण अगदीं स्पष्ट होतें. त्यांस गैरसमज होण्याला कांहीं कारणच नव्हतें. सोन्या आपला खिसा चापसून पाहावयास लागला, तों आंत त्यास एक पावली लागली. एवढ्या पावलीवर काम भागेल काय, असें त्यानेंही स्पष्टपणें त्या हवालदारास विचारलें. या पोराजवळ आणखी कांहीं नाहीं अशी खात्री होईपर्यंत त्यानें ओढून धरलें, परंतु शेवटीं आतां हा पावलीसुद्धां न देतां परत जातो, असें जेव्हां त्यास वाटलें, तेव्हां आतां आपल्याकरितां ह्मणून पावलीवारीच साहेबांच्या शिव्या खाण्याचें व त्या खाऊन त्यांच्यापुढें सोन्यास नेऊन उभें करण्याचें त्यांनीं पतकरलें. या वेळीं क्यांकेंतून मंडळी बाहेर जाऊं लागली होती. कारकूनमंडळी एकामागून एक उठून बाहेर येत होती. ती सोन्याकडे टौकारून पाहातच होती. सोन्या आपल्या मनांत ह्मणत होता कीं, आपण एकदोन दिवसांत या मंडळींत येऊन बसणार व या मंडळीप्रमाणेंच नवीन येणाऱ्या इसमाकडे टौकारून पाहाणार.

हवालदार बराच वेळ झाला, आंत गेला होता तो कांहीं केल्या बाहेर येईना. आपली पावली खाऊन स्वारी आपल्याला बहुतकरून फसविणार, असें सोन्याच्या मनांत आलें; परंतु तितक्यांत हवालदारसाहेब बाहेर येऊन म्हणतातः—"तुमचं

नशीब चांगलं आहे, रावसाहेब. नोव्हेअरसाहेब केव्हांच घरीं गेले, पण मी तुमच्यासाठीं आमच्या थोरल्या साहेबांपर्यंत जाऊन आपली दाद लावली. एखादी पावली चवली असली तर या आणखी अशा कामगिरीबद्दल. आमचे हे थोरले साहेब कधीं कोणाच्या अंगावर येत नाहींत. आणखी कोणाचं होण्याजोगं काम असलं, तर अगदीं तावडतोब करून टाकतात. तुम्ही बेलाशक जा. मला त्यांनीं शिव्या दिल्या तुम्हाला सोडण्याबद्दल. तरी मी त्या सोशीन पण तुमचं काम होऊं द्या. तुम्हाला तर शिव्या बसायच्या नाहींत. आमचं काय रोजचंच आहे. पाहा परत येतांना खिसा चाचपून पाहा. सांपडलं कांहीं नाणं, तर आमच्या नशिबाचं म्हणून द्या झालं आम्हाला."

असें ह्मणून त्यांनीं सोन्यास आपल्या मागोमाग येण्यास सांगितलें सोन्या गेला. तों समोर एक साहेब एका मोठ्या टेबलाजवळ बसले होते. त्यांचें कांहीं तरीखरडण्याचें काम चाललें होतें.

सोन्यानें साहेब पाहण्याबरोबर तो अगदीं जमिनीशीं लवून सलाम करून उभा राहिला. साहेबांनीं काय एक दोन वाक्यें लिहून पुरीं करावयाचीं तीं करून त्यांनीं वर पाहिलें आणि एकदम सोन्यास उद्देशून ते म्हणतात, "वेल्, यंग् मॅन्, व्हाट् क्यान् आय् डु फार् यू ? (माझा कोणत्या कामांत तुला उपयोग होणार आहे ?")

सोन्याच्या तोंडून एक शब्द निघण्याची मारामार पडली, तें पाहून ते साहेब स्मित करून त्याचेकडे पाहून त्यास म्हणतात, "तुझं कांहीं विशेष काम आहे काय ?"

"होय साहेब, प्रोफेसर ड्यांडी इथें येणार होते ते इथं आले होते का, आणखी माझं काम त्यांनीं केलं कां ? एवढंच मला विचारायचं होतं."

"प्रोफेसर ड्यांडी ! प्रोफेसर ड्यांडी कौन् ?" साहेबांनीं अर्धवट तिरस्कारानें व अर्धवट मौज वाटून विचारलें; परंतु त्यांच्या त्या कठोर आवाजानेंच हा पोरगा घाबरला. प्रोफेसर ड्यांडी हें आपल्या मित्राचें नांवसुद्धां साहेबांस कसें ठाऊक नाहीं, अशी शंकाही त्याच्या मनांत आली; परन्तु त्यास इंग्रजी धड येत नसल्या कारणानें काय बोलावें तेंच सुचेना. शेवटीं त्यानें चांगलाच हिय्या करून अर्धवट हिंदुस्थानी व अर्धवट इंग्रजी भाषेंत साहेबांस असें समजाविलें कीं, आपण प्रोफेसर ड्यांडींचे एक मित्र आहों व प्रोफेसर ड्यांडी ब्यांकेचे ऑडिटर आहेत. त्यांनीं आपल्यापासून पांच हजार रुपयांचे दागिने ब्यांकेंत ठेव म्हणून ठेवून आपल्याला एक साठ रुपये दरमहाची नोकरी देण्याचें कबूल केलें आहे. या ब्यांकेंत त्यांचें स्वतःचें वजन फार आहे. आजचा त्यांचा ऑडिटिंगचा वार आहे. तेव्हां ते इथें येणार आहेत. त्यांच्याजवळ आपण दागिने दिले आहेत, ते दागिने आपल्या ब्यांकेंत ठेव म्हणून ठेवून आपल्याला जागा देण्याबद्दल शिफारस करणार आहेत. त्यांनीं मला स्वतः हें सांगितलं."

हा सर्व मजकूर साहेबांच्या ध्यानांत येण्यास फार वेळ लागला. कारण साहेबांस हिंदुस्थानी धडपणें येत नव्हतें आणि सोन्याचापूर्चें इंग्रजी तितकेंच त्यांस गहन होतें तथापि कसेंबसें त्यांनीं तें समजावून घेतलें आणि एकंदर हकीकत ध्यानांत घेऊन त्यास सांगितलें, "इथें कोणी तुझ्याकरितां ठेव आणून ठेवली नाहीं, ठेवली असती, तर तुला तेव्हांच नोकरी मिळाली असती.

तूं कोण ड्यांडी म्हणतोस, तो आमच्या ब्यांकेंत मुळींच नाहीं. आह्मीं त्याचें नांवही कधीं ऐकलें नाहीं. तो कोणी तरी बडा लुच्चा असावा. त्यानें तुला थापा मारून, तुझ्यापासून दागिने उपटून पोबारा केला असेल. आमच्या इथें त्या नांवाचा ऑडि-टर कोणी नाहीं. आमचे ऑडिटर बडे लोक आहेत. तुझा हा माणूस भामट्या दिसतो आहे."

"नाहीं, नाहीं, साहेब. आपण नीट शोध करा. तो भामट्या नाहीं. फार मोठा सभ्य गृहस्थ आहे. तो आपल्या इथें ऑडि-टर असेल, आपल्या लक्ष्यांत नसेल."

"व्हाट् नॉनसेन्स! ऑडिटर आहेत् माझ्या लक्ष्यांत नसेल म्हणजे काय? जा. तूंही मला त्यांतलाच दिसतोस. तूं लहान दिसलास, म्हणून मी इतकं तरी बोललों. तूं आपले काय दागिने आणावयाचे ते सरळपणानं माझ्याकडे कां नाहीं आणलेस? मीं तुला पावती दिली असती, आणखी ताबडतोब, त्या दागिन्यांच्या किंमतीच्या मानानं नोकरी दिली असती. तुझं दागिने जर पांच हजारांचे होते तर तुला चाकरी साठ रुपयांची सहज दिली असती. तुमच्या हिंदु लोकांची रीतच ही. सरळपणानं जा-ऊन आपलीं कामं तुह्मी करणार नाहीं. मधें कोणी तरी शिफारस घालून काम करायचं. तुह्मांला वाटतं त्यामुळं कांहीं वि-शेष फायदा होईल. पण आह्मी साहेबलोक अशा शिफारशींना विचारीत नाहीं. खरा गुण आणखी वाजवी जामीन असला कीं झालं आमचं काम. जा तूं आपल्या त्या लुच्चाला दुसऱ्या कोठें तरी शोध. आणखी सांपडला म्हणजे त्याला पकडून, त्याच्या-पासून आपले दागिने घेऊन मजकडे ये. मी तुझ्या मनाप्रमाणें काम करून देईन."

इतकें बोलून साहेबांनीं लागलीच पट्टे-वाल्यास हांका मारून सोन्यास बाहेरची वाट दाखविण्यास सांगितलें आणि आ-पण पुनः आपल्या कामास सुरुवात केली. सोन्याबापू आणखी कांहीं बोलून साहेबांस त्रास देणार तों साहेबांनींच त्यास हातांनीं "जाव, जाव," अशा अर्थी जरा जोराची खूण केली. बिचारा सोन्या बाहेर गेला. हवालदार पुनः बक्षिशी मागूं लागला, परंतु सोन्याजवळ ती देण्यास कांहींच नव्हतें. यामुळें त्यानें गयावया करून आपली सोड-वणूक करून घेतली. बिचाऱ्याजवळ आतां ट्रामपुरतेही पैसे नव्हते. अर्थात् पायीं रख-डतच घरीं जावें लागलें. ज्या मनाच्या स्थितींत तो त्या बॉम्बे बिग बबल् ब्यांकिंग ब्युरोच्या ऑफिसाकडे मघाशीं चालला होता, त्या स्थितीपेक्षां आतां त्याच्या मनाची कशी बरें स्थिति झाली असेल? आपला स्नेही—आपला कैवारी प्रो-फेसर ड्यांडी—खरोखरीच लुच्चा आहे काय? त्यानें आपल्याला खरोखरीच फसवलें काय? दागिने घेऊन तो पळून गेला काय? असेंच असलें पाहिजे, नाहीं तर त्यानें आ-पणास ते दागिने फार कमी किंमतीचे आहेत, असें सांगितलें नसतें. आपल्याला सगळ्या दिवसांत भेटला नाहीं. आपण सगळ्या गांवभर जितकीं ह्मणून त्याचीं बसण्याउठण्याचीं ठिकाणें, तितक्या ठि-काणीं शोध केला तरी कोठें पत्ता लागला नाहीं याचें कारण काय? आपले दागिने घेऊन तो पळून गेला असेल? जर खरो-खर पळून गेला असेल तर मग काय ह्म-णायचें आहे? दागिने कोणाचे? आईनं ते किती श्रमानं आणि शिताफीनं आप-ल्या स्वाधीन केले, आणखी त्यांत हें काय भयंकर झालं? आतां आपण त्याचा शोध

लावावा तरी कोठें ? आई आतां आपल्याला विचारील, नर तिला सांगावं काय ? तिला एक सांगितलं समजा कांहीं तरी, पण शेवट काय लावावा या सगळ्या प्रकरणाचा ? आई आतां विचारल्याखेरीज राहणार नाहीं. कांहीं तरी सांगून फार तर एक दोन दिवस तिची सजजूत होईल, पण पुढं काय ? रोज तीं विचारायला लागली म्हणजे तिला काय सांगणार ? ''

असल्या तऱ्हेचे विचार, प्रश्न व शंका हीं त्याच्या मनांत एकसारखीं उभीं राहत होतीं. होतां होतां तो घरीं आला. तेव्हां अगदीं तिन्हीसांजा होऊन गेल्या होत्या. अंधार पडला होता म्हटलें तरी चालेल. बिचारा थकला असल्या कारणानें, आला तसाच जामानिमा न काढतांच उताणा पडला. आई त्याची अगदीं वाटच पाहात होती. आल्याबरोबर तिनं त्याला बसण्याची सुद्धां फुरसत दिली नाहीं. लागलींच ' काय झालं ? ' म्हणून विचारलें. त्याबरोबर यानें तिरसटून जाऊन तीस दुरुत्तर केलें. उमाकाकूंसारख्या आया अशा वेडगळ प्रेमळ असतात, कीं त्यांना मुलानें दुरुत्तरांनीं तर काय, पण त्याच्याही पलीकडे अपमान केला, तरी सुद्धां, त्या त्याला दादाबाबाच करणार आणि पुनःपुनः त्याला गोंजारणार. त्यांस त्या मुलापलीकडे कांहीं सुद्धां दुसरें दिसत नाहीं. मुलानें दुरुत्तरांनीं अपमान केला, तरी तो त्या वेळीं त्रासला होता, मीच मुळीं थोडा वेळ वाट पाहून विचारायला पाहिजे होतें असें म्हणून आपल्याकडेच दोष घेतील. उमाकाकूंनीं या वेळीं असेंच केलें. मुलगा थकूनभागून बाहेरून आला नाहीं, तोंच त्याजवळ आपण जाऊन असा घाईचा प्रकार कशाला करावा, असा आपला आपल्यासच दोष घेऊन ती अंमळ स्तब्ध बसली व थोड्या वेळानें त्यास म्हणते, " तुला कांहीं खायला पाहिजे का ? सगळ्या दिवसभर वणवण करीत हिंडत असशील. भूक लागली नसेल का ? थोडं खाऊन पाणी पी म्हणजे ..."

परंतु सोन्याबापू कसले तिरशिंगराव ! त्यांनीं " मला आतां घटकाभर स्वस्थ पडूं दे. थोडी तुझी टकळी बंद कर. " असें मध्येंच म्हणून तिचा पाणउतारा केला. त्याची बहीण तेथें जवळच बसली होती. तिनें तें त्याचें भाषण ऐकून एकदम त्यास म्हटलें, " वारे वा ! बापू, तूं फार दिवसानुदिवस आईला टाकून बोलायला लागलास. बाबादेखील असं कधीं बोलत नाहीत. आणखी तूं असं बोलतोस का ? शाबास ! मोठा अगदीं रोजगारी झालास कनी ? सगळ्या दिवसभर ... "

सोन्याबापूनें आपल्या आईस दुरुत्तर केलें, त्यांत त्यास वावगें कांहीं वाटलें नाहीं, परंतु आपल्यापेक्षां लहान बहिणीनें आपला उपमर्द करावा, हें त्यास बिलकुल खपलें नाहीं. तो लागलीच संतापून उठून तिच्या अंगावर धांवला व म्हणतो, " हडळी, लहान तोंडीं मोठा घांस घेतेस का ? दम धर थोतरीच रंगवतों ! "

आणि त्यानें बोलल्याप्रमाणें अक्षरशः केलें असतें, परंतु तितक्यांत चाळीच्या दाराजवळ एक मोठी थोरली जोडीची गाडी येऊन थडकली आणि प्रोफेसर डयांडीचा त्याचें नांव घेऊन हांका मारणारा आवाज त्याच्या कानीं पडला.

मग काय विचारतां ? उंचावरून खालीं दरींत पडणाऱ्या पाण्याच्या वेगानें स्वारी त्याकडे खालीं गेली. त्यास असें वाटलें कीं, आपण आतां माडीवरून उडी टाकूनच

जावें कीं काय? कीं एकदम आकाशांत उड्डाण करून खालीं आपल्या मित्राच्या खांद्यावर बसावें! सगळ्या दिवसभर ज्याच्याकरितां आपण भिरीभिरी हिंडत होतों, ज्याच्याविषयीं आपल्या मनांत इतका अविश्वास उत्पन्न झाला होता, ज्यानें आपणास आपण ब्यांकेचे ऑडिटर आहोंत ह्मणून थाप मारली, शोध करतां तसें कांहींच आढळलें नाहीं, उलट तो तसा नाहीं तसेंच कळलें, ज्यानें आपल्यास आदले दिवशीं गाडीभाडें भरण्यास लाविलें, तो आतां आपल्याला पुनः कसचा भेटतो; तो गुंगारा देऊन जाणार असें वाटत असतां एकदम त्यानें आपण होऊन येऊन आपल्यास हांक मारली आणखी काय पाहिजे? केव्हां एकदां जाईन आणि त्यास भेटून सर्व हकीकत विचारीन, असें त्यास होऊन गेलें होतें. त्याप्रमाणें तो धांवला. प्रोफेसर ड्यांडी त्या वेळीं एकटाच त्या गाडींत होता. गाडी व तिला जोडलेली जोडी एवढी मोठी होती, वरचे कोचमन् इतक्या भचक व श्रीमंती पोषाखाचे होते कीं, तो सर्व थाट पाहातांच सोन्याबापू अगदीं थक्क होऊन स्तब्धच झाला. तो त्या थाटाकडे पाहून गुंगून गेला, हें पाहतांच ड्यांडीसाहेब एकदम त्यास ह्मणतातः-'कम् माय् बॉय्, युअर वर्क् इज् डन्. तुला साठांची तर काय, पण एकदम पाऊणशें रुपयांची जागा देण्याचा ठराव डायरेक्टरांकडून करवला. मी समक्ष मीटिंगला हजर राहून ठराव करवला. अतां त्यांत शंका नाहीं. चल आतां घटकाभर हिंडायला माझ्याबरोबर. आज तिथें त्या ब्यांकेच्या डायरेक्टरांच्या मीटिंगला ते श्रीमंत भाटे-आपले शेट **सडकूनदास नागरजी** नाहींत का-ते आले होते. त्यांनीं आपली गाडी मला दिली ह्मणून मी तीतच बसून इथें आलों. ह्मटलं तुला ही बातमी सांगावी आणखी बाहेरच् न्यावं."

सोन्याबापू गाडींत चढून त्यांच्या शेजारीं बसला. परंतु त्याच्या तोंडांतून एकही शब्द निघेना. गाडी चालू झाली. थोडासा वेळ गेला आणि मग स्वारी जरा शांत होऊन म्हणते, "पण मी स्वतः मघां तिकडे गेलों होतों. साहेबांना भेटलों, मी इतकं सगळं केलं याबद्दल क्षमा करा. पण मला त्या ऑलबॉशसाहेबांनीं असं सांगितलं कीं, प्रोफेसर ड्यांडी कोण तें आह्मांला मुळींच माहीत नाहीं."

"तूं गेला होतास तें काय मला माहित नाहीं का काय? साहेबांच्या मागल्या बाजूला पडदा आहे त्याच्या आड बसून सगळं तुमचं बोलणं एकलं. मीं मुळीं असं बोल ह्मणून ऑलबॉशला सांगितलंच होतं. गाढवा, मला तुझ्या विश्वासाची परीक्षा बघायची होती. तूं काय असं समजलास मी तिकडे गेलों नाहीं? मी आंत बसून सगळं ऐकत होतों. तुझी अशी योग्यता आहे कीं, तुला खेटराजवळ उभा करूं नये, पण मीं गय केली. तें सगळं विसरून तुझ्या दागिन्यांच्या किंमतीची पावती आणली, आणखी चाकरीचा हुकूम उद्यां परवां येईल, तूं मात्र निमकहराम झालास."

हें ड्यांडीचें भाषण इतक्या उग्रतेचें, आवेशाचें व कठोरपणाचें झालें कीं, सोन्या बिचारा घाबरून बेशुद्ध पडण्याची पाळी आली.

---

# प्रकरण २६ वें.

## मनीषा पूर्ण झाली.



प्रभाकरास कुशब्दांनीं ताडन करून पद्माकर जो निघाला, तो पुनः आपल्या खोलींत राहण्यास यावयाचें नाहीं असा निश्चय करून आपल्या एका दुसऱ्या मित्राकडे गेला. आतां परीक्षेचा निकाल होईपर्यंत येथेंच राहणार असें त्यास त्यानें सांगितलें. त्या गृहस्थास त्याच्या या बोलण्याचें फार आश्चर्य वाटलें. परंतु आपल्याकडे आलेल्या मनुष्यास 'कां आलां?' हें विचारणें रास्त नाहीं हें मनांत आणून त्यानें त्याचें नुसतें स्वागतच केलें. पद्माकर तेथें राहिला. परंतु एक दोन दिवसांत त्वेषाची लहर उतरल्यावर त्याच्या मनाची फारच विलक्षण स्थिति झाली. एखाद्या अधीर मनाच्या मनुष्याप्रमाणें गेल्या कांहीं दिवसांत आपल्या हातून वर्तन झालें अशाबद्दल त्यास फार वाईट वाटूं लागलें. आपण या प्रभाकराच्या नादीं लागून विनाकारण आपलें भयंकर नुकसान करून घेतलें असें राहून राहून त्याच्या मनांत आलें. अधीर मनुष्य आपल्या उतावीळेपणाच्या आवेशांत, एखादी गोष्ट करून जातो आणि नंतर त्यास पश्चात्ताप होतो तो तितक्याच आवेशानें होतो, आपण कांहीं एका आशेनें सर्वस्वी आपलें नुकसान करून घेतलें आणि ज्याच्या भिस्तीवर ती आशा धरली, त्यानें आपणास सर्वथैव फसवलें. हा विचार जितका अधीर मनुष्यास दुःखद होतो, तितका कोणताच होत नाहीं. तीच स्थिति पद्माकराची झाली आणि त्याला इतकें वाईट वाटलें कीं, आतां आपल्या जीवितांत अर्थ तरी काय? असेंच त्यास वाटलें. इतकें झालें आहे, तर आतां आपण या सर्व प्रकरणाचा सोक्षमोक्ष तरी करून घ्यावा, म्हणजे सर्व गोष्टींचा निकाल होऊन आपल्याला पुढच्या कामाला लागायला हरकत नाहीं असें त्यास वाटलें. हा प्रभाकर आतांपर्यंत स्वस्थ बसला नसेलच; त्यानें आपल्या आधींच तिकडे जाऊन काय बिव्हा सारवून ठेवावयाचा तो सारवून ठेवला असेलच. तथापि आपण एकदां स्वतः जाऊन सोक्षमोक्ष करून घ्यावा. निदान प्रभाकराचा नीचपणा कोठपर्यंत गेला आहे, हें तरी आपल्याला पूर्णपणें समजून येईल असा त्यानें मनांत विचार करून बळवंतरावाकडे जाऊन त्यांची एकांतीं भेट घ्यावी, असा निश्चय केला.

हा निश्चय केल्याला सरासरी पंधरा मिनिटें झालीं असतील नसतील, तोंच टपालवाल्यानें त्याचे हातीं दोन पत्रें आणून दिलीं. एका पत्राच्या पत्त्याचें अक्षर त्याला आपल्या बऱ्याच परिचयाचें वाटलें आणि त्यानें तें उघडून पाहिलें, तों त्याच्याखालीं सही नसून फक्त 'आपल्यासारख्या भोळवटांचा हितचिंतक' एव



कमला व पद्माकर यांचा विवाह. ( प्रकरण २६ वें पहा. )

डीच सही होती. पत्रांत मजकूर होता तो अगदीं त्रोटक, सुमारें चार ओळी असतील नसतील. परंतु त्या चारच ओळी अशा होत्या, कीं त्या त्यानें सुमारें पंचवीस वेळां वाचल्या.

'सिंहाचा भाग जंबुक कसा नेतो! सिंहाला तो तोंडघशीं पाडून नेतो, विश्वासघात करून नेतो आणि पुनः आपण अलिप्त आहों असा बहाणा करितो. सिंह मात्र बिचारा फसतो आणि अशा विहिरींत पडतो कीं, जेथून सुटका करून घेणें त्याच्या हातांत राहात नाहीं.' एवढींच वाक्यें होतीं. अक्षर ओळखींचेंसें तर त्यास वाटलें, परंतु अमक्याचेंच असें ह्मणण्यास खात्रीनें, त्या अक्षरासारखें अक्षर कोणाचें असावें हें त्याच्या लक्ष्यांत येईना. लिहिणाराचें मूळचें अक्षर ज्या वळणाचें होतें, तें वळण मुद्दाम लपवून लिहिण्याचा प्रयत्न केला असावा असें स्पष्ट दिसत होतें.

कित्येक वेळां मनाची स्थिति अशी असते, कीं तीत विचार किंवा शंका हीं सुचतच नाहींत. पद्माकराच्या मनाची या वेळीं अशीच स्थिति झालेली होती. त्यानें अक्षर ओळखून काढण्यासाठीं प्रयत्नच केला नाहीं. आंतील मजकुरानेंच त्याचें डोकें व्यापलें गेलें. त्या लिहिण्याचा अर्थ व उद्देश आपणास बरोबर समजला असेंच त्यानें धरलें, आणि त्याचा संताप अधिक मात्र वाढला. त्यामुळें त्यास आपलें दुसरें पत्र वाचण्याची इच्छाही झाली नाहीं. तो डोकें हातांनीं धरून चोळी व सुस्कारे टाकी. मध्येंच 'बरें, कांहीं हरकत नाहीं' असें म्हणून आपली मान त्यानें हलवावी आणि वेड्यासारखें इकडे तिकडे पाहावें. होतां होतां काय त्याच्या मनांत विचार आला आणि तो उठला. उठतांना सहज आपल्या पुढला तो कागद उचलून ठेवावा असें मनांत घेऊन त्यानें तो उचलण्यासाठीं खालीं हात केला. तेव्हां त्याच्या हातास तो दुसरा कागद लागला. तेव्हां काय कोणाचें पत्र आहे? पाहूं तरी असें म्हणून त्यानें तें घेऊन फोडलें. पाहातो तों त्यांतही तीन चारच ओळी होत्या; परंतु त्याच्याखालीं सही होती. बळवंत ही सही होती. ती सही पाहातांच स्वारीनें तें पत्र वाचलें. तों त्यांत पुढील अर्थाचा मजकूर होताः—" आपली त्वरित भेट पाहिजे आहे, मी सर्व वेळ घरीं आहें. आमचे मित्र गणपतरावही तेव्हां तेथें असतील."

या ओळी वाचल्याबरोबर पद्माकराची स्थिति अधिकच विलक्षण झाली. आपणास वाटाण्याच्या अक्षता देण्यासाठीं स्वारीनीं बोलावलें असावें, तेव्हां आपण मुळींच जाऊं नये, असें त्यानें मनांत योजिलें. परंतु पुनः त्याला असें वाटलें कीं, आपण हें पत्र येण्याच्या आधींच निश्चय करून चुकलों होतों कीं, काय तो सोक्षमोक्ष एकदां करून घ्यायचा, मग आतां पत्र आलें म्हणून कां बदलावा? तेथें जाऊन स्पष्ट स्पष्ट कायतें झालें ह्मणजे मनुष्याचा नीचपणा कोठपर्यंत जातो, हें तरी सहज समजणार आहे. वेळ येऊं नये, ती आली खरी, मग भित्र्याप्रमाणें मागें मागें बसून तरी काय उपयोग?

असा पुनः निश्चय करून स्वारी उठली आणि जाण्यास निघाली. वाटेनें जातांना त्याच्या मनांत किती प्रकारचे तरी विचार आले! गेल्या वर्षा दोन वर्षांत आपण कसकसे वहावत गेलों आणि कोणत्या परिणामापर्यंत गोष्टी आणून सोडल्या, त्याचें

त्यानें सिंहावलोकन केलें. त्यानें केलें म्हणण्यापेक्षां तें आपोआप झालें, असें म्हटलें तर विशेष शोभणार आहे. त्या विचारांच्या नादांतच तो बळवंतरावांच्या त्या बंगल्यांत गेला. तेथें बळवंतराव बाहेरच बसले होते. त्यांनीं यास पाहातांच मोठ्या उल्हासित वृत्तीनें त्याचें स्वागत केलें. 'इतक्या दिवसांत कां आला नाहीं? पत्राचें उत्तर येईपर्यंत आतां आपण जाणें बरोबर नाहीं असें मनांत आलें वाटतें? पण आजारी माणसांच्या समाचाराला तर यावें कीं नाहीं असें प्रश्न केले आणि पुढें होऊन त्याचा हात धरून त्यास त्यांनीं आपल्याजवळच्या खुर्चीवर बसविलें.

पद्माकरानें असल्या सत्काराची अपेक्षा केली नव्हती. असें बोलणें होईल ही त्यास कल्पना नव्हती. त्यामुळें तो सर्व प्रकार पाहून तो अगदीं भांबावून गेला. त्याला असें वाटलें होतें कीं, उभ्याउभ्याच बहुतकरून आपणास निरोप मिळणार; परंतु तसें झालें नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट अगदीं पाहिल्याप्रमाणें आपलें स्वागत होतें आहे, तेव्हां हा प्रकार आहे तरी काय? त्याला कांहींच उमगेना.

प्रथमचें स्वागतपर भाषण झाल्यानंतर बळवंतरावांचा चेहरा थोडा गंभीर झाला व ते लागलीच पद्माकरास म्हणतात, "पद्माकरपंत, मी आतां थोडासा गंभीरपणा आणून बोलणार आहें, तुमचें पत्र आल्या दिवसापासून मी—आह्मी सर्वच जण त्या गोष्टीचा विचार करतों आहोंत. गणपतराव येथें आल्यापासून व त्यांचें आणि तुमचें बोलणें झाल्या दिवसापासून त्या विचाराला दिशा निराळी मिळाली होती. परंतु एकंदरींत पुष्कळ भवति न भवति होऊन आह्मीं असें ठरविलें कीं, आपल्या विचाराप्रमाणें करावयाचें. मध्यंतरीं तुमच्या घरच्या वाचनींत काय काय प्रकार झाले, ते सारे प्रभाकरानें मला सांगितले. तसे प्रकार न घडतां आपला कार्यभाग होता, तर विशेषच चांगलें होतें. परंतु तें कधींच शक्य नव्हतें. हेंही पण प्रभाकरानें मला सांगितलें."

प्रभाकराचें नांव दोन वेळां निघालें तेव्हां पद्माकरानें आपल्या कपाळास आंठ्या घालून (किंवा त्या स्वाभाविकपणें पडून असेल) बळवंतरावांकडे पाहिलें; परंतु बळवंतरावांच्या लक्षांत तें आलें नाहीं. ते पुढें बोलतच होते. "तेव्हां आमचा विचार असा ठरला कीं, तुमच्या इच्छेप्रमाणें करावयाचें. हिच्या दुखण्याचा कांहीं नियम सांगवत नाहीं, यामुळें ही गोष्ट जितक्या लवकर घडून येईल, तितक्या लवकर यावी अशी तिची त्यांत फार इच्छा आहे. माझ्या मनांत आणखी दोन तीन वर्षें तरी थांबावें असें होतें. परंतु ती जरी स्पष्ट बोलून दाखवीत नाहीं, तरी आपला नेम नाहीं, आपल्या देखत जर हें कार्य झालें, तर फार बरें, असें तिला वाटतें आहे किंवा तें व्हावें—आणि लवकर व्हावें—अशाबद्दल ती उत्कंठित आहे. अशी माझी, गणपतरावाची व वहिनींची पक्की खात्री झाली. वहिनींमुळेंच ही तिची इच्छा आह्मांला समजून आली, तेव्हां तिच्या इच्छेकरितां हा संबंध जितक्या लवकर घडेल तितक्या लवकर घडावा, असा आमचा सगळ्यांचा विचार ठरून मी तुह्मांला पत्र लिहिलें आठ दिवसांच्या आंत समारंभ उरकावयाचा असें ठरविलें, तर तुमची कांहीं हरकत नाहींना?"

इतकें बळवंतरावांचें बोलणें होतें तों गणपतराव आंतून बाहेर आला व मध्येंच

ह्मणतो, " हरकत ? कोणाची ? यांची ? कालिदासानेंच त्याचें उत्तर दिलें आहे.

" क इदानीं शरीरनिर्वापयित्रीं शारदीं ज्योत्स्नां पटान्तेन वारयति "

कां ? पद्माकरपंत, मी ह्मणतों असेंच कीं नाहीं ? "

पद्माकर त्या बोलण्यानें इतका लाजला कीं, त्याचें उत्तर कालिदासाच्याच शब्दांत देण्याचें आलें असून त्याच्या जिभेनें तें बाहेर निघालें नाहीं. तो किंचित् स्मित करून खालीं पाहूं लागला. तेव्हां बळवंतराव त्यास म्हणतात; " मग ? मी तुह्मांला बोलावलें, तें आठचार दिवसांतला कोणता मुहूर्त तुह्मांला पटतो तें विचारायला बोलावलें, जी गोष्ट ठरली. ती आतां लांबणीवर टाकायची नाहीं. बोला."

पद्माकर बराच वेळ कांहीं एक बोलला नाहीं. नंतर म्हणतो, " मुहूर्ताचें काय, जो मुहूर्त, जी वेळ तुम्हीं ठरवाल, ती मला शुभच आहे. पण मी एक प्रश्न विचारतों त्याचा आपण विचार करून काय तें ठरवावें. प्रश्न विचारतों म्हणण्यापेक्षां वस्तुस्थिति सांगतों असेंच म्हटलें तर विशेष बरें होणार आहे. माझी अगदीं एका पायावर तयारी आहे. अशा स्थितींत सुद्धां मी उत्तम तऱ्हेनें राहीन अशी माझी उमेद आहे, परंतु तुमचा विचार तुम्हीं केला पाहिजे. माझा आतां माझ्या कुटुंबाशीं कांहीं सुद्धां संबंध नाहीं. मी आज या घटकेस अकिंचन आहें. "

" ती हरकत आतांचीच काय आहे ! विवाह झाल्याबरोबर ही हरकत उपस्थित होणार होतीच. त्यांत विशेष तें काय ! त्याखेरीज दुसरी तर कांहीं हरकत नाहींना ? "

" दुसरी काय असणार ? " पद्माकरानें किंचित् उत्कंठितपणें उत्तर दिलें आणि त्याच्या चर्येवर एकदम उल्हासितपणाचें तेज चमकूं लागलें. तो मळचा दुखणा आणि त्यांत हा असा आनंददायक प्रकार झाल्याबरोबर मग काय विचारतां ! त्या बैठकीस सर्व कांहीं ठरलें. दिवस, वेळ आणि स्थळ. गणपतरावांच्या ओळखीनें माधवदासांच्या विवाहशालेंत सर्व व्यवस्था करण्याचें ठरलें. निमंत्रणपत्रिकेचा मसुदा तयार झाला; आणि पद्माकरपंत बराच वेळ बसून घरांतील मंडळींत भेटण्यासाठीं आंत गेला, तों प्रभाकर द्वारकाबाईच्या जवळ बसून कांहीं बोलतो आहे. कमला तेथेंच उभी होती. ती पद्माकरास पाहून चटकन् उठून लाजून उभी राहिली. परंतु पद्माकरानें तिजकडे पाहिलें नाहीं. प्रभाकराकडे पाहतांच त्याच्या चर्येवर घनपटल आलें. भिवयांचें आकुंचन झालें. प्रभाकराच्या तोंडून नितक्यांत एक वाक्य बाहेर पडलें. ' तीही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. ' हें वाक्य मागल्या कांहीं बोलण्याच्या संबंधाचें होतें, हें उघडच आहे. पद्माकर आंत जातांच प्रभाकरानें उल्हासित चर्येनें त्याच्याकडे पाहिलें. पद्माकर आतां बोलेल असें त्यास वाटलें. परंतु तो बोलला नाहीं. द्वारकाबाईस मात्र ' कसं काय आहे ? ' एवढेंच त्यानें विचारलें आणि पुढें, " जातों आतां, जरा गर्दी आहे, " असें ह्मणून तेथून तोंड फिरविलें. प्रभाकरास वाईट वाटलें, परंतु तें त्यानें एके बाजूस सारून आपण होऊनच किंचित् थट्टेच्या स्वरानें पद्माकरास ह्मटलें, " अहो, अहो, लग्नगर्दी तर आतां आहेच आहे. पण थोडे इकडे तर याल. आतांच एकमेकांला पाहून दूरदूर कां व्हायला लागलां ? "

" दूर करणारे असले कीं दूरही होतात. जरा गर्दी आहे, जातोंच. " एवढेंच कसें

तरी बोलून स्वारी चालतीच झाली. प्रभाकरास एखादें मर्मभेदक शस्त्र उरांत खुपसल्याप्रमाणें झालें. परंतु तो मोठा समयज्ञ होता. त्यानें तें दूर सारून द्वारकाबाईस म्हटलें, 'पाहा, कशी तुमच्या जांवईबोआंना घाई झाली आहे ती!' पण कमलेनें त्याची चर्या पाहिली आणि तिला तो सर्व प्रकार चमत्कारिक वाटला. इकडे पद्माकर तेथून निघून आपल्या जागीं गेला.

हा प्रकार काय झाला! आपण प्रभाकराला दुरुत्तरें केलीं, तीं केवळ मूर्खपणानेंच काय? त्यानें तर आपली सर्व हकीकत बळवंतरावांस सांगितली. असें बळवंतरावांच्या बोलण्यांत आलें. ही त्यानें काय हेतूनें सांगितली असावी बरें? आपलें हें जुळूं नये. आपली स्थिती फार वाईट झाली आहे, आतां आपल्याला कमला देण्यांत अर्थ नाहीं, असें सुचवावें म्हणून तर नसेलना हा प्रकार झाला? अशी त्यास शंका आली. परंतु शेवटीं स्वारीची फजीती उडालेली दिसते. तरीच तो माझ्या देखत तिथें नव्हता. माझ्यापुढें येण्याची त्याला लाज वाटली असावी. मी आंत जाईन आणि तो तेथें आहे, हें माझ्या दृष्टीस पडेल, असें त्याला वाटलें नसावें. "तीही गोष्ट विचार करण्यासारखी आहे." हें तो कशाबद्दल बोलला? विघ्नें आणण्यासाठीं जें काय करायचं तें सगळं करूनच्याकरून पुनः गृहस्थ माझी थट्टा करायला तयारच. मी कसा पण छान टोमणा दिला? तोंडाची बोथरखिडीच झाली खाशी!" असले विचार त्याच्या मनांत चालल होते; परंतु त्यास असल्या विचारांत गर्क होऊन बसण्यास तितकी फुरसतच नव्हती. तथापि आणखी एक चमत्कारिक प्रसंग झाला, तो येथें सांगून ठेवतों. पद्माकर बळवंतरावांच्या बंगल्यांतून निघाला, तेव्हां त्याला असें झालें होतें कीं, आपल्या सुदैवाची बातमी केव्हां एकदां कोणास सांगेन. कर्मधर्मसंयोगानें त्यास राजारामपंत समोरून येतांना दिसला. दुसरें कोणीच नाहीं, तर त्यासच ही आपली सुवार्ता सांगावी अशी इच्छा त्याला झाली आणि त्यानें त्यास ती सांगितली. त्यावर "हं! एकूण तुमच्या स्नेहांचें बेत फसले तर! बरं झालं बोआ!" एवढेंच म्हणून तो स्नेही तेथून निघून गेला. पद्माकराच्या डोक्यांत त्या त्याच्या उद्गारानें पुनः काहूर केलें आणि त्याचा उल्हास कमी झाला.

इकडे त्या भावी विवाहाची बातमी गांवभर पसरली. दुसरे दिवशीं प्रसिद्ध होणाऱ्या दोन वर्तमानपत्रांत दोन तऱ्हेनें आली. ती येथें मासल्याकरितां देतोंः—

"या आठवड्यांत शेट माधवदासजींच्या विवाहशालेंत एक अत्यंत इष्ट व स्तुत्य विवाह होणार आहे. वधुवरें दोन्हीही थोर कुळांतील व सुशिक्षित आहेत. या विवाहांत विशेष हें आहे कीं, वधू ही एका पुनरूढ दंपत्याची कन्या असून प्रौढ आहे आणि वर कुलीन व थोर घराण्यांतील असून विद्वान् आहेत. आमचे मित्र रा. बळवंतराव यांस असा जामात मिळाल्याबद्दल व रा. रा. पद्माकरपंत यांस कमळाबाईसारखी वधू मिळाल्याबद्दल आम्ही दोघांचेंही अंतःकरणापासून अभिनंदन करतों. सुधारणेचें तारूं हळूहळू का होईना, परंतु सततपणें व संथपणें पुढें चाललें आहे, तें या संसारसमुद्रांतील दुर्धारक मगरांना जुमानीत नाहीं; हीच मोठी आनंदाची गोष्ट आहे. एवढें सांगून आम्ही

या नूतन जोडप्यास चिरायुष्य इच्छितों."

दुसऱ्या वर्तमानपत्रांत याचसंबंधानें लिहिलें होतें; तें असें:—

"येत्या आठवड्यांत येथें एक सुधारकी विवाह होणार आहे असें ऐकतों. वधू एका सुधारकाची पुनर्विवाहित कुटुंबाची कन्या आहे व वर एक नवीनच कुलंगे सुधारक आहेत. हे कुलंगे सुधारक एका फार सन्मान्य, सच्छील व धर्मशील अशा गृहस्थांचे चिरंजीव आहेत व मुंबईस शिकण्याकरितां राहिले असतां सुधारकांच्या जाळ्यांत सांपडले. नाटकांत गेलेलीं पोरें त्या दिखाऊ थाटमाटाला व फुकट मिळणाऱ्या साजाला भुलून आपल्या आई बापांस टारगटपणाचीं उत्तरें देऊन त्यांना अवमानतात, त्यांतलाच या नवीन कुलंग्या सुधारकांनीं प्रकार केला असल्याचें आमच्या कानीं आलें आहे. तें कसेंही असो, वर सांगितल्या प्रकारचें एक टारगट लग्न येथें होणार आहे एवढी गोष्ट खरी. वधू **सुशिक्षित** आहे कीं काय हें आम्हांस सांगतां येत नाहीं, परंतु ती **सुवृद्ध** आहे हें मात्र खास. या विवाहाच्या स्तुत्यत्वाबद्दल आमचीं कांहीं भावंडें आतां टिमकी वाजवितीलच. कारण असें एक लग्न म्हणजे त्यांची मोठी जुबिली होय. आतांच्या काळीं सर्व पुरुषार्थ, अशीं लग्नें उर्फ हातलावणीचे समारंभ करणें व विधवांचे पाट लावणें यांतच आहे."

अशा तऱ्हेनें वर्तमानपत्रांतून हा विवाह प्रसिद्ध झाल्याकारणानें लग्नाचे दिवशीं शेट माधवदास यांच्या विवाहशालेंत अशी गर्दी जमली, कीं कांहीं वर्णन करणें शक्य नाहीं. गणपतरावांच्यामुळें मुंबईतील बहुतेक पुढारी मंडळी तेथें जमली असून त्यांनीं सर्वांनीं वधूवरांचें अभीष्ट चिंतन केलें. कमळाबाईच्या पुष्कळ मैत्रिणी व अलेक्झांड्रा गर्ल्स् स्कूलमधील मास्तरणी तेथें आल्या होत्या. साहेब, पारशी, मुसलमान वगैरे पुष्कळ मंडळी आली असल्याकारणानें विवाहस्थान फारच प्रेक्षणीय झालें होतें. वधूवरें समोरासमोर बसलीं असतां थोडाबहुत विनोदही झालाच. एकंदरींत विवाह मोठ्या समारंभानें पार पडला.

---

# प्रकरण २७ वें.

## गंगापुरचे गुंडभट्ट व शास्त्री.



दादासाहेबांनीं आपल्या चिरंजिवांस एक फार कडक असें पत्र पाठवून स्वारी स्वतः तातडीनें काशीयात्रेस गेली. आपल्या त्या पत्रापासून आपल्या चिरंजिवांचे मनावर कांहीं इष्ट परिणाम होईल आणि तो त्या पत्रांतील मजकुरानें भेदरून जाऊन आपली क्षमा मागण्यास येईल ही कल्पनासुद्धां दादासाहेबांस नव्हती. आपल्या अंगचे सर्व गुण आपल्या मुलाच्या अंगांत ओतप्रोत भरलेले असून आपला करारी किंवा दुराग्रहीपणाही अगदीं ओतप्रोत पूर्णपणें त्याच्या अंगीं उतरला असावा हें त्यांस पक्कें वाटून चुकलेंच होतें. आपल्या पत्रापासून त्याचा निश्चय ढळणें तर लांबच राहिलें, परंतु त्या निश्चयास बळकटी मात्र येईल असेंही त्यांस स्पष्टपणें वाटलें. याउपर आतां त्या 'कारट्याचें' मुखावलोकनसुद्धां करावयाचें नाहीं. हा तर त्यांचा स्वतःचा निश्चय झालाच, परंतु आपल्या कुटुंबापैकीं कोणाही माणसानें आतां त्याच्याशीं कांहीं संबंध ठेवला तर, आपणास खपावयाचें नाहीं, असा सर्व घरांत त्यांनीं जिकडे तिकडे जाहीरनामा फिरविला.

दादासाहेब ह्मणजे पक्का जमदग्नीचा अवतार होता. त्यांच्यापुढें कोणाची ब्र काढण्याचीसुद्धां ताकद नव्हती. बरोबरीचें कुटुंब, परंतु त्यांच्या मर्जीचा तालामाला पाहिल्याखेरीज अमुक एक गोष्ट अशी करावी किंवा तशी करूं नये, हें बोलणेंसुद्धां त्यांस दुष्कर असे. किंबहुना अशक्य असें ह्मटलें तरी चालेल. कोणतीही गोष्ट, मग ती महत्त्वाची असो अगर गैरमहत्वाची असो, ती अमक्याच तऱ्हेनें झाली पाहिजे, असा एकवार दादासाहेबांचा हुकूम सुटला कीं, ती तशी न करतां, अशी करण्याला अमुक कारणें आहेत, असें सुचविणाराचे वाभाडे उडालेच ह्मणून समजावें. ज्यांना कधीं दुसऱ्याच्या हाताखालीं काम करण्याची जरूरी लागली नाहीं, कोणचीही गोष्ट कशी करावी, याबद्दल दुसऱ्या कोणाचें मत विचारण्याचा प्रसंग आला नाहीं, त्यांस अरेरावीपणाचें बाळकडूच असतें. त्यांत आणखी दादासाहेबांसारख्या मंडळींना चारचौघांत जाण्याची मुळींच संवय नसल्याकारणानें त्यांच्या स्वभावास अनियंत्रितपणा येतो. त्यांचेकडे येणारे लोक स्वतंत्र विचारांचे व स्पष्ट बोलणारे फारच क्वचित् असावयाचे. ज्यांचेकडे हे कधीं जावयाचे नाहींत, ते तरी आपण होऊन यांचेकडे काय ह्मणून येणार? अर्थातच यांचे भोंवतीं अशीच मंडळी जमावयाची कीं, ज्यांना यांची गरज. गरजू मनुष्य कधीं अशांच्या मताविरुद्ध आपणांस कांहीं वाटलें, तरी तें स्पष्ट बोलून

दाखवावयाचे नाहींत. इतकेंच नव्हे, तर यांचें मन सुप्रसन्न होऊन आपलें काम त्यांचे हातून व्हावें हा त्यांचा हेतु असल्या कारणानें यांची 'हांजी हांजी' करून त्यांनीं मनधरणी चालू ठेवावयाची. यांचे तोंडावर यांचेसारखे निःस्पृही, करारी, परोपकारी गृहस्थ कोठेंही आपण पाहिला नाहीं. असलीं माणसें नवीन मंडळींत अगदीं ह्मटल्या अगदींसुद्धां सांपडणार नाहींत, ह्मटलें तरी चालणार आहे. ही दानतच कांहीं निराळी! नाहीं तर हे आतांचे रावसाहेब, आणखी रावबहादूर घ्या! यांना कांहीं तरी दानत का शील, का कांहीं! कांहीं सुद्धां नाहीं असें भाषण नेहमीं व्हावयाचें. मग आणखी काय पाहिजे? यांना असेंच वाटावयाला लागतें, कीं आपल्यासारखा कोणीही माणस या जगांत नाहीं. मग यांनीं जगांत कोणाला मुळींही अक्कल नाहीं असें आपण प्रतिपादन करावें, आणि बाकीच्यांनीं त्यावर माना डोलवाव्या, असें सदोदित सुरू होतें. आपल्या बरोबरीनें आपल्याशीं भांडतील, बोलतील, आपले दोष काढतील अशा माणसांचा आणि यांचा संबंध येईल, तर यांच्या स्वभावाच्या खाचाखोचा नाहींशा होतील कीं नाहीं? तसा संबंध न आणण्याविषयीं यांची मोठी आतुरता असावयाची. घरीं बसून आपल्याहून कमी दर्जाच्या कारकुनांत अगर गरजू लोकांत आणि नेहमीं यांच्या मर्जीचा कल पाहून होस हो देण्यांत तत्पर असणाऱ्या लोकांत यांचें वाक्पांडित्य चालावयाचें. दादासाहेबांचा सगळा काळ अशा लोकांनीं परिवृत्त अशा स्थितींत गेला, यामुळें त्यांच्या आढ्यतेची अगदीं पराकाष्ठा झाली होती. हें यापूर्वीं वाचकांच्या निदर्शनास आलेंच आहे. तेव्हां त्यासंबंधानें आणखी कांहीं सांगण्याची अवश्यकता आहे असें नाहीं.

दादासाहेबांनीं आपल्या चिरंजिवांस कडक पत्र लिहून पाठविल्यानंतर त्यांनीं लागलीच काशीयात्रेचा निश्चय करून तो अमलांत आणला. काशीयात्रा दोन तीन महिने करून पुनः परत आल्यावर दिगंबरपुरास यावयाचें नाहीं, दुसऱ्या कोठें तरी पवित्र क्षेत्रीं राहावयाचें, असा त्यांचा निग्रह होता, आणि ज्या गांवांत आजपर्यंत आपण इतक्या ऐटीनें राहिलों, जें काय ह्मणूं तें करूं म्हणून कीर्ति मिळविली, त्याच गांवांत जहागिरदाराशीं सोयरीगत करण्याचें जुळवून पुनः 'माझं कांहीं चालत नाहीं' असा लाजिरवाणा परत निरोप पाठवून सोयरीगत मोडण्याचा प्रसंग आला तेव्हां आतां तेथें राहाणें त्यांस कसें बरें वाटणार!

स्वारीचा काशीयात्रेनें थोडा संताप उतरला तेव्हां यात्रा संपवून स्वारी गंगापुरास येऊन राहिली. दिगंबरपुराचें नांव टाकलें. यांना पाहिजे तसा जम गंगापुरास तेव्हांच बसला, आणि मन थोडें शांत झालें. मात्र आपल्या त्या पोराचें नांव सुद्धां कोणी काढतां कामा नये हा हुकूम कायमचा कायम होता.

दादासाहेबांस तेथें येऊन कांहीं दिवस होतात न होतात, तोंच मागील प्रकरणांत सांगितलेला त्यांच्या चिरंजीवांचा विवाह झाल्याबद्दलची बातमी गांवांत येऊन धडकली आणि गंगापुराच्या भटांपैकीं एकानें आचरटपणानें जाऊन, त्यांस स्वतःस विचारलें: " मुंबईस एका तरुण गृहस्थानें नुकताच एका पाट लावलेल्या विधवेच्या मुलीशीं विवाह केला, आणि गांवांत अगदीं दाट वदंता आहे कीं, ते गृहस्थ आपले

चिरंजीव आहेत. रावसाहेब, ही गोष्ट खरी काय ! "

दादासाहेबांनीं तें ऐकिलें मात्र आणि त्यांच्या अंगाचा विलक्षण संताप झाला. त्यांचें सर्वांग अगदीं थरथरूं लागलें. संतापानें डोळे लाल झाले, आणि ते त्या भटाच्या अंगावर ओरडून ह्मणाले, "तुह्मां भटुग्यांना दुसरा कांहीं धंदाच नाहीं कारे दुसऱ्यांच्या कुटाळक्या करण्यापलीकडे ! हो. हो. तो माझाच कारटा, मग ह्मणतोस काय ! "

असल्या नऱ्हेचा तोफेचा गडगडाट आपल्यावर होऊन आपली त्रेधा उडेल, हें गुंडभटजींच्या स्वप्नींसुद्धां नव्हतें. क्षेत्रस्थ ब्राह्मणांच्या आचरटपणाला अनुसरून त्याचें वर्तन होतें. आपण कांहीं जरी बोललों तरी आपल्यास कोणी अरे कीं तुरे करीत नाहीं, जाऊं द्या ब्राह्मण बोलतो आहे, त्याला काय बोलावें ! असें म्हणून जो तो गुंडभटजींच्या आचरटपणाबद्दल त्यास तसाच सोडून देई. यामुळें गुंडभटजी शेंफरल्याप्रमाणें झाले होते. ते आपल्या यजमानांची किंवा दुसऱ्या कोणा श्रीमंतांची कधीं पर्वा करीत नसत; असा त्यांचा फार मोठा लौकिक त्या क्षेत्रस्थ मंडळींत असे. कोणी यजमान जरा पैशाच्या बाबतींत घट्ट मुठीचा आहे असें दिसलें कीं, त्याला गुंडभटजी भेटला पाहिजे असेंच नेहमीं जो तो ह्मणे. यामुळें गुंडभटजी म्हणजे एक शेंफारलेलें प्रस्थच झालें होतें आणि तशांत त्यांचें वयही थोडेंसें साठीच्या पलीकडल्या बाजूला गेलें होतें, तेव्हां त्यांस वयोवृद्ध ह्मणून मान देण्यांत येऊं लागला होता. गुंडभटजी ज्ञानवृद्ध म्हणूनही नांवाजलेले असत. परंतु नांवाजलेले असत इतकेंच कायतें. नांवाजले जाण्याला खात्रीलायक असें कारण कांहींच दिसत नव्हतें. गुंडभटजींना आपल्या शाखेच्या संहितेची संथा देतां येत नाहीं, अगर ब्राह्मणाचा पाढाही धड पढवितां येत नाहीं, अशी नवीन होतकरू विद्यार्थ्यांत त्यांची ख्याति होती. गंगापुरास रुद्रघाटावर गुंडभट आले, म्हणजे सर्व भिक्षुक मंडळी त्यांस उत्थापन देई, एवढ्यांमुळें होतकरू विद्यार्थीही तसें करीत. परंतु अंतःकरणापासून गुंडभटजींबद्दल सन्मानबुद्धि एकास असेल, तर शपथ. ज्या वेळीं कोणी वडीलधारें माणूस जवळ नसेल, तेव्हां गुंडभटजींबद्दल विद्यार्थीमंडळ काय बोलत असे, तें मोठें ऐकण्याजोगें होतें; परंतु तें येथें सांगण्याजोगें नाहीं. गुंडभटाची आणखी थोडीशी हकीकत येथें सांगून आमच्या दादासाहेबांचे व त्यांचे काय दोन हात झाले, तो वृत्तांत पाहूं.

गोदापुरांत एक जहागिरदार गृहस्थ राहात असत. गुंडभट हे त्या गृहस्थांचे आश्रित असत. हा एक त्यांस फार मोठा आधार होता.

जहागिरदारांचें नांव काकासाहेब दडपे. देशस्थांत चमत्कारिक आडनांवें असतात, त्याप्रमाणेंच हें काकासाहेबांचें आडनांव पडलें होतें कीं त्यांच्या पणजांनीं निपणजांनीं कोणा यजमानाची जहागीर दडपली होती म्हणून त्यांस त्यांच्या निंदकांनीं तें आडनांव दिलें होतें, तें सांगवत नाहीं. सध्या एवढी गोष्ट खरी कीं, त्यांचें आडनांव दडपे होतें, आणि काकासाहेबांस जहागीर कशी मिळाली, त्याच्या इतिहासाकडे लक्ष्य दिलें ह्मणजे, किंवा हल्लीं काकासाहेबांचें जें ज्या त्या बाबतींत वर्तन पाहावें, त्यावरूनही विचार करतांना असें दिसतें, कीं त्यांचें तें आडनांव अगदीं

अन्वर्थक होतें. काकासाहेबांनीं गुंडभटजींस आश्रय दिलेला होता, आणि ते त्यांस शास्त्रीबुवा ह्मणत. अर्थातच एवढ्या थोरल्या गृहस्थांनीं त्यांना शास्त्रीबुवा म्हटल्यानंतर मग काय, शास्त्रीबुवा हेंही नांव प्रचारांत येऊं लागलें. परंतु गंगापुरांतील शास्त्रीमंडळी होती ती गुंडभटजींस आपल्या गोटांत कांहीं केल्या घेईनात. कोणी गुंडभटजींना शास्त्री म्हटलें, कीं या शास्त्रीमंडळीचा अगदीं संताप व्हावयाचा. काकासाहेब जर त्यांना शास्त्री म्हणतात, तर इतरांनीं कां म्हणूं नये, असें कोणी त्यांस म्हटलें, तर शास्त्रीमंडळींनीं म्हणावें, 'कुंभकारानं आपल्या वाहनास लंबकर्ण न म्हणतां श्यामकर्ण म्हटलं, म्हणून कर्णाचं लंबत्व जाऊन त्यास शामत्व थोडंच येणार आहे? आणि जोंपर्यंत तसं होत नाहीं, तोंपर्यंत गुंडभटजींस शास्त्री अशी संज्ञा देणं कसं शक्य होणार!"

हा शास्त्रीमंडळीचा कोटिक्रम गुंडभटजींच्या कानीं गेला होता. परंतु त्याचा प्रतिकार करण्यास त्यांना चांगलीशी संधीच आज कित्येक वर्षांत सांपडली नव्हती. ते 'शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायानें शास्त्रीमंडळीस अपशब्दपुष्पांजलि वाहून स्वस्थ बसत, झालें. दुसरें काय करणार? परंतु ते आपल्याकडून शास्त्री मंडळीवर सूड घेतां येण्यास संधि पाहातच होते. ती संधि केव्हां येईल असें त्यांस झालें होतें.

एका दृष्टीनें पाहातां अशी संधि आणणें त्यांस अगदीं सोपें होतें. आपण कोणत्या तरी शास्त्रांत चांगले पारंगत आहोंत, असें दाखविणें त्यांच्या हातचें होतें; परंतु आपण होऊन आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शन करून प्रतिष्ठा मिरविणें हें आपल्यास अगदीं गौण वाटतें, अर्थातच आपण अत्यंत विनयसंपन्न असल्या कारणानें आपलें विद्यासंपन्नत्व कोणास दाखविणें आपल्या हातून होणार नाहीं असें ते नेहमीं ह्मणत. मात्र शास्त्रीमंडळी त्यावर म्हणत: "गुंडभटांजवळ विनयसंपत्ति फार असल्यामुळें विद्यासंपत्ति ठेवण्याला त्यांचे डोक्यांत स्थानच नाहीं."

तें कसेंही जरी असलें, तरी एवढी गोष्ट खरी कीं, काकासाहेबांस त्यांच्या विद्वत्तेचें व शास्त्रपारंगततेचें ज्ञान पूर्णपणें झालें होतें व त्यामुळें ते नेहमीं असें ह्मणत कीं, या आमच्या गंगापुरांत जर कोणी वैदिकांत आणि शास्त्रांत खरोखर नांव घेण्याजोगा माणूस असेल, तर ते आमचे गुंडभट ऊर्फ गुंडशास्त्रीच होत. एके बाजूस वैदिक, एके बाजूस शास्त्री अशी मंडळी बसवून यांस मेरुमण्याप्रमाणें अगदीं मध्यभागीं बसविलें असतां कोंदणांत बसविलेल्या हिऱ्याप्रमाणें स्वारी शोभणार आहे. आमचा आश्रय त्यांना आहे म्हणूनच त्यांची एवढी योग्यता झाली, ही गोष्ट कांहीं अंशीं खरी; परंतु यांचे अंगीं तसे गुण म्हणून आह्मांला तरी त्यांस अशा तऱ्हेचा आश्रय देण्याची बुद्धि झाली.

गुंडभटजीच्या तोंडावर काकासाहेबांनीं असें भाषण केलें, ह्मणजे भटजी अर्थातच कांहीं बोलत नसत; परंतु ते दृष्टीआड झाले, ह्मणजे भटजींनीही आपला गौरव आपल्याच तोंडानें वाटेल तसा करून घेऊन, "काकासाहेबांच्या आश्रयाची आपणास मुळींच अपेक्षा नाहीं, आपण खुशाल कोठें संस्थानांत जाऊं तर उत्तम आश्रय मिळवूं. कोणा राजाची व आपली, एकवार भेट होण्याचा अवकाश कीं त्यानें आपल्याला पदरीं ठेवून आपलें

चीज केलेंच. परंतु आपल्याला गंगापूर सोडायचें नाहीं. म्हणून आपण, आहे त्यांत संतुष्ट राहून, इथेंच यांच्या बढाया एकत राहतों आहोंत" असें म्हणून यथेच्छ वाक्सुख घ्यावें. असा गुंडभट्ट ऊर्फ गुंडशास्त्री यांचा पूर्वेतिहास होता.

दादासाहेबांनीं गुंडभट्टास झाडल्याबरोबर गुंडभट्टाच्या अभिमानास फारच जबरदस्त असा धक्का बसला. आजपर्यंत त्यांनीं आपल्या स्पष्ट वक्तृत्वाचें प्रदर्शन बरेच वेळां बऱ्याच लोकांपुढें केलें, परंतु त्यांत कोणी एकदम अरेतुरेपर्यंत येऊन भटुर्ग्या म्हणण्यापर्यंत पाळी आणली नव्हती. ती आज एकदम अचानक आली, त्याबरोबर त्यांना कसेंसेंच झालें आणि या गृहस्थाला उलट काय बोलावें, हें त्यांस कांहींच सुचेना. त्यांच्या मनांत अतोनात संताप आला, शिव्या देण्याचीही पुष्कळ इच्छा झाली; परंतु नितक्यांत दादासाहेब हे फार मोठे गृहस्थ आहेत, ते फार थोर अंमलदार होते, असें त्यांस स्मरल्यावरून त्यांनीं जिव्हानियंत्रण केलें. फक्त एवढेंच त्यांनीं दादासाहेबांस म्हटलें, "रावसाहेब, आपण फार थोर आहांत. पण आपल्याला माणसाची परीक्षा काडीइतकी नाहीं. मी आज येथें वैदिकांचा आणखी शास्त्र्यांचा प्रमुख आहें, शिवाय आपण ज्याच्या पासंगासुद्धां लागणार नाहीं, अशा एका जहागिरदार गृहस्थाचा आह्माला आश्रय आहे, तेव्हां आपण बोललांत तें कांहीं विचारानं बोलायचं होतंत, आमच्या क्षेत्रांत येऊन आमचा असा अपमान करणं आपल्याला शोभत नाहीं, आणखी याचा परिणामही पण बरा होणार नाहीं."

दादासाहेबांनीं तें पहिलें बोलणें शांतपणें ऐकून घेतलें आणि आपण ब्राह्मणास अशा तऱ्हेनें अगदींच टाकून बोललों, हें बरें केलें नाहीं, असें वाटलें. गुंडभटजी जर त्यावेळीं 'आपण बोललांत तें कांहीं विचारानं बोलायचं होतंत' इतकेंच बोलून थांबते, पुढें बोलले तें बोलतेना, मुकाट्यानें बसते. तर त्या दिवशीं, त्या बैठकीस जरी नाहीं, तरी दुसरे दिवशीं कदाचित् दादासाहेबांनीं त्यांस बोलावून आणून झाल्या गोष्टीबद्दल आपणास वाईट वाटतें, असें बोलून दाखवून अन्य मार्गानें त्यांच्या अपमानाबद्दल भरपाईही करून दिली असती; परंतु गुंडभटजींनीं आपल्या शेवटल्या दटावणीनें, तो भावी प्रसंग अगदीं घालविला. त्यांच्या त्या बोलण्यानें दादासाहेबांस अधिकच चीड आली आणि ते त्यास म्हणतात, "आह्मांला काय शोभतं, आणखी काय नाहीं, हें आमचं आह्मांला चांगलं ठाऊक आहे. तुह्मी भट झालांत तर आपल्या म्हणण्यासंबरण्याच्या आणखी फुकट जेवणं झोडलीं असतील त्यांच्या गप्पा ठोका. आमच्यासारख्या गृहस्थांना अपमानकारक असलं बोलत जाऊं नका. पुनः माझ्याशीं भाषणसुद्धां करूं नका. क्षेत्रांतले तुमच्यासारखे भट आणखी कावळे सारखेच. कशांत तोंड घालाल आणखी कशांत नाहीं........"

त्यांचें भाषण गुंडभटास इतकें झोंबलें, कीं तो ताड्कन् उडी मारूनच त्यांच्या समोरून नाहींसा झाला. हा भाषणसमारंभ झाला, त्यावेळीं आणखी एक दोन मंडळी तेथें होतीच. त्यांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं, गुंडभटजी उठून गेल्यानंतर दादासाहेबांस त्यांनीं हे भटजी कोण, काय, वगैरे सर्व कांहीं सांगितलें, आणि एकंदरींत अशा तऱ्हेचें भाषण केलें कीं, गुंडभटजींस आपल्याकडून बक्षीस मिळालें, तें अगदीं

यथायोग्य झालें असें जरी नाहीं, तरी फारसें वावगें नाहीं असें त्यांस वाटलें असावें असें दिसलें. त्याच दिवशीं रुद्र-घाटावर गुंडभटांची झालेली फजिती, अगदीं जगजाहीर झाली. ज्या ब्राह्मणांच्या देखत ती झाली होती, त्यांना ती मिठाचें पाणी प्यालेल्या माणसांप्रमाणें, केव्हां कोठें ओकूं, केव्हां कोठें ओकूं, असें होऊन जाऊन त्यांनीं ती ठिकठिकाणीं ओकून टाकली. सगळ्या गांवभर गुंडभटजींच्या फजितीचा बोभाटा झाला. शास्त्रीमंडळीस ती हकीकत कळतांच त्यांच्या आनंदाला पारावारच नाहींसा झाला. प्रत्येक जण दुसऱ्याला विचारून त्या हकीकतीचीं पारायणें ऐकूं लागला. गुंडभटांनीं स्वतः काकासाहेबांस मात्र ती आपल्या परीनें सांगितली. काकासाहेबांस आपल्या आश्रितांचा असा अपमान झाला हें पाहून अतोनात संताप आला आणि त्यांनीं सूड उगविण्याची एक युक्ति काढली.

---

# प्रकरण २८ वें.

## चाकरीचा हुकूम.



आज हुकूम येईल, उद्यां येईल, असें करतां करतां जवळजवळ पंधरा दिवस गेले, तरी सोन्याबापूच्या हातीं चाकरीचा हुकूम मुळींच नाहीं. प्रोफेसरसाहेबांस त्यानें रोज भेटून विचारावें आणि त्यांनीं त्यास कांहीं तरी सबब सांगून त्याची समजूत घालण्याचा यत्न करावा. तो यत्न सफळ होत नाहींसें पाहिलें, तर त्याजवर उलटें गुरकवावें, त्याच्या अधीरपणाबद्दल त्याला शिव्या द्याव्या आणि असें करशील तर मी या तुझ्या चाकरीच्या भानगडींत मुळींच पडणार नाहीं, असें ह्मणून दटावणी दाखवावी, असा प्रकार पंधरा दिवस चालला होता. उमाकाकूंनी रोज हुकूम केव्हां येणार ह्मणून सोन्यास विचारावें, सोन्यानें रोज उद्यां ह्मणून सांगावें आणि पुनः दुसरा दिवस उजाडला कीं, आज पाहा आतां मी स्वतःच आफिसांत जाऊन साहेबाला भेटून हुकूम घेऊन येतों, ह्मणून सांगून लवकर जेवून घराच्या बाहेर पडावें, असा क्रम चालला होता. दागिने घरांतले गेले. दागिन्यांच्या किंमतीची पावती मात्र अगदीं ऑलूबॉशसाहेबांच्या सहीची प्रोफेसर ड्यांडीनें आणून मागेंच दिली. सोन्याच्या व उमाकाकूंच्या मतें कमींत कमी पांच हजार रुपये किंमतीचे दागिने होते, परंतु पावती कायती बाराशें रुपयांची होती. पावती हातीं आली ते दिवशीं सोन्यानें आईला ती दाखविली, परंतु किती रुपयांची आहे असें विचारल्याबरोबर कचरून जाऊन त्यानें

तिला ती पांचहजार रुपयांची आहे असेंच सांगितलें. तिला बिचारीला वाचतां थोडंच येत होतें ! तिनें ती त्याचेपासून घेऊन मुकाट्यानें लपवून ठेवली. कारण दुसऱ्या कोणास दाखविण्याचीही सोय नव्हती. पावती जरी हातीं आली, तरी चाकरी मिळेना याचें तिला आश्चर्य वाटे, तिची मोठी महत्त्वाकांक्षा ही कीं,सोन्यास आपल्या नवऱ्यापेक्षां मोठी चाकरी मिळावी, आणि त्याचा डौल आपण करूं लागून नवऱ्यास पावलोपावलीं ह्मणावें, " कां ! पोरगा अगदीं वेडा ह्मणत होतांना ! तुमच्यापेक्षां आधीं तुमच्यापेक्षां मोठा पगार मिळवायला लागलाना पण ? तुह्मी आपले असेच रिकामे हेलपाटे घालून मोठ्याच्या घराचे उंबरठे झिजवून सोडा. उपयोग काडीचाही नाहीं. " तो प्रसंग केव्हां एकदां लाभतो, आणखी आपण एकदां नवऱ्यास केव्हां मनमुराद बोलून घेतों असें उमाकाकूंस होऊन गेलें होतें. उमाकाकूंचें विश्वासस्थान-हितगुजाच्या गोष्टी बोलेण्यापुरतें-त्यांची मुलगी होय. चंद्रीजवळ त्यांच्या गोष्टी चालावयाच्या. आतां एकदां सोन्याबापूला नोकरी लागली, ह्मणजे आपण चंद्रीच्या वडिलांस काय काय प्रकारांनीं बोलणार आणि आपण तसें बोललों, ह्मणजे ते कसकसे संतापतील, त्रासतील, मग आपण त्यांना आणखी काय बोलूं वगैरे सर्व गोष्टींची तिनें आपल्या मनांत जेवढी म्हणून योजना केलेली होती तेवढी सगळी चंद्रीच्याजवळ बोलून दाखविली, त्याचप्रमाणें चाकरी लागतांक्षणींच सोन्याबापूस मुली सांगून येतील, मुली सांगून आल्या ह्मणजे आपण हुंडा पुष्कळ मागूं, आणखी करवलीचा मान फार जबर मागूं, असेंही तिला अगदीं खात्रीपूर्वक सांगण्यांत आलें. चंद्रीला लुगडें मागावें कीं शालू मागावा, याबद्दल मायलेंकींत वादविवाद झाला. चंद्री स्वतः, लुगडें मागावें परंतु तें जरीकांठी मागावें असें ह्मणाली, आणि आई म्हणाली, 'भिकाऱ्यासारखं लुगडं घ्यायचं नाहीं, चांगला दोनशें अडीचशें रुपयांचा शालू मागितला पाहिजे.' होतां होतां चंद्री शालूला कबूल झाली. हा एकंदर प्रकार व हुंड्याच्या रकमेबद्दलचाही वाद रोज होत असे. सुमारें पांच सहाशेंपासून हजार बाराशें पंधराशेंपर्यंत रकमा खालीं वर होत होत्या. परंतु इतक्या सगळ्याचा पाया ज्याच्यावर, ती चाकरी मात्र कांहीं केल्या हातीं आल्याचें किंवा येण्याचेंही चिन्ह दिसेना.

एके दिवशीं उमाकाकू स्वस्थ बसल्या होत्या—चुकलों—स्वस्थ ह्मटलें ही फार मोठी चूक. त्या बिचारीला स्वस्थपणा कुठला ! तिचें मन अगदीं अस्वस्थच होतें आणि तशांत तिच्या मनांत असा विचार आला कीं, ज्याच्या मार्फत सोन्यानें साहेबाला पैसे भरले तो लुच्चा तर नसावा ? त्यानें मधल्यामधें दागिने पळविले तर नसावे ? नाहीं तर इतके दिवस झाले तरी चाकरीचा हुकूम कां येऊं नये ? असा विचार तिच्या मनांत चालला असतां सगळ्या दिवसभर वणवण करीत हिंडत असलेला सोन्याबापू तेथें आला. त्यास पाहातांच उमाकाकूंचा विचार विशेषच जोरावला व त्या एकदम आपल्या मुलास ह्मणतात, " सोन्या, मी विचारतें तेवढं खरंच सांग. हा जो तुझा विश्वासातला म्हणून जुना स्नेही आणला होतास, तो लुच्चा तर नाहींना ? त्यानं ते दागिने मधल्यामधें तर लांबविले नाहींना ? मला

आतां तशीच शंका येऊं लागली आहे ह्मणून विचारतें, नाहीं तर, पोरा दागिन्यापरी दागिने जातील, आणखी चाकरीचं नांव नाहीं."

ती शंका ऐकतांच सोन्यास घुस्सा आला. त्याला स्वतःला ती शंका होतीच; परंतु आइनें ती शंका घेण्याबरोबर स्वारी चवताळून म्हणते: "छे. छे. आई, ही भलतीच शंका अगदींच घेऊं नको. प्रोफेसर आतांशा रोज जाऊन त्या हुकुमासाठीं खटपट करतो आहे, पण जागा रिकामी नाहीं म्हणून एव्हां हुकूम देतां येत नाहीं, असा साहेबाचा जबाब आला. तेव्हां प्रोफेसराचं आणखी साहेबांचं भांडण झालं कीं, जर तुमच्याजवळ जागा रिकामी नव्हती, तर आमची अमानत ठेव तुह्मीं कां घेतली? ती जर घेतली आहे तर आतां तुमच्या आफिसांत जागा रिकामी असो वा नसो, आमच्या ठेवीबद्दल व्याज दर शेंकडा रुपये दोनप्रमाणं दिलं पाहिजे, नाहीं तर चाकरीवर तरी रुजू करून दरमहा साठ रुपये दिले पाहिजेत. प्रोफेसर ड्यांडींनीं असं साहेबांला चापलं, शेवटीं वकिलाच्यामार्फत नोटिस देण्याबद्दलसुद्धां जेव्हां धाक घातला, तेव्हां साहेबांनीं "या महिन्यापासून पगार तर सुरू करतों" असं सांगितलं. आणखी या महिन्याचा पगार पहिल्या तारखेला तोच आणून देणार आहे. मात्र आफिसांत, एव्हांशीं जायचं नाहीं. पण आपलं काय जातं आहे? पगार जर हातीं आला, तर आमचा काय आग्रह आहे? कीं आह्मीं तिथें जाऊन त्या खुर्चीवर बसलं पाहिजे? खरं कीं नाहीं आई?"

परंतु आईला त्यांत विशेष खरें वाटलें नाहीं आणि पगार हातीं येईलच असा भरंवसाही पण लागेना. तथापि मुलगा रागावलासें पाहून अधिक उणें कांहीं न बोलतां ती एवढेंच ह्मणाली, "पहा बाबा, कोणीकडून अगदीं वाटोळं न होवो म्हणजे झालं. नाहीं तर तुझी पोरबुद्धि आणखी माझी बाईलबुद्धि. करायला गेलों एक, आणखी झालं भलतंच, असं न होवो. दुसरं कांहीं माझं म्हणणं नाहीं."

सोन्याबापूनीं पुनः तिला नानाप्रकारांनीं आश्वासनें दिलीं. "तुला अगदीं काळजी नको. माझी चाकरी अगदीं खाम ठरलेली, तुला त्याची काय भीति वाटते!" असें त्यानें शंभर वेळां तिला म्हटलें. चंद्री फार चमत्कारिक. तिचें आईला, "कांहींसुद्धां नाहींग आई, हा रोजरोज हेंच सांगतो आहे. आज कितीं दिवस माझे..."

परंतु सोन्याबापू तिला बोलूं कोठें देतो! तो वस्कन् तिच्या अंगावर येऊन तिला ह्मणतो, "गप्प बस, तूं आतांशा फार वात्रटपणा करायला लागली आहेस बरं का, पण तुझं थोबाड फोडायला कमी करणार नाहीं, हें खूप समजून ठेव. तूं आपल्या ठिकाणीं समजत असशील कीं, मी श्रीमंताच्या घरीं पडलें आहे, ह्मणून मी तुझा दिमाख ठेवीन, पण असे कितीक थेरडे श्रीमंत माझ्या पायाशीं लोळताहेत समजलीस?......" त्या बिचाऱ्या आईस त्याला हो हो करतां करतां पुरेवाट झाली. चंद्रीनें रडण्यास व त्याला मोठमोठ्यानें शिव्या देण्यास सुरुवात केली आणि सारा गोंधळच उडाला. शेवटीं सोन्याबापू तेथून निघून चालता झाला.

सोन्याबापू आईशीं बोलतांना जरी प्रो० ड्यांडींच्या विश्वासूपणाबद्दल अगदीं पूर्णपणें तरफदारी करीत असे, तरी त्याचें स्वतःचें मन त्याच्याबद्दल अगदीं बेभरंवशी झालें होतें. आपण याच्या नादीं लागून

सफाई बुडाली, आपले दागिने यानें गट्ट केले, असें त्याच्या मनानें पूर्णपणें घेतलें, परंतु प्रो० ड्यांडींची व त्याची समक्ष नजरानजर झाली कीं, त्याच्या मनांतला सर्व बेभरंवसा कोणीकडच्या कोणीकडेच जाई

तर सांगितल्याप्रमाणें आईजवळ भाषण व बहिणीजवळ भांडण करून स्वारी बाहेर पडली ती अशा निश्चयानें कीं, आतां आपल्या त्या मित्राला भेटून त्याला मडकून बोलावयाचें आणि एक तर आमचे दागिने तरी जसेच्या तसे दे, नाहीं तर चाकरीचा हुकूम आणून दे, नाहींपेक्षां मदूनानांना दागिन्यांची सगळी हकीकत सांगून काय होईल तें करतों. नाना पोलिसांत वर्दी देऊन तुला पकडण्याला कधींसुद्धां कमी करावयाचे नाहींत. त्यांची पोलिस अधिकाऱ्यांत चांगली वग आहे, असा धाक घालून त्याला भेवडावून टाकण्याचा विचार त्यानें केला. तो भेटल्याबरोबर काय बोलावयाचें आणि कसें बोलावयाचें याची मनांतल्या मनांत तालीमसुद्धां त्यानें केली. आतां स्वारी भेटण्याचाच काय तो अवकाश ! परंतु स्वारी भेटते कशी, आणखी कोठें ? त्यानें पुष्कळ पायपिटी केली. शेवटीं एका नेहमींच्या इराण्याच्या शॉपमध्यें साहेब सांपडले. त्यांची व सोन्याबापूची दृष्टादृष्ट होतांच ड्यांडीसाहेब स्वतः मोठ्यानें " ओहोहो ! सोन्या, माय फ्रेन्ड, अरे तुझी गांठ केव्हां पडेल असं मला झालं होतं. तुझा हुकूम येऊन दोन दिवस झाले, गुलामा, चार वेळां तुला घरीं शोधायला आलों, तुझा पत्ता नाहीं. शेवटीं घरीं हुकूम ठेऊन येऊं का काय असा विचार केला पण म्हटलं, कोणाच्या हातीं जाईल, आणखी गहाळ होईल. नाहीं तर दुसराच कोणी तरी तुझं नांव सांगून चाकरी पटकावील. अरे, या मुंबईत बाबा असले लुच्चे लोक आहेत कीं, विचारूं नकोस. हा तुझा हुकूम. पण या हुकुमावरून तुला एव्हां रुजू वगैरे होतां यायचं नाहीं बरं का ? आपला हुकूम पदरांत पाडून घेतला आहे. जागा रिकामी झाल्याबरोबर दुसरा हुकूम येईल, तो आला कीं रुजू, अन् एकदां चिकटलास कीं, मग काय विचारतोस ! तिसाचे चाळीस, चाळिसाचे पन्नास, साठ, शंभर, दीडशें, दोनशें, अडीचशें असा चढत जाणार. अरे, माझी शिफारस वायां जाणार कशी ! पोरा, तूं मात्र विनाकारण बेभरंवसा करतोस. त्याचा मला संताप येतो आहे, दुसरं कांहीं नाहीं. बाकी तूं कितीं जरी बेभरंवसा दाखविलास, आणखी कांहीं केलंस, तरी माझं जें तुझ्यावर प्रेम आहे, तें कांहीं कधीं कमी होणार नाहीं, आणखी मी कांहीं तुला सोडणार नाहीं. अरे, मला कायमची पांचशें रुपयांची नोकरी मिळत होती, ती नाकारून मी तुझ्यासाठीं आधीं हुकूम घेतलाना ! माझ्या चाकरीचं काय गुलामा, मी लाथ मारीन तिथें पाणी काढीन ! अगदींसुद्धां मला काळजी नाहीं. पण तुला मीं एकदां आपलं म्हटलं, आतां त्यांत अंतर होणार नाहीं. हा पहा, आपल्या डोळ्यानं आपला हुकूम बघ. पाहिलास ? आतां असूं दे. माझ्याजवळ राहूं दे. तूं पोरा कुठं तरी हरवून टाकशील. तो दुसरा हुकूम आला कीं, हानू तो बरोबर तुला देईन. दोनही घेऊन जा आणखी साहेबांच्या पुढें उभा रहा. म्हणजे चटूकन् साहेब तुला काय काम सांगायचं तें सांगतील. पोरा, तुला या जगाची माहिती नाहींरे. मला तुझी सगळी काळजी घ्यायला पाहिजे आहे आणखी मी

घेणार. तूं मला किती जरी थुनकारून दिलेंस, येभरंवसा दाखविलास, तरी मी तुला हातीं धरला आहे तो सोडणार नाहीं."

प्रोफेसर डयांडी या वेळीं जरा रंगांत होते. यामुळें त्यांच्या या लांबलचक बोलण्याबरोबर त्यांना प्रेमाचाही पान्हा फुटला. त्याच्या आवेशांत झुकांडे खात खात त्यांनीं आपल्या मित्रास मिठी मारली आणि एकदम प्रेमाश्रु गाळण्यास सुरुवात केली! दोन्ही डोळ्यांतून इतके प्रेमाश्रु गळूं लागले कीं, कांहीं विचारूं नये. नुसते पाट सुरू झाले.

बिचाऱ्या सोन्याचा निश्चय त्या पाटांत कोणाकडच्या कोणाकडे वाहून गेला. आपल्या या थोर मित्राचें खरें प्रेम आपल्यावर आहे अशी त्याच्या मनाची खात्री झाली.

मग आतां बोलावयाचें काय राहिलें? हुकूम हातीं आलाच. फक्त त्याला पगार किती याची शंका राहिली होती. कारण पगाराच्या चढतीचें वर्णन करतांना डयांडीसाहेबांनीं तिसापासून सुरुवात केली होती. तेव्हां त्यानें त्यास हुकूम किती रुपयांच्या जागेचा म्हणून विचारतांच, "पगार किती म्हणून काय विचारतोस पोरा? पगाराची जागा आज मी कोरीच टाकल्यासारखी ठेवून हुकूम आणला आहे. उगीच कांहीं तरी आंकडा भरायचा तर घाला म्हटलं तीस. बाकी आतां पहिली जागा जी रिकामी होईल, ती तुला मिळणार. मग साठांची होवो, कीं पाऊणशांची होवो. दीडशांची झाली, तरी तुला मिळणार. अगदीं पक्कं समज. या इथें तिसांचा आंकडा आहे, इथें आणखी एक पूज्य देऊं का घालून? तीनशांची जागा रिकामी झाली, तर तीनशें रुपयांचीसुद्धां जागा तुला मिळेल. या हुकुमांतल्या आंकड्यावर काय तूं चमला आहेस? वेड्यासारखा. ये. सोडा घे थोडासा. बर्फ टाक त्यांत थोडं. आतां आज फीस्ट झाली पाहिजे तुला. काढ कांहीं रुपया आठ आणे असले तर पाहूं. हा मूर्खा, देवळांत यायचं तें असं रिकाम्या खिशांनीं यायचं का? अशानं कसं होईल? देवाला कांहीं नैवेद्य नको का? "पाव बिस्कीट केक आइस्क्रीम नायनैवद्यं समर्पयामि, नैवेद्यमध्ये सोडाव्हिस्की पानीयं समर्पयामि" असं म्हटलं पाहिजे. चल, आटप. मीच आज तुला कांहीं खाऊ दिला असता, पण मी कोट बदलला त्यांत मनीबॅग राहिली. जा आतां जा. इथं नको थमूं. आधीं आईला जाऊन सांग, कीं आपल्याला हुकूम मिळाला. आणखी म्हणावं मी जेवायला येणार आहे. आज जा, पोरा. तिला सांग म्हणावं दीडशांचा हुकूम मिळाला. अरे त्याचा काय नेम? मिळेलय् कदाचित्. जा म्हणतोंना! उभा काय राहिलास? गेट आवे, गेट आवे, माय बॉय्, नाहीं तर हाही हुकूम मी फाडून टाकून स्वस्थ बसतों. पुनः तुझ्या भानगडींत म्हणून पडायचा नाहीं. जा. मी आज खरोखर जेवायला येतों. समजलं काय? काकूंना सांग कीं, चांगलं चुंगलं कांहीं तरी करा."

सोन्याचा बिचाऱ्याचा त्या बडबडीच्या सपाट्यांत अगदीं चक्काचूर झाला. हुकूम त्यास पहाण्यास मिळाला नाहीं. तो तिसांचा आहे पण तीनशांचाही होऊं शकतो. जागा आज मिळत नाहीं. दुसरा हुकूम आल्यावर मिळणार. मग या पहिल्या हुकुमाचा अर्थ काय? सारेंच गोंडबंगाल. उलगडा करून घ्यावा असें त्याच्या मनांत आलें, परंतु बोलण्याची छाती कोठें आहे? तो

व्हावी कशी ? शेवटीं ' तो हुकूम आईला दाखविण्यासाठीं म्हणून तरी द्या ' असें त्यानें ह्मटलें. तेव्हां स्वारी संतापून म्हणत, " मूर्खा, आईला काय समजतं आहे त्यांत ? तिला काय वाचायला येतं आहे तिला हुकूम दाखवायचा म्हणतो आहेस तो ? सोन्या, तूं आतांशा माझ्याविरुद्ध फारच वागतोस बोआ. हें तुझं करणं चांगलं नाहीं. तुला आमचा बेभरंवसा झाला असला, तर तसं एकदां मला सांग. आणखी तुझं आमचं आपलं बऱ्यांतच आहे, तोंपर्यंत ठीक आहे. जर तुलाच खात्री नाहीं, तर तुझे दागिने मी परत आणून देतों कसे ! उगीच दूर खेपेला भगभग नको. चल, बोल काय तें, आहे कबूल ? सगळे दागिने जसेच्या तसे बँकेंत ठेवलेले आहेत, ह्मणशील त्या दिवशीं काढून आणून देतों. समजलास ? बोल बोल, देऊं का आणून ? आतां का मुखस्तंभासारखा उभा राहिलास ? पाजी कुठला ! जेव्हां काम होतं तेव्हां अगदीं भरंवशाच्या गोष्टी सांगून पोटांत शिरून जेवायला या, अमक्याला या, तमक्याला या, असं करीत होता. आतां चाकरीचा हुकूम हातांत आला, पावत्या हातांत पडल्याबरोबर डोळे उरफाटले. चल पुनः तुझं दर्शनसुद्धां मला नको. मूर्ख पोरांच्या नादीं लागूं नये ह्मणतात तें कांहीं खोटं नाहीं. पण मला वाटलं, गरीब पोर आहे, त्याचं हित होतं आहे, तें कां करूं नये ? अरे सोन्या, तूं माझा धाकटा भाऊ असं मी आजपर्यंत समजत आलों, आणखी तसा तुझ्याशीं वागलों आणखी तूं आतां असं वागतोस ? काय ह्मणावं आतां तुला, पोर रे पोर !"

पुनः प्रेमाचा झटका येऊन डयांडीसाहेबांनीं त्यास कवटाळलें, पुनः झिडकारलें, पुनः व्याख्यान दिलें आणि शेवटीं त्यास तेथून लावून दिलें.

सोन्या बिचारा तेथून निघाला. हुकूम त्याच्या हातांत मिळाला नाहींच. तेव्हां आईला नुसतें सांगण्यापलीकडे कांहींच नव्हतें. आणि नुसत्या सांगण्यावर आई आतां खुष होत नव्हती. तथापि आपण आपल्याकडून तर नाटक यथास्थित करावयाचें, असा त्यानें निश्चय केला आणि तो घरीं आला. आल्याबरोबर आईच्याजवळ गेला आणि त्यानें मोठ्या उल्हसित वृत्तीनें ह्मटलें, " आई, आई, हुकूम आला. आतां अगदीं काळजी नको तुला. आतां तुझ्या मनाप्रमाणं सगळ्या कांहीं गोष्टी जुळणार. दागिने व्यर्थ गेले, बुडाले, असं तुला वाटत होतंना ? आतां दरमहा आला म्हणजे तर नाहीं वाटणार ! "

" दागिने व्यर्थ गेले, बुडाले, असं तुला वाटत होतंना ? " हें वाक्य तो मोठ्या उल्हासानें उच्चारायला आणखी त्याच्या पाठीमागें सदूनाना उभे राहण्याला एकच गांठ पडली.

" दागिने बुडाले ! व्यर्थ गेले ! कुठले दागिने ? कसला दरमहा ? " त्यांनीं एकदम दोघां मायलेंकरांकडे पाहून विचारलें !

# प्रकरण २९ वें.

## पुढें काय करावें?



**रीतीप्रमाणें** लग्न तर झालें. आधीं ज्या वर्तमानपत्रांनीं ज्या तऱ्हेनें त्या लग्नाचें पूर्व स्वागत केलें होतें, त्याच प्रकारें त्या त्या पत्रांनीं त्याची गर्हणा केली किंवा अभिनंदन केलें. कांहींनीं तो एक समाजास अत्यंत घातक असा प्रसंग झाला म्हणून तारस्वरानें विलाप केला तर इतरांनीं तो आमच्या समाजाच्या भावी हिताचा पाया रचला गेला ह्मणून उच्च स्वरानें गायन गाइलें. ज्याप्रमाणें वर्तमानपत्रांत, त्याचप्रमाणें साधारणतः सर्व मंडळींत दोन तऱ्हेचीं मतें ऐकूं येऊं लागलीं. लग्नाच्या नंतर एक भोजन-समारंभ झाला, त्या भोजनास आमंत्रणें देते वेळीं गणपतरावानें सर्वांस असें सांगितलें कीं, "आमच्या पक्षाची एकंदर संघशक्ति किती आहे हें पाहण्यासाठीं भोजनास ये-णाऱ्या मंडळींचीं नांवें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. तेव्हां अमक्या विवाह-समयीं आपण भोजनास गेलों होतों हें स्पष्टपणें जाहीर करण्यास ज्यांची हरकत नसेल, त्यांनींच आमंत्रण स्वीकारावें. नाहीं त्यांनीं उगीच आपल्यास घोंटाळ्यांत घालून घेऊं नये." गणपतराव ह्मणजे स-गळ्या मुलखाचा उतावळा, त्यास पुष्कळ मंडळींनीं असें सांगितलें कीं, "अशी अट घालून विनाकारण अडचणी उत्पन्न कर-ण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. जे कोणी येतील, त्यांस येऊं द्यावें, असें केल्यानेंच त्यांची आपल्या या कार्याला सहानुभूति मिळणार आहे. प्रत्येकाची सहानुभूति रस्त्यांच्या कोंपऱ्या कोंपऱ्यांवरून उद्घोषित करून जगजाहीर करतां आली, तरच ती सहानुभूति; नाहीं तर तिला कांहीं अर्थ नाहीं, असें ह्मणणें अगदीं चुकीचें होणार आहे. जो जेथवर येऊं म्हणेल तेथवरच त्यास येऊं दिलें, तर आपलें नुकसान कांहीं नाहीं. चोरून लपून त्यानें सहानु-भूति दाखविली, म्हणून त्याची सहानु-भूति कमी आहे असें नाहीं. त्या सहानुभूतीच्या प्रदर्शनानें नुकसान होईल तें होऊं नये एवढीच त्याची इच्छा असते, तर बाबारे, तूं असा कांहीं प्रकार करूं नकोस. साहजिकपणें जें होईल तें होऊं दे."

परंतु गणपतराव हा निराळ्या शीलाचा मनुष्य. त्याचें नीतीचें परिमाण फार निराळें. जें कृत्य आपणास उघड्या मा-थ्यानें करण्याचें धैर्य नाहीं, तें करण्याच्या खटाटोपांत कोणाही पामरानें पडूं नये, हें त्याचें ह्मणणें. एखादें कृत्य जर चांगलें वाटलें, इतरांना तें वाईट व अनिष्ट वाटलें, तरी आपल्याला तें चांगलें व इष्ट वाटतें आहे, असें जर आहे, तर त्याच्याबरोबर तसें जगांत तारस्वरानें उद्घोषित करून दाखवून जगास तुच्छ मानण्याचें धैर्यही पाहिजे, असें त्याचें ह्मणणें. अशा त्याच्या

मताबद्दल त्याच्या मित्रांशीं त्याची अनेक वेळ वाटाघाटही झाली; परंतु त्यानें आपलें ह्मणणें कधीं सोडलें नाहीं. त्याचीच आज पुनरुक्ति झाली. इतरांचें कोणाचेंही न ऐकतां त्यानें ज्यास त्यास आपली आमंत्रणाची अट घातली आणि त्यामुळें कित्येक मंडळींची त्या दिवशीं जेवावयाला जाण्याबद्दल निराशा झाली. कोणी ह्मणाले, "इतक्या जाहिरपणें जेवायला येऊन जगाला आपल्या नीतिधैर्याचें प्रदर्शन करण्याची आह्मांस जरूर वाटत नाहीं." कोणी ह्मणाले, "आह्मी आल्यानंतर तीं नांवें प्रसिद्ध झालीं असतीं, तर आमचें आह्मी काय तें पाहून घेतलें असतें, परंतु तुम्ही अशी अटच घालतां,तेव्हां आह्मांला त्या गोष्टीची जरूर नाहीं." कोणी संतापानें म्हणाले: "ही अट घालणार हे कोण ! विवाहाचें मंगलकार्य झालें, त्या विवाहाबद्दल ज्याला कोणाला आनंद झाला असेल, त्याला घेऊन आनंदानें गप्पा गोष्टी करीत हंसत खेळत जेवण जेवावें, तें टाकून मेजवानीच्या वेळीं हें भयंकर खटलें काय उपस्थित केलें आहे!" असें जरी असलें, तरी गणपतरावानें आपल्या म्हणण्याप्रमाणेंच भोजनसमारंभ पार पाडला. रिकामटेकड्या शंसवाशें मंडळींपेक्षां कट्ट्या पंचवीस तीस मंडळींसमवेत तो भोजनसमारंभ मोठ्या आनंदानें झाला आणि पांच चार दिवसांनीं त्या नवीन दंपत्यास आपला पुढला आयुःक्रम मोठ्या धैर्यानें, आनंदानें व सुनिश्चयानें पार पाडण्याबद्दल उपदेश करून गणपतराव त्यांचा निरोप घेऊन सहकुटुंब निघून गेला. गेला त्या वेळीं त्या दंपत्यास पुढच्या इतिहासाचें चित्र त्याच्या कल्पनापटावर दिसतें, तर–परंतु तें चित्र ज्यांच्या दृष्टीस पडावयाचें आहे, त्यांस 'जर आणि तर' या शब्दांची जरूरी काय !

सुमारें आठ दिवस अभिनंदनांतच गेले. कित्येक मंडळींनीं बळवंतराव, त्यांची पत्नी व नवीन वधूवरें यांचें अंतःकरणापासून अभिनंदन केलें. कित्येकांनीं आह्मांस उघडपणें आपलें अभिनंदन करतां येत नाहीं, आपल्याशीं व्यवहार करतां येत नाहीं, परंतु आह्मांस अंतःकरणपूर्वक आनंद झाला आहे व आह्मी तितक्याच अंतःकरणपूर्वक तुह्मांस सुखानें भरलेलें असें चिरायु इच्छितों. अशीं पत्रें पाठविलीं. कित्येकांनीं अर्थातच यांस यथास्थित शिव्यागाळींनीं भरलेलीं व नाहीं नाहीं त्या प्रकारच्या नालस्त्यांनीं भरलेलीं पत्रें पाठविलीं. अर्थातच हीं पत्रें निनांवीं होतीं. अशा तऱ्हेनें आठ दिवस गेले.

या आठां दिवसांत कमळेच्या आईस पुष्कळ बरें वाटलें. एकवार बळवंतरावांस तर असें वाटलें कीं या कमळेच्या विवाहाच्या काळजीमुळेंच इतके दिवस आपल्या बायकोची प्रकृति इतकी बिघडली असावी, ती काळजी दूर झाल्यामुळें आतां इची प्रकृति खास बरी होणार. तें त्यांचें वाटणें अगदीं साहजिक होतें आणि तें बऱ्याच अंशांनीं खरेंही झालें. द्वारकाबाईस चांगलें बरें वाटूं लागलें. कमळेची काळजी हीच त्यांच्या रोगाचें प्राबल्य होण्यास पुष्कळ अंशांनीं कारण होती. लग्न ठरल्या दिवसापासूनच त्यांच्या प्रकृतींत फरक पडत चालला आणि 'शुभ मंगल सावधान' या अक्षरांच्या घोषांत वधूवरांनीं परस्परांच्या गळ्यांत माळ घालतांक्षणींच, मृत्यूनें आपले पुढें केलेले पाश जणूं काय, माघारी घेतले. तिची प्रकृति सुधारत चालली. ज्यांचें औषध

चाललें होतें. त्या डॉक्टरांनींही असें सांगतलें कीं, यांनीं आतां जर कोठें तरी कोरड्या हवेवर चार दोन महिने काढले तर यांची प्रकृति खचित फार चांगली होणार आहे. आतां नियमितपणा आणि चांगली हवा व मायेची शुश्रूषा इतक्याच गोष्टींची यांना कायती अवश्यकता आहे. तें ऐकतांच बळवंतरावांस, कमलेस, तिच्या भावास, पद्माकरपंतास, प्रभाकरास वगैरे सर्व मंडळीस अत्यंत आनंद झाला, हें सांगणें नकोच. बळवंतरावांनीं त्याच दिवशीं आपला परममित्र जो गणपतराव त्यास तें डॉक्टरांचें ह्मणणें कळविलें. लागलीच गणपतरावांकडून त्यांस एक पत्र आलें कीं, द्वारकाताईस मजकडे पाठवून द्यावें. सध्यां आमच्याकडील हवा त्यांना जशी हवी तशी आहे. पत्राच्या पाठोपाठ कधीं येणार अशा अर्थाच्या प्रश्नाची तार आली आणि तारेच्या पाठोपाठ स्वारी स्वतः येऊन उभी राहिली. बळवंतरावांनीं त्याच्या उतावळेपणासंबंधानें त्याची चेष्टाही केली, परंतु तशी चेष्टा आजपर्यंत कित्येक वेळां कितीकांनीं केली. तरी गणपतरावानें कधीं त्यास दाद दिली नाहीं. एखादी गोष्ट अशी व्हावी, असा एकदां मनाचा कृतनिश्चय आला कीं, मग तेथें लटपट नाहीं. बळवंतरावांची रजा आतां थोडे दिवसच राहिली, तेव्हां त्यांनीं द्वारकाताईबरोबर जाऊन थोडे दिवस राहून नंतर यावें अशी इच्छा धरिली. गणपतरावानें डॉक्टरास भेटून त्याच्यापासून प्रकृतीचें मान नीट विचारून घेतलें, आणि आपणच त्यांची तयारी केली. त्यांचे घरीं द्वारकाबाईची शुश्रूषा राहील कीं नाहीं, हा प्रश्न मुळीं कोणाच्या मनांतसुद्धां आला नाहीं. प्रत्यक्ष बहिणी बहिणी आपल्या परस्परांची इतकी काळजी घेणार नाहींत, इतकी काळजी सरस्वतीबाई द्वारकाबाईची घेईल, हें ठरलेलेंच. अर्थातच सर्वांनीं सध्यां जावें आणि बळवंतरावांची रजा भरतांच बळवंतरावांनीं आपल्या चाकरीवर रुजू व्हावें, असा बेत ठरला. मंडळी गणपतरावाबरोबर गेली. कमळाही अर्थातच आपल्या आईबरोबर गेली. तिच्या सान्निध्याची व शुश्रूषेची अवश्यकता द्वारकाबाईस होती.

सर्व मंडळी गेल्यानंतर पद्माकरपंतास आतां आपण पुढें काय करावें, हा प्रश्न उभा राहिला. वडिलांनीं आपणास—नव्हे वडिलांस—आपण सोडलें, तेव्हां आतां निर्वाहाचें साधन शोधणें, हें पहिलें कर्तव्य झालें. त्यांची परीक्षा बी. ए. झालीच होती, आणि ती ज्या प्रकारानें होईल असें सर्वांस वाटलें होतें त्याच प्रकारानें झाली. पुढें एलूएल्. बी. च्या परीक्षेचा अभ्यास करावा असा मूळचा बेत, परंतु तो बेत आतां कायम ठेवून उद्योग करणें शक्य नव्हतें. आतां पहिल्या प्रथम कांहीं तरी स्वतंत्रपणें निर्वाह करण्याचा उद्योग आरंभावयाचा. अर्थातच कोठें तरी चाकरी पहावी हा विचार झाला.

विवाहाची पूर्व वटघटना होत असतां बळवंतरावांनीं त्यांस असें सुचविलें होतें कीं, आपण दोन वर्षे एलएल. बी. चा अभ्यास करण्याचें योजिल्यास आपल्यास मदतीची वाण पडणार नाहीं. चाकरी करूं लागणेंच जरूर नाहीं; परंतु पद्माकरास तें पसंत पडलें नाहीं. विवाह झाला नाहीं तोंच आपल्या सासऱ्याची मदत घेऊन दोन वर्षे काढणें रास्त होणार नाहीं, असें त्याच्या मनानें पक्कें ठरविलें. एक तर आपणास ओशाळगत होणार आणि दुसरें, लोकां-

मध्येंही हंसूं होणार. शिवाय लग्न झालें नाहीं, तों परोपजीविकीटकाप्रमाणें आपण दुसऱ्यावर आत्मपोषण करूं लागलों, असें पाहून आपली निंदाही लोक करूं लागतील. ती सहन करणें त्यास शक्य वाटलें नाहीं. ज्यास लोकांना तुच्छ मानून रहावयाचें, त्यानें आपल्या पायावर उभें राहून काय करणें तें करावें. छळ सोसणें, संकटें सोसणें आणि त्यांतून तावून सुलाखून बाहेर पडणें हेंच खरें भूषण, असा त्याच्या मनाचा पक्का ग्रह. त्या ग्रहाप्रमाणें आपण सर्व कांहीं केलें पाहिजे हा त्याचा दृढनिश्चयच. तेव्हां बरीच मनांत भवति न भवति करून त्यानें कोठें तरी आपलें व आपल्या कुटुंबाचें चांगल्या स्थितींत राहून पोषण करतां येईल, अशा तऱ्हेचें साधन पहाण्यास सुरुवात केली.

आजकाल असें साधन म्हटलें, म्हणजे उच्च वर्णाच्या हिंदूस चाकरीवांचून दुसरें काय आहे? हेंच साधन कोठें साध्य झालें तर पहावयाचें. त्याप्रमाणें त्यानें कोठें अर्ज करावे व कोठें कसा प्रयत्न करावा, याविषयीं विचार चालविला. कोठें तरी मास्तरकी मिळवावी, हा अर्थातच पहिला विचार. कारण प्रारंभींच चाळीस पन्नास रुपये मिळतील असें तेवढेंच एक खातें आजमितीस बी. ए. झालेल्या माणसाच्या नजरेपुढें उभें राहतें. सरकारी शाळाखात्यांत जागा मिळाली नाहीं, तर मुंबईसारख्या ठिकाणीं खासगी शाळांत तरी मिळण्याचा संभव फार. अर्थातच त्याच्या डोळ्यासमोर तें खातें उभें राहिलें. परंतु जो उठतो तो शाळाखात्यांत शिरतो, त्यांत अर्थ नाहीं, असें म्हणून त्यानें तें खातें दूर सारलें. तें दूर सारण्याबरोबर दुसरें खातें रेव्हेन्यु, तें मनांत येतांच पंधरा वीस रुपयांचा "स्टार्ट" पुढें उभा राहिला! आणि त्यांत पुढें सतरा भानगडी! तेव्हां अशा स्थितींत ती नोकरी धरणें कितपत श्रेयस्कर होणार! बरें ती नोकरी तरी अशी आहे कीं, इतर अभ्यास करतां येतील! तर तसेंही नाहीं. केवळ गुराप्रमाणें काबाडकष्ट करून बरोबरीच्या नॉन् ग्रॅज्युएट कारकुनांकडून छीः थुः करून घ्यावयाची. अमुकच काम येत नाहीं, तमुकच काम येत नाहीं असेंच नेहमीं चालावयाचें आणि शिकवणें लांबच राहिलें, परंतु जितक्या म्हणून चुका निघतील, तितक्या पर्वतप्राय करून दाखवून उलट जितकी म्हणून फटफजिती करणें शक्य असेल तेवढी करावयाची, हा त्यांचा बाणा! अशा स्थितींत त्या खात्यांत नोकरीला जावें तरी कशाला? अर्थात जाऊं नये असेंच त्याच्या मनानें घेतलें. त्याच्या कित्येक मित्रांनीं मामलतींच्या आशेनें तो मार्ग धरला होता आणि त्यांचे हाल त्यांनीं त्यास अनेकवार सांगितले होते.

तें खातें दृष्टीसमोरून दूर केल्यानंतर त्याचे डोळे कोठें तरी उद्योगधंदा करण्याकडे वळले; परंतु निर्द्रव्य पुरुषाच्या मनांत उद्योगधंदा करण्याचें आलें, तरी त्याचा उपयोग काय? उद्योग कोठला आणि धंदा कसला? थोडे दिवसांपूर्वीपर्यंत त्याची मोठी महत्त्वाकांक्षा ही होती कीं, आपण बी. ए. झाल्यानंतर व एल्. एल्. बी. झाल्यानंतर कांहीं तरी उद्योग काढावयाचा. वकिली किंवा चाकरी करीत बसावयाचें नाहीं. परंतु आतां तें काय उरलें? आतां उद्योग काढणार कशावर? अर्थातच तें शक्य नव्हतें, तेव्हां त्याच्या नंतर दुसरा मार्ग म्हणजे अर्थातच कोण्या तरी व्यापारी कंपनीत राहून नोकरी करा-

वयाची ह्मणजे व्यापारांत माहिती होऊन पुढें कांहीं तरी करणें शक्य होईल. हा विचार त्यास फार पसंत पडला. परंतु कोणत्या कंपनींत गेलें असतां आपली दाद लागणार आहे? सर्व कंपन्यांतून कोणी ना कोणी तरी एकजातीचे लोक भरलेले असावयाचे. कोण्या कंपनींत ब्राह्मण असल्याचें फारच क्वचित् उदाहरण. कोठें पारशी तर खालपासून वरपर्यंत पारशीच, कोठें कोठें परभू तर परभूच. मुख्य हेड्क्लार्क ज्या जातीचे असतील, त्या जातीच्या लोकांनीं सर्व जागा भरून टाकलेल्या. तेव्हां तेथें याची दाद कोठून लागणार? नाहींच लागावयाची. मग आपण जाणार कोठें? आपला शिरकाव होणार कोठें? कोठेंही होण्याची आशा नाहीं, हें त्यास स्पष्ट दिसलें. अशा स्थितींत पुनःपुनः काय करावें, हा विचार त्याच्या मनांत कायमचा उभा राहिला. स्वतंत्र धंदा करावा, हें सांगणें व मनांत ह्मणणें फार सोपें, परंतु प्रत्यक्ष करण्यास उभें राहिलें, म्हणजे त्याच्या अडचणी काय आहेत, त्या उत्कृष्ट-पणें दिसूं लागतात. त्यानें आपल्याकडून पुष्कळ विचार केला, परंतु शिफारशी-शिवाय कोठेंही कांहीं डाळ शिजेल हें त्यास संभवनीय दिसलें नाहीं. त्यांत आणखी ब्राह्मण ही मोठीच नड उत्पन्न झालेली आहे! कारण कोठेंही गेलें, तरी ब्राह्मण म्हणून सांगितलें कीं, कोठें स्पष्ट-पणें, कोठें अपरोक्ष रीतीनें ब्राह्मणास नोकरी नाहीं, असें म्यानेजरसाहेबांकडून किंवा ज्यांच्याकडे उत्तर देण्याचा अधि-कार असेल अशा बहुतेक व्यक्तींकडून अगदीं स्पष्टपणें जबाब मिळाला जातो! पद्माकरपंतांस स्वतःस या गोष्टीचा अनुभव होता असें नाहीं, परंतु पुष्कळांस हा अनुभव आलेला त्याच्या कानीं आला होता. अर्थातच त्याच्या स्वतःवर जेव्हां प्रसंग आला, तेव्हां तें सर्व त्यास आठवून त्याच्या मनांत उभें राहिलें. एतावता कोणत्या बाजूनें प्रयत्न करावा याचा त्यास उलगडा कांहींही केल्या होईना. येऊन जाऊन मास्तरकीसारखा सद्यःफलदायी मार्ग त्यास दिसेना, आणि तोही तितका सुगम असेल असें त्याचें मन घेईना. आपणास तशी अवश्यकता नसतां आपण हा प्रसंग आपल्या अंगावर ओढून घेतला, याबद्दल त्यास किंचित् वाईट वाटलें काय?—असेल; पण नसेल, कां कीं, त्यानें केलें तें अगदीं डोळे उघडे ठेवून निश्चयानेंच केलें होतें.

तो बराच वेळ सचिंत बसला होता.

---

# प्रकरण ३० वें.

## गांठ तर पडली !



सदूनानाच्या पायास हल्लीं नुसता भोंवरा बांधल्याप्रमाणें झालें होतें. विचाऱ्यास हर्पास सुचेना काम सुचेना इतकेंच नव्हे, तर ज्या कामाकरितां तो बिचारा एवढा तडफडत होता, तें काम कसें साध्य करावें, हें सुद्धां सुचेना. एखादा मस्तक बिघडलेला माणूस ज्याप्रमाणें, काय करतो आणि काय नाहीं याचें कांहीं ज्ञान नसून आपला हिंडत असतो, तशीच त्याची स्थिति झाली होती. कोणी त्यास कांहीं विचारलें, तर विचारणारा काय विचारतो, याचें ज्ञान त्यास होत असेल कीं नाहीं, याचीच कोणास शंका यावयाची. ज्या रावबहादूर, रावसाहेब, काकासाहेब, अण्णासाहेब इत्यादि मंडळींच्या घरीं ते रोज जेवण झाल्याबरोबर किंवा जेवावयालाच जावयाचे, त्या रावबहादुरांच्या वगैरे घरीं जाण्यास सदूनानास फुरसत नाहींशी झाली होती. उमाकाकूंचें व त्यांचें आधीं कधीं रहस्य नव्हतें हें वाचकांस माहीत आहेच. त्यांत आतां अधिक एवढेंच सांगावयाचें कीं, पहिल्यापेक्षांही दोघांचा भाषण समारंभ विशेष रागासंतापाचा होऊं लागला ! सोन्याबापूंची स्वारी तर आतांशा त्यांच्या वाऱ्यासही उभी राहीनाशी झाली. एखादे दिवशीं सदूनाना जर सबंद दिवस घरीं असले, तर सोन्याबापूंचें गवाळें सगळ्या दिवसभर बाहेरच. मुलीला तिच्या सासऱ्याहून दोन बोलावणीं आलीं; परंतु सदूनानांनीं एव्हां मुलीला पाठवीत नाहीं अशीं उत्तरें दिलीं !

सदूनानांची अशी स्थिति होण्याला काय कारणें झालीं असतील, तीं त्यांचीं त्यांसच ठाऊक. ते नेहमीं कांहीं तरी विचारांत व कोणत्या तरी शोधांत असत. कोणत्या विचारांत असत आणि कोणत्या शोधांत असत, हें त्यांसच ठाऊक !

वर सांगितल्याप्रमाणें स्वारी एके दिवशीं घरींच स्वस्थ विचार करीत व मधून मधून उमाकाकूंस कठोरपणानें बोलत असतां टपालच्या शिपायानें एक पत्र आणून दिलें. तें त्यांनीं फोडून वाचलें. वाचल्याबरोबर ते ताड्कन् उठले आणि आपल्या बायकोस म्हणतात, "शेवटीं जें होईल होईल म्हणून भय वाटत होतं तें झालंच. पाहिलं का ? काकासाहेब आतां येताहेत पोरीला न्यायला ! त्यांच्या कानावर हीं तुमचीं कर्मं गेलीं. आतांपर्यंत कांहीं तरी सबब सांगून कशी तरी टाळाटाळी केली. आतां काय करणार ? ते आले म्हणजे त्यांना उत्तर काय देणार ? आणखी हें अरिष्ट टाळणार कसं ? मला तर आतां

अफू खाऊन प्राण देण्यापलीकडे कांहीं-सुद्धां मार्ग दिसत नाहीं. त्या कारट्याच्या तूं नादीं लागलीस, आणखी सगळा सत्य-नास करून घेतलास! पहिल्यापासून तुला सांगत होतों कीं, हा कारटा चांगला निघाय-चा नाहीं.तूं त्याला क्षणभरसुद्धां घरांत थारा देत जाऊं नकोस पण तूं ऐकलं नाहींस. आतां आपल्या दांतावर मारायला एक दिडकीसुद्धां नाहीं, आणखी प्रसंग तर हा असा विलक्षण आला. आतां ह्मणावं काय! पोलिसांत वर्दी दिली, तर सगळ्या घरदाराचा फजीतवाडा. न द्यावी, तर काय करावं तें सुचत नाहीं."

"त्यांत झालं काय पण! सांगावं त्यांना कीं,चार दिवस अडचणीसाठीं असं[illegible] केलं आहे. चार दिवसांनीं सगळ्या खिडुकामि-डुकासुद्धां पोरीला लावून देतों. सोयऱ्या-धायऱ्यांनीं एकमेकांना उपयोगीं नाहीं पडायचं तर कोणीं पडायचं? तें कांहीं नाहीं. आपल्याच्यानें नाहीं तसं सांगवलं, तर मी सांगेन. त्यांत लाज कसलीन् भय कसलं? पोराला जर तेवढ्या हमीवर साठ रुपयांची चाकरी मिळते आहे, तर झालं काय थोडंसं हें केलं म्हणून!"

"डोंबलं झालं तुझं! एवढी झालीस तूं पण तुला कांहीं ह्मटल्या कांहींसुद्धां अजून समजत नाहीं. कारटा आणखी माझ्या दृष्टीससुद्धां पडत नाहीं. त्याला बरोबर घेऊन त्या भामट्याचा शोध काढीन ह्मटलं तर! आज एका ठिकाणीं त्याचा शोध लागायचा आहे, पण खरो-खर लागेल तेव्हां खरा, आणखी लागूनही त्याच्यापाशीं कांहीं सांपडेल तेव्हां खरं. नाहीं तर नुसता कफल्लक सांपडून उपयोग काय? पोलिसांत कळवलं असतं, तर याच्यापूर्वी केव्हांच त्याला पकडून जेर-बंदाखालीं खूप मारून तेव्हांच कबूल केला असता. पण त्या कबूल होण्यांत गाढवानं कोणकोणाचीं नांवं घेतलीं असतीं, आणखी काय सांगितलं असतं, याचा काय नेम! तोंड बांधून बुक्क्यांचा मार म्हण-तात त्यांतली गत झाली आहे. इतके बडे बडे लोक माझे स्नेही. रोज एकत्र बैठक, पण अशा वेळीं कोणाची सुद्धां मदत कशी ती होत नाहीं. त्यांनीं तरी काय मदत करावी? आणखी आह्मांला तरी सगळी हकीकत सांगणं कुठें शक्य आहे? काय सांगावं? आजपर्यंत मी कसाही जरी वागलों, तरी हा असा प्रसंग कधीं येईल असं माझ्या स्वप्नीही आलं नाहीं. आतां मी जातों आणखी त्या डांबिसाचा तपास लागला तर पाहातों. बाबासाहेब तर उद्यां सकाळीं अगदीं दत्त म्हणून ठेपलेले. ते आले आणखीन् त्यांनीं जर पोरीला आपल्याबरोबर न्यायची म्हणून ह्मटलं, तर करणार काय? त्यांच्या-पुढं मी काय आडवा पडूं? का करूं तरी काय? आणखी तो गृहस्थ ह्मणजे कसला विलक्षण आहे! एकदां एक गोष्ट करा-यची ह्मटलं कीं ब्रह्मदेव खालीं उतरला, तरी सुद्धां कधीं ऐकायचा नाहीं. जातों मी आपला, जर कांहीं जुळलं तर पाहातों, नाहीं तर पोलिस आहेतच. मग काय धिंडवडे व्हायचे असतील कोणाकोणाचे ते होतील. मी तरी काय करणार?"

उमाकाकू कांहींच बोलल्या नाहींत. त्यांस बोलण्यास अवसरच सांपडला नाहीं. सदूनाना निघून गेले देखील. शिवाय प्रसंगच असा होता कीं, काय बोलावें हेंच तिला समजेना.

सदूनानांला जाऊन सुमारें पंधरा किंवा वीस मिनिटें झालीं असतील नस-

तील, तोंच सोन्याबापू धांपा टाकीत घरांत आला. "आई, आई आतां काळजी नको. मला चाकरी मिळाली आणखी ते जे काय जिन्नस नेले ते सगळे परत येतात, याहीबद्दल पण माझी खात्री झाली आहे. आतां अगदीं सुद्धां काळजी नको. आज मी आमच्या प्रोफेसराला गांठला, त्याला सगळी हकीकत सांगितली. त्यानं माझा एक महिन्याचा पगार आज संध्याकाळीं आणून देतों म्हणून सांगितलं. आणखी चाकरी पुढं नको असेल, तर आपले दागिने परत घेऊन जा, असं सुद्धां सांगितलं. आतांपर्यंतची गोष्ट निराळी होती. पण आज आतां अगदीं शपथा आणा वाहून त्यानं मला सांगितलं. आतां अगदीं सुद्धां काळजी नको."

आजपर्यंत उमाकाकूंनीं अशा आणाशपथांच्या खाऱ्या किती वेळां तरी ऐकल्या, तेव्हां आतां त्यांचा विश्वास कसला बसतो ! त्यांनीं चिरंजिवांस पाहिल्याबरोबर, सदूनानांचें सर्व भाषण त्यांस आठवलें आणि त्यांस एकदम रडूं कोसळलें. इतकें कीं, तें कांहीं केल्यानें थांबेना. त्या प्रोफेसर ड्यांडीस त्यांनीं अद्वातद्वा शिव्या दिल्या. "तुझ्यापायीं मी सगळ्या घरदाराचं वाटोळं करून घेतलं, आतां उद्यां बाबासाहेब येणार, ते आले म्हणजे पोरीला घेऊन जातील तिच्याबरोबर काय देऊं !" म्हणून ती मोठमोठ्यानें ओरडूं लागली. "त्या मेल्याला धरून आण. कसली चाकरी. आणखी कसलं काय ! त्या मेल्यानं तुला फसवलं. कुठून मला बुद्धि झाली आणखी या नादांत पडलें ! तूं भीकमाग्या, आणखी तो सात भीकमाग्या. पण मला केवढं भुरळ पडलं !........."

अशा प्रकारें बिचारी उमाकाकू दीर्घ स्वर काढून रडूं लागली. सोन्यानें तिला पुष्कळ दाबण्याचा प्रयत्न केला; परंतु कांहीं तिचा आवेग दाबला जाईना. तो अगदीं मुखस्तंभाप्रमाणें उभा राहिला. तिच्या आरडण्याओरडण्यांत त्याच्या बहिणीच्या आरडण्याओरडण्याचीही भर पडली. आपण चाळींत राहातों आहोंत, जी गोष्ट कोणासही कळूं नये अशी आपली इच्छा, ती आपल्या अशा आरडण्या ओरडण्यानें कळेल, याचें सुद्धां भान उमाकाकूंस राहिलें नाहीं. आणि तें न राहिल्यामुळें सगळ्या चाळभर सगळा बभ्रा झाला असता, परंतु तितक्यांत पांच सात माणसें दाराशीं गोळा झालीं आणि कसले दागिने, काय झालें वगैरे प्रश्न विचारायला लागलीं, तेव्हां उमाकाकू थोडीबहुत शुद्धीवर आली आणि तिनें आपलें दीर्घ रोदन आटपून मुलीसही दाबलें.

असा प्रकार चालला आहे, तों अचानक सदूनानांची मूर्ति तेथें येऊन उभी राहिली. आज कित्येक दिवसांत बापलेकांचें दर्शन नव्हतें, तें आज अगदीं अचानकपणें झालें. त्याबरोबर इतके दिवस अगदीं दाबदाबून ठेवलेला सगळा आवेग बाहेर पडून त्या सोन्याची अगदीं त्रेधा उडविली. तो सदूनानांपुढें कधींच कांहीं बोलत नसे. त्यांतून आज तर त्यास कांहीं बोलणें शक्यच नव्हतें. बऱ्याच वेळानें त्या आवेगाची थोडीशी शांति झाल्यानंतर सदूनानांनीं सोन्यास म्हटलें, "तो चोर कुठें आहे, तो मला दाखव. कारट्या, तूं त्याच्या नादीं लागून आपण फसून हिला फसवून किती घात केलास, तुला कांहीं कल्पना तरी आहे? आतां शहाणपणा करून त्याची माझी दृष्टादृष्ट करून दे, कांहीं

झाला उपयोग तर करून घेईन. दुसरं काय!"

सोन्यानें प्रथम पुष्कळ उडवाउडवी केली, परंतु शेवटीं बापानें फारच उग्र स्वरूप धारण करून जेव्हां पोलिसांत वर्दी देऊन सगळ्यांचाच त्रेधा उडविण्याचा धाक घातला, तेव्हां त्यानें त्यांच्याबरोबर जाऊन प्रोफेसर ड्यांडींची व त्यांची गांठ घालून देण्याचें कबूल केलें. कोणत्याही प्रकारें आतां काम दीनावधावर टाकणें शक्य नाहीं, हें जाणून सदूनानांनीं आपल्या मुलास लागलीच आपल्याबरोबर चलण्याबद्दल सांगितलें, आणि त्याचा हात धरून त्यास चालविलेंच. त्याची टंगळमंगळ चालूं दिली नाहीं, त्यांनीं त्यास बरोबर घेतलें आणि ते प्रोफेसर ड्यांडींच्या शोधार्थ निघाले. बहुतेक क्लब पालथे घातले, तरी स्वारीचा कोठें तपास लागेना. नाहीं नाहीं तीं ठिकाणं त्यांनीं पाहिलीं; परंतु कोठें स्वारी सांपडली नाहीं. सुमारें तीन साडेतीन तास त्यांचा कोटांत शोध चालला होता. आतां अगदीं निराश होऊन, आपल्या पोरावर शिव्याशापांचा भडिमार करीत सदूनानांची स्वारी घरच्या मार्गास लागणार, तोंच समोरून एक रबरटायरची मोठी थोरली गाडी आली व एका दुकानाशीं उभी राहिली व आंतून प्रोफेसर ड्यांडींची स्वारी बाहेर पडली. आतां दुकानांत जाणार तोंच सोन्यानें त्यांस हांक मारली आणि सदूनाना त्यांच्या पुढें जाऊन उभे राहिले. त्यांस पाहण्याबरोबर प्रोफेसर ड्यांडींच्या चेहेऱ्यावर क्षणमात्र आश्चर्य व भय हीं दिसलीं; परंतु पुढल्याच क्षणीं तें सर्व पार जाऊन ते इंग्रजींत सोन्यास ह्मणतात: "काय आहे ? इथें काय माझ्याशीं तुमचं काम आहे? मला एक सूट करवायचा आहे, ह्मणून इथें जातों आहें मी. जर कांहीं काम असलं, तर माझ्या घरीं या. हे कोण गृहस्थ आणले आहेस तूं आपल्याबरोबर? त्यांनाही तिकडेच घेऊन ये. पण उद्यां ये. आज येऊं नको. रात्रीं मला आमच्या मेसॉनिक् लॉज्‌मध्यें डिनर आहे तिकडे जायचं आहे. समजलास?"

सदूनाना खमंग होते. ते उभ्या जागचे एक यवभरही हालले नाहींत. मात्र हलकेंच त्याच्या कानांत म्हणतात, "तें तुमचं डिनरबिनर असूं द्या. पण पांच मिनिटांच्या आंत मला बोलायचं आहे, तें ऐकून घेतलं नाहींस, तर दुकानांतच वारंटानं पकडून तुला आतां न्यायला सांगतों."

"कोणाला? मला? वारंटानं मला पकडून नेणार? कोण? वा! वा! आपण कांहीं भांगबिंग घेतली आहे कीं काय? ए मैन्, त्या पलीकडल्या पोलिस शिपायाला बोलाव पाहूं...बरं पण असूं दे. यांचं काय ह्मणणं आहे तें ऐकून तर घेऊं दे. काय ह्मणणं आहे तुमचं: बोला लवकर, नाहीं तर आतां पोलिसच्या ताब्यांत देतों. कुलाब्याच्या इस्पितळांत नेऊन घालील. नाहीं तर डोंगरीवर नेऊन अडकवून ठेवील!" इतकें म्हणून आपल्याशींच मोठ्यानें हंसले. नंतर मोठ्या ऐटीनें सदूनानांच्या खांद्यावर हात ठेवून ह्मणतात, "वेल्, बोला काय आहे तें! नाहीं तर मला वेळ नाहीं."

सदूनाना त्रासून त्याला ह्मणतात, "इथें रस्त्यांत बोलण्याजोगी गोष्ट नाहीं, पण बोलाच ह्मणतो आहेस, तर बोलतों. या पोराला फुसलावून दागिने नेलेस ते कुठें आहेत ते दे. नाहीं तर आतांपासून पांच

मिनिटांच्या आंत इथल्या इथें पकडलं म्हणून समज. मी फिर्याद वगैरे करून वारंट घेऊन डिटेक्टिव् घेऊन आज चार मास हिंडतों आहें. शेवटीं सांपडलास. आतां सुटत नाहींस. मुकाट्यानं दागिने देणार असशील, तर मी फिर्याद काढून घेईन. घरांतल्या घरांत डबा चुकून ठेवून उगीच भलत्याचाच संशय आला म्हणून म्हणेन, आणखी व्यवस्था करीन. नाहीं तर माझा हा कागद आणखी तूं दोघेही तुरुंगांत गेलांत म्हणून समजा. मला कांहीं त्याचा विधिनिषेध नाहीं. बोल. पांचच मिनिटांची तुला मी फुरसद देतों."

"पांच मिनिटांची तरी फुरसद कशाला पाहिजे ? माझ्याजवळ यानं दागिने दिले नाहींत असं मी म्हणेन तर कीं नाहीं ? याला चाकरी पाहिजे, ती मिळायला कांहीं रक्कम डिपॉझिट् ठेवायला पाहिजे म्हणून यानं माझ्याजवळ दागिने आणून दिले. मला काय ठाऊक यानं चोरून आणले का तुम्हींच याला दिलेत ? बरं तर बरं, मी आजपर्यंत याच्याच सांगण्यावर भरंवसा ठेवून सगळी विल्हेवाट लावली नाहीं. नाहीं तर आज विनाकारण छान घोरपड माझ्या गळ्यांत आणली असती. तुम्हांला पाहिजे तेव्हां आपले दागिने घेऊन जा. कोण नको म्हणतो आहे ? पण आजपर्यंत झालेला माझा, त्याच्या चाकरीबद्दलचा खर्च देऊन टाकिला पाहिजे. तो तुम्हांला सुटायचा नाहीं. केव्हां पाहिजेत तुमचे दागिने ? ते जसेच्या तसे तुम्ही आपल्या पदरांत घ्या."

"चल तर दे. तुझ्याबरोबर मी आतां येतों. नुसत्या गुळचट थापांनीं आतां मी फसायचा नाहीं."

"म्हणतो कोण तुम्हांला फसा म्हणून ! मी फसलों तेवढा पुरे. पण आतां मी असे एकदम नाहीं दागिने द्यायचा. चार साक्षी ठेवीन आणखी पावती घेईन तेव्हां देईन. त्याचा काय नेम आहे, तुम्ही केव्हां काय माझ्या गळ्यांत धोंगडं आणाल तें !"

"साक्षीदार ठेव, पावती घे, पण दागिने मला आज दे. नाहीं तर ... मी कांहीं तुला सोडायचा नाहीं."

"देतों, चला. मी आज मुदत नाहीं करणार, उद्यां करीन. चला, माझ्याच गाडींत चला. असल्या पोरांच्या नादीं लागूं नये म्हणतात तें काय खोटं ? कुठून मला भुरळ पडली आणखी मी यांत पडलों ! या गाढवाचा स्नेह मला हा भोंवला दुसरं काय ? पण कोणीकडून मला चांगली बुद्धि सुचली आणि मी उजळा बिजळा देऊन विकण्यासाठीं ठ्यांकेंत नेलेले दागिने पुनः डब्यांत घालून ठेवले ! गाढव आतां कांहीं बोलतो आहे का ! मला म्हणाला माझ्या बापानं दिले आहेत. आईनं दिले. मला वाटलेंच कीं, इतके दागिने याच्याजवळ आले कुठले ! तुमची किंमत काय आहे ती मला ठाऊक. तेव्हांच वाटलं कीं, एक तर यानं हे चोरून आणले असतील, नाहीं तर तुम्हीं कुठून तसेच आणून दिले असतील. नाहीं तर इतके दागिने यावे कुठून तुमच्या सारख्यांच्या घरांत ? कां, मी म्हणतों, तें खरं का खोटं ?"

सदूनानांस त्याच्या त्या बोलण्याचा अतोनात राग आला, परंतु दागिने देतों म्हणणाऱ्या माणसाचा, दागिने हातीं येइ-पर्यंत राग आणून कसें चालणार ? तेव्हां त्यांनीं गम खाल्ली. न खाऊन काय करतो बिचारा !

प्रोफेसरसाहेबांची गाडी व जोडी मार टणटणा उडत चालली. सदूनाना आपल्या मनांत विचार करतात, हा लेकाचा असल्या या गाड्यान् घोडीं आणतो तरी कुठली? परंतु तो विचार फार वेळ मनांत राहूं देण्याची ती वेळ नव्हती. यामुळें आणि तितक्यांत एका मोठ्या थोरल्या इमारतीपाशीं गाडी थांबल्यामुळें तो तितकाच राहिला.

प्रोफेसरसाहेब चटूकन् उतरले. त्यांनीं सदूनानास उतरावयाची विनंति केली. सोन्या उतरत नव्हता, त्यासही मुद्दाम उतरविलें, आणि सदूनानास व त्यास घेऊन ते त्या इमारतींत शिरले. ती भव्य इमारत, ते प्रशस्त जिने, ते उंच मजले पाहून सदूनानांस आश्चर्य वाटलें नाहीं. कारण तशा इमारती मुंबईस कितीतरी आहेत. परंतु याचें येथें काय आहे हें मनांत येऊन मात्र त्यांस आश्चर्य वाटलें. प्रोफेसर डयांडी सदूनानांच्या अंमळ पुढें परंतु त्यांच्याशीं बोलत बोलतच चालला होता. "हें इथें तिसऱ्या मजल्यावर माझं हापीस आहे, तिथें माझी सेफ आहे, त्यांत तुमचे दागिने घालून ठेवले आहेत. तुह्मांला इतकें चढवणार नाहीं, तर इथेंच उभे रहा; मी इचा घेऊन येतों." असें तो ह्मणत होता.

"कांहीं नाहीं. येतों कीं मी वर," असें सदूनाना त्यास म्हणत होता.

इतक्यांत "हा पाहा मी आलोंच, तुह्मांला विनाकारण कां त्रास?" असें ह्मणून प्रोफेसर डयांडी त्या दोघांच्याही पुढें सटकला. हे दोघे थोड्या वेळानें वर जातात, तों तेथें निरनिराळ्या खोल्या असून त्यांतील बहुतेक लागलेल्या, कोठें माणसांची चाहूल लागेना. मोठ्यानें हांका माराव्या तरी पंचाईत! इतक्यांत एक नांवडी पगडी घातलेला शिपाई तेथें आला; त्यानें त्यांस कोण कुठले करून, हे कांहीं बोलणार तोंच तेथून खालीं हांकून लाविलें.

खालीं येऊन पहातात तों ती गाडीही नाहीं!

---

# प्रकरण ३१ वें.

## दागिने आले!



प्रोफेसर डयांडी भेटल्याबरोबर जितका बिचाऱ्या सदूनानास हुरूप आला होता, तितका त्याचा या प्रोफेसर डयांडीच्या अचानक नाहींशा होण्यानें अगदीं हिरमोड झाला. 'दागिने देतों, मजबरोबर चला,' असें ह्मणून त्यानें एकदम त्यास आपल्या ऑफिसाकडे घेऊन जाण्याची आपली सिद्धता दाखविली; "दागिने सुरक्षित ठेवले आहेत; तुमच्या साऱ्यांच्या दागिन्यांबद्दल असा कांहीं तरी घोटाळा होणार, पाठीमागून अशी लडथड होणार, हें मला माहीत ह्मणूनच मीं आपल्याकडून ते दागिने अगदीं मोडल्या विकल्यावांचून ठेवून दिले आहेत," असें तो

बोले, यामुळें अर्थातच त्यांस असें वाटलें कीं, कसें तरी करून याच्याजवळ अजून दागिने शिल्लक आहेत तेच पदरांत पाडून घ्यावे, नाहीं तर हे दागिने एकदां का हातांतून निसटले, कीं मग बोलायलाच नको. मग आपल्या हातांत मुळींच ते येणें शक्य नाहीं. तुमचे दागिने सुरक्षित आहेत, ते मीं नीट ठेवले आहेत असें तो म्हणत असतांही त्यास शंका येतच होती कीं, हा म्हणतो हें खरें नसावें. आपले दागिने आतां आपल्यास मिळणें नाहीं. मगरानें गिळलेलें माणिक मिळणें आणि असल्या लुच्चयाच्या हातांत गेलेले दागिने मिळणें, हीं दोन्ही सारखींच अशक्य. तथापि आशा ही कोणाला सुटली आहे ? बिचाऱ्यास असें वाटलें कीं, न जाणों आपलें दुर्दैव नितकें बलवत्तर नसलेंच तर दागिने परत मिळण्याचा संभव आहे. त्याच आशेनें तो त्याजबरोबर गेला. परंतु मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें त्या भव्य इमारतींत त्याचा फजिता झाला. प्रोफेसर ड्यांडी कोणीकडच्या कोणीकडे निघून गेला. हा भ्रमिष्टासारखा त्यास हुडकीत राहिला. तेथून त्या तांबड्या पगडीच्या शिपायानें घालवून दिल्यावर खालीं येऊन पहातो तों ज्या गाडींत आपण त्याचबरोबर आलों ती गाडीही कोणीकडच्या कोणीकडे गेली !

आतां काय करणार ? एखाद्या भ्रांतिष्टाची जशी अवस्था होते, तशी त्याची अवस्था झाली. तो भिरीभिरी इकडून तिकडे, तिकडून इकडे त्या इमारतीभोंवतीं हिंडला, परंतु त्याला त्याचा तो इसम कसचा भेटतो ? तो याच्या हातावर तुरी देऊन गेला. इकडे तिकडे पाहून अगदीं निराश झाल्यानंतर स्वारी अगदीं कंटाळून घरीं जाण्यास निघाली. सोन्या बरोबर होताच. तेव्हां त्याला शिव्या देण्यापलीकडे बिचाऱ्यास आतां कांहींसुद्धां दुसरें राहिलें नाहीं. 'दे शिव्या दे शिव्या,' असें करीत तो पुढें चालला. परंतु शिव्या देऊन काय उपयोग होता ? सोन्या मुकाट्यानें त्याचे बरोबर चालला होता. सोन्या अगदीं गरीब गाय होऊन गेला होता. काय करणार ! त्याचे हातून फार मोठें नुकसान झालें खरें. चाकरीच्या आशेनें त्यानें ते दागिने लोकांचे स्वाधीन केले. चाकरीपरी चाकरी नाहीं आणि दागिनेही हातचे गेले. अशा स्थितींत कोणी कांहीं बोललें तरी तें ऐकून घेणें त्यास भाग होतें. दुसरें काय करणार ? बाप पुढें आणि तो मागें, अशा थाटानें स्वाऱ्या चालल्या होत्या. मधून मधून वडिलांस जसजसा आवेश येई तसतसे ते चवताळून अंगावर येत, आणि मुलावर ताशेरा झाडीत. घरीं आल्यानंतर तर त्यांनीं अगदीं कमालच करून सोडली. बायकोचे नुसते वाभाडे काढले. दुसरे दिवशीं जांवईबोआ आले आणि त्यांनीं दागिन्यांची गोष्ट काढली, तर काय उत्तर देणार, हा प्रश्न कमींत कमी पंचवीस वेळां त्यांनीं आपल्या बायकोस विचारला असेल; आणि लेकीवरही ते चवताळले. परंतु कोण काय करणार ? जसा एखादा पिसाळलेला कुत्रा असतो, तशीच त्यांची अवस्था झाली. कोणाला डसूं आणि कोणाला न डसूं असा सगळा प्रकार त्यांचे हातून होत होता. घरची सर्वच मंडळी अपराधी असल्याकारणानें अर्थातच सर्व अगदीं मुकाट्यानें बसली, कांहीं एक बोलली नाहींत. अशा स्थितींत कोण काय बोलणार आणि कोण काय करणार ? मुकाट्यानें त्यांचें सर्व बोलणें,

रागावणें, जाजावणें मंडळी ऐकून घेत होती. एका अर्थी तें बरेंच होतें. कारण त्यायोगानें सदूनानांचा आवेश तेवढा लंगडा पडे. आपण जोरानें बोलत असतां दुसरा तितक्याच जोरानें बोलूं लागला, व आपला निषेध करूं लागला, म्हणजे आपल्या भाषणाला विशेष जोर येतो. तेंच आपलें बोलणें मंडळी मुकाट्यानें ऐकून घेते असें दिसलें तर आपलाही जोर जरा कमी होतो. तीच स्थिति सदूनानांची झाली होती. ते आपल्याकडून वाटेल तितकें बोलत होते. प्रथम प्रथम उमाकाकूही त्यांस प्रत्युत्तर देत होत्या. परंतु किती जरी केलें, तरी उमाकाकूंच्या हातूनच त्या दागिन्यांच्या बाबतींत मोठा गुन्हा झाला होता, तेव्हां त्या बोलण्यास किती टिकणार? त्यांनी मौन स्वीकारलें. सोन्यानें तर गुंगाराच दिला. घरापाशीं तो येतो न येतो, तों तो जो मागच्या मार्गेच पळाला, तो सदूनानांच्या दृष्टीस पुनः त्या दिवशीं कांहीं पडला नाहीं. जसजशी रात्र पडली तसतशी उमाकाकूंस त्याच्याबद्दलची काळजी पडली. सदूनाना त्यास हजार प्रकारांनीं बोलले, तेव्हां आतां पोरगा पुनः आपल्या दृष्टीस पडतो कीं नाहीं, याचीसुद्धां त्यांस शंका वाटूं लागली आणि नवऱ्यानें दागिन्यांचे बाबतींत पुनः फारसें बोलूं नये म्हणून त्यांनीं रडण्यास व मुलास घरांतून घालवून दिल्याबद्दल सदूनानांस शिव्या देण्यास सुरवात केली. त्याचा परिणाम मात्र कांहींसुद्धां झाला नाहीं. सदूनानांचा एकसारखा बोलण्याचा तडाखा चालला होता. त्यांत कांहीं केल्या खळ पडेना. पोरगा आतां पुनः परत येत नाहीं अशाबद्दल उमाबाईचें विव्हळणें जेव्हां सुरू झालें तेव्हां स्वारी अधिकाधिकच चवताळून बोलूं लागली, "पोरगा अजिबात् जाईल, मरेल तरच फार चांगलें होईल, असें स्पष्ट बोलून त्यांनीं त्यास सडकून शिव्या दिल्या. उमाबाईच्यानें त्या शिव्या आणि तो एकंदर प्रकार ऐकवेना इतका दुःसह झाला. पण त्या काय करतात!

दुसरे दिवशीं जांवईबोवा स्वतः येणार होते. परंतु सदूनानांच्या सुदैवानें ते ज्या गाडीनें यावयाचे त्या गाडीनें आले नाहींत. आपल्याला तेवढाच अधिक टाइम सांपडला, असें सदूनानांस वाटून थोडाबहुत आनंदही झाला. त्यांनीं ऑफिसांतून चार दिवसांची रजा काढण्याचा विचार करून त्याप्रमाणें कांहीं मचर्चीनें चिठी पाठवून स्वारी घरीं राहिली. घरीं राहिली म्हणण्यापेक्षां गांवांत हिंडत बसली म्हटलें तर विशेष शोभेल. कारण, प्राण गेला तरी बेहत्तर, परंतु ज्या डॉक्टरसाहेबानें आपल्या पोरास व बायकोस फसवून अशा तऱ्हेनें आपणास नागविलें, त्यास आपण शोधून काढून तुरुंगांत पाठविल्याखेरीज कधींही ठेवणार नाहीं, असा त्यांनें पूर्ण निश्चय केला आणि एवढ्याच कारणाकरितां रजा घेतली, कीं सगळ्या गांवभर वेळ पडली तर हिंडून त्याचा एकदां शोध लावावयाचा, त्याखेरीज राहावयाचें नाहीं. हा सगळा विचार करून स्वारींनीं प्रोफेसर डयांडींचा शोध लावण्यास कंबर बांधली. त्यांत आणखी त्यांस वेळ मिळण्यास एक कारण झालें कीं, जांवईबोवा चार दिवसांनंतर येणार असें पत्र आलें. तेव्हां परमेश्वर आपला साहाय्यकारी आहे असेंच त्यांस वाटलें आणि त्यांनीं जोरानें शोध चालविला. मग काय विचारतां? त्यांनीं प्रोफेसर डयांडींच्या जितक्या म्हणून जागा

शोधून काढावयाच्या तेवढ्या सगळ्या शोधल्या. जसा एखादा शिकारी गृहस्थ एखाद्या सावजाच्या पाठीमागें लागला म्हणजे मग त्यास दुसरें कांहींसुद्धां सुचत नाहीं, तशीच त्यांची स्थिति झाली. परंतु कोठेंही त्यांच्या त्या सावजाचा पत्ता लागला नाहीं. अशा तऱ्हेनें दोन दिवस गेले. तिसरे दिवशीं सकाळीं सदूनानांस मोठ्या थाटाच्या लिफाफ्यांत घातलेलें इंग्रजींत लिहिलेलें एक पत्र आलें. त्या पत्रांत पुढील मजकूर होता.

सदूनाना यांस,

तुह्मी मजबरोबर माझ्या ऑफिसांत आला होतां. तुमचे दागिने आणण्यासाठीं मी थोडा तुमच्यापुढें ऑफिसांत गेलों आणि सेफ उघडून डबा काढून मी बाहेर येतों, तों तुमचा पत्ता नाहीं. मी तुमचा अतोनात शोध केला परंतु पत्ता लागला नाहीं. पुढें मी आपल्या पट्टेवाल्याला विचारलें, तों मला असें कळलें कीं, तुह्मी गेलां. तेव्हां माझा नाइलाज होऊन मी परत आपल्या ऑफिसांत जाऊन बसलों. दागिने जेथल्या तेथें ठेवले. आतां असें कळतें कीं, तुह्मी माझा शोध करतां आहां. इतका शोध करण्याचे ऐवजीं तुह्मी बरोबर चार वाजतां माझ्या आफिसांत या. मी तुह्मांला भेटेन. वास्तविक पाहतां तुमच्या मुलाला चाकरी लावून दिली त्याच्या जामिनकीसाठीं म्हणून हे हजार बाराशांचे दागिने त्यानें व तुमच्या कुटुंबानें मला दिले. पुढें तो चाकरीवर रुजू करण्याची वेळ आली, तोंच तुमचा हा धुमाकूळ सुरू झाला, तेव्हां या गोष्टीस काय म्हणावें ? जी गोष्ट तुमच्या आमच्या समक्ष भेटींत सहज उलगडून जाणार, तिच्याबद्दल तुह्मी एवढा अट्टाहास करतां याचा अर्थ काय ? नाहीं तुमचा मजवर विश्वास तर समक्ष भेटून आपला निकाल करून घ्या. नको कोण म्हणतो आहे ? परंतु विनाकारण माझी गांवभर नालस्ती करीत हिंडतां, याचा अर्थ काय ? आजकाल या मुंबईंत मी अब्रूदार लोकांत मोडतों आहें. तेव्हां तुह्मी जर अशी माझी नालस्ती करूं लागला, तर मला त्याबद्दल चांगलाच विचार करावा लागणार आहे. तुमच्या मुलाला मी आपला धाकटा भाऊ म्हणून मानून त्याच्या चाकरीच्या भानगडींत पडलों. नाहीं तर कशाला पडलों असतों ? त्याला भाऊ मानल्यानंतर आपल्याला मी कसें मानतों हें काय सांगावयास पाहिजे ? जर आपल्याला मी अगदीं तीर्थरूपांप्रमाणें मानतों, तर आपण तरी मला आपल्या मुलाप्रमाणें कां मानूं नये ? परंतु तुम्हांला असें वाटतें, मी चांगला माणूस नाहीं आणि मला तुम्ही वाटेल तशा शिव्या दिल्या, माझी नालस्ती केली किंवा आणखी कांहीं प्रकार केले, तरी बिलकुल हरकत नाहीं. तुमचें करणें तुमच्याकडे. पण आतां माझी एवढीच विनंति आहे कीं, आज दोन तीन दिवस मजकरितां तुम्ही ज्या धडपडीनें गांवांत हिंडतां, ती धडपड अगदीं एके बाजूस ठेवून मन अगदीं शांत करून येथें माझ्या ऑफिसांत या. जें काय मजपाशीं दिलें आहे, तें घेऊन जा. मात्र पुनः विनाकारण माझ्या नांवानें गांवांत उगीच बभ्रा करीत हिंडूं नका. दुसरें कांहीं नाहीं. मी अजून अगदीं तरुण आहें; मला या मुंबईंत आजच्यापेक्षांही कितीतरी अधिक नांवारूपाला यावयाचें आहे. तेव्हां आजच तुमच्या सारख्यांनीं एकदां माझ्या नांवाच्या नालस्तीचा डांगोरा पिटला म्हणजे मग काय राहिलें ? मग मी मागतों एवढी कृपा

कराल काय? कराल अशी पक्की आशा धरून पत्र लिहिलें आहे. तरी निराशा होणार नाहीं असें मागणें आहे."

पत्राखालीं सही इतकी फरडेशाहीनें केली होती, कीं ती सदूनानांस मुळींच लागली नाहीं तथापि एकंदर पत्रांतल्या मजकुरावरून त्यांनीं जाणलें कीं, हें पत्र त्या स्वारीचेंच आहे. एकंदर मजकूर अशा विलक्षण तऱ्हेनें लिहिला होता कीं, कोणी ह्मणेल लिहिणारा केवढा थोरला तरी अब्रूदार माणूस असून सदूनानांसारखा पाजी माणूस त्याच्या अगदीं विनाकारण पाठीस लागला आहे. पण सदूनानांस तसें वाटण्यास मुळींच कारण नव्हतें. त्यानें तेव्हांच मनांत असा विचार केला कीं, हा पाजी माणूस आपल्यास आणखी कोठल्या तरी गोत्यांत घालण्यास पाहात असावा. दुसरें कांहीं नाहीं. परंतु याचा पिच्छा सोडतां कामा नये. यानें बोलावलें आहे त्या वेळीं तेथें जाऊन तर पाहावें बरें काय करतो! दागिन्यांच्या किंमतीची जी रक्कम त्यानें लिहिली होती ती रक्कम अर्थातच फार थोडी होती, परंतु सदूनानांनीं असा विचार केला कीं, तेवढ्या रकमेचे तरी दागिने पदरांत पडले, कीं पुनः त्याच्या मानगुटीवर बसून बाकीच्यांची वाट काय लागली असें विचारण्यास ठीक पडेल. असा विचार करून स्वारी त्या नेमक्या वेळीं प्रोफेसर ड्यांडींनें त्यांस जेथें झुकांडा दिला होता, तेथें गेली. तेथें जाऊन त्या मजल्यावर ते जातात तों एक डगला, पट्टा घातलेला शिपाई पुढें येऊन त्यानें "आपण सदूनाना काय? शेट कधींचे वाट बघतात, होय!" असें म्हणून त्यांस आंत चलण्याबद्दल गर्दी केली. सदूनाना पुढें झाले. दारांत अर्ध्या भागांत बसविलेली अलवाणानें सजवलेली झडप त्या शिपायानें उघडून धरली. सदूनाना आंत शिरले, पहातात तों काय थाट. एखाद्या दोन हजार रुपये दरमहा मिळविणाऱ्या ऑफिसरांचें ऑफिसमुद्धां असें शृंगारलेलें नसेल असा थाट तेथें केलेला. सर्व अगदीं साहेबी तऱ्हा. सदूनाना आंत जाण्याबरोबर, तो थाट पाहून अगदीं गुंगच झाले! प्रोफेसर ड्यांडी हा फाकाजी अशी त्यांची अगदीं खात्रीच होती. परंतु त्याचा फाकाजीपणा इतक्या श्रीमंती थाटावर चालत असेल, ही कल्पनामुद्धां त्यांस नव्हती. आपल्या ऑफिसाची एकंदर व्यवस्था पाहून स्वारी गुंगली असें पाहातांच प्रोफेसर एकदम टेबलाजवळील ड्याकडे बोट करून ह्मणतात; "ते तुमचे दागिने आणि ते तुह्मी. यादी करा, पावती द्या. आणखी मी आपल्याला नमस्कार करतों. कोणावरही उपकार करायला गेल्यावर अशा तऱ्हेनं त्याची फेड होते, हा अनुभव कांहीं मला नव्यानें येत नाहीं. हा अनुभव आजपर्यंत अनेक वेळां मला आला, आणखी पुढेंही येईलच. यांत शंका नाहीं. असो, चला. इतःपर कानाला खडा लावून घेतला."

असें बोलून त्यानें तो डबा आपल्यापुढें ओढून घेऊन उघडला आणि त्यांतूनच एक यादी काढून ह्मणतो, "ही पहा जे दागिने मला सोन्यानं आणून दिले, त्यांची ही यादी. या यादीप्रमाणें तुमचे सगळे जिन्नस घ्या, आणखी इथून जा. मात्र पुनः माझी विनाकारण निंदा करूं नका. एवढंच मागणं आहे; दुसरं कांहीं नाहीं." दागिने पाहण्याबरोबर सदूनानांस अनोनात आनंद झाला, इतका कीं, आतां हर्षवायु होतो कीं काय, असेंच वाटण्याची पाळी आली. विशेष आनंद

होण्यास कारण झालें तें हें, कीं पत्रावरून हजारबाराशांचेच दागिने हातीं लागतील असें जें वाटलें होतें, तें एकीकडेच राहून दागिने जितके म्हणून गेले होते तेवढे सगळे त्यांत दिसले. आतां हे आपल्या हातांत येतात कसे एवढेंच कायतें त्यांस भय वाटूं लागलें. शेवटीं दागिने नेण्याबद्दल प्रोफेसरांचीच तांतडी लागलेली पाहून त्यांस फारच आश्चर्य वाटलें. परंतु तें आश्चर्य बाहेर न दाखवितां त्यांनीं प्रोफेसरांस ह्मटलें, "माझ्या स्वाधीन दागिने करा, मी जातों." प्रोफेसरानें उलट त्यांस ह्मटलें, "तर मग मी काय करतों आहें ? ही पहा ही तुमची सरी, हा चंद्रहार, ही माळ, वजनांचजन करायची आहे काय ? असली तर शंका फेडून घ्या. एकदां मनुष्याचें मन शंकित झालें, ह्मणजे काय शंका घेईल आणि काय नाहीं ! इथें आतां आहांत तोंपर्यंत काय शंका असताल त्या फेडून घ्या. नाहीं तर विनाकारण मग शंका घेत बसाल. हं, हे गोठ..." असें करीत करीत सर्व दागिने त्यांस उचलून दाखविले व यादी वाचली.

सर्व आहेत अशाबद्दल हर्ष पावलेल्या सद्गुनानांनीं मान डोलविली. पावती लिहून दिली आणि आनंदानें रुंदावलेल्या मुखानें 'तुह्मांला विनाकारण त्रास दिला याबद्दल माफी असावी,' असें ह्मणत ह्मणत तेथून प्रयाण करण्यास ते उठले.

"आतां आणखी त्रास देऊं नका ह्मणजे झालें. इच्छा आमची आहे, पण तुम्हांला देतों." असें ह्मणत प्रोफेसर उठले. सद्गुनाना इच्छा घेऊन बाहेर पडून घराच्या रस्त्यास लागले.

---

# प्रकरण ३२ वें.

## संसाराचा पूर्वरंग.



स

द्गुनानांचा चेहरा आनंदानें अत्यंत प्रफुल्लित झाला व ते तसेंच उड्या मारीतच तेथून गेले हें सांगावयास नकोच. मगरीच्या तोंडांत सांपडलेलें रत्न आपण ओढून काढलें, असा त्यांचा त्यांस अभिमान वाटूं लागला. आतां जांवई येवोत कीं, आणखी कोणी वाटेल तो येवो, आपण कोणाच्या बापाला सुद्धां भीत नाहीं, असेंच जणूं काय त्यांची चर्या ह्मणते आहे असें दिसलें. आतां यापुढें दागिने आपल्या स्वाधीन ठेवायचे आपल्याखेरीज कोणाच्याही हातांत जाऊं द्यावयाचे नाहींत, बायकोच्या तर आतां दृष्टीस पडूं द्यावयाचे नाहींत, असा त्यांनीं कृतनिश्चय केला. परंतु त्यांस त्यांच्या आनंदांत व कृतनिश्चय पार पाडण्याच्या आवेशांतच आपण सोडून देऊन इतरत्र जाऊं.

आपण आतां कांहीं तरी उद्योग करून

आपण आपल्या पायांवर उभें राहण्याच्या इच्छेनें कोठें तरी नोकरी शोधण्याचा कृतनिश्चय करून पद्माकरपंतांनीं चाकरीचा शोध चालविला. कोठें व कशी चाकरी आपणास मिळेल याविषयीं विचार करितांना, त्यांना चाकरी मिळणें जितकें म्हणून कठिण वाटलें, त्याच्यापेक्षां अनुभवानें तें किती तरी कठिण आढळून आलें. मुंबईतील प्रत्येक ऑफिसांतून जणूं काय एक एक कटच झालेला, कीं अमुक अमुक जातीच्या किंवा अमुक अमुक प्रकारच्याच माणसास जागा द्यावयाची. नुसती उमेदवारी मिळविण्यास सुद्धां किती लोकांची हांजी हांजी करण्याची जरूरी असे. किती लोकांच्या शिफारशी घेऊन चार चार महिने फुकट उमेदवाऱ्या करणारे लोक प्रत्येक ऑफिसांत दहादहा पांच पांच आहेत असें आढळून आलें. पद्माकरपंतांनींही कोणाची शिफारसपत्रें मिळवावयाची अगर कोणाचे तरी वशिले लावावयाचे असें मनांत आणलें असतें, तर त्यांस तशीं शिफारसपत्रें अगर तसे वशिले मिळतेना असें नाहीं; परंतु कधीं ज्या ओळखी आपण ध्यानांत आणल्या नाहींत, त्या ओळखी काढून आतां उपयोग करून घ्यावयाचा किंवा तसा उपयोग करून घ्यावा ह्मणून त्या आतां उकरून काढावयाच्या, हें त्याच्या मानी स्वभावास बरें वाटलें नाहीं. गणपतराव हा मोठा वजनदार माणूस होता. त्यास पत्र लिहून जर दोन शिफारसपत्रें किंवा ओळखपत्रें मागविलीं असतीं, तर त्यांनीं तीं मोठ्या आनंदानें दिलीं असतीं, अगर तीं पत्रें देण्याचें एकीकडेच ठेवून तुह्मी पुढें अभ्यास करा, मी तुमची सर्व व्यवस्था लावतों असा आग्रह त्यांनीं धरला असता. तेव्हां गणपतरावांचा ह्मणजे आपल्या मासऱ्यांच्या मित्राचा तशा तऱ्हेनें उपयोग करून घ्यावा हें त्यास मुळींसुद्धां बरें वाटलें नाहीं.

लग्न होण्याच्या आधीं थोडे दिवसांपूर्वींपर्यंत जो प्रभाकर अगदीं जिवश्च कंठश्च होता, ज्याला विचारल्याखेरीज पद्माकरपंतांनीं एक पाऊलही टाकलें नाहीं, त्या प्रभाकराची अशा वेळीं सल्लामसलत घेण्याची इच्छा पद्माकरपंतास होणें किती साहजिक होय, परंतु आतां त्याचें नुसतें नांव मनांत येण्याचीच पद्माकरपंतास कसेंसेंच होत असावें असें दिसलें. कधीं कधीं त्याच्या मनांत असें खचित येई, कीं आपण त्याच्याशीं बोलत नाहीं ही आपली अगदीं चूक होय; परंतु तें वाटणें अगदींच क्षणभर असे. पुनः त्याच्या मनांत त्याचा तो पूर्व संशय येई. आपला विवाह न होऊं देण्यांत त्याचा कांहीं तरी हेतु आहे असें त्याच्या मनानें अगदीं पक्कें घेतलेलें आणि तें कांहीं केल्या त्याच्या मनांतून गेलें नाहीं. लग्न झालें. सर्व कांहीं झालें, तथापि एकदां जी कांहीं अढी त्याच्या मनांत बसली, ती कांहीं केल्या त्याच्या मनांतून गेली नाहीं आणि जाण्याकरितां दोनही पक्षांकडून कांहीं प्रयत्न झाला नाहीं. उलट कोणा एका व्यक्तीकडून तो द्वैतभाव तसाच वाढत जाण्याचा प्रयत्न चालू होता, परंतु हें लवकरच पुढें येईल.

आपणास कोठें तरी चाकरी केव्हां लागेल, आणि आपण आपल्या वैवाहिक स्थितीचा अनुभव केव्हां घेऊं असें पद्माकरपंतास झालें होतें, परंतु चाकऱ्या शोधतांना जेव्हां वर सांगितल्या प्रकारचे धक्के बसूं लागले, तेव्हां एकंदरींत आपण केलें हें बरें केलें काय? असा प्रश्न त्याच्या

मनांत उभा राहिला. अशा स्थितींत त्याचें तें चमत्कारिक मन विलक्षण नाजूक झालें. इतकेंच नव्हे, तर आपण जें एकंदर वर्तन केलें, आपण जें पाऊल टाकलें, तें बरोबर टाकलें काय? अशी शंकाही त्याच्या मनांत एक दोन वेळां आली. परंतु त्या शंकेस सबळ होऊं देण्याइतका अवकाश त्यास नव्हता. बी. ए. पदवी एकदांची मिळवून ही चाकरी मिळवावयाची ह्मटल्यास किती प्रकारांनीं त्रास होतो, याची त्या बिचाऱ्यास कल्पना सुद्धां नव्हती. यापूर्वीं कोणी त्या त्रासाचें वर्णन त्याच्या जवळ केलें, तर तो त्या वर्णन करणाराची नुसती चेष्टा करीत असे. बी. ए. झाल्यानंतर जेथें कोठें आपण अर्ज करूं, तेथें आपल्यास नोकरी हां हां ह्मणतां मिळेल असें ज्याला त्याला तो ह्मणे. कारण त्यास चाकऱ्या शोधण्याचा प्रसंग येईल ही कल्पनासुद्धां नव्हती. 'ज्याला कधीं जखम झाली नाहीं तो जखमेच्या वणाची थट्टाच करावयाचा' हें शेक्सपीअरचें वाक्य त्याचे बाबतींत अगदीं अन्वर्थक असे.

परंतु आज त्याचा अनुभव अगदीं निराळा झाला. आजपर्यंत ज्या गोष्टीची त्यास मुळींच जरूरी नाहींशी वाटत होती, आणि ती त्याला अगदीं सुलभ वाटे—तीच आज त्यास फार कठिण अशी अनुभवास आली. आणि काय करावें हें त्यास सुचेना. कित्येक ठिकाणीं जीं उत्तरें त्यास मिळालीं, त्यांनीं तर त्याचें मन अतिशय संतप्त आणि उद्विग्न झालें. परंतु जे उत्तरें देणारे, ते अधिकारारूढ व सत्तावान् आणि हा याचक, यामुळें अर्थातच त्यास आपला संताप व उद्वेग दाबून धरावा लागला. पहिल्या एक दोन प्रसंगीं त्यानें रोख उत्तरास ठोक प्रत्युत्तर दिलें. परंतु त्यानें इष्टकार्य सिद्धीस जाण्याचें लांबच राहून त्याचा अधिक उपमर्द मात्र झाला. एके ठिकाणीं तर, "तुमच्या अंगीं इतकी गुर्मी आणखी इतका ताठा आहे, तर भीक मागायला आमच्या पायांपाशीं आलां कशाला?" असें प्रत्युत्तर त्यास मिळालें, आणि शिपायास बोलावून त्यांना बाहेरचा रस्ता दाखव असा हुकूम झाला!

असा एकंदर प्रकार झाला, तव्हां त्याचें मन अगदीं दुर्विषण्ण होईल त्यांत नवल काय? कोठेंही गेलों तरी आपल्याला कांहीं ह्मटल्या कांहींही आशेला कारण मिळत नाहीं हें पाहून त्याच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली.

त्यानें आजपर्यंत अनेक काव्यें, नाटकें व कादंबऱ्या वाचल्या, त्यांतील दारिद्र्यावस्थेतल्या—पर्णकुटिकेतल्या—प्रेमाच्या वर्णनांचें त्यास स्मरण झालें. कवीच्या वर्णनास पैसे पडत नाहींत; त्यांनीं ज्या जोडप्याचें 'पर्णकुटिकेंतील प्रेम' वर्णन केलें असेल त्या पर्णकुटिका बांधण्यास कवीस जवळची एक कवडीसुद्धां खर्च करावी लागत नाहीं. परंतु प्रत्यक्ष ज्याला पर्णकुटिका बांधून आपल्या प्रियकर दयितेसह संसार करण्याची पाळी येते, त्यास पर्णकुटिका बांधण्याचा खर्च कोठून करावा हा प्रश्न उभा राहतो. किंवा तशी पर्णकुटिका भाड्यानें मिळाली, तरी तिचें भाडें नुसत्या प्रेमानें देतां येत नाहीं, त्याला कांहीं तरी रुप्याचें नाणेंच लागतें, हें ध्यानांत घ्यावें लागतें. त्याचप्रमाणें केवळ प्रेमावर उदरपोषण होत नाहीं. हल्लींचा काळच असा विलक्षण आहे कीं, पर्णकुटि बांधावयालासुद्धां बरेंच "राणीचें नाणें"

लागतें. आणि पर्णकुटींत राहिलें, तरी आपल्या व आपल्या पत्नीच्या उदरभरणाकरितां प्रेमाशिवाय आणखी कांहीं पदार्थ लागतात. ते पदार्थ पुनः "राणीच्या नाण्या" खेरीज मिळत नाहींत. अगदीं कंदमूळफळें म्हटलीं तरी प्रेमानें सहज उत्पन्न होत नाहींत. तीं रुपें खर्चूनच घ्यावीं लागतात. याप्रमाणें राहण्याला पर्णकुटि आणि खाण्याला कंदमूळफळें मिळविल्याखेरीज केवळ प्रेमाचा संसार तर होत नाहीं! तेव्हां त्या संसारालाही अवश्य लागणारें राणीचें नाणें मिळविल्याखेरीज दुसरें गत्यंतर नाहीं हें त्याच्या निदर्शनास आज आलें. आपला विवाह आपल्या आवडत्या वधूशीं झाला म्हणजे सुखाची परमावधि झाली असें जें त्याला वाटत होतें, त्यांतली खरी परमावधि होण्यास आणखी कांहीं पाहिजे, आणि जें पाहिजे तें मिळविणें अगदीं सोपें नाहीं असेंही त्यास आतां समजलें. कवींच्या काव्यांत, नाटककारांच्या नाटकांत, कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांत आणि या रोख ठोक जगांत अंतर आहे तें हेंच, दुसरें काय? कादंबऱ्यांतील नायकनायिकांचें दारिद्र्यावस्थेंतल्या प्रेमाचें अनुकरण करून सुद्धां राहूं, आपल्या मनाप्रमाणें वधू मिळविण्यासाठीं काय वाटेल तें नुकसान सोसावें लागलें तरी तें सोसूं, असा त्या काळचा त्याचा कृतनिश्चय आज म्हणजे फारच डळमळूं लागला होता असें नाहीं; परंतु त्या वेळीं तीं सर्व भावीक दुःखें त्याच्यापासून फार दूर होतीं, आणि तीं सोसण्याचा मोठेपणा फारच उत्कृष्ट वर्णानीं काव्यनाटकादिकांतून सुंदर तऱ्हेनें रंजित व चित्रित केलेला त्यास दिसला होता; परंतु तो मोठेपणा या उदरनिष्ठ व व्यवहारनिष्ठ जगांत काय उपयोगाचा? तो मोठेपणा कसा मिळवावा, तो मिळवितां मिळवितांच आपलें काय होईल आणि काय नाहीं असे अनेक विचार त्याचे मनांत नानाप्रकारांनीं आले. काव्यांतील कल्पनांच्या भराऱ्या काव्यांतच राहणार, या जगांत त्यांचा कांहींसुद्धां उपयोग नाहीं, असें त्याच्या मनास वाटूं लागलें.

जोंपर्यंत कोठेंतरी पन्नास साठ रुपयांची नजरबांज लागली नाहीं, तोंपर्यंत "आपल्या नववधूस पाठवून द्यावी, आपण आतां तिच्या स्वागतार्थ सर्व तयारी करून ठेविली आहे," असें लिहावें तरी कसें? त्याच्या आधीं तिला बोलावून आणून संसार थाटावा तरी कसा? आणि कशानें? असें त्यानें आपलें आपल्यासच पंचवीस वेळां विचारलें. पद्माकरपंत स्वतः लहानपणापासून श्रीमंती थाटानेंच राहिलेला, अर्थातच आपल्या वधूस घेऊन तिच्या ममतेन राहण्यास आपल्यास पन्नास साठ रुपयेंपर्यंत तरी निदान महिन्याची प्राप्ति पाहिजे आहे. तितकी प्राप्ति असल्याखेरीज संसार चालणें केवळ अशक्यच होय असें त्याच्या मनानें पूर्णपणें घेतलें. तितक्या प्राप्तीची तरी नोकरी किंवा उद्योग आपल्याला पाहिजे, अशाकरितां त्याचा एकसारखा प्रयत्न चालू होता. पण त्यांत यश येण्याचें कांहींच चिन्ह त्यास दिसेना. तेव्हां काय करावें? त्यानें अजूनपर्यंत आपल्या पत्नीस पत्रही लिहिलें नव्हतें. बळवंतरावांस मात्र खुशालीचें पत्र लिहून तो आपली हकीकत कळवीत असे. बळवंतरावांनीं त्यास पुष्कळ वेळां लिहिलें कीं, आपण अगदीं इतका अट्टाहास करून चाकरी शोधूं नये. सावकाशी सावकाशीनें पाहतां येईल. तुम्हीं आपल्या स्वतःच्या

मताप्रमाणें चालण्याकरितां केवढा थोरला आत्मत्याग केला आहे, हें धडधडीत दिसतें आहे. त्या आत्मत्यागाबरोबर आणखी विनाकारण दुःख कां सोसतां ? मला थोडी-बहुत ऐपत आहे, तेव्हां तुह्मांला प्रारंभा-पासूनच अगदीं चाकरीकरितां धडपड करावयाला नको. परंतु या मानी गृहस्थास तें बिलकुल खपेना. तसें मुलींसुद्धां मला आवडावयाचें नाहीं, महिन्या पंधरा दिव-सांत मला कोठें तरी मुंबईंतच नोकरी लागली नाहीं, तर मी बाहेरगांवीं राहीन. परंतु आपल्या जिवावर राहून निरुद्योगी-पणांत काळ कंठण्यासाठीं मीं असा हा विवाह केला, अशी शंकासुद्धां कोणाच्या मनांत येऊं नये आणि तसें ह्मणण्याचा कोणाला प्रसंग देऊं नये, ह्मणूनच मी एवढा खटाटोप करतों आहें, असें त्यानें बळवंतरावांस उलट उत्तर पाठविलें आणि आपला चाकरी शोधण्याचा क्रम सुरू ठेवलाच.

सरते शेवटीं शोध करतां करतां त्यास एका शाळेंत पंचेचाळीस रुपयांची जागा देण्याचें हेडमास्तरांनीं कबूल केलें. शिकवावयाचें काय, वगैरे सर्व विचारून ठर-वून टाकिलें आणि ती जागा त्यानें पतक-रली. शाळामास्तरी त्यास आवडत होती असें नाहीं, परंतु कोठें कांहींच नाहीं, तेव्हां ती काय वाईट, म्हणून त्यानें पतकरली. आणि बळवंतरावांस पत्र लिहिलें. द्वारका-बाईच्या प्रकृतींत विशेषसा फरक पडत होता असें कांहीं नाहीं. गणपतराव व सर-स्वतीबाई हीं त्यांना केवळ आपल्या सख्ख्या बहिणीप्रमाणें मानून कायावाचा-मनानें त्यांची शुश्रूषा करीत, यामुळें त्यांच्या प्रकृतीस अधिकपणा झाला नाहीं. वेळच्या वेळीं औषधपाणी देण्यास तिची कन्या कमला तयार होतीच; परंतु तो ह्मणजे एकदां पाऊल पुढें पडलें, की मा-घारीं जावयाचें फार कठिण अशांतला रोग. नानाप्रकारचे उपाय झाले, तरी तो काय-मचा कायम. त्याची अधिक वाढ व्हाव-याची, ती मात्र आतां या गेल्या कांहीं दिवसांत झाली नाहीं. एवढ्यावरच ती मंडळी आनंदांत होती. दिवसानुदिवस रोग चळावत चालल्यानंतर मग कोण्या थराला रोग जाईल हें सांगणें अगदीं कठिण होतें; परंतु ती अवस्था आतांपर्यंत तरी नव्हती. तशांत वर सांगितल्याप्रमाणें जांवईबोआंचें पत्र आलें. मग काय वि-चारतां ? द्वारकाबाईस असें वाटलें, कीं जें पाहण्याकरितां आपण आणखी जगावें, एव्हांशीच या सर्वांना सोडून जाण्याचा प्रसंग येऊं नये असें इच्छीत होतों, तें आज घडून येऊन आपला इष्ट हेतु सिद्धीस जातो आहे. त्या हेतूप्रमाणें जांवईबोवा आतां स्वतंत्र संसार करूं लागणार आणि या आपल्या कमलाप्रमाणें खरोखर सुंदर व नाजूक मुलींचें या जगांत कसें होईल ही जी काळजी पडली होती, ती आपली काळजी पूर्णपणें दूर होणार. "आतां मला कोणाची काळजी नाहीं. आतां ज्याचीं तीं माणसें आहेतच" असें तिनें बोलून दाखविलें. तें ऐकून गणपतराव एकदम हं-सत हंसत तिला ह्मणतात. "एकूण कमळा तेवढी तुमची वाटते ? बाकीच्यांचा तिच्यावर कांहीं हक्क नाहीं. बाकीचे कोणी तिची काळजी घेणारे नाहींत आणखी हा गोपाळा कोणाचा ? याची कोण काळजी घेणार ? त्याची नाहीं का तुम्हांला काळजी वाटत ?"

"नाहीं वाटत तर काय झालं ? पण भावजी, त्याची गोष्ट निराळी, आणखी

कमळेची गोष्ट निराळी. जसं कांहीं आपल्या लक्ष्यांत येतच नसेल, नव्हे, मला कमळी-बद्दलच कां इतकं वाटतं आणखी गोपाळा-बद्दल कां वाटत नाहीं तें ?"

"तेंच तर मला समजत नाहीं," गणपतराव द्वारकाबाईला म्हणतातः "माझ्या दृष्टीनं कमला आणखी तो सारखाच. निदान तुह्मीं आह्मीं ज्यांनीं एकवार एका बाबतींत पाऊल पुढें घातलं आहे, त्यांनीं तरी त्या भेदाचा विचार नको करायला. वारंवार बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, पण वहिनी, तुमच्या आग्रहाकरितांच मीं या पोरीच्या लग्नाबद्दल संमत दिली. नाहीं तर ही कसली पोर, सुलक्षण, बुद्धिवान् ज्या विद्येंत घालावी, त्या विद्येंत ती अगदीं पारंगत होऊन जायची. पण तुह्मीं तिला दिलीत गाड्याला जुंपून. आतां काय ? आतां नवऱ्याचे पंचेचाळीस रुपये आणखी हिची संसार करण्याची कुशलता. ही त्यांत देखील अगदीं उत्तमपणा दाखविणार, पण काय ? तेवढें करतां करतांच हिचा सगळा वेळ गेला म्हणजे आजपर्यंतच्या शिक्षणाचा आणखी तीक्ष्णबुद्धीचा उपयोग काय झाला ? कांहीं नाहीं....... "

"तुमच्या आपल्या नेहमीं आकाशांत भराऱ्या. जमिनीवर चालणाऱ्या माणसांना त्या काय उपयोगी ?" द्वारकाताईनीं त्यांस हंसत हंसत मोठ्या मार्मिकपणें उत्तर दिलें व त्या आणखी पुढें म्हणतात, "या गोष्याची बुद्धि कांहीं कमी नाहींना. आतां याचं होऊं या काय व्हायचं तें."

"हेंच तें. हेंच तें. मी जें म्हणतों नेहमीं, कीं आमच्या बायका किती जरी तयार झाल्या, तरी त्यांच्या मनावरले पूर्व संस्कार कांहीं वर डोकं काढल्याखेरीज राहयचे नाहींत. अहो, गोष्या होऊन आणखी ही पोरगी जर पुढें सरसावली असती तर त्यांत कांहीं नुकसान का झालं असतं ? खाशी मोठी डॉक्टरीण झाली असती, आणखी किती तरी बायकांना तिच्यापासून उपयोग झाला असता. तुम्हीं लग्नाची अगदीं गर्दी केलीत, फार गर्दी केलीत, तें मला मुळींसुद्धां आवडलं नाहीं. पण तुमची इच्छा. तिचा अतिक्रम करील कोण ? खरं जर पुसाल तर मला...........पण मी अगदीं आपला वेड्यासारखा झाल्या गेल्या गोष्टीबद्दल काय बडबड करीत बसलों आहें ? एकूण आतां तुह्मी पुनः मुंबईला जाणार आणखी कमळेचा संसार थाटणार ? कमळे, आतां संसार तुझ्या पाठीमागें लागलाच. तो तूं मोठ्या चतुरतेनें करशील, आपल्या नवऱ्याला नेहमीं आनंदांत ठेवशील, त्यांत तर मुळींच शंका नाहीं. पण पोरी, तूं इतकी शिकली सवरली आहेस, तेव्हां त्याचा काय उपयोग करतेस तें पाहतों. भात, भाजी, वरण, पोळ्या छान केल्यास, नवऱ्याचे कपडे धोब्याला दिले कीं मांडून ठेवून त्यानें परत आणले म्हणजे पाहून घेतलेस, म्हणजे संसार उत्तम झाला असं नाहीं बरं ! तुझ्या शिक्षणासारखं कांहीं तरी कर. काय कर कसं कर तें मी तुला सांगायला नको. तें तुला समजेल, तुझ्यापुढें उदाहरणं आहेत, त्यावरून ध्यानांत येईल, त्याप्रमाणं कर ह्मणजे झालं. ... "

गणपतरावानें आणखीही पुष्कळ तऱ्हेनें त्या वेळीं तिला सांगितलें. पद्माकरपंतांचें पत्र आल्या दिवसापासून अर्थातच कमळेच्या जाण्याबद्दलची बाटाघाट होऊं लागली. गणपतरावाचा अत्याग्रह कीं, द्वारकाताईनीं कांहीं एव्हां मुंबईला जाऊं नये,

कारण त्यांच्या प्रकृतीला तें बरें होणार नाहीं. कमलेला पाठविणें जर जरूर, तर द्वारकाताई तेथें राहण्यास तयार नव्हत्या. कमलेबरोबर आपण मुंबईस जाणार असा त्यांनीं हट्ट धरला. तेव्हां आतां पुढें काय करावें याचा विचार मंडळीस पडला. आठ चार दिवसांत पद्माकरपंतांचें दुसरें पत्र आलें कीं, मीं चाळींत कोपऱ्यांतल्या दोन खोल्या घेतल्या आहेत, आणि संसाराला लागणाऱ्या सर्व जिनसासामानसांची तयारी केली आहे. अर्थातच त्यांच्या पत्रांतला ध्वनित अर्थ असा होता कीं, आतां आपण संसार करण्यास तयार व उत्सुक आहों. पत्र वाचतांच गणपतरावांनीं त्यांस उतावळेपणाबद्दल दोष दिला आणि सहजगत्या ते एवढेंच म्हणाले, "एकंदरींत चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं."

पण लागलीच त्यांनीं आपली जीभ चावली.

# प्रकरण ३३ वें.

## विरुग्णतापपरिहार शौण्डीरशाला.



एकाएकीं मुंबईच्या व इतर वर्तमानपत्रांतून मथाळ्यावर दिलेल्या दीड मैल लांब हेडिंगाच्या जाहिराती फडकूं लागल्या. हेडिंगाचा टाईप सगळ्यांत मोठा म्हणजे सुमारें एक इंचाचा होता. आणि जाहिरातींनीं मोठ्या वर्तमान पत्रांचा दुहेरी एक कॉलम भरलेला असे! लहानसान वर्तमानपत्रांचें एक एक पान सहज भरून गेलेलें. या जाहिरातींत हजारों रोगांवर औषधें सांगितलेलीं असून तीं सर्व "**विरुग्णतापपरिहार शौण्डीरशाळें**" त अनिर्बन्ध दरानें मिळतील असा मजकूर होता. सर्व जाहिरात येथें घेण्याइतकें स्थल आमचेजवळ नाहीं. परंतु वाचकांच्या मनोरंजनाकरितां, नव्हे विज्ञानाकरितां कांहीं उतारे येथें देतों.

"अलीकडे आपणास वैद्य–वैद्यभूषण–वैद्यालंकार–कविराज–वैद्यविद्यामार्तंड वगैरे मोठमोठीं नांवें घेऊन व भपकेदार नांवाचीं, परंतु दीडदमडी किंमतीचीं औषधें विक्रीस ठेवून भचक जाहिराती देणारे लफंगे लोक पुष्कळ झाले आहेत. त्यामुळें खऱ्याखोट्याची निवड होत नाहीं आणि गरजू लोक भलतींच औषधें विलक्षण किंमती देऊन विकत घेऊन फशीं पडतात. पुनः त्यांच्या रोगांचा परिहार होत नाहीं तो नाहींच. ही स्थिति बरी नव्हे असें जाणून रुग्णजनांच्या उद्धारार्थ प्रतिधन्वंतरि व अगदतेजोमार्तण्ड केवळ यमाचे यम असे **गंगाकुंड** शास्त्री यांनीं आपली विरुग्णतापपरिहार शौण्डीरशाला उघडली आहे.

या शालेंत सर्व प्रकारच्या मात्रा, आसवें, अर्क, पुटी, रस वगैरे अगदीं तयार करून ठेविले आहेत. अगदीं दरिद्री मनुष्यासही अमूल्य औषधांचा फायदा करून घेतां यावा म्हणून किंमती अगदीं माफक ठेविल्या आहेत. पृथ्वीचा केवळ मानदंड असा जो हिमालय, तो ह्मणजे सर्व वनस्पतींचा जनिता. म्हणून आमच्या औषधांसाठीं लागणाऱ्या सर्व वनस्पति व इतर सामग्री कैलासशिखरावर असणाऱ्या योगींद्रचूडामणींपासून आणल्या जातात. योगींद्रचूडामणि हे गंगाकुंड शास्त्र्यांचे गुरु होत व त्यांचेपासूनच त्यांना औषधिज्ञान, आयुर्वेदज्ञान आणि मंत्रशास्त्रज्ञान आलें. तेव्हां औषधिलोलुप्सूंनीं विनाकारण ही अमोल्य संधि वायां जाऊं देऊं नये. रुग्णांनीं विनाकारण खितपत पडूं नये. मुमुर्षूंनीं विनाकारण मरूं नये. वृद्धांनीं तारुण्यप्राप्तीची संधि दवडूं नये. पुत्रेच्छूंनीं प्रसंग जाऊं देऊन निपुत्रिकत्वाचा कलंक लावून घेऊं नये. कारण आमच्या यममर्दन मात्रेनें कसलाही असाधारण रोग रोग्यास दीड प्रहराच्या आंत सोडून जातो; **कृतांतांतक रसानें** महारोग, राजयक्ष्मा वगैरे रोग चोवीस तासांत नष्ट होतात. तारुण्यध्वजावलेह हा नव्वद वर्षांच्या वृद्धास ऐन वीस वर्षांचा तरुण बनवितो ......"

परंतु एवढा उतारा पुरे. सगळी प्रसिद्धिपत्रिका उतरून घेतली, तर तें एक प्रकरणच होईल आणि मग गंगाकुंड शास्त्र्यांची स्वतःची ओळख करण्यास मुळींच वेळ सांपडणार नाहीं. त्याचप्रमाणें त्यांच्या त्या लांबलचक शालेचेंही वर्णन तसेंच राहील. तथापि एवढें मात्र सांगतो कीं, या प्रसिद्धिपत्रकांत एकाही रोगाचें नांव आणि त्याला मारक असा शास्त्रीबोआंचा उपाय ही सांगितल्याखेरीज राहिली नव्हती. शास्त्रीबोआंनीं आपला पत्ताही दिला होता हें उघडच आहे. तो पत्ता—**नवी सोनापूर गल्ली घर नंबर. सातशें बारा** येथें तिसऱ्या मजल्यावर—असा होता. आणि आह्मी आपल्या दवाखान्याची एक शाखा लवकरच कोटांत काढणार आहोंत असेंही पण लिहिलें होतें. शास्त्रीबोआंचे निंदक असत ते ह्मणत कीं, शास्त्रीबोआंनीं आपला दवाखाना नव्या सोनापुरगल्लींत घातला याचें कारण त्यांचीं औषधें लोक घेऊं लागले, कीं जुनें सोनापूर मुंबईस पुरावयाचें नाहीं. नवें सोनापूर काढावें लागणारच. म्हणून त्यांनीं तशा गल्लींत दवाखाना काढला. कोणी शास्त्रीबोआंचे भक्त होते त्यांनीं असें ह्मणावें कीं, शास्त्रीबोवांचीं औषधें इतकीं गुणकारी, कीं सोनापुरास ज्याला नेत आहेत त्याला वाटेंत थांबवून शास्त्रीबोआ उठवणार, याकरितां त्यांनीं सोनापुराच्या रस्त्यावर दवाखाना घातला!

अशीं प्रसिद्धिपत्रकें आलीं व जाहिराती फडकूं लागल्या, कीं नानाप्रकारच्या व्यथांनीं पीडिलेल्या—अर्थात् गरजू व नाडी लोकांचें लक्ष्य तिकडे जावयाचेंच; त्याप्रमाणें या जाहिरातींकडेही तसल्या लोकांचें लक्ष्य गेलें आणि शास्त्रीबोआंच्या औषधांला मागण्यावर मागण्या येऊं लागल्या. कोणी नानाप्रकारच्या रोगांवरील त्यांच्या **'रामबाण'** व **'अमोघतेज'** मात्रा मागितल्या; कोणीं **विविधप्रतापभस्में** मागितलीं; कोणी **रसेश्वरभूषण** मागितलें; कोणीं **सर्वांतकशतपुटी** मागितली; कोणीं **दंतद्वात्रिंशतिदृढीकरणचूर्ण** मागितलें. ह्मणजे एकंदरींत शास्त्री-

बोआंचे नांवें रोज पांच पन्नास तरी मनिआर्डरी येऊं लागल्या आणि पांच पन्नास व्हॅल्युपेबलें जाऊं लागलीं. विशेषतः तीन औषधांना मागण्या अतोनात. एक **वार्धक्यकुठार**, दुसरें **तारुण्यशतपुटी** आणि तिसरें **केशविरंजिनी**. **वार्धक्यकुठारानें** वार्धक्य नाहींसें व्हावयाचें, **तारुण्यशतपुटीनें** ...परंतु आतां असें विवरण करण्यापेक्षां केव्हां तरी वाचकांची व शास्त्रीबोआंची प्रत्यक्ष भेट करून देऊन त्यांच्या भाषणादिकांनीच समजवून घेण्याचा प्रसंग जमवून आणावा ह्मणजे ठीक पडेल.

वर सांगितल्याप्रमाणें नव्या सोनापूरच्या गल्लींत पोस्टाच्या शिपायास दर दिलिवरिला खेपा घालतां घालतां पुरे वाट झाली आणि रुपये मोजून देतां देतां बिचाऱ्याचे हात मात्र काळे पडले. असा एकंदर प्रकार चालून सुमारें एक महिना झाला होता. सोनापूरच्या त्या गल्लींत लोकांची गर्दी होऊं लागली. परंतु चमत्कार मात्र हा कीं, शास्त्रीबोआंशीं प्रत्यक्ष गांठ कोणाचीच पडत नसे. सर्व व्यवहार तेथें असणारा एक कारकून व एक शिपाई करी. जे कोणी आह्मांला शास्त्रीबोआंना भेटावयाचें आहे असें ह्मणत, त्यांना त्या कारकुनाकडून असा जबाब मिळे कीं, शास्त्रीबोआ तिकडे पंजाबांत एका संस्थानिकाची प्रकृति बिघडली आहे तिकडे गेले आहेत, आणखी आठ चार दिवसांनीं येतील; तोंपर्यंत बिंदुमाधव पांडे ( ह्मणजे तो कारकून स्वतः ) हे दवाखान्यांतील काम पाहतील व शास्त्रीबोआंच्या बदली कागदपत्रांवर सह्या करतील. बिंदुमाधव पांडे बहुतकरून रोगाच्या लक्षणांचें वर्णन ऐकून औषधयोजना करून देत. बाहेरगांवचीं पत्रें आणि औषधांच्या मागण्या किती होत्या याचें अनुमान वाचकांस वर दिलेल्या थोड्याशा वर्णनावरून सहज होणार आहे. दवाखान्याचा नोकर ( शिपाई, गडी वगैरे सर्व एकच व्यक्ति होती ) पार्सलें व बंग्या बांधतां बांधतां अगदीं मेट्याकुटीस येत असे. जाहिराती दिल्याच्या पहिल्या आठवड्यांत त्या शिपायास तुसतीं प्रसिद्धपत्रकें बुकपोष्टानें पाठविण्याचें व बिंदुमाधव पांडे यांस त्यांवर पत्ते लिहिण्याचेंच काम असे. परंतु दुसऱ्या आठवड्यापासून पार्सलांचा तडाखा सुरू झाला आणि तिसऱ्या व चवथ्या आठवड्यांत तर इतकीं औषधें बाहेरगांवीं गेलीं कीं, त्यांच्या सेवनानें बाहेर गांवीं कोणताही रोगी म्हणून राहिलाच नसावा. असें एखाद्यास सहज वाटलें असतें.

बिंदुमाधव पांडे एका बैठ्या चौरंगाजवळ नक्क्याशीं टेंकून गादीवर बसले होते. वेळ अगदीं ऐन दोन प्रहरची होती. बिंदुमाधव पांडे आले नव्हते म्हणून मनिआर्डरी व व्हॅल्युपेबलचें सगळें काम पोस्टाच्या शिपायानें त्यांच्या सह्या घेण्याकरितां शिपायाजवळ ठेवून दिलें होतें. तें घेऊन बिंदुमाधव सह्या करीत व हिशेबानें किती पैसे येतात त्या बेरजा करीत होते. त्यांचे समोर एक वृद्ध गृहस्थ बसले होते. त्याचेबरोबर त्यांचा एक कारकून होता, तो दूर बसला होता. वृद्ध गृहस्थ बिंदुमाधवास ह्मणत होता, "शास्त्रीबोआंना एकवार भेटावयाची इच्छा होती, परंतु आपण ते इथें नाहींतच म्हणतां, कोठें पंजाबांत गेले आहेत, तर त्याला इलाज नाहीं. परंतु मला सांगायचं आहे तें ऐकून घ्यावं."

"बोला, बोला. आह्मी ऐकून घेतों.

पण कांहीं औषध घ्यायला आलां असलां, तर बोला; नाहीं तर उगीच वायफळ बोलायला वेळ कुठून आणावा ? ह्या पाहा या औषधांना मागण्या. शास्त्रीबोआ इथें नाहींत यामुळं मला आपल्या जबाबदारीवर ज्यास्त माणसं तर कांहीं ठेवतां येत नाहींत, आणखी माझ्या एकट्याच्यानं तर इतकं सगळं काम उरकत नाहीं. धंदा पडला औषधांचा. तीं मागणारा अगदीं अत्यवस्थ असला म्हणजे मागणार, आणि त्यांत आमच्याकडून वेळेवर गेलीं नाहींत, कीं आलं आमच्या कपाळीं हत्येचं पातक ! पण इलाज काय? अहो, जों जों या औषधांची माहिती लोकांना होत जाणार, तों तों असाच प्रकार होणार. पण त्या मानानं इथें कारखान्यांत माणसं वाढायला नकोत का ? पण नाहीं. शास्त्रीबोआंना वाटतं कीं, माणसं वाढवल्यानं नुकसान येईल. आणखी एका दृष्टीनं तें खरं आहे. शास्त्रीबोआंचीं औषधं इतकीं विलक्षण गुणकारी आहेत, तीं तयार करण्याकरितां त्यांचा इतका द्रव्यव्यय व बुद्धिव्यय होत असतो, तरी पण ते म्हणतात, अगदीं प्रत्यक्ष खर्च होतो, त्याच्यावर एक टोलीभरसुद्धां किंमत ठेवावयाची नाहीं. कां तर त्यांचे गुरु योगींद्र चूडामणि यांनीं त्यांच्यापासून शपथ वाहून घेतली आहे कीं, आपण या औषधांवर उपजीविका करण्याच्या हेतूनं एक कवडीसुद्धां मिळवणार नाहीं. पुढं मागं तर त्यांचा असा विचार आहे कीं, हीं औषधं लोकांना फुकट द्यायचीं. थोडा राजाश्रय मिळाला तर ते पाहाताहेत, म्हणजे मग अगदीं फुकट औषध देण्याला मुळींसुद्धां त्यांच्याकडून कमीपणा व्हावयाचा नाहीं. बरं, आपण काय म्हणणार होतां तें राह्यलंच. तें सांगा कायतें. आपल्याला वार्धक्यकुठार पाहिजे, कीं तारुण्यशतपुटी पाहिजे, कीं..."

"अहो महाराज, या दोनही औषधांच्या कुप्या मी आपल्याकडून नेल्या, पण उपयोग कांहींसुद्धां झाला नाहीं, म्हणून प्रत्यक्ष आलों. नर्वीन कुटुंब केलं आहे, तें माहेरीं आलं होतं, तेव्हां त्याला घेऊन जाण्यासाठीं मला यायचंच होतं, म्हटलं एकदां शास्त्रीबोआंना भेटून प्रत्यक्ष प्रकृति दाखवून कांहीं तसंच औषध मिळालं तर घेऊन जावं. आपल्या या औषधांनीं कांहीं म्हटल्या कांहींसुद्धां गुण आला नाहीं...."

"काय म्हणतां !" चिंदुमाधव पांडे अगदीं आश्चर्यपूर्ण दृष्टीनें त्या वृद्ध गृहस्थाकडे पाहून म्हणतात, "असं होईल कसं ! वार्धक्यकुठार तुम्हीं घेतला म्हणतां ! बरं किती मासं घेतला ! अहो, या वार्धक्यकुठाराची महती तुम्हांला ठाऊक नाहीं. यानं गुण येत नाहीं म्हणणं म्हणजे परशुरामाच्या परशूनं क्षत्रियांचं निर्दलन झालं नाहीं, असं म्हटल्यासारखंच आहे. कारण ही मात्रा कैलासीं प्रत्यक्ष श्रीशंकरांनीं तयार करून स्वतः तिचा अनुभव घेऊन मग आपल्या भक्तांना दिली. अशी तशी नव्हे बरं. शंकरांनीं आपलं वार्धक्य घालवलं कशानं ? या वार्धक्यकुठारानं नव्हे तर ! तेव्हां तुम्हीं ती मात्रा घेण्यांत कांहीं तरी कमजास्त झालं असेल, दुसरं काय !

"शंकराला काय गुण आला असेल तो खरा, पण मला कांहींसुद्धां गुण आला नाहीं हो ! " काकासाहेब अगदीं दीनपणें म्हणतात, "आणखी या तारुण्यशतपुटीचं त्याचप्रमाणं -या औषधाबरोबर अनुपानाचा आणखी गुणवर्णनाचा कागद दिला आहे तशी सगळी कृति केली, पण कांहीं नाहीं. आतां काय करणार ! "

" हें रडगाणंच का गायला तुह्मी आलां आहां माझ्याकडे ! तें एकायला कांहीं बोआ मला वेळ नाहीं. ह्मणे, या तारुण्यशतपुटीचा कांहीं गुण नाहीं. या तारुण्यशतपुटीनं जर तुम्हांला गुण नाहीं, तर सगळा हिमालय त्याच्यावरल्या वनस्पतींसकट उगाळून पाजला, तरीसुद्धां तुह्मांला गुण यायचा नाहीं, या शतपुटीचा जर गुण नाहीं, तर ती शतपुटी आम्हीं तयार केली कशाला ? अहो, दर पुटास एक वर्षाचं वार्धक्य कमी होत जाणार. अशा हिशेबानं शतपुटं दिलीं आहेत. जो अगदीं शंभर वर्षांचा म्हातारा तो अगदीं नुकताच जन्माला आला आहे असा होणारना ? त्याचीं शंभर वर्षं शंभर पुटांना वजा घातलीं ह्मणजे ? तुम्हाला त्या मानानं काय वाटावी हुषारी ? आणखी तुह्मी म्हणतां कांहीं होत नाहीं म्हणून ? शाबास. मग शास्त्रीबोआंना आतां दवाखाना बंदच करायला सांगावं. बरं दोन औषधांची ही स्थिति झाली; आणखी केशविरंजिनीचं काय म्हणतां ? का तिचंही तसंच कांहीं तरी आहे ? बोला, म्हणजे एक तरी आह्मांला समजून येईल कीं, आमच्या औषधांपासून कांहीं उपयोग नाहीं. मग आपला दवाखाना बंद करून जाऊं. काय बोलतां ! अशीं कचीं चिचीं औषधं असतीं तर दोन दिवस तरी कोणी या मुंबईत आम्हांला उभं राहूं दिलं असत काय ? आणखी इतक्या मागण्या येत्या काय ? आज एक महिना झाला नाहीं दवाखाना काढून, तों रोजची विक्री शंभर दीडशांवर आलीना ? आपले पैसे अनाठायीं टाकायला लोक काय मूर्ख आहेत ? त्यांना कांहीं समजत नाहीं ? याच वार्धक्यकुठाराचा उत्तम अनुभव घेऊन कित्येकांनीं आमच्याकडे सर्टिफिकेटं पाठविलीं आहेत, तीं तुह्मांला दाखवलीं तर अगदीं डोळे दिपून जातीलना ? आतां आणखी पंधरा वीस दिवसांत सर्टिफिकिटांचा भारा छापून काढतों बघा, ह्मणजे काय लोकांत चळवळ उडते ती पाहा. जा, जा, आतां, तुह्मांला आमच्या औषधाची किंमत ठाऊक नाहीं. उगीच काय आमचा वेळ घेतां ! पुनः पाहिजे तर घेऊन चला त्या चारही बाटल्या. ताजीं औषधं भरलीं आहेत. देऊं ? चोख आठ रुपये काढा. आणखी सकाळीं वार्धक्यकुठार घेऊन केशविरंजनी लावा. नंतर थोड्या वेळानें या दंतद्वात्रिंशतिदृढीकरणचूर्णानें दंतधावन करा, सगळे गेलेले दांत लहान मुलाचे एकदां दांत जाऊन पुनः जसे येतात, तसे चळकट दांत तुमचे होतात कीं नाहीं पाहा ! मधल्या वेळीं पुष्टिवर्धनाश्रक घ्या. आणखी सायंकाळीं तारुण्यशतपुटी एक गुंज मात्रेनं घेऊन सुंदर आटीव दुधाचा मारा करा. ऐशी प्रकृति होऊन जाईल कीं बा ! आपल्या दक्षिणेंतल्या संगमपूरकरांनीं आजपर्यंत काय केलं ? श्रीमंत वृद्धांना आमच्या या औषधांखेरीज दुसरं त्राण काय महाराज ! अरे खंड्या, चल बांध या चार बाटल्या, आणखी आण इकडे. काकासाहेब आपल्याला अगदीं काळजी नको. आणखी त्यांतून तुम्हाला सांगतों, हीं जीं औषधं आह्मी आपल्या बाटल्यांतून तुम्हांला देणार, तीं एका सप्तकापुरतीं असतात. आणखी आपल्या सारख्यांना चार, निदान तीन सप्तकं तरी या औषधांचा मारा पाहिजे. अरे खंड्या, गाढवा, एकेक बाटली देऊन काय उपयोग आहे ? आणखी दोन दोन बाटल्या दे. ह्मणजे पुनः पुनः आपल्याकडे औषधासाठीं

मागण्या करण्याची त्यांना जरूरीच नाहीं. पण काकासाहेब, सर्टिफिकिट पाहिजे बरं का, आपल्याला कांहीं फायदा झाल्याबरोबर! खंड्या, नीट बांधलें का? चार त्रिकें बारा बाटल्या बांधल्यास का? छान प्यॅकिंग कर. काकासाहेबांना त्या लांब बाहेरगांवीं गंगापुराला न्यायच्या आहेत. वाटेनं फुटतां बिटतां उपयोगी नाहीं. बारा दुणे चोवीस रुपये झाले, काकासाहेब! आह्मी इतका माल कोणीं नेला, तर कमिशन देतोंच; पण आपल्यासारख्या श्रीमंतांना कमिशन देतों ह्मणणें ह्मणजे अपमान करणं आहे. चोवीस रुपये झाले. ही त्याबद्दल पावती. खंड्या, खंड्या आटप. त्या बाटल्या खालीं विक्टोरिआंत ठेव नेऊन. हा अगदीं आळशी बोआ! आणखी कांहीं औषधं पाहिजेत काय?"

काकासाहेबांच्यानें एक अक्षरसुद्धां बोलवलें नाहीं. ते रुपये काढण्यासाठीं खिसा चापसूं लागले. इतक्यांत त्यांचा कारकून पुढें येऊन म्हणतो, "काकासाहेब, हें आहे काय हें? आपण यांच्या औषधांचा गुण नाहीं म्हणून नकार करण्याकरितां आलों आणखी तुह्मी बारा बाटल्या घेऊन जाणार कीं काय, वा!" इतकें बोलून तो अंमळ पुढें झाला. बिंदुमाधव पांड्याकडे त्यानें पाहिलें आणि हा माणूस आपण कोठें तरी पाहिला असावा, अशी शंका त्यास आली. परंतु खात्री पटेना. इतक्यांत बिंदुमाधव काकासाहेबांस ह्मणतो, "पाहिलं, काकासाहेब, हीं आपल्या पदरचीं माणसं. यांना आपण नेहमीं दुखण्यांत असावं, ह्मातारपणाचा अशक्तपणा आपल्या अंगांतून जाऊं नये, ही यांची नेहमींची इच्छा. आपण जर तरुण झालां, आणखी यांचीं सगळीं कामं पाहूं लागलां तर यांची चलती कशी चालणार? आपण यांचं काय ऐकतां? वाटलं तर निम्मे रुपये देऊं नका आज. चला, बाराच घ्या. आपल्याला जर पहिल्या सप्तकानंच गुण आला, तर आमचे रुपये पाठवून द्या. नाहीं तर आह्मी मुळींच मागणार नाहीं. आणखी काय पाहिजे? इतकंच नाहीं पण मुळींच रुपये देऊं नका. पण गुण आला तर मात्र रुपये अठ्ठेचाळीस घेईन. या कारकुनापुढें तर आपल्या सारख्यांचं सगळं फसतं. खंड्या, लेका, तोंडाकडे काय पाहात उभा राहिलास? जा खालीं यांच्या गाडींत नेऊन ठेव तें पार्सल."

इतकें भाषण झाल्यावर मग काय पाहिजे! "तुमचे रुपये ठेवून घेऊन आह्माला काय करायचं आहे? कोणीकडून तरी गुण आला ह्मणजे झालं. पैशाकडे पाहाणारा मी माणूस नाहीं. आतां तुह्मी म्हणतां, तर रुपये देतों. आणखी औषध नेतों...."

परंतु त्यांच्या त्या कारकुनानें त्यांस मध्येंच हटकून म्हटलें, "काय काकासाहेब हें? माझ्यासारख्या कारकुनानें आपल्याला कांहीं सांगायचं म्हणजे लहान तोंडीं मोठा घास असं होतं. पण मला आपले असे पैसे गेलेले पाहावत नाहींत, त्याला काय करूं?"

परंतु काकासाहेबांनीं त्याच्याकडे मुळींच लक्ष्य दिलं नाहीं. "तूं वेडा आहेस, तुला कांहीं यांत समजत नाहीं. माझ्यासारखा म्हातारा झालास, पोटीं पोर झालं नाहीं, आणखी चवथं लग्न केलंस ह्मणजे मग तुला समजेल."

"बस् बस् बस्. काकासाहेब, किती मार्मिकपणाचं या वेळीं बोललांत। अहो! ज्यांना कधीं त्या गोष्टीचा अनुभव नाहीं त्यांना हें असंच वाटायचं! आणखी

त्यांनीं आपल्यासारख्यांना असेच दोष द्यायचे." बिंदुमाधव रुपये मोजून घेत घेत ह्यः ह्यः ह्यः करून हंसत हंसत म्हणाले.

काकासाहेब व त्यांचा कारकून दोघे तेथून निघून गेले. बिंदुमाधव आपल्याशींच क्षणमात्र विचार करीत बसला. काकासाहेबांचा कारकूनही हा बिंदुमाधव कोण असावा या विचारांत आपल्या यजमानाबरोबर चालला होता.

# प्रकरण ३४ वें.

## काकासाहेब व दादासाहेब.



गंगापुराम दोन तट झाले. गुंडभटजींना दादासाहेबांनीं झाडून टाकल्या दिवसापासून त्यांच्या चित्ताची काय अवस्था झाली होती हें मागें एका प्रकरणांत सांगितलेंच होतें, दादासाहेबांनीं आपली विटंबना कोणत्या प्रकारें केली आणि आपल्याबरोबर आपल्या यजमानांस म्हणजे काकासाहेबांसही किती अपमानकारक भाषणें त्यांनीं केलीं, त्याचें वर्णन गुंडभटजींनीं आपल्या यजमानांस अशा रीतीनें जाऊन सांगितलें कीं, काकासाहेबांसही त्याबद्दल संताप आला. गंगापुरास दादासाहेब येऊन राहिल्या दिवसापासून काकासाहेबांचें एकछत्री राज्य नाहींसें झालें म्हणण्यास हरकत नाहीं. दादासाहेबांनीं आपल्या परीनें नेहमींप्रमाणें दानधर्माचा सपाटा सुरू केला. काकासाहेबच आजपर्यंत काय ते गंगापुरांतले दुढ्ढाचार्य होते. ती स्थिति अर्थातच आतां बदलली. भिक्षुक व शास्त्री मंडळी त्यांचेही घरी बरीच जाऊं लागली. उलट आजपर्यंत काकासाहेबांनीं ज्या प्रकारचीं दानें केलीं नव्हतीं तशीं होऊं लागल्या कारणानें भिक्षुक मंडळीचा ओढा काकासाहेबांकडून उलटून दादासाहेबांकडे जातो असें दिसूं लागलें. काकासाहेब अतिशय अहंमन्य आणि आढ्यतेखोर व दुराग्रही. त्यांस ही स्थिति मुळींसुद्धां सहन होईना. आपल्यापेक्षां मोठ्या मान्यतेचा किंबहुना आपल्या बरोबरीचा गृहस्थ गंगापुरांत आला हेंच त्यांस फार मोठें वैषम्य वाटलें. त्यांनीं आपल्याकडून, दादासाहेबांचा पक्ष फार कमी, ते किती झालें तरी नौकरीवर वाढलेले, आपण पिढीजाद इनामदार व जहागीरदार, आपली व त्यांची बरोबरी होणार कशी? असें ह्मणून अनेकवार आपला मोठेपणा स्थापण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या प्रयत्नास चांगलेसें यश येईना. भटाभिक्षुकांना त्यांचा नेहमींचा कद्रूपणा माहीत, आणि दादासाहेबांनीं आपलें कर्मनिष्ठत्व व दान-

शूरत्व लोकांच्या अनुभवास आणून दे-ण्याचा उपक्रम चालविला होता. मग आणखी काय पाहिजे? काकासाहेब आजपर्यंत कधीं कोणत्या लौकिक कृत्यांत पडले आहेत, किंवा त्यांनीं कोणावर उपकार केले आहेत असें मुळींच नाहीं. खरें जहागिरदारी जी त्यांच्या पूर्वजांनीं मिळविली होती, ती आपल्या यजमानांशीं बेइमानपणा करून त्यांच्या जहागिरी सरकारच्या घशांत घालवून त्यांत आपल्या नांवानें गांव इनाम करून घेऊन आपला नळीराम गार करून घेतला होता. अशा स्थितींत खरोखर अगदीं अंतःकरणापासून त्यांच्या बाजूला असें कोण असणार? गुंडभटजीसारखेच एखादे दुसरे तोंडपुजे भटजी असणार, हें उघडच आहे. तेव्हां काकासाहेबांस दादासाहेबांचें वैषम्य वाटणें हें किती साहजिक आहे, हें वाचकांस सहज समजणार आहे. त्यांत आणखी गुंडभट्टाचार्यांनी आग लावून देण्याचा विडा उचलल्यावर आणखी काय पाहिजे? दादासाहेब, काकासाहेबांबद्दल कधींमुद्रां बोलणार नाहींत असले शब्द बोलल्याचा आरोप त्यांच्यावर करून त्यांनीं काकासाहेबांचें मन अधिकच दूषित करून टाकलें. काकासाहेब अतोनात दुराग्रही व खुनशी होते, हें वर सांगितलेंच आहे. त्यांनीं गुंडाभट्टांच्याजवळ अशी प्रतिज्ञा केली कीं, जर मी खरा ब्रह्मबीजाचा असेन तर या दादासाहेबांस गंगापुरांतून उठवून लावीन आणि पुनः दिगंबरपुरांत थारा मिळणार नाहीं असें करीन. गुंडभट्टाची अशी खात्रीच कीं, काकासाहेब म्हणजे महा दुराग्रही. सत्कार्यांत पडण्याची त्याला कधीं बुद्धि व्हावयाचीच नाहीं, पण दुष्कार्यांत पडण्याला अगदीं एका पायावर तयार! व तसे पडले म्हणजे 'शेंडी तुटो पारंबी तुटो' या न्यायानें स्वारी आपलें म्हणणें खरें करण्यासाठीं झटावयाची. असा प्रकार झाल्यावर मग गुंडभट्टजींच्या आनंदास काय विचारतां? त्यांनीं लागलींच आनंदानें टाळ्या पिटल्या. पुढें कार्य सिद्ध करून घेण्यास उपक्रम कसा करावयाचा असें विचारलें. काकासाहेबांनीं विचार करण्यास एक रात्र घेतली. दुसरे दिवशीं सकाळींच उठल्याबरोबर त्यांनीं गांवांतल्या पांच विद्वान् व पुढारी शास्त्र्यांस कांहीं धर्मकृत्यानिमित्त भोजनास बोलावून भोजनोत्तर त्यांच्याशीं खलबत केलें. प्रथम ती मंडळी नाहीं होय असें कांहीं म्हणत होती, परंतु अमक्या देवळांतला अभिषेक बंद करीन, अमक्या देवळांत तुह्मांला पाय घालूं देणार नाहीं, मी पंच असल्या कारणानें माझ्या स्वाधीनच सर्व गोष्टी आहेत; तुम्हीं उपऱ्या माणसाला हातीं धरून माझ्यासारख्याचा अपमान करतां हें चांगलें नाहीं,नेहमींची गांठ तुमच्या आमच्याशीं आहे, आमच्या घराण्यावर तुमचीं घराणीं अवलंबून आहेत; असें तसें बोलून त्यांनीं त्या मंडळीस आपल्या म्हणण्यास कबूल करून घेतलें. इतकेंच नव्हे, तर त्यांचेकडून बेल उचलवून घेतला आणि नंतर त्यांस आपला बेत काय तो सांगितला. दादासाहेब हे आतां जरी शिंगें मोडून वासरांत शिरूं पहातात, तरी ह्यांचें आजपर्यंतचें वर्तन सुधारकी पंथाचें होतें, आतां हे देवपुजेला लागले आहेत, परंतु यांच्या मुलानें उघडपणें विधवेच्या मुलीशीं लग्न लावलें आहे. हे म्हणतात, त्याचा माझा आतां कांहीं संबंध नाहीं, परंतु विवाह होण्यापूर्वी यांचा मुलगा त्या विधवेच्या घरीं

जात असे, जेवीत असे, ती विधवा पुनरूढ आहे, हें आणखी विशेष. म्हणजे तिनें केलेलें पातक उघड उघड आहे. तिच्या घरीं तिच्या हातचें हा मुलगा जेवी आणि दिगंबरपुरास येऊन पुनः आपल्या बापाच्या पंक्तीस जेवी, तेव्हां हें पातकच झालें, आणि त्या पातकाबद्दल जबरदस्त प्रायश्चित्त घेतल्यावांचून याला पंक्तिपावन मानणें हें अगदीं गैर आहे. तेव्हां श्रीरघुनाथाच्या नाहीं तर दारुणेश्वराच्या देवालयांत शिलकी भिक्षुक मंडळी जमवून याच्यावर ग्रामण्य केलें पाहिजे. दादासाहेबांवर ग्रामण्य केलें पाहिजे असा बूट निघतांच त्या शास्त्री मंडळींनीं त्याला आधार नाहीं, त्याला शास्त्र नाहीं, असें तसें गुळमुळित भाषण सुरू केलें; कारण त्यांजवर ग्रामण्य केलें असतां आपलीच मिळकत बंद होईल असें त्यांस दिसून आलें. परंतु काकासाहेबांनीं जेव्हां असा धाक घातला कीं, श्रीमच्छंकराचार्यांकडून तुम्हांला सगळ्यांनाच वाळींत टाकवीन, ते मी सांगेन तसें ऐकतील, कारण त्यांची जहागीर माझ्या ताब्यांत आहे. शिवाय कांहीं लघुरुद्र, महारुद्र करविण्याचें, कोणा संस्थानिकास गंगापुरांत चातुर्मासांत राहण्यास आणण्याचेंही आमिष त्यांनीं त्या ब्राह्मणांस दाखविलें. स्वतः अतिशय कद्रू व नतद्रष्ट, परंतु अटीला पेटल्या कारणानें जवळचे पैसेही काढून त्यांनीं त्या भिक्षुकांचा हात ओला केला. तेव्हां तें जसें शिजावयास पाहिजे तसें शिजलें. त्या भटांभिक्षुकांनीं बाकीच्या भिक्षुकांस व शास्त्रीमंडळीस मथवून आपल्याकडे ओढण्याचें कबूल केलें आणि त्याप्रमाणें उपक्रम सुरूही झाला. पांचचार दिवसांत आपल्याला पाहिजे तितके व पाहिजे ते भिक्षुक मथले, असें पाहतांच दारुणेश्वराच्या देवालयांत एक गुप्त सभा भरविली आणि तेथें दादासाहेबांवर व त्यांच्या पक्षाच्या कांहीं भिक्षुक व शास्त्रीमंडळीवर ग्रामण्य केलें. त्यांस कोणीं आपल्या घरीं हव्यकव्यास किंवा भोजनास बोलावूं नये, अशी द्वाही मुकाट्यानें फिरली. कोणी त्यांस स्पष्टपणें सांगावयाचें नाहीं, परंतु जेवणाखाणास बोलवावयाचें नाहीं, त्यांनीं बोलाविलें तर यावयाचें नाहीं; असा प्रकार झाला. दादासाहेब व त्यांचेबरोबर राहिलेली मंडळी आपल्याशींच चरफडूं लागली. आमच्यावर ग्रामण्य करण्यास कारण काय, आधार काय, असें ज्यांस त्यांस विचारूं लागली. परंतु सरळ उत्तर देतो कोण ? ब्रिटिश राज्यांत नालस्तीच्या फिर्यादींची एक भीति असल्याकारणानें कोणी त्यांस तुह्मांस वाळींत टाकलें आहे, सबब आह्मी तुमचे घरीं येत नाहीं, असेंसुद्धां स्पष्ट ह्मणेना. जो तो गुपचुप राहून काकासाहेबांच्या मर्जीप्रमाणें करी. इकडे दादासाहेबांच्या बाजूस राहिलेल्या थोड्या भिक्षुकांनाही दे माय धरणी ठाय करून आपल्या बाजूस आणण्याची युक्ति काकासाहेबांच्या वतीच्या भिक्षुकांकडून चालली होतीच व अल्पस्वल्प प्रायश्चित्तानें किंवा केवळ चुकलों एवढेंच म्हणून तुह्मांला घेतों असें त्यांस सांगण्यांत आलें. त्या गांवचींच भिक्षुक मंडळी ती गरीब, एकट्या दादासाहेबांच्या आधारावर किती दिवस बसणार ? शिवाय धर्म बुडाला अशी ओरड काकासाहेबांनीं करून गांवांतील लोकांसही उठविलें होतें. दादासाहेब दिगंबरपुरास असतां तेथील भिक्षुकांनीं त्यास मुलाचे भ्रष्टाकाराबद्दल प्रायश्चित्त घेण्यास सांगितलें. परंतु दादासाहेब अंतः-

करणांतून सुधारक; त्यांचे मनांतून सर्व दिगंबरपुरांत भ्रष्टाकार करून सोडावयाचा. त्यास तेथील भिक्षुक कबूल होईनात. त्यांनीं दादासाहेबांवर मुकाट्यानें ग्रामण्य केलें, तेव्हां ही स्वारी आतां गंगापुरास पळून आली. दिगंबरपुरास कोणी भिक्षुक किंवा गृहस्थ यांचे घरीं आचमनही घेत नाहीं. सोनवलीच्या जहागिरदाराशीं सोयरीक जमवून हा भ्रष्टाकार जुन्या जहागिरदारी घराण्यांनही घुसडून देण्याचा यांनीं प्रयत्न केला होता, परंतु सोनवलीकरांचे डोळे वेळींच उघडून त्यांनीं आयत्या वेळेस तुमच्याशीं आह्मी सोयरीगत करीत नाहीं, असें सांगून पाठविलें. इतका फजितवाडा झाला तेव्हां ही स्वारी तो गांव सोडून गंगापुरांत ढवळाढवळ करण्यास आली आहे, अशीही एक गप्प काकासाहेबांनीं आपल्या हस्तकांच्यामार्फत सगळ्या गांवभर पसरून दिली. मग काय विचारतां? हां हां ह्मणतां बहुतेक गांव दादासाहेबांच्या उलट झाला. दादासाहेबांस मोठी पंचाइतीची वेळ आली. गांव सोडून परत दिगंबरपुरास जावें तर मोठें नामुष्कीचें काम होणार आहे. आणि जें आपल्या विरुद्ध किटाळ रचलें गेलें आहे, त्याला आपलेकडूनच पुरावा दिल्यासारखें होणार आहे; न जावें तर गांवांत रहाणें मोठें कठिण, किंबहुना अशक्य होण्याची पाळी येते कीं काय, असें भय पडूं लागलें. मंडळींच्या ह्मणण्याप्रमाणें प्रायश्चित्त घ्यावें तर आजपर्यंतच्या आपल्या ब्रीदास काळोखी लागणार. जें पाप आपल्या हातून घडलें नाहीं, त्या पापाकरितां एखाद्या पाजी माणसाच्या कवटाळाला भिऊन प्रायश्चित्त घेणें हें भ्याडाचें काम होय. तें आपल्या हातून कधींही होऊं द्यावयाचें नाहीं. होईल तितकें करून असेंच राहून आपल्या प्रतिपक्षाचा पाडाव करण्यास झटावयाचें, हा त्यांनीं त्यांच्या स्वभावास अनुसरून कृतनिश्चय केला.

इकडे काकासाहेबांनीं आपल्याकडून आपला इच्छित हेतु सिद्ध करण्यास जें काय करावयाचें तें एकसारखें चालू ठेविलेंच होतें. दुसऱ्याचा छळ करण्याचें कार्य हातीं घेतलें ह्मणजे काकासाहेबांस असें स्फुरण चढे कीं, जणूं काय तें सिद्ध करण्यावर त्यांचें जीवितसर्वस्व अवलंबून आहे. काकासाहेबांचें जसें या बाबतींत आचरण होतें, तसेंच दादासाहेबांचें आपण ह्मणूं तें खरें करण्यांत होतें, हें वाचकांस आजपर्यंतच्या वर्णनावरून कळलेंच आहे. मध्यंतरीं काकासाहेब आपल्या चतुर्थ पत्नीस आणण्यासाठीं मुंबईमुक्कामीं गेले होते, ते वेळीं त्यांनीं मुंबईस दादासाहेबांच्या चिरंजिवाच्या लग्नाबद्दल वगैरे बरीच माहिती गोळा केली. गांवीं परत आल्यानंतर त्यांत आपल्या पदरच्या बऱ्याचशा गोष्टी वाटतील तशा मिसळून देऊन सगळ्या गांवभर दादासाहेबांची व त्यांच्या चिरंजिवांची वाटेल तितकी नालस्ती केली. ज्या मुलीशीं दादासाहेबांच्या चिरंजिवांनीं विवाह केला त्या मुलीची आई ब्राह्मण जातींतील विधवाही नव्हे. दुसऱ्याच कोणत्या तरी गर्ह्य जातींतील विवाहित स्त्री होती, तेव्हां दादासाहेबांच्या हातून घडलेला भ्रष्टाकार साधारणतः प्रायश्चित्ताहेंही नव्हे. दादासाहेबांनीं प्रायश्चित्त घेतों ह्मटलें तरीं प्रायश्चित्त काय द्यावयाचें, हा गंगापुरांतील ब्रह्मवृंदास व श्रीमत् शंकराचार्यांस मोठा गूढ प्रश्नच येऊन पडणार आहे, असेंही ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें.

या सर्व गोष्टी दादासाहेबांच्या कानांवर

येतच आणि त्यामुळें त्यांचे अंगाचा संताप होऊन काय करूं आणि काय न करूं, असें त्यांस होऊन जाई; परंतु बिचारा करतो काय ? आपण इतक्या कर्मठपणानें वागत असतां व स्वधर्माविषयीं इतकें प्रेम दाखवीत असतां काकासाहेबांसारख्या नीच मनुष्यानें आपल्यास अशा स्थितींत आणून टाकावें, हें त्यांस अतिशय वाईट वाटलें.

# प्रकरण ३५ वें.

## काय म्हणून ?



खोल्या वगैरे घेऊन बिऱ्हाड केल्याचें पत्र पद्माकरपंतांकडून आल्या दिवशीं गणपतरावांनीं त्याच्या घाईबद्दल नाक मुरडलें, हें वाचकांस स्मरत असेलच. परंतु ते नुसतें नाक मुरडूनच राहिले नाहींत. द्वारकाताईच्या प्रकृतीला गणपतरावांच्या गांवची हवा बरीच मानवली होती; यामुळें त्यांस असें वाटत होतें कीं, त्यांनीं एव्हांच येथून जाऊं नये. तेव्हां त्या पत्रामुळें मंडळींनीं पुनः उचल करतांच गणपतरावांनीं त्यांस मोडून काढण्यास सुरुवात केली. कमळेनें लागलीच जाऊन संसार करूं लागावें, हें बरें नव्हे. ती अजून लहान आहे. पद्माकरपंतानें असली घाई करूं नये. इतकी घाई करण्याचें मुळींच कारण नाहीं. त्यानें एक तर अधिक अभ्यास करावा, नाहीं तर चाकरी केली, तरी तुमच्याजवळ रहावें. तुमच्यावर अवलंबून राहण्याची इच्छा नसली, तर तुमच्या स्वाधीन पगार करावा; परंतु निराळें बिऱ्हाड करून रहाण्याची गर्दी करूं नये. हें त्यांचें म्हणणें त्यांनीं वारंवार आपल्या मित्रमंडळींच्या पुढें ठेवलें. इतकेंच नव्हे, तर आपण पद्माकरपंतांस याप्रमाणें लिहितों व त्याची चांगली कानउघाडणी करतों, असेंही त्यांनीं म्हटलें; परंतु द्वारकाताईनीं त्यांचा निषेध केला. परंतु मनांत आलेली गोष्ट कोणाच्या निषेधानें दूर सारण्याची संवय गणपतरावास नव्हती. इतकेंच नव्हे, तर अशा निषेधानें उलट ती निषिद्ध गोष्ट अवश्य करण्याची त्यास उत्कंठा होई ! अर्थातच त्यांनीं आपल्या मनांत जें जें काय होतें, तें तें स्पष्टपणें लिहून पद्माकरपंतास पत्र घातलें. "आपण इतक्या लवकर संसारास प्रारंभ करून तिच्या शिकण्याचा अगदीं निरुपयोग किंबहुना दुरुपयोग करणार. बळवंतरावांनीं व आह्मीं सर्वांनीं इतकी शिकविली, ती केवळ लग्न लागतांच चुलीच्या पूजेस बसण्याकरितां नव्हे. या गोष्टीचा विचार करावा. तुमचंही अजून शिकण्याचं वय गेलं नाहीं. झाल्या परीक्षा एवढ्यांत तुह्मांला किती रुपये दरमहा प्राप्ति करून घेतां येईल याचाही विचार केला तर बरं. शिवाय इथें द्वारकाताईच्या प्रकृतीस पुष्कळ

आराम वाटत आहे. तेव्हां आजच तिला इथून हलविणं–निदान तिच्या जवळून कमळेला हलविणं–अगदीं अनिष्ट होय. तुमचं बिन्हाडाचं अगदीं अडलं आहे असं नाहीं. आपणच इकडे येऊन रहा." अशीं व अशा अर्थाचीं कांहीं कांहीं वाक्य त्या पत्रांत होतीं. वाचकांस ठाऊकच आहे कीं, कमळेचें लग्न इतक्या लवकर व्हावें हें गणपतरावांस मुळींच मान्य नव्हतें. तें लग्न आपल्या मनाविरुद्ध झालें आणि त्यामुळें त्या तीक्ष्णबुद्धीच्या पोरीच्या भावि शिक्षणाचें व आपण तिच्या भावि उन्नतीबद्दल जी महत्त्वाकांक्षा धरली होती, तिचेंही मातेरें होणार हें पाहतांच त्यांस फार वाईट वाटलें. त्या वाईट वाटण्याच्या भरांत आपण काय लिहितों आहों, आणि याचा शक्य परिणाम काय, याचा विचारही त्यास राहिला नाहीं. गणपतरावाची ही तऱ्हा नेहमींचीच होती. तो आपल्या बाल्यापासून–तारुण्यापासून–अशाच तऱ्हेचा गृहस्थ. जो विचार किंवा मनोविकार त्या वेळीं मनांत बलवत्तर असेल, त्याच्या स्वाधीन तो असावयाचा, त्याच्याशिवाय त्यास कांहींही सुचावयाचें नाहीं. त्या विचाराच्या अगर विकाराच्या भरांत जें काय करावेंसें वाटेल तें त्यानें करावयाचें, त्याचे परिणाम कोठवर आणि कसे होतील हा विचार त्या वेळीं त्याच्या मनास शिवावयाचासुद्धां नाहीं. अशाच मनाच्या स्थितींत त्यानें वरील पत्र लिहिलें आणि पाठविलेंही. पाठविल्यानंतर त्यांनीं द्वारकाताईंस आपण असें असें पत्र पाठविल्याबद्दल सांगितलें. द्वारकाताई त्यास सहज हंसत हंसत, "तुम्ही तसं केलं नसतं तर त्यांत नवल!" एवढेंच म्हणाल्या आणि तें प्रकरण तितकेंच राहिलें. द्वारकाताईंनीं जाण्याचा विचार कायम केला व अमुक दिवशीं जावयाचें असें ठरवून दुसरे दिवशीं पद्माकरपंतास तशा मजकुराचें पत्रही ल्याहावें असें ठरविलें.

परंतु आपल्या शक्तीच्या बाहेर अशा किती तरी गोष्टी या जगांत आहेत! आतां अमुक एक गोष्ट करावयाची असें ठरवावें आणि लागलीच असें कांहीं तरी कारण उपस्थित होतें, कीं तो आपला पहिला बेत बदलावा लागतो; केव्हां केव्हां अजीबाद सोडून द्यावा लागतो. द्वारकाताईंच्या बेतासंबंधानें अशीच स्थिति झाली. अमुक दिवशीं अमुक गाडीनें आम्हीं निघून येतों अशा मजकुराचें पत्र लिहिण्याच्या ऐवजीं सध्यां येणें शक्य नाहीं, असें पत्र लिहिण्याचाच प्रसंग आला. द्वारकाताईंस त्याच रात्रीं एकाएकीं सडकून ताप भरला आणि त्यांच्या प्रकृतीला थोडाबहुत गुण पडतोसें वाटूं लागलें होतें, तें दुखणें पुनः उलटतें, असें भय वाटूं लागलें. अर्थातच सध्यां जाणें केवळ अशक्य झालें, आणि आईला अशा स्थितींत टाकून आपण एकटेंच मुंबईस निघून जाणें कमळेस बरें वाटलें नाहीं, हें उघडच आहे. अशी अशी अडचण आल्यामुळें सध्यां येतां येत नाहीं, असें तिलाच पद्माकरपंतास पत्र ल्याहावें लागलें.

गणपतरावाचें पत्र आदले दिवशीं जरी टाकलें गेलें होतें, तरी मुंबईस येणाऱ्या पत्रांची वेळ निघून गेल्यानंतर टाकलें गेल्याकारणानें तेंही दुसरे दिवशीं पत्रें जाण्याच्या वेळेपर्यंत टपालांतच पडून राहिलें होतें. कमळेचें पत्र दुसऱ्या दिवशीं वेळींच पडल्याकारणानें गणपतरावाचें व

तिचें दोनही पत्रें पद्माकरपंताचे हातीं अगदीं एकाच वेळीं गेलीं. मोठें व जाड पत्र कोणाचें वरें असावें, असा प्रश्न त्यानें आपला आपल्यास केला. दुसरें पत्र कोणाचें तें त्यानें तेव्हांच ओळखलें. परंतु तें तावडतोब उघडून वाचण्याची अत्यंत उत्कट इच्छा असतांही त्यानें ती दाबली. त्याचे जवळ त्या वेळीं राजाराम होता. राजाराम सहज त्याला भेटण्यासाठीं ह्मणून आला होता. आपल्या पत्नीचें पत्र फार पवित्र, तें दुसऱ्याच्या दृष्टीस पडूं नये; त्यांत असलेले प्रेमोद्गार दुसऱ्यानें पाहून आपली चेष्टा करूं नये; तें पत्र एकांतींच वाचावयाचें ह्मणून आपली उत्कंठा दूर सारून त्यानें दुसरें पत्र हातीं घेतलें, फोडलें व वाचलें. गणपतरावाचें पत्र आहे असें पहातांच प्रथम त्यास समाधान वाटलें. त्याचा चेहरा उल्हसित झाला. गणपतराव ह्मणजे सुधारकांचा धुरीण आणि फार मोठा गृहस्थ. त्याच्या पत्रांत कांहीं तरी उदात्त उपदेश असावयाचा, असा त्याचा ग्रह, आणि त्या ग्रहानें युक्त अशा मनानेंच त्यानें तें पत्र वाचण्यास प्रारंभ केला. परंतु ओळीपाठीमागून ओळ त्याच्या दृष्टीखालून जात चालली, तसतसें त्याचें चित्त विपण्ण झालें. उल्हसित वृत्ति मावळली. कपाळास आंठ्या पडल्या. चेहऱ्यावर प्रथम तिरस्कार दिसूं लागला. नंतर क्रोध चढला आणि पत्र संपतांच तें पत्र तसेंच खालीं पडलें व तोंडांतून, "Impertinent fool" असा उद्गार बाहेर पडला. राजाराम जवळ होताच. तो पद्माकरपंताच्या या स्थित्यंतराचें सूक्ष्म अवलोकन करीत होता. स्वारींना राग येण्यास कांहीं तरी विलक्षण कारण झालें आहे असें त्यानें ताडलें. परंतु "काय झालें ?" ह्मणून लागलीच विचारण्याइतका तो मूर्ख नव्हता. संतापाचा पहिला कढ जाईपर्यंत जरा थांबावें तेंच बरें असें म्हणून तो स्वस्थ बसला. इतक्यांत पद्माकरपंत स्वतःच त्यास ह्मणतो, "एक एक नवीन नवीनच अनुभव मला येऊं लागले आहेत. हे गृहस्थ इतके पढतमूर्ख असतील अशी कल्पनासुद्धां नव्हती बोआ मला. दुरून डोंगर साजरे एवढीच गोष्ट खरी."

राजारामानें ती संधि साधली, आणि हळूच तें खालीं पडलेलें पत्र उचलून घेऊन तो त्यावरून भराभर आपला डोळा फिरवूं लागला. न जाणों मध्येंच पद्माकरपंताची चित्तवृत्ति बदलून आपल्या हातून ते तें पत्र घेतील व मग त्यांतील मजकूर आपल्याला समजणें कठिण ! भराभरा तो तें पत्र वाचून घेत होता. कांहीं माणसांची अशी तऱ्हा असते कीं, ज्यांत त्यांत त्यांस तोंड घालावयास पाहिजे. ज्याचें त्याचें कांहीं तरी आपणांस कळलें पाहिजे. तें कळण्याकरितां ते काय वाटेल तें करतील. लोकांचीं पत्रें त्यांना नकळत फोडावयाला सांपडलीं तरी फोडतील, आणि उघडकीस आलेंच तर चुकून फोडलें म्हणून निर्लज्जपणानें ह्मणण्याला तयारच ! राजारामपंत हा यांपैकींच असे. त्याला सगळ्यांचीं गुपितें समजून घ्यावयास पाहिजे असत आणि सगळ्यांचे कारभार उरकण्याची खोड असे. पद्माकरपंत आपल्या विचारांत गर्क झाला आहे एवढी संधि साधून त्यानें तें गणपतरावाचें पत्र तर सबंद वाचलेंच. आणि नंतर ह्मणतो, "अहो, या पत्रांतलं धोरण सर्वच कांहीं निराळं दिसतं आहे. यांच्या मनांत तुह्मी नांवाला मात्र लग्न केलं. आतां कमळाबाईंनीं असंच पूर्वीप्रमाणं घरींच रहावं, आणखी तुम्हीं त्यांच्याजवळ

घरजांवई म्हणून राहून दिवस काढावे ! या आपल्या सुधारकांची मौज तर हीच. यांच्या पोरी मोठाल्या झालेल्या. अविवाहित तर ठेवण्याची इच्छा नसते, किंवा धैर्य नसतं ह्मणा. म्हणून कोणी तरी असा गांठतात, त्याच्याशीं एकदां लग्न लावून देतात, आणखी तो आपला स्वतंत्र संसार करून राहूं ह्मणूं लागला, तर त्याला आडकाठी आणतात. बरं, मुलींना तितकं शहाणपण असावं कीं नाहीं, कीं आपण ज्याच्याशीं लग्न केलं त्याच्या मर्जीप्रमाणं त्याच्याजवळ जाऊन आपला संसार करावा म्हणून; पण त्यांना लहानपणापासून ओढच निराळी लागलेली. त्यांना कामाची संवय नाहीं, काम करण्याची इच्छाही नाहीं. मीं ह्मटलं कीं, तुमच्या बाबतींत तरी तशी स्थिति व्हायची नाहीं, पण इथें देखील हीच का रड ? तरी मीं तुम्हांला बजाविलं होतं कीं, तुम्हांला हें सगळं प्रकरण जितकं गोजिरवाणं दिसतं आहे, तितकं तें गोजिरवाणं नाहीं. प्रभाकरपंत कायसे काल तिकडे गेलेच आहेत—मग कशाला गेले आहेत कोण जाणे ! काय चमत्कारिक पत्र लिहिलं आहे बोआ हें !..."

या त्याच्या भाषणापैकीं प्रत्येक शब्द जणूं काय पद्माकरपंतांच्या हृदयावर आघाताप्रमाणें पडत होता. त्या शेवटच्या बोलण्यानें तर तो अति त्रासल्याप्रमाणें करून राजारामास ह्मणतो, "तुह्मी इथून या वेळीं जा कसे ? या वेळीं माझ्याजवळ दुसरं कोणीही नको असं वाटतं आहे. जा, कृपा करून जा. मला चार घटका अगदीं एकट्याला बसूं द्या. मला आतां एकांत पाहिजे आहे. मी इतक्या स्पष्टपणानं असं ह्मणतों आहें याबद्दल क्षमा करा. पण मला जरा एकटं बसूं द्या."

राजारामाच्या मनांत तेथून जावयाचें नव्हतें. दुसरें पत्र जें पद्माकरपंतानें अजून उघडलें नव्हतें, तें कोणाचें आणि काय हें समजण्याची त्याला उत्कट इच्छा होती, आणि पद्माकरपंतास तर हा माणूस जाईल केव्हां आणि मी आपलें तें पत्र वाचीन केव्हां असें झालें होतें. गणपतरावांचें पत्र वाचल्याबरोबर तर त्यास आपली बायको काय म्हणते हें जाणण्याची फारच उत्कट इच्छा झाली. आणि शेवटीं जेव्हां राजाराम तें कर्णकटु शब्द उच्चारून त्याच्या मनास त्रास देऊं लागला, तेव्हां अर्थातच आतां आपण यास जा म्हणून स्पष्ट सांगावें असें त्यास वाटलें, त्याप्रमाणें त्यानें त्यास सांगितलेंही. आणि तो धूर्त राजाराम 'आतां लोचटपणानं असंच इथें राहण्यापेक्षां उठून जावं, पुनः लवकरच यावं ह्मणजे सर्व कांहीं आपोआप समजेल' असा मनांत विचार करून तेथून उठला व जातां जातां ह्मणतोः

"लग्न करून सवरून एकांतच तुमच्या नशिबीं आहे, तेव्हां एकांताची संवय तुम्हांला करून घेतलीच पाहिजे आहे. बायकोसाठीं घरदार, आईबाप सोडून बसलां, तिकडून एकांत झाला. आतां सासुरवाडीची मंडळी बायकोला पाठवीनात तेव्हां तिकडूनही एकांतच झाला. आतां आणखीहो किती एकांत पाहिजे ? मी जातों बापडा. नाहीं कुठें म्हणतों ? शिवाय मलाही आपलीं कामं आहेतच."

असें म्हणून तो तेथून चालता झाला. पद्माकरानें त्याचे ते शब्द ऐकले नाहींत असें नाहीं, ऐकले. परंतु त्यांतील छद्म त्याच्या मनांत बरोबर तऱ्हेनें उतरलें नाहीं. निदान त्या वेळीं तें उतरावें अशा तऱ्हेची त्याची मानसिक स्थिति नव्हती. काय वाटेल तें बोलून पण तो जावा

हीच आतां त्याला उत्कट इच्छा होती. आणि त्याप्रमाणें तो तेथून उठून गेल्याबरोबर त्यानें आपल्या पत्नीचें पत्र फोडून पाहिलें. आपण लवकरच येऊं अशा अर्थाचा मजकूर आंत असावा असें त्यास वाटत होतें, परंतु तसा मजकूर नाहीं. आईची प्रकृति पुनः बिघडली, त्यामुळें आपल्या लिहिण्याप्रमाणें त्वरित निघून येतां येत नाहीं असेंच लिहिलें होतें. त्याबद्दल दिलगिरी कोठें दर्शविली नव्हती. पत्र कसें तरी लिहिलें होतें, असें त्यास वाटलें. त्याचें मन फारच उद्विग्न झालें. एकंदरींत आपल्याला जितकी आपल्या बायकोस भेटण्याची उत्कंठा आहे, तितकी तिला नाहीं असें त्यास वाटलें. इतकेंच नव्हे तर एकाच वेळीं आलेल्या दोन पत्रांतील मजकूर तत्त्वतः एकाच अर्थाचें असावें. गणपतरावानें आपल्यास आपल्या बायकोला न पाठविण्याबद्दलची इच्छा दर्शवावी आणि त्या पत्रांत द्वारकाबाईची प्रकृति पुष्कळ सुधारली आहे असें लिहावें; परंतु आपल्या बायकोच्या पत्रांत मात्र त्या एकाएकीं आजारी पडल्याचें वर्तमान लिहिलेलें असावें हें त्यास मोठें संशययुक्त वाटलें. कमळेला मीं एव्हांशीं येथें आणण्याची गर्दी करूं नये. गर्दी करणें रास्त नाहीं असें दाखविण्यास जर कोणतें उत्कृष्ट कारण असेल तर तें तिच्या आईचा जास्त झालेला आजारीपणा हेंच होय. परंतु त्या कारणाचें नांवही गणपतरावांच्या पत्रांत नसून त्या पत्राबरोबरच आलेल्या आपल्या पत्नीच्या पत्रांत मात्र असावें याचें त्यास फार आश्चर्य वाटलें व असाही संशय आला कीं, आपल्या पत्राप्रमाणें लवकर निघून येण्याचें मनांत नसल्यामुळें आईच्या आजारीपणाचें हें नुसतें ढोंग असावें. परंतु 'असें ढोंग करणें कमळेच्या हातून होईल काय? ती अशा तऱ्हेनें खोटेंच लिहून आपल्यास फसवील काय?' हा प्रश्न त्यानें आपल्या मनास वारंवार विचारला. त्याचें उत्तर त्यास नकारार्थींच आलें.

परंतु तेवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं, इतकेंच नव्हे तर बळवंतराव व त्यांची पत्नी यांनीं आपल्याला खरोखरीच फुसलावून गोत्यांत घालण्याच्या इराद्यानेंच आपल्याशीं इतके दिवस अगदीं गोड असें वर्तन ठेविलें नाहींना? कसें तरी करून माझ्याशीं आपल्या या पोरीचें एकदां लग्न लावून द्यावें या हेतूनेंच त्यांनीं आजपर्यंत मला फसविलें नाहींना? थोरा मोठ्या कुटुंबांतला मी, त्या मला जांवई केल्यानंतर अर्थातच मुलीला श्रीमंती आली असें वाटून त्यांनीं हा सर्व व्यूह रचला असेल काय? 'आपल्याला पगार तो काय मिळणार आणि तेवढ्यावर संसार तो काय थाटणार' अशा अर्थाचें एक वाक्य गणपतरावांच्या पत्रांत होतें. त्या वाक्यावरून त्यानें असा अर्थ केला कीं, दहावीस रुपड्या मिळवून तेवढ्यावर स्वतंत्रपणें संसार करण्याला आमची मुलगी तयार नाहीं, असाच अर्थ गणपतरावांनीं ध्यानांत केला असावा, नाहीं तर हें अशा अर्थाचें वाक्य लिहिण्याचा हेतु काय? जों जों गणपतरावांच्या पत्राबद्दल स्वारी अशा तऱ्हेनें विचार करूं लागली तों तों त्यांतील प्रत्येक शब्द कांहींना कांहीं तरी विशेष अर्थानेंच त्यांनीं तो लिहिला आहे आणि आपल्या बायकोस स्पष्टपणें तुमच्या पत्राप्रमाणें मी येत नाहीं असें लिहिण्याचें धैर्य होईना, ह्मणूनच तिनें आपल्या आईच्या आजारीपणाबद्दल कांहीं तरी सबब लिहून टाळाटाळी केली आहे असें त्यास वाटूं लागलें.

मन एकदां संशयित झालें म्हणजे त्याला वाटेल तेथें संशय घेण्यास जागा मिळते, तीच स्थिति प्रस्तुत प्रसंगीं पद्माकराच्या मनाची झाली. वांकड्या आरशांत प्रतिबिंबेंही वांकडींच. त्याचें मन आधींच कलुषित झालेलें; त्यांत तो त्या दोन पत्रांचा जों जों विचार करूं लागला तों तों त्यास अधिक अधिकच संशय येऊं लागले. आणि जे संशय आले होते ते दृढ दृढ विचारास दृढ होत चालले. गणपतरावाच्या मनांत असणें शक्यही नाहीं असले अर्थ त्याच्या पत्रापासून पद्माकर काढूं लागला आणि एकंदरींत त्यानें आपल्या मनाशीं असें पक्कें ठरविलें कीं, ज्या विलक्षण सुखाच्या आशेनें आपण या भानगडींत पडलों, तें विलक्षण सुख आतां आपणास मिळत नाहीं. मनुष्यानें असा एखादा निश्चय केला म्हणजे तोच निश्चय त्याच्या मनांत कायम होत जातो.

पद्माकरानें आपल्यास त्या वेळीं तशा त्या विचारांनीं अतिशय असुखी करून घेतलें. न जाणों कमळेनें लिहिलेलें पत्र आणि गणपतरावांनीं लिहिलेलें पत्र या दोहोंत वेळाच्या संबंधानें अंतर असेल किंवा आपल्या मनाप्रमाणें लिहिण्याच्या भरांत द्वारकाताईच्या प्रकृतीबद्दल लिहिण्याचें गणपतराव विसरला असेल, द्वारकाताईची प्रकृति बरी असतां कदाचित् एकाएकीं बिघडली असेल आणि त्यामुळें कमळेनें घाईघाईनें हें पत्र लिहिलें असेल, अशी त्याच्या मनास शंका सुद्धां आली नाहीं. "अमुक दिवशीं निघण्याचा आमचा बेत कायम झाला होता, परंतु आई एकाएकीं आजारी पडल्याकारणानें नाइलाज झाला" असें वाक्य कमळेच्या पत्रांत होतें, परंतु तें त्याला दिसलें नाहीं, किंवा दिसूनही कांहीं तरी तिनें खोटेंच लिहिलें आहे असेंच त्यास वाटलें. कसेंही असो, परंतु त्यानें आपणास वर सांगितल्याप्रमाणें दुःखमय विचारांनीं व संशयांनीं दुःखी करून घेतलें एवढी गोष्ट खरी.

# प्रकरण ३६ वें.

## गुप्तसभा.




केची भरभराट होते असें वाटण्याजोग्या गोष्टी होऊं लागल्या. एका दैनंदिन पत्रांत ब्यांकेसंबंधाचे बारीक बारीक पारिग्राफ यावयाला लागले. मध्येंच एखाद्या पारिग्राफांत या ब्यांकेची स्तुति येऊन असेंही ध्वनित केलें गेलें कीं, "या ब्यांकेचा शेअर रुपये २५ चा असून आजमितीस शेअरची किंमत जवळजवळ दीडशें रुपये होण्याची पाळी आली आहे. ब्यांकेजवळ आज शेअर शिल्लक नाहीं. दीडशें रुपये कोणीं दिले, तरी शेअर देण्यास नाहीं. पहिल्या शेअर—होल्डरपासून शेअर परत मागवून मिळाल्यास

पहा, अशी फार लोकांची निकड लागल्यामुळें ज्या शेअर—होल्डरांनीं प्रथम २५ रुपयांस शेअर घेतले, त्यांजवळच खुद्द ब्यांक आज दीडशें रुपयांस तो शेअर मागत आहे; कारण तितक्या दराच्या मागण्या रोज कमींत कमी शें दीडशें तरी परत कराव्या लागत आहेत ! तेव्हां ब्यांकेचें भांडवल वाढवावें किंवा दुसरा कांहीं उपाय करावा याबद्दल यथायोग्य विचार करण्याकरितां लंडनहून मूळ ब्यांकेचे व्हाइस् प्रेसिडेंट **सर एम्प्टिहेड् व्हाइसफुल** हे मुद्दाम पुढल्या बोटीनें येथें येणार आहेत. **सर एम्प्टिहेड** हे मोठे नामांकित फडणीस्–फायूनॉन्सिअर–असल्याकारणानें, ते आल्याबरोबर ब्यांकेची अधिक सरशी होऊन, सरकारच्या मदतीनें चाललेल्या ब्यांक् ऑफ् बॉंबेची अगदीं फजिती उडण्याचा संभव आहे. या ब्यांकेंत मुंबईतील थोरनावे लोक होतां होईतों न घेतां गरीबगुरीब लोकांमध्यें व्यवहार करावा व सर्व व्यवस्था त्यांच्या हितास जागरूक राहून होईल अशी तजवीज करावी असाच डायरेक्टरांचा हेतु आहे. सारांश, या ब्यांकेची अशी महत्त्वाकांक्षा आहे कीं, ही अगदीं सार्थपणें ( People's Bank ) लोकांची ब्यांक व्हावी. अगदीं एखाद्या गरीब हमालानें आपले पैसे आणून ठेवावे आणि एक दिवस पैसे राहिले, तरी त्यास त्या पैशाचें व्याज मिळावें अशी तजवीज केली जाईल. नव्हे, हल्लीं जातेही."

अशा अर्थाचे पारिग्राफ आज इकडल्या रकान्यांत, उद्यां तिकडल्या, परवां आणखी एखाद्या पेजावर झळकूं लागले. आणि सहामाही सभा होऊन डिव्हिडंड् डिक्लेअर करण्याची ( नफ्याचा भाग कोणाला किती येणार हें सर्वश्रुत करण्याची ) तारीखही जवळ येत चालली. तेव्हां आणखी एक पारिग्राफ पुढें दिलेल्या आशयाचा पुनः त्याच पत्रांत आलाः

"सचोटीनें, नेकीनें व लोकहिताविषयीं जागृतता ठेवून काम केलें, ह्मणजे कोणत्याही कामांत सिद्धि ठेवलेली. त्याचप्रमाणें आमच्या 'दि बॉम्बे विग् चबल् ब्यांकिंग ब्यूरो' ची स्थिति झालेली आहे. ही पेढी अस्तित्वांत आली, तेव्हां कित्येकांनीं हिच्याबद्दल अनेक प्रकारचे संशयोद्गार काढले. अनेक लबाडीच्या धंद्यांपैकीं हा एक फार मोठ्या प्रमाणावर अनेक लोकांच्या बारीकसारीक शिलका गिळंकृत करण्याचा धंदा दिसतो आहे, अशाही प्रकारचे उद्गार ब्यांकेच्या डायरेक्टरांच्या कानीं आले; परंतु डायरेक्टरांनीं किंवा एजंटांनीं धिमेपणानें तें सर्व मुकाट्यानें सहन करून आपली ब्यांक कोण्या तऱ्हेनें कोणत्याही प्रकारची लबाडी किंवा नीच कृत्य न करतां पुढें सरसावेल इकडे लक्ष्य दिलें. जे अशा तऱ्हेचे आपणांस अनिष्ट असे उद्गार काढतील तेच उद्यां आपल्याला आपली एकंदर कर्तबगारी व उपयुक्तता पाहून आपली स्तुति करतील, आपल्या मदतीला येतील, अशी ब्यांकेच्या अधिकाऱ्यांची पुरी खात्री होती आणि त्या त्यांच्या धीरास उत्तम प्रकारचें बक्षिसही मिळालें, हें कळविण्यास आह्मांस मोठा संतोष वाटतो. या सहामाही मीटिंगच्या वेळीं जें कांहीं डिव्हिडेंड लोकांस दिलें जाणार म्हणून आह्मांस कळलें आहे तें पाहून व सहामाहीचा ब्यालन्स शीट ( जमाखर्चाचा व शिलकीचा तक्ता ) आमच्या नजरेस पडला त्यावरून प्रत्येक शेअरहोल्डरास अत्यंत आनंद होईल

याबद्दल शंका नाहीं. ब्यांकेनें गेल्या सहा-माहींत फार घडामोड केली असें नाहीं; फक्त अठ्ठावीस लक्ष ब्यायशीं हजार नऊशें साडेचौऱ्याण्णव रुपये चवदा आणे सात पेंचीच देवघेव झाली. परंतु तेवढ्यांत डिव्हिडेंड पंचेचाळीस पर्सेंट पडणार हें अगदीं उघड झालें आहे. फक्त डायरेक्टरांचें ह्मणणें कीं, या पंचेचाळिसांपैकीं फक्त तीस पर्सेंट द्यावे आणि पंधरा पर्सेंटपैकीं दहा पर्सेंट रिझर्वमध्यें ठेवून पांच पर्सेंट धर्मादाय फंड म्हणून ब्यांकेनें निराळा ठेवावा. ही ब्यांक लोकांची. लोक ह्मणजे थोर थोर पदवींचे व गाड्याघोडीं उडविणारे नव्हेत, तर गरीबगुरीब लोक, त्यांची ब्यांक; त्यांना दुष्काळ, प्लेग वगैरे संकटांच्या वेळीं मदत करणें ब्यांकेचें काम आहे, तेव्हां तशा संकटसमयीं ब्यांकेकडून कांहीं तरी मोठी रक्कम दिली जावी ती या फंडांतून द्यावी या हेतूनें हा फंड ठेवावा. शेअरहोल्डर लोक या गोष्टीस खात्रीनेंच अनुमत देतील यांत शंका नाहीं. कारण पंचवीस रुपये देऊन सहा महिने झाले नाहींत, तों ते पंचवीसचे पंचवीस कायम राहून आपल्या पदरांत साडेसात रुपये पडल्यावर अडीच रुपये परस्पर धर्मादायांत जाण्यास कोणाची हरकत येणार आहे!"

या पारिग्राफानें तर फारच चळवळ उडाली. दि बॉम्बे बिग् बबल ब्यांकिंग ब्यूरोच्या शेअरांसाठीं अगदीं चढाओढ लागली. ज्यांनीं आधीं शेअर्स घेतले होते, त्यांजवळ लोक शेअर्स विकावयाचे आहेत काय ह्मणून विचारूं लागले. ज्यांच्याजवळ शेअर्स होते ते आतां बरे विकतील! ते विकीनात. आणि लोकांच्या गरजेप्रमाणें भांडवल वाढविण्याखेरीज व भांडवल वाढलें म्हणजे अर्थातच कंपनीचा व्यापारही विस्तृत केल्याखेरीज दुसरें गत्यंतर नाहीं. या विचाराकरितांच वर सांगितल्याप्रमाणें सर एम्प्टिहेड्र व्हाइमूफुल् यांस इंग्लंडच्या डायरेक्टरांनीं पाठविलें आहे. व त्याप्रमाणें ते या मेलबोटीस येणार व त्यांचेबरोबर **मि. हार्डप मनीमॉंगर** एक डायरेक्टर हेही येणार असें कळलें होतें. तेव्हां अर्थातच बोट येण्याचे वेळीं ब्यांकिंग ब्यूरोचे येथील अधिकारिद्वय **मि. एम्. नोव्हेअर** व **मि. क्रूव्हन्फूट ऑल्बॉश्** हे व त्यांचेबरोबर मि. सोकरजी बाबुलजी, मि. कर्सेटजी डल्लावाला आणि ब्यांकेची बढती करण्यास कारणीभूत झालेले तीन ब्रोकर (दलाल) **नौलाखचंद फसवचंद, सडकूनदास नागरजी** आणि **रामभाऊ खोटबोले** ही मंडळीही बंदरावर सामोरी गेली होती. रीतीप्रमाणें आदरसत्कार झाल्यानंतर इतर मंडळी आपआपल्या घरोघर गेली. आणि सर एम्प्टिहेड् व्हाइसफुल व मि. हार्डप् मनीमॉंगर हे दोघे **ऑलबॉश्**साहेबांच्या बंगल्यावर उतरण्यास गेले. बोटीवरून उतरल्यावर बंगल्यावर जातांना गाडींतच सहामाही मीटिंग् होण्याच्या पूर्वीच आपली एक गुप्तसभा होऊन काय करावयाचें, कसें करावयाचें याचा खल झाला पाहिजे. करितां गुप्त मीटिंग्साठीं अमुक अमुक मंडळींना बोलाविलें आहे असें ऑल्बॉश्साहेबांनीं त्यांस सांगितलें. सर एम्प्टिहेड् यांनीं नुसती मान हलवून आपली संमति दर्शविली व मि. हार्डप् मनीमॉंगर यांनीं शब्दांनीं, "अगदीं बरोबर! आधीं त्या सर्व गोष्टींचा विचार करून ठेविलेला असला ह्मणजेच ठीक होईल," असें म्हणून आपली पसंती दर्शविली. नोव्हेअरसाहेबांनीं ऑलबॉश्साहेबांच्या ह्मणण्याचा प्रतिध्वनि

काढला. थोड्या वेळानें त्यान्या ऑलवॉश्-साहेबांच्या बंगल्यावर जाऊन पोंचल्या. तेथें गेल्यानंतर उपाहाराची सर्व तजवीज झालीच होती, आणि साहेबांचा, किंवा आपण साहेब असें जगास भासविण्यांत ज्यांस भूषण वाटतें, किंवा ज्यांचें हित होतें, अशा मंडळींचा, एकंदर व्यापारव्यवहाराचा खल भोजनकालीं किंवा उपाहारकालीं व्हावयाचा, त्याप्रमाणें तो सुरू झाला. सर एम्प्टिहेड् यांच्या आगमनाप्रीत्यर्थ आज ऑल्वॉश्साहेब व नोव्हेअरसाहेब दोघांनीं त्या रात्रीं मोठें "डिनर" दिलें. त्यांत खाण्याबरोबर पिण्याचीही तजवीज करून ठेविली असल्याकारणानें व सर एम्प्टिहेड् हे त्या दुसऱ्या भागाचे थोडेसे पक्षपाती असल्याकारणानें थोड्याच वेळांत एकमेकांचें आरोग्य व ब्यांकेची अभिवृद्धि चिंतण्यास सुरुवात झाली. जों जों तें अभिवृद्धिचिंतन अधिक अधिक होत चाललें, तों तों त्या सर्वांचीं मस्तकें आपल्या स्थानांवरून भ्रष्ट होत जाऊन त्यांच्या जिव्हांचेंही बंधन फार शिथिल होऊं लागलें. आणि त्या जिव्हांचे द्वारें आपण आतांपर्यंत काय काय करीत आलों, आणि कसा कसा डाव जमत चालला, याची उच्चारणा होऊं लागली. आपला शेवटला व्यूह साधण्यास अजून आपल्याला काय काय गोष्टींची जरूरी आहे, याहीबद्दल वाच्यता होऊन असें ठरलें कीं, ब्यांकेची जी स्थिति आली ह्मणजे आपला कार्यभाग होणार आहे, ती स्थिति येण्यास आपल्यास एक फर्डानिशी वर्तमानपत्र प्रसिद्ध करूं लागलें पाहिजे आहे. आणि सोंकरजी बाबूलजी, रामभाऊ खोटबोले, नौलाखचंद फसवचंद, अशांसारखे दलालही अधिक ठेविले पाहिजेत. हल्लीं आपल्या ब्यांकेसंबंधानें माहितीचे पारिग्राफ आपण लिहून पाठवितों, ते फक्त एकाच वर्तमानपत्रांत येतात, त्यामुळें जितकी प्रसिद्धि व्हावी तितकी होत नाहीं. ती होण्याला दुसरा मार्ग ह्मणजे हल्लींच्या वर्तमानपत्राला मुबलक कमिशन द्यावयाचें तें आणखी वाढवून शिवाय आपलें एक "ब्यांक्स् सर्क्युलर" नांवाचें पत्र काढावें. त्या पत्रांत आपलें अंग आहे असें तर दिसूं नये. पण तें चालवावें अशा तऱ्हेनें कीं, आपल्या ब्यांकेचें नांव लोकांच्यापुढें कायमपणें रहावें. मधून मधून या आपल्या हस्तपत्रकांतून आपली स्तुति येण्याची तजवीज सुरू राहीलच. तेव्हां त्यांतला उतारा घेऊन आपलें सर्क्युलर गांवांत फुकट वांटावें. असें केल्याखेरीज दुसरा उपायच नाहीं. इतका एकंदर खटाटोप केल्यासारखें चांगलें पचाड घेऊन तरी बसूं, मग काय होईल तें होईल. अशा अर्थाचें एकंदर भाषण चाललें होतें. असा भाषणसमारंभ चालला असतां मि. नोव्हेअर अगदीं स्थानभ्रष्ट झाले आणि त्यांचें मस्तकही स्थानभ्रष्ट होऊन ते पडल्या जागींच झोंपीं गेले. ऑल्वाश रंगांत आले होते, परंतु त्यांचा अभ्यास दांडगा असल्याकारणानें ते संडकून बोलतच होते. मि. हार्डप् त्यांचेपासून एकंदर आजपर्यंत खरोखर रकमा झाल्या किती आणि कर्जाऊ दिल्या गेल्या किती—किंबहुना आजमितीस आपलें चंबुगवाळें जर गुंडाळलें, तर आपल्या प्रत्येकाच्या हातास काय लागेल याचीही पृच्छा त्यांनीं चालविली होती. सर एम्प्टिहेडूही अगदीं पेंगून आतां टेबलाखालीं जातात अशी भीति पडण्याला कारण होत होतें. इतक्यांत एक चपराशी एका छोट्या

तबकावर ठेवलेली नांवाची कार्ड घेऊन, आंत आला. त्यानें तें तबक ऑलबॉश-साहेबांच्या पुढें केलें. त्यांनीं तीं घेऊन पाहिलीं आणि एकदम ते उद्गारले, "ड्यम् धिस् फेलो! याचा त्रास कांहीं कधीं चुकायचा नाहीं. मला वाटतं याला एकदां द्यावी थोडी बहुत चाकरी, ह्मणजे आमच्या पाठीमागली भगभग तरी नाहींशी होईल." "बॉय्, बोलाव ये साबूक्," असें ह्मणून कोण बाहेर आलें आहे त्यास बोलावून आणण्यास शिपायास पाठविलें. शिपाई आला तो दोन असामींस घेऊन आला. एक इसम पुढें आला, त्यानें मोठ्या ऐटीनें "गुड् इव्हिनिंग मि. ऑल्बॉश्, माझे हे दुसरे स्नेही आहेत, यांची व आपली ओळख करून देतों. हे आपल्या ब्यांकेचे एक शेअर-होल्डर आहेत. यांचं नांव मि॰ राजाराम आगलावे. यांचं आपल्याकडे कांहीं काम आहे. तें काम फार जरूरीचं आहे, सबब ते आले आहेत. तर कसंही करून त्यांस अर्धी घटका वेळ द्यावा. त्यापासून तुमचं हित होणार आहे. मी आज इतके दिवस येतों आहें. अनेक प्रकारांनीं तुम्हांला मदत करण्याचं कबूल करतों, तरी तुम्ही मला जवळ उभं करीत नाहीं. तरी माझी व आपली ओळख आहे ह्मणून मी यांना तुमच्याकडे घेऊन आलों. यांना कशी माहिती कळली, आणखी काय कळली, तें मला कांहीं ठाऊक नाहीं; पण यांचं काय म्हणणं आहे तें ऐकून घेऊन नीट विचार कराल, तर आपल्या ब्यांकेचा त्यांत मोठा फायदा होणार आहे. एवढंच माझं सांगणं आहे. नाहीं तर भलतंच कांहीं तरी होण्याचाही पण संभव आहे. तेव्हां वेळींच आपल्याला सावध करण्याच्या हेतूनं मी इतक्या चमत्कारिक वेळीं आलों आहें. तुह्मी साहेब, निदान साहेबी थाटानें राहतां–या माझ्या बोलण्यांत काय तें आपण समजालच !–तेव्हां मी हें असं वेडंवांकडं जरा धाकधमकी दाखविल्यासारखं बोलायला आलों म्हणून हांकून चिकून द्याल, किंवा उद्धटपणानं वागाल, तर त्यांत आमचं कांहीं नुकसान नाहीं, पण आपल्या ब्यांकेच्या बढतीला खो येईल किंबहुना पडतीला कारण होईल. हे गृहस्थ याच्या पूर्वींच कांहीं लटपट करणार होते; परंतु मीं त्यांना थांबवून धरून इकडे आणलं. आतां तुह्मी यांना काय तें विचारा. ते सारं सांगतील."

ऑल्बॉश्साहेबांचा पहिला आवेग असा होता कीं, त्या दोघांना बुटाच्या लाथा मारून हांकून द्यावें. परंतु थोडीशी विचारशक्ति उरली होती, तिचा उपयोग करून त्यांनीं दोघांसही दोन खुर्च्यांवर बसण्याविषयीं डाव्या हाताच्या तर्जनीनें खूण केली व मोठ्यानें म्हटलें, "काय तुह्मी आमचे ब्यांकेसंबंधानं बोलायला आलां आहां ! काय बोलणार ? बोला लवकर."

राजाराम आगलावे मधेंच ह्मणतात, "आमचं दुसरं कांहीं म्हणणं नाहीं, फक्त एवढंच सांगायचं आहे कीं, मजजवळ पुष्कळ गोष्टी अशा आहेत कीं, ज्या मी बाहेर काढूं इच्छीत नाहीं. परंतु मी आणखी हा माझा मित्र या दोघांची ब्यांकेंत चांगली सोय करून देववावी. नाहीं तर शेअरहोल्डर या नात्यानें मला पुष्कळ गोष्टी बाहेर काढून परवांच्या सभेपुढें मांडणं भाग पडेल. तें टाळायचं असलं तर आपण आह्मी म्हणतों तशी आमची सोय करा, नाहीं तर मग पुढचं पुढें पाहूं. कां, मी म्हणतों तें पटलं काय ? हा आमचा

स्नेही प्रोफेसर ड्यांडी याच्या अंगीं हुशारी कांहीं लहानसान नाहीं. तुमच्या ब्यांकेच्या धंद्याला जशी पाहिजे तशी आहे, ही गोष्ट लक्ष्यांत घ्या. त्याचप्रमाणं मी कांहीं कमी उपयोगी पडेन, असं नाहीं. आपण आमचा एकदां नुसता अनुभव पहा दुसरं कांहीं नाहीं. आपल्याला खात्रीनं बरं वाटेल. ब्यांकेचं हित होईल. नाहींपेक्षां आह्मांला जगाला स्पष्टपणं असं सांगावं लागेल कीं, या ब्यांकेच्या तर्फी अशा अशा मजेच्या गोष्टी आहेत. आपण डिव्हिडेंड देणार तो कुठला ! आपण खरे कोण, आपला..."

परंतु ऑलूबॉशसाहेब एकदम त्याच्या अंगावर येऊन ह्मणतात: "काय ! तुह्मी आह्मांला रिकाम्या धमक्या दाखवायला आलां काय इथें ! अं: ! तुह्मांला इथल्या-इथें दाखवितों काय चमत्कार आहे तो ! बॉय, कासम,...तुम्हांला वाटलं असेल कीं तुमच्या धमकीनं इथें काम होईल नाहीं ! "

राजाराम आगलावे यत्किंचित् डगमगला नाहीं. तो एकदम ऑलूबॉशसाहेबांस म्हणतो, "साहेब, तुह्मी ज्या प्रकारचे आहां, त्याच प्रकारचा मी आहें. तुम्ही आपल्यास साहेब म्हणवितां, मला परमेश्वरा ! तसला रंग दिला नाहीं, त्याला इलाज नाहीं. पण तुमचं आमचं गोत एक. तुम्ही जितकीं धाडसाचीं कामं कराल त्याच्या बरोबरीनं मी करीन. याचं तुम्हांला प्रत्यंतर पहायचं असलं, तर पहा. कासम आणखी बॉय वगैरे हांका मारून उगीच त्यांत काय तात्पर्य आहे ? मला आणखी आमच्या प्रोफेसर ड्यांडीला आपण जवळ करा, मग पहा आणखी काय काय मौजा होतात त्या ! "

ऑलूबॉशसाहेब किंचित् स्तब्ध बसले होते, इतक्यांत राजाराम जागचा उठून त्यांच्याजवळ गेला आणि हलकेच त्यांच्या कानांत पुटपुटला. त्याबरोबर साहेबांचा चेहरा एकदम चमत्कारिक झाला. अति आश्चर्य वाटलें असेंही नव्हे; अति दुःख झालें, असेंही नव्हे. त्याच्या त्या पुटपुटण्यानें काय विकार एकंदरींत त्यांच्या मनांत जागृत झाले, हें सांगणें मोठें कठिण होतें. ते लागलीच त्या जोडीस म्हणतात, "ठीक आहे, तुम्ही दोघे उद्यां बारापासून चार वाजेपर्यंत केव्हांही ब्यांकेच्या ऑफिसांत या, मग मी तुम्हांला काय काम देतों तें सांगेन. देतों खास त्याबद्दल शंका नको. मात्र......पण तें आपण उद्यांच बोलूं. या वेळीं तुम्ही आतां जा. आणखी कांहीं-सुद्धां बोलूं नका."

प्रोफेसर ड्यांडीच्या मनांत आणखी जरबीचीं बोलणीं बोलावीं, असें होतें; परंतु त्याचा सोबती अधिक विचारी होता. तो त्यास ह्मणाला, "आपण आज जितकी तार ओढली आहे, तितकीच पुरे आहे. इतक्या ताणेनं जर आपल्याला पाहिजे तसा स्वर उद्यां निघत नाहीं असं दिसून आलं, तर मग उद्यां आणखी ओढूं. पण एकदम ओढून इसापनीतींतल्या तिरकमठ्याच्या तात खाणाऱ्या कोल्ह्याच्या गोष्टीसारखं होऊं नये. त्याचा काय नेम आहे ? आपल्याला जी बातमी लागली आहे असं आपण समजतों, तशी ती अगदीं हुबेहुब नसली, किंवा या लुच्चांनीं आपलीच छान फजिती केली, तर मग त्यांत काय राहिलं ? सावकाश बेताबेतानं एकंदर गोष्टी साधाव्या तें चांगलं."

प्रोफेसर ड्यांडीनीं मान डोलविली व ते आपल्या त्या चतुर स्नेह्यास म्हणाले, "राजाभाऊ, तुह्मी ओळख झाली ही

केवढी महत्त्वाची गोष्ट माझ्या आयुष्यांत घडली, असं मला वाटतं आहे! मीं तो दिवस अगदीं मी आपल्या आयुष्यांतला फार मोठा म्हणून टिपून ठेविला आहे. मीं आपल्याकडून आपल्या एकंदर गोष्टी चालविल्याच होत्या. पण माझं सगळं लहान प्रमाणावर आणखी बेतावातानं चाललं होतं तरी, या मुंबई शहरांत कधीं कांहीं मूर्खांची आणि भोळ्या लोकांची मला वाण पडली नाहीं. कोणीना कोणी तरी कसाना कसा माझ्या डेऱ्यांत येऊन मीं त्याच्यापासून आपल्याला पाहिजे तें करून घेतों. इकडे तिकडे हिंडण्याफिरण्याला, चैन करण्याला आपल्याला मुळींच कमतरता पडली नाहीं. पण तुझी शिताफी आगळीकच! ही व्यांक स्थापित झाल्या दिवसापासून आपला हात इथें शिरकावा म्हणून एकसारखा खटाटोप चालविला होता. तो कसा शिरकावा तें कांहीं केल्या समजेना. शेवटीं नाद सोडून यावा व इतर उद्योगांत पूर्वीप्रमाणं आपला तडाखा चालू ठेवावा असा विचार करून स्वस्थ होतों; पण तितक्यांत तुझी गांठ पडली त्यामुळें सर्वच मौज झाली. तुझी फार कमाल, तुझ्यासारखा वस्ताद तूंच, यांत शंका नाहीं. किती खोल शोध करून तूं या लोकांचा बरोबर खित्तं पत्ता काढलास. मीं तुला गुरु केला आहे. तूं जें सांगशील त्याच्या बाहेर कधींसुद्धां जाणार नाहीं. मात्र आतां तुझी आमची दोस्ती कधीं कमी होऊं देऊं नको. माझ्याकडून तुझ्याशीं कधीं लबाडी होणार नाहीं हें पक्कें समज."

इतकें बोलून प्रोफेसर डयांडी आपल्या मित्राच्या तोंडाकडे पूज्यबुद्धीनें पाहूं लागले. त्यांच्या मित्रानेंही त्याजकडे गुरूनें आपल्या सच्छिष्याकडे पहावें तसें मोठ्या प्रेमपूर्वक रीतीनें पाहिलें आणि दोघेही एका व्हिक्टोरियावाल्यास बोलावून व्हिक्टोरियेंत बसून कोटाचे बाजूस निघून गेले.

# प्रकरण ३७ वें.

## अति विचार.



आपल्या सासूची प्रकृति एकाएकीं अधिक बिघडली असें आपल्या पत्नीच्या पत्रावरून कळतांच एक तर पद्माकरानें स्वतः ताबडतोब तिकडे जाण्याचा विचार करावा हें साहजिक होतें; पण तें नवीन लागलेल्या चाकरीमुळें शक्य नसलें, तर निदान आपल्यास वाईट वाटल्याबद्दल व बायकोस, "तूं एव्हांच इकडे येण्याची गर्दी करूं नको," अशा मजकुराचें पत्र लिहिणें अगदीं योग्य व नैसर्गिक होतें. परंतु बायकोनें लिहिलेला मजकूर त्यास खराच वाटला नाहीं. गणपतरावानें आपल्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें सर्वांचा विचार होऊन त्यांनीं इकडे

एव्हांशीं न येण्याचा विचार केला आणि तसें स्पष्ट लिहितां येत नाहीं म्हणून कांहीं तरी सबब लिहून आपली समजूत करण्यासाठीं हें पत्र पाठविलें, अशीच त्याच्या मनाची समजूत झाली. अशी समजूत झाल्यानंतर मग काय विचारतां ! त्यानें आतां आपण पुनः पत्रच ल्याहावयाचें नाहीं आणि कोणत्याही प्रकारें आपली इच्छा काय आहे हें कळूं द्यावयाचें नाहीं असा अगदीं पक्का पक्का निश्चय केला.

असा निश्चय केला, त्यामुळें त्यानें हातानें पत्र लिहिलें नाहीं म्हणून मनानें त्या गोष्टीचा विचारही करावयाचा नाहीं हें थोडेंच शक्य होतें ! मनांत तो एकंदर प्रकार वारंवार उभा राहून त्याचें चित्त अतिशय खिन्न झालें. शेवटीं आपण गोड रूपास, त्याहून गोड स्वरास, सगळ्यांत गोड अशा हावभावांस भुलून जाऊन आपल्या आईबापांस आंचवलों काय ? आपल्या हातून खरोखरीच अविचार झाला असून आपण त्या अविचारास बळी पडलों काय ? अशा शंका त्याच्या मनांत वारंवार येऊं लागल्या. कमलेचें तें मुग्ध व मधुर स्वरूप त्याच्या डोळ्यांसमोर उभें राही, परंतु विवाहाच्या पूर्वी जी पूर्णता, जी सर्वांगसुंदरता त्या स्वरूपाच्या ठिकाणीं त्यास दिसे, ती आज त्यांत त्यास दिसेना. तिचें मन जितकें सुंदर आपणास वाटे, तितकें सुंदर तें नाहीं, तें तितकें निर्मळ नाहीं, आपल्याला तिच्याबद्दल जितकें प्रेम वाटतें, तितकें आपल्याबद्दल तिला वाटत नाहीं, असेंच त्याच्या मनानें घेतलें. आपण तिच्याकरितां आईबापांस व सर्वस्वास सोडून देऊन तिच्याशीं विवाह करून घेण्यास सिद्ध झालों, परंतु तिला आपल्या बापाच्या स्नेह्याचा शब्द मोडवत नाहीं, किंवा मोडावयाची इच्छा नाहीं, त्यांत आणखी कर्मधर्मसंयोगानें असें झालें कीं, प्रभाकर तात्डतोबीनें तिकडे निघून गेला हें त्याच्या कानीं आलें. झालें ! आधींच कलुषित झालेल्या मनाला तेवढें आणखी एक कारण पुरवलें. आपल्याला न बोलावितां प्रभाकराला बोलाविलें,—तें बहुतकरून कमलेनेंच पत्र पाठवून बोलाविलें असलें पाहिजे—असें त्याच्या मनांत आलें आणि त्याच्या मनाची त्या वेळची स्थिति अशी होती, कीं जें मनांत येईल, तें संभवनीय आहे कीं अन्यथा आहे, याचा मुळींच विचार न करतां सत्य म्हणून धरून चालावयाचें. त्याच्या मनानें घेतलें कीं, कमलेनें पत्र लिहूनच त्याला बोलाविलें आणि आपल्याला मुद्दाम बोलाविलें नाहीं. नाहीं तर त्याला एवढ्या तांतडीनें जाण्याचें कारण काय ? असा विचार त्याच्या मनांत येईना कीं, द्वारकाताई पुनः एकाएकीं आजारी पडल्या, तेव्हां त्यास एकदम आपण त्यांच्या समाचाराला जावें असें वाटून तो गेला असावाछे ! तसा सरळ विचार येण्याजोगी त्याच्या मनाची सरळ स्थितिच नव्हती. त्याचें मन एखाद्या वांकड्या आरशाप्रमाणें झालें होतें. जें प्रतिबिंब आंत पहावें तेंही वांकडेंच दिसावयाचें. अर्थातच त्या प्रभाकराच्या सरळ कृत्याचें प्रतिबिंब याच्या मनोरूप वक्रादर्शांत वांकडें दिसलें ! आणि तें पाहिल्यापासून तो पहिल्यापेक्षांही अधिक विषण्ण दिसूं लागला. नवीन चाकरी लागली असल्याकारणानें चाकरीवर वेळेवर जाऊन हजर वगैरे होणें अगदीं जरूर होतें, म्हणून तो ती वेळ साधी. बाकी चाकरी तरी आतां करण्यांत मतलब काय, असेंच त्याचे मनांत येऊं लागलें होतें.

अशा विषण्ण स्थितींत मनुष्य असला, म्हणजे तो कोणत्या कोणत्या विचारांच्या भक्ष्यस्थानीं पडेल, याचा नेम नसतो. त्यास कोणाच्या संगतीसोबतींत जावेंसें वाटत नाहीं. नेहमीं कोठें तरी एकटें बसावें, आपल्याशींच कुढत असावें, कोणाशीं नीट बोलूं नये, नीट उत्तरें देऊं नयेत, सारांश, इतरांपासून जितकें दूर राहण्यास सांपडेल तितकें चांगलें असा आपला त्याचा स्वभाव बनतो. तीच स्थिति पद्माकराची बनूं लागली होती. आपल्या मनाप्रमाणें वागण्याकरितां आईबाप किंवा धनदौलत यांची परवा न करतां त्यानें आपल्या मनास रुचलें तें केलें, यामुळें त्याचे पुष्कळ सहाध्यायी व इतर तरुण मंडळी त्यास पूज्य मानूं लागली होती व त्याचें व आपलें संभाषण व दळणवळण व्हावें अशी इच्छाही त्यांस होती; परंतु याचा स्वभाव वर सांगितल्याप्रमाणें झाला असल्याकारणानें यास त्या कोणाचीही संगति रुचेना. कोणीं आपणास भेटूं नये, आपण कोणास भेटूं नये, ही इच्छा त्याचे मनांत फार बळावत चालली.

अशा स्थितींत एके दिवशीं शाळेंतून आल्यानंतर येतां येतां एका चहाकॉफीच्या दुकानांत चहा घेऊन पद्माकर बाहेर पडत होता. त्याचा चेहेरा अतिशय म्लान झालेला होता. इतक्यांत समोरून एक व्हिक्टोरिया जोरानें येतांना त्यानें पाहिली. तिला वाट देण्यासाठीं तो दूर झाला, तों आंतून व्हिक्टोरियांत बसलेल्या कोणी तरी, 'ओहो! पद्माकरपंत, वः बरी गांठ पडली!' असें म्हटल्याचा त्यास भास झाला व कोण आहे तें तो पहाणार तों ती व्हिक्टोरिया थोड्या अंतरावर थांबून एकदम त्यांतून एक इसम बाहेर पडला आणि पद्माकरपंताच्या जवळ आला व त्याचे पाठीवर हात ठेवून त्यास म्हणतो, "पद्माकरपंत, मी आज तीन चार दिवस तुमची गांठ घेण्यासाठीं हेलपाटे घालतों आहें. निदान तुम्हांस मी आल्याचा निरोप कळावा म्हणून तुमचे बिऱ्हाडीं कुटुंबाचाही शोध केला, परंतु कांहींच पत्ता लागेना. मला वाटलं होतं कीं, तुम्ही एव्हांना बिऱ्हाड करून त्याच्या जुळवाजुळवीच्या धांदलींत असाल, पण पहातों तों तसा कांहींच रंग दिसला नाहीं. मग तुम्हीं जशी नोकरी धरलीत, तशी कुटुंबालाही लागली आहे कीं काय?"

राजारामाचें हें बोलणें पद्माकरपंतांस केवळ विषवत् लागलें हें सांगावयास नकोच. त्याच्या कपाळावर आंठ्या चढल्या, भुवयांचें संकोचन झालें. चर्येवर किंचित् त्रास, राग व खिन्नता या विकारांचें मिश्रण दिसूं लागलें व तो एकदम कठोरपणानें राजारामास म्हणाला, "माझं बिऱ्हाड अजून झालं नाहीं. मी खाणावळींत जेवतों. बिऱ्हाडाच्या जागीं अमुक वेळीं असतोंच असं नाहीं. तुझं काय काम होतं?"

राजाराम त्याच्या त्या कठोरपणाकडे मुळींच लक्ष्य न देतां त्यास म्हणतो, "काय म्हणतां? अजून बिऱ्हाड केलं नाहीं? कुटुंब अजून आलं नाहीं? मोठं आश्चर्य म्हणायचं. माझी समजूत अशी कीं, बिऱ्हाड सर्व थाटलं असलं पाहिजे. मी मनांत म्हणत होतों कधीं तरी तुमच्याकडे जेवायखायला येईन. एकूण अजून धड इकडे ना तिकडे अशाच स्थितींत आहांत?"

पद्माकरपंतास तें त्याचें बोलणें अतिशय लागलें; परंतु रस्त्यांत बोलण्याची ती जागा नव्हती, सबब तो पुढेंच जाऊं

लागला; परंतु राजारामानें त्यास पुनः हटकलें व ह्मटलें, "तें जाऊं द्या, मी ज्या कामाला आलों होतों तें काम तर ऐकून घ्याल ? एक गोष्ट मात्र ध्यानांत ठेवायची कीं, या ठिकाणीं अशा भररस्त्यांत सांगण्याजोगं तें काम नाहीं. ही गाडी आहे, माझ्या बरोबर चला, ह्मणजे आपण कुठें तरी व्हिक्टोरिया गार्डनसारख्या जागीं जाऊन बसून तुम्हांला काम कायतें सांगतों. माझं काम आहे ह्मणण्यापेक्षां तुमचंच काम आहे, असं ह्मटलं तर विशेष शोभणार आहे. तुम्हांला ही संधि फार चांगली आहे. जर साधलीत तर मोठाच फायदा होणार आहे, नाहीं तर कोणी तरी तो फायदा घेणारच. माझ्या नजरेला ती गोष्ट आली. तुमच्यासारखा विद्वान् मनुष्य त्या कामाला योग्य आहे असं मला वाटलं म्हणून तुमचा शोध करीत आज तीन दिवस घालविले."

एक क्षणभर पद्माकरानें त्याचेबरोबर जाण्याबद्दल अनिच्छा दाखविली, "कां कूं करूं नका, मी काय सांगणार तें ऐकून घ्या आणि मग त्याप्रमाणं करणं किंवा न करणं हें तुमच्या हातचंच आहे. कुठें तरी हिंडायला जायचं तें माझ्याबरोबर बागेंत किंवा तुम्हाला पाहिजे असल्यास ब्यागबेवर चला; पण चला." असें राजारामानें म्हणून त्यास बळेंच ओढ· ल्यामुळें तो त्याचेबरोबर गाडीजवळ गेला गाडींत आणखी एक गृहस्थ होते. ते लागलीच बसल्या जागचे उठून समोरच्या बैठकीवर बसले व त्यांनीं आपली जागा पद्माकरपंतासाठीं रिकामी केली. पद्माकरपंतास राजारामानें आंत ढकललें व मागोमाग आपणही त्यांचे शेजारीं जाऊन बसला.

गाडी चालू झाल्यानंतर गाडींतल्या आपल्या स्नेह्याची व पद्माकरपंताची ओळख राजारामानें करून दिली. हे गृहस्थ वाचकांस अपरिचित नाहींत.

किंबहुना वाचकांच्या दाट परिचयांतलेच होते. राजारामानें प्रो. ड्यांडीस पद्माकरपंताचें नांव सांगतांच प्रो. ड्यांडी मोठ्या अदबीनें त्यांचेकडे पाहून ह्मणतो, "माझा आणखी यांचा विशेषसा प्रत्यक्ष परिचय नाहीं; परंतु यांची कीर्ति मला ठाऊक आहे. 'सोशल रिफॉर्म' साठीं यांनीं केवढा सेल्फस्याक्रिफाइस केला आहे, हें मला ठाऊक आहे. जनरल ब्लंडरबुस यांच्या लग्नाला गेले होते, त्यांना मींच आग्रह करून तिथं नेलं होतं, यांना मात्र माझी माहिती नसेल. कधीं प्रसंग आला नाहीं. हे विद्यार्थी ह्मणून कॉलेजांत होते. मी तिथल्या प्रोफेसरांचा स्नेही ह्मणून कधीं कधीं जात असें, तेव्हां यांना पहात असें. याचा कोण तो प्रोफेसर—परवां रिटायर झाला हो—काय करावं आतां नांव आठवत नाहीं—अतिशय ब्रेनवर्कनं माझी मेमरी अगदीं फेल होत चालली बुवा—तो यांची फार वाहवा करीत असे. म्हणे माझ्या प्रोफेसरीच्या पंचवीस वर्षांत असा स्टूडंट कधीं आला नाहीं."

राजारामानें तें ऐकतांच आपला पाय लांबवून प्रो. ड्यांडीच्या पायास एक लहानशी ठोकर दिली व वरच्या दांतांनीं खालील ओंठ चावून फाजीलपणानें न बोलण्याबद्दल खूण केली. पद्माकरपंतानें व्याजोक्तिपूर्ण दृष्टीनें ड्यांडीकडे पाहून व्याजार्थानेंच "मलाही पण तुमची कीर्ति ऐकून चांगली ठाऊक आहे," असें उत्तर दिलें, परंतु पद्माकरपंताच्या त्या बोल-

ण्याचा किंवा पहाण्याचा आणि राजारामाच्या त्या ठोकरीचाही यत्किंचितही उपयोग न होतां प्रो. झ्यांडी पुढें ह्मणतात, "मला वाटतं कुठं तरी सी-व्हॉयेजला ( समुद्रप्रवासाला ) जाऊन आलं पाहिजे. ब्रेनला तशी विश्रांति दिल्याखेरीज पुनः तें पहिल्याप्रमाणं तरतरीत होणार नाहीं जर राजारामपंत, तुह्मीं सुचविल्याप्रमाणं हे तिकडे जायला कबूल असतील तर आपण यांच्याबरोबर खचित जाऊं. यांचं आमचं चांगलं जुळेल, दोघेही लिटररी माणसं, मग काय विचारतां ? छान जोडी जमणार आणि इंग्लंडासारख्या देशांत चार सहा महिने घालवायला सांपडल्यानंतर आणखीहो काय पाहिजे ? मला तर वाटतं मी परत सुद्धां येणार नाहीं. तिकडे एखाद्या पेपरच्या स्टॅफवर, इंडियन टॉपिक्सवर लिहिण्याला मला खास ठेवून घेतील. पद्माकरपंत कसं काय इंग्रजी लिहितात तें मला कांहीं ठाऊक नाहीं, पण आमच्या सहा महिन्यांच्या सहवासांत ते तयार होतील. अहो पण सगळंच मुसळ केरांत ! आह्मांला धाडणारे धाडणार कोणत्या हेतूनं, आणखी आम्हीं करणार काय ह्मणतों ! "

राजारामपंत बिचारा त्यास एकसारख्या ठोकरा देत होता व खुणा करीत होता, परंतु सर्व व्यर्थ. प्रो. झ्यांडीचें चऱ्हाट कांहीं केल्या लवकर संपेना. पण कर्मधर्मसंयोगानें त्यालाच काय बुद्धि झाली आणि त्यानें राजारामास विचारलें, "बरं पण यांना काय प्रपोझल आहे आपल्या ह्यांकेचं तें सांगितलंत का ? का आतांच यांची तुमची गांठ पडली ! "

राजारामपंतानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य केलें आणि पद्माकरपंतास तो म्हणतो, "या आमच्या स्नेह्याला थोडं अधिक बोलायला हवं असतं. तिकडे तुम्हीं लक्ष्य देऊं नका. मीं तुह्माला जें काम आणलं आहे तें एवढंच कीं,...कुठं तरी लांब परदेशांत तुम्हीं जायला तयार आहांना ? आजकाल जो तो हिंदुस्थानच्या बाहेर जायला पहात असतो. आमच्यासारख्या अर्धवटांना त्याचा कांहीं उपयोग नाहीं, पण तुमच्यासारखा विद्वान् जर जाईल तर कोणतंही काम फत्ते करून येईल यांत शंका नाहीं. एक संधि आली आहे. तुमचा माझा स्नेह तुमचे मजवर अनंत उपकार, तेव्हां ती संधि तुम्हाला मिळावी या हेतूनं तुमच्याजवळ गोष्ट काढतों आहे. जात असलां तर अवधि नाहीं. पुढच्या मेलनं रवानगी. दुसरे लोक तयार आहेत. तुम्हीं नाकारलं तर मग दुसऱ्या कोणाला ती संधि देणं भाग पडणार आहे. आणखी तुमच्या सुधारकी पेशालाही तुह्मी तिकडून जाऊन चिऊन आलांत, तर एकंदरींत तें बरंच होणार आहे. पहा, होतं आहे कां ? होत असलं तर मीं तुम्हांला सांगितलंच आहे कीं, पुढच्या मेलला इथून निघून जायचं. अवकाश करतां कामा नये. तुमची हो असली तर काय अटी, काय काम, हें सगळं मी तुम्हाला सांगतों. 'ना' असली तर त्यासंबंधाचं भाषण नको, न नाद नको. "

राजारामाचें तें बोलणें ऐकून अविश्वस्त व आश्चर्यचकित दृष्टीनें त्याच्याकडे पहात पद्माकरपंत त्यास ह्मणतो, "राजारामपंत, तुह्मी माझी चेष्टा करतां आहां कीं काय करतां आहां, तें मला कांहीं समजत नाहीं. तुम्ही मला रस्त्यांत भेटतां काय ? कांहीं काम आहे ह्मणून गाडींत घेतां काय ! आणखी एकदम परदेशाला जाण्याचं

बोलतां काय ? तुह्मीं असं मला विचारण्याला तुमच्या हातीं आलं आहे तरी काय ? मला तर हें सगळं विलक्षण दिसतं आहे. "

तें ऐकून राजाराम मोठ्यानें हंसला व म्हणतो, "अहो विलक्षण तर खरंच; पण जितकं विलक्षण तितकं या जगांत खोटंच असतं, असं मात्र समजूं नका. ज्या वेळीं तुमची माझी गांठ पडली त्या वेळच्या माझ्या स्थितींत आणि आतांच्या स्थितींत फार अंतर आहे. तें सगळं मी तुम्हांला सांगत बसलों, तर एक तर अतिशय वेळ लागेल आणि दुसरं तें तुह्माला खरं वाटेल कीं नाहीं, कोण जाणे. तेव्हां तें सगळं सांगण्याच्या भानगडींत मी आतां पडत नाहीं. मीं तुह्मांला आतां सांगितलेलं विलक्षण वाटलं तरी खरं आहे, असं समजून चाला, आणखी तुमची संमति आहे कीं नाहीं. एवढं मला सांगा. संमति असली तर मी तुह्माला, त्यांत कांहीं विलक्षण नाहीं- निदान विलक्षण असलं तरी खोटं नाहीं, हें दाखवून देईन. त्यांत वाईट कांहीं नाहीं, लबाडी नाहीं, अशाबद्दल तुमची खात्री करून देईन. तुमच्या हातांत ग्यासेजचं तिकीट आणि टॉमस् कुक आणि सन्स यांच्याकडलं एक चेकबुक दिल्यानंतर माझं ह्मणणं खरं वाटेल किंवा नाहीं !"

प्रोफेसर इयांडी इतका वेळ स्वस्थ होते. ते मध्येंच, "माझ्या तर जिभेला पाणी सुटलं बुवा तें चेकबुकाचं नांव ऐकून" असें म्हणून खो खो खो करून हंसले. पद्माकरपंत दोघांकडेही अविश्वास व आश्चर्य यांनीं युक्त अशा दृष्टीनें पाहूं लागले.

# प्रकरण ३८ वें.

## याला प्रायश्चित्त ? देहांत प्रायश्चित्त !



काकासाहेबांनीं गंगापुरांत नुसता धुमाकूळ चालविला. गुंडभट्टांचा आनंद त्रिभुवनांत मावेना. आपला जो अपमान झाला, त्याचें प्रायश्चित्त दादासाहेबांस पूर्णपणें मिळालें, अशी त्यांची खात्री झाली. 'ज्या तोंडानं दादासाहेब अपमानकारक शब्द बोलले, त्याच तोंडानं त्यांच्याकडून आपण आपली प्रथमतः व मग एकंदर ब्रह्मवृंदाची आणि शेवटीं काकासाहेबांची क्षमा मागवूं, तेव्हांच राहूं,' अशा तऱ्हेच्या आढ्यतेखोर वल्गना गुंडभट्टजी ऊर्फ गुंडभट्टशास्त्री ऊर्फ गुंडभट्टाचार्य, दिवसांतून आठी प्रहरीं भेटणार नाहीं त्या माणसाखेरीज प्रत्येकाजवळ करीत असत. अर्थातच त्यांच्या त्या वल्गना दादासाहेबांच्या कानीं दररोज जात व तशा गेल्या ह्मणजे त्यांनीं गुंडभट्टास 'न भूतो न भविष्यति' अशा शिव्या द्याव्या आणि त्याबरोबर त्याच्या आश्रयदात्या काकासाहेबांसही त्या शिव्यांपैकीं कांहींचा वांटा मिळावा. अर्थातच

या शिष्यांचा रिपोर्ट गुंडभट्टजी व काकासाहेब यांचेकडे जाऊन त्यामुळें त्यांचे तोंडून प्रतिपुष्पांजलि होत असे.

एके दिवशीं दादासाहेबांच्या शिष्यांचा रिपोर्ट कोणा एकाकडून गेला असतां काकासाहेबांस व गुंडभट्टाचार्यांस फारच संताप आला आणि त्यांनीं आपल्याशींच असा बूट काढला, कीं गांवांतील न्हावी, धोबी, तेली, तांबोळी दादासाहेबांस बंद करणें शक्य आहे कीं नाहीं ? हें पहावें. तेवढें जर झालें, तर आपल्या पक्षास आतांपेक्षांही अधिक जोर येईल, किंबहुना आपल्या इच्छेप्रमाणें दादासाहेबांची स्वारी गांव सोडून खास पळेल. परंतु हें व्हावें कसें ? उघड उघड तुमच्यावर बहिष्कार आहे असें एकवेळही ह्मणण्याची छाती काकासाहेबांस नव्हती; अर्थातच त्यांच्या अनुयायांसही नव्हती. जो तो कांहीं तरी सबब सांगून दादासाहेबांच्या घरीं जाण्याचें टाळी किंवा नाकारी. गुंडभट्टाचार्य तर दादासाहेबांच्या थाऱ्यासमुद्धां उभे राहत नसत; कारण त्यांना कोणीं असें सांगितलें होतें, कीं दादासाहेबांची व तुमची दृष्टादृष्ट झाल्याबरोबर ते तुमच्याशीं बोलतील आणि तुह्मी कांहीं बोललां कीं, दोन साक्षीदार ठेवून तुमच्यावर नालस्तीची फिर्याद ठोकतील. एकदां तुह्मी फिर्यादीच्या तडाख्यांत सांपडलां पुरे, कीं तुमच्या गळ्यांत भयंकर धोंगडें आलेंच. मग वर्ष सहा महिने बिनभाड्याची जागा आणि कांदाभाकरी यांची गांठ पडणार. हें ऐकल्या दिवसापासून गुंडभट्टजींच्या मनांत धागधुगच सुरू झाली होती. काकासाहेबांस त्यांनीं त्याच दिवशीं ऐकलेला सर्व प्रकार सांगितला व दादासाहेब असें करूं शकतील काय आणि त्यांनीं केलें, तर त्यांतून आपली सुटका होईल किंवा नाहीं, तें विचारलें. तेव्हां अर्थातच काकासाहेबांनीं त्यास पुष्कळ धीर दिला आणि दमाच्या गोष्टी सांगितल्या. जोंपर्यंत काकासाहेबांच्याजवळ स्वारी होती, तोंपर्यंत अर्थातच गुंडभट्टाचार्यांसही खूप धीर आला; परंतु काकासाहेबांचे घरून स्वारी आपल्या घरीं उठून गेली मात्र, तों वाटेंतच त्यांच्या मनांत असें आलें, कीं काकासाहेब आजपर्यंत कधीं कोणाच्या उपयोगी पडल्याचें आपल्या अनुभवांत तर नाहीं; त्यांच्या कामासाठीं म्हणून जरी एखादा संकटांत पडला, तरी त्याला सोडविण्याकरितां आपला छदाम किंवा आपला एक क्षण कधीं खर्च करणार नाहींत. आपलें काम असतां नुसत्या गुळचट थापा वाटतील तितक्या देण्यास त्यांचेकडून कधीं कमी व्हावयाचें नाहीं. तेव्हां आपण यांचे नादीं लागून आपला क्रम असाच चालू ठेवावा, कीं आपण या भानगडींतून निसटण्याला सांपडलें तर निसटावें ! सारांश, आपण ज्या मोठ्यांचा आश्रय धरून इतक्या मोठमोठ्या उड्या मारतों आहों, त्यांचा आश्रय आपल्याला शेवटपर्यंत कितपत मिळेल व टिकेल, याचा पुरा विचार न करतां आपण हा जो प्रकार चालविलेला आहे हा आपल्याला अंतीं कितपत श्रेयस्कर होणार आहे, याचा विचार मनांत एकसारखा घोळूं लागला. एक मन सांगूं लागलें, कीं दोघां अजगरांच्या झोंबींत आपल्यासारख्यानें न पडणें हाच शहाणपणा, नाहीं तर त्या दोघांनीं एकमेकांस जर का विळखे घातले, तर त्या विळख्यांत आपण सांपडून आपला चक्काचूर व्हावयाचा. अंगांत एकसुद्धां हाड रहावयाचें

नाहीं. असा विचार मनांत येऊन त्यांचें मन फार विषण्ण होत होतें. वर्ष दोन वर्षांची कैद भोगावी लागण्याचा प्रसंग म्हणजे लहानसहान नव्हे. तो प्रसंग आल्यास आपली नुसती चांदी उडून जाणार. काकासाहेबांनीं म्हटलें कीं, " दादासाहेबांची प्राज्ञा नाहीं फिर्याद करण्याची आणि यदाकदाचित् फिर्याद केलीच, तर मुंबईहून बॅरिस्टर आणून त्यांची खोडकी जिरवूं. त्यांना वेडेवांकडे प्रश्न विचारून त्यांची फटफजिती करूं." असा दम त्यांनीं दिला; परंतु हे आपल्यासाठीं बॅरिस्टर वगैरे आणून इतका खटाटोप करतील, हें संभवनीयच नाहीं हें अगदीं सूर्याच्या तेजाप्रमाणें स्पष्ट होतें. ग्रामण्य उपस्थित करण्याच्याच वेळीं यांनीं पांच सात मुख्य धेंडांस मथविण्यासाठीं त्यांचा हात ओला केला व त्यांस द्रव्य दिलें, त्याबद्दल सर्व गंगापुरांतील लहान थोर इतके आश्चर्यचकित झाले, कीं अजून त्या चकिततेंतून त्यांची कोणाची सुटका झाली नव्हती. गुंडभट्टाचार्य मात्र त्या चकितपणांतून कधींच बाहेर पडले होते; कारण त्या दिवसापासून कांहींही नैमित्तिक काकासाहेबांच्या घरीं झालें, तरी बोलाविण्याच्या ब्राह्मणांच्या संख्येंत आणि त्यांस देण्याच्या दक्षणेंत पुष्कळच कापाकापी सुरू झाली. " काकासाहेब, उद्ईक आपल्या मातुःश्रींचं श्राद्ध आहे." असें गुंडभट्टांनीं त्यांचे कानीं घातलें पुरे, कीं स्वारी त्यांना लागलीच म्हणावयाची, 'अहो नित्याप्रमाणं पांच ब्राह्मण सांगूं नका हो. तुम्ही एक आहातच, आणखीं एक सांगा म्हणजे झालं आणि दक्षणा फक्त चार चार आणे द्यायची. परवां त्या तुमच्या ग्रामण्याप्रीत्यर्थ बराच पैसा खर्च झाला आहे. तो पुरा निघेपर्यंत प्रत्येक बाबतींत काटकसर करणं अगदीं जरूर आहे आणि ती आम्ही अशी करणार. गुंडभट्ट, ही सगळी कसर तुमच्या पायीं आम्हांला करावी लागत आहे. तुमच्या अभिमानामुळं आम्हीं त्या गृहस्थाची खोड मोडण्याच्या उद्योगाला हात घातला. तेव्हां दक्षणा कमी अधिक म्हणायला तुम्हांला चिलकुल तोंड नाहीं. समजलांत ? हे उद्यांचे आठ आण्याचे पैसे आणि वर लागणारा हा अर्धा आणा. संभाळा, नाहीं तर कुठें पाडाल, आणखी मग पुनः मागाल. मी कांहीं देणार नाहीं; तुम्हाला भरावे लागतील. नाहीं तर उद्यां सकाळपर्यंत कोणाला तरी व्याजावारी द्याल, आणखी आयत्या वेळीं तो कांहीं तुम्हांला देणार नाहीं. तें नकोच; मी आयत्या वेळीं तुमच्याजवळ देईन,' असें म्हणून काढलेले पैसे गृहस्थानें पुनः परत ठेवावे, असा क्रम चाले. ज्या धर्मकृत्याला पांच ब्राह्मण बोलाविण्याचा परिपाठ, तेथें एकावर किंवा फारतर दोहोंवर भागविण्याचा फार मोठा आग्रह आणि दक्षणेचें प्रमाण तर चतुर्थांशावर आणून ठेवलेंच ठेवलें. कोणत्याही नित्यनैमित्तिकाचा दिवस येवो, गुंडभट्टांच्या अभिमानास पेटून आपण ब्राह्मणांना विनाकारण मध्येंच दक्षणा दिली. तो अधिक खर्च भरून येईपर्यंत कोणत्याही बाबतींत अधिक खर्च करावयाचा नाहीं आणि जो नित्याचा परिपाठ होता, त्यांत कमी करावयाचें असा काकासाहेबांचा निर्धार त्यांनीं सकारण बोलून दाखवून, तुमच्यावर माझे हे उपकार आहेत असें गुंडभट्टास स्पष्ट समजेल असें करावयाचें. बिचारा गुंडभट्ट अगदीं कंटाळला तें सर्व ऐकून ऐकून ! प्रथमतः ब्राह्मणांना थोडेसे पैसे दिले होते, त्याच्या

चौपट पैसे या हव्यकव्यांच्या दक्षणेंत पुढें केलेल्या काटकसरीनें भरून आले. तथापि स्वारींनीं तो उच्चार करून दाख-विण्यास कधीं कमी केलें नाहीं, किंवा कमी दक्षणेचा व कमी ब्राह्मण बोलवावयाचा नवीन परिपाठही सोडला नाहीं. एखादे वेळीं त्यांचें त्यांसच वाटे, कीं आपल्या काटकसरीत; ज्या निमित्तानें काटकसरीस सुरुवात केली, त्या निमित्ताचे वेळीं झा-लेल्या खर्चाच्या सहापट पैसा निघून आला, तर त्यांनीं आपणच गुंडभट्टास ह्मणावें, 'हें पहा भटजी, तुह्मी ह्मणाल, कीं ते पैसे निघून सुद्धां आले, तर ती तुमची चूक होणार आहे बरें का! या तुमच्या ब्रह्म-घोटाळ्यांत मी आणखी किती खराबीला येणार आहें आणि किती मला खर्च येणार आहे, याचा मुळींसुद्धां नेम सांगवत नाहीं. अहो, एखाद्या कामाला हात आधीं घालूं नये, पण घातला, मग त्याचा पक्का शेवट लागला पाहिजे. उद्यां समजा कांहीं विशेष खर्चाचा प्रसंग आला, तर काय मागें घ्यायचं आहे? मुळींच नाहीं. एकदां जें आपण केलं, तें शेवटास नेऊन पोंचविलंच पाहिजे. हा तर आपला वाडिलोपार्जित बाणा, तो बाणा कधीं सोडायचा नाहीं.'

काकासाहेब जे दिवशीं असें कांहीं बोलतील, ते दिवशीं गुंडभट्टाचार्यांस त्यांचा मोठा अभिमान वाटे. पण एकदां का एखाद वेळ एखादा पैसा खर्च कर-ण्याच्या वेळीं त्यांची चर्या कशी कावरी-बावरी होते तें पाहिलें ह्मणजे, व एकंदर पैशाच्या बाबतीत कसें काय वर्तन असे तें ध्यानांत आणलें ह्मणजे त्यास असें वाटे, कीं पैशाची वेळ आली, कीं काका-साहेबांचा दुराग्रह लटपटेल. असें ज्यांच्या-विषयीं मत, त्यांनीं कितीही दम दिला, किंवा धीर दाखविला, तरी काय उपयोग? आयत्या वेळीं आपण गरीब मात्र नाहक मरूं. आणखी तर कांहींसुद्धां आपल्याला फायदा होणार नाहीं, ही त्यांच्या मनाची पक्की खात्री झाली, व असें मनांत येऊं लागलें, कीं दादासाहेब आपल्यावर खरोखर फिर्याद करणार आहेत कीं काय, याचा पक्का तपास काढावा. जर असा तपास लागला, कीं ते फिर्याद खरोखरीच करणार आहेत, तर एक वेळा त्यांच्याकडे जाऊन त्यांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांची माफी मागावी. ब्राह्मणाला क्षमा करा, असें ह्मणावें आणि आपण मोकळें व्हावें. पुनः त्या भानगडींत पडूं नये. ते काकासाहेब जाणोत आणि त्यांचे ते दादासाहेब जाणोत; आपण आपलें नामानिराळें व्हावें. गुंडभट्टांनीं असा पोक्त विचार करून तपास काढण्यासाठीं कोणा-कडे जावें याची त्यांनीं आपल्या मनांत विचक्षणा चालविली. गांवांत कोणाशीं बरें नसल्यामुळें कोणी धड सांगेल किंवा नाहीं याचीच त्यांस शंका होती. त्यांतून जे यांच्याच पक्षाचे होते, त्यांनीं सांगून तरी काय उपयोग होता? दादासाहेबांच्या पक्षास आतां भिक्षुकच राहिला नसल्या-मुळें कोणाचे येथें जाऊन शोध लागणें शक्य नव्हतें.

इतक्यांत एक विशेष मौज झाली. गुंडभट्ट रस्त्यानें चालले होते, त्यांचेपुढें दोघे भिक्षुक चालले होते. त्यांचें आप-आपसांत भाषण चाललें होतें त्यांतलें एक वाक्य गुंडभट्टांच्या कानीं पडलें तें ऐक-तांच गुंडभट्टांनीं आपले कान उभारले; कारण त्यांच्या संबंधाचाच मज[illegible]र त्यांत होता. तें वाक्य असें:-"तो लब[illegible] गुंड्या-तो मात्र लेंकाचा फुकट यांत

मरणार. आह्मी ज्या वाड्यांत रहातों, तिथेंच ते श्रीधरपंत वकील रहातात–मोठा सुधारक आहे गृहस्थ तो–ह्मणत होता कीं, दादासाहेबांचा फिर्याद करण्याचा विचार आहे; आणखी तशी फिर्याद त्यांनीं लाविली, तर ते त्या गुंडलंबकर्णाचार्यांवरच लावणार–आणखी तो निदान दोन वर्षांच्या शिक्षेवर तरी खास जाणार. "

गुंडभट्टाच्या कानीं हे शब्द पडले मात्र, आणखी त्याची पांचावर धारण बसून त्यानें आपले कान उंचविले, तों पुढील संवाद त्याच्या कानीं पडला. आपल्या संभाषणाचा आधारविषय आपल्या मागोमाग येतो आहे, असें त्या बिचाऱ्यांच्या स्वप्नींसुद्धां नव्हतें. ते सहज गंगेच्या कांठीं कोठें देवळांत मंत्रजागर होता, तिकडे चालले होते. गुंडभट्टानें संवाद ऐकिला तो असाः—

" काय म्हणतोस दोन वर्षांची सजा होईल ? दोन वर्षांची ? त्या गुंड्याची तर मग चांगलीच जिरेल ह्मणायची. त्या गुलामानं हा सगळा व्यूह रचला. "

" दोन वर्षांची होईल असं मला श्रीधरपंतांनीं सांगितलं. त्याच्याबरोबर त्या काकासाहेबांनाही होईल, आणखी दोघेही दोन वर्षं जातील, तर या गंगापुराला थोडी शांति तरी मिळेल. दादासाहेब म्हणजे कसला सोज्ज्वल मनुष्य ! त्याचा आमच्याकडून विनाकारण छळ होतो आहे, आणखी काकासाहेब ह्मणजे सगळ्या मुलुखाचा भ्रष्ट, ततद्रष्ट, त्याचा आम्हांला पक्ष घ्यावा लागतो आहे ! तेव्हां या एकंदर बहारीला म्हणावं काय ? पण करतां काय ? भिक्षुक आणखी भिकारी यांची एक स्थिति झाली आहे आतां. "

" नरसिंगभट, तूं म्हणतोस तें अगदीं खरं बाबा. म्हणूनच मला दिखाल वाटतं, कीं या गुंड्याला जर चांगली अद्दल घडेल, तर फार बरं होईल. काकासाहेबांचं काय घेऊन बसला आहेस ? त्यांना कांहीं सुद्धां होणार नाहीं. कोणसा मला परवां म्हणत होता कीं, त्यांना फार झालं तर दंड–फंड होईल; दंड झाला तर ते तेव्हांच रुपटक्या फेंकून देतील, आणखी हा मात्र गरीब बिचारा हकनाक मरेल. "

" अरे गरीब कशानं झाला बाबा ? त्याला असं कांहीं तरी घडायलाच पाहिजे. गुलामाचा त्या दादासाहेबांना कशा शिव्या देत असतो, ऐकलंसना ? मोर नाचला म्हणून हा कावळाही लेकाचा पावलं टाकूं लागला. कोकिळ गाऊं लागला, हाही काकावूं लागला. मग त्याला जर कोणीं लगुडप्रहार केला, तर त्यांत वावगं काय झालं ? या गंगापुरांत दादासाहेब प्रथम आले, तेव्हां त्यांनीं दानधर्माचा, हव्यकव्याचा काय सपाटा चालविला ? पण तें सगळं आमच्या तोंडचं नेण्याला हाच डोमकावळा नाहीं का कारण झाला ? मग त्याला जर चांगली सजा झाली, तर वाईट कोणाला वाटायचं आहे ! एकदांची खटराक जाईल, इतरांनायू धाक बसेल आणखी पुनः हा घोंटाळा रहाणार नाहीं. अरे बाबा, आज प्रत्यक्ष किरिस्तानाच्यानू इराणाच्या इथें चहा घेणारे ब्राह्मण मुंबईंत आहेत, त्यांच्या इथें तुम्ही आम्हीच चातुर्मास्यांत वाटेल तशीं जेवणं झोडतों, आणखी जो बिचारा खरा कर्मठ, आपल्या पोटच्या पोराला धर्मबाह्य वर्तनासाठीं सोडलं, त्या दादासाहेबाला–शुचिर्भूत ब्राह्मणाला–आपण वाळींत टाकतों ! कां, तर काकासाहेबांचं वर्तन काय पण अगदीं

शुद्ध ! आणखी घरांतला अंधार तर विचारूंच नका ! सारांश, आमच्या हातीं सत्ता नाहीं, आम्हांला जिव्हा नाहीं. पोटासाठीं काकासाहेबांसारख्यांच्या दारांत गेल्याखेरीज चालत नाहीं म्हणून केवळ स्वस्थ बसायचं. त्या गुंड्याच्या पोटाला आग का लागली नाहीं. पण बोलावं कोणीं ? काकासाहेबांनीं त्या लंबकर्णाला बनविला आहे श्यामकर्ण ! तेव्हां हो म्हणून गप्प बसावं लागतं. जाऊं द्या गुलामाला एकदां चार दोन वर्षं म्हणजे वकील म्हणतात कीं दादासाहेबांनीं मनांत आणलं तर चार दोन वर्षं सहज......" परंतु पुढें तो काय बोलला हें गुंडभट्टाचार्यांस ऐकूं आलें नाहीं. कारण ते दोघेही गंगेच्या कांठीं ज्या देवळांत त्यांस जावयाचें होतें त्या देवळांत शिरले.

गुंडभट्टाचें अंतःकरण अतिशय खिन्न झालें. एक तर लपून ऐकणाऱ्या माणसास कधीं स्वतःच्या निंदेखेरीज कांहीं ऐकावयाला येत नाहीं, या गोष्टीचा त्याला अनुभव आला. आपण आपल्या ठिकाणीं एवढी आढ्यता मारतों, परंतु आपल्याविषयीं आपल्या बरोबरीच्या इतर भिक्षुकांत किती प्रेम आहे, वेळ प्रसंग येऊं नये तसा आला, तर आपल्याला शिक्षा झाल्याचा त्यांना किती आनंद होणार आहे, आपल्यास त्यांच्यापासून किती मदत मिळणार आहे, हेंही चांगलें कळून आलें; आणि दुसरें वकील लोक सुद्धां असें ह्मणतात, कीं फिर्याद झाली तर शिक्षा चांगली जबर होईल. तेव्हां अशा स्थितींत आपण करणार काय ! गुंडभटजींची पांचावर धारण बसली आणि त्यांस काकासाहेबांनीं दिलेला धीर अगदीं सुटला. त्यांनीं मनांत पक्का निश्चय केला कीं, मुकाट्यानें दादासाहेबांकडे जाऊन त्यांस, आजपर्यंत आपल्यासंबंधानें मी काय बोललों असेन, त्याबद्दल क्षमा करा, असें ह्मणावें, तोंडांत मारून घ्यावी आणि पुनः या भानगडींत ह्मणून पडावयाचें नाहीं, असा कृतनिश्चय करून चार दिवस गंगापुर सोडून कोंकणची वाट धरावी तोच मार्ग उत्तम, असा विचार स्वारींनीं केला.

कर्मधर्मसंयोगानें असें झालें कीं, गुंडभट्टांचे पाय दादासाहेबांच्या घराकडेच वळले, आणि 'शुभस्य शीघ्रं' या न्यायानें त्यांनीं आपल्या निश्चयाचा एक भाग पार पाडण्यासाठीं दादासाहेबांच्या घराच्या पायऱ्याही आक्रांत केल्या. दादासाहेब काय ह्मणतात काय नाहीं, याबद्दल त्यांचे मनांत धागधुगच चालली होती. माडीवर दादासाहेब आहेत असें कळल्यावरून स्वारी माडीच्या पायऱ्याही चढूं लागली, तों आपलेंच नांव कोणी उच्चारीत आहे, असें त्यांना वाटलें. म्हणून स्वारी थबकली व साहजिकपणें कानोसा घेऊं लागली. तों पुढील संभाषण त्यांच्या कानीं पडलें:—

"दादासाहेब, आमचा नाइलाज आहे. आम्ही गरीब भिक्षुक. तो गुंडभट काकासाहेबांच्या नाकचा बाल, त्याच्याखेरीज पान हलायचं नाहीं. काकासाहेब इथले पिढीजाद घरंदाज जहागिरदार. त्यांच्या हातून एक कवडी जरी आम्हांला मिळाली नाहीं, तरी त्यांच्यामार्फत किती तरी संस्थानिकांचीं नैमित्तिक कर्मं इथें होतात. गायकवाड असोत, होळकर असोत किंवा त्यांच्यासारखे अनेक संस्थानिक आणखी त्यांच्यासंबंधाची इतर मंडळी असोत, या गंगापुरास यात्रेला आली, कीं त्यांचीं सगळीं कर्मं काकासाहेबांच्या मार्फत व्हायचीं, आणखी तो गुंड्या त्यांचा अध्वर्यु.

अहो दादासाहेब, कित्येकांचे पिढीजाद यजमान गेलेना ? सात सात पिढ्यांच्या वह्या दाखविल्या एकसारख्या, तरी या काकासाहेबांनीं भिक्षुकांना धुडकावून देऊन या शून्य शास्त्र्याला उपाध्येिक द्यायचं. त्यानं आम्हांला बोलाविलं, तर आह्मीं जायचं, अशी जर स्थिति आहे, तर आह्मीं मुकाट्यानं त्याच्या कच्छपीं असावं यांत नवल काय ? हें आमचं पोट तर चाललं पाहिजेना ! " बोलणाराचा आवाज गुंडभट्टानें ओळखला. तो त्यांस नित्य शिव्या देणाऱ्या भिक्षुकांपैकीं एक भिक्षुक होता. तेव्हां त्याच्या तोंडून हा आपला महिमा वर्णन होत असलेला ऐकून, तशा त्या मनाच्या घाबरलेल्या स्थितींतही गुंड-भट्टाचार्यांस आनंद झाला. परंतु पुढलें वाक्य ऐकतांच पुनः पांचावर धारण बसली. तो बोलणारा पुढें म्हणालाः

" दादासाहेब, आपण हा एवढा कांटा काढून टाका. तो आपली अद्वातद्वा निंदा करतो. अगदीं मागें घेऊं नका. परवां त्या दारुणेश्वराच्या घाटावर आम्ही पांच पन्नास भिक्षुकमंडळी संध्या करीत बसलों असतां त्यानं आपली अशी निंदा केली, कीं आम्हांला ऐकवेना. अहो, तो नुसता प्रमत्त झाला आहे. त्याला अस्मान ठेंगणं झालं आहे. त्याची जर खोडकी जिरवाल, तर हें भिकार ग्रामण्य हां हां म्हणतां मोडणार आहे. आपल्या सारख्यां-वर ग्रामण्य करणं ह्मणजे शुद्ध मूर्ख-पणा—नव्हे नीचपणा—आहे. पण करतां काय ? आमचा गरीब पोटार्थ्यांचा कांहीं इलाज आहे ? आपण त्याच्यावर फिर्याद ठोका, आह्मी पन्नास भिक्षुक साक्ष देऊं, कीं हा दारुणेश्वराच्या घाटावर शेंकडों ब्राह्मणांच्या भरसमाजांत आपल्याला अपशब्द बोलला. तिथेंचसं काय ? रोज वाटेल तिथें बोलत असतो; पण आह्मी काय करणार ? आपण फिर्याद करा, त्याला सजा होऊं द्या, या गंगापुरांतला प्रत्येक ब्राह्मण जर 'छान झालं, कांटा मोडला,' असं म्हणून साखर वांटणार नाहीं, तर आपण काय ह्मणाल तें ऐकेन. "

" अहो अन्नंभट, तुम्ही म्हणतां हें जरी अक्षरशः खरं असलं, तरी मी कालत्रयीं असली गोष्ट करायचा नाहीं. ब्राह्मणाला तुरुंगांत घातल्याचं पाप मी आपल्या हातानं आपल्या माथीं आणणार नाहीं. काय त्या दोघांना माझा छळ करायचा असेल, तो खेलाशक करूं द्या. मी गंगापूर सोडून जाणार नाहीं, इथें राहीन, वाटेल त्या अडचणी सोशीन; पण त्यांना हार जाणार नाहीं; आणखी तो ब्राह्मण जरी मूर्ख झाला, माझी हवी तशी नालस्ती करूं लागला, नव्हे त्यानं माझ्या तोंडावर जरी कांहीं अतिशय वाईट भाषणं केलीं, तरी मी कोर्टांत जाणार नाहीं. तें माझं ब्रीद नाहीं. मला आतांपर्यंत पुष्कळांनीं तो उपाय सांगितला. तो माणूस जोड्याजवळसुद्धां उभा करण्याच्या योग्यतेचा नाहीं, हेंही मी जाणून आहे; पण मी कोर्टाची पायरी चढून त्याला तुरुंगांत पाठविणार नाहीं. छे ! कालत्रयींसुद्धां ती गोष्ट माझ्या हातून होणार नाहीं. त्या भटाची योग्यता मी जाणून नाहीं असं नाहीं. मी यापुढें त्याला नुसत्या जोड्याजवळ उभा रहातों म्हणाला तरीसुद्धां उभं राहूं देणार नाहीं. पण फिर्यादी अर्यादीचं नांव काढूं नका. तो कितीं जरी नीच असला तरी ब्राह्मण आहे, त्याला तुरुंगांत घालण्याचा प्रयत्न मी कधीं करणार नाहीं. रागाच्या सपाट्यांत

कदाचित् मी बोललों असेन त्याला तुरुंगांत घालायच्या गोष्टी, मला आतां आठवन नाहीं; पण खरोखर तसा प्रकार मी कधीं म्हटल्या कधींसुद्धां करणार नाहीं."

" अहो, आपण करूं नका, पण तुसती भुमका तर उठूं या गांवांत, आमच्या मंडळींत पसरलीच आहे, पण तेवढ्यावर तो लेंकाचा तुमच्या पायां पडायला येतो कीं नाहीं तें पहा. इथें येईल, पायां पडेल......."

" तो इथें येईल? इथें आला तर जोड्याजवळसुद्धां उभं करणार नाहीं म्हणून सांगितलं ना? त्यानं यावं बरीक इथं आतां, म्हणजे सांगेन काय आहे तें. कोर्टांत जाणार नाहीं पण इथें त्याची अगदीं..."

दादासाहेबांना संतापानें अधिक बोलवेना. त्यांचे ओंठ थरथरा कांपायला लागले आणि ते जागचे उठले. त्यांच्या त्या उठण्याबरोबर गुंडभट्टजी घाबरला आणि एकदम त्यानें यःपलायन केलें. न जाणों ते आवेशांत खालीं येऊन त्यांनीं आपणास पाहिलें तर! गुंडभट्टजींस त्या पलायनाच्या धांदलींतही आनंद झाला. आपल्यास फिर्यादीची व तुरुंगाची जी भीति होती, ती उगीच होती. कांहीं केलें तरी आपल्यास हा गृहस्थ तुरुंगांत कांहीं पाठवीत नाहीं. आतां आपल्याला ती भीति नको असें त्यांस खात्रीनें वाटलें, पण त्यांत मौज ही कीं, आतां आपला पूर्वक्रम अव्याहत चालविण्यास कांहीं हरकत नाहीं असाही त्यांस भरंवसा आला. इतकेंच नव्हे, तर आपल्यास जोड्याजवळ सुद्धां उभें न करणाऱ्या त्या गृहस्थास आपल्या पायां पडण्यास लावूं व तसा पायां पडून त्यानें प्रायश्चित्त घ्या असें विनविण्यास या भाषणाची आठवण देऊन " आपल्याला प्रायश्चित्त? देहांत प्रायश्चित्त!" असें निष्ठुर उत्तर देऊन काकासाहेबांस खुष करूं असा त्यानें निश्चय केला!

# प्रकरण ३९ वें.

## सर्वंकषाय.



गंगाकुंडशास्त्री अजून पंजाबांतून आले नव्हते. अनेक गुप्तागुप्त रोगांनीं परिपीडित झालेल्या विरुग्णजनांची प्रणालिका त्यांचे शोधाकरितां विरुग्णतापपरिहार शौण्डीरशालेंत एकसारखी येऊन जात होती. ज्या शालेंत प्रथम एक शिपाई होता तेथें आतां आणखी दोन शिपाई झाले. मात्र चिंदुमाधव पांडे त्या शालेचा व्यवस्थापक एकटाच होता. ज्या ठिकाणीं आतांपर्यंत एकच बत्ता एकाच खलांत पृथिव्यंतर्गत प्रत्येक धातूचें भस्म करीत असे, त्याचप्रमाणें गंगाकुंडशास्त्र्यांनीं आपल्या हिमालयस्थ योगींद्रचूडामणीकडून मिळविलेल्या माणिक्यगेरुकाचें चूर्ण आणि गंगाकुंडशास्त्र्यांच्या

सन्निध अध्ययन केल्याकारणानें बिंदुमाधव पांडे यांनींही शोधून काढलेलें वीटकर्यादी पृथ्वीतत्त्वाचें चूर्ण बनत असे, तेथें आज तीन बत्ते तीन खलांत त्या सर्वरोगपरिहारक औषधींचें चूर्ण बनवूं लागले. कोणीही औषधिलोलुप गृहस्थ औषधि घेण्यासाठीं आला असतां बिंदुमाधव पांडे त्यास त्या खलांकडे हात करून ह्मणे, "अहो, या खलांत हे बत्ते या औषधी द्रव्यांचं चूर्ण करण्याच्या मिषानं सर्व रोगांचं चूर्ण करीत आहेत असं समजा. या पलीकडल्या दालनांत भट्ट्या चालल्या आहेत, त्यांचे औषधिकषाय बनतातसे दिसताहेत, परंतु वस्तुतः बहात्तर रोग भट्टींत जळताहेत असं समजा. यापुढें रोग ह्मणून जर कांहीं राहिला तर प्रमाद रोग्यांचा होय. योगींद्रचूडामणींनीं आमच्या गुरुजींस त्यांचं अध्ययन झाल्यानंतर आज्ञा दिली. तेव्हां असं बजावून सांगितलं कीं, तूं इथून दक्षिणेंत गेल्यानंतर तिथें रोगाचं नांवही रहातां कामा नये. तेव्हां शास्त्रीबुवांनीं अगदीं प्रतिज्ञा करून मग चूडामणींचे चरण सोडले."

"शास्त्रीबुवा लौकर परत येईनात हो—पण त्यांनीं तरी काय करावं, पृथ्वीवर रोग पडले अनंत आणि रोगी त्याहून अनंत. चूडामणींचा अवतार एक आणि शिष्यही पण एकच! तेव्हां त्यांनीं तरी सगळ्यांचा रोगपरिहार करावा कसा? सगळ्यांना त्यांनीं जाऊन पहाणं व परीक्षा करून औषध देणं शक्य नाहीं. आणि रोगपरिहार तर झाला पाहिजे. तेव्हां हीं अतिस्वस्त औषधं त्यांनीं तयार करण्याचा कारखाना लाविला. बोला, कोणतं औषध तुह्मांला पाहिजे? वार्धक्यकुठार देऊं, कीं तारुण्यशतपुटी देऊं? या दोनही औषधांची भट्टी कालच नुकती काढली आहे. अमुक रोगावर ह्मणजे औषध इथें नाहीं, असं तुम्हीं समजूं नका. रोगाचं नांव तोंडून उच्चारा, कीं औषध निघालंच ह्मणून समजा. त्याबद्दल तुह्मांला शंका नको."

हें इतकें लेक्चर याच शब्दांत किंवा याच अर्थाच्या अनेक शब्दांत बिंदुमाधवांनीं गिऱ्हाईक एक आलें तरी व गिऱ्हाइकांची झुंड आली तरी द्यावयाचेंच. इतकें व्याख्यान द्यावयाचें, नंतर आह्मांला उगीच बोलत बसण्याला वेळ नाहीं असें ह्मणावयाचें, आणि गिऱ्हाइकास काय माल पाहिजे तो लौकर त्यानें घेण्याबद्दल व लौकर पैसे देण्याबद्दल गर्दी करावयाची. असा क्रम चालला असतां एके दिवशीं एक वृद्ध गृहस्थ मोठ्या कष्टानें रुग्णशालेच्या त्या बैठकखान्यांत येऊन गंगाकुंडशास्त्री कोठें आहेत अशाबद्दल जरा संतापून मोठ्यानें विचारूं लागला. इतर गिऱ्हाइकांचीही गर्दी तेथें झालेली होती. शिवाय बिंदुमाधव पांड्याच्यापुढें ब्याल्युपेएबल फर्म्यांचा ढिगारा पडलेलाच होता. ह्मातारेबुवांचें संतापाचें बोलणें ऐकून बिंदुमाधवांनीं वर पाहिलें, आणि लागलीच हंसून त्यास ह्मणतात, "तुह्मी आलां का पुनः? तुमचीं औषधं आजच तयार झालीं बुवा. घटकाभर औषधं देण्याला उशीर झाला तर तुम्ही इतके संतापतां याला काय म्हणावं?"

म्हातारेबुवा तावडतोब त्यास उत्तर करतात, "अहो माझ्या पोराला, बायकोला आणखी मलाही तुमच्या त्या औषधांनीं गुण आला तो अर्धवटच आहे, आणखी औषध तर नाहीं मग धडपडत येऊं नको तर काय करूं? पोराला उशीवरून डोकं इकडचं तिकडे करायला येत नव्हतं, तो तुमच्या

एका बाटलमिध्यें आपल्या पायानं माडी उतरून येऊन बहिर्दिशेला वगैरे जायला लागला. बायकोची पोटदुखी तुमच्या एका पुडीनं राहिली. आणखी माझी कंबर किती तरी सावरली. पण औषधं संपलीं म्हणून तीं आणायला पाठविलं, तर ह्मणे औषधं तयार नाहींत. ह्मणून आलों खुरडत खुरडत तुमच्याशीं भांडायला. पण इथपर्यंत आलों हा तरी तुमच्या वार्धक्य-कुठाराचाच गुण! शर्थ आहे बुवा तुमच्या औषधांची. बरं पण माझीं आधीं औषधं कुठें आहेत तीं द्या, नाहीं तर ही गिऱ्हाईक मंडळी इथें बसली आहेत, यांच्यापैकीं कोणाला कांहीं, कोणाला कांहीं द्याल आणि मला सांगाल आतां उद्यां या, करून ठेवतों. मी आतां औषधं घेतल्या-वांचून इथून हलायचा नाहीं. आमच्या भाच्याची बायको—ती, तिला असंच जीवदान द्या, दुसरं कांहीं नाहीं. आणखी माझीं आधीं औषधं द्या. तीन तीन बाटल्या देऊन ठेवा कशा. एक बाटली शिल्लक राहिली कीं पुनः येईन."

बिंदुमाधव पांडे मोठ्या संतोषयुक्त व साभिमान दृष्टिक्षेपानें सर्वांकडे पाहून व हंसून त्या ह्मातान्यास ह्मणतात, "अहो, औषधांचा इतका सोस कां करतां! उगीच बारा रुपये आजच खर्चतां. आणखी एका बाटलींत तुमचं काम होणार. मग दोन दोन बाटल्या अधिक नेतां कशाला! एक एक घेऊन जा, संपली ह्मणजे पुनः या."

"नको, नको, नको, नको. आतां मला तीन तीन बाटल्या द्या. औषधांवरून मी बारा रुपये ओंवाळून टाकतों. माझा पोरगा मला परत मिळाला, बायकोची पोटदुखी राहिली, माझी कंबर बरी झाली, मी आपल्या पायांनीं दोन दिवसांच्या औषधांनीं इथपर्यंत आलों. आतांहो पैशाची मला काय दिक्कत! बेलाशक घ्या बारा रुपये." असें ह्मणत ह्मणत ह्माताऱ्यानें कनवटीचे बारा रुपये बिंदुमाधव पांड्यांपुढें फेंकल्याप्रमाणें टाकले. तेव्हां पांडे इतर गिऱ्हाइकांकडे हास्यमुख होत्साते वळून म्हणतात, "मनुष्याला औषधांचा गुण आला ह्मणजे त्याला त्या औषधांची खरी किंमत कळते. या गृहस्थाच्या मुलाला आज सहा महिनेपर्यंत यकृत्-पिंडप्रकोप म्हणून केवळ असाध्य रोग होऊन तो अंथरुणाला खिळला होता. हे मजकडे आले, कोणीं यांना आमचं नांव सांगितलं कोण जाणे, पण आले. मला मुलाच्या रोगाची हकीकत सांगितली. हकीकत सांगतांच मीं यांना यकृद्रोगां-कुशकषायाची एक बाटली दिली. त्याचा काय उपयोग झाला हें आपण आतां ऐकलंच. यांच्या कुटुंबाला आज वीस वर्षं एकसारखी पोटदुखी, परंतु आमचं वातारिभस्म, मक्षिकापक्ष मात्र देऊन पुडी यांच्या स्वाधीन केली, तिचाही परि-णाम काय झाला हें आतां मंडळींनीं ऐकलंच. वार्धक्यकुठाराबद्दल कुणाचं आम्हाला सर्टिफिकिट नकोच. आज या मुंबईंत साठ वर्षांच्या वरचा म्हातारा तरण्या बांडाप्रमाणं वाटेल तसा वाटेल तिकडे हिंडतो आहे. म्हातारबुवा, तुम्ही आतां वार्धक्यकुठाराची एकच बाटली घ्या, आणखी त्या वार्धक्यकुठाराच्या दोन बाटल्या ठेवून तारुण्यशतपुटीच्या तीन तीन रुपयांच्या दोन बाटल्या घेऊन जा. फक्त दोन रुपये अधिक द्या ह्मणजे झालं." म्हाताऱ्यानें लागलीच कनवटीस हात घातला आणि तोंडानें, "तुम्हीं सांगाल

तसं आम्हाला करायचं. तुम्हीं आमच्या कुटुंबाला जीवदान दिलं; एकदां शास्त्रीबुवा आले म्हणजे दोघांनाही आणून त्यांच्या पायांवर घालण्याचा हेतु आहे, तो कधीं सिद्धीस जाईल तो खरा. शास्त्रीबुवा आपले त्या राजाच्या रोगाचीच व्यवस्था लावीत तिकडे बसले आहेत. लिहा त्यांना पत्र, नाहीं तर मला सांगा पत्ता, मी लिहितों कीं, एका राजासाठीं इथें लाखों लोकांचे प्राण वांचवायचे सोडून तुम्ही तिथें काय बसलांत !" इतकें बोलून म्हातार्‍यानें आपल्या बाटल्या गुंडाळल्या व तेथून तो जावयास निघाला. इतक्यांत एका डोळ्यावर पट्टी बांधलेला एक गृहस्थ वर आला. त्यास पहाण्याबरोबर पांडे म्हणतात, "वा ! आज काय घनचक्करच आहे ! कसा काय आहे तुमचा डोळा ! ठणकाबिणका काय म्हणतो ?"

आलेला गृहस्थ उत्तर करतो, "इथून काल तुमचं अंजन नेलं आणखी निजण्यापूर्वी डोळ्यांत घातलं आणखी ठणका राहिला बुवा. आज दीड महिन्यांत त्या ठणक्यामुळं झोंप नव्हती ती ठणका राहिल्याबरोबर सुंदर खाशी आली. मग मध्यें अंजन घातलंच नाहीं. जागाच झालों नाहीं, मग कसला घालतों ! सकाळीं अम्मळ डोळा चिकटला होता, पण धुऊनबिऊन पुनः अंजन घातलं आणि बांधून ठेविला. इकडे येण्यापूर्वी एकदां उघडून पाहिलं तों थोडी लाली राहिली आहे. ती तेवढी गेली, गेल्यासारखीच आहे ती; पण तेवढी एकदां गेली, म्हणजे सुटलों बुवा इतके दिवसांच्या त्रासांतून. मी आज किती दिवस ह्या डोळ्यांच्या त्रासामुळं अगदीं रडकुंडीस आलों आहें, सगळे मुंबईतले हकीम पाहिले, वैद्य पाहिले, डॉक्टरांच्या फिया दिल्या. काय लेकांचे अंधारखोलींत काय नेतात, कांचा घेऊ घेऊन काय पहातात, अशी मान करा, इकडे पहा, तिकडे पहा. असं करून करून शेवटीं कांहींतरी पाणी देतात डोळ्यांत घालून झालं. कधीं त्याचा गुण येत नाहीं, कधीं कांहीं होत नाहीं. या डॉक्टराचा गुण नाहीं आला, दुसर्‍या डॉक्टराकडे जावं, दुसर्‍याचा गुण नाहीं आला, तिसर्‍याकडे जावं. शेवटीं सहज कोणीं मला आपलं नांव सांगितलं, मी आपणही त्यांतलेच असाल, उगीच जाहिरातीचे डॉक्टर म्हणून येणारच नव्हतों, पण ज्यानं आपलं नांव सांगितलं, त्यानं फारच आग्रह केला म्हणून आलों झालं. असं असतं तें, जिथें विश्वासानं जावं तिथें कांहीं होत नाहीं; आणखी नाहीं तिथं एक दोन थेंबांत गुण."

बिंदुमाधव पांडे पुनः एकदां साभिमान दृष्टीनें सर्वांकडे पाहून व हंसून त्या गृहस्थास म्हणतात, "अहो, तुम्हाला गुण आला ना ? झालं, तुमचं काम झालं. दुसर्‍या डॉक्टरांशीं आणि वैद्यांशीं आतां तुम्हांला करायचं आहे काय ? तुमच्याजवळ अंजन अजून शिल्लक असेलच, मग काय आतां ? जा. डोळा बरोक दोन दिवस सोडूं नका. जा कसे, आतां आम्हांला पुष्कळ काम आहे."

"अहो पण वैद्यबोवा, मला अंजन पाहिजे आहे. माझा रात्रीं ठणका राहिल्याबरोबर बायकोनं दोघां पोरांच्या डोळ्यांत अशा लसणीच्या बियांसारख्या खुपर्‍या झाल्या होत्या, त्या निघाव्या म्हणून तें अंजन आतांपर्यंत सतरा वेळां घालून सरवून टाकलंन्. पण चमत्कार हा कीं, आज चार महिने खुपर्‍यांनीं खराब

झालेले पोरांचे डोळे एका चार प्रहरांत निवळले. तेव्हां तेवढं अंजन चांगलं एक कुपीभर द्या. काय त्याचे दाम असतील ते सांगा मी देतों, पण द्या."

चिंदुमाधवांनीं चटकन एका शिपायास हांक मारून नेत्रविमलांजन दोन तोळे एका कुपींत घालून त्या गृहस्थास देण्यास सांगितलं व त्याचेपासून एक रुपया घेतला. तो गृहस्थ त्या शिपायाजवळून ती बाटली घेण्यास जातो, तों तिसरा एक गुजराथी आंत आला. त्यास पहाण्याबरोबर चिंदुमाधव पांडे यांनीं मोडक्या गुजराथींत "आपल्या मातोश्रींचं कसं काय आहे?" असें विचारलें. त्याबरोबर मोठ्या उल्हसित मुद्रेनें तो गुजराथी ह्मणतो, "आतां ठीक आहे. दुपारीं बारा वाजल्यापासून झाड्याला गेली नाहीं. थोडं दूधही पिण्यास मागते. द्यावं कीं नाहीं तें विचारायला आलों, आणखी रात्रींबेत्रीं झालं, तर औषधही पण थोडं घेऊन जाऊं."

असें त्याचें बोलणें एकल्याबरोबर चिंदुमाधव पांडे लागलीच म्हणतात, "ठीक, ठीक. चार महिन्यांची संग्रहणी चार तासांत गेली आणखी काय पाहिजे! दूध घाला बेलाशक, आणखी औषध घेऊन तर जाच. पण एक दोन तोळे पचनप्रदीपभस्मही घेऊन जा. थोडं महाग आहे. इतरांना तीन रुपये तोळ्याप्रमाणं देतों, पण तुमची गरिबी आम्हीं पाहिली आहे, तेव्हां तुम्हांला रुपयाला एक तोळा पडेल. अरे खंडू, यांना दोन तोळे पचनप्रदीपभस्म दे, आणखी ही गिऱ्हाइकांची एकदां गर्दी मोड. ज्यांना आपलीं आयतीं तयार औषधं नुसतीं पाहिजे असतील त्यांना तीं भराभर दे. त्या दुसऱ्या दोघांना म्हणावं सध्यां घोटायचं काम राहूं द्या आणखी या गिऱ्हाइकांच्याकडे पहा. त्यांत ज्यांना परीक्षा करून घेऊन औषधं पाहिजे असतील त्यांना एका बाजूला बसव. ज्यांना नुसतीं औषध पाहिजेत त्यांना तीं भराभर दे. पैसे नीट पाहून घे बरं का; नाहीं तर कोपाला दोन रुपयांची बाटली देशील आणखी एकच रुपया घेशील. जें ज्याला पाहिजे तेंच औषध दे. भलत्याला भलतंच औषध देऊं नको. मी आतां हे ब्याल्यपेएबलचे फार्म तपासून पाहतों. त्या मथाच्या साडेतीनशें बंग्या पोस्टांत दिल्यास? नीट बजावून दिल्यास का? आणखी त्या सतरा पार्सलच्या पेट्या गेल्या का बोरीबंदरावर? चला, चटचट काम आटपा. हा कोण येतो आहे? हं! हा शेख हबीब वाटतं. याच्या पोराला एका सप्ताहांत क्षयरोगापासून चांगलाच गुण आला. तान्ह्या पोराला खोकला आला कीं, औषध न्यायला येतो. आपला नेहमींचा हकीम त्यानं बंद केला. काय शेख, आज कां आलां? सगळी मंडळी ठीक आहे ना? तुमच्या मुलाला तर परवां ब्याकबेवर चांगलं हिंडतां फिरतांना पाहिलं."

शेख अदबीनें वांकून सलाम करून म्हणतो, "हां साहेब, आपल्या मेहरबानगीनं तेवढा आम्हाला लाभ झाला. आज मी दुसऱ्याच कांहीं कामाकरतां आलों आहें. कृपा करून जरा एकीकडे."

तो इतकें अर्धवट बोलतो आहे तोंच चिंदुमाधव म्हणतात, "एका बाजूची गोष्ट असली तर तुह्मी आपले बरोबर बारा वाजण्याच्या सुमाराला दुपारीं येत जा. त्या वेळीं घटकाभर कशी तरी मी काढीत जाईन. आतां सध्यां बोलूं नका. ही पहा कोण मंडळी बसली आहेत ती; यांनीं तरी किती वेळ वाट पहावी! जा आतां मेहर-

थानीं करा. उद्यां दुपारीं या, मी स्वस्थ चित्तानं ऐकून घेऊन अशी सुंदर औषधयोजना करीन कीं, तुम्हाला तिसरे दिवशीं गुण येईल. आलाच पाहिजे. त्याच्याबद्दल तुम्हाला शंका नको."

"पण मी इथं कांहीं सांगायला आलों नाहीं. आपल्याला घरीं न्यायला आलों."

"आतां घरीं न्यायला, पन्नास रुपये फी दिलीत तरी मी या वेळीं येणार नाहीं हो. छे, छे, छे! इथें आलेल्या रोग्यांना टाकून तुमच्याबरोबर येणं कधीं व्हायचं नाहीं. तसंच जरूरीनं यायला पाहिजे असलं तर रात्रीं १० वाजतां इथें या, तोंपर्यंत माझं हें इथलं काम असंच चालणार. आमचा इलाज नाहीं त्याला आम्हीं तरी काय करावं! जा आतां अगदीं बोलूं नका."

"पण वैद्यबुवा, फारच निकडीची वेळ आहे, निदान ती परवां आमची मुलगी थंडगार पडली होती तिला आपण मात्रा दिलीत तिचे तरी दोन वळसे द्या."

"हां, तें घेऊन जा. त्यांनीं मी येईपर्यंत खास काम होणार. मी आल्यावर मग सर्व व्यवस्था यथास्थित लावून देईन. अगदीं काळजी करूं नका."

लागलीच त्यांनीं एका शिपायास बोलावून **प्रेतोज्जीवन** मात्रेचे दोन वळसे उगाळून देण्यास सांगितलें, आणि शेख निघून गेला व चिंदुमाधव आपले रोगी तपासण्याच्या कामांत गढून गेले.

---

# प्रकरण ४० वें.

## चेष्टा नव्हे !



आपल्याशीं बोलणारे हे कोणी ठग आहेत कीं वेड्याच्या इस्पितळांतून नुकतेच सुटून आलेले वेडे आहेत याची पद्माकरास भ्रांति पडली. प्रो. ड्यांडी हा डांबीस आहे हें त्यास ऐकून ठाऊक होतें, परंतु राजाराम, कीं ज्यास आपण व प्रभाकरानें मोठ्या चमत्कारिक स्थितींतून सोडविलें तो अशाच्या नादीं लागून तशाच प्रकारचा झाला असेल ही कल्पना त्यास होईना. त्यांच्या त्या बोलण्यावर एका शब्दानेंही उत्तर न करितां तो त्यांच्याकडे नुसता पहात राहिला. राजारामास त्याच्या मनाची काय स्थिति होती याचा तर्क झाला असावा. तो थोडा वेळ थांबून एकदम म्हणतो, "पद्माकरपंत, तुम्हाला माझं सर्व बोलणं म्हणजे कांहीं तरी वेड्याचं बोलणं आहे असं वाटतं आहे, असं दिसतं; परंतु मी बोलतों आहें यांत एक अक्षरही वृथा नाहीं, तुमची संमति असेपर्यंत मला तुम्हाला सर्व गोष्टींचा खुलासा करून सांगतां येत नाहीं. तुमचा विचार आहे असं कळलं म्हणजे तुम्हाला जिथें न्यायचं तिथें नेऊन सर्व

खुलासा समजावून देतों. मग सहजच तुमच्या मनाची समजूत पटून जाईल."

राजारामाचें तें बोलणें ऐकून पद्माकर स्वस्थच बसला. नंतर बऱ्याच वेळानें तो राजारामास म्हणतो, "अशा गूढ बोलण्यास मी कधींही नक्की उत्तर देणार नाहीं. जर तूं काय म्हणतोस यांत कांहीं सत्यपणा असेल तर तो काय व कसा हें मला आधीं पूर्णपणें समजलं पाहिजे. त्याखेरीज काय सांगतां येणार आणि कसं सांगतां येणार? मला तर तुझ्या बोलण्यांत कांहीं सत्यपणा असेल ही कल्पनासुद्धां होत नाहीं, आणि जर कल्पना होत नाहीं तर मी 'हो' किंवा 'नाहीं' हें तरी तुला कसं सांगणार? जर तुला माझं पक्कं उत्तर पाहिजे असेल तर मला सगळ्या गोष्टी—पाठविणारा कोण? कशाकरितां पाठवितो? तिथें जाऊन करायचं काय? इ० सगळ्या गोष्टींचा चांगला खुलासा झाला पाहिजे. तर मग मी तूं म्हणतोस या गोष्टीचा विचार करीन. आजकाल इंग्लंडला जावंसं कोणास वाटत नाहीं? ज्याला त्याला तीच महत्त्वाकांक्षा आहे, तशी मलाही आहे. त्याचा सर्व तऱ्हेनं चांगला विचार केला पाहिजे."

राजाराम त्यास मध्येंच म्हणतो: "गोष्ट अगदीं खरी, पण मी जें म्हणतों तें कांहीं तरी हेतूनंच म्हणतों आहे, याबद्दल तुम्हांला शंका कां यावी? तुमच्याशीं मी कांहीं तरी भलतंसलतं कांहीं तरी थापबाजीचं बोलणं बोलावयास येईन अशी कल्पनासुद्धां आपण मनांत आणूं नये. फक्त मला सांगायचं तें एवढंच कीं, तुम्हाला या संधीचा उपयोग करून घ्यायचा नसेल तर मी दुसऱ्या कोणास ही संधि देईन. मला तुमचं काय म्हणणं तें मात्र नक्की कळलं पाहिजे. तुम्हाला आतांच स्पष्टपणें सांगतां येत नसलं तर विचार करण्यासाठीं कांहीं वेळ पाहिजे असला तर घ्या. उद्यां संध्याकाळपर्यंत मला काय तें कळलं तरी चालेल. आतांच कळायला पाहिजे असा माझा आग्रह नाहीं."

पद्माकरपंतास तें त्याचें बोलणें आवडलें. एक दिवसाची फुरसत मिळाल्यास याचें बिंग काय आहे याबद्दल चौकशी तरी करावयास सांपडेल, असें आपल्याशींच म्हणून त्यानें त्या वेळीं, "ठीक आहे. उद्या संध्याकाळीं मी तुम्हांला आपला विचार काय तो कळवीन; तोंपर्यंत मला फुरसत द्या," इतकें म्हणून त्यानें लागलीच त्या दोघांची रजा घेतली, आणि तो एकटाच आपल्या बिऱ्हाडीं जाण्यास निघाला. वाटेनें येतांना त्यानें नानाप्रकारचे तर्क करून हें सर्व लचांड काय आहे; हा राजाराम कोणच्या स्थितींत आपल्यास आढळला आणि आपण आज त्यास कोणत्या स्थितींत व कसल्या गोष्टी सांगतांना पाहातों; माझ्यासारख्या माणसास परदेशीं पाठविण्यास याचे हातीं असें आलें आहे तरी काय? परंतु कोणत्याही तर्कानें त्याचें समाधान होईना हें उघडच आहे. तो या गोष्टीचा आपण शोध तरी कोठें करावा याचाही विचार करूं लागला, परंतु राजाराम आपल्या दोघांपासून दूर गेल्यानंतर त्याचे स्नेहीसोबती कोण झाले, तो असतो कोठें, करतो काय, त्याची उपजीविका कशी चालली आहे, यांपैकीं कांहींसुद्धां त्यास ठाऊक नव्हतें. कधीं मधीं आपण होऊनच तो यांचेकडे येई, घटका दोन घटका चार घटका वाटेल तितका वेळ राही आणि कोठें असतोस, काय

करतोस, असें विचारलें तर, 'माझें काय, कुठें तरी असतों, खाणावळीपुरते चार दोन रुपये मिळवतों आणि कसे तरी दिवस काढतों,' असें उत्तर देई किंवा "अहो, आमचं काय विचारतां ?" इतकेंच म्हणून दुसरा कांहीं तरी विषय काढून कशी तरी वेळ मारून नेई. यानेंही त्यास निक्षून असे प्रश्न कधीं केले नाहींत. तो म्हणेल त्यावर विशेषपणें असें कां, तसें कां, असेंही विचारलें नाहीं. परंतु तोच राजाराम आज मोठमोठाल्या गोष्टी सांगण्यास आला, तेव्हां त्यास मोठें आश्चर्य वाटलें आणि त्यानें याबद्दल शोध कोठें लागणार याचा आपल्या मनांत विचार चालविला.

परंतु त्याचे मनांत तेवढाच विचार नव्हता. लवकरच त्या विचाराहूनही विशेष महत्त्वाचा असा विचार आला. समजा कीं, कांहीं तरी खरेपणा त्या राजारामाच्या बोलण्यांत असला, तर आपण हो म्हणावयाचें किंवा नाहीं, हा विचार मनांत येण्याबरोबर त्याचें चित्त विशेष अस्थिर झालें. त्याची चर्या उद्विग्न दिसूं लागली. कांहीं तरी अनिष्ट असा विचार त्याचा मनांत घोळूं लागला. तो विचार काय असावा, हें जाणणें मोठें कठिण होतें. ज्या स्थितींत आपण आहों त्या स्थितींत खुशाल जाण्यास आपल्याला कांहीं हरकत नाहीं; आतां आपली काळजी घेणारें किंवा आपण गेलों असतां आपली कळकळीनें चौकशी करणारें असें कोणीही नाहीं; अशा स्थितींत येथेंच राहून आपल्याला तरी काय कर्तव्य आहे ? खुशाल त्या देशांत जाऊन आपलें काम करावें, कांहीं फायदा झाला तर तोही करून घ्यावा आणि स्वस्थ असावें. या विचाराचा अधिकाधिक जोर होत जाऊन तो त्याच्या मनावर पूर्णपणें बिंबत चालला आणि जों जों विचाराचा जोर होत चालला तों तों त्याची उद्विग्नता अधिकाधिक वाढत चालली आणि त्याच्या मनाचा निश्चय कायम होण्याची वेळ अगदीं जवळ येत चालली. तो तशाच मनाच्या स्थितींत आपल्या बिऱ्हाडीं गेला. जेवणखाण देखील न करतां तसेंच पडावें अशी त्यास इच्छा झाली. विचारांनीं डोकें भणभणून गेलें असतां जेवणाखाणाची यत्किंचितही अपेक्षा राहत नाहीं, हा अनुभव कोणास नाहीं ! त्यानें आपले कपडे काढले आणि पलीकडे पडलेल्या इझीचेअरवर धाडकन् आपलें अंग टाकून दिलें.

पद्माकरपंत जितका विचारवश, त्याच्यापेक्षां कितीतरी अधिक पटीनें विकारवश होता. त्याच्या बुद्धीचा त्याचा मनावर जितका ताबा होता, त्यापेक्षां त्याच्या भावनांचा अधिक ताबा होता. कल्पनांनीं त्याचें मन व्याप्त असतां तो जितका सुखी किंवा दुःखी होत असे, त्यापेक्षां तो विचारांत गुंतला असतां अधिक शांत असे, परंतु विचारापेक्षां विकार, भावना व कल्पना यांच्याच स्वाधीन तो अधिक काळपर्यंत असे, असें म्हटल्यास त्याच्या मनस्थितीचें बरोबर वर्णन होणार आहे. त्याचे हातून ज्या ज्या गोष्टी आतांपर्यंत झाल्या, त्या त्या खरोखर या विकारकल्पनादिकांच्या जोरामुळेंच झाल्या, परंतु एखादें चांगलें व इष्ट कृत्य घडण्यास या मनस्थितीचें जितकें साहाय्य इष्ट आहे तितकेंच तें इतर प्रसंगीं अनिष्ट आहे. मनोविकार नेहमीं जाज्वल असल्या कारणानें एखादी गोष्ट चांगली असो किंवा वाईट असो—तडकाफडकी होऊन जाते. अतिविचार हा कार्यापासून निवृत्त करणारा व कल्पांस नेहमीं

कुण्यांत पाडून हात जोडून बसविणारा असतो.

पद्माकरपंतांची स्थिति या प्रकारची होती. त्याचें मन विकारवश झालें होतें, यामुळें क्षणोक्षणीं त्यास असें वाटूं लागलें, कीं आपल्या सध्याच्या स्थितींत आपण कोठें तरी गेलों तरच बरें होणार आहे. अर्थात् जाण्याकडे त्याचें मन कलूं लागलें. राजाराम सांगतो त्यांत सत्य आहे. तो ह्मणतो त्याप्रमाणें आपल्यास खरोखरींच चांगली संधि आहे, असें त्यास वाटेना. आजमितीस अशीं किती तरी मंडळी आहेत कीं, जी अशा तऱ्हेनें जाण्यास एका पायावर तयार होतील! त्या सर्वांस सोडून माझीच शिफारस कोण करणार! पैसे देणारा कोणी तरी खास निराळा माणूस असला पाहिजे. तो राजाराम नव्हे. आपण त्यास सर्व हकीकत कळल्याखेरीज विचार करून सांगतों असें तरी कसें ह्मटलें? या सर्व गोष्टी कळल्याखेरीज, काम काय आहे हें कळल्याखेरीज, आपण विचार तरी कसला करणार! तें कांहीं नाहीं. तो पुनः भेटेपर्यंत आपणास कांहीं एक नक्की बेत करतां येणार नाहीं. बाकी सर्व गोष्टी सरळ व आपणास जशा हव्या तशा असल्या तर होय ह्मणून ह्मणण्यास कोणतीच हरकत नाहीं. मग ज्यांनीं मला केवळ फुसलावून अशा स्थितींत आणून टाकलें त्यांनीं आपल्या मनाप्रमाणें वागण्यास कोणचीच हरकत राहिली नाहीं. हा शेवटला विचार मनांत येण्याबरोबर त्याच्या चर्येवर उद्वेग व तिरस्कार यांनीं पूर्ण असें स्मित दिसूं लागलें. याप्रमाणें मनाला अंशतः तरी स्थिरता येण्याबरोबर तो तसाच पडल्या पडल्या पलीकडलें एक पुस्तक घेऊन तें उघडून वाचण्याचा यत्न करूं लागला. पुनः आपले पहिले विचार आपल्या मनास त्रास देऊं नयेत याच हेतूनें त्यानें तें पुस्तक उचललें होतें; परंतु त्याच्या मनाची जशी स्थिति झाली होती तशा स्थितींत वाचणें कसलें सुचतें! कांहीं वेळ पुस्तकाच्या पानांवरून डोळे फिरत, हातानें पान उलटलें जाई, परंतु अर्थबोध यत्किंचितही होत नसे. होणार कसा!

तशा स्थितींत सुमारें अर्धा तास तर गेला. तो तसाच चळवळ करीत मध्येंच पुस्तकाचीं पानें उलटीत पडला होता, इतक्यांत कोणी तरी आल्याची त्यास चाहूल लागली व कोण आहे ह्मणून वर पाहतो, तों राजाराम त्याच्यापुढें उभा राहिला. त्यास पाहाण्याबरोबर पद्माकर एकदम त्यास ह्मणतो, "इतक्या तातडीनें माझ्या मागोमाग आलासना? मला मघाच्याच बाबतींत अधिक उणं कांहीं विचारण्यासाठीं आलास कीं काय? तूं त्याकरितां आला नसलास तरी मला त्याच बाबतींत तुला कांहीं विचारायचं आहे. तो पाजी मनुष्य मघाशीं तुझ्या बरोबर असल्यामुळें मला अधिक बोलतां आलं नाहीं. आतां तूं एकटा आहेस. जी काय खरी हकीकत असेल ती मला सांग."

राजारामानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो हंसला व त्याच्याकडे पाहात क्षणभर उभा राहिला. त्याच्या त्या हंसण्यांत कांहीं तरी विलक्षण अर्थ भरलेला होता, यांत संशय नाहीं. तो कांहीं बोलेना, तेव्हां पद्माकर पुनः त्यास ह्मणतो, "कां, मला तूं धाडणार, परंतु कां धाडणार, कोण धाडणार, कशाकरतां धाडणार, याचा खुलासा तर करायचा नाहीं, हा न्याय कुठला? या सर्व गोष्टी समजल्याखेरीज विचार करणारानं विचार तरी कसला करायचा?"

राजाराम पुनः एकदां पूर्वीप्रमाणेंच हंसला व मोठ्यानें म्हणतो, " अशी संधि आली असतां जायचं कीं नाहीं, हाच विचार, दुसरा विचार कसला ? मघाशीं मीही पण तुमच्याजवळ स्पष्टपणानं बोललों नाहीं. परंतु तुम्हालाच मीं विचारलं यांत आणखीही कांहीं हेतु होता. कांहीं एका मोठ्या आशेनं एखादी गोष्ट करावी, त्या आशेनंच आपलं इतर बाबतींत नुकसान करून घ्यावं, आणखी शेवटीं ती आशाही व्यर्थच व्हावी. आपण ज्याला आपली तहान भागविणारं पाणी असं समजून त्याच्याकडे धांव घ्यावी, तें शेवटीं मृगजळ आहे किंबहुना पिण्याला अगदीं अयोग्य असं वाईट दुर्गंधलेलं पाणी आहे, असं अनुभवाला आलं, म्हणजे मग मनुष्य तें सोडून जाण्याला किती तरी उत्सुक होतो !—असा कांहीं अनुभव तुम्हांला आहे का ? "

या शेवटल्या प्रश्नांत किती तरी अर्थ भरलेला होता ! आपल्या मनाची स्थिति यास खात्रीनेंच कळली असावी, असें पद्माकरपंतास वाटलें; परंतु आपल्या मनाची स्थिति कोणासही कळावी व त्यानें नंतर त्याबद्दल आपल्याशीं अधिक उणें बोलावें, आपल्यास होय नाहीं असें म्हणण्याची पाळी यावी, हें त्यास नको होतें. तसा त्याचे मनांत स्वाभिमान पूर्णपणें होता. त्यांत त्या स्वाभिमानानें त्यास अगदीं आपलेंसें करून घेतल्यामुळें राजारामाच्या बोलण्यानें त्यास विशेषच वाईट वाटलें. आपली सध्यांची स्थिति कांहीं विशेष प्रकारची झाली आहे, असें यास कळलें असल्यामुळेंच हा आपल्याशीं अधिक बोलण्यासाठीं आला असावा हेंही पण त्याच्या मनास पक्केपणें वाटलें. नंतर तो त्यास म्हणतो, " तुमच्या बोलण्याचा अर्थ मला मुळींच समजत नाहीं. मृगजळ काय, त्याच्यापासून मनुष्य दूर होतो काय, हें सगळं तुम्ही एखाद्या कोड्याप्रमाणं बोलतां काय, मला कांहींच समजत नाहीं. मी विचारल्या प्रश्नांचीं सरळपणें उत्तरं द्या म्हणजे त्यांत कांहींच पुनः पुनः विचारायला कारण राहणार नाहीं. "

कोणताही प्रश्न केला तरी राजारामाचें त्यास पहिलें उत्तर हंसणें हें होय. त्याप्रमाणें याही वेळीं तो हंसला व म्हणतो, " मी बोलतों तें कोड्याप्रमाणं बोलत नाहीं. त्याचा अर्थ तुम्हांला पूर्णपणें समजून चुकला आहे, पण मी आतां त्याचा उलगडा करून तुम्हाला दुखवीत नाहीं. तुमची जाण्याची इच्छा असली तर होय म्हणा, नसली तर नाहीं म्हणा. चार दिवस मुंबई सोडून जावं अशी तुमच्या मनास जरूरी वाटत असली तर हा प्रसंग चांगला आहे. वाटत नसली तर मग तुमचं चाललं आहे हें ठीकच आहे. तुम्हाला जरूरी वाटण्याजोगी स्थिति झाली आहे अशी माझी समजून आहे, पण अशा समजुती पुष्कळदां चुकीच्या ठरतात, तशी हीही ठरेल. त्यांत मोठसं काय ? "

पद्माकरपंत त्यास म्हणतो, " बरं मी जातों म्हटलं—जातों असं धरूं नका, परंतु जातों म्हटलं तर—माझ्याबरोबर तो पाजी येणार कीं काय ? "

राजाराम पुनः हंसला व म्हणतो, " तें कांहीं मी आतांच सांगूं शकत नाहीं. तुमचा नक्की बेत समजला म्हणजे मग त्या सर्व गोष्टींचा विचार करतां येईल. पाठविणाराच्या अटी जेव्हां तुम्हांला सांगितल्या जातील तेव्हां तुमच्याही कांहीं अटी असल्या तर विचारल्या जातील, त्यांत

तुम्हाला त्याच्याबरोबर जायचं नसल किंवा तो तुमच्याबरोबर नको असला तर ती एक तुमची अट धरा. तुमच्या आणि पाठविणाराच्या अटी जुळल्या नाहींत म्हणून तुमचं जाणं राहिलं तर ती गोष्ट निराळी; परंतु मुळींच तुम्हाला जायचंच नसलं तर अटी तरी करून काय करायचं आहे!"

पद्माकर कांहीं वेळ विचार करीत बसला व एकदम म्हणतो, "मी जाणार, कोण पाठविणार, कशाला पाठविणार, कां पाठविणार, तें मला सांग." राजाराम अगदीं संतोषमयदृष्टीनें पद्माकरपंताकडे पाहूं लागला. नंतर त्याला म्हणतो, "त्या गोष्टी मी तुम्हांला आतांच सांगूं शकत नाहीं. तुम्ही आपल्या नौकरीवर उद्यां न जातां माझ्याबरोबर मी नेईन त्या साहेबाकडे चला तेच तुम्हाला सर्व कांहीं समजावून सांगतील. त्यांची एक इंग्लंडांत मोठी थोरली ब्यांक आहे. तिथें त्यांना कोणीतरी इंग्रजी, मराठी वगैरे भाषा जाणणारा माणूस पाहिजे आहे. माझी तुमची ओळख व माझी आणखी त्या साहेबाचीही ओळख. त्यानं मला, "असा आपल्याला उपयोगी पडणारा कोणी माणूस आहे काय" असं विचारलं तेव्हां तुमचं मला स्मरण होऊन मी त्यास "आहे. मी त्याला विचारून तुम्हाला सांगतों" असं ह्मटलं आणि परवांपासून तुह्मांला शोधीत होतों तों आज आयतीच गांठ पडली. तिथें इंग्लंडांत काम काय, मराठीची जरूरी काय, तें मला कांहीं ठाऊक नाहीं. ऑलबॉशसाहेब तें तुम्हाला समजावून सांगतील. इकडल्या हुंड्या शेट्याभाट्यांच्या किंवा बोहऱ्यांच्या जातात त्या त्यांना पाठविण्यास फार अडचण पडते म्हणून आपल्या ब्यांकेंत तशा हुंड्या तिथें घेण्याची व त्या पुनः इथें पाठविण्याची व्यवस्था करण्यासाठीं कोणी तरी माणूस तिथें पाहिजे आहे असं त्यांचं कायसं दुसऱ्या एका साहेबाशीं बोलणं चाललं होतं, असं वाटतं. मग त्यांत काय असेल तें त्यांचं त्यांनाच ठाऊक. मला कांहीं त्यांत समजत नाहीं. तुम्ही माझ्याबरोबर चला, मी त्यांची तुमची ओळख घालून देतों, मग ते तुम्हाला कायतें स्वच्छ समजावून सांगतील!"

बिचाऱ्या पद्माकरपंतास अगदीं गोंधळल्याप्रमाणें झालें. त्याला स्वतःलाही ब्यांकेची कांहीं एक माहिती नव्हती, तेव्हां इकडून तिकडे मराठी, गुजराथी हुंड्या जाणार कसल्या आणि काय कसलें, हें कांहींच समजेना; अर्थातच त्यानें त्यासंबंधाचा खुलासा मिळावा म्हणून राजारामालाच प्रश्न विचारले. परंतु राजारामाचें उत्तर एक, "मला त्यांतली कांहीं माहिती नाहीं. तुम्ही मजबरोबर आलांत तर साहेब तुम्हाला सर्व माहिती करून देतील. आतां त्यासंबंधानं मला आणखी कांहीं विचारूं नका. आपल्या तयारीस लागा. या शुक्रवारीं नाहीं, पुढच्या शुक्रवारीं पण तुम्हाला ही जाण्याची संधि मिळणार खास!"

एवढेंच बोलून राजाराम थांबला नाहीं. लागलीच पुढें हंसून म्हणतो, 'आमचे प्रभाकरपंत अजून कांहीं आले नाहींत. इकडे कॉलेजांतून त्यांना वारंवार रजा तरी कशी मिळते कोणास ठाऊक, आणि मौज काय, गृहस्थ रजा घेतो तो आपल्या आईबापाकडे जातो का? ते गणपतराव आहेत कीं नाहीं तुमच्या सुधारकांचे अग्रणी ते त्यांचे देव. त्यांच्याकडे जातो आणि मी जर एखादे वेळीं भेटून कुठें

गेलां होतां, काय गेलां होतां, द्वारकाताईची प्रकृति कशी काय आहे, असं विचारलं तर धड उत्तरं देतच नाहीं. कमळाबाई कधीं येणार म्हणून विचारलं तर म्हणतो-पण तो एक आचरटच आहे-आपल्यावर त्यानं उपकार केले आहेत तेव्हां आपण त्याला नेहमीं पूज्यच मानणार; पण एकंदरींत भलेपणाचा प्रकार कमी म्हणून राहून राहून मनाला खेद आणखी आश्चर्य हीं वाटतात."

पद्माकरपंताच्या कपाळावर तावडतोब आंठ्या चढल्या आणि तो त्यास एकदम म्हणतो, "तुम्हीं त्याला तो प्रश्न विचारलांत तेव्हां तो काय म्हणाला हें सांगतां सांगतांच मधेंच त्याला नांवं कां ठेवूं लागलां ! तो काय म्हणाला, सांगा कीं !"

राजाराम पुनः एकदां खोटेंच हंसून म्हणतो, "खूप आहे महाराज ! स्नेहास्नेहांत खूप लावालावी करायला लावा आह्मांला म्हणजे म्हणतील या लेकावर त्या दोघांनीं इतके उपकार करून शेवटीं त्या दोघांत वैमनस्य आणण्याला हा कारण झाला. हा उद्योग मला कोणीं सांगितला आहे ? बोलणं कांहीं तरी झ लं, त्यांत तुह्मांला सांगितलंच पाहिजे असं कांहींसुद्धां नाहीं; पण बोलणाराची शहामत खरी. तुह्माला घरदार सोडून आईबापांची अवज्ञा करून असल्या भानगडींत पाडायला कारण झालां आपण, आणखी तुमच्या सुखांत माती कालवायला धडपडतो आहे आपणच ! अहो, त्यांतली मौज अशी कीं, हीं सुधारलेली मंडळी, यांच्या पोरीबाळींना श्रीमंती थाटानं रहायची झालेली संवय, आणखी तुह्मी म्हणणार तीस चाळीस रुपयांत संसार करायला या. तुमच्या तीस चाळीस रुपयांत एक चांगलासा हार्मोनियमसुद्धां येणार नाहीं. पहिल्या दोन महिन्यांचा पगार हार्मोनियममधेंच जाणार, तेव्हां तुह्मीं बोलाविलं तर या कशाला ! या माझ्या बोलण्यांत काय तुह्माला समजत असेल तें समजा......"

"मला नाहीं समजत !" पद्माकरपंत त्वेषानें खुर्चीवरून उठून उभा राहून राजारामाकडे कठोर दृष्टीनें पाहून ह्मणाला: "तो काय जें बोलला असेल तें स्पष्ट आणखी अक्षरशः मला सांग. तें सांगितल्याखेरीज तुला मी इथून हलूं देणार नाहीं मला सगळ्या गोष्टी समजताहेत, नाहीं असं नाहीं. पण तितका पुरावा असला म्हणजे फारच चांगलं. बोल, एक अक्षरदेखील मागें ठेवूं नको."

राजाराम तें ऐकतांच एखाद्या दैत्याप्रमाणें हंसला व हलकेंच मान हलवीत म्हणतो, "मला बसविणं, हलूं न देणं हें तुमच्या हातचं आहे, पण जें सांगूं नये असा माझा निश्चय झाला आहे तें माझ्याकडून सांगवून घेणं हें तुह्माला कसं करतां येणार ? तुम्ही सांगा म्हणत असाल, तर मी सांगतों. पण तें ऐकण्याचा तुम्हीं आग्रह धरूं नये हा शहाणपणाचा मार्ग आहे."

"हा जर शहाणपणाचा मार्ग होता, तर माझ्याजवळ मुळींच कांहीं बोलायचं नव्हतं. अर्धवट बोलून माझ्या अंतःकरणांत आग पेटवून देऊन मग हें शहाणपणाचं नव्हे, तें शहाणपणाचं नव्हे असलं ब्रह्मज्ञान सांगून माझी मजा कसली पहातोस ! बोल, जें काय तो खरोखर बोलला असेल तें अक्षरशः मला सांग."

"सांगतों बापडा, पण सहज कदाचित् थट्टेनंही जें तो मला बोलला तें तुम्हांला सांगून करायचं काय ! मला तर वाटतं माझी चेष्टा करण्याकरिताच कांहीं तरी बोलला झालं ! मला मात्र तें जरा चम-

त्कारिक वाटलं. कारण स्वर कांहीं चेष्टेचा नव्हता. तो ह्मणाला, 'अरे, याचा तीस चाळीस रुपड्यांत संसार करायला आपली कोवळी नाजूक पोरगी बळवंतराव पाठविणार कसं! हा मार लिहितो आहे पत्रं, पण त्याच्या पत्रांला उत्तरसुद्धां कोणी पाठवील कीं नाहीं, कोण जाणे!' दुसरं कांहीं तो म्हणाला नाहीं. मग तुम्हांला नाहीं का वाटत तें त्याचं चेष्टेचंच बोलणं असेल असंच!"

पद्माकरपंत अधिक कांहीं एक बोलला नाहीं. तो आपल्या वरच्या दांतांनीं खालचा ओंठ चावीत शून्य दृष्टीनें मान हलवीत राजारामापुढें स्वस्थ उभा राहिला.

---

# प्रकरण ४१ वें.

## विवंचनेंत विवंचना.



पद्माकरपंत मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें अनेक विचारांनीं खिन्न होऊन काय करूं व काय न करूं, अशा स्थितींत तळमळत असतां दुसरीकडे दुसराच प्रकार चालला होता. द्वारकाताईचें दुखणें उलटल्याकारणानें सर्व मंडळीचें तोंडचें पाणी पळालें होतें. बळवंतराव पुनः वरीचशी रजा घेऊन गणपतरावाकडे आले होते. क्षय झालेल्या माणसाची अशीच स्थिति असते. कांहीं दिवस बरें बरेंसें वाटतां वाटतां मध्येंच दुखणें उलट खाऊन पहिल्यापेक्षांही अधिक जोर करतें. गणपतरावाचे गांवीं आल्याबरोबर हवेचा बदल झाल्याकारणानें प्रथमतः द्वारकाताईस पुष्कळच बरें वाटलें; परंतु जोरानें जमिनीवर आपटलेल्या चेंडूप्रमाणें तें दुखणें पुनः उसळी मारून पहिल्यापेक्षांही दुप्पट जोर करतें कीं काय, अशी भीति सर्वांस वाटूं लागली. कमलेस तर फारच वाईट वाटूं लागलें. एक तर जिच्या ठिकाणीं तिचें अत्यंत प्रेम ती तिची आई पुनः आजारी पडली हें कारण आणि तिनें मनांत जी कांहीं आशा बांधली होती तिची निराशा झाली, हें दुसरें कारण. त्यांत आणखी आपलें पत्र गेल्या दिवसापासून पद्माकरपंतांचें पत्र नाहीं यामुळें तिला विशेषच काळजी लागली. आपण त्यांचें पत्र येण्याबरोबर गेलों नाहीं, यामुळें त्यांस राग आला असेल काय! अशीही शंका तिच्या मनांत आली. परंतु आईची प्रकृति एकाएकीं पुनः बिघडल्याकारणानें आपण गेलों नाहीं, हें वाचून त्यांस कधींही राग येणार नाहीं, आईच्या ठिकाणीं त्यांची तशी भक्ति आहे, असें म्हणून तिनें आपलें समाधान करून घेतलें. तथापि उलट टपालावर उत्तर यावयाचें तें, पत्र पोहोंचल्यानंतर पांच सात दिवस झाले, तरी आलें

नाहीं याचें कारण तिला समजेना. तिनें नानाप्रकारच्या कल्पना केल्या, परंतु एकही कल्पना समाधानकारक दिसेना. जो जो पत्रावांचून दिवस जाई तो तो तिच्या मुखकमलावर चिंतेच्या छायेचें एक एक बारीक पटल चढवीत असे. इकडे अंथरुणावर पडलेल्या तिच्या आईनेंही तिला रोज रोज पद्माकरपंतांचें पत्र आलें काय म्हणून विचारावें आणि तिनें, नाहीं, असें उत्तर दिलें म्हणजे खिन्न होऊन आश्चर्योद्गार काढावा. आपलें दुखणें उलटलें असें ऐकतांक्षणींच पद्माकरपंत आपल्या समाचारास येईल असें तिला वाटलें होतें, परंतु आतां त्यानें चाकरी धरली असल्याकारणानें प्रथमतःच रजा वगैरे मिळणें शक्य नसेल असें तिनें समाधान करून घ्यावें. तरी पत्राचें उत्तर येऊं नये, आपल्या प्रकृतीची विचारपूस करण्यासाठींसुद्धां त्यानें पत्र लिहूं नये, याचें तिला आश्चर्य वाटल्याखेरीज राहिलें नाहीं. सरते शेवटीं एक दिवस "तूं तरी त्यांना पुनः एक पत्र लिही" असें कमलेस तिनें म्हटलें, इतकेंच नव्हे तर गोपाळाकडून आपल्या समक्ष तिनें पद्माकरास पत्र लिहविलें; परंतु गोपाळाचे पत्राचेंही उत्तर नाहीं. तेव्हां मात्र त्यांस फारच आश्चर्य वाटलें, इतकेंच नव्हे तर काळजीही वाटूं लागली. सरते शेवटीं पद्माकरपंतांची व्यवस्था काय आहे, त्याचा पत्ता काय वगैरे माहिती मिळविण्यासाठीं बळवंतरावांनीं व गणपतरावांनीं आपल्या कोणा तरी स्नेह्यास निराळें पत्र लिहावें, असा द्वारकाताईनीं आग्रह धरला. किंबहुना पद्माकरपंतांचे नांवानें एक तार करून तिचा जबाब येतो कीं नाहीं तें पहावें, असेंही तिनें खिन्नपणें सुचविलें.

परंतु तसें करण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. पद्माकरपंताचें कमलेस पत्र आलें तें पहातांच तिचें मन व त्याबरोबर तिचें मुखही प्रफुल्लित झालें. पत्र लहानसेंच होतें. परंतु तें आलें या आनंदाच्या भरांतच तिनें तें किती वेळां तरी वाचलें आणि हास्यमुखानें आपल्या आईस व इतर मंडळीस सांगण्याजोगा मजकूर होता तेवढा सांगितला. चाकरीमुळें दगदग फार होते. द्वारकाताईच्या समाचाराकरितां येण्याची अतोनात इच्छा झाली होती. परंतु रजा न मिळाल्याकारणानें ती इच्छा तशीच दाबून ठेवावी लागली. रोज संध्याकाळीं चिन्हाडीं आल्याबरोबर पत्र लिहायास बसेन बसेन म्हणून जप करीत असें, परंतु थकवा आल्याकारणानें दुसरे दिवसावर लोटावें असें होऊन पत्र पाठविण्यास दिवसगत झाली. काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. द्वारकाताईस चांगलें बरें वाटून त्या मुंबईस येण्याजोग्या होईपर्यंत त्यांचेपासून हलूं नये. माझें इकडे कसें तरी चाललेंच आहे. सवडींत सवड करून मी केव्हां तरी मधेंच तिकडे येऊन जाईन. माझें पत्र वेळचे वेळीं न आलें तरी काळजी करूं नये. आपण मात्र नेहमीं पत्र पाठवीत असावें. इ० इ०. व प्रेमळ पतीनें आपल्या नववधूस लिहिण्याजोगा आणखीही कांहीं प्रेमळ मजकूर आंत होता. तो जाणण्याची इच्छा वाचकांनीं करूं नये आणि यदाकदाचित् केली, तरी ती तृप्त करण्याचें पाप मी करीत नाहीं.

तें पत्र आल्या वेळेपासून कमलेनें इतक्या वेळां वाचलें कीं, तिच्या भावानें तिची सर्वांदेखत त्याबद्दल थट्टाही केली; परंतु हा आनंद सुमारें तीन दिवसांचे वर राहिला नाहीं. तें पत्र आल्या दिवसापासून तिसरे दिवशीं तिनें त्याचें

उत्तर पाठविलें आणि चौथे दिवशीं टपालवाल्यानें तिच्या नांवचें एक पत्र आणून दिलें. त्या पत्राचें अक्षर पहिल्याप्रमाणें नव्हतें. आपल्यास लिहिणारा हा दुसरा माणूस कोण, हें तिला समजेना. पत्र फोडण्यापूर्वीच तिनें तें उलथेंपालथें करून पाहिलें. पत्र फोडून पहावें कीं नाहीं याचीच तिला शंका वाटूं लागली. फोडून पाहिलें असतां आंत कांहीं तरी आपल्यास अनिष्ट असें लिहिलेलें असावें, असें तिच्या मनास अगदीं नैसर्गिकपणें वाटलें. शेवटीं तिनें तें फोडलें व पहाते तों अगदीं अनोळखी अक्षरानें एवढाच मजकूर लिहिला होताः—

"केल्या कर्माचा पश्चात्ताप होऊन मी वाटेल तिकडे निघून जातों. मला तुझा इतका तिटकारा आला आहे, कीं स्वतः पत्र लिहूं नये, असें वाटून आजपर्यंत तुला पत्र लिहिलें नाहीं आणि आजही दुसऱ्याच एका स्नेह्याकडून हें पत्र लिहवितों आहें. मीं आपल्या हातांनीं मीं आपली अशी विलक्षण स्थिति करून घेतली. तुझ्या स्वरूपावर भुललों, घरास सोडलें, घरादारास मुकलों, स्वतःच्या आईची काळजी केली नाहीं, त्या सर्वांचें बक्षीस मला फार उत्तम मिळालें. मोठ्या कष्टानें नोकरी मिळवून बिऱ्हाडाची जागा पाहून तावडतोब निघून येण्याबद्दल लिहिलें. त्याचें उत्तर गणपतरावांकडून आलें, कीं एव्हां बिऱ्हाड वगैरे करून आमच्या मुलीचें मातेरें करूं नका. तुमच्या तीस चाळीस रुपड्यांत संसार काय होणार ! असलें तिरस्काराचें पत्र त्यांचें, शिवाय त्यांत द्वारकाताईची प्रकृति फार उत्तम सुधारली आहे असें लिहिलेलें, आणि त्याच दिवशीं तुझें पत्र हातीं येतें त्यांत "आईची प्रकृति फार बिघडली आहे" असें लिहिलेलें ! बरें प्रभाकराला तातडीनें तुझें बोलावणें आणि तो निघून जातो, पण मला विचारीतही व कळवीतही नाहीं. हें गौडबंगाल तुमचें तुम्हांलाच माहीत ! मी एवढेंच सांगतों कीं आतां पुनः तुला माझें अनिष्ट तोंड दिसणार नाहीं, तूं काळजी करूं नकोस. तुझा बाप, तुझी आई, तुझ्या बापाचे ते स्नेही आणि आणखीही कोणी खुशाल एकमेकांच्या समागमांत आनंदानें रहा. मी कोठें गेलों याची चौकशी करून कांहीं फळ होणार नाहीं. कारण मी कोठें जाणार, हें मुंबईंत एकालासुद्धां ठाऊक नाहीं."

पत्राचे खालीं सही वगैरे कांहीं एक नव्हती. पत्र वाचतां वाचतां कमलेची फार विलक्षण स्थिति झाली. तिच्या उरांत धडकी भरली. इतकी कीं, तें धडधडणें तिचें तिला तर ऐकूं येतच होतें, परंतु त्या वेळीं तिच्याजवळ जर दुसरें कोणी असतें तर त्यालाही तें ऐकूं गेलें असतें. तिच्या डोळ्यांतून एकसारखा अश्रुपात होऊं लागला. तीन दिवसांपूर्वीं आलेल्या पत्रांतील मजकूर काय आणि या पत्रांतील मजकूर काय, असें मनांत येऊन तिला कांहीं सुचेनासें झालें, इतकेंच नव्हे, तर तीन दिवसांपूर्वीं आलेलें पत्र आपल्या पतीचेंच काय अशीही पण तिला शंका आली. कां कीं, या पत्रांत तें पत्र आपण पाठविलें असल्याचें मुळींच नमून उलट आजपर्यंत मुळींच पत्र पाठविलें नाहीं, असेंच ध्वनित केलेलें होतें. आपली शंका बरोबर आहे कीं नाहीं, हें पहाण्यासाठीं तिनें पहिलें पत्र आपल्या पेटींतून काढण्यासाठीं पेटी उघडली; परंतु तें उचलून घेण्यास तिचें धैर्य होईना. आपली शंका खरी ठरेल काय ! तें पहिलें पत्र कोणीं

तरी आपल्यास फसविण्यासाठीं खोटेंच लिहिलें असेल काय ? परंतु विनाकारण खोटें पत्र लिहून आपणास कोण कशाला फसवील ? नाहीं म्हणावें, तर या पत्रांत तें पत्र लिहिल्याचा उल्लेख कां नाहीं ? असे एकमेकांशीं सुरुद्ध विरुद्ध विचार तिच्या मनांत उभे राहिले आणि त्या विचारांचें तुमुल युद्ध चाललें असतां असतांच तिला नकळत तिच्या हातांनीं तें पहिलें पत्र उचलून उघडलें आणि पुनः एकवार तिची नजर त्या अक्षराकडे गेली आणि एकदम तिला असें वाटलें, कीं त्या पत्राचें अक्षर आपल्या नवऱ्याच्या अक्षरासारखें हुबेहूब खरें; परंतु त्यापूर्वीं आलेल्या त्याच्या पत्राच्या अक्षराप्रमाणें खास नव्हे. अशी शंका येतांच ती तें अक्षर बारकाईनें निरखून पाहूं लागली. जों जों असें निरीक्षण तिनें केलें, तों तों तिची शंका आपलें रूप टाकून खात्रीचें रूप घेऊं लागली. सरतेशेवटीं तिनें जुनीं पत्रें काढून त्या पत्रांचें अक्षर व या नव्या पत्राचें अक्षर ताडून पाहिलें आणि तिची पक्की खात्री झाली, कीं ज्या पत्रानें आज तीन दिवस आपणास येवढा आनंद दिला तें पत्र आपल्या पतीच्या हातचें खचित् नव्हे. कोणी तरी आपल्यास फसविण्याकरितां तें लिहिलेलें असावें. हा विचार एकदां मनांत येतांच तिचें धैर्य खचलें, ती भ्रांतिवटाप्रमाणें एका तळहातावर दुसरा तळहात ठेवून सचित अशी आपल्या त्या उघड्या पेटीपुढें शून्य दृष्टीनें कोणीकडे तरी पाहात बसली, दोन्हीं पत्रां मिळून एकंदर खरी गोष्ट आहे तरी काय, याचा विचार करण्याइतकें सुद्धां तिच्या अंगीं त्यावेळीं बुद्धिसामर्थ्य राहिलें नाहीं. कोणापाशीं जाऊन तीं पत्रें दाखवून त्यांचा विचार घ्यावा, ही कल्पनासुद्धां तिला सुचेना. ती वयानें बाला, तशीच बुद्धीनेंही बालाच होती; परंतु त्या तेवढ्या प्रसंगानें तिच्या मुखावरून बाल्याची कांति एकदम दूर झाली. क्षणार्धांत ती जणूं काय दहापंधरा वर्षांनीं वृद्ध असलेल्या चिंतापीडित पतिपरित्यक्त अशा गृहिणीप्रमाणें दिसूं लागली. त्या तासा दोन तासांत तिच्या चर्येवर होत जाणारे बदल जर कोणी एकसारखे पाहात राहाता, तर त्याचें मनही तसेंच उद्विग्न होत होत पूर्णपणें तिच्या मनाशीं संमीलित होऊन गेलें असतें; परंतु तसें कोणी त्या वेळीं तिजजवळ नव्हतें. प्रथमतः अलोटपणें होणारा अश्रुपात पुढें बंद झाला, आटला. पतन पावण्यास तिच्या डोळ्यांत अश्रु राहिला नाहीं. त्यांत एके वेळीं आरक्तवर्ण परंतु आतां पांडुरवर्ण बनत चाललेल्या गालांवरून गेलेले अश्रूंचे ओघळ पुसण्याचेंही भान तिला न राहिल्याकारणानें ते तसेचे तसेच वाळून जाऊन त्यांजवर मलिनता दिसूं लागली.

वर वर्णिलेल्या अवस्थेंतच ती कितीवेळ तरी तटस्थपणें बसून राहिली होती. तिच्या पलीकडल्या खोलींत अंथरुणावर पडलेल्या तिच्या आईनें दोन चार वेळां हांका मारिल्या, परंतु जेथें चित्तच ठिकाणावर नाहीं, तेथें श्रवणशक्ति तरी कोठून ठिकाणावर असणार ! सरतेशेवटीं तिचा भाऊ तिला हांक मारण्यासाठीं म्हणून तेथें आला. त्यानें तिला हांक मारिली. तेव्हां अर्धवट शुद्धीवर आल्याप्रमाणें तिनें मागें वळून त्याजकडे पाहिलें.

परंतु तो आपणास हांका मारतो आहे कीं दुसरेंच कांहीं करतो आहे, याचीच समजूत तिला पडेना. ती तशीच वेड्यासारखी त्याजकडे पाहात राहिली. ही असें

काय करतें, आपली पेटी उघडून नुसतीच तिच्यापुढें काय बसली आहे, असें त्यास वाटून तो तिला हंसत हंसत म्हणतो, "एकशेंआठ वेळां तें पत्र वाचण्याचा संकल्प केला आहेस कीं काय?" परंतु त्याच्या त्या हंसण्याचा तिच्या चेहऱ्यावर अर्थातच अनुवाद झाला नाहीं. न जाणों तो जें काय बोलला त्याचा अर्थही तिच्या विषण्ण व शून्य मनांत उतरला नसेल. आपल्या विनोदाच्या भाषणानें ती हंसली नाहीं,तेव्हां गोपाळास असें वाटलें,कीं आपण बोललों त्याचा तिला राग आला असावा. नाहीं तर ती अशी मुग्ध बसायची नाहीं. असें मनांत येऊन तो "ताई, मीं तुझी थट्टा केली त्याचा तुला राग आला होय!" असें पुनः हंसत हंसत म्हणत तिच्यापुढें गेला आणि तिच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला.तेव्हां ती रडत असावी असें त्यास स्पष्ट दिसलें. त्याच्या बालमनास तें सर्वच चमत्कारिक वाटलें. त्यामुळें तिला तो पुनः विनोदानें ह्मणतो, "आपल्याला मुंबईस लौकर जायला सांपडत नाहीं, ह्मणून तूं एकीकडे येऊन रडत बसली आहेस होय!" याही त्याच्या प्रश्नास तिनें उत्तर दिलें नाहीं. केवळ वेड्यासारखें तिनें त्याच्याकडे पाहिलें.

त्यानंतर गोपाळा तेथें आणखी उभा राहिला नाहीं. आईजवळ जाऊन त्यानें, "ताईला मीं हांक मारिली, पण तिनें ओ दिली नाहीं. ती आपली पेटी उघडून एकटीच वेड्याखारखी पेटीपुढें बसली आहे, रडत होती, असें वाटतें. मीं तिची थट्टा केली तरी ती बोलेना, हंसेना, कांहीं देखील करीना." वगैरे मजकूर द्वारकाताईस सांगितला.

कमळा, रडणें आणि अशा तऱ्हेनें, हीं जपर्यंत कधींही एकत्र दिसलीं नव्हतीं, यामुळें द्वारकाताईस तें त्याचें बोलणें मुळींच खरें वाटेना. 'बसली असेल उगीच! वेड्या, रडेलरे कशाला! जा, तिला ह्मणावं मी इकडे बोलावतें आहें,' असें म्हणून द्वारकाताईनीं त्यास तेथून पाठविलें. ती रडेल कशाला, असें त्यांनीं गोपाळास ह्मटलें खरें, परंतु लागलीच त्यांचें त्यांसच असें वाटलें कीं, न जाणों आपलें दुखणें असें वारंवार उलटतें, कित्येक वेळां आपल्या जगण्याची अगदीं निराशा होते यामुळें ती एकांतांत असतां तिला रडूं येणें अगदीं साहजिक आहे. आपण फार दिवस जगत नाहीं, आपला नवरा, आपली मुलगी, आपला मुलगा, आपले गणपतरावभाऊजी, या सगळ्यांनीं जीवापलीकडे श्रम करून आपली काळजी घेतली तरी फार तर वर्ष सहा महिने आपण जगूं, त्यापलीकडे जगणें शक्य नाहीं, हें त्यांचें त्यांस दिसून येतच होतें; आणि हाच आपल्या बद्दलचा विचार तिच्याही मनांत येऊन ती एकांतांत बसली असतां तिला रडूं येणें साहजिक आहे, हेंही पण त्यावेळीं त्यांस वाटलें. आपला धीर सुटेल म्हणून आपल्या देखत ती रडत नसावी, एकीकडे एकटीच बसली ह्मणजे रडत असेल, यामुळें आपल्याला तें आजपर्यंत समजलें नसेल.

असा विचार त्यांचे मनांत येऊन त्यांस असें वाटलें, कीं तिला एकदां आपल्याजवळ बोलवावें आणि तिची समजूत घालून आपल्या मरणासाठीं तिचें मन तयार करून ठेवावें असें त्यांच्या मनांत येण्यास आणि गोपाळानें बोलावून आणलेली कमला तेथें येण्यास एकच गांठ पडली. त्यांनीं तिला आपल्याजवळ बोलाविलें. गोपाळास कांहीं वेळ बाहेर जाण्यास

सांगितलें. ती बसल्याबरोबर तिच्या पाठीवरून हात फिरविला आणि आपल्या त्या क्षीण परंतु ममतापूर्ण शब्दांनीं तीस ह्मटलें, "कमले, पोरी, तूं अशी एकीकडे बसून कां रडत बसली होतीस ? कोणाची आई कधीं कोणाच्या जन्मास पुरली आहे ? कोणाची लौकर, तर कोणाची उशीरां जायचीच, त्याबद्दल नेहमीं खेद करून काय उपयोग ? माझ्या नशिबानं आणखी तुझ्याही नशिबा ं तुला तळहातावरल्या फोडाप्रमाणें वागवील, तुझ्या जिवाला अणुरेणुमात्र दुःख देणार नाहीं, असा पति तुला मिळाला आहे. आतां मी आणखी जगून काय करणार आहें ? आयुष्य कोणाला नको ? जितकं मिळेल तितकं प्रत्येकाला हवंच; पण खरं पुसशील, तर मी आतां मरणाला अगदीं तयार आहें. माझी कसलीही आशा आतां उरली नाहीं. तुझं लग्न कसं होईल, तुला नवरा कसा मिळेल, हीच कायती मला काळजी होती. तुझ्या लग्नाच्या गोष्टी निघाल्या ह्मणजे कोणी म्हणत, अनाथबालाश्रमांतला एखादा मुलगा पाहून त्याला घरांत बाळगून त्याच्याशीं हिचं लग्न करून द्यावं; कोणी ह्मणत, दुसऱ्या एखाद्या जातीचा बरासा मुलगा पाहून लग्न करून टाकावं; कोणी ह्मणत, अशीच राहूं द्यावी. जों जों लोक असं म्हणत, तों तों माझ्या काळजाला चरके बसल्याप्रमाणें होई. पण देवाला माझी काळजी, त्यानं माझं गाऱ्हाणं ऐकलं. त्यानं मला सोन्यासारखा जावई दिला, आतां एकदां त्याला आणखी तुला उशाशीं बसवून एकमेकांचे हात एकमेकांचे हातांत घालून ते तसेच मीं आपल्या हातानें धरून प्राण सोडला, म्हणजे मला कांहीं सुद्धां दुःख वाटणार नाहीं."

आपल्या नवऱ्याचं नांव आईनं पुनः अशा तऱ्हेनं काढलेलं ऐकतांक्षणीच इतक्या वेळ मोठ्या कष्टानं दाबून ठेवलेला अश्रुसंचय एकदम तिच्या डोळ्यांवाटे बाहेर येऊं लागला व एक हुंदकाही फार मोठ्यानें बाहेर पडला. तें पाहतांच आपल्याकरितांच ही इतकी रडते आहे अशाबद्दल त्यांच्या मनाची खात्री झाली व त्या लागलीच कमलेस म्हणतात, "पोरी, इतका वेळ तुला समजावून सांगितलं त्याचा हाच का उपयोग केलास ? देवाच्या मनांत जितके दिवस मला ठेवायचं असेल, तितके दिवस तो ठेवीलच, पण जरी त्यानं मला लौकर आपल्या घरीं नेलं, तरी आतां त्याबद्दल वाईट वाटायला काय बरं कारण आहे ! प्रत्येक गोष्टींत आपल्याच मनाप्रमाणें त्यानं करावें, असें त्याच्यावर ओझं आपण काय म्हणून घालावं ? समज कीं, मी जगलें, आणखी पन्नास वर्षं अशी खितपत पडून जगलें, म्हणून तूं काय मजजवळ राहणार आहेस ? तुझा तुला संसार नाहीं ! माझ्याजवळ राहून मला तरी सुख वाटेल. तूं आपल्या घरीं सुखानं संसार करूं लागलीस, हें पाहाण्यांत आणि ऐकण्यांत जें मला सुख आहे, त्याची तुला कशी कल्पना होईल ? उगी, तूं अगदीं रडूं नकोस. मी जरी आतां येथें राहिलं तरी, तुला लौकर पाठवून देणार आहें. मी स्वतः येऊन तुझा संसार थाटून दिला असता, तर मला जितकं अधिक समाधान झालं असतं; पण नाहीं तें माझ्या नशिबीं; तरी तूं जाऊन संसार थाटल्याचं पत्र आलं ह्मणजे सुद्धां कमी समाधान होईल असं नाहीं."

द्वारकाताई जों जों असें बोलत तों

तों कमलेस अधिकाधिकच जोराचे हुंदके येत. बिचाऱ्या द्वारकाताईस काय ठाऊक, कीं हिच्या रडण्याचें मूळ आपलें जवळ आलेलें मरण नव्हे, दुसरेंच कांहीं आहे! कमलेचे हुंदके जों जों अनावर होत चालले, तों तों द्वारकाताईस असेंच वाटू लागलें कीं, आपल्या मरणाची कल्पना आणि त्यासंबंधाचें आपलें हें बोलणें हिला दुःसह होऊन ही अधिकाधिक रडत आहे. एक वेळा केव्हां तरी हें होणारच होतें आणि व्हायला पाहिजेही होतें, असें त्यांच्या मनास वाटून त्या वारंवार तेंच तेंच बोलल्या व त्यांत तिला समाधान वाटावें म्हणून तिच्या नवऱ्याचें नांव त्यांनीं काढावें, ती नवऱ्याजवळ राहून जो संसार थाटील त्याचें वर्णन करावें आणि अशा तऱ्हेनें तिचें मन घट्ट बनवून आपल्या चिरवियोगास तयार करावें, अशाकरितां प्रयत्न चालविला होता. परंतु त्या त्यांच्या प्रयत्नाचा कमलेच्या मनावर अत्यंत विपरीत असा परिणाम होत होता. थोड्या वेळेपूर्वी तिच्या हातीं आलेल्या त्या पत्रानें नवऱ्यापासून झालेल्या चिरवियोगाचें वर्तमान आणून दिलें होतें व आंतील अत्यंत कठोर शब्दांनीं तिच्या कोमल मनावर अतिशय दुःसह असे प्रहारावर प्रहार केले होते. त्या वेदनांच्या योगें ती इतर सर्व गोष्टी पूर्णपणें विसरून गेली होती. परंतु आईच्या या दुःखद भाषणानें ती सर्व स्मृति जागृत होऊन आपल्यास आतां पतीचाचसा काय, आपल्या या प्रेमळ मातेचाही चिरवियोग होणार, असें स्पष्ट दिसून सर्व जग केवळ अंधारमय झालें!

# प्रकरण ४२ वें.

## काकासाहेबांचे घरीं.



गंगापुरास काकासाहेब म्हणजे एक मोठें प्रस्थ आणि त्यांत आतां दादासाहेबांसारख्या माणसांची हुर्रेवडी उडविण्याचें महत्कृत्य त्यांनीं हातीं घेतलेलें, तेव्हां मग काय विचारतां! त्यांच्या पक्षाच्या भिक्षुकांकडून त्यांची अशी बडेजाव होत चालली कीं बा! दिवसानुदिवस दादासाहेबांसही असें वाटूं लागलें कीं, आपण आपला आग्रह धरून येथें राहिलों, ही अगदीं चूक केली. ज्या गांवांत आपण नव्यानें आलों, त्या गांवांत अशा कुऱ्यानें वागून कसें चालणार? असे विचार त्यांच्या अंतःकरणांत येऊं लागले खरे, परंतु ते त्यांनीं एका वेळीं एका मिनिटावर कधींही टिकूं दिले नाहींत. आपलें आजपर्यंत ब्रीद जाऊं देऊन आपण आपल्या प्रति-

पक्षाला पाठ दाखवून पळून जाणें, किंवा त्याच्या म्हणण्यास 'हो'ला 'हो' देवून देऊन त्याच्यापुढें नामर्दपणें वांकणें, हें त्यास कालत्रयींसुद्धां पसंत पडणार नव्हतें. आतां आपण आलों आहोंत, तर काय वाटेल तें झालें, तरी येथून हलावयाचें नाहीं, किंवा या काकासाहेबासारख्या क्षुद्र माणसापुढें वांकावयाचें नाहीं, या आपल्या पूर्वनिश्चयाला ते अगदीं बळकट धरून बसले. काकासाहेब आपल्या तोंडपूजकांना रोज आश्वासन देत होते कीं, दादासाहेब मुकाट नाक धरून दोन दिवसांत आपल्या पुढें येतील आणि प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घ्या म्हणून म्हणेल; परंतु आश्चर्य एवढेंच कीं, ते दोन दिवस रोजच्या रोज पुढें जात. ते कधीं सरले नाहींत. परंतु सध्यां आपणांस बाहेरच्या काकासाहेबांशीं कांहीं करावयाचें नाहीं. घरांतल्या काकासाहेबांची ओळख करून घ्यावयाची आहे.

पुष्कळ व्यक्ति अशा असतात कीं, त्यांचीं घरांतलें आणि बाहेरलें अशीं दोन स्वरूपें असतात. कित्येक बाहेर अगदीं कर्दनकाळ-निदान उग्रावतार-परंतु घरांत ताटाखालचे मांजर! बाहेर-आपल्याहून कनिष्ठ कोकांशीं बोलण्याचालण्याचा व हुकूम सांगण्याचा प्रसंग आला म्हणजे यांचे डोळे विस्तारतात, नाक फुगतें, मान ताठ होते आणि शब्द ठसठसीत निघूं लागतो; परंतु घरांत ते तशा प्रकारचा उग्रावतार धारण करण्याच्या भानगडींत पडत नाहींत असें नव्हे, ते तितकी ती भानगड करूं पाहतात, परंतु त्यांच्या अवताराला कोणी जुमानीत नाहीं. याचें कारण काय असेल तें हरि जाणे! मला वाटतें, अशा माणसांची खरी किंमत घरांतल्या मंडळीस पूर्णपणें ठाऊक असते. बाहेरच्या लोकांस फक्त दिसाऊ किंमत ठाऊक असते. असो; काकासाहेब या अशा व्यक्तींपैकीं एक होते. घरांत त्यांचें कांहीं चालत नसे.

घरांतील कारभार त्यांच्या घरीं आलेल्या एका वहिनींकडे होता. त्यांचें चवथें कीं पांचवें (कितवें याबद्दल त्यांचें त्यांनासुद्धां स्मरण असेल कीं नाहीं कोण जाणे,) कुटुंब आतां वयांत आलें होतें. यामुळें अर्थातच घरांत दुही माजूं लागण्यास सुरुवात झाली होती. वन्संचा तोरा काकासाहेबांच्या गृहिणीस न खपून तो तोरा काढून टाकण्याची त्यांची एकसारखी खटपट चालली होती. यामुळें घरांत कच्याकचीस सुरुवात झाली. प्रथम प्रथम काकासाहेब आपल्या भगिनीस वाईट वाटूं नये म्हणून पत्नीस गप्प बसवीत, परंतु वहिनीबाई जसजशा मोठ्या होत चालल्या, तसतसा काकासाहेबांचा धाक कमी होत जाऊन काकासाहेबांसच त्यांचा धाक वाटूं लागला! आणि त्यांनीं आपल्या भगिनीसच सामोपचाराच्या गोष्टी सांगून घरांत शांतता रहाण्याचा यत्न चालविला. परंतु जिनें आजपर्यंत घरांत एवढा कारभार चालविला, ती पंधरा सोळा वर्षांच्या पोरीच्या अंमलाखालीं मुकाट्यानें कशी राहणार! हरघडी दोघींचें भांडण जुंपूं लागलें. वन्संनीं भावजयीला, "तूं भिकारड्याची पोरगी दिमाख दाखविशील तर मी सहन करून घेईन कीं काय!" असें म्हटलें आणि भावजयीनें, "मी भिकारड्याची पोरगी असो कीं कशी असो, पण आतां इथली मालकीण मी आहे, आणखी माझ्या घरीं तुम्ही तुकडे मोडतां आहांना, तुमच्या सासरीं तेवढेसुद्धां नाहींत म्हणून!"

असें फारच मर्मभेदक प्रत्युत्तर केलें. मग काय विचारतां! एकदम खूपच भडका उडून गेला आणि बाहेरल्या ओटी-वर बसलेल्या काकासाहेबांच्या कानाला त्यांच्या ज्वाळांचे चटके बसूं लागले. हें आहे तरी काय, असें होऊन ते चवकशीसाठीं आंत गेले. तों एक-सारखी शब्दांची मारामारी चाललेली त्यांच्या दृष्टीस पडली. त्यांचें कुटुंब आतां त्यांना मुळींच लागेनासें झालें होतें. एकी-च्या मनांत आपण इतकीं वर्षें मालक म्हणून कारभार केला असतां आतांच या गुडघ्याएवढ्या पोरीनें काय म्हणून आपल्यास झुडकावून लावण्यास पहावें ! दुसरीच्या मनांत आपण खरी मालकीण असतां आपल्यास एके बाजूस सारून हिनें आपला तोरा काय म्हणून चालवावा ! नणंदेस वाटत होतें, कीं आजपर्यंत आपण अशा चार भावजया वागविल्या व वाटेस लाविल्या, आतां ही कानापाठी-मागून आलेली, तिचें काय म्हणून प्रस्थ माजूं द्यावें ? भावजयीस वाटत होतें, कीं आजपर्यंत यांनीं चालविलेला धुडगुस पुरे झाला. यापुढें आपण आपला अंमल बसवून नणंदेचें कांहीं चालेनासें करावें. आपल्या माहेरचीं माणसें आणून आपले-जवळ ठेवावा आणि नणंदेला केवळ दोन वेळच्या जेवणाची धनीण करून ठेवावी. असा प्रकार ज्या घरांत सुरू होतो त्या घरांत चाकरनोकरही विभागून दोन पक्षांस मिळतात. काकासाहेबांची बहीण आज-पर्यंत त्यांचे घरांतील संसार फार दक्षतेनें चालवीत. आल्याकारणानें चाकरनोक-रांचें कांहीं चालत नसे. त्यामुळें अर्थातच त्यांचेवर पुष्कळ नोकरांचा रोष झाला होता. घरांतील कर्त्या माणसास या गोष्टींचा अनुभव असतोच, त्याप्रमाणें याही घरांत झालें होतें. कित्येक वेळां कित्येक चाकरनोकरांनीं ताईसाहेबांस दुरुत्तरेंही केलीं होतीं. परंतु काकासाहेब त्यांचा पक्ष घेऊन कोणासही शासन करण्यास खंबीर असल्याकारणानें असले अपराध कधींही कोणाचे हातून दोन वेळां झाले नाहींत. पण गेल्या वर्ष दीडवर्षांत तो मनु बद-लला. वहिनीबाई ताईसाहेबांची मात्रा चालूं देत नाहींत, अशी चाकरनोकरांची पक्की खात्री झाली आणि आपलें आतां फावण्यास हरकत नाहीं, असें त्यांस वाटलें. इकडे काकासाहेबांचा खंबीरपणाही हलके हलके कमी होत चालला. वार्धक्यांत शरीराच्या शिथिलतेबरोबर मनासही शिथिलता येत जाते तशी त्यांचे मनास येत चालली.

अर्थातच तो रंग चाकरमाणसांनीं ओळखून मावळत्या चंद्रप्रभेस सोडून उगवत्या सूर्यप्रभेची आराधना करण्यास सुरुवात केली. ताईसाहेबांनीं अमुक गोष्ट केली, त्या वहिनीसाहेबांविरुद्ध अमुक अमुक बोलल्या, अमुक जिन्नस अमक्या माणसास त्यांनीं विनाकारण दिला आणि वहिनीबाई काय ह्मणतील असा प्रश्न केला असतां, " तिला कोण भिकारडीला विचा-रतं आहे ! " असें ह्मणाल्या, अशा चुगल्या वहिनीबाईच्या कानावर जाऊं लागल्या. वहिनीबाई आधींच अल्पवयी, त्यांत दरिद्री बापाच्या घरीं दारिद्र्यांत वाढलेल्या. काकासाहेबांसारख्या जहागिरदाराच्या चौथ्या कीं पांचव्या [illegible] झालेल्या, तेव्हां त्यांस थोडा [illegible] गा येणें किती साहजिक होय! त्यांत आणखी वहिनीसाहेबांचें घरचें शिक्षण फारच चम-त्कारिक प्रकारचें असल्यामुळें भरींत भर

पडली होती. त्यांचे मनाचा दृढनिश्चय झाला, कीं आपल्या नणंदेचें कांहींही चालूं द्यावयाचें नाहीं. बहुतेक चाकरनोकरांस तें इष्टच होतें. यामुळें बहुतेक मंडळी वहिनीबाईंचे पक्षास मिळाली. एकदोन जुने नोकर होते ते मात्र या नवीन मालकिणीला प्रतिकूल राहून ताईसाहेबांच्या पक्षास चिकटून राहिले होते. अशी एकंदर स्थिति होती. प्रत्येक गोष्टींत एकीनें नाहीं ह्मटलें कीं दुसरीनें तें हटकून करावयाचेंच, असा क्रम सुरू झाला व काकासाहेबांस घरामध्यें 'दे माय धरणी ठाय' होण्याची पाळी आली. आपला भाऊ पहिल्याप्रमाणें आपला पक्ष घेत नाहीं, दुबळ्याप्रमाणें "जाऊंदे, जाऊंदे. ती अजून लहान आहे, तिच्याच मतानं का घेईनास ! तुला तरी काय करायचं आहे !" असें ह्मणून आपल्यास पड घेण्यास लावतो, याची ताईसाहेबांस मोठी चीड येऊं लागली. परंतु चीड येऊन करते काय ! आपल्याशींच मुकाट्यानें बसण्यापलीकडे तिला कांहीं शक्य नव्हतें. ती कुलीन, वहिनीबाईस कुलीनता कशी ती ठाऊक नव्हती. नणंद एकीकडे रागाचा एक शब्द बोलली तर हिनें सर्व चाकरनोकरांच्या देखत हजारों शब्द तिला बोलावे. चाकरांनोकरांच्या देखत बोलण्यांतच तिला मोठेपणा वाटे. अर्थातच वहिनीबाई तिची तिळमात्र दया ठेवीत नाहींत, हें पहाण्याबरोबर चाकरांनोकरांनींही तसलेंच वर्तन करण्यास थोडीबहुत सुरुवात केली. वहिनीबाईंची मोठी महत्त्वाकांक्षा ही कीं, सर्व किल्ल्या आपल्या ताब्यांत याव्या आणि आपल्या नणंदेनें एवढें तेवढें जें काय लागेल तें आपलेपासून मागून घ्यावें. केव्हां आपण तें इतकें कशाला, तितकें कशाला, असें ह्मणावें आणि तिला धुडकावून द्यावें ह्मणजे जी मौज होईल ती आपल्या सुखाची परमावधि झाली. तें अद्यापि जुळेना. किल्ल्या अजून हातीं येईनात. कांहीं जरूर लागल्यास आपणास नणंदेजवळच जावें लागतें, हें तिला फार दुःसह झालें आणि अहोरात्र आपला इष्ट हेतु कसा साध्य करावा, इकडे तिचें चित्त लागलें. होतां होतां एके दिवशीं तिची मनःकामना पूर्ण होण्याची संधि आली.

ताईसाहेब मुख्य किल्ली एका गोफांत घालून तो गोफ आपल्या गळ्यांत घालीत असत एक दिवस त्या स्नानास बसल्या असतां. तो गोफ काढून त्यांनीं विहिरीच्या भिंतींत असलेल्या कोनाड्यांत ठेविला व धांदलींत विसरून ओलेत्याच माजघरांत गेल्या. शागिर्दानें तें पाहिलें आणि ही संधि आपल्या छोट्या यजमानणीची मर्जी संपादण्यास उत्तम आहे असें पाहून त्यानें तो किल्लीचा गोफ पटकन उचलून वहिनीसाहेबांपाशीं नेऊन दिला. त्या बरोबर त्यांस हर्षवायुच होण्याची पाळी आली. घरांतील इतर सर्व ठिकाणच्या कुलुपांच्या किल्ल्या ताईसाहेब जेथें ठेवीत असत तेथें त्या लागलीच गेल्या आणि या किल्लीनें तें त्यांचें मुख्य कुलूप उघडून त्याही किल्ल्या त्यांनीं आपल्या स्वाधीन करून घेतल्या. आणि त्या आनंदानें अगदीं फुगून जाऊन आतां काय मौज होते ती पहा, असेंच जणूं काय ज्यांस त्यांस ह्मणताहेत अशा दृष्टीनें सभोंवार पाहून व जिकडे तिकडे हिंडून आपली नणंद आपल्याकडे केव्हां येते आणि आपण तिला अद्वातद्वा केव्हां बोलतों, असें त्यांस होऊन गेलें.

ताईसाहेबांची तळशीची व बाळ-

कृष्णाची पूजा थोडी विशेष होती यामुळें त्यांस ती आटपेपर्यंत किल्लीचें भान राहिलें नाहीं. परंतु पूजा आटपून जपाची वेळ आली, तेव्हां त्यांनीं गळ्यांतली पोवळ्यांची माळ काढण्यास हात घातला, व तितक्यांत काकासाहेबांनीं कोणास देण्यास पांच रुपये मागितले आहेत असें सांगण्याला एक गडीही आला, म्हणून त्यांनीं किल्ली पाहिली तों किल्ली आपण स्नानाचे जागीं विसरलों अशी त्यांस आठवण झाली. पूजेचें साहित्य ठेवणारा शागिर्द त्यांचे विश्वासांतला होता, त्यास त्यांनीं कोनाड्यांत मी किल्ली विसरलें आहें तेवढी घेऊन ये असें सांगितलें. तो गेला व लागलीच तेथें किल्ली नाहीं म्हणून परत आला. अर्थातच किल्ली शोधण्याची एकच गडबड उडाली. स्नानाचे वेळीं आपण गळ्यांतलि गोफ काढून कोनाड्यांत ठेविला ही त्यांच्या मनाची पक्की खात्री. त्या वेळीं पाणी देणाऱ्या शागिर्दाखेरीज दुसरें कोणी तेथें नव्हतें हीही पण त्यांच्या मनाची खात्री, म्हणून त्यांनीं त्यास बोलावूं पाठविलें, परंतु त्यानें आपण येत नाहीं म्हणून उर्मटपणाचें उत्तर दिलें. किल्लीची जरूरी यामुळें ताईसाहेब आपण होऊन तो होता तेथें गेल्या व त्यास किल्ली कोठें आहे असें विचारूं लागल्या. परंतु त्यानें पुनः उर्मटपणें "मला काय विचारतां? मीं घेतली कीं काय तुमची किल्ली? ठेविली असेल एकीकडे आणि आमच्यासारख्यांना विनाकारण त्रास!" असें उत्तर दिलें. ताईसाहेबांच्या अंगाचा तिळपापड उडाला. "मी काकाला तुझें हें उत्तर जाऊन सांगतें म्हणजे तो तुला काय सांगायचं तें सांगेल." असें म्हणून चडफडत चडफडत त्या तेथून निघून गेल्या. इकडे हा शागिर्द "जा काय सांगायचं असेल तें सांगा. आह्माला काय, एक घर नाहीं दहा घरं आहेत," अशा तऱ्हेनें त्यांना ऐकूं येईल असें पुटपुटतच होता.

पांच रुपयांसाठीं काकासाहेबांकडून पुनः माणूस आला, तेव्हां ताईसाहेबांनीं त्यांसच "एक वेळां घरांत येऊन जा" असा निरोप पाठविला. काकासाहेब आंत आले. ताईसाहेबांनीं किल्लीची हकीकत व शागिर्दाचें उर्मटपणाचें वर्तन हीं त्यांचे कानावर घातलीं आणि त्या पुढें म्हणाल्या, "आतांच्या आत्तां त्याला धरून त्याचा झाडा घेऊन किल्ली घेतलीत तर ती सांपडणार, त्याच्याखेरीज किल्ली गेली नाहीं, आणखी किल्ली सांपडल्यावर त्याला ताबडतोब हांकून दिला तरच माझी या घरांत रहाण्याची आतां शोभा आहे; नाहीं तर मी आपली काशीयात्रेला जातें."

ते शब्द त्यांच्या तोंडून निघाल्याबरोबर दोन बाजूंनीं दोन आवाज त्यांच्या दोन कानाला एकदम येऊन आदळले. "माझा झाडा घेणार! आज इतकीं वर्षं तुमच्या इथें इमानानं नोकरी केली, त्याचं बक्षीस माझा झाडा घेऊन माझी बेअब्रु करणार हेंच कीं काय? आतां घ्या झाडा, मी एक क्षणभर सुद्धां याच्यापुढें तुमच्या इथें चाकरी करूं इच्छित नाहीं. झाली एवढी बस्स झाली. घ्या, झाडा घ्या. मला आत्तां मोकळं करा. किल्ली सांपडली तर बरं; नाहीं तर मीच जाऊन बेअब्रु केल्याबद्दल आपल्या दोघांवर फिर्याद लावतों. घ्या, एकदां झाडा घ्या आमचा." हे शब्द एका बाजूनें काकासाहेबांच्या कानावर आले व दुसऱ्या बाजूनें कोमल परंतु क्रोधामुळें कर्कश झालेल्या आवाजानें पुढील शब्द दुसऱ्या कानावर आले, "कां,

त्याचा कां झाडा घेतां, किल्ली माझ्याजवळ आहे, मीं घेतली आहे, मी तिची मालकीण आहे. दुसऱ्या कोणाजवळ आतां कधीं द्यायची नाहीं. जें काय कोणाला मागायचं असेल तें त्यांनीं माझ्याजवळ मागावं. आजपर्यंत लोकांनीं कारभार केला तेवढा पुरे झाला. आतां माझा मीच कारभार करणार."

काकासाहेबांनीं ते शब्द ऐकण्याबरोबर ते आश्चर्यानें अगदीं चकित झाले व विस्फारित नेत्रांनीं आपल्या वहिणीकडे व वहिणीकडून कुटुंबाकडे आणि पुनः कुटुंबाकडून वहिणीकडे पाहूं लागले. दोन बाजूंनीं वणवा पेटून मध्यें सांपडलेल्या पशूप्रमाणें त्यांची अवस्था झाली. कोणास काय ह्मणावें तें त्यांस मुळींच सुचेना. ताईसाहेबांची अवस्था तशीच झाली, परंतु त्या लवकर शुद्धीवर येऊन आपल्या जिभेचा उपयोग करूं लागल्या. "मी लोक का तूं लोक ? भिकारड्याच्या घरीं उकिरड्यासारखी वाढून इथें येऊन पडलेली तूं लोक कीं ज्या घरांत जन्म घेतला ती मी लोक ! कारभार करणार ? पायपोसाचा कर कारभार."

वहिनीबाईस जें काय पाहिजे होतें तें हेंच. आपल्या नणंदेनें आपल्यासमोर असें अद्वातद्वा एकवार बोलून आपल्यास प्रसंग मात्र द्यावा, ह्मणजे तिला आपण कशा आहोंत तें चांगल्या तऱ्हेनें दाखवूं ही तर त्यांची मोठी महत्त्वाकांक्षा. ती तृप्त करून घेण्याची अशी सुंदर संधि सांपडल्यावर आणखी काय पाहिजे ? त्या संधीचा लागलीच आपल्यास पाहिजे तसा तिनें उपयोग करून घेतला. काय व कसें बोलली हें सर्व सांगण्याचें हें स्थळ नव्हे व प्रयोजनही नाहीं. एवढेंच सांगितलें ह्मणजे पुरे कीं, आपली सोळा वर्षांची तरुण पत्नी कर्तृत्वानें कशी जरी असली तरी वक्तृत्वानें कोणत्याही वक्त्यास हार जाणारी नव्हे अशी काकासाहेबांची पूर्ण खात्री झाली. एवढीच खात्री झाली असें नव्हे, तर वाग्युद्धाच्या ऐवजीं करयुद्धाची पाळी आली तरीही आपली वीरपत्नी मागें घेणारी नाहीं असें भय त्यांस पडलें. इतरांशीं युद्ध करण्यांत नेहमीं तत्पर असे काकासाहेब, वार्धक्यकुठार व तारुण्यशतपुटींच्या दोन दुष्ट बाटल्यांचा पाठिंबा असतांही त्या वीरपत्नीच्या हस्तक्षेपांनीं घाबरून जाऊन थोडेसे मागें सरले व "हें काय, हें काय ? जरा गप्प बस. बाहेर मंडळी आहेत, त्यांना रुपये द्यायचे आहेत, तेवढे आधीं मला दे. तूं कारभार कर, नको कोण ह्मणतो ? ज्याचा त्यानं कारभार पत्करला तर ताईचं तरी काय जाणार आहे ! मला तेवढे रुपये दे" असें ह्मणूं लागले. तों तों त्यांच्या वीरपत्नीची कमान अधिकाधिक चढून प्रतिपक्ष्यावर तिरावर तीर सुटूं लागले.

---

# प्रकरण ४३ वें.

## द्वारकाताईंचा विचार.



आई आणि मुलगी यांचा परस्परांचा त्याप्रमाणें गैरसमज होऊन परस्परांचें बोलणें किती तरी वेळ चाललें होतें! कमळेला आपलं मन खुलें करून सर्व हकीकत सांगतां येईना आणि आईला तर असं वाटत होतें कीं, आपल्याला आई नाहींशी होणार, एवढेंच वाटून ही एवढी ओक्साबोक्शीं रडत आहे. त्याखेरीज दुसरें इतकें रडण्याचें कारणच नाहीं. त्यांतल्या त्यांत आणखी तिचें खरें कारण काय तें तर तिला तर्कानें सुद्धां जाणणें केवळ अशक्यच होय. ज्या गोष्टी-बद्दल शंकाच मनाला नाहीं, ती गोष्ट मनांत कशी यावी? पुष्कळ वेळ याप्रमाणें मातेच्या जवळ रडणें झाल्यानंतर कमळा थांबली, ती थकली, तिचे अश्रु आटले. तथापि तिला आपल्या आईजवळ खरें कारण सांगण्याचें धैर्य होईना. बिचारी काय सांगणार? आणि कसें सांगणार? जों जों आई तिला 'मला तुझी एक काळजी होती, पण देवानं ती अगदीं पूर्णपणें टाळली, जसं होईल असं माझ्या स्वप्नीं सुद्धां नव्हतं असं अगदीं झालं. आतां मला मरण आलं, तर तेवढ्या बाबतींत तरी मी अगदीं सुखानं मरेन,' असें ह्मणे, तों तों आपल्या त्या वेळच्या ओक्साबोक्शीं रडण्याचें कारण आईला सांगणें ह्मणजे तिच्या हृदयावर तापलेल्या डागर्णीनें डाग देणेंच होय, असें तिच्या मनांत येई. मनुष्यानें ज्या बाबतींत अगदीं निर्धास्त ह्मणून असावें, त्याच बाबतींत अगदीं धक्का बसण्यास कांहीं तरी कारण व्हावें, ह्मणजे किती वाईट, केवढा धक्का बसेल, किंवा तसा धक्का बसून, काय परिणाम होईल! त्यांतून मनुष्य आजारी असल्या-वर तर बिचारूंच नये. हा विचार तिच्या मनांत येऊन आपलें दुःख एका बाजूला सारून तिनें आईला कांहीं तरी उत्तरें दिलीं. सर्व गोष्टी उलगडून सांगण्याचें, अर्थात् आईस आपल्याविषयीं काळजी नाहीं असें वाटत असतां तिचा तो इष्ट भ्रम दूर करून तिच्या अंतःकरणास धक्का बसविण्याचें काम तिच्यानें होईना. आपल्याकरितां आईनें आजपर्यंत पुष्कळ काळजी केली, आतां आणखी काळजींत तिला लोटूं नये, असें तिला वाटलें आणि तिनें कांहीं तरी निरा-ळेंच बोलून व आपल्या रडण्याचें कारण आईच्या या दुखण्यांतून उठण्याबद्दल निरा-शाच होय, असें तिला भासवून तेवढी वेळ मारून नेली. दुसरें कांहीं तिला शक्यच नव्हतें. शक्य असणार काय? तिनें आपण आईची भ्रांति कधींही घालविली नसती; आणि त्या वेळीं ती तिनें घालविलीही नाहीं.

आईची भ्रांति तिनें कायम ठेवली,

परंतु तिच्या स्वतःच्या भ्रांतीची गोष्ट काय ! तिच्या स्वतःच्या मनाची काय अवस्था झाली होती? तीं दोनही पत्रें तिच्या अंतःकरणास सुयांप्रमाणें बोंचत होतीं त्याचें काय? तें दुःख कसें निवारण केलें ? त्या दुःखाच्या त्रासांतून ती कशी सुटली? सुटली? कशी सुटणार? तें दुःख नाहींसें होईपर्यंत ती त्यांतून कसची सुटणार? तिचें सर्व वर्तन एखाद्या भ्रांतिष्टाप्रमाणें झालें. आपण आहोंत कोठें, करतों आहोंत काय, याचें जणुं काय तिला भानच नाहीं, असेंच तिचें वर्तन त्या दिवशीं झालें. आईला एक वेळां तिनें औषध दिलें, परंतु पावतासानें तें औषध दिल्याचें ती विसरली, आणि एकदम पुनः येऊन आईस औषध घेण्याविषयीं आग्रह करूं लागली. अशा भ्रांतिष्टपणाच्या आणखी एक दोन गोष्टी झाल्या. परंतु आईनें त्या तिला आपल्या दुखण्याबद्दल फारच वाईट वाटतें आहे त्यामुळेंच झाल्या अशावारीं घालविल्या. तिच्या दृष्टीनें अशा भ्रांतिवष्टपणास एकच कारण होतें. इतरांस तिनें तें कमलेचें भ्रांतिवष्टपणाचें वर्तन सांगितलें, परंतु त्यांनीं—विशेषतः तिच्या भावानें व सरस्वतीकाकूंनीं—तिची थट्टा केली, कीं तिला मुंबईहून पत्रं आलीं आहेत, तिकडे तिला जावंस वाटतं आहे, म्हणून तिचं मन अगदीं वेडावून गेलं आहे, दुसरं कांहीं नाहीं. इतर मंडळी त्या थट्टेनें हंसली. कारण तिच्या अंतःकरणाला काय वाटत होतें, आणि काय दुःख होत होतें, हें तिच्याखेरीज दुसऱ्या कोणास ठाऊक ! तिचें मन फार अस्वस्थ झालें. इतक्यांत तिच्या मनांत एक कल्पना आली. ती खरी कां खोटी, हें पाहण्यासाठीं ती फार उत्सुक होती. परंतु सर्व मंडळींचीं जेवणें-खाणें होऊन निजानीज होईपर्यंत पुनः आपल्या पेटीशीं जाऊन मागल्या पत्राचें व आतां आलेल्या पत्राचें अक्षर नीट तपासून पहावें, कदाचित् आपलें सुख पाहवत नाहीं अशा कोण्या माणसानें निवळ दुष्टपणानें अक्षरासारखें अक्षर काढून लिहिलें असेल, अशीही पण शंका आली. या शंकेचें निवारण करून घेण्यास मार्ग एकच. तो तीन चार दिवसांपूर्वी आलेलें पत्र आणि त्याच्या आधींचीं एकदोन पत्रें हीं एकमेकांशीं ताडून पहावीं, हा होय. तें करण्यास बाकीच्या लोकांची निजानीज झाल्यानंतरचीच वेळ. ती वेळ केव्हां येईल आणि आपण आपला संशय दूर केव्हां करून घेऊं असें तिला झालें. सरते शेवटीं सर्व मंडळींची निजानीज झाली. ही आपल्या आईच्याजवळ निजत असे, तेथें पडली. आतां आईला नकळत आपल्या पेटीजवळ जाऊन पत्रें पहावयाचीं असें तिनें मनांत योजिलें. क्षयाच्या माणसास खोकल्याची उमळ वारंवार आली नाहीं, तर थोडीबहुत पहिल्या रात्रीं तरी झोंप लागते. ती झोंप आईला लागली आहे असें पाहून कमळा बसल्या जागची उठून आपल्या पेटीजवळ गेली, आणि तिनें पत्रें काढलीं.

पद्माकरपंताचा आणि तिचा पत्रव्यवहार लग्न झाल्यानंतरच काय सुरू झाला असेल तेवढा. आधीं परस्परांची ओळख जरी चांगली, तरी पत्रें पाठविण्याचा किंवा चोरून परस्परांना पत्रें देण्याचा कधींच परिपाठ नव्हता. तेव्हां तिला त्याच्या अक्षराची विशेषशी माहिती नव्हती. तथापि पहिलीं त्याच्या हातचीं आलेलीं पत्रें होतीं, तीं तिनें

काढली आणि ज्या पत्रांत कांहीं हरकत नाहीं, तूं आईच्या प्रकृतीसाठीं राहा वगैरे अर्थाचा मजकूर होता तें पत्र जवळ ठेवून त्या अक्षरांची तिनें तुलना केली. अक्षर तर अगदीं सारखें दिसलें. तें पत्र खरें ठरलें, तर मग लागलीच आपल्याबद्दल इतका राग येण्याजोगें आपण काय केलें, कीं आपल्या हातूनसुद्धां पत्र न लिहितां दुसऱ्याच्या हातून लिहवून त्यांत आपला असा विलक्षण धिक्कार करावा? तें पत्र तर अगदीं खोटें नसेल! कोणी तरी दुष्टाव्यानें माझें अहित करावें अशा उद्देशानें लिहिलें नसेलना? निनांवी पत्रांची आणि तिची ओळख नव्हती, असें नाहीं. ती पुनर्विवाहित दंपत्याची मुलगी, प्रौढवयापर्यंत अविवाहित राहिलेली, आणि जिचें सर्वांगीं शिक्षण चाललें आहे, अशी असल्यामुळें तिला, आईला, तिच्या बापाला, वगैरे अनेक वेळां अनेक प्रकारचीं अश्लील पत्रें आलेलीं तिला ठाऊक होतीं. तेव्हां निनांवी पत्रें उगीच कोण कशाला लिहील, असें तिच्या मनांत आलें तरी तें एक क्षणभरसुद्धां राहण्याचें प्रयोजन नव्हतें. जों जों ती त्याबद्दल अधिक अधिक विचार करूं लागली, तों तों तिच्या मनास असें वाटूं लागलें कीं, दुसरें पत्र आलेलें अगदीं खोटें. त्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. एकदां या विचारानें तिच्या मनावर पगडा बसविल्यानंतर मग काय विचारतां? हां हां म्हणतां पहिली तिची उदासीन वृत्ति कमी झाली. आपण या अशा भलत्याच पत्रानें अशा कशा फसलों असें तिला वाटूं लागलें. मधून मधून त्या पत्रांतील कांहीं वाक्यें आठवून असें वाटे कीं निनांवी पत्र लिहिणारानें असें कसें लिहिलें! त्याला आपलें तिकडे गेलेलें पत्र पहावयाला सांपडलें कीं काय? असेल कदाचित्. तसाच कोणी येणारा जाणारा असला, तर तसेंही त्यास दिसलें असेल. तो लुच्चा हें न समजून त्याला दाखविलें असेल, आणि त्यानें असा हा उपयोग केला असेल. तें कांहीं नाहीं. तें पत्र कोणा तरी लबाडानें लिहिलेलें असें तिला खचित् वाटलें व आपण आतां ह्या पत्रांतील मजकूर लिहून व तो मजकूर वाचून आपली चार घटका काय अवस्था झाली, त्याचेंही अगदीं सविस्तर वर्णन करून एक पत्र लिहूं, असा तिनें विचार केला, आणि तेवढ्या रात्रीं तेथेंच बसून तिनें खुलासेवार पत्र लिहून तें लिफाफ्यांत घालून पद्माकरपंताच्या पत्त्यावर लिहून ठेविलें. आपल्या मनाचें याप्रमाणें वर्णन वगैरे करण्यांत मन गढून गेलें व मनांतील नानाप्रकारचे उद्विग्नतेचे विचार कागदावर मांडले गेले, तेव्हां तिला किंचित् हलकें वाटलें आणि तिला जाऊन पडण्याची इच्छा झाली. तिचें मन शांत झालें होतें. यामुळें शरीरही शांत झाल्याकारणानें तिला लवकर झोंप लागली. परंतु तिच्या मनाची स्थिति त्या वेळीं स्वस्थ नव्हती. स्वस्थ असणें शक्यच नव्हतें; अर्थातच झोंप स्वस्थ लागली नाहीं. तिला ती अस्वस्थ झोंप लागण्याला आणि द्वारकाताईची झोंप होऊन त्या जाग्या होण्याला एकच गांठ पडली. त्या त्या वेळीं जशा जाग्या झाल्या, तशा जाग्या झाल्या असतां त्यांना पुनः कांहीं स्वस्थ झोंप कधींच लागत नसे. अर्थातच त्या अंथरुणावर पडून राहत.

अशा स्थितींत त्या पडल्या असतां कमळा कांहीं चावळते आहे, कांहीं बडबडते आहे, असा त्यांस भास झाला, म्हणून त्यांनीं काळजीपूर्वक ऐकण्यासाठीं

चित्त तिकडे लाविलें. तों त्यांना, "माझी आई सोडून जाणार, आणखी तुह्मीही जातां!" असें एक वाक्य ऐकूं आलें. 'पोरीला माझ्या मरणाची पक्की भीति पडली आहे. तिला आतां चार दिवस आपल्यापासून दूर करून जांवईबोवांकडे पाठविल्याखेरीज तिला आपल्या या दुखण्याचा थोडाबहुत तरी विसर पडायचा नाहीं. शिवाय आतां आपल्याजवळ तरी आपण किती दिवस राहून घ्यायची? आपण जिवंत आहोंत तोंपर्यंत ती सुखानं संसार करायला लागल्याचं कळलं ह्मणजेच आपल्याला खरं समाधान होणार आहे. तें कांहीं नाहीं; गणपतराव भावजींचं कांहीं न ऐकतां आतां तिला पावती करून द्यावी. मग आपण कांहीं बऱ्या होऊन तिजकडे गेलों, तर ठीकच. नाहीं तर तसाच कांहीं वेडावांकडा प्रसंग आला लवकर, तर तिला आणण्याला मुळींच हरकत नाहीं. हाच विचार कायम. तिला पाठवायची. आपण जवळ नसलों म्हणून काय झालं? आज इतके दिवस आपण जें शिकविलं, जो कित्ता घालून दिला, तो जर तिच्या मनांत ठसला आहे, तर ती तावडतोब आपला संसार करायला लागेल. होतील पहिल्या पहिल्यानं कांहीं चुका, झाल्या तर झाल्या. पण आतां आपल्यासाठीं म्हणून तिला इथें ठेवून घ्यायची नाहीं. त्याचा काय नेम माझी प्रकृति सुधारतेच म्हणून! कदाचित् अधिकाधिकच होईल. मग कमळेचा संसार पाहाण्याचं तर लांबच राहिलं, परंतु ती संसार करूं लागली, तिचं आणखी जांवईबोवांचं मोठं प्रेम आहे, असं ऐकायला सुद्धां मिळायचं नाहीं. तेव्हां हाच विचार कायम. उद्यां सकाळीं गांठ पडली, कीं पहिली गोष्ट ही सांगायची,' असा द्वारकाताईनीं आपल्या मनांत पक्का विचार केला व सकाळ केव्हां होईल आणि आपण आपल्या नवऱ्यास हा आपला विचार आग्रहपूर्वक सांगून त्यांच्याकडून त्याप्रमाणें करवूं केव्हां, असें त्यांना झालें. त्यांनीं कमळेच्या तोंडून वर सांगितल्याप्रकारचेच आणखीही कांहीं उद्गार ऐकिले, त्यामुळें तर त्यांचा निश्चय कायम झाला. इतका कीं, कांहीं जरी झालें, तरी आपण अगदीं आग्रह धरून तिला पोहोंचवा, असा हट्ट धरण्याचा विचार त्यांच्या मनांत आला.

अशा विचारांत व निश्चयांत पहांट झाली. तेव्हां त्यांनीं कमळेला हांक मारून उठविलें. ती रात्रीं जागत होती हें त्यांना मुळींच ठाऊक नव्हतें. कमळा त्यांच्या पहिल्या हांकेसच जागी झाली. "काय पाहिजे? आई तूं केव्हां जागी झालीस?" असें विचारीत विचारीत आईच्याजवळ आली, तेव्हां द्वारकाताई किंचित् हंसून तिला ह्मणतात, "कमळे, तुला मी तावडतोब पाठविणार. मी आज जागी झालें, तेव्हांपासून माझ्या मनांत हा विचार घोळतो आहे, आणखी तो आज मी अमलांत आणणार. आतां माझ्याकरितां तूं इथें राहूं नकोस. मला एकदां तूं सुखानं संसार करायला लागलीस एवढं ऐकूं तरी दे. प्रत्यक्ष दिसेल तो दिवस सोन्याचा. पण ऐकण्याचं तेवढं तरी सुख माझ्या नशिबीं आहे कीं नाहीं, कोण जाणे, असं माझ्या मनांत आलं आणखी वाटलं कीं, तुला तावडतोब पाठवावी. तूं अगदीं कां कूं करूं नकोस. माझी इच्छा आहे, म्हणूनच तूं माझ्या ह्मणण्याप्रमाणं ऐकलं पाहिजेस, असं ह्मटलंस तरीसुद्धां

चालेल, पण माझ्या मनानं आतां ही गोष्ट घेतली आहे. त्याच्या आड कोणी-सुद्धां येऊं नका."

परंतु कमलेला आतां काय उत्तर द्यावें, हेंच समजेना. आदले दिवसाच्या सर्व गोष्टींचें तिला स्मरण झालें आणि पुनः रडूं येऊं लागणारसें झालें. परंतु तें तिनें तितकेंच दाबलें. आज तिला तितकें दाबण्याइतकें आत्मसंयमन राहिलें होतें. तसें तें रडें दाबून ती ह्मणते: "पण आई, तुझं दुखणं अजून ......" कमळा इतकें बोलणार तोंच द्वारकाताई एकदम ह्मणतात, "माझं दुखणंबिखणं काय वाटेल तें असो, त्याचा कांहीं विचार करायचा नाहीं. आजच्या आज तुला नेऊन पोंचविण्याबद्दल मी तिकडे सांगणार आहें. आज अगदीं कोणाचं सुद्धां मी ऐकणार नाहीं. आज मला पुष्कळ बरं वाटतं आहे. आणखी माझं दुखणं काय, किती दिवस चालणार आणखी किती दिवस नाहीं, याचा काय नेम ! माझं दुखणं आणखी चार वर्षं चाललं, ह्मणून तूं अशीच इथें माझ्याजवळ राहणार कीं काय ! "

आजचा रंग कांहीं निराळाच आहे, असें कमळेनें पाहिलें आणि तिचें मन दुग्ध्यांत पडलें. एका परीनें तिला बरेंही वाटलें. आपल्याला जें पत्र आलें होतें त्या पत्राचा खरेखोटेपणा आपल्याला प्रत्यक्ष पाहाण्यास सांपडेल. न जाणों, त्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें कांहीं जर तिकडच्या मनाची चलबिचल असली तर आपल्या जाण्यानें ती बंद होईल, असेंही पण तिच्या मनांत आलें. आदले रात्रीं पुष्कळ विचार करून जें तिनें ठरविलें होतें, कीं तें दुसरें कोणाच्या तरी दुसऱ्याच्या अक्षरानें लिहिलेलें पत्र खोटें, तें पुनः तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. पुनः तें पत्र खोटें असें आपण म्हणतों, पण खरोखरच खोटें कशावरून ? असा प्रश्न तिनें आपल्या मनाला केला आणि आईनें आतां जो मार्ग सुचविला आहे तोच मुकाट्यानें धरावा. पत्र खोटें नसलें, तर ठीकच होणार. खोटें असलें, तरी आपलें जाणें कांहीं वावगें नाहीं. असा एकंदर विचार करून त्या वेळीं तिच्या मनांत असेंही आलें, कीं आदल्या दोन तीन दिवसांतल्या या दोन पत्रांचा मजकूर आईच्या कानावर घालावा. आजपर्यंत आपल्या आई-पासून तिनें कधीं कांहीं लपवून ठेविलें नव्हतें. तेव्हां आजही तें कांहीं लपवून ठेवूं नये असें तिनें अर्थातच मनांत आणलें; परंतु आतां सांगण्यानें विना-कारण आईला घाबरण्याला मात्र कारण होईल. दुसरें तिसरें कांहीं होणार नाहीं, असेंही तिच्या मनास वाटून तिनें पुनः आपलें मन बदललें. ती कांहीं बोलली नाहीं. मुकाट्यानें बसली. आई काय बोलत होती, तें तिनें नुसतें ऐकून घेतलें.

द्वारकाताई त्या वेळीं तिला अधिक कांहीं बोलल्या नाहींत. आपली आज जावयाची तयारी कर एवढेंच तिला ह्मणाल्या आणि स्वस्थ बसल्या. नंतर पुनः हलकेच ह्मणतात, "तिकडे हांक मारून आण. त्यांना लवकर सांगतें. आज माझ्या मनाला काय वाटतं आहे कोणास कळे, पण आपलं असं वाटतं आहे कीं, तुला कांहीं आतां इथें राहूं देऊं नये. जा. उठवून आण. आज मधं समाचाराला मुळींच यायचं नाहीं. तेव्हां झोंप चांगली झाली असेल, तेव्हां उठविलंस तरी कांहीं हरकत नाहीं. जा जा ह्मटलं कीं जावं."

कमळा, आईची ती विलक्षण गर्दी पाहून तशा स्थितींत किंचित् हंसली आणि तिचा बाप जेथें निजला होता तेथें गेली. तिनें त्यांस हांक मारिली आणि आई बोलावते आहे ह्मणून त्यांना तिनें सांगितलें. द्वारकाताईंची प्रकृति अगदीं क्षणोक्षणीं अधिकउणी होई यामुळें काय आहे आणि काय नाहीं असें वाटून बळवंतराव घाबरूनच उठले व लेंकीस, 'काय ! काय ?' असें विचारूं लागले. तिनेंही त्यांना आश्वासन दिलें कीं, " तसं घाबरण्याचं कांहीं कारण नाहीं. नुसतं तिच्या मनांत आज कांहीं आलं आहे तेवढ्याकरितां तिनं मला तुम्हांला उठविण्याला सांगितलं. अगदीं घाई केलीन्, मला जवळ बसूं देईना, तेव्हां आलें. "

बळवंतराव लागलींच उठले व आपल्या कुटुंबाजवळ गेले. द्वारकाताईंस ते केव्हां येतील असेंच झालें होतें, तेव्हां ते येतांक्षणींच त्यांनीं आपल्या मनाचा काय विचार झाला होता तो त्यांस सांगितला. 'कमळेला आजच्या आज पोंचवा. अगदींसुद्धां दुसरा तिसरा विचार करूं नका. आपली मी सांगतें, माझी शेवटली इच्छा ह्मणून करा' असेंसुद्धां तिनें म्हटलें. हा तिचा आग्रह पाहून बळवंतरावांस फार आश्चर्य वाटलें. आजपर्यंत द्वारकाताईंनीं कधीं कोणत्याच बाबतींत असला नेटाचा आग्रह धरलेला त्यांस स्मरला नाहीं. आणि आज अगदीं एकाएकीं अशा तऱ्हेचा आग्रह पाहून एकवार तर त्यांस असें वाटलें कीं, हिला वायु वगैरे झाला कीं काय ? पण तसा कांहीं प्रकार दिसला नाहीं. तेव्हां त्यांनींही 'बरं आहे, गणपतरावाला विचारून काय तें ठरवूं' असें म्हटलें. त्याबरोबर ती त्यांस ह्मणते, " गणपतरावभावजींना आतां या कामांत कांहीं विचारूं नका, आणखी कांहींसुद्धां करूं नका. मी ह्मणतें तसं करा. मी त्यांनासुद्धां सांगेन कीं, आतां तुह्मी माझ्याआड येऊं नका. माझ्या मनानं घेतलं कीं, आजच्या आज कमळेला आपलं पाठवून द्यावं. मग एवढं माझं ऐकायचं नाहीं का ? "

हें शेवटलें वाक्य त्यांनीं अशा कांहीं चमत्कारिक आवाजानें उच्चारलें कीं, त्याविरुद्ध आतां एक अक्षरसुद्धां बोलावयाचें नाहीं असा निश्चय करून बळवंतरावांनीं तिला 'होय' असें उत्तर दिलें.

आणि सर्व तयारीही त्यांनीं चालविली. परंतु टपाल आलें त्यांत प्रभाकराचें एक पत्र आलें, त्यानें सर्व घोंटाळा केला. तो काय व कसा हें पुढें समजेल.

# प्रकरण ४४ वें.

## कॉफीगृह.



को टांतील एका सामान्य प्रकारच्या कॉफीगृहांत एका संगमरवरी राऊंड टेबलाजवळ एक चांगलाच फ्याशनेबल पोषाख केलेला तरुण गृहस्थ पुढें एक सोडावॉटरची रिकामी बाटली व भरलेला ग्लास ठेवून त्या ग्लासाच्या तळापासून वर येणाऱ्या बारीक बारीक बुडबुड्याकडे पाहत व डाव्या हातानें डाव्या गालाचा हनवटीजवळचा भाग चोळीत कांहीं तरी गूढ विचार करीत बसला होता. पुढें ठेवलेल्या ग्लासांतील पाणी पिण्याविषयीं तो फारसा उत्सुक दिसला नाहीं. किंबहुना सूक्ष्म दृष्टीनें पाहणारास असेंही वाटलें असतें, कीं तो तेथें बसण्यास कांहीं तरी निमित्त पाहिजे म्हणूनच एक बाटली आणून ती उघडवून पाणी ग्लासांत ओतून तेथें बसला होता. त्याची दृष्टि अतिशय चंचल होती. दोन दोन, तीन तीन मिनिटांनीं तो एक वेळ दाराकडे दृष्टि फेंकी, पुनः कॉफीगृहांतील इतर टेबलांजवळ वगैरे येऊन बसलेल्या, बसत असलेल्या व बसावयास येणाऱ्या लोकांकडे निरखून पाहत असे. परंतु आपल्यास जो कोणी इसम किंवा जे इसम पाहिजे होते ते नाहींत असें पाहून पुनः आपल्या ग्लासाकडे पाही, एखादा घोट घेई, हातांत एक पेन्सिल होती तिनें त्या पांढऱ्या शुभ्र टेबलावर कांहीं तरी रेखाटी व स्वस्थ बसे. हें अगदीं उघड होतें कीं, तो कोणाची तरी तेथें बसून वाट पाहत होता. याप्रमाणे अर्धा तास झाला. तो जागचा हलला नाहीं किंवा तेथें आल्यापासून त्यानें जी कृति चालविली होती ती बंद पाडली नाहीं. एक दोन मिनिटांनीं दाराकडे पाही, पुनः आंतील सर्व व्यक्तींकडे पाही व पुनः स्वस्थ बसे. आणखीही अर्धा तास गेला, परंतु त्याला तेथें बसण्याचा कंटाळा आला नाहीं. आपण ज्या विवक्षित हेतूनें येथें आलों आहोंत तो हेतु लौकर साध्य होत नाहीं, म्हणून त्यास काय अधीरपणा झाला असेल तो निराळा, परंतु तें स्थानच असें आहे कीं, तेथें व्यक्तींची मौज पाहतां पाहतांच तासभर तर काय परंतु सबंद दिवस बसलें तरी कंटाळा म्हणून यावयाचा नाहीं. बसणाराच्या अंगीं तितकी अवलोकनशक्ति व कौतुक हीं मात्र पाहिजेत. या दोन गोष्टी ज्याचे अंगीं असतील त्यास तशा ठिकाणीं कंटाळा येण्याचा संभवच नाहीं. कां कीं, तेथें अनेक व्यक्ती येतात. इतकेंच नव्हे तर मनाच्या अशा स्थितींत येतात, कीं त्यावर कोणात्याही प्रकारचा दाब नसतो. मन अगदीं खुलास ठेवून उल्हसित वृत्तीनें चहा किंवा विविध पेयांचें पान व देशी आणि परदेशी विविध

अन्नांचें भोजन घटकाभर स्वस्थपणें बसून करावयाचें आणि काम करून करून, चिंता वाहून वाहून, थकलेला अंतरात्मा पुनः उल्हसित व कार्यक्षम करावयाचा, हा गुष्कळांचा हेतु असतो. कित्येक आपले कांहीं पुढले बेत कोणत्या तऱ्हेनें तडीस न्यावे याबद्दलचा आपल्या स्वतःशीं किंवा आपल्या कोणा मदतनिसाशीं खल करण्याकरितां तेथें येतात. कित्येकांस दुसरें कांहीं करावयास सुचतच नाहीं म्हणून ते तोंडचाळवणीस तेथें जाऊन रेंगाळतात. एका वेळीं अशा या पानगृहांत पन्नासपन्नास माणूस बसलेलें दृष्टीस पडतें. कोठें एकटाच एकजण बसलेला असतो, कोठें दोघे, कोठें तिघे, चौघे एकत्र बसून सहपानाचा व सहभोजनाचा आनंद अनुभवीत असतात. मूर्ति तितक्या प्रकृति या न्यायाचें सत्यत्व कोणास लहानशा जागेंत एकदम पहावयाचें असेल, तर तें त्यास येथें गेल्यानें सहज दृष्टीस पडणार आहे. जो येतो तो बाकीच्याहून भिन्न असा येतो. परंतु आंत जाऊन कोठें तरी बसला म्हणजे आपण निराळा असूनही तो त्या लहानशा लोकसमूहांतलाच एक भाग होतो.

कॉफीगृहाचा मालक प्रत्येकास त्याच्या इच्छेप्रमाणें पदार्थ देतच असतो. एकंदरींत लहानशा एंजिनाप्रमाणें तेथें सर्व कारभार सुयंत्रितपणें चाललेला असतो.

मनुष्याच्या दिनक्रमांत सर्वांत महत्त्वाची व उल्हासाची वेळ म्हटली म्हणजे,—निदान मुंबईत तरी—मधल्या वेळेच्या उपाहाराची होय. प्रातःकाळीं कामावर जाण्याच्या गडबडीमुळें भाताचे धड दोन घांसही कोणाच्या पोटांत जात नाहींत; परंतु कामावर गेल्यावर दोन तीन तास काम झाल्यानंतर जी भूक लागते ती भूक मधल्या वेळच्या अन्नास अतोनात गोडी आणते. यामुळें मुंबईस मधल्या वेळीं करावयाच्या चहापाण्याच्या शुद्धाशुद्धत्वाबद्दल विधिनिषेधच राहिला नाहीं. अर्थातच वर सांगितल्या प्रकारचीं श्रीमंती थाटाचीं, त्याचप्रमाणें मध्यम स्थितींतलीं व अगदीं गरीब लोकांच्या उपयोगास पडतील अशींही चहाकॉफीगृहें अनेक उत्पन्न झालीं आहेत आणि त्यामुळें तशा कॉफीगृहांतून वर सांगितल्याप्रमाणें नानाप्रकारचे, नाना जातींचे व नाना व्यवसायांचे लोक एकत्र येतात. त्या प्रत्येकाकडे पाहाणारास व त्याच्या रुचीचें, संवयीचें, ऐटीचें वगैरे अवलोकन करणारास फारच मौज वाटते. त्या वेळीं आपल्याकडे कोणी पाहत आहे, कोणी आपल्यावर टीका करील, असें क्षणभरसुद्धां वाटत नसतें. ज्याची त्याची वृत्ति आपल्या ठिकाणीं तल्लीन असते. अर्थात् खरा माणूस कसा आहे, हें समजण्याला त्या वेळीं चांगला प्रसंग असतो. आमचा वर सांगितलेला गृहस्थ तेथें बसला होता, तेव्हां तेथें कोणी सर्वांकडे पाहिलें असतें तरी मूर्तिवैचित्र्याबरोबर प्रकृतिवैचित्र्य त्यास दिसून आलें असतें. आमच्या गृहस्थाच्या पलीकडच्या टेबलावरच दोघे गृहस्थ बसले असून, त्यांपैकीं एकानें कांहीं जिन्नस त्या कॉफीगृहांतील परिचारकास आणण्यास सांगितला होता; परंतु त्यानें सांगितलेला जिन्नस न आणतां चुकून भलताच जिन्नस आणला म्हणून गृहस्थाची तब्यत गरम होऊन त्याजवर व कॉफीगृहाच्या एकंदर व्यवस्थेवर त्यानें ताशेरा झाडण्यास सुरुवात केली होती. तेथून कांहीं अंतरावर दुसरे दोघेतिघे असेच बसलेले असून त्यांचेसंबंधा-

तेंही तशीच चूक झालेली होती; परंतु ते गृहस्थ शांतपणें त्या परिचारकास "अशी चूक कशी केलीस बरें, कांहीं हरकत नाहीं, आणले आहेस ते पदार्थ राहूं दे, पण आह्मीं सांगितलेले दुसरेही घेऊन ये," असें ह्मणत होते. त्या दोन व्यक्तींत किती तरी फरक दिसला. त्याचप्रमाणें निरनिराळी मंडळी निरनिराळे जिन्नस मागवीत होती, तेंही पाहिलें असतां रुचिवैचित्र्य सहज पाहाणारांच्या ध्यानांत आलें असतें. निरनिराळ्या भाषा, आपलें मनोगत व्यक्त करून दाखविण्याच्या निरनिराळ्या तऱ्हा, परस्परांची थट्टा करण्याचे प्रकार, आपल्याहून व्यतिरिक्त मंडळींवर चाललेल्या टीका, इतकेंच नव्हे, तर खातांना व पितांना होणारे अंगविक्षेप आणि मुखचेष्टा; हींही प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं किती निरनिराळीं असतात; हें सूक्ष्म तऱ्हेनें अवलोकन करण्यासारखेंच असतें. परंतु इतक्या सर्वांचें वैचित्र्य अवलोकन करण्यास आपणांस फुरसत नाहीं. तर इतर सर्व व्यक्तींना आपण सोडून देऊन प्रारंभींच ज्या एका व्यक्तीचें वर्णन दिलें आहे त्या व्यक्तीकडे वळूं. कॉफीगृहांतील गिऱ्हाइकांच्या ऐटीकडे, परिचारकांच्या घाणेरडेपणाकडे, मालकाच्या विलक्षण धांदलीकडे, तेथील भांड्याकुंड्यांच्या अस्वच्छपणाकडे आणि कित्येक पदार्थांच्या अमंगळपणाकडे दुर्लक्ष्य करून आपल्या एकाच व्यक्तीकडे एकाग्रचित्त करणें हें चांगलें. खांद्यावरलें घाणेरडें फडकें खांद्यावरल्या खांद्यावर उडविणाऱ्या अथवा आपलें घामानें थबथबणारें अंग निर्मळ होण्यासाठीं आणि भांडें निर्मळ होण्यासाठीं तें एकच फडकें आपल्या अंगावरून व चहाकाफीच्या पेलेबशांवरून फिरविणाऱ्या गड्यापेक्षां आमच्या या गृहस्थाकडे नजर दिल्यानें आपणांस अधिक उपयोग होणार आहे.

वर सांगितल्याप्रमाणें सुमारें दोन तास तो तेथें बसला होता. वर वर्णन केलेली तीच त्याची कृती एकसारखी चाललेली होती. दाराकडे पाहावें, इतर सर्व मंडळींकडे पाहावें आणि आपल्याशींच कांहीं विचार करावा; परंतु असें करण्यानें कंटाळा आल्याचें चिन्ह त्याचे मुखावर मुळींच दिसेना. उलट असें दिसलें कीं, आणखी कितीही वेळ गेला तरी आपण येथून हालावयाचें नाहीं, असा निश्चय करून तो तेथें आला असावा. आणखी अर्धा तास गेला आणि त्यानें पुनः एकदां दाराकडे पाहिलें, तों दारांत कांहीं तरी त्याला दिसून, आतांपर्यंतची त्याची अगदीं निर्विकार जड अशी चर्या किंचित् बदलली. त्याला जें काय पाहिजे होतें तें दृष्टीस पडलें असावें, असें दिसलें; परंतु आपल्या चर्येवरील फरक कोणाच्या दृष्टोत्पत्तीस येऊं नये, अशी उत्कंठा त्याचे मनांत असावी, असेंही पण दिसलें. कारण, त्यानें आपल्या चर्येवर झालेला बदल एकदम दूर करून, ती पुनः जशीची तशीच निर्विकार केली. नियमित अंतर टाकून घुटके घेण्याचें त्याचें काम चाललेंच होतें. एक बाटली संपली तेव्हां दुसरी आणविली होती. त्यानें आपल्या चेहऱ्यावरील बदल काढून तो पूर्ववत् निर्विकार करण्याला आणि दुसऱ्या दोन व्यक्ती दारांतून आंत येण्याला एकच गांठ पडली. पहिला गृहस्थ आपल्या नादांत बसल्याप्रमाणेंच बसला होता. परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहाणारास असें स्पष्ट दिसून आलें असतें, कीं त्याची सर्व दृष्टि त्या

दुसऱ्या इसमांवर होती. ते दोघे ऐटीनें आंत आले, व एका कोंपऱ्यांत असलेल्या संगमरवरी राऊंड टेबलाजवळ असलेल्या खुर्च्यांवर जाऊन बसले. त्यांपैकीं एकानें दुसऱ्यास 'काय जिन्नस मागवूं' असा प्रश्न केला व दुसऱ्यानें, 'काय वाटेल तें माग' अशा अर्थाचें इंग्रजींत उत्तर दिलें. त्याबरोबर पहिल्या व्यक्तीनें मालकास जवळ बोलावून आणून दहापांच जिनसांचीं नांवें सांगितलीं. त्यांपैकीं एक दोन तयार नाहींत, असें त्या मालकानें सांगण्याबरोबर हिंदुस्थानांतील कॉफी-हाऊसच्या अव्यवस्थितपणाबद्दल गृहस्थानें बरीचशी टीका केली आणि काय करावें, नाइलाज आहे, तेव्हां यावरच संतुष्ट होऊन रहावें असें पुटपुटून त्यांनीं काय जिन्नस असतील ते आण, असें सांगून त्यास जाऊं दिलें.

नंतर त्यांचें आपापसांत बोलणें सुरू झालें. एक दुसऱ्यास ह्मणतो, "ती तर फारच बहार झाली. अशी बहार केल्या-खेरीज एकंदर व्यवस्था लागावी कशी ! आतां तो गृहस्थ तिथें जाऊन पोहोंच-ल्यावर काय ह्मणेल आणि काय करील कोण जाणे. आपण तर अगदीं निश्चय केला आहे बुवा, कीं जे दिवशीं युरोपांत जायचं ते दिवशीं मुंबई सोडायची. नाहीं तर मुंबईतून आपलं पाऊल काढायचं नाहीं. आतां तर आपली चंमन उडाली. खाण्यापिण्याची किंवा कपड्यालत्त्यांची उणीव म्हणून नाहीं. मी ही टोपी घाल-ण्याचं सोडून देऊन आतां बेलाशक साहेबी टोपी स्ट्रॉ हॅट नाहींतर सोला हॅट वापरायला लागणार. तुझ्या या स्वदेशी पोषाखात कांहींसुद्धां तात्पर्यार्थ नाहीं."

दुसरा गृहस्थ त्यास लागलींच ह्मणतो, "त्यांत अर्थ आहे कीं कशांत अर्थ आहे, हें तुझ्यासारख्या पोकळ डोक्याला काय माहीत. तूं हा असा पोषाख करा-वास, आणखी भपक्या माराव्यास, याच्या पलीकडे तुला कांहींतरी जुळणं शक्य आहे काय ? आतां कोणीतरी डिटेक्टिव्ह तुझ्या पाठीवर आहे, असं तुला एकदां कळूं दे ह्मणजे कसा तूं मुंबई सोडून जात नाहींस, तें क्षणाभऱ्यांत समजून येईल. लेंका, तुझी किंमत मीं केव्हांच ओळखली आहे. पण तुझाही उपयोग होता म्हणूनच तुला हाताशीं घेऊन ठेवलं आहे. नुसतं साहेबी पोषाख करून सगळ्या गोष्टी जर साधल्या तर आणखी काय पाहिजे होतं. अरे तुझ्यासारखे लोक केव्हांच पोलीस गिळून टाकील. एक दिवसांत पंचवीस तऱ्हा करून सत्तावीस पोषाख केले, मूळचा पोषाख कोणता, मूळचा माणूस कोण जातीचा, हें समजूं दिलं नाहीं, तरच त्यांत बहार, तरच त्यांत शिताफी. ही तुझ्यासारखी भुरटे भामटेगिरी कोणी तरी नरडं धरलं नाहीं तोंपर्यंतच चाला-यची. जरा कोणी नरड्याला हात घाल-तोसें दिसतांक्षणींच तुमची जीभ इतकी बाहेर येऊन तुम्हीं तोंड वासून पडायचे."

हें भाषण करतांना तो गृहस्थ अगदीं आवेशांत आला होता. जणूं काय त्यास आपल्या जवळपास कोणी ऐकेल याचें भयच वाटत नव्हतें. पहिला बोलणारा त्यास शेवटीं ह्मणाला कीं, "जरा हलकं बोल. कोणी ऐकेल आणि भलतंच कांहीं तरी होईल." परंतु त्यावर मोठ्यानें हंसणें एवढेंच काय तें त्यानें त्यास उत्तर दिलें.

या दोघांच्या बोलण्यावरून यांचा पोषाख एकमेकांहून किती निरनिराळा होता, हें वाचकांचे लक्ष्यांत आलेंच असेल.

एकाचा पोषाख अगदीं साहेबी थाटाचा व दुसऱ्याचा बनारशी थाटाचा होता. अंगांत नुसतें कुडतें. डोक्यावर एक आण्याची पांढरी टोपी, कांखेंत झिरझिरित उपरण्याचा बोळा. कपाळावर केशर घातलेल्या चंदनाचें आडवें लहानसें रेखून कोरून लाविलेलें गंध, दोन भिवयांच्या मध्यें लाविलेला शेंदूर व पायांत चढाऊ जोडा असा थाट होता. तथापि पोषाखामुळें पुढें आलेल्या जिनसांचा त्यानें कमी समाचार घेतला, असें मात्र नाहीं. एवढेंच कीं, साहेबी पोषाखाचे गृहस्थ त्या खाण्यापिण्यांत पटाईत दिसले व बनारशी पोषाखाचे गृहस्थ थोडेसे नवशिके दिसले. खाणेंपिणें चाललें असतां त्यांच्या वाचाळपंचविशाही चालू होत्याच, आणि मधून मधून तेही इकडे तिकडे पहात असत. जणूं काय कोणाची तरी तेही वाट पहात आहेत. आमचा पहिला गृहस्थ या दोघांकडे फार लक्ष्यपूर्वक पहात असे. इतकेंच नव्हे तर त्यांचें बोलणें काय चाललें आहे, हेंही फार लक्ष्यपूर्वक ऐकत असावा असें दिसलें. मधून मधून हे दोघे हलके बोलूं लागले असतां तो आळस येऊन अंग टाकतात त्याप्रमाणें त्यांचे बाजूस अंग रेलल्याप्रमाणें करून त्यांचें बोलणें ऐकूं आलें तर पहात असे. हा गृहस्थ आपल्यासाठीं येथें बसला आहे किंवा आपल्यावर त्याचें लक्ष्य आहे, हें या दोघांस मुळींच समजलें नाहीं. यांची चर्पटपंजरी चालूच होती. बनारशी पोषाखाचा गृहस्थ साहेबी पोषाखवाल्यास म्हणतो, "तुझी आणखी माझी दोस्ती होऊन आपण एकटवून काम करूं लागलों नसतों तर आजला तूं खचित येरवड्यांत असतास. त सोन्याच्या बापा...'

"चुप, चुप, चुप बोलूं नको. तें आतां उकरून काढून काय करायचं आहे? तशाच गोष्टी बोलायच्या झाल्या तर मला नाहीं का तुझ्या गोष्टी बोलतां येणार?"

"तूं काय माकडा माझ्या गोष्टी बोलशील! मीं आजपर्यंतची माझी हकीकत तुला सांगितली तर थक्क होऊन जाशील. पण ही वेळ नव्हे तुला सांगायची. कधीं तरी सांगेन एक वेळ...पण आज आपण इथें ज्या कारणाकरितां आलों, तें कारण सोडून देऊन या भलत्याच गोष्टी काय बोलत बसलों."

होतां होतां त्यांचें खाणें संपत आलें, तेव्हां बनारशी पोषाखाचा गृहस्थ दुसऱ्यां गृहस्थास ह्मणतो, "ते वेडे तर आतां ब्रह्मदेशाकडे गेलेच; हे इतके शिकले सवरलेले. यांच्या अकला जातात तरी कुठें? पण यांच्या अकला जर गेल्या नाहींत तर तुझ्या माझ्या सारख्यांची चलती चालावी कशी! आपण वाटेल तें करतों तें साधावं कसं? मला वाटतं, आतां आपल्याला एक पाऊल आणखी पुढें टाकण्याला मुळींच हरकत नाहीं. मीं तुला इथें बोलाविलं तें तेवढ्याच हेतूनं बोलाविलं आहे. माझ्या मनांत कांहीं गोष्ट आली आहे, तिला मला तुझं साहाय्य पाहिजे. मीं तुला गांवांतच दुसऱ्या कुठें तरी बोलाविलं असतं, पण तुझ्यापुढें तुला आवडते खाण्याचे पदार्थ वेरल्याखेरीज तुझ्या हातून धड काम होत नाहीं, ह्मणून इथें तुला आदळण्याला आणलं. इतका वेळ यथेच्छ झालं नव्हतं ह्मणून बोललों नाहीं, पण आतां यथेच्छ झालं आहे तेव्हां तुझी तक्रार नसावी. मी सांगतों या अर्थाचं एक लांबलचक पत्र आत्तांच्या आतां

तूं मला लिहून दे. तें दिलंस तर बहार होणार आहे........."

'हो, आपल्याकडे लागलं. इंग्रजी लिहायचीरे काय गोष्ट ? तो तर आपल्या हातचा मळ. केव्हां ह्मणशील तेव्हां, वाटेल तें, वाटेल तितके शीट लिहून देईन. किती शीट लिहायचे आहेत बोल. १०० शीट, १५० शीट........"

" अरे शीट कसले लिहितोस, एक लहानसं दोन तीन सायडींचं नोटपेपरवर पत्र लिहायचं आहे तेवढं तूं मला लिहून दे. मी तें मला जिकडे पाठवायचं तिकडे पाठवून देईन. मात्र त्याबद्दल कुठें बभ्रा करतां कामा नये. मीं आपल्याबरोबर कागद आणले आहेत. शाईची पेन्सिल तुझ्याजवळ आहे. इथल्या इथें लिही. मजकूर काय तो मी तुझ्या कानांत सांगतों, " असें म्हणून खरोखरीच त्यानें त्याच्या कानाशीं बराच वेळ लागून कांहीं मजकूर सांगितला.

त्यांजवर नजर देऊन दूर बसलेल्या गृहस्थानें तें आपणास ऐकूं यावें म्हणून पहिल्याप्रमाणें आळस वगैरे देऊन त्यांचे बाजूस रेलून प्रयत्न करून पाहिला; परंतु त्यांत त्यास यश आलें नाहीं.

इकडे साहेबी थाटाच्या गृहस्थांनीं, " अंः त्यांत काय आहे ! आतां खरडून देतों " असें म्हणून त्या दुसऱ्या गृहस्थानें आपल्या उपरण्याच्या बोळ्यांतून काढून दिलेला कागद वगैरे घेऊन खाण्याच्या जिनसा एके बाजूस सारून व हातरुमालानें जागा साफ करून, खिशांतलें फाउंटन पेन काढून खरडशाही चालविली; व ती संपतांच मोठ्यानें 'देअर' असें म्हणून आपल्या सोबत्यापुढें तें पत्र पसरून आपटलें. इतक्यांत आमचा तो पहिला गृहस्थ आपल्या जागचा उठून कांहीं तरी निमित्त काढून झटकन् बनारशी पोषाखवाल्याच्या-सरसा गेला व तेथें क्षणमात्र थबकून तसाच कॉफीगृहाच्या म्यानेजरास पैसे देण्याच्या जागेपाशीं जाऊन उभा राहिला.

# प्रकरण ४५ वें.

## राजारामाची कल्पना.



त्या तिऱ्हाइताचें जें काय काम व्हावयाचें तें झालें असें दिसलें. कारण त्यानें चट्कन पैसे वगैरे काय द्यावयाचे ते देऊन तें कॉफीगृह सोडलें. इकडे आमचे हे दोघेही पत्र लिहिल्यानंतर फार वेळ बसले नाहींत. त्यांनीं लवकर तेथून उठण्याची तयारी केली. साहेबी थाटाचा माणूस दुसऱ्यास, 'आतां तूं कुठें जाणार' असें ह्मणाला व दुसऱ्यानें त्यास, "आतां मी आपल्या कामाला जाणार, तूं आपल्या कामाला जा. माझ्या नादीं लागूं नको." असें उत्तर दिलें.

साहेबी गृहस्थानें चटकन् बनारशी गृहस्थास ह्मटलें, "मी तेंच तुला म्हणणार होतों कीं, मी एका साहेबाला भेटायला जाणार आहें. तो मला कांहीं मोठी थोरली एजन्सी देणार आहे, तेव्हां आतां मी तुझ्याबरोबर येत नाहीं. माझ्या मी कामाला जातों, तूं आपल्या कामाला जा. पण गड्या, माझ्या गजल्यांत आज अगदीं दिडकी नाहीं, आणखी आतां आधीं मला हेअरकटिंग सलूनमध्यें गेलं पाहिजे, तर कुठं साहेबाकडे जाण्याची सोय. कांहीं पांच पंचवीस रुपये असले, तर टाक इकडे. तेवढाच दिवस निघेल. तूं आमचा चान्सेलर ऑफ दि एक्स्चेकर तो काय मग? लाव् माय् फ्रेंड एक पन्नास रुपयांची करन्सी नोट, दे इकडे!"

तें ऐकतांच बनारशी गृहस्थ मोठ्यानें हंसला, व ह्मणतोः "तर तर! आपल्या वडिलांनीं आमच्याजवळ आपलं दोन लाख चार लाखांचं डबोलं ठेविलं आहे, तेव्हां आह्मी आपले खजाननीस नव्हे तर कोण? पन्नासाच्या नोटी अशा रस्त्यावर लागल्या आहेत नाहीं? झाडाला लटकताहेत. काय लेकाचा मागतो. जशा कांहीं पन्नास शंभराच्या नोटी, ह्मणजे दिडकी दोन दिडक्याच! चल जा, माझ्याजवळून तुला एक अर्धीसुद्धां मिळायची नाहीं. अर्धीची तरी तुझी किंमत आहे का?"

"कां बरं? आजपर्यंत तुझं इंग्रजी लिहिण्याचं काम कोणीं केलं? हें सगळं काम जर कोणाला पैसे देऊन तुला करण्याची पाळी आली असती, तर लेंका, आजपर्यंत रुपये पांचशें खर्च झाले असतेना तुझे! मी म्हणतों, पांचशें राहिले पण त्यांतले दोनशें, अडीचशें तरी तुझ्याकडे येणं खास—गेला बाजार शंभराला तर मरण नाहीं? त्यांतले मला पन्नास दे. माझ्यासारखा इंग्रजी लिहिणारा तुला पांचशें रुपये देऊनसुद्धां मिळायचा नाहीं, हें तूं पक्कं लक्ष्यांत ठेव. अरे, हल्लीं टाईम्स ऑफ इंडियाला आठवड्यांतून एक शनवारचं आर्टिकल लिहून देतों, तर मला

सवाशें रुपये मिळतात. पण दुसऱ्या कुठें लिहितां कामा नये, असा त्यांनीं करार करून घेतला आहे, म्हणून पंचाईत झाली आहे. नाहीं तर पैशालारे काय तोटा! मी तुझं इंग्रजी पत्र बित्र ल्याहायचं काम करतों, हेंसुद्धां बाहेर फुटतां कामा नये हो; नाहीं तर लागलीच ते करार मोडला म्हणून नुकसानीची फिर्याद करतील. तें त्याचं कांहीं विचारूं नकोस बाबा. बाकी माझीं तीं तुझ्यासाठीं लिहिलेलीं पत्रं ज्याच्या हातांत जात असतील, ते खास म्हणत असतील कीं, हें कोणा तरी मोठ्या साहेबानं लिहिलेलं पत्र आहे इतकंच नाहीं, पण कित्येक साहेबलोक तर माझाच संशय घेतील. अशा तऱ्हेचं इंग्रजी दुसऱ्या कोणाचं नसायचंच, ही त्यांची खात्री. एकदां तर अशी मौज झाली कीं, तो **जनरल कलं-डरबस**-आपल्या मद्रास कमांडचा—त्याला मीं आपली भलतीच सही करून एक खासगी पत्र पाठविलं, त्यानं आपलं नेमकं मला त्याचं उत्तर पाठविलं. अन् पत्रांत लिहिलंन् कीं, त्या पत्रांतल्या इंग्लिशवरूनच मीं हें तुझं पत्र असं ओळ-खलं! अशी आपली मला तीं विलक्षण हातोटी साधली आहे... बरं पण, ए, पन्नास नाहीं तर नाहीं, पण तीस चाळीस रुपये दे. उद्यांच्या आर्टिकलाचे सवाशें रुपये आले कीं, तुझे तुला देऊन टाकतों. मला काय करायचं ठेवून! हें पहा, इथें उधारी फार दिवस रहायची नाहीं बाबा. तुझी मला तशी दिडकी नको. मी तुझं तसं कामयू केलं आहे, आणखी नुसते उसने मागतों आहें. तुला द्यायला हरकत काय? माझा क्रेडिट् नाहीं कीं काय?..."

"तुझा क्रेडिट्! तुझा क्रेडिट् माझ्याजवळ नसायचा, तर असायचा कोणाजवळ बाबा? पण तुझ्या थापा तूं माझ्याजवळ अजून मारतोस आणखी इतरांप्रमाणं मीही फसेन असं तुला वाटतं, याचीच मला मौज वाटते. मी म्हणजे तुला दुसरा सोन्याच वाटतों नाहीं? लेका, त्या दागिन्यांच्या भानगडींतून तुला सोडविलं नसतं, तेवढी शिताफी केली नसती, तर आजला मुंब-ईंत तुझे पाय लागले असते का? वारंट चुकण्यासाठीं गांवगन्ना हिंडत राहतास ना? तें लेंकाचा विसरून मला म्हणतो..."

"चुप् चुप् चुप् बाबा, तुला कुठें काय बोलावं, याचा बिलकुल सुमार राहात नाहीं. अरे, आपण आहोंत कुठें याचा विचार कर. अगदीं चवाठ्याच्या जागे-वर आहोंतना? बरं, बोलतोस तरी हलके? तेंही नाहीं. जसं कांहीं घरांत कोणी मुसळ कोंचलं आहे! चटकन् कोणी ऐकलं म्हणजे मानगूट धरीलना, तेंच तेंच वारंवार कितीदां काढायचं? आणखी कुठें काढायचं? जरा मी पैसे मागायला लागलों कीं लागलीच तूं तें काढतोस—माझ्यापासून काम घेतोस—आपण दोघे मिळून काम करतों, आणखी पैसे द्यायला कां अशी कुरकुर करतोस? चाळीस तुझ्या-जवळ नसले, तीस दे, पंचवीस दे, वीस दे, पण कांहीं तरी देशील कीं नाहीं? भपक्यांत झोंकांत कुठें तरी काम कर-ण्याची जरूरी आली, कीं मला पुढें कर-तोस, त्यापासून पैसे मिळतात ते आपण ठेवतोस, यांत काय अर्थ आहे? कांहीं तरी मला देशील कीं नाहीं? का सगळंच आपण लाटून बसणार? मला आज कांहीं तरी रुपये दे. नाहीं तर, पुनः मी तुझं काम म्हणून कधीं करणार नाहीं..."

बनारशी गृहस्थास आपलें हंसूं कांहीं केल्या आवरेना. "शाबासरे गबरू, तूं असा

धाक घालून माझ्यापासून पैसे काढायला पाहतोस का? तुला ती इसापनीतींतली 'किरडूं आणखी कानस' यांची गोष्ट ठाऊक आहेना? तुझ्या रागानं माझं तर कांहींसुद्धां वांकडं होणार नाहीं; पण तुझे मात्र दांत खास पडतील. तेव्हां काय बोलायूसंवराय चं तें विचार करून बोल."

"बरं, पण आतां इथं भांडतच उभं राह्यचं कीं जायचं? मला तर आज कांहीं तरी रुपये पाहिजेत. ते तूं नाहीं दिलेस, तर कांहीं चालायचं नाहीं. आज मला रुपये दे, उद्यां वाटेल तें काम घे. पण पैसे आज नाहीं मिळाले, तर मला कुठें तरी कोणाला तरी..."

"मग कोणाला तरी गांठणार तो मलाच गांठतो आहेस वाटतं? बरं तर इतकं तूं गयावया करतोस, तर एक रुपयाभर तुला देतों."

"एक रुपया! एक रुपयानं काय काम होणार बोआ? रुपये निदान दहा दे. दहा रुपयांखेरीज आज दिवस कसा निघणार? तें कांहीं नाहीं. आतां उगीच आणखी वेळ गमावूं नकोस. कांहीं तरी दे. दहा नाहीं आठ..."

"घे लेका भीकमाग्या! घे एकदांचा," असें ह्मणून बनारशी गृहस्थानें आपल्या त्या सोबत्याच्या अंगावर एक पांच रुपयांची नोट फेंकली आणि तो स्वतः तेथून चालता झाला, नव्हे जाऊं लागला. तों पुनः त्या कॉफीगृहांत केलेल्या चैनीबद्दलचे पैसे देण्याबद्दल वांधे पडलेच. साहेबी थाटाचे गृहस्थ आपल्यास नुकतीच मिळालेली पांच रुपयांची नोट मुळींच मोडीनात. 'मी काय म्हणून मोडीन? मला दुसऱ्या कांहीं कारणाकरितां पाहिजे ह्मणून तर मीं तुझ्यापासून इतकी माथेफोड करून घेतली. मी आपल्या कामाकरितां कांहीं इथें आलों नाहीं, तूं मला बोलावलंस म्हणून आलों. तुझं काम होतं म्हणून आलों, नाहीं तर मी का असल्या भिकार रेस्टोरांटमध्यें यायचा? शाबास! असल्या गचाळ ठिकाणीं आमच्यासारखे लोक यायला लागले, ह्मणजे मग झालं! तें कांहीं नाहीं. मी इथें आलों हाच मोठा उपकार ह्मण. नाहीं तर मी पीअर्संच्या, नाहीं तर व्हिएन्ना सलूनमध्यें रोज जायचा! मी आतां जातों.' 'ए माधवराव, ए शेट तुमचे पैसे देल,' असें त्या कॉफीगृहाच्या मालकास ह्मणून स्वारींनीं तेथें पडलेल्या सिगारेट्सच्या पॅकेटांतून एक पॅकेट उचललें, त्यांतली एक सिगरेट् काढून तेथलीच सेफ्टी आगपेटी उचलून फरकन् काडी पेटवून सिगारेट् शिलगावून ती ओढीत ओढीत आगपेटी व सिगरेटूचें पॅकेट दोनही खिशांत टाकून स्वारी झटकली! बिचारा बनारशी त्या झटपटीला पाहून थक्क होऊन स्वस्थच उभा राहिला.

कांहीं लोक निवळ ढकलश्रमें करून आपलीं कामें साधीत असतात. बनारसी गृहस्थानें पैसे द्यावयाचे ते दिलेच. ते आपल्याला द्यावे लागणार, हें तो जाणूनच होता. तेव्हां त्याबद्दल त्याला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. जें काय आश्चर्य वाटलें, तें आपला स्नेही किती झोंकानें, ऐटीनें व सफाईनें निघून गेला याबद्दलच होय. पैसे दिल्यानंतर स्वारी तेथून बाहेर पडली, आणि मनांत ह्मणत होती.

"मुंबईस आपण आलों, त्यावेळीं कोणत्या मनाच्या स्थितींत आलों, आणखी काय एकंदर प्रकार झाले, आपण समुद्रावर काय उद्देशानें गेलों होतों, तिथें लोकांस काय वाटलं आणि झालं काय? या

सगळ्याचा विचार मनांत आला, ह्मणजे आपल्या मनाची मोठी बहार उडते आणि आजमित्तीला तर जी स्थिति झाली आहे, ती आपल्या स्वप्नांतसुद्धां नव्हती ! बस ! ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं, कीं दुनिया झुकती है झुकानेवाला चाहिये. नाहीं तर असल्या हुन्नरावर माझ्या हातांत इतके रुपये रोज खेळावे ! आणखी पांच चार वर्षांत मी मुंबईस चार चाळी बांधीन, आणखी त्यांत जर का माझ्या इच्छेप्रमाणं गोष्टी झाल्या, तर मग विचारूंच नका. त्या वेडप्याला कशी खाशी भुरळ मीं घातली, आणखी या दुसऱ्या वेडप्याला त्याचं वारं सुद्धां नाहीं. सध्या आतां आपण चालविला आहे यासारखा दुसरा मार्ग नाहीं......."

इतकें तो आपल्याशींच बोलतो आहे, तों समोरून येणाऱ्या एका गृहस्थाला त्याचा धक्का बसला, व तो वर पाहातो, तों यानें त्यास ओळखलें. त्या गृहस्थानें मात्र यास प्रथम ओळखलेंसें दिसलें नाहीं, ओळखलें नसलें, तर तेवढें बरेंच असें मनांत ह्मणून हा त्यास टाळून जाणार तोंच त्या दुसऱ्या गृहस्थाच्या मनास याची ओळख पटून तो एकदम मोठ्यानें उद्गारला, "कोण, राजाराम ! वा ! तूं तर आज निव्वळ बनारसी बोवा बनला आहेस. तूं आतांशा असतोस तरी कुठें ! तुझा मीं किती वेळां तरी शोध केला, आणखी सध्या मला तुझी फार जरूर होती. पद्माकराचा आज पांच सात दिवसांत कोठें पत्ता नाहींसा झाला आहे. तुला कांहीं त्याची वार्ता आहे का ? तुला कदाचित् तो भेटला असेल, कुठें जाणार येणार बोलला असेल, ह्मणून मी तुझा शोध करीत होतों, तों आयताच भेटलास. पद्माकर आहे कुठें ?"

"वा महाराज, प्रभाकरपंत !" राजाराम त्यास अगदीं आश्चर्यचकित मुद्रेनें ह्मणतो, "पद्माकरपंताची हालचाल तुह्माला ठाऊक कीं आम्हाला ठाऊक ! मला तर ते आज कित्येक दिवसांत भेटले नाहींत. ते बडे माणूस, आह्मी आपलीं पोटार्थी माणसं ! सगळा दिवस पोटाच्या उद्योगांत गढून गेलेले, त्या आम्हांला त्यांची खबरबात कशानं लागणार ? ते आमच्या घरीं कधीं येत नाहींत, जात नाहींत. आम्हालाच कधीं वेळ झाला तर आह्मी जाऊं तेव्हां ते घरीं असले तर भेटणार, नाहीं तर त्यांची गांठ कसची पडते ! पण तुम्हांला कशी त्यांची माहिती नाहीं बोआ ? वडिलांकडे वगैरे गेले कीं काय ? अलीकडे अलीकडे त्यांचे तोंडून तर पश्चात्तापाचे उद्गार निघूं लागले होते. अहो, स्वतःच्या मनाचं कांहीं नाहीं, केवळ हुरळल्याप्रमाणं व्यवहार होऊं लागला ह्मणजे हें असंच होतं. त्यांची चित्तवृत्ति ठिकाणावर नव्हती असा मला अनुभव होता. कारण एकदां दोनदां ते माझ्याजवळ कांहीं वेड्या वेड्यासारखंच बडबडले. मला वाटतं तुमच्याबद्दल अलीकडे त्यांचं मन साफ नसावं........."

पद्माकरपंत त्यास ह्मणाले, "तूं ह्मणतोस तशी माझी देखील समजूत आहे. तो अलीकडे मला टाळी. कधीं भेट घेत नसे याचं कारण काय म्हणून विचारलं, तर टाळाटाळीचीं उत्तरं देई. मग त्याच्या मनांत माझ्याविषयीं काय आलं असेल तें असो. मीं आपल्याकडून त्याला पुष्कळ वेळां विचारलं, पण धड उत्तर नाहीं. तिकडे बायकोला माथं फिरल्यासारखीं पत्रं गेलेलीं आहेत. तिकडून मला तारांवर तारा आल्या, मी आज दोन तीन

दिवस एकसारखा त्याचा शोध करतों आहें, परंतु कांहीं पत्ता लागत नाहीं. कोणी मला असं सांगितलं, कीं तो कुठें तरी परदेशाला गेला, ह्मणून मीं टॉमस कुक यांच्या ऑफिसांत जाऊनही शोध केला, पण कुठं पत्ता लागत नाहीं. आज आतां रुब्याटिनो ऑस्ट्रियन लॉइडस् वगैरेंच्या ऑफिसांत शोध करावा म्हणून निघालों आहें. लागला पत्ता तर पाहतों, नाहीं तर मी तरी काय करणार ? "

" परदेशाला ? परदेशाला तो जाणार ? मला नाहीं वाटत तो परदेशाला जाईल असं. परदेशाला जायला पैसे पाहि-जेतना ? ते तो कोठले आणणार ? अहो, इथेंच कुठें गेला असेल. जातो कुठें ! तुम्हाला त्याची इतकी काळजी कां पडली ? कांहीं लहान कुकुलं बाळ नव्हे, तर बुवा कुठें गेलं असेल, काय होईल ! मला पक्कं ठाऊक आहे, ठाऊक म्हणजे काय, तो माझ्याजवळ प्रत्यक्ष बोललाच, कीं तुमच्याबद्दल आपल्या मनांत फार मोठा मत्सर आहे. मग तो कशावरून असेल तो त्याचा त्याला ठाऊक. त्यांतलं इंगित काय तें समजण्यासाठीं मीं पुष्कळ खट-पट केली, पण तो सांगेना. बाकी माझ्या मनांत शंका आलीच, नाहीं आली असं नाहीं, पण प्रत्यक्ष कळण्यांत आणखी शंकेंत पुष्कळ अंतर असतं."

" काय काय शंका आली ? माझ्याबद्दल त्याच्या मनांत अशी उत्पन्न होण्याला काय कारण असणार ? मला तर कांहीं कल्पना होत नाहीं."

" अहो, साध्या भोळ्या माणसांना शंका, आणखी कल्पना येणार कसल्या ! शंका कल्पना येणारी माणसं निराळींच असतात. त्याच्या मनांत हजार तऱ्हेच्या कल्पना आल्या म्हणून तर त्याला तुमच्या-बद्दल इतकं वैषम्य वाटलंना ? "

" पण वाटलं कशाबद्दल ? काय त्याच्या मनांत आलं ? "

" त्याच्या मनांत काय आलं तें जर मला कळतं, तें जर तो मला सांगता, तर मीं त्याच्या त्या शंका केव्हांच दूर केल्या असत्या; पण तो सांगेना म्हणून तर सगळी पंचाईत. नाहीं तर पंचाइत कसली होती."

" पण तुम्हांला काय शंका आली ! काय कारण असावं ! "

" अहो, या दुनयेंत कारणं अवघीं दोन. एक ' क ' आणखी दुसरं ' का.' "

प्रभाकरपंत वेड्याप्रमाणें राजारामाच्या तोंडाकडे स्वस्थपणें पाहात उभा राहिला.

---

# प्रकरण ४६ वें.

## गुंडशास्त्री थक्क झाले !



कित्येक मनुष्य बाहेर असतांना जितका अरेरावीचा दिमाख दाखवितात, तितका त्यांचे हातून आपल्या घरांत दाखविला जात नाहीं. किंबहुना घरांतल्या माणसांस त्यांचा पोचटपणा पक्केपणें कळून आल्याकारणानें त्यांस घरांत तो आपला दिमाख अगदीं गुंडाळून ठेवावा लागतो. ते आपल्याकडून पुष्कळ कर्दनकाळपणाचा आविर्भाव दाखविण्यास पाहात असतात; परंतु तो बाहेर कितीही साधला, किंवा साधला असें त्यांस कितीही वाटलें, तरी घरांत तो साधत नाहीं. आमच्या काकासाहेबांची हीच स्थिति होती. ते मोठे करारी, दुराग्रही, एककल्ली, ह्मणूं तें करूंच करूं, असें वर्तन ठेवणारे असे होते. निदान त्यांच्या आश्रितांची तरी अशी समजूत होती. समजूत असो नसो, अशी आपली समजूत, असें ते निदान बाह्यतः तरी दाखवीत; परंतु दिवसानुदिवस घरांत काकासाहेबांची फारच त्रेधा उडूं लागली. मागें एका प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें त्यांचे घरांत दुफळी होऊन त्यांची व त्यांच्या वहिणीची त्रेधा उडाली. काकासाहेबांस 'दे माय धरणी ठाय' होऊन गेलें व त्यांनीं आपल्याकडून बहीण व बायको यांची दोघींचीही समजूत घालून पूर्ववत् जम जमल्यास पाहावें म्हणून पुष्कळ यत्न केला; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. वहिणीनें बायकोस व बायकोनें वहिणीस अद्वातद्वा शिव्या दिल्या. एकंदर जगाची उठाठेव करून आपल्या ह्मणण्याप्रमाणें जगास चालण्यास लावण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या काकासाहेबांस बायको व बहीण या दोघींस एकत्र कसें ठेवावें, हेंच मोठें गूढ पडलें आणि आतां एक बायकोस तरी आंचवावें किंवा बहीण 'काशीयात्रेस जातें' ह्मणते, तीस जाण्यास परवानगी द्यावी. याखेरीज दुसरा मार्ग राहिला नाहीं. ह्मातारपणीं मोठ्या हौसेनें केलेल्या पत्नीस आपल्यापासून दूर ठेवण्याचें नैष्ठुर्य कोण करील ! बहीण आतां म्हातारी झालीच होती. काशीयात्रेसारख्या पुण्यकरकार्यांत तिचे शेवटले दिवस गेले तर कांहीं वावगें नाहीं, असाच विचार काकासाहेबांच्या मनांत आला व मागल्या याचसंबंधाच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें प्रसंग घडल्यानंतर सुमारें चार दिवसांनीं काकासाहेब हंसत हंसत आपल्या भगिनीस म्हणतात, "तूं आणखी मी दोघंही आतां काशीयात्रेस जाऊं. ज्याला कोणाला कारभार करायचा असेल त्याला तो खुशाल करूं दे. आपल्याला तरी आतां काय करायचं आहे ? कधीं निघणार ! हें सगळं घर हिच्या स्वाधीनच करून जाऊं. तुझा अव-

मान तो माझाच अपमान असं मी समजतों."

काकासाहेब हें बोलत होते खरे, परंतु त्यांच्या त्या बोलण्यांत किती वस्तादगिरी भरली होती, हें त्यांचें बोलणें ऐकणाऱ्या कोणासही समजून आलें असतें. त्यांच्या वहिणीस तें समजलें नाहीं असें नाहीं. ती आधींच फार संतापली होती. आपल्या भावाचें तें तसलें लबाडीचें बोलणें ऐकल्या-बरोबर तिचा संताप फारच भडकला व ती एकदम त्यास ह्मणाली, "मला हीं सगळीं बोलणीं समजतात. तुझींच फूस असल्याशिवाय हे असले प्रकार झालेच नसते. तुझ्या मनांत मी घरांत नकोच होतें, तर मला तसंच कां नाहीं सांगितलंस? मी मुकाट्यानं एके दिवशीं उठून काशीयात्रेला गेलें असतें. पण तुझ्या मायापाशांत गुंतलें त्याचीं फळं मला चांगलीं मिळालीं. मी आतां तीन दिवस वाट पाहातें. जर तूं कांहीं नीट व्यवस्था करीत असलास तर मी आहेच, नसलास तर मी आपली वाटेल तिकडे जाण्याला मुखत्यारच आहें."

काकासाहेब पुनः मोठ्यानें हंसले व ह्मणतात, "व्यवस्था व्यवस्था ती काय करायची? तूं आणखी मी दोघेंही काशीयात्रेला जाऊं. मग वाटलं तर परत आले, नाहीं तर तिथेंच एखाद्या सुंदर व प्रशस्त अशा घाटावर घर घेऊन खुशाल पूजाअर्चा करीत राहूं. ज्या संसारांत गोडीगुलाबीचा भाग नाहीं, आपलीं सर्व माणसं गुण्यागोविंदानं राहात नाहींत, तो संसार कसला, आणि तें राहाणं तरी कसलं? तूं तीन दिवस तरी ह्मणतेस पण मी तीन दिवसांची मुदतसुद्धां ह्मणत नाहीं. मला इथली तजवीज लावण्याला काय एक दोन दिवस कमी-अधिक लागतील तेवढेच. बाकी मी तुझ्या बरोबर येऊन दिवस काढणार. इथलं सुख काय आहे तें मला समजलं. मनुष्य सुखाच्या नादीं लागून खड्ड्यांत कसा पडतो याचा मला आतां पुरा अनुभव आला. तूं आधीं जात असलीस तरी मी तुझ्या आड कधीं येणार नाहीं. मला चार आठ दिवस येथेंच अधिक उणे लागण्याचा संभव आहे, तेव्हां तितके दिवस तुला इथें ठेवून घेऊन विनाकारण तुझ्या चित्ताला त्रास देण्यांत तरी काय अर्थ आहे? इकडे तिकडे नाशिक, त्रिंबक वगैरे लहानसहान यात्रा करण्याची तुझी इच्छा असली तर माझी तयारी होईपर्यंत तूं तिकडे जाऊन ये, ह्मणजे मी आपली सर्व व्यवस्था करून तयार होतों; मग इथें या मंडळींना वाटेल तो गोंधळ घालण्यास हरकत नाहीं."

काकासाहेबांनीं अशाच प्रकारें आणखीही पुष्कळ चर्पटपंजरी चालविली असती; परंतु त्यांच्या वहिणीनें ती चालूं दिली नाहीं. तिनें मध्येंच खेंकसून त्यांचे अंगावर येऊन त्यांस ह्मटलें, "मी मुळींच इथें राहात नाहीं. मला तुझा सगळा कावा समजला. याच्यापूर्वींच मी समजायला पाहिजे होतं, परंतु उमजलं नाहीं. त्याचं फळ मला आतां भोगायला लागतें आहे तें भोगलं पाहिजे. मला लहानपणींच देवानं संसारांतून उठविलीं पण मी तशीच त्याला चिकटून राहिलें. स्वतःचा संसार होईना, तेव्हां दुसऱ्याच्या संसारांत पडलें, तेव्हां लहानपणींच जर कोणी मला गुरु भेटला असता, तर मी कशाला यांत पडलें असतें! पण जी गोष्ट झाली गेली, तिचा आतां काय उपयोग! मी आतां आमच्या वहिनीसाहेबांना गुरु केल्या......"

हे शेवटले शब्द त्या बाईच्या तोंडून बाहेर पडले मात्र, तोंच ज्यांच्याविषयीं त्यांत उल्लेख होता, त्या एकदम पुढें येऊन कोणाचीही भीडमर्यादा न राखतां एकदम म्हणाल्या, "मला गुरु कशाला करतां? आजपर्यंत केलेले गुरु तुम्हाला काय कमी आहेत? त्या गुरूंची सेवा करण्यांत अंतर पडतं तें तरी कशाला पडूं देतां? लौकर जाल तेवढ्या त्यांची सेवा करायला मोकळ्या व्हाल; आणखी आमचं घर जें धुऊन काढण्याचा सपाटा चालला आहे, तो तरी एकदां बंद होईल. घरांत आमच्या तोंडीं धड अन्न पडण्याची मारामार, पण आपल्या गुरूंना कधीं कांहीं कमी पडत नसेलच. कां पडेल? आपल्या हातांत सर्व कारभार मग कमी कां पडेल? आजपर्यंत कोणीं पाहिलं नाहीं, संवरलं नाहीं, मग काय? कोण कोण जातां काशीयात्रेला तींही मी पाहीन. मी आपली लहान म्हणुन इतके दिवस गप्प बसलें, पण आतां कधीं गप्प बसणार नाहीं. कां बसेन ?"

काकासाहेब मध्येंच म्हणाले, "बस्, बस्. आतां हें फार झालं बरं का. यांत शहाणपणाचा भाग उरला नाहीं. मी इतरांप्रमाणं मुकाट्यानं बसणारा नवरा नाहीं. ज्यानं त्यानं आपली पायरी ओळखून वागावं........"

"पायरी ओळखूनच वागतें आहे. यजमानणीची पायरी दुसऱ्या कोणी घेऊं लागलं, तर मी बरी घेऊं देईन? कधीं घेऊं द्यायची नाहीं. कां घेऊं देईन? दुसऱ्यांनीं आपली पायरी ओळखून वागण्याला सुरुवात केली म्हणजे मी एक अक्षरसुद्धां बोलेन तर पाहा! आजपर्यंत घरांतून काय काय प्रकार झाले याची तुम्हांला वास्तपुस्त आहे कुठें? मी लहान म्हणून समजूं नका, मला सगळं कांहीं समजत आहे. अति झालं तेव्हांच मी इतकी बोलण्याची धिटाई केली. नाहीं तर हें आणखी असंच किती दिवस तरी चाललं असतं! घर धुऊन नेलं असतं तरीसुद्धां आपल्याला कांहीं समजलं नसतं. तसा प्रकार नसता, तर मला तरी बोलण्याची इतकी काय जरूरी असती!"

दर दिवसास आपल्या पत्नीची धिटाई अधिकाधिकच वाढत चालली हें पाहून काकासाहेबांस एक तर अतिशय आश्चर्य वाटलें व न जाणों, मनांतल्या मनांत थोडें-बहुत बरेंही वाटलें असावें. आपल्या पत्नीनें आपलें अनुकरण इतक्या चांगल्या प्रकारें करावें हें त्यांच्यासारख्या स्वभावाच्या माणसास आनंद देणारेंच खरें, नाहीं तर त्यांनीं केवळ मुकाट्यानें ही इतकी धिटाई सहन केली नसती, आणि आतां तरी आपण ती सहन करतों असें त्यांनीं कोणास समजूं न देण्याचा प्रयत्न केलाच. ते पुनः एकदां आपल्या कुटुंबास म्हणतात, "आतां सन्यास घेण्याची पाळी आली बोआ मला! कुठून या भानगडींत मी पडलों परमेश्वर जाणे! ताई, हें तुझं कृत्य बरं तुझं कृत्य. तूं मला या भानगडींत पाडलंस, नाहीं तर मी कांहीं पडत नव्हतों, पण तूं आणखी तुझ्या त्या शास्त्रीबोआंनीं आग्रह करून माझ्या गळ्याला हा फांस लावला. आतां त्याचीं फळं भोगलीं पाहिजेत. (बायकोकडे वळून) चल, जा आतां आधीं आपल्या जागीं! जों जों मी बोलत नाहीं तों तों फारच काम शेफारत चाललं. परवां बाहेर मंडळी बसलेली म्हणून कसं तरी करून समजूत घालून मीं वेळ मारून नेली, पण आज पाहातों

तों पुनः तीच अवस्था! संवकल्यासारखं काम झालं. चल."

वहिनीबाई जागच्या मुळींच हालल्या नाहीत. नुसत्या आपल्याशींच "मी जातें आहे तर! इथं उभी राहीन, काय म्हणून जाईन? कोण मला घालवणार तें पाहीन! मी या घरांत आलें ती जायला आलें नाहीं. विनाकारण घरांत शिरून ज्यांनीं संसाराचे भंडवडे मांडले आहेत, त्यांना घालवायला आलें आहें" असें पुटपुटत व काकासाहेबांकडून नणंदेकडे आणि नणंदेकडून काकासाहेबांकडे पाहात, तेथल्या तेथेंच स्वारी उभी राहिली. नणंदेच्या अंगाचा अगदीं तिळपापड उडाला. इतका कीं, संतापातिरेकानेंच तिच्या तोंडून शब्द बाहेर निघेनात. ती तडकून जागची उठली, 'पुनः या घरांत अन्न घेईल त्याला शपथ' असें म्हणून बाहेर जाऊं लागली. तेव्हां मात्र काकासाहेबांस थोडें चमत्कारिक वाटलें. आतां आपण काय करावें हें त्यांस सुचेना. गेले तीन दिवस त्यांनीं एका प्रकारें अतिशय कष्टांत घालविले असें म्हटलें तर केवळ अन्यथा होणार नाहीं. श्रीमंत म्हातान्यानें दरिद्र्याची मुलगी केली असतां होणारा त्रास त्यांनीं आजपर्यंत इतरांच्या तोंडून नुसता वर्णनानें ऐकला होता. आज तीन दिवसांत त्यांस तो अनुभवावयास सांपडला. आपली बहीण आतां घर सोडून जाते, त्यांत अंतर होत नाहीं, असें त्यांनीं पाहिलें, तेव्हां स्वारी चपापली. इतका वेळ त्यांस असें वाटत होतें, कीं हें सर्व थट्टेवारी घालवितां येईल, अगर बहीण जातेच म्हणाली तर चार दिवस इकडे तिकडे तीर्थयात्रेला पाठवून परत आणली म्हणजे झालें. आतां सर्वच प्रकार बदलला. विनोदाच्या रूप्यांतली गोष्ट राहिली नाहीं. सर्व प्रकार विकोपास गेला. जो माणूस सगळा गांव आपल्या नाड्यांत ठेवण्याची हांव धरून जिवाचे हाल करून घेत होता, त्यास आपल्या घरांतलीं दोन माणसें नाड्यांत कशीं ठेवावीं याची पंचाईत पडली. आणि दोहोंपैकीं एक तरी आपल्या नाड्यांत राहातें कीं नाहीं असें झालें. त्यांची बहीण फणफणत तेथून उठून गेली आणि हेही बायकोस उद्देशून "हें चांगलं नाहीं बरं का," अगदीं चागलं नाहीं; जा तिच्या पायां पडून तिची समजूत कर; नाहीं तर मी देखील तिच्या मागोमाग घर सोडून जातों" असें मिणमिणले.

त्यांस उत्तर मोठ्यानें तिरस्कारयुक्त हंसणें एवढेंच काय तें मिळालें. तें पाहून काकासाहेबांस विशेषच संताप आला व ते एकदम तिला म्हणतात, "तूं एवढीशीशी पोर, ती जर गेली तर तुझा संसार तरी कसा व्हावा? तिनं म्हणून तर आजपर्यंत आमच्या घराची रया राखली. तुझ्यानं काय होणार आहे?"

"काय होणार आहे तें पाहाण्याचे दिवस येऊं द्या, म्हणजे दिसेल. माझी आई उद्यां बोलाविली तर येईल. संसार संसार तो काय; पण आतां मी दुसऱ्याला कांहीं घरांतला कारभार करूं द्यायची नाहीं. काय करायचं संवरायचं तें माझं मी करणार. मला तरी करतां येतं कीं नाहीं तें पाहा."

काकासाहेब इकडे आपल्या पत्नीशीं अशा तऱ्हेनें बोलण्यांत गुंतले असतां त्यांची बहीण आपल्या चोपड्या, रेशीमकांठी धोतरें, पातळें व शालजोडी आणि दुसरे कांहीं जिन्नस यांचें गांठोडें करून तें घेऊन जाण्यास सिद्ध झाल्या. काकासाहेब तावडतोब त्यांच्यापुढें जाऊन "ताई, हें

काय हें ? आपल्या घरांत झालेल्या गोष्टी इतक्या थराला का नेऊन पोंचवायच्या, म्हणजे मग कमालच झाली ! चल आंत. तुला तरी आतां कारभार करून काय करायचं आहे ? ज्याचा संसार तें जर पाहायला लागलं तर बरंच झालं म्हणावं आणखी स्वस्थ बसावं. आणखी तें काय पाहिजे ? "

परंतु हा वेदांत त्या बाईस कुठला रुचणार ! झालेल्या अपमानानें तिच्या अंगाचा संताप झाला होता. अशा वेळीं अशा या उपदेशानें शमन होण्याचें एका बाजूसच राहून तो संताप अधिकच वाढला, दुसरें तर कांहीं झालें नाहीं. " तूं आतां विनाकारण माझ्या भानगडींत पडूं नकोस, माझी आतां इथें जरूर नाहीं; मी इथें आपला अपमान करून घेण्याला राहात नाहीं. आतां त्या अवमानाला मुळींसुद्धां मर्यादा राहिली नाहीं. गडीमाणसं माझ्यापेक्षां या घरांत ज्यास्ती मानासन्मानानं वागताहेत. त्यांना जी किंमत आहे ती मला नाहीं. मी आतां त्यांच्यापेक्षांही कमी झालें. उद्यां घरचे शागीर्द. गडी. शिपाई, सगळे माझी हुर्येवडी करतील. ती स्थिति येण्याच्या अगोदर इथून निघून जाणं यांतच शहाणपणा आहे......"

" पण तूं जाणार तरी कोणीकडे ! " काकासाहेबांनीं तिला विचारलें. परंतु त्या प्रश्नाचें उत्तर तिच्याकडून न येतां दुसऱ्याच कोणाकडून तरी तें आलें. " कोणीकडे म्हणजे, जे गुरु केले आहेत, ज्यांच्याकडे आजपर्यंत आपल्या घरांतली संपत्ति नानाप्रकारांनीं गेली त्यांच्याकडे !" हें नणंदेस झोंबणारें उत्तर भावजईनें आपल्या नवऱ्याच्या प्रश्नास दिलें आणि ती तशीच तेथें उभी राहिली. तिच्या मनांतून आपल्या नवऱ्यानें कांहीं अधिक-उणें बोलून आपल्या भावजयीस ठेवून घेऊं नये, किंवा तिलाही राहण्याची इच्छा होऊं नये असें होतें. न जाणों, कदाचित् आपल्या नवऱ्याच्या आग्रहानें ती राहील असें तीस वाटलें, तर तें अगदीं अशक्य करून सोडावें, एवढ्या हेतूनें मी तिला लावून बोलण्याची व संताप आणण्याची संधि म्हणून वायां जाऊं देईना.

भावजय इतकें बोलल्यानंतर, मग तर ती बाई एक क्षणभरसुद्धां तेथें उभी राहिली नाहीं. हें झालें काय,याच्या अचंब्यांतच काकासाहेब तेथें उभे राहिले होते. त्या अचंब्याच्या भरांत स्वारी आणखीही कांहीं वेळ तशीच उभी राहिली असती, परंतु इतक्यांत त्यांचे आश्रित शिरोमणि तेथें आले. त्यांस पाहातांच काकासाहेबांनीं, " शास्त्रीबोआ, जा. तिच्या पाठीमागून जा. भलतंसलतंच कांहीं लचांड झालं. ती कुठें जाते तेवढें तरी नीट पाहून या. मी तुमच्या पाठोपाठ येतों. काय करावं मला तर कांहीं सुचत नाहीं..."

" तें खरं काकासाहेब, पण आम्हाला तुरुंगांत जायची पाळी येते आहे त्याची काय व्यवस्था करतां ? गांवांतल्या सगळ्या ब्राह्मणांनीं त्या दादासाहेबांचा पिच्छा पुरविला आहे, कीं तुम्ही एकदां या गुंडशास्त्र्याला तुरुंग दाखवा म्हणजे गांवांतला सगळा बखेडा आपोआप मोडला जाईल." काकासाहेब एकदम त्रासून गुंडभट्टास म्हणतात, " तुरुंगांत जा कीं मसणांत जा, मला काय त्याचं ? सांगतों तें काम करा. तुरुंगांत गेलांत तर काय गांव ओस पडायचा आहे ? "

ते शब्द ऐकतांच गुंडशास्त्री आश्चर्यचकित होऊन काकासाहेबांकडे चमत्कारिक तऱ्हेनें पाहूं लागले.

# प्रकरण ४७ वें.

## शोध.



सर्व मंडळीस अगदीं वेड्यासारखें झालें होतें. कमलेला तर खरोखर वेड लागण्याचीच पाळी आली होती. आजपर्यंत विवाह होतांच अनेक वधूंवर अनेक संकटें आलीं असतील, परंतु कमलेस व तिच्या मंडळीस असें वाटलें, कीं आपल्यावर जसें विचित्र संकट आलें आहे, असें कधीं कोणाच नववधूवर व तिच्या आप्तेष्टांवर आलें नसेल. आधीं मनाप्रमाणें वर मिळून विवाह होण्याचीच मोठी अडचण. त्यांत मोठ्या सुदैवानें--निदान विवाह होऊन हा दुर्धर प्रसंग येईपर्यंत तरी 'सुदैवानें' असेंच वाटलें--अगदीं मनायोग्य वर मिळाला. आपल्या मनाप्रमाणें वागावयास सांपडावें, पुनरूढ दंपत्याची संतति ही कोणत्याही दृष्टीनें त्याज्य नाहीं असें आपणास वाटतें, तर त्याप्रमाणें वर्तन ठेवण्यास आपण तयार आहों असें कृतीनें दाखविणारा निर्धाराचा, हुशार, विद्वान् असा वर मिळाला; त्यानें आपल्यासाठीं जनकजननी, सर्व कुटुंब, धनसंपत्ति यांचा सर्वस्वी परित्याग केला, पण अखेरीस आपल्यास व आपणा स्वतःस सुखसरोवराच्या कांठावर नेऊन एकदम दुःखसमुद्रांत लोटलें असें पाहून कोणा सुशील पत्नीस--नववधूस अत्यंत दुःख होणार नाहीं? आपला पति मुंबईंत नाहीं, तो मुद्दाम मुंबई सोडून तेथून नाहींसा झाला, हें ऐकतांच त्या बिचाऱ्या अल्पवयी पत्नीला आणि तिच्या त्या मरणोन्मुख जननीला किती दुःख झालें असेल! एक महिन्यापूर्वी आपण कोणत्या उमेदींत होतों--महिन्यापूर्वी कशाला?--आठ चार दिवसांपूर्वी आपण कोणत्या उमेदींत असून काय बेत करीत होतों, आणि आज आतां काय स्थितीला येऊन पोंचलों? असें मनांत येऊन तिचें मन अत्यंत उद्विग्न व उत्तप्त होऊन वेड लागण्याची वेळ येईल यांत नवल काय?

तशांत प्रभाकराचें स्वच्छ पत्र आलें, कीं "पद्माकर कुठेंही मुंबईंत नाहीं. मीं अनेक ठिकाणीं अनेक प्रकारांनीं शोध केला, परंतु कुठेंही यत्किंचित्सुद्धां सुगावा लागत नाहीं. कोणी मला असें सांगितलें, कीं तो परदेशीं गेला, म्हणून मीं सर्व आगबोट--कंपन्यांतही जाऊन शोध केला; परंतु कुठें पत्ता नाहीं. आतां कुठें शोध करावा हें मला समजत नाहीं. आणि त्याच्या जाण्याच्या कारणासंबंधानें ज्या हकीकती ऐकावयास येतात; त्या ऐकून तर माझें मन भ्रमिष्टासारखेंच झालें आहे. पद्माकर अशा चमत्कारिक तऱ्हेचें वर्तन करील, असें थोडे दिवसांपूर्वी जर कोणीं भविष्य मला सांगितलें असतें, तर त्या भविष्यवाद्याची मीं नुसती

तर उडविली असती. परंतु मनुष्याच्या मनाची स्थिति कोण्या वेळीं कशी बदलेल याचा नेम नाहीं हींच गोष्ट खरी. झालेली हकीकत पाहून कमलेबद्दल व आपल्या सर्वांबद्दल माझे मनास काय वाटत आहे हें पत्रीं वर्णन करून सांगतां येत नाहीं. या माझ्या मित्रास मींच आपल्या इथें आणलें व पुढें जें काय झालें तें माझ्याच अनुमतानें व साहाय्यानें झालें, यामुळें माझें मन आज मला किती खातें आहे तें माझें मलाच ठाऊक. अजून मी पद्माकराच्या शोधांत आहेंच. जर कांहीं सुगावा लागला तर तावडतोब मी आपणास कळवीनच. तो मुंबईत असेल, तर त्याचा शोध केल्याखेरीज मी रहात नाहीं, व बाहेर गेला असेल तर कुठें गेला आहे याबद्दल पक्का शोध काढल्याखेरीजही रहात नाहीं. आमचा मित्र राजाराम हा आपला सर्व उद्योग एकीकडे टाकून माझ्याप्रमाणें त्याच्या शोधाकरितां सगळ्या मुंबईभर पायाला भोंवरा बांधून हिंडल्याप्रमाणें हिंडत आहे. काय होईल तें खरें."

हें पत्र बळवंतरावाच्या नांवचें होतें. या पत्रामुळें विशेषच हाहाःकार उडाला. पद्माकराचा शोध लागण्याची आतां आशाच उरली नाहीं. या पत्रांतील मजकूर बळवंतरावांनीं आपल्या घरांतील मंडळीस पूर्णपणें सांगितला नाहीं. फक्त गणपतरावास तें पत्र दाखविलें. जितक्या उतावळीनें पद्माकरानें लग्न करण्यासाठीं आपल्या कुटुंबसौख्यावर पाणी सोडलें, तितक्याच उतावळीनें व अविचारानेंही तो आपल्या संसारसुखावर पाणी सोडील ही कल्पनाही कोणास कधीं आली नसती. परंतु आज त्या गोष्टीचा अनुभव सर्वांस आला आणि तो इतका दुःसह अनुभव, कीं बळवंतरावासारखा धीरवान् मनुष्यही इतक्या उतावळीनें आपल्या पोरीचें लग्न केल्याबद्दल पश्चात्ताप करूं लागला. द्वारकाबाईची स्थिति काय झाली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी.

वर सांगितलेंच आहे, कीं कमलेस अगदीं वेड लागण्याची पाळी आली. आपण आपल्या मातापितरांस दुःख देण्यासाठींच जन्मलों, आपल्यापासून त्यांस सुखाचा लवलेशही मिळणें शक्य नाहीं, आपल्या दुःखामुळें त्यांस आतां अतोनात दुःख होणार, आपल्याकडे पाहिलें, कीं त्यांच्या हृदयास सुया टोंचल्याप्रमाणें होणार, यापेक्षां आपण त्यांच्या पोटीं जन्माला आलों नसतों तर बरें होतें, असे विचार तिच्या मनांत एकसारखे येऊन तिचें चित्त अगदीं वेतागल्याप्रमाणें व वेडावल्याप्रमाणें झालें होतें. आपली आई आधींच मरणाच्या द्वारांत बसलेली, ती आतां या आपल्या धसक्यानें केव्हां आपणास सोडून जाईल याचा नेम नाहीं, असें मनांत येऊन तिला आणखीही पराकाष्ठेचें दुःख होऊं लागलें. काय करावें, काय बोलावें, कोठें जावें, हें तिला कांहीं सुचेना. तिच्या मनास असें वाटलें, कीं यापुढें आपल्यास तर काय, परंतु आपणापासून कोणासही सुख मिळणें शक्य नाहीं.

मनाच्या अत्यंत वाईट स्थितीपैकीं अत्यंत अत्यंत वाईट स्थिति ही कीं, ज्या स्थितींत 'आपण या जगांत राहाणें ह्मणजे आपल्याला व दुसऱ्याला विनाकारण ताप देणें होय. आपल्यापासून कोणासही कांहींचें सुख लाभत नाहीं, आपल्यास पाहिलें असतां पहाणाऱ्याच्या मनास बरें वाटणें एकीकडेच राहून उलट त्यास अति-

शय वाईट वाटतें, ' असे विचार आपल्या मनांत येतात. अशा मनाच्या स्थितींत मनुष्य आपल्या जिवाचें काय करील आणि काय नाहीं याचा नेम नसतो. या जगांत मनुष्यास किंबहुना प्राणिमात्रास आपला जीव संभाळून राहाण्याची उत्कट इच्छा सदैव जागृत राहाण्याला मुख्य कारणें ह्मटलीं ह्मणजे सुखस्थितीचा अनुभव किंवा ती स्थिति आपल्यास अनुभविण्यास सांपडेल अशी प्रबल आशा. ज्या व्यक्तीचें मन अतिशय उदात्त स्थितीस पोहोंचलें असेल, त्या व्यक्तीस वरील दोन कारणांखेरीज आणखीही तिसरें कारण असतें. तें कारण आत्मत्याग करून परसुख साध्य करावयाचें अशी इच्छा होणें हें होय. आपलें सुख मनांत आणावयाचें नाहीं किंबहुना जाणूनबुजून त्याचा त्याग करावयाचा. दुसऱ्याचें सुख साधावयाचें यांतच आपलें सुख असें मनास पक्कें वाटण्यास लावावयाचें. हें आपण साधून आपल्या कष्टांनीं दुसऱ्यास सुखी करून तो आपल्या सुखाचा अनुभव घेत असतां आपण तें पाहूनच सुखी व्हावयाचें. हेंही जीवितांचा अवलंब करण्यास कित्येक व्यक्तीस फार प्रबल कारण असतें. परंतु बिचाऱ्या कमलेस या कारणत्रयींपैकीं एकही कारण उरलें नाहीं. स्वतःच्या सुखाचा विनाश झाला. सध्या आपल्या सुखाचा विनाश झाला तरी थोडे दिवसांनीं तें आपणास पुनः प्राप्त होईल ही आशाही उरली नाहीं व इतकी स्थिति झाली तरी आपण दुसऱ्यास सुख देऊन तो दुसरा तें सुख अनुभवीत असतां त्याच्या सुखस्थितीच्या दर्शनानें आपण सुखी होऊं, हीही आशा करणें या वेळीं तिला दिसेना. कारण आपणास पाहून कोणासही आतां सुख होणें शक्य नाहीं हें तिच्या मनानें पूर्णपणें घेतलें. वर सांगितलेंच आहे, कीं ही वर सांगितलेली मनाची स्थिति सर्वांत वाईट. हिनें जितकें नुकसान होतें तितकें कोणत्याही स्थितींत होत नाहीं. तशांत एका सुधारकद्वेष्ट्या वर्तमानपत्रांत खालीं लिहिलेला एक पॅरिग्राफ आला, तो अचानकपणें तिच्या वाचण्यांत आला. तो पॅरिग्राफ असाः—

“ **टारगटपणाचें फळ** अथवा **सुधारकी लग्नाची फटफजिती**— थोडे महिन्यांपूर्वी येथें एक लग्न झालें किंवा लग्नाच्या नांवानें फार्स झाला, त्या वेळीं आह्मीं आपल्या पत्राच्या द्वारें आमच्या वाचकांस त्या फार्साची हकीकत कळविलीच होती. आज त्या लग्नाचें, नव्हे त्या फार्साचें काय विचित्र रूप झालें आहे, त्या फार्साची ट्याजडी (दुःखपर्यवसायी नाटक) कशी झाली आहे हें वाचकांपुढें मांडण्याचें आमच्या नशिबीं आलें आहे. खरें ह्मटलें तर आम्हांस यांत नवल कांहींच वाटत नाहीं. विषवृक्षाला अमृताचें फळ कोठून येणार? ज्या कुलंग्या सुधारकानें फटाकडी बायको मिळण्याकरितां सुखाचें घरदार व सच्छील आईबाप या सर्वांचा परित्याग केला, त्याची काय अवस्था झाली आहे पहा! इतकी भयंकर किंमत देऊन पैदा केलेलें तें नवें संसारसुख अनुभवावयास लागण्याच्या पूर्वींच त्यास त्या सुखाचा व अर्थातच तें सुख जिच्यापासून मिळणार त्या सर्वांगसुंदर नववधूचा वीट आला. स्वजन तर सोडलेच; आतां स्वदेश सोडून कोणीकडे तरी चालतें व्हावें इतका वीट आला! आम्हांस खात्रीलायक आधारावरून असें कळलें आहे, कीं

आपल्या प्रौढ पुनर्भू [ पाट लाविलेल्या विधवेच्या प्रजेस हा संस्कृत शब्द आहे. ] वधूचा व तिच्या जनकजननींचा आणि त्यांच्या एका मित्रशिरोमणींचा कांहीं कारणावरून अतिशय निरूकारा येऊन ही स्वारी देशोधडीस लागली. सरतेशेवटीं असें च कांहीं तरी होणार याबद्दल आम्हास शंका नव्हतीच. परंतु तें इतक्या लौकर होऊन आम्हास त्याबद्दल लेख लिहिण्याची आतांच पाळी येईल असें वाटलें नव्हतें, हें कबूल करणें भाग आहे. हा प्रकार पाहून तरी समाजसुधारकांचे डोळे उघडोत म्हणजे झालें. कोणी मंडळी स्वत:च्या मूर्खपणानें आपल्यावर ओढून आणलेल्या का होईना पण दु:खांत असतां-[ दु:खांत आहेत असें आह्मी धरून चालतों, परंतु खरें विचारलें तर आह्मांस त्याबद्दल शंकाच वाटते. एक लग्नापासून सुख आलें नाहीं तर दुसरें करण्यास काय हरकत आहे असें प्रतिपादन करणाऱ्या सुधारकांस एका लग्नाच्या दुष्परिणामामुळें दु:ख कसचें होणार ? ] तथापि दुसरी मंडळी दु:खांत असतां-आपण त्यांच्या दु:खावर डागण्या देणें हें आम्हां आर्यधर्माभिमान्यांचें ब्रीद नव्हे. सबब आह्मी या मंडळीबद्दल आणखी कांहीं लिहीत नाहीं. "

गणपतराव हें पत्र नेहमीं घेत असत. आपल्या विरुद्ध पक्षाची मंडळी काय बोलते, हें आपणास कळावें, या हेतूनेंच त्यांचा त्या पत्रास आश्रय होता. त्यांत असें कांहीं वेडेंवांकडें लिहिलेलें असलें म्हणजे तें पत्र घरांत कोणाच्याही हातीं पडूं नये, अशी तजवीज ते करीत असत. परंतु नेहमीं ज्या गोष्टीविषयीं फार काळजी बाळगावी तीच गोष्ट एखादे वेळीं केव्हांच होऊन जाते. त्याचप्रमाणें कांहीं अनपेक्षित कारण घडून तें पत्र सहजगत्या कमलेच्या हातांत पडलें आणि वाचतां वाचतां वर दिलेला पॅरिग्राफ तिच्या नजरेस पडला. तो तसा पडला नसता तरीही तो तिच्या नजरेस पडण्याबद्दल उत्सुक अशा तिच्या कोणा हितशत्रूनें तिच्या नजरेस मुद्दाम आणण्याची तजवीज केलीच होती. लाल पॅन्सिलीनें त्या पॅरिग्राफाच्या सभोंवतालीं कोंडाळें करून तो अंक मुद्दाम तिच्या नांवानें कोणी टपालांत टाकून तिजकडे पाठविला होता. परंतु तो तसा अंक तिच्या हातीं जाईपर्यंतही दुर्दैवानें वाट पाहिली नाहीं. त्याचे पूर्वीच वर सांगितल्याप्रमाणें तो तसा नजरेस पडल्यापासून तिच्या मनाची स्थिति काय झाली असेल याचें वर्णन करीत बसण्यांत तात्पर्य नाहीं.

दु:खं दु:खानुबंधि म्हणजे एक दु:ख दुसऱ्याला घेऊन येणारें असें असतें. तें एकटेंच कधीं येत नाहीं. या न्यायास अनुसरून दु:खांनीं कमलेच्या संबंधानही वर्तन केलें. एकामागून एक अधिक दु:खदायक अशा गोष्टी होत जाऊन सरतेशेवटीं द्वारकाबाईच्या दुखण्यानें फार जोराची उलट खाल्ली. यायोगानें कळसच झाला. कमला अर्थातच आपलें दु:ख विसरली किंवा विसरली ह्मणण्यापेक्षा तिला आपलें दु:ख दूर सारावें लागलें, असें ह्मटलें असतां विशेष खरें होणार आहे. आईच्या दुखण्यापलीकडे कोणत्या गोष्टींचें महत्त्व तिला अधिक वाटणार ? अर्थातच कोणत्याही नाहीं. तावडतोब ती आपलें सर्व दु:ख एकदम गिळून जाऊन आपल्या जननीच्या शुश्रूषेस लागली. परंतु तिच्या मनानें या वेळीं एवढें खास घेतलें, कीं आपण पतिवियोगा-

बद्दल नव्हे, तर मातृवियोगाबद्दलही दुःख करण्यास जगणार! एका दृष्टीनें त्या वेळच्या तिच्या आईच्या दुखण्यानें तिजवर उपकारच झाला असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण सर्वत्र निराशा दिसूं लागल्याकारणानें कांहीं एक फार अनिष्ट असे विचार तिच्या मनांत उद्भवत होते, ते नाहींसे होऊन तिचें चित्त आईच्या दुखण्याकडे वेधून गेलें; तें तसें न जातें तर तिनें काय साहस केलें असतें याचा नेमच नव्हता.

या जबरदस्त धक्क्यानें आपल्या पत्नीची अवस्था फार वाईट होणार, ती यांतून वांचणें शक्य नाहीं, असें बळवंतरावांस पक्कें वाटून चुकलेंच होतें. त्यांनीं आपली रजा आणखीही वाढविली. पत्नीच्या आग्रहास्तव ते मुंबईसही पुनः जाऊन आले. परंतु जांवईबोवांचा मुळींच पत्ता नाहीं, आणि पत्ता लागण्याची कांहीं आशाही राहिली नाहीं, तेव्हां परत येऊन पत्नीची शुश्रूषा व मुलीचें समाधान करण्यापलीकडे त्यांस दुसरें कांहींच करणें राहिलें नाहीं. ते स्वतः जितक्या नेटानें व उत्कंठेनें शोध करणार, तितक्या नेटानें व अधिक उत्साहानें प्रभाकर शोध करीतच होता. आपल्या प्रत्यक्ष भगिनीचा पति नाहींसा झाला असतां एखादा प्रेमळ भाऊ जितक्या आतुरतेनें व उत्साहानें खटपट करील तितक्या आतुरतेनें व उत्साहानें प्रभाकर खटपट करीत होता. त्याच्याकडून रोज आज कोठें शोध केला, याचें सविस्तर पत्र येतच असे व त्यांत शोध लागला नाहीं हाच एकंदर मथितार्थ होता.

कमलेची स्थिति फार वाईट झाली होती. ती अतिशय फिक्कट दिसूं लागली. मरणोन्मुख झालेल्या तिच्या आईचा व तिचा वर्ण जवळजवळ सारखा दिसूं लागला. तिला भ्रांतिष्टाप्रमाणें होऊन गेलें. धड कोणतीही गोष्ट होईना. प्रातःकाळीं उठल्याबरोबर टपालाकडे चित्त असे. टपाल एकवार येऊन गेलें आणि त्यांत प्रभाकराचें पत्र नाहीं, किंवा असून त्यांत आशा करण्यासारखें कांहीं नाहीं, असें एकवार समजलें, ह्मणजे दुसरे दिवसाच्या टपालाकडे तिचें चित्त लागून राहावयाचें, असा प्रकार चालला होता. होतां होतां तिच्या प्रकृतीबद्दल मुद्दां काळजी वाटण्याजोगी स्थिति आली. आणि द्वारकाताईच्या दुखण्याची तर परमावधिच झाली. क्षयाच्या माणसाच्या मेंदूंत यत्किंचितही बिघाड होत नाहीं. सर्व शरीराला क्षीणता आली तरी मेंदूस क्षीणता येत नाहीं. किंबहुना त्याची शक्ति विशेष उत्तेजित होते, असा कित्येक व्यक्तींचे बाबतींत अनुभव आहे. द्वारकाताईची तशीच स्थिति होती. यांचें मस्तक अगदीं स्वच्छ व शांत होतें, यामुळें काय चाललें आहे, काय नाहीं, शोध कोठपर्यंत आला आहे, वगैरेबद्दल त्या दररोज चौकशी करीत असत. आणि अर्थातच दररोज त्यांची निराशा होत असे; परंतु त्याला सर्वांचाच नाइलाज होता. कांहीं तरी सांगून वेळ मारून नेण्याजोग्या त्या नव्हत्या. त्यांस वाईट वाटूं नये म्हणून एखादे वेळ त्यांस कांहीं तरी सांगितलें तर आपणांस खरें सांगितलें नाहीं असें त्या तेव्हांच ओळखून काढीत. तेव्हां अलीकडे त्यांचेपासून कोणी कांहींच लपवून ठेवीत नसे. पत्र आलें ह्मणजे जें काय त्यांत लिहिलें असेल तें स्पष्टपणें त्यांस सांगून टाकीत असत. यामुळें एका परीनें त्यांच्या मनासही त्रास होत नसे. जो काय त्रास व्हावयाचा तो

एकदां झाला होता तो होताच, आतां कांहीं शोध लागेल ही आशा जिवंत होती, तेव्हां त्या आशेचा एकपरी अणुमात्र का होईना परंतु हितकारक असा परिणाम होत होता; परंतु आशेचा अंकुरही एके दिवशीं एकाएकीं समूळ दग्ध झाला.

# प्रकरण ४८ वें.

## मंडळी मुंबईस गेली.



दादासाहेब अर्धवट शांत व अर्धवट निराश अशा वृत्तींत गंगापुरास आपल्या घरीं बसले असतां, टपालवाल्यानें त्यांस एक पत्र आणून दिलें. तें पत्र हातीं घेऊन त्यांनीं फोडण्यापूर्वीं इकडून तिकडून पाहिलें. पत्रावरलें अक्षर त्यांच्या ओळखीचेंच होतें. परंतु तें पत्र आलें याबद्दल त्यांस थोडेंसें आश्चर्य वाटून त्यांनीं तें सावकाश फोडलें व वाचण्यास सुरुवात केली. फोडतांना जितकी सावकाशी केली होती तितकी सावकाशी वाचतांना राहिली नाहीं असें दिसलें. मोडींत लिहिलेलें पत्र थोडेंसें लांबलचक होतें; परंतु दादासाहेबांनीं तें भराभरा वाचलें व शेवटास गेल्यावर एक दीर्घ सुस्कारा टाकिला आणि ते आपल्याशींच उद्गारले, " जें जें होणार असेल तें तें व्हायचं, कधीं चुकायचंच नाहीं. पण ' नाहींसा झाला ' याचा अर्थ काय ! एक वर्षापूर्वीं माझ्या पोराची अशी स्थिति होईल असं नुसतं कोणी माझ्याजवळ म्हणता, तर मी त्याला सुळीं देण्यास तयार झालों असतों. परंतु तोच मी आज स्वस्थ कपाळास हात लावून भ्रमिष्टासारखा बसलों आहें. ही स्थिति काय ह्मणावी ! वाटेल तो माणूस येऊन माझ्याजवळ माझ्या पोराबद्दल अद्वातद्वा बोलतो आणि आज तर या पत्रानं सगळीच कमाल केली ! ' नाहींसा झाला ' याचा अर्थ तरी काय ? पत्रांतील एकंदर लिहिण्याच्या झोंकावरून तो कुठें तरी निघून गेला असावा असं दिसतं. जाऊं द्या. त्यानं जे दिवशीं माझी अवज्ञा करून मला वेडंवांकडं पत्र पाठविलं, तेच दिवशीं तो मला नाहींसा झाला. मग आज कोणीकडे गेला असं कळलं म्हणून मनास वाईट वाटण्यास काय कारण आहे ? गेला, कारटा आपला नाहीं. आतां त्याचा रिकामा विचार करण्यांत मतलब काय ! हे लोक विनाकारण पत्र लिहून मला कशाला त्रास देतात ! "

असें आपल्याशींच म्हणून त्यांनीं आपल्या मनाची समजूत घालण्याचा पुष्कळ यत्न केला; परंतु अशा यत्नांनीं समजून पडण्याच्या स्थितींत त्यांचें मन त्या वेळीं नव्हतें. त्यांचें मन या वेळीं फारच सौम्य वृत्तीच्या आधीन होतें. इतकेंच नव्हे, तर आपल्या स्वतःच्या आजपर्यंतच्या दुराग्रही वर्तनाचें निरीक्षण करून पहाण्याच्या

स्थितींत तें होतें. अर्थातच वर सांगितल्या प्रकारच्या विचारांनीं त्यांचीं समजूत पडेना. पोरगा गेला कुठें आणि कां, हे विचार त्यांच्या मनांत वारंवार येऊं लागले इतकेंच नव्हे, तर एकाएकीं त्यांच्या मनांत एक चमत्कारिक शंका उद्भवली. आतांपर्यंत ती शंका त्यांस आली नव्हती. परंतु आतां ती येण्याबरोबर त्यांचें मन कसेंसेंच झालें. त्यांनीं तें पत्र पुनः हातीं घेऊन समग्र वाचलें. त्यापासून त्यांच्या शंकेचें समाधान होईना. जों जों अधिक वेळ जात चालला, तों तों कांहीं कारण नसतां ती शंका दृढ होत चालली. आपला पोरगा खरोखर कोठें गेला कीं त्यानें त्रासून जीव दिला ? आजपर्यंत त्यांच्या कुटुंबानें किंवा दुसऱ्या कोणीं त्यांच्याजवळ जर पद्माकराबद्दल कांहीं गोष्ट काढली तर "तो पोरटा गेला, मेला असं मी ह्मणतों. पुनः त्याचं नांव मजजवळ कोणी काढतां कामा नये," असें ते सर्वांस अनेकवार बजावून बजावून सांगत असत. मृत्यु जोंपर्यंत उगीच शब्दांतच होता तोंपर्यंत त्यांस त्याचें कांहींसुद्धां वाटलें नाहीं; परंतु तो मृत्यु खरोखर आपल्या पोराला घेऊन गेला काय ? असा प्रश्न त्यांच्या मनांत उभा राहतांच सर्व कांहीं निराळेंच झालें. त्यांचें मन भयभीत झालें. त्यांस एकदम वाटलें, कीं आपण या आपल्या स्नेहास अधिक माहितीकरितां पत्र लिहावें. नंतर कांहीं वेळानें असें वाटलें, कीं पत्र लिहिण्यापेक्षां आपण समक्षच तेथें जाऊन काय माहिती लागेल ती मुकाट्यानें काढावी. असे विचार एकामागून एक त्यांच्या मनांत उपस्थित झाले. दिसण्यांत अगदीं यःकश्चित् असें कारण असून त्यापासून सुद्धां केवढें तरी महत्कार्य केव्हां केव्हां होत असतें. याचा अनुभव प्रत्येकास येतो. दादासाहेबांच्या मनास तो चमत्कारिक संशय येतांच त्यांच्या मनाची विलक्षण चलबिचल झाली. ते अतिशय करारी, त्यांजला तें पत्र आलें नसतें आणि आपला मुलगा आपल्या नवीन बायकोस घेऊन संसार करीत आहे, असें त्यांनीं ऐकिलें असतें, तर त्यांच्या मनांत यत्किंचितही बदल झाला नसता, परंतु तोच बदल त्या यत्किंचित् पत्रानें होण्याची पाळी आली.

जनकांस नैसर्गिक असणारें प्रेम त्यांच्या मनांत जागृत झालें व ज्या पोराचें पुनः मुखावलोकनही आपण करणार नाहीं, अशी आपण प्रतिज्ञा केली होती, त्याचें मुखावलोकन होण्याचा संभवच नाहीं असें मनांत येतांक्षणींच तो निश्चय गडबडण्याची वेळ आली. आतां त्यांस आपल्या पत्नीचेंही भय वाटूं लागलें. आपल्या धाकानें ती आपणास कांहीं विचारणार नाहीं, परंतु पोरास कांहीं अनिष्ट घडलें असलें व तें तीस कळलें, तर तिचें आपण कोणत्या शब्दांनीं समाधान करावें, असा प्रश्नही एकदम त्यांच्या मनांत उभा राहिला आणि पुन्हां पोराचा शोध काढण्यास जावें कीं न जावें अशाबद्दल मनांत तुमुल युद्ध सुरू झालें.

परंतु तें युद्ध फार वेळ टिकलें नाहीं. या पत्रांतील मजकूर कोणास न कळवितां आपण कामानिमित्त म्हणून मुंबईस जावें आणि तेथें राहून शोध करावा असा त्यांनीं निश्चय केला. त्यांचा निश्चय आणि कृति त्यांचे दरम्यान अवधि फारच थोडा असे. यामुळें लागलींच त्याच रात्रीं ते मुंबईस निघून गेले.

दादासाहेब जातांच दुसरे दिवशीं

सकाळीं त्यांच्या जाण्याची वार्ता सगळी-कडे पसरली. काकासाहेबांस अत्यानंद झाला. आपण आजपर्यंत जो काय व्यूह रचिला, त्या व्यूहाचें एकदम इतक्या लौकर असें फळ येइल, ही कल्पनाही नसतां तसें फळ एकदम प्राप्त झालें, तेव्हां आपले ग्रह चढत्या कलेवर आहेत, आपण जें काय करण्याचा आरंभ करूं तें आपल्या इच्छे-प्रमाणें व्हावयाचेंच, असा परमेश्वराचा नेमा-नेम दिसतो, असें त्यांनीं गुंडशास्त्रीबुवांचे पाठीवर थाप मारून मोठ्यानें हंसत ह्मटलें. गुंडशास्त्रीबुवांच्या आनंदास तर पारा-वारच नाहींसा झाला. ते काकासाहेबांच्या घरून उठले व आतां कोणाच्या येथें जावें आणि कोणास आधीं आपली गोष्ट सांगावी असें त्यांस होऊन गेलें. स्वर्ग व आपण यांत दीडबोट तर काय परंतु दीडयवही अंतर राहिलें नाहीं, अशी त्यांच्या मनाची पक्की खात्री होऊन चुकली. त्यांस असें वाटलें, कीं आतांच एखादी सभा करवून आपल्या मोठेपणाचें प्रदर्शन करून द्यावें.

परंतु हा त्यांचा आनंद फार वेळ टिकला नाहीं. जितक्या उसळीनें तो वर गेला तितक्याच किंबहुना त्याच्याहीपेक्षां अधिक जोरानें तो खालीं आपटला. काका-साहेबांच्या घरांतून निघून शास्त्रीबुवा बाहेर पडतात न पडतात, तों एक भिक्षुक गृहस्थ भेटले. शास्त्रीबुवा आनंदानें रुंदा-वलेल्या आपल्या तोंडानें आपल्या मनां-तील आनंद व त्याचें कारण सांगण्या-साठीं तोंड उघडणार, तोंच त्यांचे भिक्षुक मित्र त्यांस घाबरलेल्या आवाजानें ह्मण-तात, "काय शास्त्रीबुवा, आपल्यावर चांगलीच गदा आली. दादासाहेब काल रात्रींच्या गाडीनें मुंबईस गेले." तें ऐक-तांच शास्त्रीबुवा भटजीस म्हणतात, "मग त्यांत तुह्मांला एवढं घाबरायला काय कारण झालं? मला तर सकाळींच तें कळून मी आनंदानं तुह्मा मंडळींना भेट-ण्यासाठींच कुठें तरी चाललों होतों."

भटजी त्यांस ह्मणतात, "काय ह्मणतां, तुम्हीं आनंदानं चालला होतां! तुरुंगांत जाण्याची भीति वाटून घाबरून जाऊन घरीं बसलां असाल. नाहीं तर गंगापूर सोडून कुठें तरी पळून केलं असेल. अशी शंका आह्मांला येऊन आह्मी आपल्या घरीं शोध करण्यासाठीं गेलों तों आपण घरीं नाहीं; यामुळं आमची शंका अधिकच दृढ होऊन काकासाहेबांकडे आपण आहांत कीं काय, आणि आतां आपल्या सर्वांचा बचाव करण्याला काय युक्ति काढतां, हें विचारण्यासाठीं मला मंडळींनीं आपल्या-कडे पाठविलं, म्हणून मी येत होतों; तों वाटेंतच आपली गांठ पडली. शास्त्री-बुवा आपल्या नाहीं आह्मी लागलों त्याचा आतां पुरा पश्चात्ताप होतो. इतके दिवस नाहीं नाहीं म्हणून शेवटीं दादासाहेब आपल्या सर्वांवर फिर्याद करण्यासाठीं, वकिलाची तजवीज करण्यासाठीं मुंबईस काल रात्रीं गेले. त्यांच्या घरच्या शागी-र्दानं स्वतः मला सांगितलं. तेव्हां त्याबद्दल आतां शंका मानण्यास आपल्याला मुळीं जागा नाहीं. अहो, आह्मी पहिल्यापासून ह्मणत होतों, कीं या मोठ्यांच्या झुंजींत आह्मांसारख्या गरिबांनीं पडूं नये. पण आमचं ऐकतो कोण? आतां कितीजणांवर ते फिर्याद करतील याचा नेम नाहीं. अहो, हे सरकारी नोकर, यांना सरकारच्या मार्फत फिर्यादीअर्यादी करून लोकांना धाकदपटशा दाखवून आपल्या मनाप्रमाणें सगळ्या गोष्टी करून घेण्याची नेहमींची संवय; त्यांत तुह्मी भरीस भरून त्यांना

अतिशय छळलं. मग त्यांनीं तरी गय कां करावी ? त्यांच्या त्या ब्राह्मणानं मला सांगितलं, कीं काल रात्रीं दादासाहेब जाण्यापूर्वीं अतोनात संतापले होते. 'इतके दिवस या ब्राह्मणांची गय केली, आज शुद्धीवर येतील, उद्यां येतील, असं समजून गप्प बसलों, परंतु त्यांना चांगली जालीम मात्रा बसल्याखेरीज डोळे उघडायचे नाहींत, अशी आतां आपली खात्री झाली. आतां त्यांच्यापैकीं म्होरक्यांना तरी निदान चिनभाड्याची जागा दाखविल्याखेरीज उपयोग नाहीं;' असं म्हणून संतापून त्या संतापाच्या भरांतच ते मुंबईस वकील करण्याकरितां निघून गेले. तेव्हां आतां कोण्या थरावर गोष्ट जाणार, याचा विचार आपणच करा आणि आपल्याला आनंदाला कारण आहे कीं घाबरण्याला कारण आहे, तें समजा !"

हें त्या भिक्षुकाचें बोलणें चाललें असतां, बिचारा गुंडशास्त्री अगदीं पांढराफटक पडला. त्याचे डोळे पांढरे होण्याची पाळी आली. ज्या आनंदानें बिचारा काकासाहेबांच्या घरांतून बाहेर पडला होता, तो त्याचा आनंद पार कोणीकडच्या कोणीकडे मावळून जाऊन त्याची अशी स्थिति झाली, कीं तो ज्या जमिनीवर उभा राहिला होता, ती जमीन एकदम दुभांगून आपल्यास पोटांत घेईल तर किती तरी चांगलें होईल, असें वाटून तो आतां काय करावें, या विवंचनेंत पडला. काकासाहेबांकडे परत जाऊन त्यांचेपुढें खरा प्रकार काय तो मांडावयाचा आणि त्यांचेकडून कसेंही करून हें फिर्यादीचें व तुरुंगाचें लचांड नाहींसें करून टाकावयाचें, असा त्यानें बेत केला; परंतु आपला बेत आपल्यापाशींच रहाणार. काकासाहेब महा दुराग्रही मनुष्य. तो यत्किंचितसुद्धां आपलें न ऐकतां आणखी दादासाहेबांस चिडवील व विनाकारण वैमनस्य वाढवील याला तोड काय ? कसेंही असो, काकासाहेबांकडे जाऊन झाला वृत्तांत विदित करून आपलें काय म्हणणें तें त्यांस सुचवून हें भांडण विझण्यास कांहीं तरी मदत झाल्यास पहावी. विझण्यास मदत होणें हें केवळ अशक्यच होतें, हें ते जाणूनही होते. आपला दुराग्रह सोडल्यानें बिचाऱ्या ब्राह्मणांच्या कपाळाचा तुरुंगवास टळतो, असे जरी त्यांस खास वाटलें, तरीसुद्धां तो प्राणी माघार घेणारा नाहीं. ब्राह्मण तुरुंगांत पडले तरी त्याबद्दल यांना कांहींच वाटणार नाहीं. एकदां सोडून हजार वेळां ब्राह्मण तुरुंगांत पडले म्हणून परवा करणारा तो गृहस्थ नव्हे. आपली आपणच काळजी करावयास पाहिजे, इत्यादि विचार गुंडशास्त्र्याच्या मनांत एकामागून एक आले. आपण आतां आपल्या बचावाची सोय पाहिली पाहिजे. असेंही मनांत योजून ते आल्यामार्गानेंच काकासाहेबांकडे परत गेले. वाटेंत भेटलेला भिक्षुक त्यांचेबरोबरच काकासाहेबांकडे जाण्यासाठीं निघाला. परंतु गुंडशास्त्र्यांनीं त्यास "तुम्ही मजबरोबर सध्या येऊं नका. मी काकासाहेबांकडे जाऊन सर्व खुलासा काढतों. त्या खुलाशाप्रमाणें—सायंकाळीं आपण सर्व एके ठिकाणीं जमूं व काय विचार करायचा तो करूं," असें म्हणून गुंडशास्त्र्यांनीं भटजीबुवांस टाळलें.

काकासाहेब आपल्या अंतर्गृहांत होते. गुंडशास्त्री गेले ते तडक त्यांचेपुढें गेले व म्हणाले, "काकासाहेब, आपण म्हणतां तसा आनंद मानण्याचा हा प्रसंग नव्हे. दादासाहेब आपणां सर्वांवर फिर्याद लाव-

ण्यासाठीं वकील आणण्याला मुंबईस गेले आहेत. मला आतां खास बातमी लागली. आपण हंसण्यावारी घालवूं नका. आपल्या जोरावर आम्हीं वाटेल तसा त्यांचा छळ केला. आतां आपण कसा तरी हा एकंदर प्रकार आपसांत मिटवा, नाहीं तर आमची गरिबांची धड अवस्था नाहीं. गांवच्या ब्राह्मणांनीं तर दादासाहेबांकडे जाऊन त्यांचे पाय धरून नाकदुऱ्या काढण्याचा बेत कायम केला. आपण तर मोठेच आहां. वकील द्याल, बॅरिस्टर द्याल, वाटेल तसा पैसा खर्च कराल; परंतु माझी गरिबाची कोणी दाद घेणार नाहीं. आपल्या जोरावर मीं दादासाहेबांस फार दुरुत्तरं केलीं. आपल्याला देहांत प्रायश्चित्त, त्याखेरीज प्रायश्चित्त नाहीं, असं एक दिवस त्यांच्या घरीं जाऊन ऐटीनं सांगून आलों. आतां त्यांच्याकडे जाऊन हें तोंड दाखवायलासुद्धां मला जागा नाहीं."

काकासाहेबांनीं शास्त्रीबुवांस त्या वेळीं जरा जबरीनें चापलें नसतें, तर ते वरील सुरांतच आपलें घाबरगुंडी रडगाणें किती वेळ गात बसले असते याचा नेम नव्हता. काकासाहेबांची तब्यत या वेळीं त्यांचे रडगाणें ऐकण्याच्या स्थितींत नव्हती. आपण अंतर्गृहांत असतां शास्त्रीबुवांनीं एकदम आंत घुसून एवढा गोलमाल माजविला, याबद्दल त्यांस फार संताप आला व ते लागलीच त्यांस ह्मणतात, "तुह्माला इतक्या आंतपर्यंत येण्याला सांगितलं कोणीं ? मी जों जों तुमची कींव करतों, तों तों तुम्हीं अगदीं डोक्यावरच चढून बसण्याच्या बेतांत आलां. जेव्हां तेव्हां येऊन तुम्हीं तुरुंगाच्या भयाच्या गोष्टी बोलतां. तुह्माला आतांशा रात्रंदिवस दुसरं कांहींसुद्धां सुचत नाहींसं झालं आहे. मला वाटतं, एकदां तुमच्या नशिबीं तुरुंग आहेच. त्यांच्या घरीं जाऊन तुह्माला देहांत प्रायश्चित्ताखेरीज प्रायश्चित्त नाहीं असं ह्मणायला सांगितलं होतं कोणीं ? आतां त्याबद्दल प्रायश्चित्त भोगावं लागलं तर मला काय सांगतां ? आणखी मी ह्मणतों, एखाद्या वेळीं जरा रागाच्या भरांत मीं तुम्हाला कांहीं एखादं बोलासवरायला सांगितलं असेल म्हणून मागचा पुढचा विचार न करतां तुम्हीं जाऊन तें करावं कीं काय ? तो फिर्याद करणारच. त्या लोकांना लोकांत वजन नाहीं तेव्हां फिर्यादी अर्यादी करूनच आपलं वजन ठेवायला पाहिजे. त्याखेरीज मार्ग काय ? गेलांत तर गेलांत तुरुंगांत ! याचा विचार पूर्वींच करायला पाहिजे होता. हुरळून वाटेल तसे वागलांत कशाला ? दादासाहेब फिर्याद करण्यासाठीं मुंबईला गेला, हें मघाशीं उठून गेलांत आणखी लागलीच कोणींसं मला येऊन सांगितलं. पण मला नाहीं कांहीं त्याचं वाटलं. कारण मीं त्याला फिर्याद वगैरे करण्याला कारणच दिलं नाहीं. तुमच्यासारखा मी हुरळून गेलों नाहीं. कोणतीही गोष्ट आपली स्थिति, आपली योग्यता, आपली ऐपत, हीं सगळीं पाहून करावी. तुम्हाला तो सुमार राहिला नाहीं. त्याला माझा काय इलाज ? मी फार झालं तर तुम्हीं तुरुंगांत गेल्यानंतर परत येईपर्यंत चारदोन रुपये तुमच्या माणसांना देईन. याच्यापलीकडे काय करणार ? चला, ही वेळ तुमच्याशीं बोलण्याचालण्याची नव्हे. आणि पुनः मीं बोलाविल्याखेरीज ओटीच्या आंत येत जाऊं नका. बाहेर बसून मला आंत निरोप पाठवीत जा. सवड असली तर

मी तुम्हांला भेटेन. नसलों तर नाहीं म्हणून सांगेन. मुकाट्यानं जात जा. तुम्ही समजत असाल कीं, तुम्हांला घरांत वाटेल तिथें येण्याजाण्याची मुभा आहे म्हणून, तर तसं समजूं नका. मला पक्कं कळलं आहे, कीं ताईचं मन कलुषित करण्याला तुम्हीच कारण झालां. आतां मला पहिल्याप्रमाणं तुमच्याबद्दल मुळींच प्रेम वाटत नाहीं."

हें सर्व भाषण चाललें असतां गुंडशास्त्री केवळ वेड्याप्रमाणें काकासाहेबांच्या तोंडाकडे व पलीकडे जरा कुर्‍यांत उभ्या राहिलेल्या वहिनीसाहेबांकडे आळीपाळीनें पहात उभा राहिला. काकासाहेबांचें बोलणें संपलें तरी त्यास काय बोलावें, काय करावें, हें कांहींच सुचेनासें झाल्याप्रमाणें दिसलें. आपण ऐकतों आहोंत हें स्वप्नांत ऐकतों आहोंत, कीं जागेच आहोंत, याचीच त्यास भ्रांति पडली असावी, असें त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. काकासाहेबांनीं, "जा, उभे काय राहिलां? मीं तुह्मांला काय सांगितलं तें समजलं नाहीं कीं काय? जा, इतर ब्राह्मण दादासाहेबांच्या पायांवर लोळण घेतील त्यांत तुह्मींही घ्या. तुह्मांला कोणी नको ह्मणत नाहीं, पण पुनः इथं तोंड दाखवायला येऊं नका. माझ्या घरांत नसता कलह माजविण्याला कारण तुह्मी. माझं घर धुऊन धुऊन तुम्ही नेलंत ही गोष्ट आतां माझ्या निदर्शनाला येते. आतां सगळ्या गोष्टी जुळतात. ताई बिचारी देवभोळी, तिला तुह्मीं कांहींतरी सांगावं. आणखी वाटेल तसं उपासतापास करवावे आणि पैसे उपटावे हा तुमचा धंदा आज मला कळतो. गुरूपदेश देण्याचा तुम्हांला कधींपासून अधिकार आला! तुह्मींच ताईला गुरूपदेश दिला नव्हे का? गुरुद्वादशीला तुमची खूप चंगळ उडणार होती कायशी? ती बंद झाली. हें कसं काय! मधेंच अपशकुन झाला. लोक ह्मणतात लहान पोरींना कांहीं समजत नाहीं; पण आमच्या कुटुंबानं सर्व प्रकार पाहून आह्मांला जागं केलं. पुनः आणखी आम्ही आपल्या बहिणीला घरांतून घालवून दिल्याबद्दल सगळ्या गांवभर डंका वाजवणारे तुम्हीच नव्हे का? शास्त्रीबुवा, आपली सगळी करामत आतां आमच्या नजरेला आली आहे. आपण ब्राह्मण आहां. आजपर्यंत आपल्याला आम्ही मानीत आलों. दोन घटकांपूर्वी मला जर या गोष्टी ठाऊन असत्या, तर आज सकाळींच आपली यथासांग पूजा केली असती. पण सगळी हकीगत समजली नव्हती. आतां समजली. नमस्कार! आजपर्यंत आमच्या भोळ्या ताईकडून आमचं घर लुटवलंत तेवढं बस्स झालं! आतां यापुढें आपल्याला या घरांतून एक छदाम सुद्धां मिळण्याची आशा नको."

या नवीन बोलण्यानें शास्त्रीबुवा फारच भांबावून गेला. आपलीं शंभर वर्षें भरलीं, असेंच त्यास वाटूं लागलें. आजपर्यंत त्याचा सर्व जोर केवळ काकासाहेबांवर होता. ते अशा तऱ्हेनें आपणावर उलटतील, ही बिचाऱ्यास कधीं कल्पना आली नव्हती. परंतु आज तें सर्व उलटून त्याचे डोळे उघडले आणि त्यास कांहींच सुचेना. त्यानें तोंड उघडलें, कीं तें गप्प करण्यास काकासाहेब जय्यत तयार होते. अशा स्थितींत बिचाऱ्यास तेथून जाण्यापलीकडे दुसरें कांहींच शक्य नव्हतें. तेव्हां उसासे टाकीत आणि "काकासाहेब, हें काय हें! मी आपला......" असें म्हणत म्हणत तेथून त्यांनीं प्रयाण केलें.

गुंडशास्त्रीबोवांस याप्रमाणें डुसकावून दिल्यावर काकासाहेबांची स्वारी आपल्या कुटुंबाकडे वळून म्हणते, "आपल्या मनाप्रमाणं सगळ्या सगळ्या गोष्टी झाल्या ना! याला जरी आपण हुडकून दिला तरी आपल्याला आतां त्याच्याबद्दल विचार करणं जरूरच आहे. तूंही म्हणतेस एकदां मुंबईला वडिलांच्याकडे चला म्हणून, तर जाऊं या. आजच जाऊं. दोन्हीं कामें होतील. हा फिर्यादी-अर्यादीचा काय घोंटाळा आहे तेंही समजेल, तुझ्याही इच्छेप्रमाणं होईल. बाकी नुकती आतां आलीस तेव्हां वास्तविक जाण्याचं कांहींसुद्धां प्रयोजन नाहीं; पण आतां म्हणतेसच आहेस, तर चल एकदां. पण मी तिथें येऊन तुला ठेवून येणार नाहीं हो. तुझ्यावांचून मला आतां क्षण-भरसुद्धां करमत नाहीं." हें शेवटलें वाक्य इतक्या प्रेमळ स्वरानें काकासाहेबांनीं उच्चारलें कीं, त्यामुळें वहिनीसाहेब खुदूकन् हंसून एकदम म्हणतात, "पुरे, पुरे, मला तें सगळं ठाऊक आहे. पण मी तरी कुठं राहणार आहें? मी तरी आतां घर सोडून कशी राहीन! आतां माझ्यावर नाहींका घर पडलं! मग कधीं जायचं!"

"तूं म्हणशील तेव्हां! आज म्हणत असलीस तरी माझी हरकत नाहीं."

"मग माझी तरी कुठं हरकत आहे? आज रात्रीं चललांत तरी मला पाहिजेच आहे चार सहा महिने तरी आईला इथें आणली पाहिजे. आणखी आपल्यालाही हें विकत श्राद्ध काय घेतलं आहे, त्याचं सव्य अपसव्य करायचंच आहे."

"तूं मोठी वस्ताद बोलणारी बुवा. हे दादासाहेब जाऊन काय करताहेत, तें पाहिलंच पाहिजे. मग आज रात्रीच्याच गाडीनं जाऊं, करा तयारी."

आणि या बेताप्रमाणें त्या रात्रीं मंडळी मुंबईला जाण्याला निघालीही.

# प्रकरण ४९ वें.

## शेजारच्या बंगल्यांत कोण आले ?



दादासाहेब मुंबईस आपल्या मुलाचा शोध करण्याकरितांच केवळ गेले होते, निदान तेवढ्याच हेतूनें गंगापुराहून निघाले होते ही गोष्ट खरी, परंतु वाटेंत त्यांच्या अंतःकरणांत अनेक तऱ्हेचे अनेक विचार आले. एकवार त्याचें आपण नांव सोडलें, पुनः त्याचें नांव घ्यावयाचें नाहीं असा निश्चय केला असतां आतां आपण त्याच्या शोधाला म्हणून जातों याचा अर्थ काय ? त्यानें ज्या वेळीं आपला अपमान केला, आपली अवज्ञा केली, त्याच वेळीं तो कारटा आपणास मेला असें आपण ह्मटलें. मग आतां तो खरोखरच मेला कीं काय, अशी शंका येतांच आपलें मन इतकें निर्बल कशानें झालें ? हें त्यांचें त्यांसच मोठें गूढ पडलें. आजपर्यंत आपण मोठे करारी, एकनिश्चयी आहोंत, असा इतरांशीं व आपल्या स्वतःशींही बाणा मारिला आणि आतां तो बाणा कोणीकडे गेला ? असें वारंवार मनांत येऊन ते आपलें मन घट्ट करण्यास पहात होते, परंतु तें घट्ट होईना. पुनः पुनः आपल्या पुत्राच्या मरणाचा विचार मनांत येऊं लागला आणि दर विचारागणिक त्यांच्या अंतःकरणास अधिकाधिक मार्दव येऊं लागलें. अशा अंतःकरणाच्या आंदोलक स्थितींतच ते मुंबईस येऊन पोहोंचले आणि त्यांच्या स्नेह्याच्या घरीं जाऊन उतरले. त्या स्नेह्यास हे एकाएकीं आल्यानें फार आश्चर्य वाटलें. त्यांतही विशेष आश्चर्य वाटण्याचें कारण हें कीं, दादासाहेब नेहमीं अगदीं श्रीमंती थाटानें-शिपाई, शागीर्द यांस घेऊन यावयाचे, तसें न करतां अगदीं एकटे आले ! तेव्हां आपण त्यांस पत्रद्वारें जी बातमी सांगितली, तिचाच हा परिणाम होय, हें त्यांच्या मनांत सहज आलेंच. तथापि तो गृहस्थ दादासाहेबांस आपण होऊन प्रथमतः कां आलां वगैरे कांहींएक बोलला नाहीं. अण्णासाहेब ( दादासाहेबांचे स्नेही) हे दादासाहेबांच्या तोलाचे गृहस्थ होते. यांची मुंबईस एक पेढी होती आणि मुंबईस बरीच इस्टेट होती. हे नेहमीं मुंबईस रहात. मुंबईस यांचा राहता बंगला होता. तेव्हां दादासाहेबांसारखे श्रीमंत पाहुणे आले ह्मणजे त्यांच्या व्यवस्थेची कधींही पंचाईत पडण्याचा संभव नव्हता. दादासाहेब येण्याबरोबर अण्णासाहेबांनीं त्यांची सर्व व्यवस्था लावून दिली. दादासाहेब आले त्या रात्रीं त्यांनीं आपल्या चिरंजिवाबद्दल कांहीं एक मजकूर अण्णासाहेबांस विचारला नाहीं आणि अण्णासाहेबांनींही त्यांस त्या बाबतींत कांहीं सांगितलें नाहीं. गंगापूरच्या अवांतर गोष्टी अनेक निघाल्या होत्या, परंतु त्यांत यासंबंधाचा एक शब्दसुद्धां दोघांपैकीं

कोणीही काढला नाहीं. रात्र तशीच गेली.

दुसरे दिवशीं सकाळीं दादासाहेबांच्यानें राहवेना. तेव्हां त्यांनीं अण्णासाहेबांस म्हटलें:– " आपण मला त्या माझ्या... (पोरासंबंधानें असें त्यास म्हणावयाचें होतें परंतु ते शब्द त्यांच्या मुखावाटे निघेनात ) संबंधानं लिहिलं, त्याचा पुढें कांहीं तपास लागला का ? कारटीं होऊन तीं जर नीट निघालीं तर ठीक, नाहीं तर हा असा प्रकार झाला म्हणजे मग कांहीं विचारूं नका. अण्णासाहेब, आपल्याला मुलगा नाहीं, याबद्दल आपल्याला फार वाईट वाटतं. पण आमच्या सारख्याचा अनुभव पाहिला, म्हणजे आपल्याला वाईट वाटण्याच्या ऐवजीं फार आनंद व्हावा. निदान मुळींच वाईट वाटूं नये. मी आपल्या स्वतःला इतका अगदीं निधड्या छातीचा म्हणवतों, पण माझ्या कारट्यानं, पण तें आतां बोलून दाखविण्यांत कांहींसुद्धां तात्पर्य नाहीं, जी झाली गोष्ट ती खरी, आतां मी तुम्हांला सांगतोंच मी कां आलों तो. तुमचं पत्र आलं तेव्हां मला एका प्रकारानं तुमचा थोडासा राग आला. तुम्हांला माझा स्वभाव ठाऊक. मी एकदां ज्याचं नांव टाकलं त्याचं नांव पुनः घेणार नाहीं. तेव्हां तुम्हीं मला असं लिहिलं तें पाहून आश्चर्य वाटलं. पहिल्या सपाट्यास मी तुमचं पत्र तर एका बाजूस टाकून दिलं, पण जे तुह्मी अशा बाबतींत कधीं लिहिणार नाहीं तें जेव्हां लिहिलं, तेव्हां अर्थातच कांहीं तरी विशेष असलं पाहिजे ह्मणूनच तुह्मीं लिहिलं; नाहीं तर लिहिलं नसतं असा विचार मनांत येऊन मी लागलीच इकडे येण्याचा बेत केला. कारट्यानं आपल्या जिवास तर कांहीं करून घेतलं नाहींना ? हा विचार माझ्या मनांत एकसारखा येतो आहे आणि त्या विचाराच्या सपाट्यांतच स्वतः इकडे येण्याचा बेत करून मी निघून आलों. माझाच पोरगा तो, तो संतापाच्या व उद्वेगाच्या भरांत काय करील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. आपल्याला कांहीं अधिक माहिती लागली आहे का ? "

अण्णासाहेब त्यांचा तो प्रश्न ऐकून बराच वेळ स्तब्ध राहिले व मग दादासाहेबांस म्हणतात, " दादासाहेब, आपण काढली ती शंका एका दृष्टीनं बरोबर आहे, पण तसा कांहीं प्रकार झाला असता तर या मुंबई शहरांत बाहेर आल्याखेरीज राहातांना. ती भीति तुह्मी अगदीं सोडून द्या. केल्या कर्माबद्दल त्याला पश्चात्ताप होऊन तो कोणीकडे तरी निघून गेला आहे. आणखी मी ऐकतों तितक्या सगळ्या गोष्टी जर खऱ्या असल्या, तर त्याला पश्चात्ताप होण्याला कारणही पण तशीच गोष्ट झाली आहे. पण त्या गोष्टीची घटाघटना कशाला पाहिजे ? आपल्याला वाटते ती भीति वृथा आहे, एवढं मी आपल्यास खात्रीनं सांगतों. आपण त्याबद्दल यत्किंचित्सुद्धां मनाला कांहीं वाटूं देऊं नका. तरुणपणीं अनेकांच्या हातून अनेक प्रकारच्या चुका होतात, त्यांपैकींच आपल्याही मुलाच्या हातून चुका झाल्या आहेत. त्याबद्दल केव्हांना केव्हां तरी त्यास पश्चात्ताप झालाच असता. तो लौकर झाला हें कांहीं वावगं नाहीं. "

दादासाहेब मध्येंच अण्णासाहेबांस ह्मणतात, " आपण म्हणतां तें तरी खरं कशावरून ? कदाचित् माझ्या मनांत आलेली भयंकर कल्पनाच खरी असेल. नाहीं कशावरून ह्मणावं ? हीं आतांचीं पोरं कोण्या

वेळीं काय करतील, याचा नेम नाहीं. मी इतका दृढनिश्चयी परंतु हा विचार माझ्या मनांत येण्याबरोबर निघून येण्याचीच मला इच्छा झाली. त्याचं मला पुनः दर्शन-सुद्धां नको, परंतु जर कांहीं वेडेंवाकडें झालें असेल तर एकदां काय आहे तें कळून यावं. दुसरी कांहीं आतां इच्छा उरली नाहीं. त्याच्यापासून मला काय सुख होणार तें होऊन चुकलें. आतां एवढं हें काय तें समजलं म्हणजे निकाल लागला. माझ्यासारखा मूर्ख मीच, असा अभिमान बाळगणाऱ्या मला परमेश्वरानें ही परमावधीची शिक्षा केली असल्यास त्याबद्दल मला कोणालाही दोष देण्याला कारण नाहीं. कसा आणि कुठं शोध लागेल, तेवढं एकदां मला सांगा; तो नुसती मुंबई सोडूनच गेला असला तर मला त्याच्याबद्दल कांहींसुद्धां वाटणार नाहीं; पण जर माझ्या तर्काप्रमाणें कांहीं प्रकार झाला असला तर निदान मला खरा प्रकार तरी कळावा."

अण्णासाहेबांनीं पुनः त्यांची समजूत घालण्याचा व तुमची कल्पना अगदीं खोटी आहे, असें सांगून समाधान करण्याचा यत्न केला आणि आपण अधिक शोध करवतों, असें आश्वासन देऊन तें भाषण तितकेंच ठेविलें. यांचे मुलासाठीं शोध करावयाचा तो कोठें व कसा करावा, हेंच त्यांस समजेना. तथापि त्यांनीं आपल्याकडून होईल तेवढी चौकशी करण्याचें आश्वासन दिलें. दादासाहेबांनीं परस्पर आपल्यास कांहीं शोध लागल्यास तो करण्याचें काम सुरू ठेवलेंच होतें.

परंतु कांहींही शोध लागला नाहीं. भर मुंबई शहरांतून एखादा माणूस निघून जावा आणि त्याचा शोध केला असतांही शोध लागूं नये, यासारखी आश्चर्यकारक गोष्ट कोणचीही नाहीं. सध्या दादासाहेबांस जें काय पाहिजे होतें तें एवढेंच कीं, आपला मुलगा कोठें तरी—मग तो कोठेंही असो—जिवंत आहे. राहून राहून त्यांचे मनांत असें येई कीं, त्यानें आपल्या जिवास कांहीं तरी करून घेतलें; परंतु तसें ह्मणण्यास खात्रीलायक आधार कोठेंही मिळेना. अर्थातच त्यांच्या जिवाची हुरहुर जाईना. अण्णासाहेबांकडे ते किती तरी दिवसांनीं आले होते व अण्णासाहेबांचा आणि त्यांचा फार मोठा स्नेह, तेव्हां ते त्यांस लौकर सोडीनात. चार आठ दिवस राहून मग आपण जा, सध्याच्या आपल्या मनाच्या स्थितींत आपल्याला आग्रह करणें थोडें चमत्कारिक खरें, परंतु परत गेलां असतांही मनाची स्थिति कांहीं शांत होणार आहे, असें नाहीं. तेव्हां येथेंच राहा, असा त्यांचा आग्रह चालला होता. आपण आणखी कांहीं दिवस राहिल्यास न जाणों आपल्यास कदाचित् खात्रीलायक शोध लागेल, असें अर्धवट वाटे व अण्णासाहेबांचा आग्रह दूर सारून आपलाच हेका धरून तेथून निघून जाण्याचें धैर्यही यांस होईना. तेव्हां ते तसेच राहिले; अण्णासाहेबांनीं दादासाहेबांस असा आग्रह चालविला कीं, आपण आपल्या मंडळीसही येथें बोलवावें. परंतु दादासाहेबांनीं तसें करण्याला आतां सध्या कांहीं कारण नाहीं असें ह्मणून, बोलण्याचा विषय बदलून दुसरेंच कांहीं तरी काढीत.

अशा प्रकारें सुमारें चार पांच दिवस गेले. दादासाहेब रोज, 'आज आपण जाणार' असें ह्मणत व अण्णासाहेब त्यांस 'आज जायचं नाहीं,' असें सांगत असा प्रकार चालला होता. अण्णासाहे-

यांचे बंगाल्यापलीकडेच कांहीं अंतरावर दुसरा एक बंगला होता. तो बंगला लहान असून मोठा आटपशीर होता. आज कित्येक दिवस तो लागलेला होता, परंतु एके दिवशीं सकाळीं त्या बंगल्यांत कांहीं माणसें रहाण्यास येऊन त्यांची गडबड सुरू झाली. अण्णासाहेबांच्या बंगल्यांत दादासाहेबांस जी खोली दिली होती, त्या खोलींतून पलीकडल्या बंगल्यांत काय चाललें आहे, तें स्पष्ट दिसत असे. आजपर्यंत तो बंगला बंद होता, परंतु एके दिवशीं पहांटे त्यांत माणसांची गडबड होऊन दादासाहेब जागे झाले. सकाळीं उठतांक्षणींच साहजिकपणें त्यांनीं अण्णासाहेबांस "पलीकडल्या बंगल्यांत कोण मंडळी रहाते ? ती आज पहांटेस कुठून गांवाहून आली वाटतं. त्यांत कोणी विशेष आजारी असावं असं दिसतं. कारण त्यास मेण्यांत घालून आणलं असून हलकेच बंगल्यांत घेऊन जाण्याबद्दल कोणी तरी त्या भोयांस बजावून बजावून सांगत होता." असें म्हटलें.

दादासाहेबांचें तें बोलणें ऐकण्याबरोबर अण्णासाहेबाच्या चर्येवर कांहीं एक चमत्कारिक फरक झाला; परंतु तो फरक दादासाहेबांच्या लक्ष्यांत मुळींच आला नाहीं. "कोणी मंडळी आली असेल. इथें मुंबईत काय, बिऱ्हाडावर बिऱ्हाडं येतात आणि जातात. शेजाऱ्याची शेजाऱ्याला दादसुद्धां लागणं शक्य नसतं. आपली झोंपमोड झाली असल्यास आज उत्तरेच्या बाजूला एखादी खोली रिकामी करून आपला पलंग तिथें घालवितों. तिकडच्या बाजूला मोकळी वाडी आहे; आपली झोंपमोड होण्याचा संभव मुळींच नाहीं." असें बोलून अण्णासाहेबांनीं दुसराच कांहीं विषय काढिला. शेजारच्या बंगल्यांत कोण मंडळी आली असावी, याच्याबद्दल अण्णासाहेबांस कांहीं तरी माहिती असून ती माहिती दादासाहेबांस सांगूं नये, अशाबद्दल ते उत्सुक असावे, असें दिसलें. पण दादासाहेबांस तसला संशय आला नाहीं. त्याबद्दल त्यांनीं अण्णासाहेबांस जास्त कांहीं एक न बोलतां एवढेंच ह्मटलें कीं, "माझी झोंपमोड मुळींच झाली नाहीं. कोणी तरी फार आजारी माणूस आपल्या शेजारीं आलं आहे, असं वाटून मी सहज आपल्यास तें सांगितलं. खोली वगैरे बदलण्याचं कांहींच कारण नाहीं. शिवाय मी आतां एक दोन दिवसांत खरोखरीच जाईन ह्मणतों. घरची मंडळी विनाकारण काळजी करीत बसली असतील. मी स्वतः जरी माझा संशय त्यांना सांगितला नाहीं, तुमचं पत्रही मी त्यांना वाचून दाखविलं नाहीं, तरी पण ही बातमी किती दिवस अशीच राहील ? माझ्या पश्चात् ती मंडळींना कळून त्यांनीं माझ्याप्रमाणंच परोपरीचे तर्क करावे, त्यापेक्षां मी तिथें जाऊन त्यांना खरी हकीकत सांगावी आणि त्यांचं समाधान करावं, तें चांगलं."

अण्णासाहेब त्यांस कांहींच त्या वेळीं विशेष ह्मणाले नाहींत. आपला जाण्याचा दिवस आला ह्मणजे मग त्याचा विचार करूं एवढेंच म्हणून त्यांनीं दुसरा कांहीं तरी विषय काढला.

तो दिवस निघून गेला. दुसरे दिवशीं दोनप्रहरीं एक चमत्कार झाला. अण्णासाहेब नुकतेच जेवून कांहीं जरूरीच्या कामाकरितां आपल्या पेढीवर गेले होते. दादासाहेब दोनप्रहरीं कधींही वामकुक्षी करीत नसत. कांहींना कांहीं तरी उद्योग

काढून अगर कांहीं धर्मसंबंधीं पुस्तक वाचीत दुपारचा वेळ घालवीत असत. रोज जेवण झाल्यानंतर अण्णासाहेब व ते बराच वेळपर्यंत गप्पागोष्टी सांगत असत. नंतर तिसऱ्या प्रहरीं अण्णासाहेब आपल्या पेढीवर जात, व दादासाहेब कोठें तरी हिंडण्याफिरण्यास व देवदर्शनास जात. दादासाहेबांनीं देवदर्शन वगैरे करून अण्णासाहेबांच्या पेढीवर यावें आणि मग तेथून दोघांनीं बरोबरच बंगल्यांत यावें, असा नित्य क्रम असे; परंतु आज वर सांगितल्याप्रमाणें अण्णासाहेबांस एकाएकीं पेढीवर जावें लागलें, यामुळें दादासाहेब एकटेच आपल्या खोलींत जाऊन बसले. तेथें खिडकीशीं एक आरामखुर्ची टाकलेली होती तीवर ते पडले होते, व त्यांचे मनांत कांहींतरी विचार चाललेले असावे. इतक्यांत पलीकडल्या बंगल्याच्या व्हरांड्याकडे त्यांचें लक्ष्य गेलें. तेथें एक सुमारें सोळा वर्षांची अतिशय सुस्वरूप अशी ब्राह्मणाची मुलगी व्हरांड्याच्या कठड्यावर आपल्या एका हाताचें कोंपर टेंकून व त्याच हातावर आपलें सुंदर मुख टेंकून घळघळां अश्रू ढाळीत होती. मधून ती स्फुंदे, उसासे टाकी व आपले नेत्र पुशी. तिचे आजूबाजूस कोणीही दिसलें नाहीं, आणि नसें कोणी नाहीं, हें पाहूनच ती अगदीं एकांतीं येऊन स्वस्थपणें रडत असावी, असें दिसलें. तिचें त्या वेळचें एकंदर स्वरूपच असें होतें, कीं कोणीही तिला त्या वेळीं पाहिलें असतें, तर त्याला अतोनात वाईट वाटून तिची कींव आली असती. दादासाहेब अवांतर अनेक गोष्टींत कितीही कठोरतेनें वागले, तरी अशा प्रकारचा देखावा पाहून त्यांच्या चित्तास द्रव फुटल्यावांचून राहणें शक्य नव्हतें, आणि या प्रसंगीं त्यांचें चित्त अतिशय मृदु होऊन त्या मुलीकडे वेधलेंच. ते तिच्याकडे एकसारखे तटस्थपणें पहात राहिले. या बिचाऱ्या मुलीवर असा काय प्रसंग आला असावा कीं, ती इतकी अगदीं अनाथाप्रमाणें एके बाजूस येऊन रडते आहे अशी जिज्ञासा साहजिकपणें त्यांस उत्पन्न झाली. जिज्ञासा उत्पन्न होणें आपल्या हातीं नाहीं; परंतु कांहीं एक जिज्ञासा उत्पन्न होतांच ती तृप्त करून घेणें सदैव शक्य नसतें, आणि कित्येक प्रसंगीं नुसतें शक्य नव्हे, सुलभ जरी असलें, तरी तें इष्ट नसतें. दादासाहेबांवर आलेला प्रसंग त्यांतलाच होता. या मुलीला काय दुःख झालें असावें तें जर आपल्याला कळेल, तर बरें होईल, आपण तिच्या त्या दुःखाचें निरसन करण्याचा यत्न करूं असें सुद्धां त्यांच्या मनांत आलें, परंतु उपयोग काय ? तिचें काय दुःख आहे हें कळावें कसें ! तें तिला किंवा तिच्या कोणा आप्तेष्टांना विचारल्याखेरीज कसें कळणार ! आणि तिला आपण विचारणार कसें ? असे प्रश्न त्यांच्या मनांत एकामागून एक येत होते. त्यांची दृष्टि मात्र तिच्यावरून मुळींसुद्धां हलली नाहीं. उलट तिच्या त्या सुंदर स्वरूपानें त्यांच्या मनास अधिकच परिबद्ध केलें. इतकी सुंदर आणि अल्पवयी मुलगी इतक्या दुःखांत सांपडली आहे, तेव्हां कांहीं तरी जबरदस्त कारणच घडलें असलें पाहिजे, असें त्यांस वाटलें व एकदम त्यांस असेंही वाटलें, कीं इचें कोणी तरी फार मायेचें माणूस अगदीं मरणोन्मुख असावें. मग तो तिचा नवरा असो, बाप असो किंवा आई असो. ही मंडळी ज्या दिवशीं बंग-

त्यांत आली, त्या दिवशीं पहांटे कोणा आजारी माणसास अगदीं अधरपणें आंत नेऊन ठेवण्याबद्दल जी गडबड चालली होती, त्या गडबडीचें त्यांस तशांत स्मरण झालें, आणि मनाची खात्रीच झाली कीं, हिच्या जिव्हाळ्याचें असें कोणी तरी फार आजारी असावें, आणि त्याच्या जगण्याबद्दल निराशा झाली, म्हणूनच ही एकीकडे एकटी येऊन बसून मनमुराद शोक करते आहे. दादासाहेबांचें चित्त आधींच या वेळीं अगदीं मृदु झालें होतें, आणि त्यांत वरील विचार मनांत येण्याबरोबर अर्थातच त्यांस विशेष वाईट वाटलें. त्या मुलीकडे लागलेले त्यांचे डोळे, तेथें इतके वेधले, कीं ते तेथून काढणेंच केवळ अशक्य झालें. त्या मुलीला काय दुःख झालें असावें, तिच्या घरांत इतकें कोण अत्यवस्थ असावें याची जरूर चौकशी करावी, असें त्यांस वाटूं लागलें व संध्याकाळीं अण्णासाहेब येण्याबरोबर आपण त्यांना विचारून सर्व हकीकत समजावून घेऊं, असा त्यांनीं आपल्या मनाशीं बेत केला, आणि ते तसेच त्या मुलीकडेपाहात राहिले. ती मुलगी तेथें स्वस्थपणें बराच वेळ उभी होती. आपल्याकडे कोणी पहात आहे व त्याच्या मनांत आपल्याविषयीं कांहीं दया उत्पन्न झाली आहे, याची कल्पनासुद्धां तिला नव्हती. तिच्या मनाचा पूर्ण लय तिच्या दुःखांत लागून राहिला होता. तिच्या मनांत नाना प्रकारचे दुःखतरंग येत असावे, असें तिच्या चेहऱ्यावर क्षणोक्षणीं होणाऱ्या बदलांवरून स्पष्ट दिसत होतें. मधून मधून ती आंत कानोसा घेतल्याप्रमाणें करी व पुनः आपले अश्रू पुशी. दादासाहेब तिच्या त्या दुःखानें अगदीं मोहित झाल्याप्रमाणें तिच्याकडे एकसारखें टक लावून पहात होते.

आणखी थोडा वेळ गेला. आणि एकाएकीं त्या मुलीचें लक्ष दादासाहेबांकडे गेलें. त्याबरोबर ती आपलें रडणें आंवरून चटकन् तेथून चालती झाली. तिच्या त्या जाण्याच्या लगबगीचें दादासाहेबांस थोडेंसें आश्चर्य वाटलें. ती निघून गेल्यानंतरही जणूं काय ती तेथें आहेच, अशा रीतीनें दादासाहेब ती उभी होती त्या जागेकडे पहात राहिले, आणि त्यांचे मनांत तिची मूर्ति उत्तम प्रकारें प्रतिबिंबित झाली होती. तीच त्यांचे डोळ्यांपुढें अद्यापि दिसत होती.

परंतु असें किती वेळ चालणार ! बऱ्याच वेळानें ते उठले व नित्याप्रमाणें बाहेर जाण्यास निघाले. ते अनेक ठिकाणीं गेले असतील, अनेकजणांजवळ बोलले असतील, परंतु त्यांचे मनांत त्या मुलीची मूर्ति एकसारखी उभी होती. नित्याप्रमाणें ते अण्णासाहेबांस घेण्यासाठीं त्यांचे पेढीवर गेले. व तेथून घरीं येऊन नित्याप्रमाणें संध्या, उपाहार वगैरे करून विडापानसुपारी खात असतां दादासाहेब एकदम अण्णासाहेबांस म्हणतात, "अण्णासाहेब, आज आपण गेल्यानंतर मी आपल्या खोलींत स्वस्थपणें पडलों असतां या शेजारच्या बंगल्यांत एक चमत्कार दृष्टीस पडला. तिथें कोणीतरी आपल्या सारखीच दक्षिणी मंडळी येऊन राहिली असावी. मीं एक पंधरासोळा वर्षांची अतिशय सुस्वरूप परंतु दुःखानं अतिशय व्यापलेली अशी मुलगी समोरच्या त्या पडवींत पाहिली. पहिले दिवशीं कोणीतरी आजारी माणूस तिथें आलं असं मीं तुह्माला सांगितलं तेंच एकंदरींत खरं दिसतं. त्या मनुष्याची अवस्था

ठीक नसावी. कारण ती मुलगी इतकी कांहीं शोकग्रस्त दिसली, कीं आपलं अति-शय मायेचं असं माणूस आपल्याला आतां सोडून जाणार याच विचारानं तिचा तो सर्व शोक चालला असावा असं दिसलं. तेव्हां ही मंडळी कोण आहेत याचा तपास तर काढा बरं."

दादासाहेबांचें तें बोलणें ऐकतांच अण्णासाहेब अगदीं सचिंत असे कांहीं वेळ बसले. दादासाहेबांस काय उत्तर द्यावें, हें त्यांस अगदींसुद्धां सुचत नसावें असें दिसलें. आपण विचारल्या गोष्टीला अण्णा-साहेब कांहींच उत्तर देत नाहींत हें पाहून दादासाहेब त्यांस पुनः म्हणतात, "तसं करणं बरं नसेल तर माझा आग्रह नाहीं. मला साहजिक त्या मुलीची फार कींव आली आणि अलीकडे पेन्शन घेतल्या-पासून वेळ घालविण्यासाठीं अनेक उद्योग करतों त्यांत थोडासा वैद्यकीचाही अभ्यास केला आहे, तेव्हां सहज त्या मुलीचं तें दुःख पाहून असं मनांत आलं, कीं आपण तिच्या इथें कोण आजारी आहे त्यास प्रत्यक्ष पाहून कांहीं औषधयोजना करावी. कोणी पुरुषमाणूस त्या वेळीं मला दिसतं तर मीं तेव्हांच त्यास विचारून खुलासा करून घेतला असता. ती लहान मुलगी माझ्या मुलीप्रमाणंच मला आहे; परंतु ती कोणाची कोण कळेपर्यंत तिच्याशीं कसं बोलावं म्हणून मी बोललों नाहीं."

हें दादासाहेबांचें भाषण ऐकून अण्णा-साहेबांच्या मनांत काय आलें असावें तें सांगतां येत नाहीं. त्यांच्या चर्येवर किंचित् स्मित दिसत आहे असा भास झाला. तसें दिसण्याला काय कारण झालें असेल तें त्यांचें त्यांसच ठाऊक. तें स्मित दादा-साहेबांसही दिसलें; परंतु त्याचें कारण विचारावें, असें वाटलें नाहीं किंवा आपल्या वैद्यकीच्या नादाची गोष्ट ऐकून त्यांस तसें हंसूं आलें असावें असेंच त्यांनीं गृहित धरलें असावें. ते अण्णासाहेबांस पुनः एव-ढेंच म्हणाले कीं, "मी उद्यांच जाणार होतों, परंतु उद्यांचा दिवस चांगला नाहीं, एवढ्या-करितां जाणं रहित केलं आहे. उद्यां जर ती मुलगी आजच्याप्रमाणंच माझ्या नज-रेस पडली तर मी तिला हांक मारून हकीकत विचारीन. ती मला फार विनय-शील आणि हुषार दिसली. शिवाय मी म्हातारा आहें तेव्हां मला तिच्याशीं बोल-ण्याला व तिलाही माझ्याशीं बोलण्याला कांहीं हरकत नाहीं. माझ्या मुलीला अशा स्थितींत पाहून माझ्या मनाची जी स्थिति झाली असती, तीच स्थिति त्या मुलीला पाहून झाली, यामुळं मीं तिला विचारण्याचा बेत केला आहे. आपली तर कांहीं हरकत नाहींना? म्हाताऱ्या मनु-ष्याला उद्योग नसला म्हणजे नानाप्रका-रचे उद्योग सुचतात. त्यांतलाच हा एक उद्योग म्हणायचा. सहज जातां जातां जर आपल्या हातून कोणाचं कल्याण झालं तर कां करूं नये? आमचं कल्याण आतां काय होणार तें समजलंच. पोरगा असला तरी तो आम्हाला मुकलाच! माझ्या कल्पनेप्रमाणं तो नाहींसा झाला असला तरी मुकलाच. मग त्यासंबंधाचा आतां नुसता विचार करून तरी काय उपयोग! एक गोष्ट मात्र खचित कीं, या पोराच्या अशा वागण्यानं मी एक निरा-ळाच प्राणी बनत चाललों आहें."

अण्णासाहेब लागलीच त्यावर त्यांस म्हणतात, "दादासाहेब, आपल्या आज-पर्यंतच्या एकंदर स्वभावांत आणि या खेपेच्या आपल्या वर्तनांत विलक्षण फरक

दिसतो एवढी गोष्ट मात्र खरी. हा फरक कधींपासून आणि कशापासून झाला असावा, हें कांहीं ध्यानांत येत नाहीं. मग आपल्यावर आलेल्या या प्रसंगाचं फळ असलं तर कोण जाणं! नाहींतर सहज-गत्या पाहिलेल्या एखाद्या माणसाबद्दल आपण इतकी चौकशी वगैरे कराल, असं मला कधीं वाटलं नाहीं."

दादासाहेब त्यावर कांहीं बोलले नाहींत. अण्णासाहेबांकडे चमत्कारिक दृष्टीनें पहात राहिले.

अण्णासाहेब त्यांस पुनः ह्मणतात, "आपण इथें कांहीं फार दिवस रहात नाहीं, कांहीं नाहीं. तेव्हां उगीच नुसतं औषध सुचवून काय उपयोग? अन् असं आहे तर नुसती चौकशी करण्यांत काय तात्पर्य आहे? कोण कसा माणूस असतो, कोण कसा असतो. तुमचीं वैद्यकीचीं औषधं त्यांना कदाचित् पसंतही पडणार नाहींत, तेव्हां आपण त्यांची चौकशी करण्याच्या भानगडींत पडूंच नये. उद्यां आपल्याला मजबरोबर पेठींत लौकरच मी नेणार आहे. कांहीं एका बाबतींत आपली सल्ला घ्यायची आहे. परवां आपण जाणारच ह्मणतां तर मी आपल्याला आतां अधिक आग्रह करीत नाहीं. माझ्या आग्रहानं इतके दिवस आपण राहिलां हेंच मी विशेष समजतों." असें बोलून तो पहिला विषय अण्णासाहेबांनीं टाळला. मग त्यांत त्यांचा काय हेतु असेल तो असो.

मनुष्य येत करतो पण त्याप्रमाणें होणें जाणें त्याच्या हातीं कांहींच नसतें, हें विसरतां कामा नये.

# प्रकरण ५० वें.

## दादासाहेब चौकशीस जातात.



त्या रात्रीं दादासाहेबांस नीटपणें झोंप आली नाहीं. त्यांचे डोळ्यां-समोर ती तरुण व सुंदर मुलगी एकसारखी दिसत होती. त्या कठोर अंतः-करणाच्या मनुष्याच्या मनांत एकाएकीं इतका अपत्यस्नेह उत्पन्न झाला हें पाहून त्याचें त्यासमुद्धां विशेष आश्चर्य वाटत असावें; परंतु खरोखर इतकें आश्चर्य वाटण्याजोगें त्यांत कांहींही नव्हतें. स्वतःच्या अपत्यानें आपल्या मनाविरुद्ध आचरण केल्याकारणानें—आणि तेंही विशेष महत्त्वाच्या बाबतींत—साधारण मनुष्यासही संताप येणें अगदीं साहजिक होय. त्यांतून दादासाहेबांसारख्या तामसी वृत्तीच्या मनुष्यास तसा संताप आल्यास नवल काय? परंतु जितका मनुष्य तामसी तितकाच तो प्रेमळही असतो. त्याच्या मनोविकारांना त्याला आळा घालतां येत

नाहीं. संताप येण्यास कारण झालें म्हणजे ज्याप्रमाणें त्याची तामसी वृत्ति उसळून त्याच्या विचारशक्तीस दुर्बल करून सोडते त्याचप्रमाणें दया, प्रेम वगैरे वृत्तींसही जणूं काय मनांतून हद्दपार करून टाकते; त्याचप्रमाणें त्याची प्रेमवृत्ति जागृत होण्यास कांहीं कारण झाल्याबरोबर उचंबळून बाकीच्या सर्व वृत्तींस मनांतून त्या वेळेपुरतें नष्ट करून टाकते. आतांपर्यंत दादासाहेबांची तामसी वृत्ति वाचकांस दिसून आलीच आहे. ती जितक्या उद्रेकानें आपलें कार्य करीत होती, तितक्याच उद्रेकानें त्या तरुण मुलीस पाहिल्यापासून त्यांची करुणावृत्ति त्यांच्या अंतःकरणांत जागृत झाली. अशा माणसास अमुक एक गोष्ट तुम्हीं करूं नका असें स्पष्ट सांगणें किंवा नुसतें सुचविणें म्हणजेच त्याचे मनांत ती गोष्ट करण्याविषयीं उत्सुकता किंबहुना आग्रह उत्पन्न करण्याचा उत्तम उपाय होय. अण्णासाहेबांनीं दादासाहेबांस त्या मुलीविषयीं कांहीं एक माहिती सांगितली नाहीं; इतकेंच नव्हे तर तिच्याविषयीं चौकशी करण्यांत अर्थ नाहीं, तिचें कोण आजारी आहे, त्यास औषध देण्याच्या अगर सुचविण्याच्या भानगडींतसुद्धां तुम्हीं पडूं नये, असें सुचविलें, हेंच दादासाहेबांच्या मनांत त्या गोष्टी करण्या अशी बुद्धि उत्पन्न करण्यास विशेष कारण झालें. तशी बुद्धि आणि त्या मुलीची ती दीन अवस्था पाहून मनांत उभी राहिलेली करुणाबुद्धि या दोघी एके ठिकाणीं झाल्यावर आणखी काय पाहिजे ? त्या मुलीचें कोण आजारी आहे, त्याचा आपण अवश्य शोध करून आपल्या हातून कांहीं तरी मदत झाली तर करावी, असें त्यांच्या मनांत वारंवार येऊन तें तेथें दृढ होत चाललें. इतकेंच नव्हे, तर आपण त्यास मदत करूं असें आपण म्हणत असतां अण्णासाहेबांनीं आपल्याला त्यापासून परावृत्त करण्याला कां झटावें हेंच त्यांचे ध्यानांत येईना. त्याविषयीं ते विचार करूं लागले आणि जों जों विचार अधिकाधिक होत चालला, तों तों त्यांस असें वाटूं लागलें, कीं आपण त्यांस आतां अधिक कांहीं न विचारतां मुकाट्यानें दुसरे दिवशीं शेजारीं जाऊन त्या मुलीची चौकशी करावी. आपण तशी चौकशी केली, तथापि कांहीं हरकत नाहीं. कारण आपण इतके वृद्ध आहों कीं, आपल्याला त्या चौकशीबद्दल कोणी तसा दोष देणार नाहीं. अशा विचारांत त्यांची रात्र गेली आणि पहांटे पहांटे त्यांस किंचित् झोंप लागली. त्या झोंपेंतसुद्धां त्यांस ती गरीब दीनवाणी, परंतु सुस्वरूप मुलगी दिसली ! इतकें त्यांचें चित्त त्या मुलीचे ठिकाणीं गढून गेलें होतें, असें दिसतें. कालिदासानें दुष्यंताच्या मुखानें असल्या या मनःस्थितीचें फार उत्तम कारण दिलें आहे—

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्
पर्युत्सुकीभवति यत्सुखितोऽपि जन्तुः ।
तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं
भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि ॥

रम्य वस्तु पाहून व मधुर असे शब्द ऐकून सुखांत असलेला प्राणी एकाएकीं पर्युत्सुक होतो, याचें कारण हेंच कीं, त्याला नकळत कांहीं पूर्वजन्मींच्या लाग्याबांध्यांचें त्यास स्मरण होतें. तीच किंवा तशाच प्रकारची दादासाहेबांच्या मनाची स्थिति झाली होती काय !

दुसरा दिवस उजाडला. दादासाहेब

थोडे उशीरां उठले. उठल्याबरोबर त्यांची नजर त्या पलीकडल्या घराकडे प्रथमतः गेली. त्यांना नकळत त्यांचे डोळे ती आदल्या दिवसाची मुलगी तेथें आहे कीं काय हें पाहूं लागले. आपण एकवार ती कोण, कोणाची, याची चौकशी करावी असें वारंवार वारंवार त्यांचे मनांत येऊं लागलें. ते अण्णासाहेबांच्या येथें नसतां आपणच स्वतंत्रपणें असे रहात असते तर केव्हांच आपल्या इच्छेप्रमाणें त्यांनीं करून टाकलें असतें. परंतु आज त्यांच्या मनांत तसें येईना. अण्णासाहेबांस पुनः विचारावें तर हे ऐवढें कां विचारतात, असें त्यांस वाटूं लागलें. असे नानाप्रकारचे विचार त्यांचे मनांत येऊन ते आपली दिनचर्या सारीत होते. राहून राहून त्यांस आपल्या मुलाचें स्मरण होऊन त्याचा शोध कसा लावावा हाही विचार त्यांचे मनांत येतच होता मुलगा जिवंत असून अमुक ठिकाणीं अमुक गोष्टी करीत आहे, असें त्यांस जर कोणीं येऊन सांगितलें असतें, तर त्याजबद्दलची अधिक चौकशी त्यांनीं केली नसती; इतकेंच नव्हे तर तो परत येऊन तुमचेजवळ क्षमा मागणार आहे, असें त्यांस कोणीं सांगितलें असतां किंवा प्रत्यक्ष मुलगा येऊन क्षमा मागत असतां त्यांनीं त्यास पहिले दिवसाप्रमाणें अत्यंत कठोरपणें झिटकारून टाकिलें असतें. ‘ पुनः मला तुझं मुखावलोकनही नको ’ असें ह्मटलें असतें. परंतु तो आज कोठेंही नाहीं, त्याची कांहीं तरी विलक्षण स्थिति झाली आहे, असें मनांत येतांच नैसर्गिक अपत्यस्नेह जागृत होऊन ते येथें येऊन बसले होते.

मागें सांगितलेंच आहे, कीं ते आपल्याकडून पुष्कळ निरपेक्षपणा दाखवीत होते. मी आलों तो केवळ त्याची व्यवस्था काय झाली एवढेंच पहाण्यासाठीं आलों, नाहीं तर मला त्याची मुळींच जरूरी नाहीं; कसेंही झालें तरी आपल्या पोटीं त्यानें जन्म घेतला आहे तेव्हां त्याच्या शोधाकरितां येथपर्यंत येण्याची तसदी मीं घेतली. अशा तऱ्हेचे उद्गारही त्यांनीं अनेक वेळां काढले. परंतु मृत्यूच्या विचारानें त्यांचें अंतर्याम डळमळलें होतें, यांत शंका नाहीं. अशा प्रकारें मार्दव येऊन अंतःकरणाची विशेष प्रकारचीच स्थिति झाल्यामुळें त्यांची करुणावृत्ति जागृत झाली असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. कर्मधर्मसंयोगानें अण्णासाहेबांस त्याच दिवशीं पेढीच्या कामानिमित्त रोजच्याहीपेक्षां लौकर पेढीवर जावें लागलें. पहिला त्यांचा बेत असा होता कीं, दादासाहेबांस त्या दिवशीं घरीं मुळींच राहूं द्यावयाचें नाहीं. कांहीं तरी निमित्त काढून आपण त्यांस आपल्याबरोबर घेऊन जावयाचें. ह्मणजे आदले दिवशीं त्यांनीं ज्या संबंधांत विनाकारण चौकशी केली, तसली चौकशी करण्याची संधि त्यांस मिळणार नाहीं. त्यांच्या एकंदर वर्तनावरून असें दिसलें कीं, दादासाहेबांच्या त्या चौकशीस कोणाकडूनही उत्तर मिळूं नये, अशाबद्दल ते विशेष उत्सुक असावे. तशी उत्सुकता त्यांचे मनांत आहे असें वाटण्यास आपणास आणखीही एक कारण आहे. तें असें कीं, अण्णासाहेब बाहेर जातांना त्यांनीं आपल्या शागिर्दास एके बाजूस बोलाविलें व त्यास बजावून सांगितलें कीं, शेजारच्या घरांत कोण आहे वगैरेबद्दल दादासाहेबांनीं चौकशी केली असतां त्यांस कोणींही कांहीं माहिती सांगूं नये. तवेंच कोणी चिन्हाड आहे, आपणांस कांहीं माहिती नाहीं, असें सांगून उडवाउडवी करावी.

अण्णासाहेब दादासाहेबांस, 'आज आपण लौकरच तिकडे या, पद्माकर-पंतांची कांहीं विशेष माहिती मिळाल्याम आपण शोधाकरितां जाऊं, माझें पेढी-वरलें काम लौकरच आटपेल' असेंही म्हणून गेले. दादासाहेबांचें जेवणखाण वगैरे आटपून ते आदले दिवसाप्रमाणेंच आपल्या त्या खुर्चीवर जाऊन बसले. मधून मधून त्यांची नजर त्या समोरच्या व्हरांड्याकडे जातच असे. जणूं काय, ती मुलगी आदले दिवसाप्रमाणेंच तेथें येते कीं काय, हें पहाण्यासाठीं ते तेथें मुद्दाम बसले होते. बराच वेळ झाला तों आदले दिवसाप्रमाणें ती मुलगी तेथें येऊन उभी राहिली. आपल्याकडे कोणी पहात आहे हें तिच्या स्वप्नींही नसावें असें दिसलें. आदले दिवसाप्रमाणेंच ती आप-ल्या एका तळहातावर गाल टेंकून उभी राहिली होती. आज तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा मात्र चाललेल्या नव्हत्या. चर्या अतिशय म्लान होती. दुःखदायकच, परंतु नानाप्रकारचे विचार तिच्या मनांत येत असावे असें स्पष्ट दिसलें. दादासाहेब तिजकडे एकसारखे पहात होते. त्यांच्याही मनांत आदले दिवसाप्रमाणेंच नानाप्रका-रचे विचारतरंग उठत असावे. शेवटीं त्यांचे मनांत असेंही आलें कीं, आपण, येथून उठून शेजारच्या घरीं जावें व तेथें कोण रहातें, कोण कशानें आजारी आहे, याची चौकशी करावी, आणि जर आपला उपयोग झाला, तर त्या मंडळीस तो जरूर होऊं द्यावा. आपल्याजवळ मोठ्या यत्नानें मिळविलेल्या अनेक मात्रा आहेत, त्या मात्रांनीं नानाप्रकारचे मोठमोठाले रोग बरे होतात अशी ज्यांनीं आपणांस मात्रा दिल्या त्यांनीं खात्रीलायक प्रतिज्ञा केली आहे. मग अशा कामीं मात्रांचा उपयोग झाल्यास तो कां करूं नये? नुसत्या मात्रा जवळ बाळगून काय उपयोग? आपली ओळख नसली म्हणून काय झालें? अशा कामा-करितां ओळख काढली तरीही हरकत नाहीं. सारांश, त्यांच्या विचाराची दिशा अशा प्रकारची होती कीं, तेथेंकडून आपण त्या घरांत जावेंच असा त्यांनीं आपल्या मनाचा कल केला. आणि आतां ते उठ-णार तोंच पुनः एकवार त्यांची दृष्टि त्या समोरच्या मुलीकडे गेली. ती मुलगी आतां एकटी नव्हती. तिच्याजवळ एक मुलगा आला होता. तोही तिच्याप्रमाणें दुःखित दिसत होता. चेहऱ्यावर तो तिचा भाऊ असावा असें दादासाहेबांस स्पष्ट वाटलें, व तेही दोघें काय करताहेत तें पाहाण्यासाठीं आतुरतेनें तिकडे बघूं लागले. तो मुलगा आला तो त्या मुली-जवळ गेला, आणि एकदम ओक्साबोक्शीं रडूं लागला. त्या मुलीनें त्यास आपल्या-जवळ घेतलें. ती त्याचें सांत्वन करूं लागली; परंतु त्या सांत्वनांत तिला यश येण्याचें ऐवजीं अपयशच! ती स्वतःही त्या मुलाप्रमाणेंच रडूं लागली. तो देखावा पाहाण्याबरोबर दादासाहेबांची चित्तवृत्ति फारच विलक्षण झाली. त्यांच्या मनाचा निश्चय कायम ठरला. त्यांचें कोणी तरी फार जिव्हाळ्याचें मनुष्य आजारी असून त्याच्या बरें होण्याची निराशा वाटूनच हीं मुलें रडत असावीं असें त्यांच्या मनानें पक्कें घेतलें व त्या वेळीं विशेष तऱ्हेनें उद्विग्न झालेल्या करुणा व प्रेम या दोन वृत्तींच्या आवेशांत ते उठून खालीं जाऊं लागले.

वर सांगितल्याप्रमाणें विचार करून दादासाहेब निघाले व खालीं आले. त्यांच्या

तैनातीस असलेला शागिर्द त्यांस खालीं भेटला. त्याला शेजारच्या घरांत कोण मंडळी आहेत, यांविषयीं माहिती विचारावी असें वाटलें; व त्याप्रमाणें त्यांनीं त्यास एका बाजूस बोलावून घेऊन विचारलेंही; परंतु आधीं ठरल्याप्रमाणें त्यानें 'आपणास त्या बाबतींत कांहीं माहिती नाहीं; कोणी नवेंच बिऱ्हाड आलें असेल; मुंबईस काय, आज एक बिऱ्हाड तर उद्यां दुसरेंच, असें या घराचें नेहमीं चाललेलें असतें ' असें उत्तर दिलें.

शेजाऱ्यापाजाऱ्यांस माहिती नाहीं, कोणाची मदत मिळण्याचा संभव नाहीं, अशा माणसास तर आपण जरूर मदत करावी, असा दादासाहेबांचा या मधल्या प्रकरणानें विशेषच निश्चय झाला; आणि ते मागलापुढला कांहीं एक विचार न करितां आपल्या मनाच्या लहरीप्रमाणें तिकडे जाण्यासाठीं पागोटें घालून तयार झाले. अण्णासाहेबांच्या गडीमाणसांस हे कोठें जातात, हें अर्थातच लक्ष्यांत आलें नाहीं. हे आपण उठून शेजारच्या घरीं जातील आणि चौकशी करतील ही कल्पनाही त्या माणसांस आली नाहीं. यामुळें ते अण्णासाहेबांच्या पेढीवर जात असतील अशीच त्यांची समजूत झाली. दादासाहेबांनीं आपला पोशाख चढविला आणि ते चित्ताच्या त्या मृदुस्थितींत मुलीच्या व मुलाच्यासंबंधाची चौकशी करण्याकरितां निघाले. परंतु पुनः त्यांच्या मनांत कांहीं विचार आला. ते दारांतच थोडा वेळ थांबले. नंतर पुनः एकदां फिरले, आणि त्या शागिर्दास हांक मारून हलकेंच म्हणतात, "त्या शेजारच्या बंगल्यांत कोणी आजारी आहे, तरी आपण त्यांचे शेजारी आहों, तेव्हां त्यांची थोडीबहुत तरी पुसतपास करावी हें चांगलें. तूं तिथें जाऊन बारीक चौकशी करून, तेथें एक मुलगा आहे त्याला इकडे घेऊन ये. मला थोडासा वैद्यकीचा नाद आहे, आणि कालपासून मला असं वाटतं आहे कीं, आपण आपल्याजवळचं कांहीं तरी औषध त्यांना देऊन पाहावं. गुण येण्याचा संभव आहे. मीच एकदम जाण्यापेक्षां तूं जाऊन चौकशी करून आलास, तर विशेष चांगलं होणार आहे. त्या मुलाला इथें बोलाव. मी त्याला सर्व माहिती विचारीन, मग कोण आजारी असेल त्याला पाहायाला जाईन."

दादासाहेबांचें हें बोलणें चाललें असतां तो ब्राह्मण अतिशय आश्चर्यचकित मुद्रेनें त्यांजकडे पाहात होता. त्यास दादासाहेबांच्या त्या बोलण्यामुळें इतकें आश्चर्य वाटलेलें दिसलें, कीं त्यांच्या बोलण्याचा शेवटला भाग त्याच्या कानीं पडतांच तो एकदम त्यांस म्हणाला, "काय ! आपण त्या घरांत त्या आजारी बाईला औषध द्यायला जाणार ! "

दादासाहेब त्यास लागलीच म्हणाले, "हो, न जायला काय झालं ! कोणी बाई आजारी आहे काय ? "

दादासाहेबांचा हा प्रश्न ऐकतांच तो ब्राह्मण जरा दचकला. त्यानें आपली जीभ चावली व लागलीच म्हणतो, "असं मीं तरी ऐकलं. खात्रीनं कांहीं ठाऊक नाहीं. पण दादासाहेब, आपली तिथें ओळख नाहीं, देख नाहीं. आपल्याला तिथं जाऊन काय करायचं आहे ! कोण आजारी आहे त्याला त्यांचं औषधपाणी चालू असेलच. आपण गेलां, कांहीं औषध सुचवलं, आणखी त्यांनीं आपल्या बोलण्याचा मुळींच मान ठेवला नाहीं, तर काय उपयोग ! "

दादासाहेब तें ऐकून त्यास ह्मणतात, " चाकरांनोकरांनीं असे प्रश्न विचारण्याची आणि त्यांचीं उत्तरें देण्याची मला संवय नाहीं. मी सांगतों त्याप्रमाणें मुकाट्यानें करीत असलास, तर कर......"

दादासाहेबांचा स्वभाव लहरी व तामसी. नोकर ह्मटला म्हणजे तो नोकर; मग तो आपला असो कीं दुसऱ्या कोणाचा असो. नोकरानें आपल्या सांगण्याविरुद्ध कांहीं फाटे फोडावे आणि असें तसें करावें हें त्यांस मुळींच खपत नसे. प्रस्तुत प्रसंगीं अण्णासाहेबांच्या ब्राह्मणानें आतां सांगितल्याप्रमाणें उलट भाषण करतांच त्यांची चित्तवृत्ति संतप्त झाली व वर सांगितल्याप्रमाणें ते त्यास बोलले व पुढें घराबाहेर पडले.

ते दाराबाहेर पडतात. तों डोळ्यांतून एकसारखे वाहणारे अश्रु पुशीत पुशीत झपाट्यानें कोणीकडे जाणारा तो शेजारच्या बंगल्यांतला मुलगा त्यांस समोर दिसला आणि त्याबरोबर मनोवृत्ति एकदम खूपच उचंबळून त्यांनीं त्या मुलास हांक मारिली.

# प्रकरण ५१ वें.

## शेजारच्या बंगल्यांत.



मला वाटतें, मी आपल्याकडून अण्णासाहेबांच्या शेजारच्या बंगल्यांत कोण मंडळी येऊन राहिली होती, याबद्दल आतांपर्यंत चालविलेला गुप्तपणा बहुतांशीं निरर्थकच होय. वाचकांनीं त्यासंबंधाचे बरोबर तर्क केलेच असतील, तेव्हां तें गुपित आणखी कांहीं वेळ लांबवीत बसण्यापेक्षां वाचकांनीं केलेले तर्क खरे आहेत असें त्यांस सांगून आंत काय चाललें आहे तें पाहण्यास जावें हें बरें. गणपतरावाचे घरीं असतांना जांवयाच्या संबंधाच्या बातम्या धड लागत नाहींत, एकदां टपालची वेळ होऊन गेली ह्मणजे पुनः दुसऱ्या दिवसापर्यंत निवळ काळजींत बसावें लागतें, तेव्हां पुनः मुंबईस जाऊन राहावें हेंच बरें, असा विचार बळवंतरावांचे मनांत आला. द्वारकाताईंनीं तर तसें करण्याबद्दल आग्रहच धरिला. इतकेंच नव्हे, तर त्यांची प्रकृति आतां इतकी चेताळ झाली कीं, त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें करणें हें दोन्ही दृष्टींनीं बळवंतरावांस आवश्यक वाटलें. एक तर, त्यांचा एकसारखा नाद चालला होता आणि दुसरें, त्यांच्या प्रकृतीला केव्हां डाक्तराची मदत लागेल आणि केव्हां नाहीं, अशी स्थिति झाली होती. सर्वांचें चित्त नेहमीं प्रभाकराकडून किंवा दुसऱ्या कोणाकडून जांवईबोवांच्या संबंधानें काय बातमी येईल आणि केव्हां येईल, यावि-

षयीं नानाप्रकारचे तर्कवितर्क करण्यांत नेहमीं गुंतलेलें असे. हा सर्वच प्रकार टळावा आणि आपण परत मुंबईस गेल्यानें मात्र तो टळेल, असा एकंदर विचार करून मंडळीस घेऊन बळवंतराव व गणपतराव मुंबईस आले. वाटेच्या दग-दगीनें अर्थातच द्वारकाताईच्या अतिशय हलक झालेल्या प्रकृतीला फार त्रास झाला. आतां यांतून ती जगेल असें कोणासच वाटत नव्हतें; किती दिवस जगेल एवढाच काय तो विचार होता व आपल्या हातून जितकी काळजी घेववेल तेवढी घेऊन जितके अधिक दिवस जातील तेवढे घाल-वावे, असा बळवंतरावांचा व सर्वांचा यत्न होता. मुंबईस आल्यानंतर दुसरेच दिवशीं द्वारकाताईची प्रकृति अतिशय बिघडली. एक वेळ तर इतकी चमत्कारिक स्थिति झाली, कीं ती अगदीं निपचित पडून हात व पाय गार लागूं लागले, ना-डीचाही ठिकाण लागेनासा झाला. अर्था-तच सर्व मंडळी गडबडून गेली. दोन प्रह-रची वेळ. बाहेर ऊन जरा कडक पडलें होतें, यामुळें तिचा जीव घाबरा होऊन तशी स्थिति झाली असावी, असें प्रथमतः मंडळीस वाटलें; परंतु बराच वेळ झाला तरी द्वारकाताई शुद्धीवर येईना; यामुळें सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. पण काळ आला नव्हता. द्वारकाताई बऱ्याच वेळानें शुद्धीवर आल्या. हातापायांस चोळून ऊब आणण्याचें काम चालू होतेंच, त्यांत ती शुद्धीवर आल्याकारणानें लवकर ऊबही आली व उलट तिनें सर्वांस; "तुम्ही माझ्याभोंवतीं कां जमलां? मला झोंप लागली होती ती झोंपमोड का केलीत?" असें विचारूं लागली.

ती शुद्धीवर येण्याबरोबर सर्वांना आनंद झाला व तिला, 'कांहीं नाहीं, सहज जमलों होतों,' असें उत्तर देऊन मंडळी आपआपल्या ठिकाणांवर गेली. एकटी कमळा मात्र तिच्याजवळ बसली होती. द्वारकाताई आपल्या क्षीण परंतु सतेज नेत्रांनीं कमलेकडे पाहात होती व कमळा बाह्यतः तिच्याकडे पण खरोखर कोणी-कडे तरी पाहात बसली होती. दोघीही अगदीं स्वस्थ होत्या. द्वारकाताईचे नेत्र आपल्या मुलीकडे एकसारखे लागल्यामुळें ताटकळल्यानेंच कीं काय, मिटूं लागले. कदाचित् तिला झोंपही येऊं लागली अ-सेल. होतां होतां ते नेत्र अगदीं मिटले. परंतु कमळा तेथें तशीच बसून राहिली होती. इतक्यांत सरस्वतीबाई आंत आल्या व कमलेस ह्मणतात, "तुला सगळी रात्र जागरण झालं आहे मी आतां ताईजवळ बसतें. मुलगा निजला आहे तो आतां तास दोन तास उठणार नाहीं. तूं जा, नाहीं ह्मणूं नको. मी ऐकणार नाहीं. चार घटका जाऊन पड. सगळी मंडळी पडली आहेत. आळीपाळीनेंच इथें बसलं पाहिजे, अहोरात्र तूं एकटीच बसून कसं चालणार?"

कमलेच्या मनांत तेथून हलावयाचें नव्हतें. परंतु सरस्वतीबाई तिला बोलूं देईनात. तिला त्यांनीं तेथून उठवून लाविलीच. बिचारी तेथून उठून गेली आणि सरस्वतीबाईनीं सांगितल्याप्रमाणें जाऊन एका कोचावर पडली; परंतु मन अस्वस्थ असल्यावर शरीराला स्वस्थता कोठली! घरांत इतर सर्व ठिकाणीं अगदीं शांत होतें. गणपतराव व बळवंतराव एका खोलींत स्वस्थ पडले होते व त्यांस निद्राही लागली होती. गोपाळाही मधल्या दिवाण-खान्यांत एका इझीचेअरवर पडला

असतां त्याचा डोळा लागला होता. शांतीचें नांव नाहीं, अशी एक फक्त कमलाच होती. थोडा वेळ गेल्यावर तिला कोचावरही पडवेना. ती उठली व एकवार आपल्या आईच्या खोलीशीं जाऊन तिनें कानोसा घेतला आणि आंत विशेष कांहीं गडबड नाहीं असें पाहून बाहेर व्हरांड्यांत कठड्यावर हात टेंकून उभी राहिली.

या वेळीं तिच्या मनांत चाललेल्या विचारांचें पृथक्करण करणें व त्यांचें वर्णन करणें फारच कठिण होय. आपली आई आतां आठचार दिवसांपलीकडेही जगत नाहीं हें तिला उघड उघड दिसलें. शिवाय आपल्या स्वतःवर कोण भयंकर प्रसंग आला आहे तोही तिच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. आजपर्यंत आपण कोणत्या आनंदस्थितींत होतों आणि आतां कोणत्या दुर्धरस्थितींत येऊन पडलों; आपल्या दुर्दैवामुळें आपल्या मातापितरांस आजपर्यंत फार त्रास झाला, किंबहुना आपल्या दुर्दैवामुळेंच आपली माता लवकर मृत्यु पावत आहे असेंही तिच्या मनास वाटूं लागून तिला पराकाष्ठेचा खेद झाला. तिच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले. आपण जन्मलों नसतों तर हा कोणचाही त्रास आपल्या मातापितरांस झाला नसता, असेंही तिच्या मनांत येऊन ती फार कष्टी झाली. किती वेळ तरी ती अश्रु गाळीत व ते पुनःपुनः पुशीत, उसासे टाकीत व आपल्या दुर्दैवास नानाप्रकारें दोष देत उभी राहिली होती. आपल्या बापानें आपल्याबद्दल काय काय उमेदी बांधल्या होत्या; त्याच्या त्या सर्व उमेदी फलद्रुप करण्याचा आपण कशा प्रकारें निश्चय केला; आणि सरतेशेवटीं त्या सर्वांचा कळस कशा प्रकारें झाला, तें सर्व तिच्या मनांत येऊन तिची स्थिति अतिशय दुःखमय झाली. अशाच स्थितींत ती आणखीही कांहीं वेळ उभी राहिली असती, डोळ्यांत एकही अश्रु शिल्लक नाहीं अशी स्थिति येईपर्यंत तशीच उभी राहिली असती; तितक्यांत तिला कोणी आंत बोलावलेंही. या दिवशीं जें झालें तशाच प्रकारें दुसऱ्या दिवशींही प्रकार घडला. आदल्या दिवसाप्रमाणेंच द्वारकाताईचा जीव अतिशय घाबरला व कांहीं वेळ त्या अगदीं निपचित् पडल्या. काय होतें आणि काय नाहीं, असें वाटून सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. मात्र आदले दिवसाप्रमाणें द्वारकाताई लवकर शुद्धीवर आल्या नाहींत, तें पाहून कमलेस अतिशय रडूं येऊं लागलें व ती एकसारखी रडूं लागली; तेव्हां गणपतरावांनीं व बळवंतरावांनीं तिला तेथून अगदीं सौम्यरीतीनें उठवून बाहेर जाऊन बसण्यास सांगितलें. ती मुकाट्यानें तेथून उठली व बाहेर येऊन बसली. आतां आपण जवळ बसलों तरी कांहीं उपयोग होणार नाहीं. आपल्या बसण्यानें व रडण्यानें आईला अखेरीस विनाकारण त्रास मात्र होईल, असेंही तिच्या मनांत आलें असावें. ती बाहेर येऊन बसल्यानंतर तिला फारच मोठमोठ्यानें हुंदके येऊं लागले. सरासरी अर्धा तास ती मनमुराद रडली. बापानें नको म्हटलें तरी आपण पुनः तेथें जावें आणि काय होईल तें होवो, आईच्या उशाशीं बसून राहावें, असें तिच्या मनांत आलें, व ती एकदम तिकडे जाण्यासाठीं निघाली; परंतु दाराशीं जाते तोंच पुनः तिचें मन कचरलें आणि आंत जाण्याचा बेत रहित करून ती बाहेरल्या व्हरांड्यांतच जाऊन उभी राहिली.

आदले दिवसाप्रमाणें ती एकसारखी अश्रु गाळीत नव्हती; कारण सकाळपासून तिनें अश्रु इतके गाळले होते कीं आतां गाळण्यास तिच्या डोळ्यांत अश्रूच राहिले नव्हते. तिच्या शोकाच्या प्रचंड तापानेंही या वेळीं तिच्या नेत्रांतील अश्रू पार नाहींसे करून टाकिले असतील. ती आदले दिवसाप्रमाणेंच व्हरांड्यांत येऊन उभी राहिली. तिचें चित्त मात्र सर्व आंत होतें. इतक्यांत तिचा भाऊ आंतून बाहेर आला व तिच्या जवळ येऊन अतिशय गहिंवरून मोठमोठ्यानें रडूं लागला. हिनें त्याचें पुष्कळ समाधान केलें.–नव्हे करण्याचा यत्न केला; परंतु तो सफल होण्याच्या ऐवजीं ती आपणच त्याचे बरोबर रडूं लागली. इतक्यांत त्या दोघांसही त्यांच्या बापानें आंत हांक मारिली व तीं दोघें आंत गेलीं. त्यांची आई थोडीशी शुद्धीवर आली होती; परंतु रोजच्या पेक्षां आज मला कांहीं निराळेंच होत आहे, कसेंसेंच होत आहे,' असें एकसारखें ह्मणत होती. तेव्हां डाक्टरास बोलावून आणून एकवार काय होत आहे तें पाहावें, असें मनांत येऊन गणपतरावांनीं व बळवंतरावांनीं गोपाळास डाक्टराकडे जाऊन त्यांस बोलावून आणण्यास सांगितलें. गोपाळा वाऱ्याच्या गतीनें निघाला, व त्याची बहीण बंगल्याचे दाराशीं तो डाक्टराला घेऊन केव्हां परत येतो, हें जणूं काय पाहाण्यासाठींच उभी राहिली. द्वारकाताईजवळ त्यांच्या उशाशीं सरस्वतीबाई बसल्या होत्या, बळवंतराव तेथेंच उभे होते, आणि गणपतरावही पलीकडे उभे होते. द्वारकाताईंची चर्या अतिशय वाईट दिसत होती; आजपर्यंत जी कळा त्यांचे चेहऱ्यावर कधीं दिसली नाहीं ती कळा आज दिसूं लागली होती. यामुळें सर्व मंडळींचीं तोंडें अतिशय म्लान झालीं होतीं व सर्व जेथल्या तेथेंच उभीं राहून द्वारकाताईकडे पाहात होतीं; प्रत्येकाच्या मनांत निराशेनें पूर्ण अंमल बसविला होता. घटका दोन घटका, फार तर एखादा प्रहर ही आतां वांचेल, अधिक वांचणार नाहीं, असें प्रत्येकास पक्कें वाटत असावें, असें दिसे.

कमला दारांत उभी राहून वाट पाहात होती हें वर सांगितलेंच आहे; इतक्यांत टपालवाल्यानें तिच्या हातांत तिच्याच नांवचें एक पत्र आणून दिलें. तें पत्र हातीं घेण्याबरोबर तिच्या मनांत एकाएकीं धस्स झाल्याप्रमाणें झालें. कांहीं तरी अनिष्ट मजकूर आंत आहे, असें सुचविणारी एक काळी रेघ त्या पत्राच्या लिफाफ्यावर होती. ती पाहतांक्षणीं कोणाच्याही पोटांत विलक्षण भय वाटल्याखेरीज राहावयाचें नाहीं. त्यांत, ज्या स्थितींत कमळा होती त्याच स्थितींत असणाऱ्या व्यक्तीस असें कांहीं अनिष्टसूचक पत्र हातीं येण्याबरोबर अंतःकरणांत धडकी भरावी, यांत नवल काय ? तिनें तें पत्र हातीं घेऊन दोनदां चारदां इकडून तिकडे तिकडून इकडे करून पाहिलें, तें फोडून वाचण्याचें कांहीं तिला धैर्य होईना. आपणच फोडावें कीं दुसऱ्या कोणास हांक मारून फोडण्यास द्यावें, हेंही तिला सुचेना. पत्र फोडण्यास तर धीर होईना आणि फोडल्यावांचून आंतला मजकुर कळणें शक्य नव्हतें. मजकूर कशा प्रकारचा असावा याची सूचना ती भयंकर काळी रेघ स्पष्टपणें करीतच होती. तथापि नुसत्या सूचनेवर घाबरून जाऊन कसें चालतें ! तिनें आणखी एक दोन वेळां लिफाफा उलथा पालथा करून पाहिला,

वरचें अक्षर आपल्या अर्धवट ओळखीचें आहे, तें आपण कोठें तरी पाहिलें आहे, असेंही तिला वाटूं लागलें; परंतु नक्की कोठें व केव्हां पाहिलें, हें तिच्या ध्यानांत येईना. सरतेशेवटीं तिनें एका बाजूनें तें पत्र फाडलें आणि उघडून दहापांच ओळी वाचते न वाचते तोंच तिला एकदम अगदीं भान नाहींसें होऊन ती रडत रडत आपल्या आईच्या खोलींत घुसली व बळवंतरावांपुढें तें पत्र तिनें केलें. बळवंतराव क्षणापूर्वींच खुर्चीवर बसले होते. ते आपल्या मुलीचा तो चमत्कारिक आक्रोश, तें तिनें पुढें केलेलें पत्र व ती शोकमूर्ति पाहिल्याबरोबर ते जागचे उठले आणि सर्वच मंडळी तिच्याकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहूं लागली. तिची आजारी आई तर नितक्यांतल्या नितक्यांत उठण्याचा यत्न करूं लागली, परंतु त्या मुलीचें तें शोकस्वरूप पाहूनच कीं काय, तिच्या अत्यंत क्षीण अशा शरीरास तेवढाही यत्न फार कष्टदायक होऊन ती मागें पडली. सरस्वतीबाईंनीं तिला सांवरून धरिलें. उठतां उठतांच त्यांचा हात तिच्या मानेला होता म्हणून बरें झालें, नाहीं तर ती जास्त जोरानें मागें पडली असती. तिची चर्या तर पहिल्यापेक्षांही अतोनात काळवंडलेली दिसूं लागली. परंतु तिच्याकडे कोणाचेंही लक्ष्य नव्हतें. सर्वांचें लक्ष्य कमलेकडेच लागलें होतें. इतक्यांत गोपाळा आला; तोही दार उघडून कमलेकडे व येथील सर्व देखाव्याकडे पाहून दचकून तसाच थबकला. त्याच्याबरोबर ज्यास तो आणावयास गेला होता, तो डाक्टर किंवा दुसरें कोणी आलें असल्यास तें त्या खोलींतल्या कोणास दिसलेंही नाहीं. अर्धवट उघडलेल्या दारावर हात देऊन आंतला तो देखावा पाहून तो पोरगा अगदीं घाबरून जाऊन तसाच उभा राहिला. त्यास असें वाटलें, कीं आपण डाक्टरास आणण्यास गेलों असतां इकडे आपली आई वारली असावी; त्या विचारानें त्याची एकदम अशी स्थिति झाली कीं, त्यास रडूं सुद्धां येईना.

इकडे बळवंतरावांनीं कमलेच्या हातून तें पत्र घेतलें आणि त्याजवर एकवार नजर फेंकली. त्याचा अर्थ जणूं काय त्यांच्या मनांत अगदीं उतरला नाहीं, अशाच तऱ्हेनें ते आपल्या समोर पाहात राहिले आणि तें पत्र त्यांचे हातून खालीं गळून पडलें. गणपतराव त्यांस व कमलेस "काय, झालें काय? कमले, तूं अशी वेड्यासारखी काय करितेस? बळवंतराव, पत्र कोणाचें? काय आहे? जरा कांहीं विचार कराल कीं नाहीं." असें ह्मणाले. व खालीं पडलेलें पत्र उचलून त्यांनींही त्यावरून एकवार नजर फिरविली. तों त्यांचीही स्थिति फारच चमत्कारिक झाली. कोणी कोणास पत्रांत काय होतें तें सांगेना, गणपतरावानें मुकाट्यानें तें पत्र आपल्या बायकोच्या पुढें धरलें. तिनेंही त्याजवरून डोळे फिरविले आणि एकदम तिला रडूं कोसळलें. एकमेकांशीं एकमेक अवाक्षरही न बोलतां ते दोघे पुरुष अतिशय उद्विग्नचित्त होऊन परस्परांकडे पाहात राहिले आणि कमळा व सरस्वतीबाई मोठमोठ्यानें रडूं लागल्या. बिचारी द्वारकाबाई अगदीं आसन्नमरण झालेली, आपल्या त्या क्षणोक्षणीं तेजहीन होत चाललेल्या नेत्रांनीं, जणूं काय हा विलक्षण प्रकार काय आहे, मला कां सांगत नाहीं, असेंच विचारीत सर्वांकडे आळीपाळीनें पाहात राहिली.

अशा स्थितींत गोपाळास जरा दूर सारून आणखी एक गृहस्थ आंत आला.

# प्रकरण ५२ वें.

## दादासाहेब औषध देतात.



तो गृहस्थ गोपाळास अंमळ दूर सरून आंत आल्यावर जणूं काय गोपाळा शुद्धीवर आला व एकदम आपल्या बापास ह्मणतो, "बाबा, हे आपल्या या शेजारच्या अण्णासाहेबांच्या घरचे पाहुणे आहेत. त्यांच्याजवळ फार उत्तम आणखी गुणकारी असं क्षयाचं औषध आहे. आपल्या घरांत आज दोन दिवस चाललेली गडबड पाहून, त्यांनीं मघाशीं मी डॉक्टरकडे जात असतांना थांबवून विचारपूस केली, आणखी 'माझ्या आईला पाहायला येऊं का ?' असं ह्मणून आपणच आले आहेत. मी डाक्टरला निरोप सांगून येतों; मग तुह्मांला हांक मारतों असं सांगून मी येतांना बोलावून आणलं. डॉक्टर घरीं नाहींत यामुळं तर मला वाटलं कीं, यांना आणावंच. बाबा, पाहानात हो यांचं औषध काय आहे तें देऊन !"

बळवंतराव व गणपतराव या दोघांनींही एकदम त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें. डाक्टर नाहीं अशाच्या औषधावर गणपतरावांचा अगदीं बेभरंवसा, दुसरा एखादा माणूस असता, तर गणपतरावानें जेथल्या तेथेंच त्याला तुच्छ करून टाकलें असतें, परंतु दादासाहेब दिसण्यांत असा तेजस्वी व भरदार पुरुष असे कीं, गणपतरावांसारख्या उतावळ्या स्पष्टवक्त्यासही त्यांच्याशीं असन्मानोक्तीनें बोलणें अगदीं अशक्य होतें. इतक्यांत त्यांची दृष्टि कमळेकडे गेली. कमळा स्फुंदत स्फुंदत तेथून बाहेर जाऊं लागली, परंतु तिचें पाऊल उचलेना इतकें तें जड झालें होतें. गणपतराव तिच्याजवळ जाऊन एकदम म्हणाले, "पोरी, तूं असल्या या निनांवी पत्रावर काय भरंवसा ठेवितेस ? कोणा तरी लबाडानं कांहीं तरी लिहिलं असेल. मी आतां तार करून माहिती आणतों. तुझ्या हातीं आतां मुळीं एकही पत्र लागूं देतां उपयोगी नाहीं. अगदीं सुद्धां तें कांहीं खरं मानूं नकोस, वेडी कुठली !"

बळवंतरावही थोडेसे भानावर येऊन त्या गृहस्थाजवळ जाऊन ह्मणतात, "आपली परोपकारबुद्धि पाहून मोठा संतोष होतो. आम्ही सर्व औषधं आतांपर्यंत करून चुकलों. आपल्याजवळ कांहीं उरलंच नाहीं. काय करायचं ! आमच्यावर दुर्दैवानं घालाच घातला आहे. संकटंच येऊं लागलीं ह्मणजे काय ? एकसारखीं येऊं लागतात."

दादासाहेबांनीं तें त्यांचें सद्गदित कंठानें उच्चारलेलें भाषण ऐकलें आणि त्यांसही फार वाईट वाटलें. ते लागलीच बळवंतरावांस ह्मणतात, "तुम्ही असे निराश होऊं नका. याच्याहीपेक्षां अगदीं असाध्य

म्हणून आशा सोडलेले रोगी बरे झाल्याचीं उदाहरणें आहेत. मला एकंदर यांच्या या रोगाची हकीकत सांगा पाहूं."

इकडे गणपतरावांस असें वाटलें, कीं आतां आपण येथें राहाण्यांत अर्थ नाहीं, म्हणून कमळेला घेऊन ते तिचें समाधान करीत बाहेर गेले.

आपण होऊन औषध देण्यासाठीं आलेल्या गृहस्थाची अवहेलना करणें अगदीं मूर्खपणाचें आहे असें जाणून म्हणा, किंवा आतां कोणी कांहीं औषध दिलें तरी तें घ्यावें, परंतु आपल्या पत्नीस आराम पडला तर पहावा असें वाटून ह्मणा. पण बळवंतराव दादासाहेबांशीं फार अदबीनें बोलले आणि आपल्या पत्नीची प्रकृति पहाण्यासाठीं त्यांस पुढें घेऊन जाऊं लागले, परंतु पुढें जाऊन प्रकृति पहाण्यापूर्वी दादासाहेब त्यांस ह्मणतातः

"हें पहा, मी आधीं एकदोन गोष्टी स्पष्टपणानं तुह्मांला सांगतों. एक ही कीं, मी कांहीं वैद्यकी करून पोट भरणारा माणूस नाहीं; किंवा कांहीं टाण्याटोण्याचीं औषधं देऊन कोणापासून पैसे बुडविण्याचाही माझा धंदा नाहीं. औषधाबद्दल कोणापासून एक दिडकीसुद्धां मी कधीं घेत नाहीं. मी सुखवस्तु सरकारी पेन्शनर आहें. अशाच कांहीं कारणानं मी आपला मुंबईत आलों, तों आमच्या स्नेह्याच्या इथें उतरलों आहें. सहज खिडकींत बसलों असतां तुमच्या त्या मुलीकडे माझी नजर गेली. ती शोक करीत असावी असं वाटलं. तुमच्या मुलालाही असंच रडतांना पाहिलं. तेव्हां मनांत आलं, कीं आपल्या जवळच्या औषधाचा कांहीं उपयोग झाला तर करावा, म्हणून आपण होऊन मी आलों आहें. तुमच्या घरांत कोणी आजारी असून त्यामुळं ही शोक करते आहे असंही वाटलं. तुमच्या मुलाला हांक मारून त्याच्याबरोबर आलों, तेव्हां औषध द्यायला आलों, याच्यामुळं माझ्याबद्दल कांहीं तुमच्या मनांत शंका आली असली, तर ती काढून टाका. मला तीनशें रुपये पेन्शन आहे. शिवाय माझा जमीनजुमला आहे. कांहीं इनाम आहे तेव्हां कोणाला ढोंगधत्तुरा दाखवून फसविण्याचं मला कांहींसुद्धां प्रयोजन नाहीं. मला हा नाद आहे. स्वतः पैसे खर्च करून गरिबांगुरिबांना औषधपाणी देतों. दुसऱ्याही कोणी इच्छा दाखविली तर त्यांना देतों. तुमच्या मुलांना पाहून मला केवळ त्यांची कींव येऊन आलों आहें. इतकं तुह्मांला कळवून आतां मग पुढं प्रकृति पाहूं."

दादासाहेबांना जणूं काय संशयच आला, कीं आपण कोणी उगीच ढोंगधत्तुरा करून लोकांकडून पैसे काढणारे वैद्य असूं, असा या मंडळीचा समज झाला असेल, आणि तो समज एकदां दूर करून टाकावा एवढ्याकरितां त्यांच्या स्वभावाला अनुसरून त्यांनीं सणसणीत प्रस्तावना केली. बळवंतराव अगदीं थक्क झाला व एकदम त्यांस ह्मणतो, "छे. छे. तसा समज माझा झालाच नाहीं. मनुष्याला पाहिल्याबरोबर पारख होत नाहीं काय? आह्मी सर्व उपाय करून चुकलों आहोंत. आतां अगदीं निश्चयानं असं ठरविलं आहे, कीं एक कोणतं तरी औषध द्यायचं, दुसरं तिसरं कांहीं नको. आपण आदरून आलां आहां, तर मी असंच समजतों, कीं आपल्याला परमेश्वरानं मुद्दाम पाठविलं आहे. तिला बरी करावी आणखी आपल्या हाताला यश द्यावं

असंच त्याच्या मनांत आहे. आपल्याला मी हकीकत सांगतों. आपण प्रकृति पहा; आणखी आपलं औषध द्यावं असं आपल्याला वाटत असलं, तर तावडतोब सुरू करा. माझी बिलकुल ना नाहीं."

इतकें बोलणें झाल्यानंतर मग काय ? दादासाहेबांनीं रोगासंबंधीं प्रश्न विचारले, आणि बळवंतरावांनीं रोग कसा उद्भवला, कसा बळावला वगैरे हकीकत सांगितली. दादासाहेबांनीं 'आपलं औषध खात्रीनं लागू पडेल,' असें सांगितलें. मी आपला औषधाचा संग्रह नेहमीं बरोबर बाळगतों, मला हा नादच आहे, माझ्याबरोबर औषध आहे. मी घरीं जाऊन पाठवून देतों, असें ह्मणून ते तेथून उठले. आपण कोण, कुठें असतां हें दादासाहेबांस विचारण्याची बुद्धि बळवंतरावांस झाली नाहीं, आणि बळवंतरावांसही ते प्रश्न विचारण्याची इच्छा दादासाहेबांस झाली नाहीं. दोघांसही त्या बाबतींत संकोचच वाटला असावा. औषध तावडतोब आणून तावडतोच देण्यास सुरुवात करण्याची आतुरता दादासाहेबांस झाली. पहिली पुडी मी स्वतः येऊन कशी द्यावयाची ती देतों असें म्हणत व पथ्यपाणी काय व कसें करावयाचें तें सांगत, स्वारी त्या खोलींतून बाहेर चालली. बळवंतरावही अर्थातच त्यांचे मागोमाग चालले होते. जातां जातां दादासाहेब बळवंतरावांस सहज म्हणतात, "मी आंत येण्यापूर्वी तुमची कसल्या पत्रावरून कांहीं भानगड 'चालली होती, यामुळं मी तसाच माघारी जाणार होतों; परंतु पुनः वाटलं, कीं या बाईच्या प्रकृतीपेक्षां अधिक महत्त्वाचा असा कांहीं प्रसंग नसेल. आपण जाण्याला कांहीं हरकत नाहीं. असा विचार करून आंत आलों. एका अर्थीं बरंच कळलं म्हणायचं. कारण त्या पत्रांत विशेष महत्त्वाचा कांहीं प्रकार असता, तर आपण मला तेव्हांच आह्मी अशा अशा अडचणींत आहोंत, सध्या कांहीं बोलूं नका असं सांगितलंच असतं. पण..."

इतकें ते बोलत आहेत तों दोघेही बाहेरच्या बाजूस आले. त्यांस उत्तरादाखल बळवंतरावांचे तोंडून एक सुस्कारा मात्र बाहेर पडला. आणि ते त्यांस शब्दांनीं कांहीं उत्तर देणार, तोंच दादासाहेब अंगणांतही गेले. बळवंतराव मागें फिरले. कमळा अजून शोक करीतच होती. गणपतराव तिचें नानाप्रकारांनीं समाधान करीत होते:—"आजपर्यंत तुला अशीं बनावट पत्रं थोडीं का आलीं! तूं कां विनाकारण भलताच शोक करतेस? हा शोक सोडून दे. कोणा तरी दुष्टानें अगदीं विनाकारण लबाडीनं हा प्रकार केला आहे. याच्याबद्दल मुळींच शंका नको. नाहीं तर त्या विक्षिप्तांनींसुद्धां हा प्रकार करविला असेल. एकदां मनुष्य वाहवला ह्मणजे कोणीकडे वाहवेल याचा मुळीं मुद्दां नियम नाहीं. त्यांतलाच हा प्रकार असेल." असें बोलून त्यांनीं तिचें शांतवन चालविलें होतें. त्यांत बळवंतराव तेथें आल्यानंतर त्यांनीही तसेंच बोलून तिचें समाधान चालविलें. इतक्यांत गोपाळानें तें पत्र हातीं घेतलें व पाहिलें; आणि तो एकदम म्हणतो, "मागं एकदां ताईला पत्र आलं होतं तसंच हें अक्षर दिसतं. कोणा तरी लुच्चयाचंच हें काम आहे, यांत शंका नाहीं."

गणपतराव व बळवंतराव यांनीं तें पत्र पुनः हातीं घेतलें व गोपाळाच्याच ह्मणण्याचा अनुवाद केला. इतकें झाल्यावर

आपला शोक आवरण्यापलीकडे कमलेस कांहींही उरलें नाहीं; परंतु तिच्या मनाला एकसारखा हुरहुर लागून राहिलीच हें सांगावयास नको. पत्रांतील मजकूर खोटा, पत्र कोणा तरी लुच्चयानें बनावट पाठविलेलें, असें सर्वांना ह्मटलें, तरी त्यांची त्यांचीं अंतःकरणेंही तशीं अगदीं निर्मळ राहिलीं असतील हें संभवनीयच नाहीं. परंतु एकदम हलकल्लोळ उडूं दिला असतां काय होईल आणि काय नाहीं असें भय वाटून गणपतराव व बळवंतराव यांनीं मोठें विलक्षण धैर्य धरून वर सांगितल्याप्रमाणें उडवाउडवीचा प्रकार केला. त्यांच्या अंतःकरणांत काय वाटत होतें तें त्यांचें त्यांसच ठाऊक! तो विषयच अजीबाद उडविण्यासाठीं बळवंतरावांनीं आपल्या मुलीच्या देखत गणपतरावांस शेजारचे गृहस्थ आले होते त्यांच्याविषयीं माहिती सांगितली. व ते पुनः औषध देण्यास येणार आहेत असेंही सांगितलें. तें ऐकतांच गणपतरावांस थोडेंसें आश्चर्य वाटलें असें दिसलें. किंबहुना कांहीं संशयही त्यांचे मनांत आला असावा व तो संशयही उद्गारून दाखवून त्या गृहस्थाविषयीं कांहीं अवहेलनापूर्वक ते बोलणार इतक्यांत तेच गृहस्थ बाहेर आल्याची वर्दी त्यांस आली. त्याबरोबर बळवंतराव एकदम बाहेर गेले व त्या गृहस्थांस घेऊन आपल्या पत्नीच्या खोलींत गेले. तेथें दादासाहेबांनीं मध मागवून आपल्या हातानीं एक पुडी त्या मधांत कालवून तावडतोब रोग्यास देण्यास सांगितलें. सरस्वतीबाईनीं ती द्वारकाबाईस चाटविली.

दादासाहेब बळवंतरावांस त्या औषधाच्या गुणाबद्दल आणि आजपर्यंत त्याच्यायोगानें कितीकांस गुण आला याबद्दल वर्णन करून सांगत होते. थोड्या वेळानें यांना झोंप येईल, तेव्हां होतां होईलतों आतां आपण विशेष गडबड होऊं देऊं नये; जितक्या लवकर झोंप येईल तितकें चांगलें. किती वेळांत झोंप येते हें पहाण्यासाठीं मी येथेंच थांबतों. आपण बाहेर गोष्टी सांगत बसूं. असें दादासाहेबांनीं सुचविलें, आणि ते उठून बाहेर जाऊं लागले. झोंप लागतांच आह्मांला बाहेर कळवा असें सरस्वतीबाईस बळवंतरावांनीं सांगून तेही दादासाहेबांच्या बरोबर बाहेर आले. बाहेर खुर्च्या वगैरे टाकलेल्या होत्याच. त्यांवर मंडळी बसली. "अण्णासाहेब अजून आले नाहींत, मला तरी तिकडे जाऊन काय करायचं आहे, इथेंच घटकाभर बसूं," असें ह्मणत दादासाहेब एका खुर्चीवर बसले. पण तितक्यांत ह्मणतात, "मी तुमच्यावरूनच ह्मणतों असं नाहीं, पण अलिकडे हा खुर्च्यांचा वगैरे सुधारकी थाट फारच माजला आहे! जुनं तेवढं कोणाला नकोसं झालं आहे. मला तर त्याचा मनापासून कंटाळा. पण जावं तिथें हाच प्रकार. ज्या त्या बाबतींत सुधारणा! हीं लहान लहान कारट्यांची सुद्धां ओरड!"

दादासाहेबांचं हें बोलणं होतें आहे तों गणपतराव तेथें आले. त्यांजकडे पाहून दादासाहेब गणपतरावांस ह्मणतात, "आपला व आमचा कांहीं परिचय नाहीं. पण तुमच्या दोघांही मुलांना रडतांना पाहून मला सहज इच्छा होऊन मी इथें आलों. आपण होऊन परिचय करून घेतों आहें, याबद्दल आपल्याला कांहीं वाईट नाहींना वाटत? मला पहिल्यापासून वैद्यकीचा मोठा नाद. त्यांत पेन्शन घेतल्यापासून

आपला एका क्षेत्रांत जाऊन राहून काल-क्षेप करीत असतों. आपला आणखी यांचा काय व्यवसाय आहे ?"

गणपतराव त्यास तत्काल उत्तर देतात, "सरकारी नौकरी नाहीं, तर वकिली याखेरीज आजकाल दुसरा कोणता व्यवसाय कोणाला असायचा? हे सरकारी नौकर आहेत, मी दुसरा धंदा करतों. मिळून धंदा नौकरीसारखाच. दुसरा धंदा करणार काय ! कुठें मुद्दां आपल्या लोकांना वर डोकं करायला जागा नाहीं. व्हावी कशी ? पोरगा अठरावीस वर्षांचा झाला नाहीं तोंच संसार करायला लागण्याची जरूरी त्याला पडते, अशा स्थितींत धाडसाचीं कामें व्हावीं कशीं ? पोरगी आठदहा वर्षांची झाली नाहीं तोंच तिला कुठें तरी एकदां देऊन टाकून डोक्यावरलं ओझं खांद्यावर उतरून घ्या ही तर ज्याला त्याला इतिकर्तव्यता वाटते. पंचविस वर्षांखालीं पोराचं लग्न करूं नये आणखी अठरा वर्षांखालीं पोरीचं लग्न होऊं नये अशी स्थिति जेव्हां येईल तेव्हां उगीच कुठें कोणाच्या हातून धाडसाचीं कामें झालीं तर होतील."

दादासाहेब हें सर्व भाषण ऐकून अगदीं चकित झाले. सुधारणेचा वगैरे सुधारकी थाट तेथें दृष्टीस पडला, तरी हे असले भयंकर विचार ऐकूं येतील असें त्यांस वाटलें नव्हतें. ते अगदीं बावरल्याप्रमाणें झाले. दुसऱ्याच्या घरीं आपण आलों म्हणून त्याचें असल्या प्रकारचें बोलणें मुकाट्यानें ऐकून घ्यावें अशांतला तो ब्राह्मण नव्हता. ते एकदम संतापून म्हणतात, "तर मग काय तुमच्या मनांतून आमच्या घरांत सगळा बाल्यांचा प्रकार व्हावा, असं तुम्हाला वाटतं ! असं वाटणारांपैकींच तुम्ही असलां तर...."

पुढचे शब्द त्यांच्या मुखावाटें धड निघेनात. ते थोडा वेळ स्तब्ध बसले व एकदम आणखी म्हणतात, "तुम्ही इतक्या मजलीपर्यंत जर बोलतां आहां तर आपल्या मुलीला अविवाहितच ठेविली आहे कीं काय ?"

गणपतराव त्यावर तावडतोब त्यांस म्हणतात, "माझी मुलगी असती, तर ठेवलीच असती. ही मुलगी बळवंतरावांचीयांनीं तरी थोडे दिवसांपूर्वीपर्यंत ठेवलीच होती. मी त्यांना तिचें तुम्ही मुलीचं लग्न करूं नका म्हणून म्हणत होतों. पण त्यांनीं ऐकलं नाहीं. आणि आतां पश्चात्तापांत पडले आहेत. लग्न करून अजून जेमतेम चार सहा महिने झाले असतील नसतील तोंच........"

इतक्यांत बळवंतरावांनीं त्यांस दाबलें. गणपतराव बोलण्याच्या भरांत आला म्हणजे काय बोलेल आणि काय नाहीं याचा सुमारच नसे. यामुळें बळवंतरावांस तसें करणें भागच पडलें; परंतु तें भाषण त्या वेळीं तितकेंच थांबविल्यानें दादासाहेबांस विशेषच आवेश येऊन ते गणपतरावांस म्हणतात, 'तोंच काय ? तोंच काय झालं !"

यावर दुसऱ्या कोणी उत्तर देण्याचे आधींच प्रभाकर समोरून पायऱ्या पायऱ्या पायऱ्या चढून आला व बळवंतरावांस एकदम म्हणतो, "काका, काका, पद्माकराची बातमी नाहीं बातमी नाहीं म्हणतां म्हणतां भलतीच किंहो बातमी आणण्याचा माझ्यावर प्रसंग आला. इतके दिवस मला फसवून फसवून शेवटीं आज भयंकर प्रसंग गुदरल्यावर राजारामानं खरा प्रकार काय झाला तो मला येऊन सांगितला. त्याला आजच सकाळीं ब्रह्मदेशांतून पत्र आलं,

त्यांत स्पष्ट पद्माकराची शेवटीं काय अवस्था झाली तें लिहिलें आहे. हें तें पत्र पहा. मला कांहीं विचारूं नका."

'पद्माकर, पद्माकर' हें नांव दोन वेळां त्या मुलानें उच्चारलेलें पाहून दादासाहेब एकदम चमत्कारिक चर्या करून उठून उभे राहिले व त्या मुलास म्हणतात, "पद्माकर, पद्माकर कोण? आणखी त्याची काय अवस्था झाली?"

परंतु त्या त्यांच्या शब्दांस उत्तर म्हणून आंतून एक हृदयभेदक रोदनस्वर मात्र आला.

बाकी सर्व मंडळी केवळ मृतवत् स्तब्ध उभी होती.

---

# प्रकरण ५३ वें.

## दुष्ट वार्ता.



बाहेर काय भाषणें चाललीं होतीं तीं आंत कमला लक्ष लावून ऐकत होती. तिला आलेलें पत्र वाचल्या वेळेपासून तिची चित्तवृत्ति अतिशय व्यग्र झाली होती हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. तिच्या बापानें व गणपतरावानें केलेलें समाधान अणुभरही तिच्या चित्तांत ठरलें नाहीं. ही मंडळी अशा प्रकारें आपलें समाधान करीत असतां आपण मात्र निकामा आक्रांत करून त्यांस व आपल्या मरणाच्या द्वारीं बसलेल्या आईस त्रास देणें तिला अगदीं योग्य वाटलें नाहीं. ती मनाची मोठी निर्धारी. आपल्या मनोविकारांचें संयमन करावयाचें, असा एकदां निर्धार केल्यानंतर काय वाटेल तें झालें, तरी तो निर्धार मोडावयाचा नाहीं असें तिचें मनोबल होतें. परमेश्वराच्या इच्छेबाहेर कोणतीही गोष्ट नाहीं आणि जें जितकें ज्याच्या नशिबीं भोगावयाचें असेल, तें तितकें भोगल्याखेरीज त्यास सुटका नाहीं. हीं दोन तत्त्वें तिच्या आईनें तिच्या मनावर पूर्णपणें बिंबवून दिलेलीं होतीं.

लहानपणींच वैधव्य येऊन दुसऱ्याचे तोंडाकडे पाहण्याचा अत्यंत दुःखदायक प्रसंग आल्याकारणानें कित्येक लहान मुली किती तरी विचारी व सहनशील बनतात. आपल्या नशिबीं जसें होतें तसेंच आपणास भोगावयास लागणार आहे, ते भोग टाळण्याकरितां कितीही खटपट केली तरी कांहीं उपयोग होणार नाहीं, अशा तऱ्हेचा निराशामूलक परंतु आल्या स्थितींत पूर्ण समाधान मानण्यास शिकविणारा विचार अशा मुलींच्या मनांत वारंवार वारंवार येऊन व तशाच प्रकारचे उद्गार इतरांच्या तोंडून पुनः पुनः ऐकून त्यांचीं मनें सर्व दुःखें सहन करण्यास

शक बनतात. द्वारकाताईचें मन असेंच बनलें होतें. पुढें इतर बालविधवांच्या स्थितीहून अगदीं भिन्न अशी स्थिति त्यांस प्राप्त झाली विवाहित स्थितीचा आनंदजनक अनुभव त्यांस मिळाला, परंतु प्रथमच्या दुःखस्थितीनें मनांत उपजलेले विचार व त्यावर झालेले संस्कार त्यांचे मनांतून दूर झाले नाहींत. त्यांच्या मनावरले संस्कार उपदेशद्वारानें, व न जाणों कदाचित् आनुवंशिक नियमानेंही कमलेच्या अंगीं उतरले. यामुळेंच नसलें तें सर्वथा घात झाल्याची वार्ता आणून पोंचविणारें पत्र हातीं आलें असतांही केवळ आपली वडील मंडळी त्या पत्रांतील मजकूर अगदीं खोटा कोणीतरी द्वेषबुद्धीनें लिहून पाठविला असावा, असें म्हणून समाधान करतात एवढ्याचसाठीं तिनें आपलें मन आवरून धरलें, आकांत केला नाहीं. परंतु त्या पत्रांतील मजकूर अक्षरशः खरा आहे असें सिद्ध करणारें दुसरें पत्र प्रभाकरानें आपल्या बापास व इतर मंडळीस आणून दाखविलें आहे आणि अत्यंत दुःखस्वरानें ती दुष्ट बातमी सांगत आहे, असें ऐकतांच तिच्या मनावरला तिचा ताबा अगदीं नाहींसा झाला. आणि मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें तिच्या तोंडून एकदम बाहेर पडलेली हृदयद्रावक किंकाळी बाहेरील मंडळीच्या कानावर आली. ती ऐकतांच सर्व मंडळी केवळ मृतवत् स्तब्ध उभी राहिली. कोणासही काय बोलावें किंवा काय करावें हें सुचेनासें झालें. शून्य दृष्टीनें जो तो कोणाच्या तरी तोंडाकडे पहात उभा राहिला. दादासाहेबांची तर स्थिति फारच चमत्कारिक होऊन गेली. ते अगदीं पक्क्या भ्रमिष्टाप्रमाणें ह्याच्याकडून त्याच्याकडे, त्याच्याकडून ह्याच्याकडे पाहात राहिले. हा पद्माकर कोण? आपला मुलगा तर नव्हे? आपला मुलगाच असला तर ही काय भयंकर बातमी, आणि ही मंडळी तरी कोण, असे विचार त्यांच्या मनांत एका क्षणाच्या लक्षांश अवकाशांत येऊन गेले. बळवंतराव, गणपतराव वगैरे मंडळीचा पाय आंत जाण्यास धजेना. प्रभाकरास आतां आपण आंत जावें, की आल्या वाटेनें परत जावें, की जेथें उभें आहोंत तेथेंच उभें रहावें, कांहींसुद्धां समजत नसावें असें दिसलें. दादासाहेबांस ती संशयस्थिति फार वेळ सहन होईना व ते एकदम प्रभाकराजवळ जाऊन त्याचे खांद्यावर हात ठेवून त्यास म्हणाले, "बाबारे, पद्माकर कोण? तो कुठें आहे? त्याचें काय झालें?"

प्रभाकर त्यांचे तोंडाकडे पाहून ह्मणतो: "पद्माकर माझा स्नेही. या मंडळीचा जांवई. तो थोडे दिवसांपूर्वीं एकाएकीं नाहींसा झाला. कोणी म्हणत तो परदेशास गेला. किती शोध केला तरी त्याचा पत्ता आम्हांला लागेना, आणि आज एकाएकीं त्याच्याबद्दलची अतिशय दुष्ट बातमी लिहिलेलें पत्र आमच्या एका स्नेह्याला ब्रह्मदेशांतून आलें आहे."

प्रभाकर याप्रमाणें बोलत असतां दादासाहेबांची चित्तवृत्ति अतिशय विलक्षण झाली. आपण कोठें आहोंत, काय करीत आहोंत, याचें जणूं काय त्यांस भानच नाहींसें झालें. व आपल्या दांतांनीं आपला खालचा ओंठ चावून व आपली उजवी मूठ वळवून ती डाव्या तळहातावर हापटून प्रभाकरास म्हणतात, "तो कोणाचा मुलगा हें तुला ठाऊक आहे?"

हा निर्व्हाईत वृद्ध गृहस्थ आपल्या

तोंडची आपल्या स्नेह्याची दुःखवार्ता ऐकून अशा त्वेषानें हें आपणास विचारतों आहे याचा अर्थ काय, असें मनांत येऊन प्रभाकर त्यांस ह्मणतो, " माझा स्नेही पद्माकर दिंगबरपूरच्या दादासाहे...... "

परंतु प्रभाकरास आपलें वाक्य पुरें करण्यास दादासाहेबांनीं मुळींच अवधि दिला नाहीं. ते एकदम अतिशय संतप्त होऊन प्रभाकरास म्हणतात, " तर मग काय तो माझा कारटा मेला म्हणतोस? खचित मेला? आणखी मी ज्यांच्या घरांत उभा आहें ते त्याचे सासरे? जिला औषध द्यायला मी आलों ती त्याची सासू? आणखी जिला पाहून माझें मन कळवळलें, ती त्याचा खून करणारी? आमच्या राजरत्यांच्या सुखाचा सत्यनाश करणारी?................."

दादासाहेबांनीं बिचाऱ्या कमलेला त्या वेळीं काय विशेषण दिलें हें लिहून न दाखविणेंच बरें. त्या घरांतील इतर सर्व मंडळी दुःखानें अतिशय व्याप्त होऊन शोक करीत असतां हा एकटा वृद्ध गृहस्थ त्या बाहेरच्या पडवींत उभा राहून त्यांस एकसारख्या शिव्या व शाप देत होता. त्याची दृष्टि फिरून गेली होती. आपण काय शब्द उच्चारीत आहोंत याचा अर्थ त्यास कळत होता किंवा नाहीं, त्याची सुद्धां शंकाच त्याजकडे पाहणारास यावी असें वर्तन होतें.

त्याचे ते शब्द ऐकण्याबरोबर प्रभाकर एकदम चकित झाला. पद्माकराचा आणि या म्हाताऱ्याचा पितापुत्रसंबंध असावा हें तर दादासाहेबांचें बोलणें ऐकतांच त्याचे मनांत आलें. पद्माकराच्या तोंडून त्यानें या म्हाताऱ्याचें वर्णन ऐकलें होतें इतकेंच नव्हे, तर पद्माकरानें दाखविलेला त्यांचा एक फोटोग्राफही त्यानें पाहिला होता. त्या फोटोग्राफांतील चर्या एकदम त्याचे मनांत उभी राहिली व आपल्यासमोर अत्यंत क्रोधानें शिव्या व शाप देत असलेला वृद्ध गृहस्थ आपल्या मित्राचा जनकच खरा, अशी त्याच्या मनाची पक्की खात्री झाली. परंतु हा म्हातारा येथें कोठून आला? हा येथें येण्याचा संभव तरी काय? आणि आला तोही अशा दिवशीं! हें सर्व विचित्र प्रकरण काय झालें व कसें झालें याची त्यास कल्पनाही होईना. आणि त्या आश्चर्याच्या भरांत तो तेथल्या तेथेंच उभा राहिला. दादासाहेबांचें मोठमोठ्यानें चाललेलें बोलणें ऐकून बळवंतराव व गणपतरावही अतिशय चकित झाले. इतके कीं, आपल्या पोरीवर कोण प्रसंग गुदरला आहे याचें त्यांस भानही राहिलें नाहीं. हा कमलेला पाहून तिची कींव वाटून आपल्या बायकोस औषध देण्यासाठीं आलेला वृद्ध गृहस्थ आपला व्याही असेल, कमलेचा सासरा असेल, असें त्यांस आधीं स्वप्नांत सुद्धां खरें वाटलें नसतें, परंतु या वेळीं त्याचें तें भाषण, तो संताप व त्या संतापाच्या भरांत त्याचे तोंडून निघत असलेले ते शब्द ऐकून त्यांस त्याबद्दल मुळींच शंका राहिली नाहीं. हा ह्मातारा कमलेचा सासराच असून विलक्षण चमत्कारानें येथें अशा विलक्षण वेळीं आला आहे. हें नुसतें मनांत येण्यास व त्याबद्दल मनाची पक्की खात्री होण्यास त्यांस किती तरी अवकाश लागला. एखाद्या नाटकांत किंवा कादंबरींत अशा प्रकारचा प्रसंग दाखविलेला किंवा वर्णिलेला त्यांनीं पाहिला असता, तर ग्रंथकारानें आपल्या कल्पनेचा कांहींतरी खेळ आहे असें म्हणून ते स्वस्थ बसले असते. परंतु आज तसाच चमत्कारिक प्रसंग प्रत्यक्ष त्यांचे

घरांत त्यांचेवरच येऊन उभा राहिला. वर सांगितल्या प्रकारें एखाद्या नाटकांत किंवा कथानकांत असा प्रसंग आला असता, तर त्यांनीं तो वाचून त्याच्या संभवनीयत्वाबद्दल आपल्या मित्राशीं संवाद केला असता व संभवनीय किंवा असंभवनीय हें ठरविलें असतें. परंतु आज तो प्रसंग त्यांचेवरच आल्यामुळें त्यांस या प्रसंगीं काय करावें हें अगदीं सुचेनासें झालें. आलेलें संकट आपल्यास व या वृद्ध गृहस्थास सारखेंच दुःखद व दुर्घट होय. प्रसंगीं ह्मणजे समानदुःखत्वामुळें परस्परांनीं परस्परांचें समाधान करण्यास झटावें, तें एकीकडेच राहून हा ह्मातारा आपणास व आपल्या सर्व माणसांस अद्वातद्वा शिव्याशाप देत आहे, तें पाहून बळवंतराव व गणपतराव या दोन व्यक्तींच्या मनांत दोन निरनिराळ्या प्रकारचे विचार उपस्थित झाले. या ह्माताऱ्यास आपण न बोलाविता हा आपण स्वतः येथें येऊन आपल्या दुःखाविष्ट मित्रमंडळीस शिव्या देत आहे याची नसल्याच भाषणानें चांगली कानउघाडणी करावी आणि यास येथून चालतें होण्यास सांगावें, असा उतावळा विचार गणपतरावांच्या मनांत आला व त्याप्रमाणें तो त्यांस बोललाही असता, परंतु बळवंतरावाचा स्वभाव त्यास पक्का ठाऊक, यामुळें त्यानें थोडा गम खाल्ली.

बळवंतराव अतिशय शांत, विचारी व धिमा, त्यास त्या म्हाताऱ्याच्या बोलण्यानें फार वाईट वाटत होतें, परंतु म्हाताऱ्यास अशा तऱ्हेनें वागण्यास अगदीं योग्य कारण आहे, त्यास आपण वेडेंवाकडें बोलून विनाकारण दुखवूं नये. सौम्य शब्दांनींच त्याची चित्तवृत्ति स्थिरावतां आल्यास यत्न करावा असें मनांत येऊन ते दादासाहेबांच्या थोडेसें पुढें जाऊन त्यांस कांहीं म्हणणार, तोंच दादासाहेबांची क्रुद्ध दृष्टि त्यांचेकडे वळली आणि ते त्यांस एकदम म्हणतात, "माझ्या पोराला फुसलावून आपली पोरगी त्याच्या गळ्यांत बांधणारा नीच मनुष्य तूंच का? मी तुझ्याच घरांत उभा आहें का? का मला कांहीं तरी भयंकर स्वप्न पडतें आहे? माझ्या पोराला फुसलावून त्याचा खून करणारा तूंच? तुझी ती वरून फार सुंदर दिसणारी कारटीच?"

हे शब्द तो म्हातारा उच्चारीत असतां त्याची दृष्टि कांहीं चमत्कारिक दिसत होती. त्या दृष्टींत मानवीपणा दिसला नाहीं. त्याच्या तोंडून पडणारे शब्द मनाच्या नेहमींच्या नैसर्गिक स्थितींत उद्गारले जात नसावेत असेंच ऐकणारास वाटावें असा कांहीं त्या त्याच्या दृष्टींत विशेष दिसत होता, आणि तो विशेष बळवंतरावाच्या दृष्टीस पडलाही असावा. कारण एकाएकीं त्याची चर्या अगदीं बदलली. त्या म्हाताऱ्याची कींव त्यांचे मनांत उभी राहिली. आणि त्यास खुशाल तसेंच वडबडत उभें राहूं द्यावें, त्यांचे आड कोणी येऊं नये, असें त्यांचे मनास वाटलें असावें. कारण दादासाहेब त्यांस एकसारख्या शिव्या देत असतां ते अगदीं स्तब्धपणें त्या ऐकून घेत होते. गणपतरावास तें सहन न होऊन तो कांहीं तरी बोलणार असें पाहून त्यांनीं त्यास गप्प केलें, व "तूं त्यांच्या डोळ्यांकडे पहा; आपण काय बोलतों आहोंत याचा अर्थ त्यांना समजत नाहीं. दुःखानें ते अगदीं वेडे झाले आहेत. आपण कांहीं तरी बोलून उगीच त्यांच्या त्या दुःखांत भर घालूं नये. अशी त्यांची स्थिति होणें

अगदीं साहजिक आहे, " असें बळवंतराव अगदीं हळूच आपल्या मित्राचे कानांत बोलला.

आपल्या दुःखापेक्षां त्या ह्मातान्याचें दुःख कितीतरी दुःसह असलें पाहिजे असें मनांत येऊन तो बिचारा गृहस्थ आपलें दुःख एका बाजूस सारून त्या ह्मातान्यास कोणत्या प्रकारें शांत करावें याचा विचार करूं लागला. त्या वेळीं त्यानें केलेलें आत्मसंयमन कितीतरी विलक्षण होतें. त्याच्याच स्थितींत असणारा दुसरा एखादा मनुष्य त्या म्हातान्यावर तुटून पडून त्यास तावडतोब आपल्या घरांतून घालवून देऊन मोकळा झाला असता. परंतु ह्मातान्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्यानें आपणास शिव्या देण्यास अगदीं सबळ कारण आहे, असाच विचार करून त्यास कांहीं वेळ तरी बोलूं द्यावें, पहिला त्वेष गेला म्हणजे त्याचें त्यालाच वाईट वाटून तो शांत होईल, असा विचार करून त्यानें गणपतरावाचा हात धरून त्यास आंत नेलें.

आंत अतिशयच दुःखपूर्ण व हृदयद्रावक अशी स्थिति होती हें सांगावयास नकोच. आतांपर्यंत मोठ्या कष्टानें आत्मसंयमन करून आपला शोक आवरून बसलेली कमला आतां अगदीं मुक्तकंठानें शोक करीत होती व सरस्वतीबाई आपल्याकडून जें सुचेल तें बोलून तिचें समाधान करण्याचा यत्न करीत होती. परंतु तें समाधान कसें व्हावें? ज्यावर तिच्या सर्व आयुष्याचा आधार तोच नाहींसा झाला; ज्यावर सर्व सुख अवलंबून त्याची दुष्ट अशी निधनवार्ता कानीं आली. अमृतानें भरलेला पेला आपल्या हातीं आला, असें पाहून होणाऱ्या आनंदाचा अनुभव घेतों न घेतों तोंच एकाएकीं त्याजवर दुष्ट काळानें लाथ मारून तो त्या अमृतासकट उडवून दिला. अशा स्थितींत तिला आतां समाधान तें कोण व कसें देऊं शकणार? या वेळीं तिला उत्तम समाधान ह्मणजे मनसोक्त शोक करूं देणें व अश्रु ढाळूं देणें एवढेंच होतें. परंतु तसें तिला कोण करूं देणार? तिची स्थिति पाहिल्याबरोबर तिच्या बापास काय झालें असेल याची कल्पना प्रत्येक मुलीच्या बापास येणार आहे. दुसऱ्या कोणास येणें शक्य नाहीं. हेंही पत्र खोटें असेल, तूं इतक्यांतच असा धीर सोडूं नकोस, आपण शोध करूं, आतांपर्यंत खोटीनाटीं पत्रें पाठवून लोक तुला छळ करीत आले, त्यांतलाच या पत्राचाही प्रकार असेल. धीराधीरानें सर्व गोष्टींचा विचार करावा. तूं जर असा धीर सोडशील तर आम्हीं काय करावें? अशा प्रकारचें भाषण करून तिचें समाधान मंडळी आपल्याकडून करीत होती. पुनः पुनः तेंच तेंच निरनिराळ्या शब्दांनीं बोलून समाधान झालें तर पहावें, एवढाच त्यांचा हेतु दिसला. परंतु अशा पोकळ भाषणानें तिचें आतां समाधान कसें होणार? शेवटीं तिचा तो शोक आवरून धरण्यास एकच रामबाण असें अस्त्र त्यांच्याजवळ राहिलें. तें अस्त्र योजण्यापलीकडे दुसरा उपाय राहिला नाहीं. "तूं असा अनावर शोक करशील तर तुझी आई अगदीं मृत्यूच्या द्वारीं बसली आहे तिला उद्यांचें मरण आजच आणून दिल्याप्रमाणें होणार आहे. याचा कांहीं विचार कर. अजून तिच्या कानीं हा कांहीं प्रकार घातला नाहीं. तुझ्या अनावर शोकानें तो तिला कळेलच, आणि कळला ह्मणजे तिची

एकदम काय अवस्था होईल तें तूं पहा." अशा अर्थाचें बोलणें प्रभाकराच्या तोंडून बाहेर पडलें मात्र, तो एकदम विजेच्या धक्क्यानें एखाद्यास गप्प करावें त्याप्रमाणें तो गप्प झाला. मरणाच्या दारीं बसलेल्या आईस हा प्रकार जर एकदां समजला तर तिचा प्राण जाण्यास एक पावघटकेचाही अवकाश लागणार नाहीं, हा विचार तिला स्वतःला त्या शोकावस्थेंत आपोआप सुचला नाहीं; परंतु तो दुसऱ्यानें सुचविण्याबरोबर तिच्या मनांत एकदम उतरला. आणि अर्थातच त्या मातृभक्त मुलीनें त्या तशा प्रसंगींही आपला शोक आवरून डोळे वगैरे पुसले. इतकेंच नव्हे तर तितक्यांतल्या तितक्यांत मनांत असाही विचार केला, कीं त्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें भयंकर प्रसंग खरोखरीच आपल्यावर आला असला तरी आतां काय उपयोग? तो टाळणें आपल्या हातचें नाहीं. आलेल्या प्रसंगास तोंड देऊन स्वस्थ बसावें एवढेंच आपल्या हातीं आहे. याप्रमाणें विचार करून ती विचारी मुलगी आपलें मन आवरीत असतां बाहेर वृद्ध दादासाहेबांची एकसारखी बडबड चाललीच होती. कमलेनें आपलें मन किंचित् मात्र स्वस्थ केल्याबरोबर आतांपर्यंत तिला न ऐकूं आलेली ती बडबड तिला ऐकूं आली व कोण एवढ्या मोठ्यानें बोलतें आहे, तें ऐकण्यासाठीं तिनें आपलें लक्ष्य सहजच तिकडे दिलें. तों 'माझा कारटा प्रभाकर यांच्या पायीं मेला,' एवढीं अक्षरें कर्कशवाणीनें उच्चारलेलीं तिच्या कानीं पडलीं! आणि तिला एकदम चमत्कारिक झालें. आपल्या नवऱ्याचें नांव घेऊन तो आपला मुलगा असें म्हणणारा कोण गृहस्थ एवढ्या मोठ्यानें बोलत आहे हें पाहण्याची सहजच तिला इच्छा झाली; व ती इच्छा होतांक्षणींच मागें पुढें न पाहातां ती एकदम बसल्या जागेची उठून धांवत बाहेर गेली, आणि पहाते तों आपल्या आईस औषध देण्यासाठीं आलेला वृद्ध गृहस्थच तेथें उभा आहे. त्यास पहाण्याबरोबर तिची चित्तवृत्ति कांहीं चमत्कारिक झाली व ती तटस्थ होऊन तेथें उभी राहिली. तिच्या मनावर काय परिणाम झाला, हें सांगणें मोठें कठिण. परंतु तिला पाहिल्यानें त्या वृद्ध गृहस्थाच्या मनावर मात्र विलक्षण परिणाम झाला असावा. इतका कीं, तो परिणाम होण्याबरोबर त्यास मूर्च्छा आल्याप्रमाणें होऊन तो एकदम निश्चेष्ट खालीं पडला.

---

# प्रकरण ५४ वें.

## मातृविरह.



म्हाताऱ्यास शुद्धीवर आणण्याकरितां काय उपाय योजावे, हेंच कोणास समजेना. तो मूर्च्छा येऊन खालीं जमिनीवर पडण्याबरोबर केवळ नैसर्गिक स्फूर्तीनेंच कमला त्याच्याजवळ गेली, आणि तिनें त्याच्या डोळ्यास पाणी लाविलें. हा वृद्ध गृहस्थ आपला सासरा हें तिला समजतांच, जणूं काय त्याजविषयींची तिची भक्ति एकदम शतगुणित झाली. तिनें आपल्याला सुचले ते सर्व उपाय करून त्यास शुद्धीवर आणण्याचे प्रयत्न केले. परंतु कितीवेळ झाला. तरी म्हातारा शुद्धीवर येण्याचा रंग दिसेना. अशा विलक्षण स्थितींत करावें तरी काय हें कोणासच सुचेना. इतकेंच नव्हे, तर याची अशी अशी स्थिति झाली आहे, हें आपल्या शेजारच्या गृहस्थांस—ज्यांच्या घरीं दादासाहेब उतरले होते त्यांस—आतां जाऊन सांगावें हें सुद्धां कोणास सुचलें नाहीं. परंतु थोड्याच वेळांत तें सुचलें. बळवंतराव लागलीच उठले आणि त्यांनीं अण्णासाहेबांकडे जाऊन सर्व प्रकार सांगितला. तो ऐकून त्यांचें काळिज चर्र झालें. पण तो पुरुष धिमा, तेथल्या तेथें अधिक कांहीं न बोलतां बळवंतरावांबरोबर त्यांच्या बंगल्यांत गेला.

कमलेनें या वेळीं विलक्षण धीटपणा दाखविला. तिनें गणपतरावांची मदत घेऊन दादासाहेबांस एका कोंचावर ठेविलें. आणि जे जे म्हणून कांहीं उपाय सुचतील ते सर्व ती करून पहात होती. थोड्याच वेळांत अण्णासाहेब आले व त्यांनी दादासाहेबांस पाहून आणि सर्व गोष्टींचा विचार करून तेथून त्यांस आपल्या बंगल्यांत नेण्याची व्यवस्था केली. अर्थातच शोकग्रस्त चित्ताला व्यग्र करणारें तें अकस्मात्पणें आलेलें कारण दूर होतांच कमलेचा शोक पहिल्यापेक्षांही दुप्पट, चौपट, नव्हे शतपट वेगानें जागृत झाला. तिला सर्व जग पुनः शून्यवत् भासूं लागलें. आतां आपल्या दुर्दैवानें आपल्यास दुःख देण्याची पराकाष्ठा केली, असें वाटून ती अगदीं तटस्थ बसली. परंतु तेवढ्यानेंच तिच्या दुःखाचा कळस होणार नव्हता. त्याच दिवशीं आणखी एक दुःख, परम दुःख तिच्या कपाळीं लिहिलेलें होतें. तें दुःख केव्हांना केव्हां तरी येऊन तिला निराशेंत बुडविणार होतेंच. आज कित्येक दिवस त्या दुःखाला तिचें मन तयार होतच होतें. परंतु दुर्दैवाच्या मनांतून तिच्या धैर्याची जणूं काय पक्की कसोटी पहावयाची होती. यापूर्वीं तें दुःख तिजवर आलें असतें, तर कदाचित् त्याची तीक्ष्णता तिला इतकी भासली नसती, असा विचार करूनच काय दुर्दैवानें ते दिवशीं तिजवर तें दुःख कोसळविलें. आज कित्येक दिवसपर्यंत

द्वारकानाद्द आपल्या प्रेमळ पत्नीस व प्रियतम अपत्यांस आज सोडून जाणार. कीं उद्यां सोडून जाणार, अशी स्थिति चाललेली होती. ज्या दिवसाची व त्याच्या आदल्या दिवसाची हकीकत वाचकांस सांगितली जात आहे, त्या दोन दिवसांतच तिच्या प्रकृतीसंबंधीं काय प्रकार झाला हें वाचकांस कळलेंच आहे. कित्येक वेळां तिचे प्राण जणूं काय तिच्या कुडीस सोडून गेले व कित्येक वेळां ते परत आले, जणूं काय कांहीं एका बाबतींत राहिलेली शंका पूर्णपणें दूर होईपर्यंत—मग ती इष्ट वार्ता करून किंवा अनिष्टवार्ता करून दूर होवो. पण ती दूर होईपर्यंत—ही कुडी सोडून जावयाचें नाहीं, असा तिच्या प्राणांनीं निश्चयच केला असावा, असें दिसलें. वर सांगितलेली दादासाहेबांची हकीकत घडल्यानंतर सुमारें प्रहर दीड प्रहरपर्यंत कमला आपल्याशींच शोक करीत बसली. तिला स्वस्थ एकांतांत बसूं द्यावें यांतच या वेळीं शहाणपणा आहे, नुसतें समाधानाचें भाषण कितीही केलें तरी तिचा शोक दूर होणार नाहीं; प्रज्वलित अग्नीप्रमाणें कांहीं शोकाग्नि असेच असतात, कीं त्यांचें शमन करूं जाणें म्हणजे त्यांच्या प्रज्वलनास अधिक साहाय्य करणेंच होय; त्यांचें स्वाभाविकरीत्या जेव्हां शमन होईल तेव्हां होऊं द्यावें, हाच त्यांच्या शमनास उत्तम उपाय होय, असा विचार करून बळवंतरावांनीं तिचें समाधान करण्याचा प्रयत्न केला नाहीं, इतकेंच नव्हे, तर दुसऱ्या कोणास करूंही दिला नाहीं. तसे प्रयत्न समाधान करण्यापेक्षां क्षोभ करण्यासच अधिक कारण होतात ही त्यांची पक्की समजूत !

होतां होतां रात्र झाली. कमला बसल्या जागची अगदीं उठली नाहीं. आणि तिला ऊठ असें कोणी जाऊन म्हटलेंही नाहीं. मध्यरात्रीच्या सुमारास ती आपण होऊनच उठली. आपल्या आईची काय स्थिति झाली असेल, ती शुद्धीवर आली असतां तिनें कोणास कांहीं विचारलें असेल काय, झालेला प्रकार तिला कळला असेल काय. कळला असला तर तिची काय अवस्था झाली असेल इत्यादि विचार तिच्या मनांत येऊं लागले. जर कळला असेल तर तिच्या मनाची काय अवस्था झाली असेल असाही प्रश्न तिच्या मनांत उभा राहिला. व आपण एकवार तिच्याजवळ जावें. असा विचार करून ती नाचडतांच उठली. घरांत जिकडे तिकडे शांतता होती. सर्व मंडळी निजली होती असें नव्हे; त्या रात्रीं त्या घरांत असणाऱ्या एकाही व्यक्तीस झोंप येणें शक्यच नव्हतें. दुपारपासून जें माणूस जेथें बसलें होतें, तें तेथल्या तेथेंच स्वस्थ बसलें होतें; फार तर तेथून उठून कोठें तरी जाऊन पडलें होतें. परंतु निद्रासुखाचा अनुभव कोणासही मिळत असेल हें शक्यच नव्हे. दुसरी मंडळी स्वस्थ पडली असेल, त्यांना आपल्या चळवळीनें त्रास होऊं नये, हाच विचार ज्याच्या त्याच्या मनांत येऊन जी ती व्यक्ति आपल्या ठिकाणीं चूर होऊन पडलेली असावी. यामुळें जिकडे तिकडे शांत होतें. वर सांगितल्याप्रमाणें कमला आपल्या जागची उठली. आपल्या आसन्नमरण मातेचें दर्शन घेतल्याखेरीज तिच्यानें आतां राहवेना. अगदीं मंद अशीं पावलें टाकीत ती आपल्या आईच्या खोलीकडे गेली. दार उघडून आंत शिरण्यापूर्वीं तिनें एक-

दार कानोसा घेतला. सब कांहीं शांत होतें. तिनें हलकेंच दार उघडलें. आंत डोकावून पाहिलें. नेहमींप्रमाणें दिवा बारीक केलेला होता, व ज्या ठिकाणीं ती स्वतः निजत असे, त्या ठिकाणीं आज सरस्वतीबाई बसल्याबसल्याच कंटाळून पेंग आल्याकारणानें उशीवर डोकें टेकून पडली होती. तिचें मूल तिच्याजवळ नव्हतें. तें कदाचित् मधेंच उठून रडावयास लागून आपल्या मैत्रिणीस त्रास देईल, म्हणून तिनें गणपतरावाजवळ दिलें असावें. कमलेनें हळूच दार ढकललें व मुळींसुद्धां पाऊल वाजूं न देतां ती आपल्या आईच्या पलंगापाशीं गेली. एकवार तिनें आपल्या आईच्या निस्तेज मुखाकडे न्याहाळून पाहिलें आणि तिला एकदम पुनः रडें कोसळून आलें. आपल्याकडून जितका यत्न करावयाचा तितका यत्न करून तिनें हुंदके तर दाबलेच. हूं कीं चूं सुद्धां मुखावाटे बाहेर पडूं दिलें नाहीं. एक विलक्षण विचार तिच्या मनांत त्या वेळीं आला. जिला सर्वतोपरी सुख आहे, सुखास लागणाऱ्या साधनांपैकीं एकही साधन उणें नाहीं, त्या आपल्या अत्यंत सद्गुणी, परोपकारी, सदाचारसंपन्न, शुद्ध व पवित्र मातेला अकालीं मरण काय ह्मणून यावें? त्यापेक्षां दुर्दैवानें चोहोंकडून गांजलेल्या व आपल्या एकट्याच्याच नव्हे तर आपल्याशीं ज्याचा ज्याचा ह्मणून संबंध आहे त्यास त्यास अत्यंत दुःख देण्याला कारण होणाऱ्या आपणा स्वतःला मरण कां येत नाहीं? तें आलें तर कितीतरी माणसांना संतोष होणार आहे! आपल्या प्रेमळ आईला व बापाला थोड्या वेळापुरतें काय दुःख होईल तेवढेंच. परंतु आतां यापुढें मला पाहून त्यांना क्षणोक्षणीं दुःख होणार. तें टाळण्यास आपल्याला मृत्यु आला तर बरें! आई मात्र वांचावी. दुसऱ्याचें मरण आपणास घेतां येऊन आपलें आयुष्य त्यास देतां येतें, तर किती चांगलें झालें असतें! ज्याचा मुळींच या जगांत उपयोग नाहीं किंवा उपयोग तर लांबच राहिला पण ज्याच्यापासून दुसऱ्यास अतिशय त्रास मात्र होतो, जो स्वतः आपल्या जीवितास पूर्णपणें कंटाळला असेल, त्यास आपलें उरलेलें आयुष्य दुसऱ्याला देतां आलें तर कितीतरी चांगलें होणार आहे! मनुष्यमात्रास आज नाहीं उद्यां आपल्यास बरे दिवस दिसतील, आज दुःख असलें तरी उद्यां सुख प्राप्त होइल, अशी आशाच केवळ जगवीत असते. परंतु ज्याला सुखाची आशा करण्याला, बरे दिवस येतील अशी धुगधुगी धरण्याला मुळींसुद्धां कारण नाहीं, त्याला जगण्याची इच्छा कोठून रहावी! आणि कां रहावी! मला आतां सुखाची आशा करण्याला अणुरेणुएवढें कारण राहिलें नाहीं. उलट मी जर गेलें तर पुष्कळांना संतोष वाटेल.

हे विचार कमलेच्या मनांत येत असतां तिची अश्रुपूर्ण दृष्टि तिच्या आसन्नमरण मातेच्या मुखाकडे लागलेली होती. दिवा अतिशय मंद होता. त्याची ज्योत द्वारकाताईच्या मुखाप्रमाणेंच अगदीं निस्तेज दिसत होती. दिव्याचा सभोंवतालीं दोन तीन हातांपलीकडे प्रकाश जाऊं शकत नव्हता. यामुळें सभोंवतालचा प्रदेश शोकग्रस्त मनुष्याच्या मनाप्रमाणें अगदीं अंधकारव्याप्त दिसत होता. अशा क्षीण प्रकाशानें स्पष्ट केलेल्या अंधकारांत कोणाही व्यक्तीचें मन उत्साह धारण करण्यास असमर्थच व्हावयाचें. उलट असलेला उत्साह नष्ट व्हावयाचा. मग एकीकडे

मरणाच्या द्वारीं बसलेलें आपलें अत्यंत जिव्हाळ्याचें माणूस पडलें आहे, दुसरें तसेंच माणूस मृत्यूनें नेल्याची दुष्टवार्ता कानीं येऊन विव्हल चित्त झालें आहे, अशा प्रसंगीं कोणाची काय स्थिति व्हावी ? कमलेनें आपल्याकडून विलक्षण प्रयत्न करून हुंदके तर दाबलेच, परंतु अश्रु तिच्यानें मुळींच दाबले जाईनात. थोड्या वेळेपूर्वी सांगितलेले सर्व विचार वारंवार तिच्या मनांत येऊन तिचा शोकवेग तिला दुःसह झाला व त्यायोगानें तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू होऊन पांचपंचवीस बिंदु तिच्या आईच्या गालावर पडले.

द्वारकाताई झोंपेंत होती असेंही नाहीं, किंवा पूर्णपणें जागृत होती, असेंही नाहीं. ती जणूं काय अर्धवट इहलोकीं व अर्धवट स्वर्गलोकीं होती. कमलेचे अश्रुबिंदु तिच्या गालावर पडण्याबरोबर जणूं काय रज्जु बांधून खेंचून आणल्याप्रमाणेंच तिचें चित्त आणि तिचे प्राण इतका वेळ दुसऱ्या कोठें तरी गेले होते, ते त्यांनीं एकदम परत आणले. त्या अश्रुबिंदूंनीं द्वारकाताई जागृत झाली. पूर्णपणें मिटलेले आपले नेत्र उघडून पहाण्याचा तिनें प्रयत्न केला; परंतु ते पूर्णपणें उघडलेच जाईनात. आपल्याजवळ कोण आहे याचें तिला ज्ञान झालेलें दिसलें नाहीं. जणूं काय बऱ्याच वेळानें पुनः कांहीं गोष्टींची स्मृति झाल्याप्रमाणें तिला होऊन ती एकदम ताठ डोळे उघडून आपल्या लेकीकडे ती कोण आहे, हें न समजतांच चमत्कारिक तऱ्हेनें पाहून म्हणते: " काय हो, जांवईबुवांचा कांहीं पत्ता लागला काय ! कुठला लागणार ! कोणी तपासच करीत नाहीं, मग पत्ता कुठला लागणार ! "

तो प्रश्न ऐकतांक्षणींच कमलेची किती विलक्षण स्थिति झाली ! जे हुंदके आतांपर्यंत तिनें अगदीं आवरून धरले होते, ते हुंदके एकदम बाहेर पडले, व ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. त्या तिच्या हुंदक्यांनीं आणि रडण्यानें द्वारकाताई जणूं काय अधिकच जागृत झाली. आतां तिनें आपल्या मुलीस ओळखलें, आणि " तूं कां रडतेस ! कमळे, अधिक का कांहीं बातमी लागली आहे ! " असें तिनें तिला अत्यंत कळवळ्यानें विचारलें.

या प्रश्नानें तर सर्व तऱ्हांनीं परमावधिच झाली, व आपण काय बोलतों, कोणाजवळ बालतों याचें मुळींच भान न राहून कमलेच्या तोंडून एकदम पुढील उद्गार बाहेर पडले:—" आई, आतां कसची बातमी ! जी यायची ती येऊन चुकली ! "

यावर द्वारकाताईच्या तोंडून 'काय !' एवढाच उद्गार निघाला. परंतु तो उद्गार जणूं काय तिचें तें क्षीण अंतःकरण समूळ उपटून बरोबर घेऊनच बाहेर पडला. इतकेंच नव्हे तर पंचप्राणच घेऊन बाहेर पडला. असें कमलेस वाटण्याजोगी तिची स्थिति झाली. अर्थातच कमला अतिशय घाबरली व 'आई, आई,' करून ती मोठ्यानें आपल्या आईस हांका मारूं लागली. त्या तिच्या घाबऱ्या घाबऱ्या मारलेल्या हांकांनीं इतका वेळ जागी न झालेली सरस्वतीबाई जागी झाली व द्वारकाताईच्या बिछान्याजवळ आली. तों द्वारकाताई पूर्वी दोन तीन वेळां पडल्याप्रमाणें निचेष्ट पडली आहे, तिला कांहीं सुद्धां शुद्धि नसावी, असें स्पष्ट दिसत होतें. अशा स्थितींत त्या दोघींच्या मनाची स्थिति काय बरें झाली असेल ! सरस्वतीबाई घाबऱ्या घाबऱ्या बाहेर गेली व तिनें आपल्या नवऱ्यास व बळवंतरावांस

मोठ्यानें हांका मारिल्या. ते दोघेही झटकन् उठून आले व पुनः द्वारकाबाईच्या सभोंवतालीं सर्व मंडळी जमली. पुनः तिला शुद्धीवर आणण्यासाठीं जे काय उपाय करावयाचे ते सर्व उपाय चालविले. पुढें थोड्याच वेळांत ते उपाय अखेरीस सोडून देऊन दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसण्यापलीकडे आतां आपल्या हातीं कांहींही नाहीं, असें वाटून मंडळी निराशही झाली. अतिशय मंद अशा प्रकारें श्वास चालला होता, एवढ्यावरूनच अत्यंत सूक्ष्म व दुर्बल अशा आशातंतूवर आपला सर्व भार टाकून मस्तकाला हात लावून कमला आपल्या आईच्या उशाशीं बसली. इतक्यांत द्वारकाबाईचे ओंठ हलताहेत असा तिला भास झाला, व म्हणून तिच्या ओंठांशीं तिनें कान लाविला. तों आपली आई आपलें नांव घेत आहे असें तिला कळलें. नुसतें ओंठांतल्या ओंठांत नांव घेतलें जात होतें, तें आतां अधिक स्पष्ट होऊन सर्वांस ऐकूं येऊं लागलें. शेवटीं तिनें डोळेही उघडले व सभोंवार एक वेळां पाहून कमलेचा हात घट्ट धरला, व मोठ्यानें ह्मणत, "कमळे, मी तर आतां जातेंच, पण गोप्याला तूं संभाळ. शेवटीं तुझें कल्याण होणार आहे. हा माझा नुसता आशीर्वाद नाहीं, तसें तें होणारच आहे." असें म्हणून पुनः एकवार तिनें सर्वांकडे पाहिलें, व नंतर कससेंच डोळे करून व नमस्कार केल्याप्रमाणें हात करून इहलोक सोडला!

बराच वेळपर्यंत मंडळींस त्याबद्दल खात्री वाटली नाहीं. आतांपर्यंत पांच चार वेळां झालें त्याप्रमाणेंच पुनः कदाचित् ती शुद्धीवर येईल अशी आशा वाटत होती; परंतु थोड्याच वेळांत त्या आशेची पूर्ण निराशा झाली. बिचाऱ्या कमलेवर सर्व आकाश कोसळलें. तिला दशदिशा अंधकारमय झाल्या. आजपर्यंत सर्व जग तिला मातृमय होतें. कसेंही संकट आलें, तरी आईनें दोन समाधानपर शब्द उच्चारल्याबरोबर तिला तें संकट अगदीं हलकें वाटत असे. त्या संकटाबद्दल आपण विशेष दुःख करीत बसल्यास आपल्या आईला विनाकारण दुःख होऊन तिची प्रकृति अधिक बिघडेल, किंबहुना आपणच व आपलें दुर्दैवच तिचें मरण लवकर होण्यास कारण होईल, अशी भीति तिला वारंवार वाटून ती आपलें सर्व दुःख आजपर्यंत होईल तितकें करून गिळून घेत असे; परंतु आतां तें दुःख गिळून बसण्याचें कारण अगदीं नाहींसें झालें. आतां कोणाकरितां आपला शोक आवरावयाचा? आपला सर्व आधार तुटला. समाधानाचें स्थान नाहींसें झालें. एकंदरींत आपल्या सर्व जन्माचा पुरा सत्यनाश झाला, असें वाटून कमलेनें पाषाणाचेंही हृदय भेदून टाकील अशी किंकाळी फोडली!

# प्रकरण ५५ वें.

## बिंदुमाधव पांडे.



मुंबईस आल्यापासून काकासाहेब बिंदु-माधव पांड्यांच्या शौण्डीरशालेंत रोज निदान एक दिवसा-आड तरी खेप घाला-वयाचेच. केव्हां पांडे त्यांस भेटत, केव्हां ते शालेंत नसत. दुस-रीकडे कोठें आपला वैद्यकाचा धंदा चाल-विण्यास बाहेर जात असत. परंतु काका-साहेबांस तेथल्या औषधींच्या वासानेंच जणूं काय समाधान होत असे. बिंदु-माधव तेथें असले म्हणजे त्यांच्या औष-धींच्या गुणांवर वगैरे अनेक तऱ्हेची बोलणीं निघत. काकासाहेब प्रथम जेव्हां या खेपेस त्यांच्याकडे येऊं लागले, तेव्हां एके दिवशीं बिंदुमाधवांनीं सहज त्यांज-पाशीं अशी गोष्ट काढली कीं, " आपण औषधं वगैरे तयार करतों, यांत कांहींच नाहीं. या औषधांत काय मिळणार आणि काय होणार? आपला खरा भर निराळ्याच गोष्टीवर आहे. त्यामुळें आपणास जसे पैसे मिळतात, तसे दुसऱ्या कशानें कधींच कोणाला मिळायचे नाहींत. पण आज-पर्यंत आपण सर्व कांहीं लहान प्रमाणावर केलें, तें आतां मोठ्या थोरल्या प्रमाणा-वर करावं, असा विचार आहे. कोणी तसा भागीदार मिळाला, तर एका वर्ष-सहा महिन्यांत त्याचं व आपलं असं जन्माचं सार्थक करून घेईन, कीं पुनः म्हणून कांहीं धंदा करण्याची जरूरीच राहणार नाहीं. "

तें ऐकतांच दादासाहेबांच्या तोंडाला पाणी सुटलेंसं दिसलें आणि ते बिंदुमाधवास तो काय धंदा आहे, हें खोदखोदून विचारूं लागले. बिंदुमाधवानें त्यांस म्हटलें: " तु-म्हांला सांगण्यांत काय अर्थ आहे? ज्याला त्या कामांत पाणी ठेवावेंसं वाटेल, त्याला सांगण्यांत कांहीं तरी अर्थ. तुम्ही आपले विचारून घेऊन नुसता त्या गोष्टीचा बभ्रा मात्र कराणार. दुसरं काय तुमच्या हातून होणार आहे! लाख चार लाख एकदम मिळ-वून स्वस्थ बसण्याचीं कामं पारशी, भाट्ये, खोजे यांनीच करावीं. मला कांहीं भांडवल फार नको आहे. आंत घातलेल्या भांडव-लाची दामदुप्पट तर काय पण साधलं तर दाम दसपट सहा महिन्यांच्या आंत ठेव-लेला! पण त्याला आपले हे दक्षिणी ब्राह्मण कधीं राजी व्हायचे नाहींत. त्यांना आपलं त्यांतल्या त्यांत टोलीची दमडी करीत बसण्यांत मौज वाटते. "

पांड्याचें हें भाषण ऐकल्यावर तर काकासाहेबांस विशेष ईर्षा आल्याप्रमाणें दिसलें आणि ते एकदम बिंदुमाधवांस म्हणतात, " तुम्ही अगदीं उडवूनच दिलंत. पण आम्ही त्यांत पडण्याला मुळींच मागपुढं पाहणार नाहीं. अहो, अलीकडे लोक फसवाफसवी करूं लागले, म्हणून

आमच्यासारखे लोक अशा कामांत पडतानासे झाले. आतां तुमची आमची चांगली ओळख झाली. आणखी तुमची माहितीही झाली. तेव्हां आतां कांहीं व्यवहार करण्याला हरकत नाहीं. आपण मला सांगा काय धंदा तो. मी खरोखर त्यांत पडेन." काकासाहेब याप्रमाणें म्हणाले. परंतु पांड्यांनीं आपली अनुमति तावडतोब दिली नाहीं. "पाहूं, सांगूं," असें करून चाळवण्या चालविल्या आणि त्यांच्या चाळवण्या जसजशा सुरू झाल्या तसतशी काकासाहेबांची त्यासंबंधाची उत्सुकता अधिकाधिक वाढत चालली. काकासाहेबांची उत्सुकता जसजशी वाढत चालली, तसतशी पांड्यांची त्यांच्याशीं व्यवहार करण्याची अनिच्छाही अधिकाधिक जोगवली. ते आतां त्यांस दोन दोन दिवस भेटेनासे झाले. अर्थात् काकासाहेब त्यांची गांठ पडावी ह्मणून अधिकाधिक खटपट करूं लागले. कित्येक वेळां तर ते पांड्यांच्या गांठीसाठीं दिवसांतून दोन दोन वेळां त्यांच्या "विरुग्णतापपरिहारशौण्डीरशालें" त येऊं लागले. त्यांस पांड्यांच्या मनांतला धंदा काय असावा, याबद्दल कांहीं शंका आली आणि ती शंका येण्याबरोबर तर त्यांची उत्सुकता फारच वाढली. हिमाचलांतील अनेक वनस्पतींच्या रसांच्या योगानें असलीं रामबाण औषधें तयार करताहेत, तर यांच्याजवळ तीही पण विद्या—जिच्याबद्दल काकासाहेबांनीं तर्क केला ती—यांना येत असावी, असा त्यांचा पक्का समज झाला आणि जों जों वेळ जाऊं लागला, तों तों तो आपला तर्क अगदीं खरा, अशी त्यांच्या मनाची पक्की खात्री झाली. आपण जर यांत पडलों तर खरोखर एकदम कितीं तरी श्रीमंत होऊं, तेव्हां आपण आतां बिंदुमाधवांची पाठ पुरवून त्यांचेकडून आपलें कार्य करून घेऊंच घेऊं, असा त्यांनीं दृढनिश्चय केला.

जे दिवशीं त्यांनीं हा निश्चय केला, ते दिवशीं बिंदुमाधव त्यांस भेटले नाहींत. ह्मणून त्यांनीं दुसरे दिवशीं अगदीं प्रातःकालींच शाळेंत येऊन बसून राहिलीं आणि बिंदुमाधव येण्याचा अवकाश, त्यांनीं त्यांस एकदम एके बाजूस नेऊन ह्मटलें, "अहो बिंदुमाधव, आम्हीं तुमच्या मनांतला उद्योग काय तें बरोबर ताडलें. आतां आमच्यापासून अगदीं लपवूं नका. तुह्मांला लागणारें भांडवल माझ्याकडे लागलें. अगदीं अनमान करूं नका. आणखी नसत्या शंका काढून उगीच टाळाटाळी करूं नका. तुमच्या औषधांनीं माझी खात्री झाली आहे, कीं तुम्ही या विद्येंत अगदीं खरे निपुण आहां. आणखी तुम्हांला ती दुसरी विद्याही पण अगदीं पूर्णपणें अवगत असली पाहिजे. चला, सांगा आतां, तुम्हांला किमया करण्याकरितांच कोणी तरी भांडवल घालणारा पाहिजे आहे कीं नाहीं? तुह्मांला किमया साधते आहे, याबद्दल मला मुळींसुद्धां संशय नाहीं."

तें एकतांच बिंदुमाधव एकदम त्यांच्याकडे अगदीं तिरस्काराची मुद्रा करून ह्मणतात, "खाशी, काकासाहेब, मग आम्हांला साफ लुच्चे म्हणतात? अहो किमया ही खरी विद्या आहे, असं का तुह्मांला वाटतं? आपल्याला किमया वगैरे कांहीं मुद्दां थोतांड येत नाहीं हो! भलतंच कांहीं तरी घोंगडं आमच्या गळ्यांत अडकवायला पाहूं नका." बिंदुमाधवानें हें सर्व अशा तऱ्हेनें ह्मटलें कीं, त्यापासून

काकासाहेबांचें मन किमयेविषयीं जास्त दृढच व्हावें. बिंदुमाधव असें बोलतो आहे, नाहीं म्हणतो आहे, उडवाउडवी करतो आहे; परंतु खरोखर त्याला किमया येते आहे असेंच त्यांना वाटलें आणि असें वाटावें हाच हेतु बिंदुमाधव पांड्यांच्या मनांत होता, हें त्यांच्या चेहऱ्यावरून सहज समजण्याजोगें होतें. अर्थातच काकासाहेबांनीं त्यांस पुनः ह्मटलें, "अहो बिंदुमाधव, तुमच्या अशा बहाण्यांनीं मी फसणार नाहीं. आणखी मला फसविण्याच्या भानगडींत पडून तुम्ही विनाकारण वेळ व्यर्थ घालवूं नका. तुम्हांला ती विद्या अवगत आहे त्याबद्दल आतां मला कांहीं शंका नाहीं. आणखी एकदां नाहीं असं तुम्ही जरी म्हटलंत, तरी मी तुम्हांला त्रास दिल्याखेरीज कांहीं सोडायचा नाहीं. शिवाय मी आपण होऊन जर तुम्हांला भांडवल वगैरे द्यायला तयार आहें, तर तुम्ही तरी विनाकारण कां म्हणून संधि वायां घालविता ? "

काकासाहेबांनीं अशाच तऱ्हेचीं आणखी जोराचीं भाषणें करून आपला त्या कामासाठीं वाटेल तितका पैसा खर्च करण्याचा निश्चय त्यांचेपुढें मांडला.

फसवून, भुलवून भुलथापा देऊन जाळ्यांत सांपडलेल्या सावजाकडे पाहून आतां हें अगदीं आपल्या तावडींत सांपडलें, त्याला आतां सुटून जाणें शक्य नाहीं, असें वाटून पारधी जसा त्याला आपल्यापुढें आणतो व कौतुकानें त्याचेकडे पाहतो, तसेंच बिंदुमाधव पांड्यानें नानासाहेबांकडे कांहीं खेद, कांहीं आश्चर्य, कांहीं संतोष, कांहीं तिरस्कार इत्यादि अनेक विकारांनीं मिश्रित अशा दृष्टीनें पाहिलें व नंतर म्हटलें, "नानासाहेब, तुम्ही म्हणतां आहां, पण पहा बरं पुढें मागें तुह्मांला या गोष्टीचा पश्चात्ताप होईल. माझ्या मनांत जो उद्योग आहे, तो किमयेचाच आहे. पण मी सहसा कोणाजवळ त्याजबद्दल बोलत नाहीं, कारण आजकाल भरंवसा व श्रद्धा ठेवून तो उद्योग करणारे फार थोडे, पैशाचे लोभीच लोक फार. त्यांतून किमया म्हणजे भट्टी आहे. जशा इतर भट्ट्या बिघडण्याचा संभव तशी ही बिघडण्याचा संभव आहेच. माझी आजपर्यंत कधीं बिघडली नाहीं, ही गोष्ट खरी. अगदीं कधींसुद्धां बिघडली नाहीं, पण मीं मोठ्या प्रमाणावर कधीं अजून केलीच नाहीं. दहा तोळे ह्मणजे शिकस्त झाली. आतां करायची ती दर मुशींत कमींत कमी पंचवीस पंचवीस शेरांची करणार. त्याची सामग्री सगळी आगाऊ खर्च करून तयार केली पाहिजे. तो खर्च बराच लागतो, यामुळें मी जरा अनमान करतों आहें. अहो, एकदां भट्टी बनायलाच कायतो दहा बारा हजारांचा खर्च. पण भट्टी बनली, कीं दोन दिवसांत दहा हजार काय पण पंचवीस हजारसुद्धां उत्पन्न होतील. माझ्या हातांत इतके पैसे येतात, नाहीं असं नाहीं, पण ते पैसे माझे नाहींत. गुरुजींच्या आज्ञेवांचून एका दीडकीलासुद्धां मी हात लावणार नाहीं. प्रामाणिकपणानं आणखी सत्यनिष्ठेनं वागलं, तरच या असल्या सिद्धि प्राप्त होतात. मनानं जरी सत्यनिष्ठा सुटली आणखी कोणाचा विश्वासघात केला तरी तो सर्वस्वी घात करतो. असल्या विद्या मग कधीं सुद्धां कोणाला सिद्धिप्रद होत नाहींत आणि तशा त्या झाल्या नाहींत, म्हणजे मग त्या विद्याच खोट्या, ठकबाजीच्या, असें म्हणून जो तो त्या विद्यांनाच नांवें ठेवतो ! तेव्हां याचा तुह्मी विचार करा.

मीं आजपर्यंत गुरुजींशीं कधीं प्रतारणा केली नाहीं, असत्य कसं तें मला स्वप्नांतसुद्धां ठाऊक नाहीं, ह्मणूनच माझ्या सर्व विद्या अजून सिद्ध आहेत. गुरुजी इथें नाहींत. कधीं येतील तें ठाऊक नाहीं. रोज पांचचार-शांची घडामोड हातून चालली आहे. जर मीं कोणत्या कामाला एक दहा पांच हजार रुपये लावले, तर गुरुजी मला कांहीं ह्मणतील असं नाहीं; पण त्यांना विचारल्यावांचून कांहीं केलं, कीं सगळं बुडालंच. मग एक रसायण सिद्ध व्हायचं नाहीं, कीं एक भस्म गुणकारी होणार नाहीं. किमयेसारख्या श्रेष्ठ विद्यांचा तर सर्व घात झाला म्हणून समजा. आज माझ्या अंगावर दिसणारं तेज त्या निष्पापी-पणाचं, आणखी त्याच्यामुळे अगदीं जाज्वल्य राहिलेल्या विद्यांचं आहे, हें आपण जाणतांच आहां. तें एकदां तेज गेलं कीं मग काय होणार! मग काळ्या कोळशाचा रंग येईलना मला, आणखी सगळ्या त्या विद्यांचे कोळसेच बनतील. सांगा, सांगा, काकासाहेब, मीं तुम्हांला म्हणतों हें खरं का खोटं! आतां तुम्ही ह्मणतां आहां तर ठीक आहे, माझ्याकडून मुळींच हरकत नाहीं. पण सर्व गोष्टी सरळ-पणानं आपल्याला सांगितलेल्या असल्या ह्मणजे मग उगीच कोणी कोणाला नांवं ठेवायला आणखी दोष द्यायला कारण नाहीं. कसं? मी ह्मणतों तें बरोबर आहेना? तुम्हीं आतां इतका सगळा आग्रह केलात, आतां तुह्मांला स्पष्ट सांगतों. होय. मला किमयेची चांगली माहिती आहे. मी तांब्याचं सोनं करूं शकतों. कथलाचं रुपं करतों. आणखी तुम्हांला सांगतों, कांचेचीं उत्तम प्रकारचीं हिरेमाणकं करतों. हिरेमाणकांचं हें सध्या राहूं द्या, पण सोनं तुह्मांला अगदीं उत्तम बावन्नकशी ऐसं देतों कीं आपण तोंडांत बोटच घालाल. मीं परवांचं सोनं करून आज बाजारांत पाठविलं आहे. आतां माझा तो स्नेही सोन्याचा काय भाव लागतो तो सांगेल. त्याच्या सांगण्याची आपल्याला कांहीं जरूर नाहीं ह्मणा. त्याची किंमत बाजारांत जर बरोबर नाहीं लागली, तर बाजारच्या लोकांना अक्कल नाहीं असं समजेन. पण तसं व्हायचंच नाहीं. त्या सोन्याचा दर आजमितीला बत्तीसप्रमाणं लागलाच पाहिजे......"

बिंदुमाधव पांडे याप्रमाणें आपल्या सोन्याच्या गप्पा मारताहेत, तों एक बूट, विजार व कोट घातलेले, वाचकांच्या ओळखीचे गृहस्थ धडधड बूट हापटीत वर आंत आले आणि एकदम बिंदुमाधव पांड्यांस ह्मणतात: " राजाराम—नव्हे बिंदु माधव. सगळ्या दलाल स्ट्रीटमध्यें सगळी कडे हिंडून, सगळ्या ब्यांकांतूनही तुझा बार नेऊन दाखवून आणली. बत्तीस आणखी साडेबत्तीस यांच्या दरम्यान भाव लागतो. या सोन्यांत ह्मणजे कांहीं निराळा प्रकार असेल, असा एखाद्यालासुद्धां संशय आला नाहीं. शाबास आहे बोआ तुझी. आतां आपण सोन्याचीं घरं बांधणार, यांत शंका नाहीं. पण मोठ्या स्केलवर करायला तुला भांडवल पाहिजे तें कुठून आणणार?..."

इतकें बोलून त्या गृहस्थानें चटकन्, जणूं काय सहज अशा रीतीनेंच काका-साहेबांकडे पाहिलें आणि लागलीच जीभ चावून ह्मटलें, "अरे, मला अगदींच बोलण्याचा सुमार राहत नाहीं बोआ! दुसरं कोणी इथें आहे, ही कल्पनाच मला आली नाहीं. आतां!"

बिंदुमाधव त्यास लगेच म्हणतो, "कांहीं हरकत नाहीं; पण तूं पुनः असं उताव-ळ्यासारखं बोलत जाऊं नको. यांच्या देखत बोललास तर आतां कांहीं हरकत नाहीं. त्यांच्यापासून मी हें लपवून ठेवा-यला पहात होतों, पण हे फार दूरदर्शी, आणखी धूर्त. त्यांनीं तेव्हांच तें सगळं ताडलं. आतां कांहीं हरकत नाहीं. ते उलट मला म्हणताहेत मी तुला भांडवल देतों!"

"हं?" तो दुसरा गृहस्थ वाचकांचा जुना स्नेही प्रो. ड्यांडी म्हणतो, "देणार? भांडवल देणार? तर मग आपण कमरा बांधूं. चल. तूं तयार कर. मी त्याची विक्री करायला तयार आहेच. हैद्राबादहून खरेदी करून आणलं ह्मणून सांगून तेव्हांच विकूं."

प्रोफेसर ड्यान्डी हें बोलत असतां बिंदु-माधव पांड्यांकडे डोळा मिचकावून, "शिकार पण खूप साधलीस!" असें जणूं काय सुचवीत होता. तो त्याच्या मनांतील अर्थ आपल्या सावजाच्या मनांत कदाचित् उतरेल, असें भय वाटून बिंदुमाधव पांडे त्यास एकदम ह्मणतो, "तुला, गुलामा, विकायला काय वेळ लागणार आहे? एक लाख रुपयांचं सोनं दिलं तर एका अर्ध्या तासांत नाहीं का तूं विकून आणणार? तें बनवायला काय मेहनत लागणार, याची तुला कल्पना तरी होणार आहे काय? सोन्याची गोष्ट निघाली, कीं गुलाम जसा उड्या मारायला लागतो, डोळे काय मिचकावतो, (काकासाहेबांकडे वळून जरा हलक्या आवाजानें) पण हर-काम्या आहे हो. या आपल्या कामांत अतिशय उपयोगी पडेल. पुन्हां एक दीड-कीची अफरातफर व्हायची नाहीं, ही खात्री. त्याच्या पोषाखावर तुह्मी जाऊं नका. पोषाख जरा ऐटीबियटींत साहेबी तऱ्हेचा करावा, हें आपलं त्याला वेड आहे; पण कामाला मोठा वाघ. आपण मला जें सांगितलं–आश्वासन दिलं–तें खरं समजायचं कीं काय? मला नक्की कळलं ह्मणजे पुढला विचार करायला ठीक पडेल. जी सामग्री लागायची, ती आणून ठेवली पाहिजे. आपला विचार असला, तर मी त्या भानगडींत पडेन. आणखी उगीच माझं बोलणं ऐकून नुसता विचार मनांत आल्याबरोबर सहजगत्या बोलला असलां तर सोडून द्या. आग्रह बिलकूल नाहीं. माझा मी एकटा प्राणी आहे. आपण भांडवल घालाल, तर बरोबर निम्मा वांटा मीं घ्यावा अशीसुद्धां माझी इच्छा नाहीं. तीन हिस्से आपण घ्या. एका हिश्शांत मला घ्यायचं तें मी घेऊन याचा समजूत करीन. पण इच्छा एवढी, कीं ही विद्या सिद्धीस नेऊन एका तरी सद्गृहस्थास श्रीमंत करीन. आपण विचार करायला वेळ घ्या. आतांच कांहीं करा, तावडतोब पैसे आणा, असा मुळींच माझा आग्रह नाहीं. पण एकदां मी सामग्री आणून तयारी केली ह्मणजे मग मात्र मला फशीं पाडल्याप्रमाणं करूं नका."

"बरोबर! बरोबर! आमच्या राजा-बिंदुमाधव पांड्यांचं जिकडे तिकडे चोख बोलणं असतं. उगीच इकडे तिकडे बोलणं त्यांच्या हातून कधीं व्हायचं नाहीं". प्रोफे-सर ड्यान्डी मोठ्या आढ्यतेनें काकासाहे-बांकडे पाहात बोलले.

तितक्यांत काकासाहेब एकदम बिंदु-माधव पांड्यास ह्मणतात, "जसं आपलं, तसंच माझं आहे. एकदां जी गोष्ट करा-यची असं ठरवलं, ती पुरी केल्याखेरीज

कधींही रहायचं नाहीं. मीं म्हटलं त्याप्रमाणं अक्षरशः करणार. किती रक्कम आणि कशी कशी पाहिजे येवढं सांगून द्यावं म्हणजे झालं हो ! एकदम तर आपल्याला सगळी रक्कम लागत नाहीं......"

पांडे त बडतोच म्हणाले ! "छे ! छे ! छे ! एकदम करायची काय ? अहो, विष तें, आमच्यासारख्याजवळ उगीच ठेवून करायचं काय ? लागतील तसतशा रकमा आपल्याकडून आणूं. त्या देखील आपण स्वतः आमच्याबरोबर येऊन स्वतःच किंमत देऊन जिनसा विकत आणाव्या."

"नको, नको. माझा आपल्यावर पूर्ण भरंवसा आहे. आपल्याला रक्कम लागली, कीं तीन दिवस आधीं मला कळवीत जा. चौथे दिवशीं आपल्या पदरांत रक्कम. पानी करायची, आणि गैरविश्वास करायचा त्यापेक्षां पानी करण्याचाच कोणी जुलूम केला आहे ? बोला. शुभस्य शीघ्रं. कधीं सुरुवात करतां ? उत्तम असा मुहूर्त पहा. पहिले दिवशीं किती रक्कम पाहिजे ती मला सांगा; रक्कम आपल्याकडे पावती करतों. एक हजार रुपये पुरेत ! "

बिंदुमाधव पांडे मोठ्यानें हंसून म्हणतात, "मी तुम्हांला पहिल्यांदाच म्हटलें कीं, आपल्यासारख्या दक्षिणी मंडळींचीं हीं कामं नव्हेत. अहो, एक हजारानं काय काम होणार ? प्रारंभीं एक हजार कसे पुरणार ? तडाक्यासरसे पांच हजार रुपये तरी पाहिजेत. तितकी तुमची छाती होणार नाहीं. तुम्ही त्या भानगडींत पडूं नका. लाखों रुपये मिळवायचे, आणखी ते एकदम मिळवायचे. ते कुठं एक हजाराच्या भांडवलानं मिळतात काय ? "

काकासाहेब त्यास लागलीच म्हणतात, "अहो, पांच हजार रुपये तयार करतों. तुम्हीं थोड्या थोड्या रकमा म्हणालांत म्हणून मीं हजाराचं नांव काढलं. दहा हजारपर्यंत भांडवल देण्याचा माझा मानस पक्का झाला आहे. कधीं प्रारंभ करतां ? बोला."

"परवां उत्तम अमृतसिद्धियोग आहे. आपण दहा वाजण्याच्या सुमाराला रक्कम घेऊन येथें यावं. सगळी रक्कम नाहीं जमली, तर जमेल तेवढीच रक्कम घेऊन या; पण चुकूं नका. हा योग गेला, तर पुढें किती दिवस तरी वाट पाहावी लागेल."

"छे. छे, असा योग मी कसा चुकूं देईन ? नाहींच चुकूं देणार ! "

तो त्यांनीं चुकूं दिला कीं काय हें आपण पुढें पाहूं.

---

# प्रकरण ५६ वें.

## कमला.



एक महिना गेला कमलेवर आलेल्या दुर्धर प्रसंगासही एक महिना झाला, कर्मधर्मसंयोग असा झाला कीं, बळवंतरावांची बदली थोड्याशा बढतीवर मुंबईसच झाली. त्या बढतीचा आनंद त्यांस कांहींच नव्हता. परंतु करणार काय ! त्यानें एक लहान परंतु स्वतंत्र अशी बंगली भाड्यानें घेऊन ते आपल्या मुलासह व आपल्या दुर्दैवी मुलीसह मुंबईस राहिले. गेल्या थोडे दिवसांत आपल्यावर काय प्रसंग आले आणि त्या प्रसंगांनीं आपण कसे अगदीं चुरडून निघालों, आपल्या थोडे दिवसांपूर्वींपर्यंतच्या सुखमय स्थितीबद्दल आणि एकाएकीं संकटपरंपरा येऊन काय भयंकर परिणाम झाला, याबद्दल अनेक विचार अनेक वेळां त्यांचे मनांत येऊन त्यांचें चित्त इतकें व्यग्र होऊन जाई, कीं त्यांस कांहीं सुद्धां सुचत नसे. कमलेची तर स्थिति इतकी वाईट झाली कीं, तिला विवाहसमयीं पाहाणारानें आज पुनः पाहिलें असतें, तर तीच ही मुलगी असें कोणी शपथ वाहून सांगितलें असतें, तरी खरें वाटलें नसतें. आपल्याप्रमाणें दुर्दैवी प्राणी या जगांत दुसरा कोणीही नसेल, आपण जन्मास आल्यानें आपल्या आईबापास सुख तर कांहींचेंही झालें नाहीं, दुःखमात्र पावलोंपावलीं झालें, त्यापेक्षां आपण जन्मास आलों नसतों तर किती चांगलें झालें असतें. असे विचार तिच्या मनांत एकसारखे येऊन ती अतोनात दुःखीकष्टी असे. बापानें नानाप्रकारें तिला समजुतीच्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न केला, परंतु तिची विषण्णता एक रेसभरही कधीं कमी झाली नाहीं. झालें तें एवढेंच झालें, कीं आपली विषण्णता बापास दिसूं नये. म्हणून मात्र तिनें नानाप्रकारांनीं प्रयत्न केले. त्याचप्रमाणें तिचा भाऊही तिचें दुःख कमी करण्याकरितां अतोनात तत्पर असे, पण जिचें अंतःकरण मातृवियोगानें उद्विग्न झालें व त्याच्याही पेक्षां आपल्याविषयीं कुविचार मनांत धरून आपला परित्याग करून गेलेल्या पतीच्या मृत्यूमुळें भडकलेल्या शोकाग्नीनें अगदीं दग्ध होऊन गेलें, ती क्षणभर तरी प्रसन्नवदन कशी असूं शकणार ! आपण आपल्या पतीच्या नाशास प्रथमतः कारण झालों, त्याच पायीं त्यानें आपला व आपल्यामुळें आपल्या कुटुंबाचा, स्वदेशाचा, किंबहुना स्वदेहाचा त्याग केला ! तेव्हां पतिहत्येचें पातक धडधडीत आपल्यास लागलें असतां आपण त्याबद्दल परिमार्जन करण्याचें मनांतही न आणतां, खुशाल येथें बसलों आहों यास काय ह्मणावें ! असा विलक्षण विचार तिच्या मनांत अलिकडे फारच

वारंवार येऊं लागून तिचें मन फार क्षीण झालें होतें. या मनाच्या स्थितींत तिच्या हातून काय साहस झालें असतें आणि काय नाहीं याचा नेमच नव्हता; परंतु तिच्या मनाची ही विलक्षण स्थिति तिच्या बापास पूर्णपणें कळून चुकली नव्हती. पत्नी वारल्यानंतर व लेकीवर आलेल्या दुर्धर प्रसंगाची बातमी कळल्यानंतर कांहीं दिवस गेल्यावर तो हळूहळू शांत चित्त होऊं लागला. आणि ज्याप्रमाणें आपल्या मनास स्थिरता येत चालली आहे त्याचप्रमाणें आपल्या पोरीच्याही मनास स्थिरता येत चालली असावी, अशीच मनाची समजूत करून घेऊन तो आपला नित्य कार्यक्रम सारूं लागला. सायंकाळीं कचेरी आटपतांच त्यानें तडक घरीं यावें व आपल्या मुलीस व मुलास घेऊन कांहीं तरी वाचींत वगैरे बसावें, केव्हां तिलाच वाचावयास लावावें, किंवा मुलास वाचण्यास सांगून आपण व तिनें ऐकावें, असा क्रम चालत असे. संसार करण्याचा प्रसंग ज्यांस नसेल त्यांनीं अन्य रीतीनें आपल्या बांधवांस उपयोगीं पडण्याचे अनेक मार्ग आहेत, संसार करणें हेंच केवळ जीवितार्चे कर्तव्य नव्हे, अशा अर्थाचा ते तिला उपदेश करीत किंवा कांहीं तरी विलक्षण दुःखप्रसंग आल्याकारणानें संसारापासून ज्यांचें चित्त पराङ्मुख झालें व ज्यांनीं सर्व विश्वासच आपला संसार समजून आपला देह परोपकाराकरितां अर्पिला, स्वत्व विसरून जाऊन, किंबहुना आपल्या ठिकाणच्या स्वत्वाचा पुरा नायनाट करून स्वत्व आणि विश्व हीं दोन्हीं एकच करून टाकिलीं, अशा महात्म्या स्त्रीपुरुषांचीं चरित्रें तिच्याकडून ते वाचवीत असत. त्यांनीं आपल्याकडून तिच्या मनास शांति आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, आणि तिच्या त्या वरून दिसणाऱ्या शांतपणाकडे पाहून हिचें मन आतां बरेंच शांत झालें, असा मनाचा समज करून घेतला. हा समज वस्तुस्थितीला किती सोडून आहे, हें बिचाऱ्याच्या ध्यानीं, मनीं, स्वप्नींही नव्हतें. दिवस कसे तरी चालेलच होते, परंतु आंतल्या आंत कोंडमारा झाल्याकारणानें तिच्या मनाची विलक्षण स्थिति झाली होती हें कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं. एक क्षण असा जात नव्हता, कीं ज्या वेळीं तिच्या मनांत आपण जन्मास आलों कशाला आणि आतां जगतों आहोंत कशाला, हे प्रश्न उभे राहिले नाहींत. तिचें मन इतकें अधू झालें होतें, कीं केव्हां केव्हां तर आपला अंत करून घ्यावा असेंही तिला वाटे; परंतु ती अगदींच विवेकशून्य नव्हती. असले वेडेवांकडे विचार आपले मनांत येऊं नयेत अशाबद्दल खबरदारीही ती घेत असे. तिचें एक मन तिला सांगे, कीं तूं दुःखीकष्टी होऊं नकोस आणि दुसरें मन असें सांगे, कीं आतां या दुःखकष्टांतून बाहेर पडण्यास मरण हा एकच मार्ग. अशी कांहीं तिच्या मनाची विलक्षण स्थिति झालेली होती. तिच्या मनाची खरी स्थिति काय झाली आहे, हें जर कोणी पक्केपणीं ओळखलें असतें, तर ही आपल्या जीवाचें एखादे वेळ कांहीं करणार नाहींना? अशी त्यास दृढ शंका आल्याखेरीज कधींही राहतांना. परंतु तिच्या बापास तिच्या मनाची खरी स्थिति समजली नाहीं आणि अर्थातच त्याला ती शंका आलीही नाहीं. त्याला असेंच वाटत होतें, कीं ही दिवसानुदिवस कमी कमी खिन्न होत चालली आहे व आणखी महिन्या दोन महिन्यांत

अगदीं पूर्वीप्रमाणें जरी झाली नाहीं, तरी स्थिरचित्त क्वचित् होईल. याप्रमाणें या कुटुंबांत स्थिति होती.

अशा स्थितींत एके दिवशीं दुपारीं कमला आपली खाजगी पेटी उघडून बसली होती, तिचा भाऊ शाळेंत गेला होता. बाप कामावर गेला होता, घरांतील स्वयंपाकीणबाई तिची परवानगी विचारून कोठें कामास गेली होती. कमलेच्या मनांत कांहीं एक विवक्षित विचार येऊन तिनें आपली पेटी उघडली होती, व त्यांत असलेलीं पत्रें काढून तीं एकामागून एक भराभरा वाचीत होती. एकेक पत्र वाचून ठेवांत असतां तिच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रुबिंदु पडत होते. पहिलीं पत्रें वाचीत असतां मनाची व चर्येची जी स्थिति होती ती पुढलीं कांहीं पत्रें पहात असतां अगदीं बदलत चालली, व पत्रें संपत संपत येतांच शेवटल्या दोन तीन पत्रांचे वेळीं तिच्या हातांत पत्रें धरण्यापुरतीही शक्ति नसल्याप्रमाणें झालें. होतां होतां शेवटलें पत्र तर न वाचतांच तिच्या हातांतून गळलें, आणि ती एकदम जमिनीवर धाडकन् अंग टाकून पडली! त्या वेळीं तिचें समाधान करण्यास तेथें कोणीही नव्हतें. आजपर्यंत मनसोक्त रडण्यास जणूं काय तिला प्रसंगच मिळाला नव्हता, अशाप्रमाणें ती यथेच्छ रडत राहिली. नदीला कितीही पूर आला तरी तो केव्हां तरी ओसरतोच, त्याप्रमाणें तिच्या दुःखाचाही पूर कांहीं वेळानें ओसरला व ती थोडीशी सावध होऊन उठून बसली अश्रुपूर बंद होऊन आतां उसासे बाहेर येऊं लागले व थोड्या वेळानें उसासेही बंद पडून ती केवळ शून्यचित्तानें डाव्या हातावर गाल ठेवून त्या उघड्या पेटीकडे शून्यदृष्टीनें पहात स्वस्थ बसली. तिच्या मनांत या वेळीं काय विचार येत असतील आणि तिला काय वाटत असेल हें सांगणें मोठें कठिण आहे; किंबहुना अशक्यच होय. अशा स्थितींत ती बसली असतां किती वेळ गेला हें तिचें तिलाच समजलें नाहीं, किंबहुना किती वेळ गेला हें पहाण्याची तिला अवश्यकताच वाटली नाहीं. ती एका खिडकीपाशीं बसली होती, तेथून रस्त्यावर नजर जाण्यासारखी होती; परंतु तिचें रस्त्याकडेही मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. रस्त्यावरून आपणाकडे कोणी पहात असेल किंवा पाहील हें तिच्या स्वप्नींही आलें नाहीं. परंतु एक गृहस्थ तेथें उभा राहून तिच्याकडे एकसारखा पहात होता. हा गृहस्थ जातीचा कोण! हें सांगणें मोठें कठीण होतें. त्याच्या पोषाखावरून तो अमुकच जातीचा किंवा पंथाचा होता असें कोणासही सांगतां आलें नसतें. परंतु मुंबईंत काय, असे रस्त्यावरून जातां येतां वाटेल तेथें उभे राहून वाटेल त्याच्याकडे पहाणारे लोक थोडे असतात? तशापैकीं हाही एखादा असेल, परंतु तशापैकीं हा दिसला नाहीं. हा मुद्दामच तेथें उभा राहून पहात असावा असें दिसलें. इकडे कमला वर सांगितल्याप्रमाणें शून्य दृष्टीनें पेटीकडे पहात व शून्यचित्त अशी बसली होती. तिच्याकडे दुरून कोणी पहातो आहे हें तर तिला समजणें शक्यच नव्हतें; परंतु तिच्याजवळ येऊन उभा राहिलेला माणूस तिच्याकडे एकसारखा पहात होता तेंही तिला समजलें नाहीं. स्वयंपाकीणबाई तिला विचारून गेली तेव्हां "मी जातें, तुम्ही पुढलं दार लावा," असें सांगून गेली व

हिनेंही "तुह्मी जा, मी लावतें," असें उत्तर दिलें. परंतु त्याप्रमाणें दार लावण्यास मात्र ती विसरली. अर्थात् कोणाही येणारास आंत येण्यास कांहींच आडकाठी नव्हती. तशी आडकाठी नसल्यामुळें तो गृहस्थ आंत येऊन तिच्याजवळ उभा राहिला व अत्यंत खिन्न व स्नेहपूर्ण दृष्टीनें तिच्याकडे पहात उभा राहिला. जणूं काय तिला हांक मारून किंवा अन्य कांहीं मार्गानें तिचें लक्ष्य आपल्याकडे ओढून घेऊन, तिला तिच्या विचारसृष्टींतून ऐहिक सृष्टीकडे आणणें त्याला बरें वाटलें नाहीं. जसा हा तिच्याकडे पहात होता, तसाच तो रस्त्यावरला मनुष्य आतां या दोघांकडे फारच आतुरतेनें पाहूं लागला. आपण रस्त्यांत उभे राहून दुसऱ्याच्या खिडकींत बसलेल्या स्त्रीकडे पहातों आहोंत हें पाहून लोक आपणास काय म्हणतील हा प्रश्नसुद्धां त्याचे मनांत उभा राहिला नसावा. इकडे कमलेजवळ उभा राहिलेला गृहस्थ बराच वेळ तसाच उभा राहून शेवटीं आतां हिला आपण आल्याचें कळावेंच असें मनांत येऊन लागलीच मोठ्यानें म्हणतो, "कमलाताई, मला येऊन येथें उभं राहिल्याला किती तरी वेळ झाला. तूं अशी कां बसलीस? जी गोष्ट झाली ती थोडीच आतां परत येणार आहे. मी आज किती दिवस इकडे येईन येईन म्हणून येतों आहे, पण कांहीं केल्या माझा इकडे येण्यास वाहीचना. कोण्या तोंडानं येऊं? येऊन तुला काय ह्मणूं? तुझ्याशीं काय बोलूं? असेच विचार माझ्या मनांत वारंवार येऊन मी निघालेला एक दोन वेळ परत फिरलों. शेवटीं आज अगदीं मनाचा निश्चय केला, कीं कांहीं होवो, एकवार यायचंच. येऊन पहातों तों तूं ही अशी बसलेली! ऊठ, अशी बसूं नको." असें म्हणून त्यानें तिला उठविण्यासाठीं हात पुढें केला.

त्याबरोबर कमला चटकन् उठली. तिच्या पोटांत एकदम धस्स झालें! व ती खडबडून "कोण! प्रभाकरदादा, तूं केव्हां आलास? मला कांहीं सुद्धां समजलं नाहीं. मी आपल्या नादांतच होतें. इतके दिवसांत तूं कुठं गेला होतास? तुझी प्रकृति बरी आहेना!" असे एकामागं एक पांच सात प्रश्न आपण काय बोलतों आहोंत, काय करतों आहोंत, याचं मुळींच भान न रहातां ती त्यास विचारूं लागली, व तितक्यांत पुढें पडलेल्या पत्राकडे आणि उघड्या पेटीकडे नजर जाऊन तिनें पटकन् तीं पत्रें उचलून पेटींत टाकलीं व झटकन् पेटीचें झांकण लावून घेतलें. प्रभाकरानें तिच्या त्या प्रश्नांपैकीं एकाही प्रश्नास उत्तर दिलें नाहीं. उत्तर काय द्यावें, त्यास समजलेंच नाहीं. तिचे प्रश्न एकीकडेसच ठेऊन तो आपणच तिला प्रश्न विचारूं लागला, "मी इतके दिवस आलों नाहीं ह्मणून तूं रागावली नाहींसना! यायचं नाहीं ह्मणून मी आलों नाहीं असं नाहीं. माझ्यानें येववेना. इथें येऊन काय बोलू! काय करूं. तुला काय सांगूं! असं मला होऊन गेलं! आणि ह्मणूनच आज जाऊं उद्यां जाऊं असें करीत करीत मी इतके दिवस जाऊं दिले. कमलाताई, तुझ्यावर असा दुर्धर प्रसंग आलेला पाहून मला जितकं वाईट वाटतं आहे, तितकें माझ्या स्वतःच्या बहिणीवरही प्रसंग आला असतां वाईट वाटलं असतं कीं नाहीं कोण जाणे! माझ्या हातून या तुझ्या दुःखाचा एक शतांश भाग जरी कमी करतां आला असता तरी मी वाटेल तें करून तो कमी केला असता हें कांहीं तुला सांगावयाला नकोच."

हें तो बोलत असतां कमलेच्या डोळ्यांत पुनः अश्रुपूर आला व तिच्या हातापायांतील शक्ति एकदम नाहींशी झाल्याप्रमाणें होऊन ती मटकन् खालीं बसली. हा सर्व प्रकार रस्त्यांतील गृहस्थ अद्यापि जेथल्या तेथेंच उभा राहून या दोघांकडे एकसारखा टक लावून पहात होता, तो अशा तऱ्हेनें पहातो आहे हें या दोघांपैकीं एकाच्याही लक्ष्यांत अद्यापि आलें नव्हतें. ती खालीं बसण्याबरोबर प्रभाकरानें मनांत यत्किंचितही कांहीं न आणतां तिच्या पाठीवर हात ठेवून तिला म्हटलें.

"कमलाताई, तूं हें काय आरंभलं आहेस ? मी जो इतके दिवस आलों नाहीं तो याच भयानं आलों नाहीं. इतके दिवसांनीं आलों तरी तुझी स्थिति आहे तशीच आहे. आतां त्या सगळ्या गोष्टींचा पुनः पुनः विचार करण्यांत काय अर्थ आहे ? ऊठ. आतां गोपाळा येईल. बळवंतराव काका येतील. आपण बाहेर जाऊं, तेथेंच बोलत त्यांची वाट पहात बसूं." असें म्हणून त्यानें तिचा हात धरून तिला उठविलें. तीही लौकर उठली. तिनें त्या पेटीस कुलूप लाविलें आणि दोघेंही त्या खोलींतून बाहेर जाऊं लागलीं. कमला दार ओलांडून पलीकडे गेली, इतक्यांत प्रभाकरानें खिडकीकडे सहज मागें वळून पाहिलें, तों त्याची दृष्टि त्या समोर उभ्या राहिलेल्या गृहस्थाकडे गेली. पण तितक्यांत त्याची दृष्टि आपणाकडे वळली असें पाहूनच कीं काय, खालचा गृहस्थ चपळ गतीनें तेथून नाहींसा झाला.

# प्रकरण ५७ वें.

## काय करावें ?




गृहस्थ कोण उभा होता व आपली दृष्टि त्याचेकडे जाण्याबरोबर तो इतक्या लवकर कां पळून गेला, असा क्षणमात्र विचार करून व दुसऱ्याच क्षणीं असेल कोणी तरी. मुंबईस असले महामूर्ख रिकामटेकडे थोडे थोडके असतात असें नाहीं, असें म्हणून आपल्या मनाचें समाधान करून घेऊन प्रभाकर कमलाताईच्या पाठोपाठ आंत गेला व थोड्याच वेळांत कोणी रस्त्यावर उभा होता व आपली दृष्टि त्याच्याकडे जाण्याबरोबर तो तेथून पळून गेला, हें सर्व पार विसरून गेला. रोजचे वेळेवर बळवंतराव परत आले व प्रभाकर बरेच दिवसांत न भेटल्याकारणानें त्यास "कोठें होतास ! काय करीत होतास !" वगैरे विचारून नंतर रोजच्याप्रमाणें आपल्या कालक्रमणेस लागले. थोड्या वेळानें प्रभाकर निघून गेला, व ती रात्र गेली,

दुसरा दिवस उजाडला. आदले दिव-

साप्रमाणेंच बळवंतराव व गोप्या कचेरींत व शाळेंत निघून गेले. स्वयंपाकीणबाईही त्या बायांच्या रीतिप्रमाणें काम आटोपल्यावर बाहेर गेली. कमलेस तें तिचें जाणें अनिष्ट नव्हतेंच. कांहीं एका मनाच्या स्थितींत मनुष्यास, त्यांतून कमलेसारख्या स्वभावाच्या तरुण स्त्रीस, त्यांतही असल्या प्रकारचें विलक्षण दुःख झालें असतां, एकलकोंडें बसणें हेंच विशेष इष्ट असतें. अर्थातच आपलीं आदले दिवसाचीं पत्रें काढून तीं वाचीत बसावें अशी उत्कट इच्छा कमलेस झाली. तिनें आदले दिवसाप्रमाणें दार वगैरे उघडें न टाकतां कडया लावून आपल्या खोलींत येऊन पुनः पेटी उघडली; आणि तीं पत्रें काढून वाचावयास बसली. आदले दिवसाप्रमाणेंच तिनें एकामागून एक पत्रें उघडून वाचण्यास सुरवात केली. दुःखोत्पादक पत्रव्यवहार वारंवार वाचण्यांतही दुःखी प्राण्यास एक प्रकारचें दुःखमय समाधान असतें. त्या समाधानाचा अनुभव बिचारी घेत बसली होती. कांहीं पत्रें वाचावीं, ठेवावीं, पुनः दुसरीं काढावीं, तीं वाचावीं, तीं ठेवावीं, पुनः पहिलीं घ्यावीं, असें चाललें होतें. अस्वस्थ माणसास कशापासूनही स्वस्थपणा म्हणून मिळत नाहीं. त्याप्रमाणेंच बिचाऱ्या कमलेची अवस्था झाली होती. कितीही पत्रें कितीं वेळांही वाचलीं, तरी तिच्या चित्तास स्वस्थता कशी ती येईना. कोठून येणार? आणि तशांत तीं पत्रें तरी काय स्वस्थता आणण्याजोगीं थोडींच होतीं. एखाद्यास आनंदाच्या अत्युच्च शिखरावर नेऊन बसवून पुनः लागलीच क्षणा दोन क्षणांत नेथून ढकलून देऊन अत्यंत खोल अशा दुःखदरींत पाडावें, त्याप्रमाणें तीं पत्रें तिची अवस्था करण्यास एके वेळीं कारण झालीं होतीं. कांहीं पत्रांनीं तिला आनंदाच्या कैलासांत नेऊन पोंचविलें होतें व दुसऱ्यांनीं तेथून तावडतोब अत्यंतिक दुःखदरींत ढकलून दिलें होतें आणि त्यामुळेंच ती आतां आमरण दुःखांत पडली होती. तथापि एके वेळीं आनंद देणाऱ्या दुसऱ्या कारणांचें स्मरणही दुःखस्थितींत समाधान देत असतें. त्या समाधानांतच गुरफटून जाऊन मनुष्य केव्हां केव्हां दिवस कंठावयास यत्न करतो. कमलेनें आतां तीं पत्रें काढून वाचणें म्हणजे अशा प्रकारचा यत्न करण्याचेंच चिन्ह होय.

तीं पत्रें वाचावीं, ठेवावीं, असें करतां करतां दुपारचे सुमारें तीन वाजले. मुंबईस त्या दिवसांत पांच सहा वेळ डांक येत असे. तीन वाजण्याची वेळ एका डांकेची होती व पोस्टाचा शिपाई बळवंतरावाचे दाराजवळ ठोक ठोक करीत उभा होता. त्यानें पुष्कळ वेळ ठोठावलें; परंतु कमलेचें लक्ष्य तिकडे मुळींच गेलें नाहीं. शेवटीं शिपाई अगदीं त्रासला व त्यानें पुनः एकदां आपलें होतें नव्हतें तेवढें बळ खर्च करून ठोठावलें आणि हाकाही मारल्या. तेव्हां कोणी तरी दाराशीं हांक मारीत आहे, असें कमलेस वाटून ती झटकन् कोण आहे? तें पाहण्यासाठीं दाराजवळ गेली व शिपायापासून तिनें पत्रें घेतलीं. पत्रें तीन होतीं. दोन बळवंतरावांच्या नांवचीं होतीं व एक तिच्या स्वतःच्या नांवचें होतें. स्वतःच्या नांवचें होतें त्या पत्राचा पत्ता पाहण्याबरोबर ती जणूं काय एकदम जमिनीस खिळल्याप्रमाणेंच उभी राहिली. त्या पत्राचें अक्षर तिच्या अगदीं ओळखीचें होतें, असें तिच्या चर्येवरून सहजच दिसलें. परंतु जें अक्षर आपल्यास पुनः कधींही पत्रावर दिसावयाचें नाहीं अशी

पक्की मनाची खात्री, जें अक्षर लिहिणारा हात पुनः आपल्या दृष्टीस पडावयाचा नाहीं, म्हणून अपरंपार शोक करीत आहोंत, तेंच अक्षर अगदीं अनपेक्षित प्रसंगीं अशा तऱ्हेनें दृष्टीस पडलें, तेव्हां तिच्या मनाची स्थिति किती चमत्कारिक झाली असेल! त्या पत्रावरील पत्त्याकडे ती अगदीं तटस्थपणें पाहात राहिली. तिला त्या अक्षराखेरीज दुसरें कांहींही दिसत नाहींसें झालें. दारांत ती जशी उभी होती तशीच तटस्थ पाषाणमूर्तीप्रमाणें उभी राहिली. किती वेळ तरी आपण पाहातों आहोंत, तें स्वप्नांत पाहतों आहोंत कीं खरोखर पाहातों आहोंत, याचा जणूं काय तिला उलगडा होईना असें दिसलें. पत्र फोडूं कीं नको, हाच तिचे मनास किती वेळ तरी घोंटाळा पडला असावा. तिनें तें पत्र दहा पांच वेळां वर खालीं उलटून सुलटून पाहिलें. आपण कोठें उभ्या आहोंत, आपलेकडे कोणाची दृष्टि आहे कीं काय, असल्यास तें माणूस आपल्यास काय म्हणेल वगैरे गोष्टींचा विचारसुद्धां तिचे मनांत आला नाहीं. ती या वेळीं जणूं काय इहलोकच्या सृष्टींत नव्हतीच. कोणत्या तरी दुसऱ्याच मिथ्या सृष्टींत गढून गेली होती. एक वेळ तिला वाटे, हें पत्र फोडून पाहिलें तर न जाणों, आंत काय असेल आणि काय नाहीं. हें पत्र कधींचें असेल आणि कधींचें नाहीं. आपणास कळलेल्या अत्यंत अनिष्ट वार्तेच्या पूर्वींच कदाचित् लिहिलेलें असेल आणि तें केव्हां तरी फिरत फिरत आतां आपल्या हातीं येत असल, पुनः असें वाटलें, कीं हें पत्र बहुतकरून आपल्यास अगदीं शेवटीं लिहिलेलें असावें आणि तें तसें असेल तर त्यांत कांहीं तरी विशेष मजकूर असेल, तर तो आपण वाचावाच वाचावा. असा विचार येतांच तिनें तें पत्र फोडलें. फोडून मुक्काम मुंबई असें पाहतांक्षणींच आणि विशेषतः त्याजवर आदले दिवसाची तारीख पाहतांक्षणींच तिच्या मनाची फारच चमत्कारिक स्थिति झाली. पहिल्यानें जितका अचंबा तिला वाटून ती भांबावून गेली होती, त्याच्यापेक्षां दसपट या वेळीं भांबावून गेली. हा प्रकार आहे तरी काय? आपण आहोंत कोठें? काय करितों आहोंत? कशाचेंही जणूं काय तिला भान नाहींसें झालें आणि ती पुढील मजकूर वाचण्याचें सोडून एखाद्या वेडीप्रमाणें इकडे तिकडे सभोंवार पाहूं लागली. अक्षर तर खास ओळखीचें; परंतु हें अक्षर कालच्या तारखेस आलें कसें? नंतर तिनें खालीं मजकुराकडे पाहिलें तों त्यांत तर पहिल्यापेक्षांही अतिशय आश्चर्य करण्याजोगें किंबहुना आश्चर्यानें गुंग होऊन निचेष्ट पडण्याजोगें कांहीं तरी होतें. तो मजकूर असा होताः

"मी मृत्यु पावलों असें समजून तूं सुखासमाधानांत असशील हें उघडच आहे. पण कदाचित् नसलीस आणि अजून तुला मजबद्दल कांहीं प्रेम वाटत असलें, तर मी सांगतों त्याप्रमाणें कर. घरांतील कोणाही माणसास नकळत उद्यां रात्रीं बारा वाजण्याचे सुमारास ग्रांटरोडचे स्टेशनावर एकटी ये. खरोखर असें करण्यास भिण्याचें तुला यत्किंचितही कारण नाहीं. मी तुला तेथें भेटेन. परंतु तूं एकटी आलीस तरच तुझी व माझी भेट होऊन तुझा जन्म सुखासमाधानांत जाण्याचा संभव आहे. तूं आपल्या बापास, भावास किंवा दुसऱ्या कोणास घेऊन आलीस तर माझें तुझें दर्शन होणार नाहीं, ही एवढीच संधि मी

तुला देतों आहें. ही जर घालवलीस तर पुनः मला पूर्णपणें मुकलीस, असें पक्कें समज. मी तर असें समजेन कीं, मी जिवंत आहें असें तुला कळल्यामुळें तुला अतिशय दुःख होऊन मी पुनः नाहींसें व्हावें ह्मणूनच तूं कोणास तरी–मी नको म्हणून लिहिलें असतांही–घेऊन आलीस. मला तुझ्या बापाबद्दल, काकाबद्दल, भावाबद्दल आणि त्या कर्मचांडाळ प्रभाकराबद्दल अत्यंत तिटकारा आहे. ज्याप्रमाणें तुझ्याकरितां मीं आपल्या आईबापांचा त्याग केला, त्याचप्रमाणें तूंही आपल्या आईबापांचा माझ्या मर्जीकरितां त्याग करावास. तें तुझ्या हातून होत नसलें (आणि होणार नाहीं अशी माझी खात्री आहे) तर तूं वाटेल तें कर. पुनः माझें हें मुख तुला दिसणार नाहीं. तूं पतिनिष्ठ असावेंस हें शक्यच नाहीं. परंतु माझें मन तुझ्या ठिकाणीं दृढ, ह्मणूनच मी तुझ्याकरितां पुनः इकडे धांवत आलों. ही संधि जर तूं घालविलीस, तर...पण पुढें कांहीं लिहीत नाहीं.

मात्र उद्यां रात्रीं बारा वाजतां तूं एकटी ग्रँटरोडच्या स्टेशनावर येशील अशा समजुतीनें मी तुझी तेथें वाट पाहीन. तूं एकटी आली नाहींस किंवा प्रथमदर्शनीं मात्र एकटी आल्याप्रमाणें दाखवून मागें पुढें कोठेंतरी कोणी लपून छपून असल्याबद्दल मला यत्किंचित् शंका आली, तर तुला मी, व मला तूं पूर्णपणें मुकलों हें पक्कें समज. मग तुला खरोखरीच दाही दिशा मोकळ्या असून त्या तश मोकळ्या होण्याची वाटच तूं पाहात होतीस असें मी समजेन. ही एक तुझी परीक्षाच आहे."

खालीं सही होती ती "पद्माकर" अशीच होती.

या पत्रांतील प्रत्येक शब्द, तापविलेल्या सुईप्रमाणें भाजीत भाजीत कमलेच्या अंतःकरणांत शिरला. आपल्या आतांपर्यंतच्या समजुतीप्रमाणें आपला पति मृत नाहीं, जिवंत आहे, हें समजल्यामुळें आनंद करावा कीं त्यानें जें करण्याची आपल्यास आज्ञा केली आहे, तें आपल्या हातून कसें घडावें याबद्दलची काळजी करावी, हें तिला कांहींच सुचेना. आजपर्यंत आपल्या वडिलांजवळून आपण कांहींही छपवून ठेविलें नाहीं; परंतु आज तेंच करण्याबद्दल पतीची आज्ञा होत आहे. तेव्हां या बिकट प्रसंगांतून बाहेर तरी कसें पडावें? पत्राचें अक्षर तर तिनें पक्केंपणीं ओळखलें. सही अगदीं तीच. यामुळें तिला तर फारच विलक्षण वाटलें. इकडे आड, तिकडे विहीर, मागें वणवा, पुढच्या बाजूस तुटलेला कडा, अशा भयंकर संकटांत सांपडलेल्या हरिणीची आणि तिची अवस्था एकच होऊन गेली. या वेळीं आपण खरोखर अस्तित्वांतच नसतों तर फार चांगलें झालें असतें. या भयंकर संकटांत सांपडल्याकारणानें जी आपली त्रेधा झाली आहे, ही त्रेधा झाली नसती. आजपर्यंत अनेकांस आपल्यामुळें त्रास झाले, तसे त्रास कोणासही झाले नसते. अशा तऱ्हेचे विचार तिच्या मनांत येऊं लागले. कांहीं केल्या मनास स्वस्थपणा ह्मणून येईना. कसा यावा? वर सांगितलेल्या हरिणीस त्या संकटचतुष्टयानें वेढलें असतां मनास स्वस्थपणा येण्याचा जितका संभव तितकाच या वेळीं या दुर्दैवी मुलीच्या मनास स्वस्थपणा वाटण्याचा संभव. तिनें त्या पत्राचें कितीवेळां तरी पारायण केलें. शेवटीं स्वयंपाकीणबाई परत आली. तिनें तिला दुःखाश्रूंनीं नाहलेली व हातांत तें पत्र तसेंच घेऊन

उभी राहिलेली पाहिली व "कमलाबाई अशा कां उभ्या ! " असें विचारलें तेव्हां ती शुद्धीवर आली व चटकन् तें पत्र लपवीत लपवीत तिनें "उगीच" असें ह्मणून आपल्या खोलीची वाट धरली.

अशीं कांहीं पत्रें वाचतांना व अश्रू ढाळतांना कमलाबाईस त्या स्वयंपाकीण-बाईनें आजच पाहिलें होतें असें नाहीं. शिवाय तिला तिजबद्दल विशेषसें कधीं कांहीं वाटतही नसे. यामुळें तिनें तीस अधिकउणें कांहीं न विचारतां आपल्या स्वयं-पाकाच्या खोलीची वाट धरली. ती कामा-साठीं म्हणून त्यांचे घरीं येत असे. बाकी हें पुनर्विवाहितांचें घर म्हणून ती त्यांची निंदाच करी. शेणव्यापरभाच्या येथें ब्राह्म-णाच्या बाया स्वयंपाक करितात, तशीच मी यांच्या येथें करितें, असें ती ज्यास त्यास सांगत असे. व यांच्या सोंवळ्याओंवळ्या-बद्दल, चालीरीतीबद्दल व इतर गोष्टींबद्दलही खोटीनाटी निंदा करण्यास तिला कांहींच वाटत नसे. तेव्हां तिला कमलेबद्दल काय वाटणार आहे ?

आतां आपल्या बापाची व भावाची येण्याची वेळ झाली, असें पाहून कमलेनें आपलीं तीं सर्व पत्रें आटपून ठेविलीं; तें दुपारीं आलेलें पत्र लपवून ठेविलें; आणि ती त्यांची दोघांची वाट पहात बसली. आजपर्यंत आपल्या बापापासून किंवा आईपासून अमुक एक गोष्ट लपवून ठेवा-वयाची, असा प्रसंग तिला कधींही आला नव्हता. यामुळें तिला हा आजचा प्रसंग येतांच फार भयंकर वाटलें. एखादा गुन्हेगार गुन्हा केल्यानंतर तो कोणाचे नजरेस येऊं नये ह्मणून युक्त्या प्रयुक्त्या शोधूं लागतो. परंतु गुन्हेगार नवीन असला म्हणजे त्यांपैकीं एकही युक्ति त्यास साधणार नाहीं असें वाटून निराश होऊन अगदीं कावरा-बावरा होऊन जातो. तशीच त्या बिचारीची त्या दिवशीं अवस्था होऊन गेली. आपले बाबा घरीं आले म्हणजे आज आपण रोजच्याप्रमाणें सरळपणें त्यांचे-कडे पाहूं शकणार नाहीं, सरळपणें बोलूं शकणार नाहीं. झालेला प्रकार त्यांस सांगितल्याखेरीज आपल्याच्यानें राहवेल तरी कसें ? आणि सांगून टाकावें म्हटलें तर आपल्या हातानेंच आपला केवढातरी घात करून घेतला जाणार आहे. अशा तऱ्हेचे नानाप्रकारचे विचार तिच्या मनांत येऊन तिचें मन अगदीं गोंधळून गेलें. रोजच्या वेळेवर बळवंतराव आले. हिनें त्यांचेपुढें जाऊन त्यांस रोजच्याप्रमाणें कांहीं प्रश्न विचारले. रोजच्याप्रमाणेंच चहा वगैरे करून ठेविला होता तो त्यांस दिला. सारांश, रोजच्यापेक्षां तिच्या मनाची स्थिति अगदीं भिन्न असतां ती असावी तशीच आहे, असें दाखविण्यासाठीं तिनें अधिक प्रयत्न चालविला होता. ही गोष्ट तिला अगदीं नवीन होय. तेव्हां क्षणो-क्षणीं "आज कांहीं तरी निराळा प्रकार झाला आहे असें तर यांच्या मनांत येणार नाहींना ? आणि असें मनांत येऊन ते आपल्यास कांहीं प्रश्न विचारणार नाहीं-तना ? त्यांनीं जर प्रश्न विचारले, तर आपण उत्तर काय द्यावें ? " असेही प्रश्न तिच्या मनांत तितक्यांतल्या तितक्यांत उभे राहून तिला बोलतां बोलतांच किंवा कांहीं करतां करतांच स्तब्ध करीत व ती एखाद्या भ्रांतचित्ताप्रमाणें आपण काय बोलतों आहोंत आणि काय करतों आहोंत असें होऊन हातचें कार्य भरभर कर-ण्यास लागे.

बळवंतरावांनीं तिला आदले दिवशीं

वाचीत असलेलें पुस्तक पुढें वाचण्यास सांगितलें. तेव्हां हें एक बरेंच झालें असें समजून तिनें वाचण्यास सुरवात केली. परंतु आदले दिवशीं कोठपर्यंत झालें होतें हेंच तिच्या ध्यानांत येईना, यामुळें ती कोठून तरी वाचूं लागली. गोपाळानें "तिथून नाहीं. अमक्या पानापासून." असें सुचविल्यावर "हो का, मी अगदींच विसरलें." असें म्हणून तेथून वाचूं लागली. तिचें चित्त आपण काय वाचतों त्यांत मुळींच नव्हतें. आपल्याला वाचवत नाहीं किंवा मी वाचीत नाहीं असें ह्मटलें, तर उगीच प्रश्न विचारतील, असें मनांत येऊन किंवा आपण वाचण्यांत गढलों असतां आपलें मन तिकडे लागून दुसरे विचार येणार नाहींत, अशा आशेनें तिनें वाचण्यास प्रारंभ केला असावा. परंतु दोहोंपैकीं एकही तिच्या मनाप्रमाणें झालें नाहीं. तिच्या मनांत विचार यावयाचे ते येतच राहिले. आणि त्यामुळें वाचण्यांत चलबिचल होऊन "आज तुला असं काय झालं आहे!" असें बळवंतरावांनीं तिला विचारलेंही!

तेवढा प्रश्न येण्याचीच काय ती वाट होती तो येण्याबरोबर तिच्या हातून तें पुस्तक गळून पडलें आणि तिला एकदम रडूं कोसळलें. आजपर्यंत बापापासून तिनें कोणातीही गोष्ट गुप्त ठेविली नव्हती; इतकेंच नव्हे, तर खोटें किंवा उडवाउडवीचें उत्तर तिनें त्यांस कधींही दिलें नव्हतें. परंतु त्या वेळीं तोही प्रसंग सहजगत्या टळला. कमलेस आपल्या आईची व पतीची आठवण झाल्याकारणानें तिची अशी स्थिति झाली असावी, दुसरें कांहीं कारण नाहीं, असें मनांत येऊन बळवंतरावांनीं कांहीं वेळ तिला तसेंच रडूं दिलें. त्यांनीं असा विचार केला कीं, कित्येक वेळां मनसोक्त अश्रू वाहूं देणें हाच दुःखाची तीक्ष्णता कमी होण्यास उत्तम उपाय होय. व त्याप्रमाणें कांहीं वेळ जाऊं देऊन मग ते तिला म्हणतात: "कमल, ज्या गोष्टी झाल्या गेल्या त्याबद्दल नेहमीं अतिशय दुःख करीत बसण्यापासून काय उपयोग आहे? तूं सगळा दिवसभर घरांत एकटी असतेस, त्यामुळें शोक करून करून व कुढून कुढून तुझी प्रकृति मात्र बिघडून जाईल. आज दोन तीन दिवस याला कांहीं तरी उपाय काढावा म्हणून मी विचार करतों आहें, आणि मीं आपल्याकडून उपाय योजलाही आहे, पण तो तुला आवडला तरची गोष्ट आहे. तूं ऐकत असशील तर सांगतों." इतकें बोलून आपलें म्हणणें आपल्या मुलीस कितपस रुचतें हें पहाण्यासाठीं बळवंतरावांनीं तिच्या मुखाकडे बारीक नजरेनें पाहिलें. परंतु त्यांना दुःखावेगाखेरीज दुसरें कांहींही दिसलें नाहीं. अंतःकरण स्पष्टपणें उघडें करून दाखविणें तर तिला केवळ अशक्यच झालें होतें. व उडवाउडवीचें उत्तर देऊन किंवा कांहीं तरी बोलून वेळ मारून नेणें त्याहूनही अशक्य होय. अशा स्थितींत बळवंतरावांनीं सहजगत्या "आजच नको याचा विचार करूं. उद्यां कर. परवां कर. पण लौकर केव्हां तरी कर. एवढंच माझं ह्मणणं आहे." असें तिला सांगितल्यानें ती वेळ तशीच निभली गेली.

जेवणंखाणें झालें. सर्व मंडळी आपापल्या अंथरुणावर पडून झोंपी गेली. एकट्या बिचाऱ्या कमलेस मात्र झोंप नाहीं. तिच्या मनांत वणवा पेटल्याप्रमाणें होऊन गेलें होतें.-त्या वेळीं खरोखरीच्या वणव्यांत किंवा आगींत ती सांपडती तरीसुद्धां तिला

भय वाटलें नसतें. तिनें सुखानें मृत्यूला तोंड दिलें असतें. परंतु सध्याची वेळ, सध्याचा प्रसंग, फार भयंकर होता. तिच्यासमोर दोन कर्तव्यें, एकमेकांहून अगदीं भिन्न किंबहुना एकमेकांस पूर्णपणें विरुद्ध अशीं उभीं राहिलीं होतीं. एक करावें तर जणूं काय मृत्युलोकांतून परत आलेल्या आपल्या पतीची अवज्ञा करून आपला सर्वस्वी घात करून घेणें होय असें तिला दिसलें. व दुसरें करावें, तर ज्याच्याशीं आजपर्यंत अणुरेणुमात्र कपट केलें नाहीं त्या आपल्या शोकमग्न पित्यास उकरून दुःखांत लोटून जाणें होय. अशा वेळीं आपण 'काय करावें! काय करावें!' हे शब्द तिच्या कानांत जणू काय घुमत राहिले. आणि दोहों बाजूंस पांचपांचशें फूट खोल व अंधकारानें व्याप्त अशा प्रचंड दर्यांच्या मधेंच चार बोटें रुंदीच्या कडकावर उभें राहून एकदां या बाजूस व एकदां त्या बाजूस पाहून भयानें गांगरून जाऊन मूर्च्छा येणाऱ्या हरिणीप्रमाणें तिची अवस्था झाली.

---

# प्रकरण ५८ वें.

## कर्तव्य कोणतें ?



मनुष्यानें प्रत्येक वेळीं आपलें कर्तव्य करावें, त्यांत चुकूं नये, हा उपदेश आपण किती वेळां ऐकतों, आणि ज्यांस उपदेश करण्याचा आह्मांस अधिकार, त्यांस तो आपण किती वेळां तरी करतों! परंतु आपलें कर्तव्य ह्मणजे खरोखर कोणतें, याच्याबद्दल कधीं आपल्या मनांत नक्की विचार झाला आहे काय? ज्या ठिकाणीं सत् कोणतें आणि असत् कोणतें, चांगलें कोणतें आणि वाईट कोणतें, हें अगदीं उघड उघड आहे, त्या ठिकाणीं चांगलें तें करावें, सन्मार्गानें जावें, हा उपदेश करणें फार सोपें आहे. परंतु सत् आणि असत् यांचा निवाडाच जेव्हां तलवारीच्या धारेवर उभें राहून करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां मनुष्यानें, त्यांतून दुर्बल व अजाण अशा कमलेसारख्या अनाथ मुलीनें काय करावें! तिच्यापुढें दोन रस्ते होते; एक, पतीनें सांगितल्याप्रमाणें बिनधास्त त्यास भेटण्यास जाणें—अर्थातच आपण कोठें गेलों, कां गेलों याचा मागमूस सुद्धां आपल्या बापास लागूं न देणें—व दुसरा पतीच्या आज्ञेची पर्वा न करतां सर्व वृत्तांत आपल्या बापास सांगून तो सांगेल त्याप्रमाणें करणें. परंतु दुसरें केलें, तर पुनः आपल्यास पतीचें दर्शनसुद्धां होणार नाहीं. आधींच आपल्याविषयीं त्यांचें मन दूषित झालेलें, त्यांत आतां पुनः तें सुस्थित करण्याला त्यांनीं होऊन दिलेली संधि व्यर्थ घालवावयाची, म्हणजे आपण होऊन अगदीं उघड्या डोळ्यांनीं आपल्या

जन्माचें मातेरें करून घ्यावयाचें. तें कसें करून घ्यावें? आपण न गेलों, तर पतीनें पत्रांत लिहून धाक घातल्याप्रमाणें करण्यास ते कधींही चुकावयाचे नाहींत. आजपर्यंतच्या त्यांच्या एकंदर वागणुकीचा वृत्तांत ढळढळीत तिच्या नजरेसमोर होता. ज्यांनीं आपल्याशीं विवाह करावयाचा म्हणून घरच्या श्रीमंतीवर, आईबापांवर, सर्वांवर पाणी सोडण्याइतका निश्चय केला, ते आपण अशा तऱ्हेनें संधि दिली असतांही आपली बायको आपली अवज्ञा करते हें पाहून तिचेंही नांव कां टाकणार नाहींत? एकवार टाकलेंच. अशी तरी संधि आपल्याला येईल म्हणून कोणास कधीं वाटलें होतें? आपला मृत्यु झाला अशी बातमी मुद्दाम पाठवूनही दिली. परंतु आपल्या ठिकाणीं खरोखर प्रेम म्हणूनच पुनः इकडे येऊन पुनः आपल्याला ही संधि दिली. तेव्हां आपण ती कशी घालवावी? असा प्रश्न तिच्या मनास एकसारखा लोभवीत राहून काय करावें तें तिला सुचूं देईना. अन्यपक्षीं, आपल्या बापाप्रमाणें शुद्ध, सरळ, सच्छील मनुष्याचा त्यांनीं असा तिटकारा कां करावा? त्यांनीं त्यास राग आणण्याजोगें असें काय केलें आहे? यावज्जन्मांत ज्यानें कधीं कोणाचें जाणूनबुजून नुकसान केलें नाहीं, कधीं कोणास उणा शब्द संबोधला नाहीं, कधीं कोणास शब्दांनीं तर काय, परंतु विचारांनीं सुद्धां दुखविलें नाहीं, त्या गृहस्थाचा यांनीं तिटकारा करावा, त्यांचा मला अतोनात तिटकारा आहे असें स्याहावें, हें किती आश्चर्य करण्यासारखें आहे! परंतु वस्तुस्थिति तशी आहे त्याला काय करणार! तिच्यापुढें आपलें काय चालणार! आपण या वेळीं काय करावयाचें? हा प्रश्न राहिलाच. एकदां तर तिला वाटलें, कीं असे विचार करतां करतां केव्हांच बारा वाजून जातील, आणि मग हा सर्व विचार कायमचाच बंद ठेवणें आपल्यास भाग पडेल. आपला पति आपल्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें करण्यास कधीं सुद्धां चुकावयाचा नाहीं, आणि मग आपण जन्मभर "अशी संधि आली असतां ती व्यर्थ दवडली, ह्मणूनच केवळ आपण अशा दुःस्थितींत राहिलों" असा शोक मात्र करीत बसूं. पतीची अवज्ञा या वेळीं केली, तर अशी दुर्धर स्थिति येणार; परंतु असा बिकट प्रसंग आल्यामुळें आपण बाह्यतः अशा कपटी माणसाप्रमाणें वागलों, असें आपल्या पित्यास पुढें सांगितलें, तर त्याचा राग कांहीं कायमचा राहणार नाहीं. आपण पतीबरोबर गेलों आणि आपणास न कळविण्याला अमुक अमुक कारण झालें असें पाठीमागून कळविलें, तर त्याच्या मनाचें शांतवन तेव्हांच होईल. आपण आपल्या पतीची खात्री करून देऊन, आपल्या पित्याविषयीं त्याच्या मनांत जो तिटकारा उत्पन्न झाला आहे, तो नाहींसा करून टाकून त्याचे जागीं पूर्वीप्रमाणें आदरयुक्त प्रेम-भक्ति-पुनः उत्पन्न करूं. आपल्या वर्तनानें पतीस आपल्या कह्यांत आणून चार दिवसांत त्याचेचकडून आपल्या पित्यास साद्यंत हकीकतीचें पत्र लिहवूं. असा मनाला धीर देणारा विचार मनांत येतांच तिचें मन तयार होत चाललें. पतीच्या मनांत नाहीं, त्यानें सक्त आज्ञा केली आहे, ह्मणूनच आपण आपल्या पित्यास कांहीं एक न कळवितां, त्याची परवानगी न घेतां जातों आहों-आणि त्यांच्याचकडे-आपल्या पती-

कडेच जातों आहोंत, तर यांत कोणच्याही तऱ्हेचें असत्कृत्य आपण करीत नाहीं, उलट सत्कृत्यच--कर्तव्यच--करीत आहोंत, अशी तिच्या मनाची समजूत हळके हळके पटत चालली. आणि जों जों नियमित वेळ अगदीं जवळ जवळ येत चालला, तों तों ही तिची समजूत अगदीं दृढ होत चालली. आपण गेल्याबरोबर नव्हे, आपण अंथरुणावर नाहीं, घरांत नाहीं, असें कळतांक्षणींच आपल्या बापास फार वाईट वाटेल; परंतु आपल्या म्हणण्याप्रमाणें पतीनें त्यांस तावडतोब पत्र लिहिलें, कीं तें वाईट वाटणें दूर होऊन उलट आनंद व समाधान होईल, असेंही तिच्या मनास वाटूं लागलें.

अरेरे! गरीब बिचारी अजाण पोरगी! किती तरी कोत्या व एकारलेल्या दृष्टीनें आपल्या त्या कृत्याकडे पहात होती! आपणास पत्र आलें, हें खरोखर आपल्या पतीचेंच असेल काय? अशी शंकासुद्धां तिच्या मनास शिवली नाहीं. अक्षर त्याचें, सही त्याची, तेव्हां तें पत्र दुसऱ्या कोणाचें असणार? त्याचप्रमाणें आपण नाहींशा झालों, म्हणजे आपल्याबद्दल पित्यास काय वाटेल हा प्रश्न जरी तिच्या मनांत उभा राहिला, तरी आपल्या जाण्याचा लोकांत काय अर्थ होईल? आधींच आपल्यासारख्या सुशिक्षित व कित्येक बाबतींत लोकमताविरुद्ध वागणाऱ्या लोकांविषयीं साधारण लोक व शिंगें मोडून वासरांत शिरणारे दीर्घशहाणेही कशा प्रकारें बोलतात व लिहितात, आणि त्यांत आपल्या अशा गुप्तपणें चोरून नाहींशा होण्यानें त्यांस केवढी थोरली तरी संधि मिळेल, इत्यादि गोष्टी तिच्या स्वप्नांत सुद्धां आल्या नाहींत. कशा येणार? ज्या गोष्टीचें ज्ञान तिला आजन्मांत कधीं नाहीं, तें अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तिच्या मनांत येणार कोठून? तिचें चित्त आतां अगदीं एकाच मार्गाकडे लागून होतें. तिच्या अंतर्दृष्टीचा केंद्र या वेळीं एक होता. वाचकहो! श्रोवाचक हो! तुम्ही या अनाथ व अजाण पोरीस आपल्या मनांत सुद्धां तिच्या त्या निश्चयाबद्दल नांवें ठेवूं नका. तिजवरील प्रसंग मनांत आणा. आपला पति मृत झाला, आपल्यास वैधव्य आलें, अशा समजुतीनें रात्रंदिवस होरपळून जाणाऱ्या तरुण मुलीस तिच्या त्या पतीच्या हातचें पत्र आलें कीं, " मी मृत झालों अशी तुझी समजूत आहे, ती खोटी. मी जिवंत आहें, आणि तुझ्याकरितां दूरदेशाहून परत आलों आहें. तुझ्या ठिकाणीं अजून माझें प्रेम आहे. पण तुझ्या संबंधीं लोकांचा मला तिटकारा आहे. तुला मी पाहिजे असेन, तर तूं अमुक वेळीं अमुक ठिकाणीं आपल्या वडिलांस वगैरे न कळविनां ये. तुला तुझीच मंडळी पाहिजे असेल तर येऊं नको, अगर त्यांना कळवून बरोबर घेऊन ये. तुझ्यापुढें दोनही गोष्टी ठेविल्या आहेत. आतां पाहिजे ती गोष्ट घे. जर माझी अवज्ञा केलीस, तर मी असं समजेन कीं, माझं परत येणं तुला नकोच होतं. आणि तुला स्वैरपणें वागावयास पाहिजे आहे. तें कसंही असलं, तरी मीं आज तुला दोन गोष्टी तुझ्यापुढें ठेवून निवड करण्यास सांगितलं आहे. सवड दिली आहे. तुझ्या निवडीवर तुझं सुखदुःख अवलंबून आहे. ज्यांत तुला सुख असेल त्याचीच अर्थात् तूं निवड करशील हें उघड आहे. " असें आणीबाणीचें लिहून पत्र आलें, तर तुम्हीं काय केलें असतें किंवा काय कराल याचा विचार करा. " काय करावें ! " याचा विचार करा.

नका. म्हणजे तुमचें तुम्हांलाच असें दिसेल कीं, त्या गरीब पोरीनें जो निश्चय केला तोच तिला करणें शक्य होतें.

जर सर्व यथासांग झालें, तर आपल्या नवऱ्याची समजूत घालून आपण आपल्या बापाचें व त्याचें सख्य करूं. आपण सध्या अशा गुप्तपणें निघून गेलों, म्हणून बापास चार दोन दिवस वाईट वाटलें, तरी पुढें आपण आपल्या पतीसह त्यास भेटण्यास आलों, किंवा त्यांचेकडून त्यांस पत्र लिहविलें, म्हणजे ते आपलें दुःख, राग वगैरे सर्व कांहीं विसरतील, ही तिच्या मनाची पक्की खात्री. तेव्हां तिनें शेवटीं मोठ्या कष्टानें नवऱ्याच्या पत्राप्रमाणेंच करण्याचा निश्चय केला. ती उठली आणि तितक्यांत तिच्या मनांत एक विचार आला. आपण अशा अशा कारणानें गेलों, असें पत्रांत लिहून ठेविलें तर?—त्या पत्रांत आपण बापाला लिहून विनंति करूं कीं, तुम्ही माझा कांहीं दिवस शोध करूं नका, मी तुम्हांला चार आठ दिवसांत पत्ता कळवीन, तर ते ऐकतील, आणि मी कां गेलें, कोठें गेलें याच्याबद्दल त्यांच्या मनांत शंका न राहतां ते निर्धास्त होतील. बरो-बर! ही युक्ति कांहीं वावगी नाहीं. आणि असें केल्यानें पतीची अवज्ञाही होत नाहीं. पत्रांत कांहीं असें लिहिलेलें नाहीं कीं, तूं त्यांना मुळींच केव्हांही कांहीं कळवूं नको. निघतांना किंवा निघण्याच्या पूर्वी कळवूं नको, त्यांना कोणाला बरोबर घेऊन येऊं नको, इतकेंच. मग पत्र लिहून ठेवावयाला काय हरकत आहे? असा विचार तिच्या मनांत आला, परंतु तो विचार येऊन पुढल्या क्षणींच असेंही वाटलें, कीं तसेंही करणें कदाचित् आपल्या पतीस आवड-णार नाहीं. कळवूं नको, म्हणजे मुळींच कळवूं नको, असाच त्याचा अर्थ. तें कांहीं नाहीं, तसेंच निघून जावें. मग वेळेनुसार जमेल तसें कळवितां येईल. ठरलें. ती उठली. परंतु तिचें पाऊल कांहीं केल्या पुढें पडेना. तिच्या डोळ्यांवाटे अश्रुधारा एकसारख्या वाहूं लागल्या. आपण करतों आहों हें बरोबर आहे काय? आपल्याला आपलें या वेळचें कर्तव्य कोण दाखवील! जे दाखविणारे, त्यांना विचारण्याची सक्त मनाई आहे. आणि आपलें आपल्याला तर कांहीं समजेना.

एकवार आपल्या वडिलांच्या खोलींत जाऊन त्यांचें दर्शन घ्यावें आणि मग जावें असें तिच्या मनांत आलें. हा विचार मनांत येण्याचा अवकाश, तिनें तो अंमलांत आणलाच. सावकाश अगदीं चवड्यावर चालून ती त्यांच्या खोलींत गेली. तिचा बाप अंथरुणावर पडलेला नव्हता. टेबलाचे डावे बाजूस असणाऱ्या इझिचेअरवर पडून वाचतां वाचतां पुस्तक हातांतून गळून तसेंच छातीवर पडलें होतें, आणि तशीच त्यांस झोंप लागली होती. दिवा जवळच होता. त्याचा प्रकाश टेबलाचे वरचे बाजूस लाविलेल्या तिच्या आईच्या तुकत्याच करून आणलेल्या मोठ्या तजबिरीवर पडला होता. स्वाभा-विकपणेंच तिचें लक्ष्य तिकडे गेलें, आणि एकदम तिला रडूं कोसळलें. परंतु तें तिनें दाबलें. आपण मोठ्यानें रडूं लागलों, तर बाबा कदाचित् जागे होतील, आणि... आणि...परंतु हा विचार तिचे मनांत येतो न येतो तों तेथें पलीकडे असणाऱ्या घड्याळांत एक टोला पडला. त्याबरोबर ती चपापली. काय? एक वाजला! तर मग आपल्यास नेमून दिलेली वेळ टळून गेली! हाय हाय! विचार करतां करतांच

आपण आपला केवढा घात करून घेतला! आतां काय उपयोग? पण इतक्या लवकर इतका वेळ कसा गेला! दहा वाजतां सर्व मंडळी आपल्या आपल्या अंथरुणावर पडली, आणि इतक्यांत इतका वेळ गेला! इतका वेळ जाऊं नये असें वाटून, ती एकवार हळूच घड्याळापाशीं गेली, तों त्यावर साडे-अकरा वाजून एक मिनिट झालें होतें. एकाचा ठोका पडला तो अर्ध्या तासाचा होय. तें पहातांच तिला समाधान वाटलें. तितक्यांतल्या तितक्यांत चेहरा प्रफुल्लित झाला. अजून अवकाश आहे. आपल्या घरापासून स्टेशनावर जाण्यास पुरीं सात मिनिटेंही लागत नाहींत. आतां मात्र उशीर करतां कामा नये. परमेश्वराचें नांव घेऊन जावें, मग काय होईल तें होवो! असा विचार झाल्यानंतर तिनें पुनः एकवार आपल्या बापाकडे पाहिलें. ते अजून जशाचे तसेच पडले होते. त्यांना गाढ झोंप लागली होती. आपण येथून जाऊन आपल्या पतीची गैरसमजूत दूर करून पतीस परत घेऊन येई-पर्यंत अशीच यांना गाढ झोंप लागेल, तर किती बरें चांगलें होईल! मी गेलें, न विचारतां गेलें, कोणीकडे तरी नाहींशी झालें, हें कळण्याबरोबर होणारें दुःख त्यांस अशा स्थितींत दोन दिवस मुळींच अनुभवावें लागणार नाहीं. अरेरे, बिचारी पोर! तिला किती तरी दुःख झालें असेल! तेथून पाऊल काढतांना तिचें अंतःकरण किती तरी पिळवटलें असेल! तिनें एक उसासा टाकला. मी करतें आहें हें चांगलें करतें आहे काय? असा प्रश्न तिनें आपल्यासच विचारला. एकवार पुनः आपल्या बापाकडे तिनें पाहिलें. जणूं काय ते जागे न होतां आपल्यास त्या प्रश्नाचें उत्तर देतील असें तिला वाटलें. तेथून बाहेर पडण्यासाठीं ती त्या खोलीच्या दारापाशीं आली, आणि तिनें पुनः परत वळून पाहिलें, तों तिची नजर त्या तसबिरीकडे गेली. आपण आपल्या प्रेमळ व पवित्र मातेचा निरोप न घेतांच जात होतों हा केवढा वेडेपणा, असें मनांत येऊन ती तशीच मागें वळून दारांत उभी राहून त्या तसबिरीकडे पाहूं लागली. त्या तसबिरींतील तिच्या मातेचे नेत्र जणूं काय अश्रूंनीं भरून आले आहेत आणि त्या अश्रूंतूनच ती आपणाकडे पहात आहे. इतकेंच नव्हे, तर कोणीकडे चाललीस? असें विचारीत आहे, असाही तिला भास झाला; तूं जाऊं नको असेंही ती आपणास सुचवितें आहे काय? असा प्रश्न तिच्या मनांत उद्भवला. द्वारकाबाई प्राण सोडतांना जे शब्द ह्मणाली होती, जो आशीर्वाद तिनें तिला दिला होता, तो तिला या वेळीं आठवला; तेव्हां ती आपणास नको जाऊं म्हणून सांगेल हें तिला शक्य वाटेना. ज्या वेळीं आपलें मन जसें असेल तसें त्या वेळीं आपणास सर्व जग दिसत असतें एवढीच गोष्ट खरी. या मुलीच्या मनांत या वेळीं जाण्याची अत्यंत उत्कट इच्छा झालेली होती. अर्थातच तिला असें वाटलें कीं, आपली आई आपणास कधींही नको ह्मणणार नाहीं, कारण तिची तर अतोनात अशी इच्छा होती, कीं आपण आपल्या नवऱ्याकडे जावें. तेव्हां आपण आतां जाण्यास निघालों असतां ती कधींही आपणास नको ह्मणणार नाहीं. अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली. तिचें अंतःकरण अगदीं जावें अशाच हेतूनें भरलें होतें, यामुळें आतां ती आपली

नेहमींची अंगावर घेण्याची शाल अंगावर घेऊन निघाली. दाराच्या बाहेर पडणार तों तिला पुनः अशी इच्छा झाली कीं, आपण अमक्या कारणानें आणि अमुक ठिकाणीं जातों आहों अशी कांहीं तरी खूण ठेवावी. पण आतां तसा तिचा निश्चय झाला असता, तरी सुद्धां तिला आतां तसें करण्यास वेळ नव्हता. अर्थात् ती देवाचें नांव घेऊन व आईचें स्मरण करून बाहेर पडली.

ती रहात होती तेथून खरोखरीच ग्रँटरोड स्टेशन जवळ होतें आणि ती कित्येक वेळां त्या स्टेशनावरून कोटांत आपल्या शाळेंत गेली होती. तेव्हां तिला तेथें जाण्याचें कांहींच वाटलें नाहीं. परंतु तेथें गेल्याबरोबर आपला नवरा आपणास भेटेल, तो कोठें चल ह्मणेल ! आपण काय म्हणावें ? असे अनेक विचार तिच्या मनांत येऊं लागले. मनाची गति कांहीं विलक्षण असते याचा अनुभव कोणास नाहीं ? आपण पायानें दहा पावलें सुद्धां जाऊं शकणार नाहीं ! इतक्या वेळांत मन काशीयात्रा तर काय, परंतु पृथ्वीप्रदक्षिण सुद्धां करून येतें. आपल्याकडून ती इतक्या झपाट्यानें चालूनही थोडीशीच गेली असेल नसेल, तों तिला असें वाटलें कीं, आपला पति आपल्यास भेटून त्यानें असें म्हटलें कीं, "तूं आलीस यामुळेंच आतां तुझा माझा संबंध राहिला, नाहीं तर पुनः मी या प्रांतांत पाऊल सुद्धां घालणार नाहीं, असा निश्चय केला होता. आतां तूं अशीच माझ्याबरोबर चल. आपण कोठेंही पोटापुरतं मिळवून खाऊं. माझ्या बापाचं माझं आतां पटायचं नाहीं, आणि तुझ्या बापाचं मला नांव नको. तुला माझी गरज असली, तर मजबरोबर चल; नाहीं तर आल्या वाटेनं चालती हो. हो ना करण्याला मला वेळ नाहीं. हो असलं, गाडींत बस. तिकिट काढतों. ना असलं, चालती हो." जागेपणीं स्वप्न पडल्याचा अनुभव फार थोड्यांना असेल असें नाहीं. कांहीं एखाद्या गोष्टीचा विलक्षण अमल मनावर बसलेला असला, ह्मणजे अगदीं जागेपणीं, दुसरा कांहीं व्यापारव्यवहार चालला असतांना एकीकडे आपली कल्पना नानाप्रकारचे खेळ करीत असते. अशा या जागृतावस्थेंतील कल्पनाव्यापारांनाच जागृत्स्वप्न म्हणतात. तसें जागृत्स्वप्नच या वेळीं कमलेस पडत होतें. ती स्टेशनाकडे चालली होती. स्टेशनच्या पुलावरून पुलावरच्या दाराजवळ ती गेली असेल नसेल, तोंपर्यंत तिच्या मनांत वर सांगितल्या अर्थाचे कल्पनातरंग किती येऊन गेले आणि किती नाहीं याचा नेमच नाहीं. ती त्या दाराकडे गेली व इकडे तिकडे पाहूं लागली, तों कोठें तरी बाराचे ठोके पडले. आपल्या पत्रांत सांगितल्याप्रमाणें बरोबर बारा वाजतां आपण येऊन पोहोंचलों, एक मिनिटाचा सुद्धां उशीर झाला नाहीं, हें पाहून तिचें तिलाच समाधान झालें; आणि ती आंत शिरूं लागली, तों इतक्यांत तिच्याजवळ एक इसम येऊन तिला म्हणतो, "आपलं नांव कमळाबाई काय ?" तो प्रश्न ऐकतांच कमळाबाईनें चपापून मागें पाहिलें. जो आवाज आपल्या कानीं पडेल असें तिला वाटत होतें, तो आवाज तो नव्हता, हें उघड होतें, आणि तोच तो आवाज असता तर आपण अमक्या ना, असा प्रश्नही पण होताना. तेव्हां हा विचारणारा कोण असें आपल्याशींच ह्मणून तिनें एकवार त्या इसमाकडे बारीक नजरेनें पाहिलें व

नंतर " होय " असें उत्तर दिलें. तें उत्तर त्या गृहस्थानें ऐकतांच तो पुढें तिला म्हणालाः-" आपल्याला पद्माकरपंतांचं पत्र पोहोंचलं असं दिसतं. पोहोंचलंना ? पोंचलंच असलं पाहिजे. नाहीं तर इतक्या नेमक्या कशा आलां असतां ? बरं झालं आलांत, पद्माकरपंतांनींच मला येथें पाठविलं आहे. ते दादरच्या स्टेशनावर थांबले आहेत. माझी आणखी आपली ओळख नाहीं, तेव्हां अशा अपरात्रीं आपण माझ्यासारख्या परक्याबरोबर कशा याल, अशी मीं त्यांना शंका बोलून दाखविली, परंतु त्यांनीं मला ही पत्राची खूण सांगितली. माझ्या पत्रावरूनच ती तेथें आली तर येणार आहे. तेव्हां पत्राची खूण सांगण्याबरोबर ती ओळखील आणि तुजबरोबर येईल. नाहीं आली, तर तिची मर्जी; पण तूं जा, असंही शेवटीं जरा त्रासानं ते म्हणाले. तेव्हां मी आलों आहें. आपण बिनदिक्कत चला. मनांत शंका नको. "

घरांतून निघतांना कमलाबाईस इतकी शंका वाटली नाहीं इतकी आतां वाटूं लागली. मला ग्रांटरोडच्या स्टेशनावर बोलावून आपण स्वतः तेथें न येतां दादरच्या स्टेशनावर बसून अनोळखी परक्या माणसास येथें पाठविलें, याचा अर्थ काय ? पण एकंदर पत्राच्या खाणाखुणा सांगितल्या त्यांवरून माणूस तिकडच्या विश्वासांतलाच खास, असें तिला वाटलें.

# प्रकरण ५९ वें.

## बळवंतरावास कळल्यावर.



क्षणभर विचार. क्षणभर विचारालाच कायती फुरसत होती. काय करावें ? हा माणुस सांगतो, या खुणा तर बरोबर आहेत. नाहीं तर याला पत्राची व आंतील मजकुराची माहिती कशी असावी ? पाठविलेला असावा तिकडूनच. आतां विचार कसला ? विचार करावयाचा, तर घरांतून निघतांनाच. तो जर आपण धाम करून इकडे निघून आलों, तर आतां दुसरा विचार नाहीं. जसें पहिलें पाऊल टाकिलें, तसेंच दुसरें, तसेंच तिसरें. कांहीं कारणानें त्यांना येणें बरें वाटलें नसेल दुसरें काय ? किंवा आयत्या वेळीं कांहीं काम उत्पन्न झालें असेल. इतकाच विचार करण्याला वेळ होता. आणि कमळेनें पण तितकाच विचार केला. भलताच कोणी आला असून आपल्याला फसवून दुसऱ्याच कोठें नेईल, ही कल्पनासुद्धां तिच्या मनांत एक वेळ आली, परंतु नवऱ्यास भेटण्याच्या उत्कंठेनें ती तत्काळ दूर झाली. तो गृहस्थ पुढें झाला. त्यानें तिकिटें काढलीं होतीं. गाडींत पाय ठेवून दोघेंही आंत शिरलीं आणि गाडी सुरू झाली.

परंतु आपण आतां तिला व तिच्या त्या बरोबरीच्या गृहस्थाला तसेंच सोडून देऊन दुसरीकडे जाऊं. दुसरा दिवस उजाडला. बळवंतराव रात्रीं मध्येंच जागे झाले, तों दिवा जळत आहे. असें पाहून उठले आणि दिवा मालवून आपल्या आंथरुणावर जाऊन पडले. बिचाऱ्यास, सकाळीं उठतांच आपल्या पुढें काय वाढून ठेवलें आहे, याची कल्पनाही नव्हती, कोठून असणार ? दिवस उजाडला. पहाटेस त्यांचा मुलगा गोपाळा अभ्यासासाठीं उठला. परंतु त्याचें लक्ष्य कमळेकडे गेलें नाहीं. तिच्यावर तो दुष्ट दुःखाचा प्रसंग गुदरल्यापासून तिला कोणीही जाऊन लवकर उठवीत वगैरे नसे. अगदीं उजाडलें तेव्हां मात्र ती अजून कां निजली आहे, हें पाहाण्यासाठीं बळवंतराव स्वतःच गेले, तों ती अंथरुणावर नाहीं. तें पहातांच ते दचकले. एकाएकीं त्यांच्या मनांत फार चिंता उत्पन्न झाली. तथापि ती प्रातर्विधि उरकण्यासाठीं खालीं वगैरे गेली असेल असें म्हणून पण गोपाळास त्यांनीं तिला पाहाण्यासाठीं खालीं पाठविलें. त्यास कोठेंही तिचा शोध लागला नाहीं. अर्थातच वर येऊन कमळा खालीं कोठें नाहीं असें त्यानें आपल्या बापास सांगतांच बळवंतरावांचा चेहरा अगदीं काळा ठिक्कर पडला. गोपाळा खालीं गेला असतां बळवंतरावांच्या ध्यानांत आलें कीं, कमळेचा जोडा कोठें दिसत नाहीं. आणखी थोड्या वेळानें ध्यानांत आलें कीं, तिची शालजोडीही कोठें दिसत नाहीं. तें पहाण्याबरोबर तो विशेष चपापला. ती कोठें तरी गेली असावी असा अर्थातच त्याचा तर्क झाला. पण कोठें गेली असावी ! आणि कोठेंही गेली असली, तरी आपल्याला सांगितल्या विचारल्याखेरीज गेली कशी ? हा विचार मनांत येऊन त्यास कसेंसेंच झालें. तसेंच कांहीं कारण झालें असेल आणि म्हणून ती आपल्याला न उठवितां न विचारतां कोणाला भेटण्याला गेली असेल. आतां येईल अशी त्यानें आपल्या मनाची समजूत करून घेतली. परंतु अशी समजूत कशी होते ! जिनें इकडचें पाऊल तिकडे ठेवावयाचें, तर कधीं आपल्या आईस किंवा बापास विचारल्याखेरीज ठेवलें नाहीं. तिला आजच्यासारख्या स्थितींत, कितीही जरूर उत्पन्न झाली असली, तरी ती न सांगतां न विचारतां जाईल, ही कल्पनासुद्धां त्याला होईना. कांहीं जरूरीमुळें न विचारतां गेली या कल्पनेपेक्षां निराळ्या कल्पना मनांत येऊं लागल्या, परंतु त्या त्यांनीं तशाच दाबल्या. पण असें किती वेळ चालणार ! एक एक क्षण अधिक अधिक लोटत चालला, तसतशी त्यांची चित्तवृत्ति फार चमत्कारिक होऊं लागली. ' मन चिंती तें वैरी न चिंती ' ह्मणतात तें खोटें नाहीं. त्यांच्या मनांत नानाप्रकारचे विचार येऊं लागले ! तिच्या जाण्यासंबंधानें कुकल्पना तर त्यांच्या मनांत मुळींच येईना. मनास मुळींसुद्धां शिवेना. परंतु अशी कां गेली ! कोठें जाऊन तिनें आत्महत्या तर केली नसेलना ? निदान त्या बेतानें तर ती गेली नसेलना ? असा प्रश्न मनांत उभा राहिल्याबरोबर त्यांच्या अंतःकरणांत अगदीं धस्स झालें. आणि एकदम कोठें शोध करावा आणि काय करावें असा मनांत गोंधळ होऊन ते आपल्या त्या ईझीचेअरवर धाडकन् पडले. आपल्या मुलास त्यांनीं एक दोन ठिकाणीं स्नेह्याच्या घरीं—सहज जाऊन ये ह्मणून सांगून पाठविलें होतें. परंतु कांहीं पत्ता लागेल अशी त्यांची समजूत नव्ह-

तीच. कोठेंही जावयाचें झालें, तरी ती आपल्याला कळविल्याखेरीज कधीं जाईल हें त्यांना मुळींच संभवनीय वाटलें नाहीं. कसें वाटावें! त्यांनीं तिला शिक्षणच तसें दिलें होतें. आणि त्या शिक्षणाचा परिणाम विपरीत असा कधींच होणार नाहीं, हेंही पण त्यांस पक्केपणीं वाटत होतें.

अशी कांहीं मनाची चमत्कारिक स्थिति चालली असतां, घरांतली स्वयंपाकीण-बाई आली व कमला घरांत नाहीं, चुलींत अजून विस्तव वगैरे कांहीं नाहीं, असें पहातांच तिनें बळवंतरावांस येऊन विचारलें कीं, 'कमलाबाई कुठें आहेत?' तो त्या बाईचा प्रश्न ऐकण्याबरोबर त्यांना तिला काय उत्तर द्यावें हेंच सुचेना. आजपर्यंत त्यांनीं कधीं कोणास खोटें कांहींच सांगितलें नव्हतें; परंतु आज आतां खोटें बोलण्याचाच त्यांजवर प्रसंग आला. कोठें गेली हें आपल्याला ठाऊक नाहीं असें कसें सांगावें! असें सांगावें, तर या बाईला काय वाटेल! आणि ती तेथून गेली ह्मणजे सगळ्याभर कंडी काय पिकवील? हा विचार त्यांच्या मनांत उभा राहिला; आणि त्यावरून आणखीही विचार आला, कीं आणखी कांहीं वेळ आपल्या मुलीचा आपणास शोध लागला नाहीं तर, ती नाहींशी झाली आहे ही बातमी पसरल्याखेरीज राहणार तरी कशी? एक आणि दोन! अनेक विचार व कल्पना त्यांच्या मनांत उभ्या राहिल्या. इतक्यांत बाईनें त्यांस पुनः विचारलें, तेव्हां त्यांनीं तिला किंचित् त्रासून 'कुठें बाहेर गेली आहे' असें उत्तर दिलें. परंतु तें उत्तर देतांनाच त्यांच्या चित्तास कसेंसेंच वाटलें. परंतु मनुष्यावर संकट आलें, ह्मणजे मग काय! जसा वारा वाहील तशी पाठ देण्याचा मनुष्यावर आल्याखेरीज रहात नाहीं; आणि तसा प्रसंग आला ह्मणजे मनुष्याला त्यांतून निसटण्याचें मोठें संकट पडतें. अगदीं असत्य बोलावयाचें नाहीं. असें ह्मटलें, तरी तें होऊं शकत नाहीं. शिवाय खरें न बोलणें आणि मुकाट्यानें बसणें यांतही अंतर आहे. आपल्या मनास जें वाटेल, किंवा जें कांहीं वस्तुतः असेल, तें विपरीत करून सांगणें हें निराळें, आणि आपण होऊन कांहीं न बोलणें हें निराळें. बळवंतरावांनीं जें उत्तर दिलें तें वस्तुतः अक्षरशः खरें होतें, परंतु त्यांत "ती कुठें बाहेर गेली आहे तें मला ठाऊक आहे" असा जो ध्वनि होता, तो ध्वनि त्यांच्या चित्तास टोंचीत होता; तथापि बळवंतराव तरी मनुष्यच होय. आपली मुलगी आपल्यास विचारल्याखेरीज कोठें तरी गेली असें सांगणें आणि तसें सांगितल्यावर त्या बाईला खुशाल वाटेल तें बाहेर बोलण्याची एक तऱ्हेनें मुभा देणें बरें वाटलें नाहीं, यांत नवल काय?

बळवंतरावांनीं दिलेल्या उत्तरानेंच बाईला चमत्कारिक वाटलें. कमला आज इतके दिवसांत कोठेंही गेली नव्हती, तेव्हां ती आजच एकाएकीं कशी गेली, असें वाटून ती थोडा वेळ आश्चर्य करीत राहिली. नंतर "या सुधारकांच्या मुलींचं काय! गेली असेल कुठें शाळेबिळेंत" असें म्हणून ती आपल्या कामास लागली. आणखी थोडा वेळ गेला. कमलेचा मुळींच पत्ता नाहीं गोपाळा चार ठिकाणीं जाऊन आला तेथें कांहीं पत्ता नव्हता. तो परत आला. दहा वाजले, रोजची जेवायला बसण्याची वेळ झाली. तरी कमला कोठें नाहीं, हें पहातांच बळवंतराव अगदीं हताश झाले. काय करावें आणि कोठें

कसा शोध करावा हेंच त्यांस समजेना. त्यांचा मुलगा जर असा गेला असता, तर हजार ठिकाणीं जाऊन त्यानें शोध केला असता तरी कांहीं हरकत नव्हती, परंतु आतां जाऊन कोणालाही माझी मुलगी येथें आली आहे काय, असें विचारणें म्हणजे केवढा विलक्षण प्रसंग ?

बिचारी कमला जेव्हां दारांतून बाहेर पडली तेव्हां उद्यां सकाळीं आपल्या बापावर असा विकट प्रसंग येईल, आपल्याबद्दल चौकशी करणें म्हणजे सुद्धां त्यांना एक जबरदस्त दिव्यच होणार आहे, ही कल्पनासुद्धां तिच्या मनांत आली नाहीं. आपण आपल्या पतीकडे जातों आहोंत, तर तसें जाण्यास मुळींच हरकत नाहीं, आपण व आपला पति एकत्र होतांच त्यांचेकडून आपल्या वडिलांस तावडतोब पत्र पाठवून त्यांची काळजी दूर करून टाकूं असा तिच्या मनाचा पक्का विश्वास; पण तें पत्र जाऊन पोंचेपर्यंत त्यांच्या मनाची काय अवस्था होईल, आणि लोकांत आपल्याबद्दल काय विपरीत विचक्षणा सुरू होतील, याची विचारांस कल्पनासुद्धां झाली नव्हती. तिच्या कल्पनेंत जें आलें नाहीं, तें वस्तुतः होणार नाहीं असें थोडेंच आहे ! दहा साडेदहा वाजून जातांच प्रथमतः बळवंतरावांनीं आधीं आपल्या कचेरींत चिठ्ठी पाठविण्याची तजवीज केली. आणि "स्वयंपाक तसाच ठेवून तुम्ही जा; मी सावकाश जेवीन, तुम्ही खोळंबूं नका;" असें त्या स्वयंपाकीणबाईस सांगून त्यांनीं लावून दिलें, स्वयंपाकीणबाईनें ताडलें, कीं आजचें लक्षण कांहीं निराळें आहे, रोजचें लक्षण नव्हे. आणि तशा बायांस नैसर्गिक अशी जी जबर कल्पनाशक्ति, तिच्या साहाय्यानें तिनें तें सर्व लक्षण काय व कसलें आहे तें तेव्हांच ताडलें. बळवंतरावांच्या घरचें काम झालें, म्हणजे बाई आपल्या बिऱ्हाडीं जाऊन जेवीत असे. परंतु आज तिला आपल्या कल्पनेनें ताडलेलें तें सर्व लक्षण कोठें-तरी केव्हां जाऊन सांगेन असें झालें. आणि ती आपल्या बिऱ्हाडाकडे न जातां आपल्या एका खाणावळवाल्या मैत्रिणीकडे गेली. तिला आज वेळही होता, कारण बळवंतरावांनीं तिला लवकर सोडून दिलें होतें. तेथें गेल्याबरोबर आधीं तिनें आपल्या सुधारक यजमानाची सुधारक मुलगी पळून गेली ही बातमी अगदीं गुपित सांगितल्याप्रमाणें आपल्या मैत्रिणीच्या कानांत सांगितली. आणि मैत्रिणीनें मोठ्यानें "आजपर्यंत पळून गेली नाहीं हेंच नवल, यांचीं नाकं अशींच ठेंचलीं पाहिजेत !" असें म्हटलें. तें ऐकून एका जेवणारानें बाईस "कोण ? कोण पळून गेली ?" असें अर्थातच विचारलें. त्यावर बाईनीं "असेल कोणी मर्णाजवरी" असें म्हणून सर्व पाढा वाचला. अर्थातच त्याजवर यथास्थित टीकाही सुरू झाली. बाईनीं स्वतः टीका करावयाची ती केली. तेव्हां इतरांनीं त्यावर मखलाशी चालवून आपल्याही कल्पनाशक्तीला थोडेंबहुत चालन दिलेंच. असें चालन त्या जेवणारांपैकीं प्रत्येकानें दिल्यानंतर मग काय विचारतां ! प्लेगच्या जंतूंचा प्रजाविस्तार अगदीं विचित्र असें साधारणतः हल्लीं लोक समजतात, परंतु लोकमुखांत कोणाचें उणें पडलें म्हणजे निंदाविस्तार जो होत जातो, त्याच्या पुढें प्लेगजंतुविस्तार खरोखरी कांहींच नाहीं. याप्रमाणें त्या दिवशीं त्या स्वयंपाकीणबाईच्या द्वारें कमळेच्या प्रयाणाची वार्ता

एकसारखी पसरत चालली. तिला तें दिवशीं जेवणसुद्धां सुचलें नाहीं. जेवल्याच्या आधींच तिनें आपल्या पांचचार मैत्रिणींना बातमी सांगितली व एकीच्या येथें जेवून पुढें तोच क्रम चालविला. तिच्या मैत्रिणींनीही तिला कमी मदत केली असें नाहीं. प्रत्येकीनें आपापल्याकडून जितकी मदत करावयाची तितकी केली व त्या मैत्रिणींना आश्रय देणारांनींही आपल्याकडून होईल तितकी मदत केली.

बिचारा बळवंतराव इकडे अगदीं गोंधळांत पडला होता. कुठें चौकशी करावी, काय करावी, त्यांस कांहीं सुद्धां सुचेना. जेथें कोठें जावें तेथें प्रथम आपलीच नाचक्की व्हावयाची, प्रथम आधीं, 'मुलगी कांहीं लहान नाहीं; अशी कशी गेली ?' असें जो तो विचारणार. पोलिसांत एकवार वर्दी द्यावी असेंही त्यांस वाटलें. परंतु हा विचार पुरता मनांत येतो न येतो, तोंच तो त्यांनीं दूर सारला. हा विचार भलताच कसा आपण मनांत आणावा ? मुलीला कोणीं कोठें फसवून तर नेली नसेलना ? पण फसवून नेली असें जरी असलें, तरी मुलीची अब्रु आणि चुडबुड्याचा पापोद्रा हीं अगदीं सारखीं. दोनींही फार नाजूक आणि दोहोंसही अत्यंत सूक्ष्म धक्का लागला, तरी मोठा धोका ! दोनींही एकदां भंगलीं म्हणजे कधीं चटकन् जोडून यावयाचीं नाहींत. तेव्हां पोलिसांत वर्दी देणें म्हणजे आपल्या हातानें आपण आपली नाचक्की करून घेणें होय. मग आतां करावें तरी काय ? त्यानें त्या बाईस जेवणाचें तसेंच ठेवून जा असें सांगितलें, परंतु जेवणाकडे त्यांचें मन मुळींच गेलें नाहीं. जाणार कसें ? गोपाळास त्यांनीं जेवायला सांगून मुद्दाम शाळेंत जाण्यास सांगितलें. परंतु मग त्याच्या मनांत काय आलें, त्यांनींच 'त्याला शाळेंत जाऊं नको, इथेंच अस' असें सांगितलें. तो बिचारा अगदीं खिन्न होऊन बसला होता. त्याला अजून लोकशक्तीचें ज्ञान नव्हतें. अर्थातच तो आपली ताई गेली असावी कोठें याबद्दल तर्क करीत बसला. आपल्या बाबानें कोठें जाण्यास सांगितलें, तर जाण्यास तो तयार होऊन बसला होता. बळवंतराव जेथें बसले होते तेथेंच स्वस्थ पडल्याप्रमाणें दिसत होते. एका मनाखेरीज त्यांचीं सर्व इंद्रियें अगदीं स्तब्ध झालीं होतीं, जणूं काय तीं अगदीं निर्बळच झालीं होतीं. मनांत विचार मात्र इतक्या जोरानें आणि इतके येत होते कीं, त्यांनीं एक त्यांच्या मस्तकांत वादळच माजवून टाकलें होतें. कांहीं केल्या त्यांस कांहीं सुचेना. इतक्यांत तोफ झाली, म्हणून त्यांनीं घड्याळाकडे पाहिलें, तों बारावर एक वाजला होता. इतक्यांत एक वाजला याचें त्यांस क्षणभर नवल वाटलें. परंतु नुसतें नवल करण्याची ती वेळ नव्हती. इतका वेळ स्तब्धपणा झाला तो बस्स झाला, असें वाटून ते उठले. उठून वळून पहातात, तों त्यांची दृष्टि आपल्या पत्नीच्या तसबिरीकडे गेली. आणि ती जिवंत असतांना जर असा प्रसंग झाला असता, तर आज तिला किती वाईट वाटलें असतें, असें त्यांच्या मनांत एकदम आलें. तोच विचार मनांत घोळत राहून त्यांनीं एकसारखी त्या तसबिरीकडे टक लाविली. अशा तऱ्हेनें टक लावून ते उभे असतां त्या तसबिरीच्या खालच्या टेबलाखालीं एक पत्र पडलें आहे असें त्यांस वाटलें. प्रथम असेल आपल्यालाच

आललें कोणाचेंतरी वाचून आपणच टाकलेलें, असें मनांत येऊन तिकडे दुर्लक्ष्य केलें. त्यांस एकदम असें वाटलें कीं, आधीं आपल्या मित्राला एक तार करावा. या हेतूनें ते त्या टेबलाजवळ तार लिहिल्यासाठीं गेले. तों पुनः त्यांचें त्या पत्राकडे लक्ष गेलें; आणि तें उचलून वर ठेवावें असें त्यांस वाटलें. लागलीच वांकून त्यांनीं तें पत्र उचललें. तें घडी केलेलें होतें. ठेवतां ठेवतां त्यांच्या नजरेस कांहीं अक्षरें पडलीं. त्या अक्षरांवरून त्यांस तें पत्र सबंद वाचण्याची इच्छा झाली आणि वाचावें कीं न वाचावें हा विचार करण्याची ती वेळही नसल्यामुळें, अर्थातच त्यांनीं तें वाचण्यास आरंभ केला. प्रारंभींचीं कांहीं वाक्यें वाचतांक्षणींच त्यांचें मन कांहीं चमत्कारिक झालें; आणि समग्र वाचून होतांक्षणींच ते अगदीं निचेष्टपणें—एखाद्या पाषाणमूर्तीप्रमाणें—उभे राहिले. हा एकंदर प्रकार आहे तरी काय, त्यांस कांहीं समजेना. एखाद्या मनुष्यास गेंगशुद्ध पाडण्यास औषध दिलें असतां त्याचीसुद्धां स्थिति इतकी चमत्कारिक होणार नाहीं, अशी त्यांची स्थिति झाली. ते तें पत्र हातांत धरून ईझीचेअरवर जाऊन पडले आणि पुनः तें आपल्या डोळ्यांसमोर धरून त्याच्याकडे एकसारखें पहात राहिले. तें पत्र वारंवार वारंवार त्यांनीं सुमारें दहा वेळां तरी वाचलें असेल. परंतु त्यांतला अर्थ त्यांच्या मनांत उतरल्याचें चिन्हच कांहीं त्याच्या तोंडावर दिसेना. शेवटीं एकवार त्यांच्या तोंडून पुढील उद्गार निघाला:—“तर मग काय आतांपर्यंत आपल्या हातून झाला हा सगळा मूर्खपणाच झाला! आज ती या पत्रामुळं गेली? पण मला विचारल्यावांचून! अशी ती कधीं जायची नाहीं. आपल्या मुलीची आपल्याला पक्की माहिती असतांना आपण अजून अशा शंका घेतों! पण नाहीं म्हणावें, तर ती गेली कशी? आणखी कुठें? याचा तपास काय? तपास लावणार तरी कुठें आणखी कसा?” असे अनेक उद्गार व प्रश्न आपल्याशींच काढीत व विचारीत स्वारी बसली असतां प्रभाकर त्यांचेजवळ येऊन उभा राहिलेलाही त्यांना समजलें नाहीं.

त्यांच्या डोळ्यांसमोर त्यांनीं तें पत्र तसेंच धरलें होतें. तेव्हां ते कांहीं तरी वाचण्यांतच गढले आहेत असें वाटून त्यांचें वाचन संपेपर्यंत आपण उभें रहावें, असा विचार करून तो तसाच स्तब्ध उभा राहिला. परंतु पांच, सहा, सात, दहा मिनिटें झालीं, तरी अजून ते आपल्या समोरचें पत्र हालवीतही नाहींत, आणि उलटीतही नाहींत, तेव्हां कांहीं तरी विचारांत गढून गेले आहेत, पत्र कांहीं वाचीत नाहींत, अशी त्याच्या मनाची खात्री झाली व त्यांच्या विचारांचा विनाकारण भंग करूं नये म्हणून तो हळूंच गोपाळा आपल्या खोलींत होता तेथें गेला. जातांच त्यानें गोपाळास पाहून नावडतीनें विचारलें, “तूं आज घरीं कां? काका घरीं कां? आणखी कमलाताई कुठें गेली?” गोपाळानें त्यास पहातांच त्या मुलाच्या मनावरलें एक मोठें थोरलें ओझें जणूं काय उतरल्याप्रमाणें झालें आणि त्यानें प्रभाकरास म्हटलें, “प्रभाकरदादा, तूं आलास फारच चांगलं झालं. तूं बाबाकडे जा आणखी त्यांच्याशीं कांहीं तरी बोल.” असें म्हणून सकाळपासूनची हकीकत त्यास सांगितली. ती ऐकतांच प्रभाकर अगदीं चपापून गेला. तो या वेळीं अशाच हेतूनें आला होता कीं, कमळाताई एकटी असेल,

तिला भेटून आपण कांहीं पाहिलेली गोष्ट तिला सांगावी, पण आतां येऊन पहातो, तों कमळाताईचा मुळींच ठिकाणा नाहीं, आणि हें विपरीत ऐकतांक्षणींच त्याच्या मनाची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली. आपण जें कांहीं पाहिलें, आणि जें सांग-ण्यासाठीं ह्मणून कमळाताईकडे आलों होतों, त्याच्याशीं तर तिच्या जाण्याचा संबंध नसेलना? असें एकदम त्याच्या मनांत आलें, आणि तो तडक पुनः बळ-वंतरावदादांच्या खोलींत ते पडले होते तिकडे गेला. आणि आपण काय पाहिलें होतें, तें त्यांना सांगावें म्हणून त्यानें लाग-लीच त्यांस हांक मारिली. त्याबरोबर ते शुद्धीवर आल्याप्रमाणें उठून उभे राहिले, आणि 'कोण, प्रभाकर? तूं केव्हां आलास?' असें घाबऱ्या घाबऱ्या त्यांनीं त्याला विचारलें. त्यानेंही त्यांना "आप-ल्याला आल्याला फार वेळ झाला, आपण एक वेळां इथें येऊन तुम्हीं विचार कर-ण्यांत गुंतलां होतां म्हणून गोपाळाकडे गेलों. त्यानं आपल्याला सकाळची हकी-कत सांगितली. तेव्हां मींही आज कांहीं एक चमत्कारिक गोष्ट पाहिली; आणखी ती आपल्याला लवकर सांगावी, तिच्या-पासून कदाचित् कांहीं उलगडा झाला तर होईल, म्हणून आलों आहें," असें म्हटलें. त्यांनीं लागलीच त्यास ती गोष्ट काय हें विचारतांच त्यानें हळूच सर्व सांगितलें. तें जें काय सांगितलें तें फारच हळू त्यांच्या कानांत सांगितलें. तें ऐकतांच बळवंतरावाची चित्तवृत्ति अगदीं चमत्का-रिक होऊन गेली. प्रभाकराकडे ते फारच चमत्कारिक दृष्टीनें सुमारें पांच मिनिटें पहात राहिले. नंतर आपण एकदम म्हण-तात, "हा एक कागद पहा हा वाचलास म्हणजे तूं जें काय पाहिलंस त्यांत कांहीं तरी तथ्यांश आहे असं स्पष्ट समजून येईल. वाच. वाच. कांहीं हरकत नाहीं. काय माझ्या इच्छा, काय माझे बेत, परंतु त्या सर्वांना काय चमत्कारिक प्रकारचं स्वरूप आलं! आपल्या इच्छेप्रमाणं होतं-होतंसं इतकंच नव्हे, तर झालं झालंसं वाटून पटकन् तिसरंच झालं. मी आपल्या आयु-ष्याच्या पूर्वभागांत जितकं सुख भोगलं, तितकं आतां मला दुःख भोगावं लागणार कीं काय कोण जाणे! या पोरीच्या लग्नाच्या भानगडींत मी पडलों नसतों तरी आजला किती सुखी असतों. परंतु मला केवढा मोह पडला. आनुवंशिक गुण पुढल्या पिढींत यायचेच हा विचार माझ्या मनाला त्या वेळीं शिवलासुद्धां नाहीं. शेवटीं जुने लोक म्हणतात तेंच खरं कीं, जें व्हायचं असेल तें कधीं चुकणार नाहीं. असो; इतकं जरी झालं, तरी अजून माझ्या मनाची अशी पक्की खात्रीच आहे कीं, शेवटीं सगळं ठीक होऊन जाणार आहे."

हें त्यांचें बोलणें चाललें असतां प्रभा-करानें त्यांच्या हातून तें पत्र घेऊन त्याज-वरून डोळा फिरविला, आणि वाचतां वाचतां त्यालाही फार आश्चर्य वाटलें. आपण सकाळीं कांहीं पाहावयाला आणि आतां एकदम हा सर्व प्रकार आपल्या नजरेपुढें येण्याला एकच गांठ पडली, याचेंच त्यास फार आश्चर्य वाटलें. नंतर तो पुनः बळवंतरावांच्या कानांत कुज-बुजून, व "तुम्ही असेच बसा, मी आतां एका ठिकाणीं कांहीं शोध करून येतों," असें मोठ्यानें बोलून तेथून निघाला. तो परत येईपर्यंत ते अगदीं स्वस्थ बसले होते. आपल्या मुलीचा शोध करण्यास जाण्यास जणूं काय त्यांचे हात पाय वाही-नातच. त्यांचें सर्व चित्त प्रभाकर येतो केव्हां इकडे लागलें होतें.

# प्रकरण ६० वें.

## पांड्यांनीं चुणूक दाखविली !



रंतु या मंडळीस आपण आतां कांहीं वेळ आपल्या काळजींतच सोडून दुसरीकडे जाऊं. काकासाहेबांस आपण सोडून दिल्यास बरेच दिवस झाले. याच महिन्यांत त्यांनीं आपल्या म्हटल्याप्रमाणें व बिंदुमाधव पांडे यांच्या मागण्याप्रमाणें रकमा देण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें त्यांस हळू हळू पांच सहा हजारांपर्यंत रक्कम पोहोंचविली. या रकमा कोणीकडे आणि आपण कशासाठीं देतों आहोंत याचें कांहींसुद्धां कोणास कळूं दिलें नाहीं. घरच्या कारकुनास हिशेब ठेवण्याच्या वेळीं सुद्धां रकमांची कच्ची हकीकत कळविली नाहीं. फक्त आमच्या मुंबईच्या सावकाराकडून उसनवार जमा अमुक रुपये आणि ते आपले ( काकासाहेबांच्या ) नांवें खर्ची घालावे असें सांगण्यांत आलें. पण कोणाला कशाला दिले आणि त्याच्या मोबदला काय आणलें किंवा घेतलें याचा पत्ता नाहीं. कारकून लोक म्हणजे कसले छटू. त्यांना यजमानानें स्वतः जरी एकादी गोष्ट सांगितली नाहीं, किंबहुना छपवून ठेवण्याचा यत्न केला, तरी ते सुतानें स्वर्गाला जाणारे पक्के असतात. त्याचप्रमाणें काकासाहेबांच्या दिवाणजीचीही स्थिति होती. यजमान आपल्यापासून अमुक एक गोष्ट लपवून ठेवूं पहाताहेत असें कळताच कारकून मंडळी मुद्दाम त्याबद्दल शोध करूं लागतात. आमच्या काकासाहेबांचे कारकून ह्मणजे त्या नियमाला कांहीं अपवाद होते असें नाहीं. जो गृहस्थ हिशेबास लाविल्यावांचून एक कवडीसुद्धां कधीं कोणाला द्यावयाचा नाहीं, तो आज एकदम हजार हजार रुपयांच्या रकमा कोणाला तरी देतो, याचा अर्थ काय? अशी शंका त्यांस येऊन त्यांनीं शोध चालविला, व तेव्हांच शोध काढला, कीं आपले यजमान भलत्याच नादीं लागले आहेत, किमयेच्या नादानें मनुष्य कोणत्या वेळीं किती रकमांना बुडेल, आणि किती नाहीं, हें मुळींच सांगवत नाहीं. जो गृहस्थ जरूर काजाखेरीज कधीं कोणाला एक दिडकी देणार नाहीं, तो हजार हजार रुपये अगदीं अचानक उचलून देऊं लागला, ह्मणजे त्यास त्या किमयेच्या वेडानें, अर्थातच तांब्याचें एकदम सोनें करण्याच्या हावरेपणानें पक्कें पछाडिलें ह्मणून समजावें. ज्याप्रमाणें इतर कित्येक व्यसनें मनुष्यास आपला पक्का दास करून टाकतात, त्याचप्रमाणें, किंबहुना त्यापेक्षां जास्त, द्रव्यलोभरूप व्यसन मनुष्याची अगदीं विचित्र अवस्था करून सोडते. जिना चढून अगर उतरून जाणाऱ्या

मनुष्यानें आपण एकदम पंधरा वीस पायऱ्या उडून जाव्या असें मनांत आणून प्रयत्न चालविला, कीं समजावें त्याचें भरत आलें. तो आपल्या प्रयत्नांत केव्हां तरी आपल्या प्राणास मुकणार. तद्वत्, हळूहळू द्रव्यसंचय करण्याची लज्जत लागलेल्या मनुष्याच्या डोक्यांत एकदम, फार श्रम न करतां जादूमंत्रांनीं एकदम कोट्यधीश बनण्याची इच्छा आली, आणि ती इच्छा तृप्त करण्यासाठीं वाटेल तितक्या रकमा खर्च करण्यास त्यानें सुरुवात केली, कीं हा आतां कधींना कधीं तरी रसातळास पोहोंचणार असें समजावें. काकासाहेबांचा कारकून फार वर्षांचा, आणि त्यांच्या अन्नास इमानानें जागणारा होता. हें वाक्य वाचतांच वाचकांस बरेंच आश्चर्य वाटेल. कारण सध्याच्या काळीं आपल्या यजमानाच्या हितास जपणारे आणि कधींही त्यांचें अहित होतेंसें दिसलें, तर तावडतोब आपल्याकडून होईल तितकी खटपट करून तो प्रसंग टाळणारे कारकून किंवा नोकर फार क्वचित्, किंबहुना अगदीं दुर्लभ. असें असतां काकासाहेबांसारख्याला असा कारकून मिळाला कसा ! ( त्यांतही आणखी काकासाहेबांसारख्याला ! ) परंतु ज्यांनीं एकंदर सृष्टिव्यवस्था नीट सूक्ष्म रीतीनें पाहिली असेल, त्यांस याबद्दल मुळींच आश्चर्य वाटावयाला नको; आणि वाटावयाचेंही नाहीं. जेथें जें नसावें असें आपल्यास वाटतें, तेथेंच तें असतें, असा अनुभव आपणांस किती 'वेळां तरी आलेला आहे !

काकासाहेबांचा कारकून त्या मानानें विशेष इमानी होता आणि त्यानें आपल्या यजमानास हा विचित्र नाद लागलेला पाहिला, तेव्हां त्यांस त्यापासून परावृत्त करण्यासाठीं काय करावें आणि काय नाहीं, असें त्यास होऊन गेलें. यजमानाच्या पुढें तर बोलण्याची त्याची मुळींच प्राज्ञा नाहीं आणि यजमानीणबाईंचें वय या असल्या गोष्टी मुळींच कळावयाच्या नाहींत इतक्या बेताचें ! कांहींना कांहीं तरी करून यजमानांच्या मनाला त्या नादापासून परावृत्त केलें पाहिजे, असें मनांत येऊन त्यानें त्याबद्दलची खटपट करण्याचा प्रयत्न चालविला. परंतु त्या प्रयत्नापासून काय निष्पत्ति झाली, हें पहाण्यास आपणांस थोडा अवधि आहे. त्याच्या पूर्वीं आपल्याला दुसऱ्या कित्येक गोष्टी पाहिल्या पाहिजेत. तेव्हां या कथानकाचीं आटपतीं सूत्रें वाचकांच्या नजरेसमोर नीटपणें येतील.

काकासाहेबांनीं बिंदुमाधवास पांच हजारांपर्यंत रक्कम देण्याचें कबूल केलें होतें, त्याप्रमाणें रक्कम पुरी करतांच ते अर्थातच त्याच्या नादीं विशेषच लागले. आपण एवढी थोरली रक्कम दिली, परंतु आतां ही आपली रक्कम परत येते, कीं समूळ नाहींशी होते, ही काळजी गृहस्थास क्षणभरसुद्धां चैन पडूं देईना. उठल्या सुटल्या ते आतां एकसारख्या त्या नव्या सोनापुरगल्लींतील शौण्डीरशाळेंत जाऊन बसावयाचे असा क्रम चालला होता ! अर्थातच बिंदुमाधव आतांशा बहुतकरून तेथें नसत. आणि यांना रात्रीं नऊ नऊ दहा दहा वाजेपर्यंत तिष्ठत बसावें लागे. नंतर ते अखेरीस यावयाचे नाहींत, त्यांचा कोणी तरी माणूस येऊन दुकान बंद करून जावयाचा व आज पांडे काम करून परस्पर घरीं गेले ह्मणून सांगे. दोन चार वेळां असें झाल्यानंतर एक वेळां असें झालें कीं,

काकासाहेबांनीं त्यांचें घर कोठें आहे तें विचारलें, तर त्यास, घर कोठें आहे तें ठाऊक नाहीं, असें उत्तर मिळालें. आणि दुसऱ्या खेपेस घरीं कोणीच जाण्याची सक्त मनाई आहे असेंही खडखडीत उत्तर मिळालें. मग काय विचारतां? काकासाहेबांच्या मनाची अगदीं त्रेधा उडाली. आपण पैसे दिले हा गाढवपणा झाला काय? अशी त्यांची त्यांनाच शंका वाटूं लागली. आणि जशी एखाद्या मेल्या माणसाची एखाद्यानें हाय घ्यावी, तशी त्यानें त्या गेलेल्या रकमांची हाय घेतली. पुढें एक दोन वेळां असें झालें कीं, ती शौण्डीरशाळा मुळीं उघडलीच नाहीं. बिचारा झानाराव सतरा जिने चढून वर जाऊन दाराशीं तीन प्रहर बसला, पण कुत्रेंसुद्धां तेथें आलें नाहीं. हा एकंदर प्रकार आहे तरी काय? याची कांहींच त्यास कल्पना होईना. अद्यापि त्याच्या असें मात्र मनांत येईना कीं आपण ज्या माणसाच्या नादीं लागलों आहों, तो केवळ भामट्या असून आपण त्याच्या भुलथापीस फसलों. आज नाहीं उद्यां तो येईल, आणि आपण त्यास गांठून एकदां स्पष्टपणें विचारावें कीं, तूं कबूल केल्याप्रमाणें आपलें काम तरी कर, नाहीं तर माझी रक्कम परत दे. मी दुसऱ्याकडून ती उसनवारीनें व्याजानें आणली आहे. असें जरा चरचरावून बोलून सोडलें, कीं आतां तो खरें काय आहे तें आपल्याला सांगून टाकील. आहे त्याच्यापाशीं कांहीं तरी इलम, याबद्दल काकासाहेबांस मुळींच कांहीं शंका नव्हती. पण तो इलम आपल्याला न सांगतां किंवा कांहीं तरी भलतें सांगून फसवून आपली रक्कम खाऊन बसले कीं काय, हें त्यांस भय वाटे. तेंही प्रथम प्रथम कांहीं वाटलें नाहीं; परंतु आतांशा रक्कम पदरीं पडल्यानंतर पांड्यांची मुळींच गांठ पडेनाशी झाली, तेव्हां विशेष शंका येऊं लागली. होतां होतां काकासाहेबांनीं एक दिवस फार त्रासून जाऊन त्या शौंडीरशाळेंतल्या शिपायापाशीं फारच त्रासून असे उद्गार काढले कीं, पांड्ये आतां मला जर भेटले नाहींत, तर मी पोलिसांत वर्दी देऊन त्यांची चौकशी करवीन. तो त्यांचा उद्गार अर्थातच पांड्यांच्या कानीं गेला. त्याबरोबर, धनुष्याची दोरी वाजवीपेक्षां फाजील ताणून ठेवावयाला पाहतों आहोंत हें चांगलें नाहीं; असें मनांत आणून त्यांनीं शौण्डीरशाळेंत एक दिवस—म्हणजे काकासाहेबांनीं त्रासोद्गार काढले त्याच्या दुसरेच दिवशीं काकासाहेबांस दर्शन दिलें आणि काकासाहेबांस पहिल्या प्रथम म्हटलें:—"बसू आपण कोणच्या श्रद्धेनं आणखी कशा मनानं आमच्याजवळ रक्कम दिली आहे याची परीक्षा पाहावयाची होती, म्हणूनच इतके दिवस अशा चाळवण्या दाखविल्या. मला जसं पहिल्यापासून वाटत होतं तसंच बरोबर ठरलं; पण मी आतां या वेळीं बोलत नाहीं" अरे व्यंक्या, आमच्या त्या मुशी खालच्या पेटींत आहेत तेवढ्या बाहेर काढून माझ्याजवळ आणून दे, आणखी भट्टी पेटवून तूं आतां इथून जा. आतां आम्हांला एकांतांत चांगला एक प्रहर असूं दे. कोणी आला, तर खालच्या खोलींच लावून दे, समजलास काय? जर एकांताचा भंग झाला, तर खबरदार! माझं एक लाख रुपयांचं नुकसान होईल. तुला बजावलं आहे." असें बोलून त्यानें आपल्या त्या नोकरास नेत्रसंकेत केला.

नोकर जातांच ते काकासाहेबांकडे वळले व त्यांस म्हणतात, "हं काकासाहेब,

या आतां, आज आपल्यासमक्ष थोडासा योग करून दाखवितों. चला उठा त्या भट्टीच्या खोलींत जाऊं. तिथें सगळी तयारी आहे. तयारी मोठ्या प्रमाणावर केलेली नाहीं. हा पहा, हा पांच तोळ्यांचा तांब्याचा तुकडा आहे. याचे पांच तोळे बरोबर सोनं झालं म्हणजे आपला थोरला प्रयोग साधणार म्हणून ह्मणायला मुळींच हरकत नाहीं. हें पांच तोळे सोनं होईल तें कसोटीला लावून तावून सुलाखून चार ठिकाणीं दाखवून आणलंत, तरी सुद्धां भय नाहीं. हें म्हणजे कृतीनं—किमयेनं केलेलं सोनं आहे असं कोणाला सुद्धां वाटणार नाहीं. त्यांतच तर कारवाई आहे, नाहीं तर त्यांत अर्थ काय ? पण बाजारांत मिळणाऱ्या सोन्याच्या बरोबर उतरेल हें मी बोलून दाखवितों आहें यांत अर्थ काय ? वास्तविक जर आम्ही पक्कं सोनंच आतां करणार, तर तें अमक्याच्यासारखं आहेनू तमक्यासारखं निघेल, असं ह्मणण्यांत अर्थ तरी काय ? आपली तुमची समजूत करण्याकारितां कांहीं तरी बोलतों आहें. चला उठा, आंत जाऊं या. भट्टी छान पेटली असेल. चला, चला, " असें म्हणून ते तेथेंच एका कपाटापाशीं गेले आणि त्यांतून त्यांनीं एक मुळी काढली. ती मुळी हिरवी होती. आंतल्या खोलींत गेल्याबरोबर त्यांनीं त्या मुळीचा आपल्या हातानें रस काढण्याची सुरुवात केली. थोडयाच वेळांत तो रस तयार झाल्यावर बिंदुमाधव पांड्ये यांनीं एक मूस घेतली व त्या मुशींत तो तांब्याचा तुकडा काकासाहेबांनीं आपल्या हातांनीं टाकावा, पाठीमागून तो मी कधीं पाहिला होता वगैरे बोलण्यास व वाटेल त्या सबबी सांगून झालेल्या ठरावांतून निसटून जाण्यास सवड ठेवावयाची नाहीं, अशा हेतूनेंच त्यांच्या हातानें तो तुकडा मुशींत टाकविला. नंतर ती मूस त्यांनीं त्यांच्या हातांनींच भट्टींत घालावी असा पांड्यांनीं आग्रह धरला. " कोणीकडूनही आम्हीं तें पाहिलं नव्हतं, हें पाहिलं नव्हतं, हें खरंच कशावरून, तें खरंच कशावरून, अशा प्रकारच्या शंका काढायला आपल्याला अवकाश राहूं नये; म्हणून मीं हें आपल्या हातून सारं करवतों आहें, दुसरं कांहीं नाहीं. " असें पांड्यांनीं त्यांस बोलून दाखविण्याचा सपाटाच चालविला होता. भट्टींत मूस पडल्यानंतर मात्र पांड्ये तेथें अगदीं जवळ बसले व तोंडानें त्यांनीं कांहीं मंत्रांचा अगदीं एकसारखा उच्चार सुरू ठेविला. दर पांच पांच दहा दहा मिनिटांनीं त्या मुशींत ते त्या मुळीच्या रसाचे थेंब पाडीत आणि वांकवांकून पाहात. मध्येंच हंसत. नंतर एकदां आणखी रस पाहिजे ह्मणून ते उठून गेले व लागलीच येऊन त्यांनीं आपल्या दोनही तळहातांच्या कडांत मुळी दाबून तिचा रस रगडून त्या मुशींत पिळला. नंतर सोनार फुंकणीनें फुंकतो व चिमट्यानें मूस नीटनेटकी करतो, त्याप्रमाणें काम चालविलें. काकासाहेबांचें आतां इतकें लक्ष्य त्यांच्याकडे नव्हतें. कारण आतां लक्ष्य ठेवण्याचें कांहीं कारणच नव्हतें. मूस इकडची तिकडे, तिकडची इकडे व निखारे खालींवर, खालीं वर करतां करतां बिंदुमाधव पांड्यांनीं एकदम आनंदोद्गार काढला.

त्याबरोबर काकासाहेबांनींही त्यांस 'काय झालं ?' ह्मणून विचारलेंच. तेव्हां त्यांनीं त्यांस चटकन् सांगितलं कीं, " आपलं काम झालं. हें काम साधलें; आतां तुमच्या मनांत असलं तर लाख दोन लाख

रुपयांचं सुद्धां सोनं एका प्रहरांत बनवून देतों. आहोहो ! पण मी कोणाशीं बोलतों आहें ? ज्याला माझा मुळींच विश्वास नाहीं आणखी जो मला पोलिसांत अडकवायला पाहात होता त्याच्याशीं. बस् झालं. चला काकासाहेब, हें घ्या तुमच्या तांब्याच्या तुकड्याचं सोनं. हें जसं कांहीं इतके दिवस तुमची रक्कम मजकडे राहिली म्हणून आपलं व्याज घ्या. आणखी आपलं मुद्दलयू आत्तां घेऊन जा. आपल्याला कांहीं बोआ आतां तुमच्याशीं व्यवहार नको. अगदींसुद्धां नको. तुह्मी पोलिसांत वर्दी देऊन काय माझ्या गळ्याशीं घोंगडं आणलं असतंत, आणखी काय नाहीं, काय सांगावं ! "

असें ह्मणून बिंदुमाधवांनीं त्यांचेकडे अगदीं बावन्नकशी सोन्याचा तुकडा फेंकला. हा तुकडा अगदीं तांब्याच्या तुकड्याप्रमाणें बरोबर आकारानें होता. जेथें त्याला खोंच होती, तेथेंच याला खोंच; जेथें त्याला टोंक तेथेंच याला टोंक, असें अगदीं बरोबर होतें. मात्र आतां तो वजनांत जरा जड लागूं लागला आणि त्याचें तेज तर अगदीं विचारूं नये असें तळपूं लागलें. काकासाहेबांचें चित्त अगदीं गुंग होऊन गेलें, डोळे दिपले आणि त्यांनीं तो तुकडा शून्य चित्तानें, परंतु अत्यंत आतुरतेनें हातावर घोळून घोळून पाहिला. इतक्यांत त्यांचे किमयागार बिंदुमाधव त्यांस म्हणतात, " कां ? आतां कां स्वस्थ बसलां ? उठा, तो कशीचा दगड घेऊन त्यावर घांसून बघा. कोणचीही परीक्षा केल्यावांचून ठेवूं नका. पक्की खात्री करून घ्या. मला ठक समजत होतां, तो मी ठक नव्हे. पोलिसांत वर्दी देण्याची कांहीं जरूरी नाहीं, एवढी तुमच्या मनाची खात्री झाली म्हणजे माझं काम झालं. मला काय रोज एक गुंजभर इतकं सोनं केलं म्हणजे संपलं. पण ठक हा काळा शिक्का बोडक्यावर बसायला नको. चार दिवस मी तुम्हांला भेटलों नाहीं, तर तुम्ही मला ठक वगैरे ठरवून पार करून टाकलंत आणखी पोलिसांत कळवण्याच्या बेतांत आलांत मग मला आमच्या गंगाकुंडशास्त्रीबोआंकडून—आमच्या गुरूंकडून बोलावणं आलं आहे, त्याप्रमाणं जर ताबडतोब गेलों असतों तर तुम्हीं माझ्या पाठोपाठ वारंटच लावून दिलं असतं नव्हे का ? शाबास ! आतां आपली ही माझी तुह्मांला आठवण ह्मणून हा तुकडा घ्या. आणखी आपले रुपये रोकठोक मोजून घेऊन चालते व्हा. मला भिक्षा एवढीच घाला कीं, माझ्यासारखा कोणी सिद्ध पुरुषाचा शिष्य तुम्हांला भेटला, तर त्याला ठक महाठक असं समजून त्याचा छळ करूं नका. काय चमत्कार आहे पहा ! तुह्मी माझ्या नादीं लागूं नका, म्हणून मी आपण होऊन तुह्मांला सांगत होतों. तुह्मी ऐकलं नाहीं. माझी मर्जी नसतांना मला या नादांत पाडलंत, आणखी त्याच कामाकरितां कुठं गेल्या—आल्यामुळें मला तुमची गांठ घ्यायला झालं नाहीं, तर माझ्यावर पोलिसचं वारंट काढण्याचा धाक घातलात. आतां तुह्मांला ह्मणावं काय ? अरे व्यंक्या, कुठं आहे रे ती आपल्या या थोरल्या पेटीची किल्ली ? आण, आण लवकर. यांची ती रक्कम ठेवली आहे ती यांची यांना देऊन टाकूं दे. आणखी यांना इथून घालवून दे कसा. पुनः इथें येऊं देत जाऊं नको. हे मोठे जरी झाले, तरी आपल्या घरचे. आपल्यासारख्या सिद्ध पुरुषांच्या शिष्यांना काय करायचा आहे

यांचा मोठेपणा! चल, आण लवकर किल्ली. करायचे काय ते रुपये? अरे, आम्ही तर त्याला अंतःकरणांतून अगदीं विष्टेप्रमाणंच समजतों. हं, चला महाराज, काकासाहेब, तो तुकडा खिशांत घालता-तना? तो आह्मी तुह्मांला बहाल करतों."

काकासाहेबांनीं मध्यंतरीं बोलण्यास अनेक प्रयत्न केले, परंतु त्यांस अवकाश मिळेना. शेवटीं ते मोठ्यानें ओरडून ह्मणतात, "महाराज, मी खरोखर पोलिसाच्या नांवाचा उच्चारसुद्धां केला नाहीं. या आपल्या शिपायानं आपल्याला कांहीं सांगितलंन्, दुसरं कांहीं नाहीं. मीं इथें हेलपाटे घालून घालून त्रासून एक दिवस म्हणजे परवांच इतकंच ह्मटलं कीं, 'काय करावं बोआ यांची गांठ पडत नाहीं. आणखी पुढें काय करायचं, काय नाहीं.' इतकंच मी बोललों. हीं एवढींच माझीं अक्षरं. आणखी त्याचं तुह्मांला कांहीं तरी भलभलतंच समजवून सांगितलंन् हो यानं. यांत कांहीं अर्थ आहे बरं? गड्यामाणसांवर अशा बाबतींत विश्वास ठेवायचा याचा अर्थ काय? मी अगदीं वाटेल तसला शपथ वाहून आपल्याला खरोखर असं सांगतों, कीं पोलीस हीं अक्षरंसुद्धां मी इथें उच्चारलीं नाहींत."

"काकासाहेब," बिंदुमाधव पांडे त्यांस एकदम मोठ्यानें हंसून ह्मणतात, "आपण कांहीं ह्मणा, आपल्यासारख्यांना मी खोटं बोलतां असं म्हणणं म्हणजे अगदीं वेडगळपणा आहे, चुकीचंहो कदाचित् होईल पण खरं पुसाल, तर हा आमचा शिपाई सत्य भाषणाच्या कामांत अगदीं माझ्यासारखाच हुबेहुब आहे. तो कधींसुद्धां खोटं बोलायचा नाहीं. तेव्हां आपण रागाच्या भरांत कांहीं बोललां असाल. पुढें आतां आपल्याला स्मरण नाहीं आपण काय बोललों तें, असं ह्मणा पाहिजे तर, पण तो बोलला तें खोटं असं आपण मनांतसुद्धां आणूं नका. अहो, कांहीं नाहीं तरी आज आठ दहा वर्षं आमच्याजवळ तो आहे! कधीं एक अक्षरसुद्धां खोटं बोलल्याचा अनुभव आह्मांला नाहीं; किंवा कांहीं कोणत्याही प्रकारची त्यानं लबाडी केल्याचा अनुभव आह्मांला नाहीं. मग तुह्मी त्याच्यावर गरीबावर कां उगीच कोलमडतां? आपले रुपये आह्मीं घेतले आहेत, तर आपल्याला आमच्याबद्दल संशय येणं अगदीं साहजिक आहे. आह्मी जें करावयाचं कबूल केलं आहे, तें जितक्या लवकर होईल तितक्या लवकर आमच्याकडून करून घेण्यासाठीं आपण आतुर होऊन हेलपाटे घालणं हेंही पण बरोबर आहे. आणखी आम्ही तुह्मांला भेटलों नाहीं, ह्मणजे आह्मी टाळाटाळी करतों आहोंत ठकबाजी चालवली आहे. असंही पण आपल्या मनांत येणं साहजिक आहे. तसं मनांतच आलं, म्हणजे पोलिसाचा धाक तुम्हीं आह्मांला घालणं हेंही पण अगदीं साहजिक आहे. त्यांत ह्मणजे मी आपल्याला दोष देतों, किंवा कांहीं माझी नाराजी होते आहे आपल्यावर असं नाहीं. पण मला असला धंदा करून विनाकारण अप्रतिष्ठा करून घेण्याची इच्छा नाहीं, एवढंच माझं ह्मणणं आहे. दुसरं कांहीं नाहीं. तुमच्या हितासाठीं मीं होय ह्मटलं, पण तुमचं हित करण्याचं एकीकडेच राहून माझी जर अप्रतिष्ठा मात्र होऊं लागली, तर त्यांत काय राहिलं? तसं नको. आतां तुह्मी आपली रक्कम घेऊन जाऊन मला मोकळा कराल, तर त्यांतच माझी खुषी. आतां केलेला सो-

त्याचा तुकडा तुमच्या हातांत पडलाच आहे. तुमची रक्कमही तुमच्या खिशांत खुळखुळूं लागली, म्हणजे मग तर कांहीं आह्मांला ठक ह्मणण्याला तुम्हांला कारण रहाणार नाहींना? झालं तर, चला उठा, घ्या आपली रक्कम. एवढं कशाला पाहिजे?"

असें म्हणून पांड्ये जरा त्वेषानेंच उठले व तितक्यांत तेथें आलेल्या व्यंकयाच्या हातून किल्ली घेऊन मोठ्या आवेशानें आपल्या त्या पेटीजवळ गेले.

आतां ही रक्कम घेतल्यास आपली सर्व किमया बुडाली, सोनें करून घेण्याची आशा गेली, असें वाटून काकासाहेब त्यांच्या मागोमाग, "नको नको, मला रक्कम नको. आपल्याला नको असेल तर मी पुनः शोधालामुद्धां येणार नाहीं. पण असं रागावून मला आपल्यापासून दूर ढकलूं नका. नवळ केला आहांत तसा एकदां आपल्यासारखा सिद्ध करून सोडा" असें ओरडत गेले. परंतु बिंदुमाधव अगदीं ऐकेनात. त्यांनीं पेटीसुद्धां उघडली, शेवटीं काकासाहेबांनीं जेव्हां, "आपण खुशाल वाटेल तें करा. मी असाच निघून जातों." असें ह्मणून खरोखर जिन्याकडली वाट धरली, तेव्हां पांड्यांनीं पुनः पेटी लावून त्यांस आपलेजवळ बोलाविलें, आणि आपल्या आजपर्यंतच्या वर्तनाबद्दल त्यांनीं त्यांना विवेचन करून सांगितलं, "काकासाहेब, मी आतां तुम्हांला टाळण्याचं खरं खरं कारण सांगतों, ऐका. तुह्मी दिलेली रक्कम घेऊन पुनः मी हिशोब करून पहातां मला असं आढळून आलं, कीं आपला हिशेब चुकला. एक लाख रुपये किमतीचं अस्सल बावन्नकशी सोनें बनवायला रुपये साडेआठ नऊ हजार लागतात. तुम्हांला तर मी पांचच हजार बोलून चुकलों. मग आतां कसं करायचं? आपल्याजवळच पुनः मागेन, तर आपल्याला शंका येणार, ह्मणून मी आपली दुसरीकडून व्यवस्था करीत होतों. आपल्याला मधें भेटलों, तर हें मागावं लागेल, ह्मणून मी आपल्याला टाळलं. आपला बाणा तर असा, कीं खोटं कधीं बोलायचं नाहीं. मग काय? पण दुसरीकडे तजवीज होत नाहीं, कारण जो तो अर्धा भाग मागतो. आपली संमति असल्याखेरीज मी कसा कबूल होऊं त्या गोष्टीला? आपण आह्मां का कबूल अर्धा भाग द्यायला."

"छे. छे. छे, भलतंच एखादं. अहो, मीच तुह्माला तितकी रक्कम देतों. अहो, एवढ्या कारणाकरितां का तुह्मी मला टाळीत होतां? शाबास! मी उद्यां तुम्हांला रक्कम आणून देतों, मग तर झालं. आतां अगदीं बोलूं नका. मी वेळ पडल्यास बायकोचे दागिने गहाण टाकीन, पण तुमची तजवीज उद्यां संध्याकाळच्या आंत करतों."

बिंदुमाधवांनीं कां कूं करून गोष्ट कबूल केली.

दुसरे दिवशीं रुपये आले कीं काय तें पढें पाहूं.

---

# प्रकरण ६१ वें.

## खड्डा खणला तो साधला?



सुताचे धागे प्रथम अगदीं विस्कळित असतात, परंतु ते कांहीं नियमित प्रमाणानें व नियमित स्थानीं बांधले ताणले गेले, ह्मणजे त्यांपासून चित्रविचित्र रंगांचें किंवा फूलपत्तीच्या नक्षीचें कापड बनतें. मात्र सर्व धागे कसेकसे व कोठें कोठें जुळवावयाचे तें लक्ष्यांत धरून विणकाम केलें गेलें पाहिजे. जी स्थिति वीणकामाची, तीच स्थिति रज्जु बनविण्याच्याही कामाची असते; आणि जी रज्जूच्या कामाची तीच विचित्र कथा रचणाराच्या कामाचीही आहे. त्यास कोणताही धागा दृष्टिआड होऊं देतां उपयोगी नाहीं. कांहीं वेळ हातीं न घेतलेले धागे नियमित वेळीं उचलून घेऊन योग्य ठिकाणीं आणून गुंतविलेच पाहिजेत. ज्या रंगाच्या धाग्याचें जितकें महत्त्व असेल, जितकी ज्याची झांक ज्या वस्त्रांत पाहिजे असेल, तितकी आणावयाच्या जागीं तितकें सूत घालून दिलें पाहिजे, आणि शेवटल्या पदरांत सर्वत्रांचें एकीकरणही झालें पाहिजे. हें लक्ष्यांत धरूनच कथापटाचें वीणकाम केलें पाहिजे, आणि त्या विणीकडे लक्ष्य देऊनच त्या पटाच्या भोक्त्यांनीं त्याचें निरीक्षण केलें पाहिजे. असो, हें तत्त्व ध्यानांत ठेवलें ह्मणजे आम्ही आपल्या कथांतून मुख्यें मुख्य कथौघास केव्हां केव्हां सोडून गौण कथाभागांकडे कां वळतों हें सहज समजणार आहे.

ब्यांकेची हकीकत वाचकांसमोर आणल्यास बरेच दिवस झाले, आणि इतके दिवसांत ब्यांकेची स्थिति कशी काय झाली, तिचे भागीदार किती झाले, मुद्दल किती वाढलें, पत किती वाढली, पहिल्या सहामाहीलाच जनरल सभा भरून पातीदारांस किती डिव्हिडंड मिळेल असें दाखविण्यांत आलें, आणि सहामाहीची जनरल सभा भरल्यानंतर तिचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला, त्या रिपोर्टांत ब्यांकिंग् ब्यूरोचा बडेजाव किती गौरवानें गाइला गेला, वगैरे गोष्टी वाचकांस अद्यापि सांगावयाच्या आहेतच. परंतु त्या सांगण्यापूर्वीं आपण दुसऱ्या एका ठिकाणीं जाऊन कांहीं घडत असलेली हकीकत पहाणें जरूर आहे.

दोन व्यक्ति त्या एका इंग्रजाच्या बंगल्यांत बसल्या होत्या. त्यांतील एक ब्रम्ही गृहस्थाचा पोषाख केलेला होता व सरा इंग्रज गृहस्थ होता. प्रथमतः दोघेही गृहस्थ आपल्या विचारांत निमग्न झालेले दिसले. एकाच्या पुढें कागद असून तो कागद वाचण्यांत अगदीं निमग्न झाला होता. दुसरा त्याच्याच चर्येकडे पाहून जणूं काय त्याच्या चर्येवर काय काय विचारभेद होतो आहे हें सूक्ष्मपणें

अवलोकन करीत होता. त्या दुसऱ्या गृहस्थाच्या डोक्यास मोठें थोरलें टक्कल पडलेलें असून त्यामुळें त्याच्या मुद्रेत एक प्रकारचा विशेष गंभीरपणा दिसत होता. तें पत्र वाचून झाल्यानंतर तो त्या दुसऱ्या गृहस्थास हिंदुस्थानींत ह्मणतो, " आपणास इंग्रजी चांगलं येत नाहीं, पण हिंदुस्थानी येतं हें तरी चांगलं आहे. कारण मला बंगाली मुळींच येत नाहीं. आपल्याविषयीं साहेबांनीं फारच शिफारस करून लिहिलं आहे. ठीक आहे. आमचाही डोळा तिकडे आहेच. परंतु आपण येऊन जी ही हकीकत आमच्या निदर्शनाला आणून दिली, तिनं आमचा संशयाचा बराच उलगडा झाला. आपण सांगतां तीच ही मंडळी आहे कीं नाहीं याबद्दल मला आतां शंका नाहीं. आपण काळजी करूं नका. या लोकांत विशेष हुषार असा माणूस एकच आहे. त्याला धरला कीं, मग तुम्हाला कोणच्याही गोष्टीची काळजी नको. मी तुह्माला एक मौज दाखवितों. थोडा वेळ आपण बसा. हल्लीं या लोकांचं एक जबरदस्त कारस्थान चाललं आहे. तें कारस्थान अगदीं परिपक्व होण्याच्या बेतांत आलं आहे; अशी त्यांची समजूत झाली आहे. परंतु जी स्थिति रंगूनमध्यें झाली, तीच येथें होऊं नये ह्मणून ते फार सावधगिरी करताहेत. अजूनपर्यंत त्यांची समजूत अशी आहे कीं, आपण जें कारस्थान रचतों आहोंत, तें अगदीं उत्तम प्रकारें पार पडणार आहे आणि त्यांत कांहींसुद्धां कमीपणा होणार नाहीं. ज्याप्रमाणं रंगून येथें केलं, त्याप्रमाणं करण्याची जरूरी पडणार नाहीं. तेथें झालेल्या चुका येथें होऊं नयेत म्हणून त्यांनीं आपल्याकडून फार चांगली खबरदारी घेतली आहे, अशी त्यांच्या मनाची पक्की पक्की खात्री आहे. आणि त्या खात्रीच्या भरावर त्यांनीं सगळा कारभार चालविला आहे. परंतु आपल्या इमारतीखालीं केवढा थोरला डोंब थोड्याच वेळानं पेटून आपली व आपल्या इमारतीची राखरांगोळी करण्यास तयार आहे, याची त्यांस शंका सुद्धां नाहीं! आपण आपल्या या कागदांत ज्या व्यक्तींची चेहरेपट्टी दिली आहे, ती मंडळी तीच आहे याबद्दल आह्मांला तर कांहीं शंका नाहीं. आणखी तुमची खात्री होण्यासाठीं आतां तुमच्याबरोबर आमचा एक हुशार माणूस देऊन खात्रीही करून देऊं. परंतु इतक्यांतच त्यांच्यावर झांप टाकून तुह्मी त्यांना सावध करूं नका. ती मंडळी ज्या कांहीं विवक्षित कारस्थानांत गुंतली आहे, त्यांत तिनं अधिकाधिक गुंतून गुरफटून जावं असंच आमच्या मनांत आहे. तशी ती एकदां का जाळ्यांत सांपडली म्हणजे फार बहार होणार आहे. मुंबई तली प्रमुख बदमाष मंडळींपैकींच सात आठ मंडळी नाहींशी होऊन लोकांच्याभोंवतींचा केवढा थोरला तरी त्रास चुकणार आहे. एक टोळीची टोळी हस्तगत झाली असं म्हणायला हरकत नाहीं. मग तुम्हांला फारसे श्रमच करायला नकोत. पाखरं तुमच्या तिकडलींच इकडे उडून आलेलीं यांत शंका नाहीं."

एखाद्या मनुष्याचा स्वभाव असा असतो कीं, त्याला आपलें आपलेंच बोलणें ऐकणें फार आवडतें, त्यापुढें दुसऱ्याचें बोलणें कांहींच किंमतीचें वाटत नाहीं. त्यांपैकीं ही स्वारी असावी असें दिसलें; निदान त्यांच्यासमोर असणाऱ्या गृहस्थास तरी तसें वाटलें असावें. कारण तो स्वस्थपणें त्याचें बोलणें ऐकून घेत होता.

मध्यंतरीं त्यानें आपल्यास या गृहस्थाचें बोलणें ऐकूं येत आहे इतक्या पलीकडे कांहींसुद्धां दिसूं दिलें नाहीं; त्याचें बोलणें संपल्यानंतरही किती वेळ तरी तो अगदीं स्वस्थच बसला होता. जणूं काय जें काय आपण ऐकलें तें फार विचार करण्यासारखें आहे तेव्हां विचार करून मनांत उतरून घेतलें पाहिजे म्हणूनच तो तसा स्वस्थ विचार करीत बसला असावा. नंतर बराच वेळ झाल्यावर तो त्यास म्हणतो, "आपण पाठवलेल्या कागदांवरून मला आपली मदत कशा संबंधांत पाहिजे आहे हें सहज समजणारच आहे. आपण सांगतां या गोष्टीवरून आपलीही नजर त्या मंडळीवर आहे हें ठीकच. माझ्या ध्यानांत आलें. मग काय! आपलं आमचं एकच काम झालं. या मंडळींना तिकडे तोंड दाखविणं शक्य नव्हतं, परंतु त्यांनीं कांहीं युक्ति करून कांहीं कागद तिकडे रवाना केले. ते कसे केले, कोणाच्या हातानं केले हें आमच्या लक्ष्यांतही आलं. परंतु ज्याच्या हातून ते कागद तिकडे पोहोंचते झाले तो अगदीं निरपराधी, त्याला आपण काय करतों आहोंत याची कांहींसुद्धां माहिती नाहीं. त्याची समजूत या माणसांनीं अशी करून दिली कीं, आपल्याला मोठी नौकरी देण्याबद्दलचं शिफारसपत्रच यांत आहे. यामुळं झालं काय, कीं तो तेथें आला व यांचा केवळ हलकारा बनून सहज काम करून गेला. पुढं त्याचा आम्ही तपास लावूं लागलों, तों तोही कोठं निघून गेला. सांपडेना. शोध करतां करतां असं आढळून आलं कीं, तोही इकडेच आला आहे. त्याचाही शोध लागला असतां या माणसांची आणखी माहिती सहज लागणार आहे. करितां त्याही इसमावर डोळा राहील अशी तजवीज करावी अशी माझी सूचना आहे. मग आपल्या चित्तास जसं येईल तसं खरं."

दुसरा गृहस्थ तें ऐकून किंचित् विचार करीत बसला. त्याच्या कपाळास आंठ्या चढल्या. नंतर थोड्या वेळानें त्यानें मान हलवून, "बरं बरं, पाहूं काय होतं तें!" असें म्हटलें आणि एक वेळ घड्याळाकडे पाहिलें. तों किती वाजले तें पाहून त्यास फार आश्चर्य वाटलेंसें दिसलें. जणूं काय इतक्यांत इतके कसे वाजले, असें वाटून तो इकडे तिकडे पाहूं लागला. दाराकडे दृष्टि चार पांच वेळ गेली, आणि अशा स्थितींत सुमारें चार मिनिटें गेल्यानंतर एकदम त्रासल्याप्रमाणें होऊन तो अर्धवट आपल्याशींच व अर्धवट दुसऱ्या त्या समोर बसलेल्या गृहस्थाला उद्देशून म्हणतो, "एव्हांना माझा असिस्टंट इथें यायला पाहिजे होता. त्याला आज मुद्दाम कांहीं विशेष कामाकरितां पाठवला आहे. तें काम याच मंडळीच्या संबंधाचं आहे. ज्याअर्थी अजून आला नाहीं त्याअर्थी तो कांहीं तरी विशेष कामांत गुंतला असावा किंवा त्याला कांहीं तरी विशेष माहिती लागण्याचा संभव असावा. त्यासेरीज तो नेमलेली वेळ कधीं चुकूं द्यायचा नाहीं. त्याची नेमलेली वेळ आजपर्यंत कधीं चुकलेली नाहीं."

असें बोलणें होतें न होतें इतक्यांत एक माणूस तेथें आला. या माणसाचा पोषाख मुसलमानी तऱ्हेचा होता. तो आंत येण्याबरोबर "आजच्यासारखं काम कधींच फत्ते झालं नाहीं. आज..." इतकें म्हणतो तों समोर बसलेल्या त्या दुसऱ्या अम्मी पोषाखाच्या गृहस्थाकडे त्याची नजर गेली आणि तो एकदम, "माफी करा, हुजूर,

मी समजलों आपण एकटेच असाल. मी जातों, " असें ह्मणत अगदीं लवून सलाम करीत करीत तेथून जाऊं लागला. तों तो गृहस्थ त्यास ह्मणतो, " कांहीं हरकत नाहीं. कांहीं हरकत नाहीं. यांच्या देखत गोष्टी सांगण्याला मुळींच हरकत नाहीं. यांनाही त्या सर्व मंडळींची फार उत्कृष्ट माहिती आहे. आणखी अधिक माहिती पाहिजे म्हणूनच हे इथें आले आहेत. काय तुला अधिकउणं सागायचं असेल तें सांग. पण त्यांना इंग्रजी येत नाहीं करितां हिंदुस्थानींत सांग. "

तें ऐकून तो मुसलमानी पेहरावाचा गृहस्थ एकवार त्या दुसऱ्या गृहस्थाकडे पाहून लवून सलाम करून ह्मणतो, " मी ज्या कामाकरितां विदा झालों होतों तें काम अगदीं फत्ते करून आलों. मला त्याची खडानूखडा माहिती लागली असं म्हणायला हरकत नाहीं. तें वुइल बनावट होणार. आणखी मंडळी त्याच्या जोरावर साठ लाख रुपये खाणार. त्याखेरीज आतां त्यांचा तरणोपायच नाहीं. आणि तेवढ्याकरितां हा शेवटचा भयंकर उपाय ते योजणार. त्याच्याकरितां ते काय करतील आणि काय नाहीं याचा बिलकुल भरंवसा नाहीं. म्हणून आपली नजर त्यांच्यावर जरूर पाहिजे. ती नसली, तर फारच चमत्कारिक प्रसंग होईल. मीं त्यांच्या पाठीमागं एक ग्रह तर ठेवलाच आहे. तो ग्रह म्हणजे आपल्याला दुष्ट ग्रहासारखा होणार आहे, अशी त्या गुलामांना शंकासुद्धां नाहीं. त्याला वाटेल त्या कामांत घेताहेत. वाटेल तसा त्याचा उपयोग करून घेताहेत. तो म्हणजे एक आपल्या हातांत खेळणं आहे, अशी त्यांची समजूत आहे. पण त्यांचा मूर्खपणाच आपल्या एकंदर कार्याला किती घातुक होतो आहे, याची त्या बिचाऱ्यांस कल्पनासुद्धां नाहीं. हीच त्यांची स्थिति आपल्याला हितकर आहे. ह्मणून मी त्याला संभाळून संभाळून धरतों आहें. आतां तो त्यांच्या त्या घोंटाळ्यांत इतका गुरफटला आहे कीं, त्यांतून त्याला बाहेर लावून देणं त्या मंडळींना केवळ अशक्य आहे. जर का हा कांहीं बाहेर भकला, तर आपलं काम होण्याच्या आधींच आपलं सगळं भांडं फुटेल असं त्यांना वाटतं आहे....... "

परंतु त्या गृहस्थानें त्यास अधिक बोलू दिलें नाहीं. तो त्यास जरा तिरस्कारानें मध्येंच म्हणाला, " हें सारं वायफळ पुराण सांगायला का तूं इथें आतां आलास? तूं आज काय केलंस तें सांगायचं सोडून देऊन हा चावटपणा मला कशाला सांगतोस? आज काय नवं तूं केलंस तें सांग. मला त्याची जरूर आहे. वुइल तयार होणार म्हणून कशावरून? त्या बाबतींत त्यांनीं पुढें काय केलं आहे तें बोल. कांहीं नसली आणखी बातमी लागली, तर तसं सांग. "

" बातमी कां नाहीं लागली? हा पाहिला ज्या कामाला जाईल तें कांहीं तरी फत्ते केल्याखेरीज कधीं आला आहे? बोला. जी गोष्ट इतक्या वर्षांत घडली नाहीं, ती आतां तरी काय म्हणून घडेल? अलबत्! मीं अगदीं वित्तंबातमी काढली आहे. आज मध्यरात्रीला तें वुइल लिहिलें जाणार. उद्यां तें वकिलाकडे जाणार, आणखी उद्यांच त्याच्यावर सही होणार. मसुदा अगदीं तयार आहे.. त्या मसुद्याची नक्कल सुद्धां मला मिळाली असती पण कांहीं कारणानं आज मिळाली नाहीं. उद्यां तें वकिलाकडे जातां जातां, किंवा जाऊन येतां येतां त्याची नक्कल बनून

माझ्या हातीं पडेल अशी तजवीज केली आहे."

"ठीक. हें कांहीं तरी आहे. बाकी शाबास ह्मणण्याजोगें कांहीं आजचें आपलें काम नाहीं. पाहिस्न, तूं आतांशा फार मंद होत चालला आहेस. तुझा पहिला साहसीपणा पार नाहींसा होत चालला आहे. आणखी जितक्या मानानें तो कमी होत चालला आहे. तितक्या मानानें तुझी वाचाळता मात्र वाढत चाललेली अनुभवाला येते आहे. तूंच विचार कर कांहीं दिवसांपूर्वी पर्यंत तूं बोलत असस थोडा, आणि काम बजावीत असस पुष्कळ. अलीकडे त्याच्या अगदीं उलट प्रकार होऊन गेला आहे. तेव्हां काय ह्मणावें !..."

त्या निष्ठाईत माणसाच्या देखत आपल्यास आपल्या साहेबानें असें बोलावें हें पाहिस्नास अगदीं मुद्दां आवडलें नाहीं, असें स्पष्ट दिसलें. त्याच्या त्या विशाल कपालावर आठ्या चढल्या व तो अदबीनें परंतु हांसून म्हणतो, "आपण ह्मणतां तो फरक मला तर कांहीं दिसत नाहीं. मग आपल्याला काय वाटत असेल तें खरें! आपल्या विरुद्ध बोलण्याची किंवा आपण म्हणतां तसं नाहीं ह्मणण्याचा माझा काय मगदूर! मी आपल्याकडून हमेष अगदीं इमानेइतबारें श्रम करतों. याच मंडळीचा बरोबर पत्ता लावण्यांत मी काय श्रम केले, त्याचा विचार आपण केला, तर आपल्या समजुतीला फारसा आधार नाहीं, हें खाविंदांच्या नजरेस येणार आहे. मग जशी आपली.,."

"बरं बरं, त्याचं काय आतां आलं आहे? एकूण आजची तुझी बातमी इतकीच की, तें वुईल बनण्याच्या बेतांत आलं आहे. मसुदा तयार होणार आहे, आणखी तो झाला ह्मणजे तुला एक नक्कल मुकाट्यानें मिळणार आहे. या सर्व गोष्टींत भूतकाळ मुळींच कमी तो नाहीं. वर्तमानकाळही नाहीं. आणि भविष्यकाळ भरपूर आहे. त्याला कधीं वर्तमानाचें अगर भूतकाळाचें स्वरूप येईल तेव्हां खरं ह्मणायचं!"

या भाषणांतला व्याजस्तुति आणि मर्मभेदकपणा हीं दोनही पाहिस्नेसाहेबाच्या लक्ष्यांत आलीं नाहींत असें नाहीं. तीं पूर्णपणें आलीं. परंतु तो अधिकउणें कांहीं एक बोलला नाहीं. नुसताच हसून ह्मणतो, "आजपर्यंत अनेक गोष्टींना आलीं, त्याप्रमाणें त्यांनाही तीं स्वरूपें येतील."

तो दुसरा गृहस्थ अगदीं स्वस्थपणें या दोघांचीं भाषणें ऐकत होता. तो ह्मणतो, "आपणास जसं हिंदुस्थानी येतं, तसंच ब्रह्मी येत असेल!"

तेव्हां सहजगत्या उत्तर दिल्याप्रमाणें तो ह्मणतो, "ज्या भाषेचें विशेष काम पडतें ती भाषा समजणं कठिण पडत नाहीं पण बोलणं कठिण असतं. तथापि मला तें चांगलं साधलं आहे. मी मूळचा लखनौकडला. यामुळें हिंदुस्थानी चांगलं येतं." असें उत्तर दिलें असतां जें काम व्हावें असें त्याची इच्छा होती, तें झालेंसें दिसलें. तो दुसरा गृहस्थ सहजपणें पुनः ह्मणतो, "हो, बरोबरच आहे. इकडे आह्माला एक मोठी अडचण आहे की, आपल्यांतिकडल्यासारखी एकच भाषा नाहीं. हिंदुस्थानी आहे, पंजाबी आहे, हिंदी आहे; तेलंगी आहे; गुजराथी आहे, कच्छी, मेवाडी या निराळ्याच आणि मराठी व तिचे प्रकार आहेतच. त्या सर्व भाषा बोलणाऱ्या गुन्हेगारांशीं आमचा संबंध येणार. त्यांना पकडायला, फसवा-

चला, त्यांच्या त्यांच्या भाषा बोलायला यायला पाहिजेत. निदान त्यांच्या भाषा बोलणारे असिस्टंट तरी ठेवून ते समजावून सांगितील तें खरें की खोटें, हें समजण्या-जोगें ज्ञान पाहिजे. तें नसलें तर चालावें कसें? हे आमचे असिस्टंट आमची तेव्हांच भंबेरी उडवून देतील. आणि एक असलें, तर तिसरेंच समजावून सांगतील." हें बोलत असतांना त्यानें किंचित् हंसत हंसत साहिस्तेखानाकडे पाहिलें. साहिस्ते-खान त्याच्या बोलण्याचा अर्थ समजला नाहीं असें नाहीं. परंतु जो माणूस दुसऱ्या-चा नोकर असतो, त्याला आपला प्रभुस कांहीं बोलला—अगदीं मर्मभेदक असें बोलला—तरी तें मुकाट्यानें ऐकून घ्यावें लागतें. तीच स्थिति या वेळीं साहिस्ते-खानाची झाली. त्यानें त्याचें बोलणें मुकाट्यानें ऐकून घेतलें. इतकेंच नव्हे, तर तो त्यावरून अगदीं मोठ्यानें हंसला. जणूं काय आपल्या साहेबांनीं फारच विनोदाचें भाषण केलेलें असून त्यानें आपल्यास अगदीं मौज वाटली.

थोडा वेळ झाल्यानंतर तो वक्ष्मी गृहस्थ उठला, आणि "तर मग मी आतां आ-पला रजा घेतों." असें म्हणाला आणि तो तेथून निघालाच. निघतां निघतां त्यानें "आतां आपल्याकडेच मला नेमलें आहे, सांगाल तेव्हां हजर होईन, हुकूम झाला की, रोज दोन वेळां नेमल्या वेळीं येऊन भेटेन" असें म्हटलें. नंतर पुनः एकवार सभोंवार नजर फेंकली व तेथून तो चालता झाला. बाहेर आल्यानंतर त्या बंगल्यापासून लांब गेल्यावर तो आपल्याशींच मोठ्यानें हंसला आणि आपल्याशींच पुटपुटला. "खड्डा खणल्याप्रमाणें तजवीज तर झाली. डोक्यांत मात्रा टाकली. पण बहार ही की, त्यांत आपलीही आपलें काम झालें. त्यांनीं म्हटलेला हा मर्द, हा हरामखोर कोण ? आपले सरकें वेत फुटतात कसे ? याचा आतां तलास लाविल्यावांचून कांहीं मुद्दा पुढें करतां येणार नाहीं. तर आतां पहिलें काम तें."

---

# प्रकरण ६२ वें.

## दागिन्यांत भर.



काकासाहेबांच्या उलाढाली किती जबर होत्या व त्यांची एकंदर व्यवस्था कशी काय होती, हें वाचकांस माहिती आहेच. तथापि काकासाहेबांच्या पत्नी केवळ हात जोडून स्वस्थ बसणाऱ्या नव्हत्या. त्या आपल्याकडून नेहमीं आपल्या पतिराजाच्या खटाटोपावर नजर ठेवण्यांत दक्ष असत, आणि आपल्याकडून माहिती मिळवेल तितकी मिळविण्यास कधीं कमी करीत नसत, असेंही ह्मटलें तरी चालणार आहे. परंतु त्यांची या बाबतींतली माहिती मिळविण्याची खटपट एका विवक्षित हेतूमुळें असल्या कारणानें कोणाकडून कोणत्या दिवशीं किती रक्कम आली व आपल्या अमुक दागिन्यांत भर घालण्यास आपणांस त्यांतून किती रुपये काढून घेणें जरूर आहे, एवढेंच पाहण्याकडे त्यांचें नेहमीं चित्त असे? कोठूनही शें दोनशें चारशें रुपये आले, किंबहुना हजार दोन हजार रुपये आले, असें त्यांस कळलें रे कळलें, कीं त्यांस आपल्या अमक्या दागिन्यांत भर घालावयास इतके रुपये अवश्य पाहिजेत, किंवा आपल्यास अमुक एक दागिना नवा केलाच पाहिजे, असें त्यांच्या ध्यानांत तेव्हांच येत असे, आणि तितकी ती रक्कम काकासाहेबांकडून काढून घेण्यास आपण कोणता उपाय योजिला पाहिजे याबद्दल त्यांचा विचार नेहमीं चालू असे. काकासाहेब मुंबईस आल्यापासून रकमा फारच क्वचित आल्या, हें त्यांस फार वाईट वाटे, आणि त्या त्यांस कोठून काय आलें, काय नाहीं याबद्दल नेहमीं विचारीत असत. परंतु काकासाहेब त्यांस त्या बाबतींत अलीकडे मुळींच दाद देत नसत. काकासाहेब आपल्या कुटुंबासह मुंबईस आल्यापासून त्यांच्या यजमानीणबाई आपल्या माहेरींच फार करून असत. क्वचित् ते जेथें उतरले होते. तेथेंही त्या जाऊन रहात, परंतु काकासाहेब नेहमीं कांहीं तरी उलाढालींत असल्यामुळें त्यांस बायकोस सरळ उत्तरें देण्यास सवड सांपडत नसे, आणि पैसे देण्यास मुळींच सवड होत नसे. यापूर्वी काकासाहेब मुंबईस केव्हांही आले तरी चार दोन दिवसही राहण्याची मुष्किल असे, परंतु या खेपेस दीडदोन महिने झाले, तरी त्यांचा परत जाण्याचा विचार दिसेना; यजमानीणबाईनीं जरी विचारलें कीं, परत केव्हां जायचं, तरी स्वारींनीं "तुम्हाला काय? स्वस्थ माहेरीं रहायला सांपडलं आहे, त्यांत वावगं काय आहे? या खेपेस जितकं माहेरीं राहावयाचं असेल, तितकं राहून घ्या. मग एकदां गांवीं गेलों कीं, माहेरचं नुसतं नांवसुद्धां काढूं देणार नाहीं." असें ह्मणून त्यांची समजूत करावी. असा प्रकार चालला होता, यांत दर आठ पंधरा

दिवसांनीं काकासाहेबांनीं त्यांस शें दोनशें रुपयांची रक्कम दिली असती, तर बाईसाहेबांकडून मुंबई सोडण्याचे बाबतींत मुळींच विचारणा झाली नसती. कारण त्यांना तरी मुंबईंतील मौज टाकून त्या आपल्या खेड्यांत जाण्याची इच्छा होती कोठें! येथें त्यांस आपल्या छंदीफंदी भावाबरोबर नेहमीं संगीत नाटकें पहावयास सांपडत, आणि वाटेल तसें स्वच्छंदानें वागवयास सांपडे, तसें त्या कुग्रामांत कोठचें? परंतु अलीकडे अलीकडे कितीही हट्ट केला, तरी मागितले तितके रुपये कधीं मिळत नसत. एवढेंच काय तें मनाला वाईट वाटण्यास कारण असे. बाकी माहेरीं रहावयास आणि स्वच्छंदानें वागावयास सांपडत असे त्यांत त्यांस परमानंदच असे. या आनंदांत एक मोठें वैषम्य आतांशा उत्पन्न झालें. तें हें कीं, काकासाहेबांकडून अलीकडे रकमांवर रकमा बाहेर कोणाकडे तरी जातात. त्यांना कशाचा तरी नाद लागला आहे, अशी शंका येण्याला कारण दिसूं लागलें. बाईसाहेब तिसरे चवथेपणाच्या, अर्थात् वयानें अगदीं लहान, स्वच्छंदानें वागण्याचें सौख्य तर त्यांस फार प्रिय, परंतु आपला वृद्धपति आपणास पैसे न देतां रकमांवर रकमा दुसऱ्या कोणास देऊं लागला आहे, हें कानीं येतांच त्यांचे अंगाचा तिळपापड झाला.

आपण आपले व्यापारव्यवहार आपल्या बायकोपासून लपवून ठेवण्याचा आपल्याकडून कितीही प्रयत्न केला, तरी तिनें त्यांत मन घालावयाचें म्हटलें म्हणजे सर्व कांहीं माहिती तिला अगदीं नेमकी लागते;–निदान तिला जी गोष्ट माहिती असेल अशी आपली कल्पनासुद्धां चालत नाहीं, ती ठाऊक असल्याचें पाहून केव्हां केव्हां आपणास किती आश्चर्य वाटतें! हा अनुभव काकासाहेबांस येण्याचा प्रसंग आला. बाईसाहेबांची एके दिवशीं लहर लागून त्या काकासाहेबांकडे आल्या होत्या. आणि त्यांस कांहीं पैशाची जरूरी असल्यामुळें त्यांनीं काकासाहेबांजवळ मागणी केली. परंतु काकासाहेबांस स्वतःसच यावेळीं पैशाची अतिशय जरूरी होती—हें वाचकांस कांहीं थोड्या कल्पनेनें जाणतां येणार आहे–त्यांनीं कांहीं रक्कम तयार करून ठेवली होती; परंतु जेथें ती भरावयाची होती तेथें भरण्याइतकी ती झाली नव्हती, म्हणून ते बाकीची कोठून आणावी या विचारांत होते. अशाच समयांत ते दिवशीं कुटुंबानें येऊन जमलेल्या रकमेच्या जवळ जवळ निम्मे रकमेची मागणी केली. ही मागणी करण्यापूर्वी त्यांनीं कारकुनाकडून जवळ शिल्लक किती आहे, किती नाहीं याची चौकशी केली होती. तेव्हां मागणी करितांच, आपल्याजवळ नाहींत असें काकासाहेबांचें उत्तर ऐकून कुटुंबानें त्यांजवर शस्त्र धरलें. "अलीकडे तुम्ही मी मागेन तें नाहीं म्हणून बेधडक सांगतां. तुम्हांला आपल्या बहिणीकडे पाठवायचे आहेत हें मला कळलं आहे. घरांतून गेली त्या शास्त्रीबोवांच्याबरोबर, तरी तुम्ही तिचंच सगळं अजून कौतुक करतां. मला आज बाबांनीं एक हिऱ्याच्या बांगड्यांचा जोड दाखवायला आणला होता तो घ्यायचाच! बाबा म्हणाले, आडगिऱ्हाइकी चांगला आहे. थोडक्यांत मिळतो आहे. मला घ्यायचाच घ्यायचा. मी आज रुपये घेतल्याखेरीज इथून हलायची नाहीं. रुपये आज तुमच्याजवळ आले

आहेत, मला ठाऊक आहे. मी नाहींच मुळीं हलायची रुपये घेतल्यावांचून; माझं मन बसलं आहे त्या बांगड्यांच्या जोडा- वर. तुम्ही मला तो घेऊन दिलाच पाहिजे. आज किती दिवसांत मी कधीं कांहीं मागितलं नाहीं ... ... " असा एकसारखा टाहो तिनें चालविला. काकासा- हेबांनीं त्या दिवशीं तिला पाहिजे तितकी रक्कम देणें तर केवळ अशक्यच होतें. तेव्हां एका शब्दानें सुद्धां त्यांनीं आपल्या कुटुं- बास आपला हट्ट चालून आपल्यास आज रक्कम मिळेल अशी आशा करण्यास जागा ठेवली नाहीं. परंतु सहसा निराश होण्या- इतका कच्चेपणा बाईसाहेबांच्याही अंगीं नव्हता. दुसऱ्याच्या घरीं–जेथें काका- साहेब रहात होते तेथें–आपण आपल्या नवऱ्याशीं कसें वागावें, कोण काय म्हणेल, याची दिक्कत तर त्या तरुण स्त्रीस मुळींच राहिली नाहीं. काकासाहेबांकडून जितक्या जोरानें 'ना' येई तितक्या जोरानें तिचा हट्ट वाढे. तशांत घरीं आई- बाप व भाऊ यांजपाशीं ती अशी प्रतिज्ञा भोगून आली होती कीं, आपल्याला त्या बांगड्या अतोनात आवडल्या आहेत, आणि त्या आपल्याला हव्यात. नवऱ्या- पासून पैसे आणून आपण त्या घेणारच. इतकी जबर प्रतिज्ञा करून येऊन ती परिपूर्ण होण्याची कांहींच आशा न उरतां विन्मुख घरीं जावें यांत केवढी नामुष्की होणार आहे ! असें वारंवार मनांत येऊन तिचा हट्ट वाढत चालला. त्यांत यदा- कदाचित् नवऱ्याजवळ रक्कम शिल्लक नाहीं, असें जर तिला कळतें, तर न जाणों तिनें गमही खाल्ली असती. परंतु आपण मागतों आहोंत, त्याच्यापेक्षां चौपट रक्कम हातांत शिल्लक असून ती आज अगदीं आणीबाणीच्या वेळीं आप- ल्याला मिळत नाहीं, हें मनांत येतांच, ती फार चवताळली. दुसऱ्याच्या घरांत वृद्धपति आणि तिसरेपणाची पत्नी यांचा झगडा कसा काय चालतो, त्याचें प्रदर्शन होण्याची वेळ येऊन पोहोंचली.

"मला फार जरूरीच्या कामाकरितां– दुसऱ्या कोणास नेमक्या मुदतींत भर- ण्याकरितां–रकमेची जरूर आहे. मी आणखी पंधरा वीस दिवसांत रुपयांचा ओटा घालून त्याच्यावर तुला बसवतों," असें नानाप्रकारांनीं काकासाहेबांनीं तिला सांगितलें, परंतु ती कोठली ऐकायला ? तिच्या प्रतिज्ञेप्रमाणें तिला व्हावयास पाहिजे होतें; तसें न झालें तर माहेरची मंडळी किती चेष्टा–थट्टा करतील, हें वारं- वार मनांत येऊन, किंबहुना केवळ आपण म्हणतों त्याला आपले कोमल पतिराज रुकार देत नाहींत हें पाहूनच तिचा हट्ट दुणावला. आणि शेवटीं तिनें आपल्या इच्छेप्रमाणें रक्कम तर घेतलीच. परंतु इतका जो आपल्या नवऱ्यानें आपल्याशीं या वेळीं अट्टाहास केला, त्याचें कारण समजावून घेण्याची इच्छा होऊन तिनें कारकुनास एका बाजूस नेऊन विचारलें कीं, "इतकी रक्कम भरण्याची जरूरी काय ? आणखी रक्कम कोणाला भरायची ?"

बाईसाहेबांचा तो प्रश्न ऐकून कारकून- दादांनीं त्यांस अशा प्रकारचीं उत्तरें दिलीं कीं, त्याच्या योगानें बाईसाहेबांची चित्त- वृत्ति विशेषच संशयित झाली आणि आपण आपल्या पतिराजांवर विशेषच नजर राखली पाहिजे असें त्यांस वाटूं लागलें. आपण मागितलेली रक्कम किंवा चीज मिळण्यास आपल्यास इतकी खळ- खळ कधीं करावयास लागली नाहीं, असें

असतां आजच असें कां? हा प्रश्न त्यांचें मनास खातच होता, आणि त्यांत हा संशय. मग काय विचारतां! त्यांस संशय पिशाचानें पूर्णपणेंच पछाडलें. ह्यातारपणीं कांहीं तरी नाद लागून आपला पति पैसे उधळूं लागला हा संशय तरुण पत्नीच्या मनास जडला कीं तिच्या चित्तवृत्तीचें वर्णन काय करावें? ते दिवशीं मोठ्या कष्टानें मिळवलेली ती रक्कम माहेरीं नेऊन बापाजवळ देऊन ती तशीच परत आली व पतीस नाद कसला लागला आहे आणि पैसे कसे व कोठें चालले आहेत याचा पक्का शोध लावण्याचा तिनें कृतनिश्चय केला. तेथें जाऊनच राहिल्यानंतर अर्थातच काकासाहेब सगळा दिवस किंबहुना बरीच रात्र होईपर्यंत कोठें तरी जातात; कारकुनास नेहमीं अमुक ठिकाणीं जा, तमुक ठिकाणाहून अमुक रक्कम आण, असें सांगतात हें त्यांस दिसलें आणि संशयपिशाचानें तिचें मन अधिकाधिकच ग्रस्त होत चाललें. तिचे कान नेहमीं अगदीं उघडे राहूं लागले आणि नवरा बाहेर जाऊं लागला कीं, त्यास न जाण्याविषयीं आग्रह होऊं लागला. असें जों जों होऊं लागलें, तों तों काकासाहेबांस आपल्या मनाप्रमाणें करण्यास फारच जड जाऊं लागलें; आणि ते आपल्या कुटुंबाशीं त्रासिकपणानें वागूं लागले. असा परस्परांचा परस्परांवर चमत्कारिक परिणाम होऊं लागल्यावर मग काय विचारतां! रोजच्यारोज खटके उडूं लागले. बायको आपल्या संशयानुरूप उपरोधिक बोलूं लागली, आणि पतिराज आपल्या परीनें संतापून कांहीं तरी उत्तरें देऊं लागले. बिंदुमाधव पांड्यासारखा सिद्ध पुरुष हातीं सांपडला आहे, तेव्हां जितकें कांहीं आपल्या हातून होईल तेवढें करून आपण त्याच्यापासून सिद्धि मिळवूं; आतां कांहीं रकमा त्याला देत असतां आपल्यास वाईट वाटतें खरें, परंतु एकदां का सिद्धि झाली, म्हणजे मग काय विचारतां? मग आपल्याला कधीं पैशाची तूट म्हणून पडायचीच नाहीं. तेव्हां बायकोच्या मूर्खपणाला भिऊन आपण हा हातीं सांपडलेला परीस गमावण्यांत अर्थ नाहीं, असें त्याच्या मनानें पूर्णपणें घेतलें; आणि त्यांनीं पांडे यास आणखी एकवार आणून देतों म्हणून कबूल केलेली रक्कम जमविण्याकडे मन गुंतविलें. वर सांगितल्याप्रमाणें कितीही बोलली, तिनें कितीही हट्ट केला, तरी तिकडे त्यांनीं दुर्लक्ष्य करावें, होतां होईल तों तिला उत्तरच देऊं नये, आणि दिलें तर तें अतोनात त्रासिकपणें द्यावें, असा क्रम सुरू झाला. होतां होतां एके दिवशीं त्यांना कांहीं रक्कम कोठून कोणाकडून यावयाची ती येऊं शकत नाहीं, असें दिसून आलें. त्या इसमाकडून पत्रच असें आलें कीं, आपणाला कबूल केलेली रक्कम सध्या पाठविण्यास सवड नाहीं. इकडे बिंदुमाधव पांड्याकडे तर रकमेची अशी जरूरी कीं ती वेळेवर न पोहोंचली, तर भट्टीचा अगदीं बिघाड होऊन आजपर्यंत घातलेल्या सर्व रकमांची राख होऊन जाणार! अशा प्रसंगीं आतां काय करणार? बिंदुमाधवांनीं तर अनेक प्रकारांनीं काकासाहेबांची अशी खात्री करून दिली होती कीं, "आतां तेवढी रक्कम आली, तर कमींत कमी दोन लाख रुपयांचे आपण धनी झालों, मात्र नाहीं आली तर घातलेली रक्कम जाऊनच्या जाऊन सिद्धिदेवतेचा आपणावर भयंकर रोष होऊन सगळें तळपट उडून जाईल! किमयाची

देवता फार कडक; आधीं तिच्या नादीं कोणी लागूं नये, आणि एकदां लागलंच, तर मग तिला प्रसन्न करून घेतल्याखेरीज दुसरं गत्यंतर नाहीं. ती जर का अर्धवट जागृत होऊन तशीच तिला सोडली, तर तिच्यासारखी क्रूर तीच! ती घरादारांचं समूळ उच्चाटन करून टाकील. संपत्ति मिळण्याचं तर मग लांबच राहिलं, परंतु समूळ निःपात करून टाकल्याखेरीज कधीं राहावयाची नाहीं. एक करतां एक व्हावयाचं. असा प्रसंग येईल, तुम्ही अर्ध्यावर सोडून द्याल, तुम्ही प्रारंभ करूं नका, मला विनाकारण त्यांत आणखी गुंतवूं नका, माझ्या औषधिसिद्धीचा सुद्धां मग नाश होईल. एवढ्यासाठीं मी आधीं बजावतों आहे, असं बिंदुमाधव पांड्यांनीं त्यांस नानाप्रकारें बजावलेंच होतें. आणि आज तर रक्कम तयार नसल्यामुळें तोच प्रसंग आला आहे. आज सायंकाळाला त्यांना रक्कम पोहोंचली, तर लाखों रुपये हातीं आले, नाहीं तर समूळ वाटोळें झालें. रक्कम तर कोठूनही येण्याचा संभव नाहीं, आणि काय वाटेल तें झालें तरी उभारली पाहिजेच. तेव्हां आतां युक्ति काय करावी?

असा विचार करितां करितां स्वारींना एक युक्ति सुचली. त्या युक्तीखेरीज दुसरी युक्ति शक्यच नव्हती. त्यांनीं आपल्या कुटुंबास हंसत हंसत हांक मारली आणि ह्मटलें, 'झालं माझं काम. आतां आज संध्याकाळच्या आंत तुला सोन्यानं मढवून आणखी हिऱ्यामाणकांनीं जडवून काढतों. इतके दिवस तूं वाटेल तशी बोललीस. मी आपल्या कामाच्या नादांत होतों म्हणून कांहीं एक बोललों नाहीं. पण आज तुला अगदीं चकित करून सोडतों. आतां या घटकेस माहेरीं जा. आणखी आपले यच्चावत् दागिने घेऊन ये. प्रत्येक दागिना अगदीं ठसठशीत करून टाकतों. पुनः ह्मणून माझ्या अमक्यांत भर घालायची आहे, आणखी अमुक नवा करून द्या असं ह्मणायची जरूरीच ठेवीत नाहीं. जा कशी. जा. आतां कां उशीर! आतां दोन दिवस एवढंच काम करून लागलीच परत जायचं. आतां आपलं इथें रहाण्याचं काम संपलं. जा." इतकें बोलून ते हलकेच तिच्या कानांत आणखी म्हणतात,' "वेडे, दीड लाख रुपयांचं सोनं हातीं आलं. आतां तुला कमी काय? जा लवकर. नापल्या तब्यावर काय व्हायचं तें होऊन जाईल. जर का माझं मन व्यापारांत पुनः गुंतलं, तर हे दीड लाख पुनः गुंततील. तेव्हां तुझ्या दागिन्यांत भर घालायची किती ती मला एकदां प्रत्येक दागिना बघून हिशोब करून अंदाज करून रक्कम वेगळी ठेवून—नव्हे सोनं आणून—तुझ्या स्वाधीन करूं दे, मग एखादा चांगला सोनार, आणखी तूं बसा काय वाटेल तें करीत, जा. आतां कां उशीर?" हें सर्व ऐकतांच बाईसाहेबांच्या आनंदाला काय विचारतां? त्या माहेरीं धांवतच जाऊन येऊन त्यांनीं आपल्या पतिराजांपुढें आपले सर्व दागिने ज्यांत होते तो डबा आणून ठेवला. तोंडानें प्रत्येक दागिन्याचें नांव घेऊन कशांत किती भर पाहिजे त्याचें विवेचन चाललें होतें. काकासाहेबांनीं तें सर्व शून्यचित्तानें ऐकून घेऊन बाईसाहेबांस म्हटलें, "तूं आतां स्वस्थ ऐस. मी हा डबा सोनाराकडे घेऊन जाऊन प्रत्येक दागिन्याचं आजचं वजन काय आहे आणि तो चांगला तुझ्या मनाला बरोबर पटेल असा करण्याला किती भर घालायची याचं टांचण करून आणतों." इतकें म्हणून दागिन्यांचा डबा भरलेलाचा भरलेला घेऊन काकासाहेब बाहेर पडले!

# प्रकरण ६३ वें.

## पुनः एकदां प्रोफेसर ड्यांडी.



प्रोफेसर ड्यांडी आपल्या खोलींत इकडून तिकडे हिंडत होते. प्रोफेसर डयांडी विचार करीत होते. प्रोफेसर ड्यांडी आणि विचार हे दोन शब्द एके ठिकाणीं पहाण्याबरोबरच वाचकांस कसेंसेंच वाटावयाचें! कारण उत्तर ध्रुव आणि दक्षिण ध्रुव एके ठिकाणीं होणें हें जसें अशक्य, त्याचप्रमाणें विचार आणि प्रोफेसर ड्यांडी यांनीं एके ठिकाणीं होणें अशक्य, अशी प्रोफेसर ड्यांडींची ओळख असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीची समजूत असे. अर्थात् वाचकांचा व त्यांचा परिचयही फार, आणि आज त्यांची व वाचकांची मुलाखतही फार दिवसांनीं होते आहे, तेव्हां त्यांसही हें मी कांहीं तरी अशक्य लिहितों आहें असें जर त्यास नवल नाहीं. परंतु वाचकांनीं एवढें खूप समजून ठेवावें कीं, या आपल्या विचित्र धरित्रीवर अशक्य कांहींच नाहीं. आपणांस ज्या गोष्टी अगदीं अशक्य वाटतात, त्याही पूर्णपणें संभाव्यच काय परंतु घडलेल्याही दृष्टीस पडतात. नेहमीं या फुलावरून त्या फुलावर त्या फुलावरून त्या पानावर असें हिंडणारें वेडें फुलपाखरूं सुद्धां मधूनमधून त्याला विचाराचा झटका येऊन तें आपले पंख हवेंत कांहीं वेळ तरंगत धरून एका क्षणाचा परार्धांश कां होईना, पण विचार करीत राहतें. बिचाऱ्या त्या फुलपांखराची आणि प्रोफेसर ड्यांडीची अवस्था अगदीं एक होय. तें जितकें वेडें तितकेच आमचे प्रोफेसरही कित्येक बाबतींत वेडे. पण फुलपांखराची उपमा सुमतीं त्यांच्या वेडेपणानेंच प्रोफेसरसाहेबांस शोभते असें नाहीं, तर फुलपांखरूं ज्याप्रमाणें आपला विचार करीत असतां आपले पंख हवेंत तरंगून धरतें, त्याप्रमाणेंच आमच्या या प्रोफेसरांनींही आपले दोन्ही पंख कोंपराच्या जागीं पोंकवून व दोनही हातांचीं चार चार बोटें आपल्या तुमानीच्या खिशांत खुपसून आणि आंगठे दोनी बाजूंस बाहेरच ताठ धरून बेंचकेंत खिशाच्या तोंडाचीं खालच्या कोंपऱ्याची शिवण ताणून धरून लांब लांब टांगा टाकीत व खालीं पहात-अगदीं वटारून पहात-ते कांहीं तरी विचार करीत होते. मधूनच ते आपले सबंध पंजे खिशांत खुपसून आपले ते खिसे व त्याच्याच बरोबर दीर्घ श्वास आंत घेऊन आपले गाल फुगवीत. त्यांच्या भुंवया वर झाल्या होत्या. साहेबी टोपी अलीकडे वापरण्याची चटक त्यांस लागली होती, यामुळें तीही या वेळीं त्यांच्या डोक्यावर दिसत होती. मात्र विचार करतां करतां त्यांस वारंवार डोकें चोळावें लागे म्हणून म्हणा, किंवा अलीकडे साहेब लोकांत तशीच फासन आहे असें त्यांस वाटू

लागलें होतें म्हणून म्हणा; पण त्यांनीं ती आपली टोपी अगदीं मागें केली होती, अंगांत यावेळीं कोट नव्हता,नुसता शर्ट-अर्धा अधिक तुमानीच्या आंत घातलेला असा आणि त्यावरून ब्रेसेस् तंग बसविलेल्या-असा होता. शर्ट इतका मलिन झाला होता कीं, तो कधीं पांढरा असेल असें वाटण्यास कारण म्हणजे त्यावर एक दोन ठिकाणीं चूण होती, त्या चुणीच्या खालच्या बाजूस थोडीशी पांढरी झांक दिसे इतकेंच कायतें. प्रोफेसरांचा विचार कसकसा चालला आहे-तो अधिक गंभीर केव्हां आहे, कमी गंभीर केव्हां आहे आणि मुळींच गंभीर केव्हां नाहीं हें त्यांच्या चालण्याच्या ऐटीवरून किंवा खिशांत असणाऱ्या हातांच्या ठेवणीवरून समजण्याजोगें असावें असें दिसलें. कारण ते केव्हां फार लांब लांब टांगा टाकीत-अगदीं टाचच टेंकतां येईल इतक्या लांब टांगा टाकीत-चालत व यावेळीं त्यांच्या खिशांतर्गत हातांचा बांक पुष्कळ कमी होई. त्यांच्या डोळ्यांच्या खालच्या वरच्या पापण्याही पायांप्रमाणेंच एकमेकांपासून फार दूर होत व ते आपल्या पायांखालच्या सतरंजीकडे अतिशय संतापून पाहत असें दिसे ! (पायांखालची सतरंजी अनेक ठिकाणीं फाटलेली होती ती बहुतकरून या वटारण्यानें घाबरूनच फाटली असावी असें दिसतें.) केव्हां ते आपले पाय अगदीं जुळून धरीत आणि त्याबरोबर हातांचा बांक व गालांची फुगवटीही खूप वाढवीत. पण असे ते पाय जुळवून नुसतेच उभे राहत नसत, तर दोन्ही पाय एकदम उचलून तशाच बेडकासारख्या उड्या मारीत खोलीची फेरी करीत. या वेळीं त्यांच्या पापण्या अगदीं एकमेकांस भिडण्यास येऊन ते बहुतकरून कोणा तरी काल्पनिक व्यक्तीकडे पाहून डोळे मिचकावीत आहेत, असें दिसे व यावेळीं त्यांच्या चेहऱ्यावर स्मिताची झांक आणि स्मितामुळें उत्पन्न होणाऱ्या सुरकुत्या दिसूं लागत. या वेळीं त्यांचे हात तुमानीच्या खिशांत जितके शिरणं शक्य तितके शिरत ! पण अशी स्थिति एक क्षण दोन क्षण टिकते न टिकते, तोंच दुसरा कांहीं विचार येऊन त्यांचे हात मनगटापर्यंत बाहेर येत, नंतर ते टांचेवरच चालूं लागत. खिन्नतेच्या सुरकुत्या तोंडावर पडत, डोळे धड वटारलेले नाहींत, धड मिटलेले किंवा मिचकवलेले नाहींत असे दिसत. आणि ते अर्ध गिरक्या घेत घेत पुढें चालत, असा कांहीं त्यांच्या विचाराचा आणि चालण्याचा परस्पर संबंध अगदीं अभेद्य होऊन गेला होता. त्यांच्या त्या निरनिराळ्या हस्तनिक्षेपांस व वैचित्र्यास निरनिराळे दृष्टांत काढून त्यांचें वर्णन करून सांगणें म्हणजे शब्दांनीं कुंचल्याचें काम करणेंच होय. पण तसे कुंचलेवजा शब्द आपल्या संग्रहीं नाहींत असें सध्या तरी मला नाइलाजास्तव म्हणावें लागतें. असो.

प्रोफेसरसाहेब वर सांगितल्याप्रमाणें कधीं लांब टांगा टाकून, कधीं टांचेवर चालून, कधीं गिरके मारीत मारीत चालून व कधीं वाऱ्याच्या जोरानें चंचल झालेल्या पाण्यावर डोलणाऱ्या नावेप्रमाणें इकडून तिकडे व तिकडून इकडे डुलक्या घेत घेत पण विचार करीत हिंडत होते. मध्येंच त्यांस एखादी कांहीं " ब्राइट आयडिया " (हे त्यांचेच शब्द) आली कीं, त्यांचे दोन्ही हात बाहेर निघून एकमेकांवर हापटत व आनंदाची टाळी वाजे. परंतु पुनः कांहीं तरी शंका मनांत उपस्थित झाली कीं,

हात चटकन् आपल्या गवसणींत जाऊन बसत, गाल फुगत इतके कीं, त्यांत वारा अधिक जाऊन आपली शीळ वाजूं लागे असा एकंदर प्रोफेसर ड्यांडींच्या थोर, गंभीर विचाराचा प्रकार चालू होता.

प्रथम प्रथम वर सांगितल्याप्रमाणें त्यांचा विचार चालू होता, परंतु पुढेंपुढें त्या विचारास आंतल्या आंत मावून राहण्यास जागा नसल्या कारणानेंच काय तो शब्दांच्या रूपानें बाहेर पडूं लागला. ते एक वार चालतां चालतां मध्येंच थांबले, आणि ह्मणतात, "आपला फायदा एकंदरींत यांतच आहे. एक तर आपल्यावर कांहीं शेकणार नाहीं. आपण नामानिराळेच राहूं, अगदीं निसटून जाऊं. दुसरं हें कीं, आपली फार दिवसांची जी मनीषा, कीं आपल्याला विलायतेस जाण्यास सांपडावं. आणि बारिष्टरची परीक्षा देऊन इकडे येऊन बारिष्टरी करावयाला लागावं तीही पूर्ण होणार. तिसरं, या चोरांनीं आतांपर्यंत आपल्यास नुसत्या थंव करूं त्यंव करूं म्हणून थापा दिल्या, कशांत आपला हिस्सा ठेविला नाहीं, दोन दिडक्या अजून हातावर टिचल्या नाहींत, याचद्दल सूड उगवायला सांपडेल, आणि साधल्यास त्या पैशावर हल्लाही मारायला सांपडेल, तेव्हां इतका आपला फायदा सोडून देऊन नुसतं यांच्या बाजूला राहण्यांत तात्पर्य काय? गुलाम आपण तर बुडणारच आणखीं मलाही मिठी मारून बुडवून टाकतील! त्या भानगडींत आपण बिलकूल पडूं नये. समुद्रांत सगळे बुडूं लागले, म्हणजे ज्याच्या हातीं जहाजाची फळी लागेल, त्यानें ती ताबडतोब पकडून आपला बचाव करावा हीच शहाणपणाची गोष्ट. अमक्याचं काय झालं, तमक्याचं काय झालं, हा विचार मुळीं सुद्धां उपयोगी नाहीं. उलट तसा कोणी येऊं लागला तर त्याला लाथेनें लांब झुगारून देऊन बुडवून टाकावा. तो बुडून फुगून वर आला, तर पोहायला भोपळ्याचा उपयोग करतात, तसाच उलटा त्याचा उपयोग करून घेण्याला सुद्धां कमी करूं नये!" येथपर्यंतचे त्यांचे विचार शब्दांनीं बाहेर पडले, आणि मग स्वारी त्या विचारांनीं अगदीं खुलून जाऊनच काय किंचित् स्मित करून मान वांकडी करून भुंवया चढवून आपल्या चित्ताची प्रसन्नता व्यक्त करूं लागले. पण लागलीच त्यांच्या मनांत दुसरी एक विचारपरंपरा उद्भवली आणि ते आपल्याशीं पुनः मोठ्यानें बोलतातः—"पण गुलामांना जर माझा कावा साधण्यापूर्वींच कांहीं संशय आला, तर कसं काय? तर ते आपल्याला ठार मारून कुठं तरी गाडून टाकण्यालासुद्धां कमी करणार नाहींत. हाः हाः तेवढ्या कामांत ते अगदीं पटाईत आहेत. यांत कांहीं शंकाच नाहीं. मुळींच शंका नाहीं. आजपर्यंत त्या भामट्यानं तीन खून जिरवल्याचं तर आपल्याला पंचवीस वेळां सांगितलं असेल. मी कधीं काळीं असा त्यांचा विश्वासघात करीन असं वाटून मला धाकांत ठेवण्यासाठींसुद्धां त्यांनीं गुलामांनीं मुद्दाम सांगितलं असेल; नाहीं कशावरून? असे खून कुठं जिरतात काय? पण तो तितकं करायला कमी नाहीं करणार. त्याचीं आतांपर्यंतचीं कारस्थानं काय कमी आहेत, तर एवढंच त्यानं केलं नसेल असं म्हणावं? होः होः या गोष्टीचा मात्र आपण पूर्ण विचार केला पाहिजे; नाहीं तर छानदार काम होऊन जाईल, पण मला हाईडवेलनं

जें सांगितलं आहे तसं जर खरोखर असेल, माझ्या जिवाच्या बचावासाठीं दोन शिपाई नेहमीं गुप्तपणानं माझ्या हांकेच्या टप्प्यांत राहात जातील असं त्यानं जर वचन दिलं आहे, तर आपण तरी असं कां घाबरावं ? बिलकुल घाबरण्याचं कारण नाहीं. पण त्यानं आपल्या त्या गांवाकडे काय केलं? त्याच्या बढाया आपल्याला सांगितल्या! ते जे त्यानं खून केले त्या वेळीं काय विचार केला होता म्हणून त्यानं सांगितलं ! कीं, आधीं त्याचा प्राण तर घेईन मग मी सांपडून फांशीं गेलों तरी हरकत नाहीं. तसा आपला प्राण गेला, आणखी मग हा सांपडून अगदीं पुरा फांशीं गेला, आपल्या बचावासाठीं असलेल्या शिपायांनीं अगदीं तावडतोब त्याला पकडला म्हणून आपल्याला उपयोग काय? त्याच्या फांशीनं आपला फायदा काय? यमापासून आपले प्राण परत आणायला आपल्याला एखादी वटसावित्रीसुद्धां नाहीं? ते बिचारे जाणार ते जाणार. तेव्हां तोही विचार केलाच पाहिजे. उगीच घे म्हणतां घेऊन आणखी वाटेल तें करून उपयोगी नाहीं. आपल्यासारख्या मुत्सद्दी माणसांनीं दूरवर विचार केला पाहिजे. त्याखेरीज कसं चालणार ! नाहींच चालायचं ! पण एवढी गोष्ट खास, कीं आपल्या जिवाची सुरक्षितता बळकट करून घेऊन मग काय कसं पाऊल टाकायचं तें टाकावं. आपल्याला आतां दोहोंकडे पंचाईत आली आहे. अशा वेळीं असं जर होईल कीं, कोणी तरी आपल्याला अचानक सुरक्षित जागीं नेऊन ठेवून शिवाय आपली सगळी मिजास चालवील, असा इसम उभा राहील तर आपण अगदीं एका पायावर उभे आहोंत? जेवढे आज आम्हीं असं करतों असं म्हणतील तेवढे असं करतीलच ह्मणून आपण भरंवसा काय धरावा. आज हा साहेब आपल्याला वाटेल तशा थापा मारतो आहे, परंतु उद्यां याप्रमाणें करील कीं नाहीं ? का आपलं काम झालं, म्हणजे मग झालं सगळं. देईल आपल्याला चार सहा वर्षं अडकवून ! हो. या लेंकांचा तरी भरवंसा धरण्यांत अर्थ नाहीं. मोठी पंचाइतीची वेळ आली बोआ आतां. आजपर्यंत अशी कांहीं वेळ आली म्हणजे आपल्याला एक तरी फार चांगला उपाय होता, कीं चार दिवस मुंबईची हवा मानवत नाहीं म्हणून कुठं तरी लांब जावं, पण आतांच्या खेपेस तेंही शक्य दिसत नाहीं. आतां आपल्या पाठीमागं हें लचांड आहे. अरेच्या गुलामांनीं माझ्या संरक्षणाकरितां म्हणजे माझ्यावर नजर ठेवण्याकरितां तर दोन माणसं ठेवलीं नसतील ? "

हा शेवटला उद्गार स्वारीच्या तोंडून निघतां क्षणींच स्वारीच्या चेहऱ्यावर अशी कांहीं विलक्षण कळा उत्पन्न झाली, कीं त्या वेळीं प्रोफेसरसाहेबांनीं स्वतः एखाद्या आरशांत आपला चेहरा पाहिला असता, तरी त्याला सुद्धां स्वतःस ओळखतां आलें नसतें. कोणी तरी तिसराच गृहस्थ आपल्यासारखा पोषाख करून आरशाच्या पलीकडून आपल्याकडे पहातो आहे असें त्यांस वाटलें असतें. इतका त्याचा चेहरा त्या विचारानें काळवंडून गेला. तो विचार मनांत येतांच आणखी कांहीं आतांपर्यंत मनांत न आलेल्या गोष्टी मनांत उभ्या राहून व त्यांचा एकमेकांशीं संबंध जुळून स्वारी अगदीं तटस्थ झाली. एकदम तिजोरीच्या खिशांतून हात बाहेर

निघाले आणि घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे पाहून आपल्याशींच तो म्हणतो, "मग आतां दुसरा मार्ग आपल्याला उरला कोणचा? नाहींच उरला. आतां हें करूं कीं तें करूं, यांना चिकटूं कीं त्यांना चिकटूं हा प्रश्न राहिला कुठें! राहिलाच नाहीं. ज्यांना चिकटून राहून आजपर्यंत दमडीचासुद्धां फायदा झाला नाहीं त्यांना चिकटून राहून अर्थही नाहीं, आणखी त्यांच्यापासून आपलें तारणय नाहीं. पण मी असला हा विचार कसला करतों आहें! विचाराची ही वेळ नाहीं. आपल्याला काय तो निश्चय करायला जितका वेळ दिला आहे तितका संपत आला. ओहो! साडे पांच वाजले! आतां साहेबांची स्वारी आपल्यापुढं येऊन उभी राहणार आणि ती एकदां उभी राहिली, आणखी "वेल! व्हाट्स् युअर डिसिजन" असा एकदां प्रश्न झाला म्हणजे मग "उत्तर काय देणार!" प्रोफेसरसाहेब आपल्याशींच हिडिसपणें हंसून ह्मणतातः उत्तर एकच देणार "हो ठरला. आय् वॉन्ट टु हेल्प् जस्टिस्. आय् अॅम् नॉट् गोइंग टु बी ए स्क्याम्प्स् पेट्. आय् अॅम् अॅन् ऑनेस्ट् चॅप्" असेंच उत्तर देणार आणि वेळ प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागणार. दोन्ही बाजूंला फसवून आपला कार्यभाग साधला, तर तसा साधणार. एकाचा विश्वासघात करून साधला तसा साधणार. पण आपला डाव कधीं जाऊं देणार नाहीं, मी काय करतों आहें याची जर यत्किंचित् माहिती आमच्या सोबत्यांना लागली, तर ते माझा प्राण घेतल्याखेरीज कधीं ठेवायचे नाहींत. पण त्यांना पक्के फशीं पाडायचे, तर त्यांना आपण आतांपर्यंत होतों तसेच आहोंत-अगदीं जसा मूर्ख आहोंत असंच दाखवलं पाहिजे. अन् तसं मी दाखविणार. मी त्यांचे गळे कापायला कांहीं करतों आहें हें त्यांना मुळींच समजूं देणार नाहीं. तसे आपण काय वस्ताद् कमी आहों म्हणा! मारे देऊं वाटेल तशा थापा त्यांना. आतां दुसरा मार्ग नाहीं, पण इकडची आपली बाजू खंबीर करून घेतली पाहिजे. तो कांहीं लिचीपिची ठेवतां कामा नये. पाहूं या आपण काय काय या बाजूकडून कबुलायती करून घेतल्या पाहिजेत त्या. असं नको. त्याचं एक टांचणच करून टाकूं. तें टांचण करून टाकून त्याप्रमाणें अगदीं कबुलायत करून त्यांची सही-शिक्का करून घेऊन मग काय तें करायचं. याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. अगदीं छान कागदच करून टाकतों. ह्मणजे तोंडीं उगाच कांहीं तरी सांगायला नको "डु मी हिअर डु यू देअर" आपले गुरुवर्य, आपल्या थापबाजीच्या कलेचे आद्य गुरु जे मिस्टर लॉफ्टी त्यांचं हें आद्यसूत्र आहे. त्या सूत्राप्रमाणें आपण वागलं पाहिजे. असें ह्मणून लिहिण्याच्या टेबलाजवळ जात जात स्वारी मोठ्यानें हंसली आणि कागद सरसावून पेन हातांत घेणार तों त्यांच्या पाठीवर हात व कानावर "कां आज फार रंगांत आहे स्वारी?" हा प्रश्न पडला.

प्रश्न ऐकण्याबरोबर व तो प्रश्न करणारी मूर्ति पाहण्याबरोबर, स्वारी भेदरून खुर्चीस धरून उभी राहिली.

---

# प्रकरण ६४ वें.

## दागिने.



कासाहेबांस मोठी काळजी होती कीं, आपली बायको आपले दागिने आपल्या स्वाधीन करावयाची नाहीं. आपल्यास अमुक तोळे सोनें आणून द्या आणि अमुक मोतीं आणून द्या, म्हणजे आपण ज्या दागिन्यांत भर घालावयाची त्यांत भर घालूं; जे दागिने नीट करावयाचे ते दागिने नीट करूं; जे मुळींच नवे करावयास पाहिजेत ते नवे करूं; सोनार घरींच आणून बसवून आई त्याच्याजवळ एकसारखी बसून आपल्यासमक्ष काय करावयाचें तें करून घेईल; या गोष्टींत पुरुषांपेक्षां बायकांनाच जास्ती समजतें, पुरुषाच्यानें ती दगदग होणें नाहीं, वगैरे वगैरे बोलून आपली बायको दागिने आपल्यास देण्याचें टाळील, अशी भीति त्यांस वाटत होती; परंतु तसें कांहीं झालें नाहीं. आपली युक्ति सहज साधली असें पाहून त्यांस अर्थातच फार आनंद झाला. दागिने नेले तरी आठ पंधरा दिवसांत आपण लाखों रुपयांच्या सोन्याचे मालक होऊं, मग आतां आहेत याहून कमीत कमी चौपट किंमतीचे दागिने आपण आपल्या बायकोच्या अंगावर घालून तिला नखशिखांत सोनें, हिरे, माणकें, यांनीं भरून काढूं; असें त्यांनीं आपल्या मनास दहा पांच वेळां सांगून जणूं काय, आपण करतों आहोंत हें चांगलें नव्हे असें सांगणाऱ्या अंतःकरणांतील अत्यंत सूक्ष्म अशा ध्वनीस हे गप्प करून टाकीत होते.

दागिने हातीं पडण्याबरोबर त्यांस असें झालें, कीं आपण केव्हां एकदां बाहेर पडूं आणि रक्कम आणून ती बिंदुमाधव पांड्याच्याकडे नेऊन देऊं. येथेंच आपण अधिक वेळ गुटमळलों आणि तितक्यांत बायकोची मति फिरली तर रिकामी कटकट व्हावयाची. त्यापेक्षां येथून निघून जाऊन दुसऱ्या कोठें तरी स्वस्थपणें बसून किंमत किती होईल आणि किती रुपये तरी त्यावर निघतील त्याचा विचार करूं. असें मनांत आणूनच त्यांनीं तेथून अति त्वरित पाय काढला.

कोणाच्या येथें जावयाचें आणि दागिने ठेवून पैसे आणावयाचे त्याजबद्दल त्यांचे मनाचा निश्चय झालाच होता. आपण खानदान घराण्यांतील गृहस्थ. आपणास मुंबईसारख्या शहरांत लहानसान रकमासुद्धां मिळूं नयेत किंवा त्या मिळण्यासाठीं दागिने गहाण टाकण्याची पाळी आली हें लोकांस कळूं नये, अशी त्यांची अत्यंत उत्कट इच्छा असणें हें अगदीं साहजिक होय आणि त्या इच्छेनुरूपच त्यांनीं कोणास फारसा माहीत नाहीं असा आपल्या अर्धवट ओळखीचा सराफ गांठून

त्याजला पैशासाठीं विचारून ठेविलें होतें. त्याच्याच घराचा रस्ता त्यांनीं पकडला होता. ते तडक त्याच्या घरीं गेले ते वेळीं तो घरीं नव्हता. यामुळें काकासाहेबांस फार वाईट वाटलें, परंतु थोड्या वेळांत परत येतील अशी त्याच्या घरच्या माणसांनीं आशा लाविली असल्यामुळें ते तेथेंच बसले. मनुष्य रिकामाच बसला म्हणजे अर्थातच त्यास बसल्या बसल्या कांहीं तरी उद्योग करावा असें वाटतें. काकासाहेबांस सहजच या वेळीं असें वाटलें कीं, एकंदर दागिने सुमारें किती भार आणि किती किमतीचे आहेत, हें आपल्या आपल्याशींच अजमावून पाहावें म्हणून त्यांनीं इकडे तिकडे कोणी नाहीं असें पाहून तो दागिन्यांचा डबा उघडला. डब्यांत दागिने कसे तरी भरलेले होते. ते पाहून ते आपल्याशींच उद्गारले, "दागिने कसे ठेवावे याची सुद्धां या गाढव बायकांना अक्कल नसते." सरीच्या खालींच पेट्या, त्याच्याच पलीकडच्या बाजूस पोत व ततमणी, ततमण्याच्या खोडाला गुरफटलेली हरपररेवड्याची माळ व दोन तीन पटविलेल्या दागिन्यांच्या गोंड्यांत गुंतलेला नाजूक चंद्रहार. ही व्यवस्था पाहून काकासाहेब पुनः आपल्याशींच म्हणतात, "भिकारड्या माणसांना दागदागिन्यांची ओज तरी कशी राखतां यावी! पुन्हां आतां दागिने म्हणून तिच्या हातीं देणारच नाहीं. ज्या दिवशीं पाहिजेत त्या दिवशीं घालण्याला देऊन लागलीच परत घेत जाईन. यांची एक यादी तरी आतां करतों." असें म्हणून त्यांनीं तेथें पडलेला दौतीचा ठोकळा पुढें ओढला व बसण्याच्या गादीखालीं कागदाकरितां ते चापसूं लागले. तेथें त्यांस मोठासा कागद अर्थातच मिळाला नाहीं. सराफी रोतीचीं घड्या पाडलेलीं चिटोरीं मिळालीं. त्यांतलीं एक दोन ओढून पुष्टीपत्रावर घेऊन त्यांनीं यादी करण्यास श्रीकार काढला आणि एकेक दागिना उचलून स्वारी पाहून व हातावर तोलून वजनाचा अंदाज करूं लागली. सरी हातांत घेतांक्षणींच त्यांस कांहीं तरी चमत्कारिक वाटलें असावें. पुनः पुनः त्यांनीं ती हातावर तोलून पाहिली. नंतर नीट न्याहाळून पाहिली तो त्यांच्या मनांत जो काय संशय आला तो दृढ होत चालला असें दिसलें. मग तो संशय काय असेल हें त्यांचें त्यांसच ठाऊक. त्यांनीं त्या सरीकडे पुनः पुनः चमत्कारिक दृष्टीनें पाहून एकवार ती बाजूस ठेविली. जणूं काय, असूं द्या. मग पाहूं हिचें काय आहे तें. सध्यां दुसरे दागिने पाहूं. असें ह्मणून त्यांनीं चंद्रहार सोडविण्याचा यत्न सुरू केला. ते आपल्या तोंडांतल्या तोंडांत कांहीं पुटपुटतच होते. मग अशा तऱ्हेनें तो गुंतूं देणाऱ्या माणसांस शिव्या देत होते कीं काय नकळे. चंद्रहार हा दागिना किती नाजूक असतो; तो कशांत—त्यांतून रेशमी धाग्यांत वगैरे—अडकला म्हणजे तुटण्याची किती भीति असते, हें कोणासही सांगावयास पाहिजे असें नाहीं. आणि तो बायकांच्या निष्काळजीनें दुसऱ्या दागिन्याच्या गोंड्यांत वगैरे अडकून त्याच्या टिकल्या पाडल्या असतां किती नुकसान होतें. काकासाहेबांस तर तें पाहून अतिशय संताप आला. आणि तो संताप विशेष वाढण्यास कारण त्याच्या कमींत कमी पन्नास साठ टिकल्या त्या डब्यांत पडल्या होत्या हें होय. ते दोनदोनदां चारचारदां त्या टिकल्या हातांत घेऊन त्यांचेकडे पाहात आणि चू चू चू चू

असें करून हलहलून व " गादव, गादव " असें ह्मणून त्या पुनः त्या डब्यांत टाकीत. पुनः कांहीं तरी त्यांच्या मनांत शंका आली असावी असें दिसलें आणि त्यांनीं एकदम त्या डब्यांतील दहा वीस टिकल्या हातांत घेऊन त्या तोलल्याप्रमाणें करून व त्यांजकडे नीट न्याहाळून पाहून आपल्याशींच मोठ्या आश्चर्यानें उद्गारतात, "हें आहे तरी काय ! ही विलक्षण शंका मला कां येते आहे ! " असें म्हणून त्यांनीं त्या सगळ्या टिकल्या ओतून काढल्या आणि दागिनेही सर्व आपल्यापुढें ओतून टाकून सोन्याचे, मोत्यांचे व जडावाचे दागिने ते निरनिराळे करूं लागले. प्रथमतःच पोत हातीं लागली. ती असा हातावर घेऊन त्यांतील मोत्यांच्या पाण्याकडे ते पाहूं लागले व वजन तर त्यांच्या हातास फारच हलकें लागलें, असें त्यांच्या चेहेऱ्यावरून दिसलें. अर्थातच ते अगदीं कावरेबावरे झाले. हा पोत आपला खास नव्हे, या दागिन्यांत खचित् कांहीं तरी घोटाळा आहे, असाही उद्गार त्यांचे तोंडून बाहेर पडला. एकदां मनुष्यास शंका आली ह्मणजे मग सर्वच कांहीं शंकास्पद वाटूं लागतें. त्याप्रमाणें अर्थातच आतां प्रत्येक दागिना त्यांस शंकास्पद दिसूं लागला. प्रत्येक दागिना त्यांनीं उचलावा; हातावर घेऊन त्याचें वजन अजमवावें, चमत्कारिक चेहेरा करावा आणि हें गूढ आहे तरी काय असें ह्मणून हातावरच्या हातावर त्या दागिन्यांकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहावें. असा प्रकार चालला असतांनाच ते ज्या गृहस्थाकडे आले होते ते गृहस्थ तेथें आले. आल्याबरोबर काकासाहेबांनीं आपला चेहेरा बदलला. लागलीच ते एकदम त्या गृहस्थास म्हणतात, " मी आपल्याला सांगितल्याप्रमाणें दागिने घेऊन हजर झालों; पण आपलाच पत्ता नव्हता. मी आतां उठून जाण्याच्या विचारांत होतों. मला रकमेची फार जरूर ह्मणून मी एवढा आपल्याकडे आलों. नाहीं तर येण्याची तितकी जरूरी नव्हती. आपण ह्मटल्याप्रमाणें आपली तयारी आहे ना ? " तें ऐकतांच त्यांचे स्नेही एकदम त्यांस म्हणतात, " त्या तयारी-करितां तर मी गेलों होतों. ती तयारी करून वेळेवर येईन असें वाटलें होतें पण दुसऱ्याच्या हातांत काम असल्यावर कमी अधिक उशीर हा व्हायचाच. आपण गेलां असता तर आपल्यालाच कामाची अडचण झाली असती. माझ्याकडे काय होतें ! मी बोलल्या बोलाला तयारच आहे. आपल्याला तितकी जरूरी नसली तर रक्कम आणली तशी परत करितों. " इतकें बोलून त्यांनीं रकमेची पुरचुंडी जरा वाजवून दाखविली. तो नाद ऐकण्याबरोबर काकासाहेबांचें चित्त प्रफुल्लित झालें आणि ते एकदम त्या सराफ मित्रास ह्मणतात, " अहो मला गरज फार म्हणून मी घरांतले सगळे दागदागिने घेऊन इथें येऊन बसलों आहें. आतां उशीर नका लावूं. वास्तविक ह्मटलें म्हणजे मी आठ किंवा दहा दिवसांतच तुमची रक्कम परत करीन अशी माझी खात्री आहे. मी आज तसा मागायला गेलोंच, तर मुंबईतल्या माझ्या सावकार मित्रांकडून एक लाख रुपये सुद्धां आणीन. पण कांहीं कारणामुळें मला त्यांच्याकडे जाण्याची इच्छा नाहीं. म्हणून मुकाट्यानें तुमच्याकडे आलों आहें. हा डबाचा डबा असाचा असा मोहोरबंद करून आपल्या पटींत घालून ठेवा. मी

सरोबर येईन, आठवेंच दिवशीं येईन असें ह्मणतों, पण तुमची आमची चोळी एक महिन्याची. सव्वापट नव्हे दुप्पट रुपये मग मी तुह्मांला तुमची फेड करून वर उसनवारी देईन. तुमच्या व्यापारांत आमची मदत असें समजा. चला उचला आणि रुपये मोजा कसे! मला आतां नेऊन भरले पाहिजेत म्हणून एवढी गर्दी. त्यांतून तुह्मांला या दागिन्यांचें वजन वगैरे सर्व यथास्थित हवें असेल, तर मी उद्यां सावकाशीनें येतों आणि आपण बसून प्रत्येक दागिन्याचें वजन तोल वगैरे करून एक यादी तुमचेजवळ ठेवा, एक मी आपलेजवळ ठेवीन आणि एक डब्यांत टाकून ठेवूं. सध्यां आतां रुपये मोजून घेऊन मला जाऊं द्या." सराफ गृहस्थ जरा मोठ्यानें हंसला व काकासाहेबांस ह्मणतो, "तुह्मांला जरा विशेषच घाई दिसते हो. तसेंच रुपये आपल्याला द्यायला मुळींच हरकत नाहीं. पण व्यवहाराला चोख असावें. मागें पुढें कसलाही लढा पडूं नये, एवढ्याकरितां आतांच सगळा निकाल करून चोख यादी वगैरे करून आपण रुपये घेऊन गेलांत तर बरें नव्हे? कोणत्याही तऱ्हेची मग तक्रार राहिली नाहीं."

काकासाहेब लागलीच त्यास म्हणतात, "अहो, तुह्मी म्हणतां त्याला माझी बिलकुल हरकत नाहीं. व्यवहाराच्या कामांत अगदीं चोख असावें, हा तर माझा नेहमींचा बाणा आहे. पण मला अतिशय गर्दी आहे येवढ्याच करितां मी यादी वगैरे उद्यां करूं असें म्हणतों. तुमची अटच असली तर माझी बिलकुल हरकत नाहीं, आतां करा. पण जितक्या लवकर होईल तितक्या लवकर बरें."

सराफ गृहस्थ पुनः हंसला व म्हणाला, 'मी मोठ्या पेंचांत सांपडलों आहें. आपल्याला तसेच पैसे देऊं तरी अडचण. न देऊं आणि यादी वजनें वगैरे करीत बसूं, तर वेळ जातो म्हणून तुमची अडचण; यादी वगैरे करण्याला व किंमती मांडण्याला एक प्रहर तरी लागेल खास. आतां असें करतों, दागिने मी एकदां दृष्टीनें पाहिले आहेत, त्यांची किंमत साधारणतः माझ्या मनांत आली आहे, आपण म्हणतां इतकी सगळी रक्कम आतांच देत नाहीं. आतां तुम्हांला जरूर तितकी रक्कम घेऊन चला. दागिने सगळे डब्यांत घालून डबा माझ्या स्वाधीन करा. उद्यां सकाळीं या. वजनें मापें करूं व किंमती ठरवूं. आज मी देतों त्या रकमेपेक्षां किंमत जितकी अधिक होईल—झाली तर हो--होईलसें मला तर कांहीं वाटत नाहीं.--पण झाली तर देईन."

काकासाहेब एकदम अचंबा दाखवून म्हणतात, "झाली तर! अहो, याचा अर्थ काय? पुरे बारा हजारांचे दागिने मी तुमच्याजवळ पांच हजारांला ठेवतों आहे. त्यांतून आज तुम्ही मला अर्डीच हजारच देऊन यापेक्षां या दागिन्यांची किंमत अधिक होणार नाहीं असें म्हणतां याला काय म्हणावें! माझ्यासारख्या जाणत्या माणसाजवळसुद्धां सगार्फी करतां कीं काय? तें कांहीं नाहीं. मी लागेल तितका वेळ बसतों, तुम्हीं आपला बटवा काढा. वजन माप काय व्हायचें तें तुमच्या हातांनींच होऊं द्या. गरजवंताला अक्कल नसते आणि उपायही नसतो एवढीच गोष्ट खरी." असें ह्मणून त्यांनीं ती सरी उचलली आणि सराफसाहेबांच्या पुढें केली. तें पाहाण्याबरोबर त्यांच्या सराफ मित्राच्या मनांत काय आलें कोणास कळे, तो एक-

द्रम काकासाहेबांस म्हणतो, " व्यवहाराच्या कामांत रागावतां कां ? रागावूं नका. आपला व आमचा इतके दिवसांचा परिचय असल्यामुळे क्षुल्लक बाबतीवरून मोडण्याची पाळी येण्यापेक्षां मी हे रुपये आपल्यास तसेच देतों, मग तर हरकत नाहीं ? पण हे फक्त तीन हजार आहेत इतके घेऊन चला. आपण म्हणतां त्याप्रमाणें दागिने डब्यांत घाला. आपली मोहोर करा. मी आपल्या पेटींत ठेवून देतों. आठ दिवसांनीं, पंधरा दिवसांनीं, महिन्यानें जेव्हां तुमची रक्कम येईल तेव्हां आपला डबा घेऊन जा. आपल्या उपयोगी पडलों असें तरी होईल. तेवढ्यांतच माझा संतोष." असें म्हणून तो काकासाहेबांकडे पाहूं लागला. त्या त्याच्या बोलण्यानें काकासाहेब खुष झाले. त्यांस तेंच पाहिजे होतें. त्यांनीं लागलीच भराभर ते दागिने डब्यांत भरले. या वेळीं ते इतक्या गर्दीनें भरले, कीं पहिल्यापेक्षांही त्यांची चोपट दुर्दशा झाली असावी, परंतु आतां तिकडे त्यांचें लक्ष्य नव्हतें. कांहीं कारणामुळें त्यांचे मनांत कांहीं शंका आल्यामुळें त्यांस ते दागिने चटकन् दृष्टीआड करावयाचे होते यामुळें त्यांनीं तसें केलें. सर्व दागिने आंत घालून डबा लावून व त्याला कुलूप घालून त्यांनीं तो आपल्या सराफ मित्राच्या पुढें ठेविला. त्याही गृहस्थाच्या मनांत काय होतें कोणास ठाऊक. त्यानेंही तो डबा आपल्यापुढें ओढून घेऊन रुपये काकासाहेबांच्यापुढें टाकले व त्यांनींही ते लवकर मोजून घेऊन तेथून आपला गाशा गुडाळला. सराफसाहेबांस त्यांच्या लवकर जाण्यानें संतोषच झाला असावा असें त्याच्या चर्येवर दिसलें. इतकेंच नव्हे तर "मी सराफभाई, दहा रुपयांचा माल तीन रुपयांपेक्षां अधिक पैसे देऊन कधीं तरी ठेवीन का ? गृहस्थानें धांदलींत मोहोर वगैरे केली नाहीं हें तर फारच उत्तम झालें. आतां दार वगैरे लावून स्वस्थपणें वजन माप पाहूं या. आपल्या अंदाजापेक्षां कमी तर भरणार नाहींच " असा उद्गार काढला. पण दार वगैरे लावून तोलामापास सुरुवात करतांच त्याची वृत्ति कशी काय झाली !

---

# प्रकरण ६५ वें.

## शौण्डीरशाळा गेली!



काकासाहेबांच्या हातांत रक्कम पडून काकासाहेब बिंदुमाधव पांड्यांच्या शौंडिर शाळेंत जातात तों तेथें पांड्ये नव्हते, परंतु त्यांचा एक नौकर त्यांस "तुह्मी येथें बसा, ते थोड्याच वेळांत येथें येणार आहेत. आपण आलां म्हणजे आपल्यास बसवून घेण्यास त्यांनीं मला सांगितलं आहे. त्यांनीं फार वेळ आपली वाट पाहिली आणि शेवटीं नाइलाज म्हणून स्वारी बाहेर गेली" असें अनेक प्रकारें सांगितलें. काकासाहेब अर्थातच बसले, परंतु स्वस्थ बसले नाहींत. ते तीन तीनदां त्या रसायनशाळेंत जाण्याची इच्छा करीत. इतकेंच नव्हे तर ते त्या शाळेंत गेलेही. पांड्यांच्या नौकरानें त्यांस अडथळा केला नाहीं, कारण हे व आपले यजमान नेहमीं आंत बसून कांहीं गुप्त कारभार करतात हें त्यास पक्कें ठाऊक होतें. ज्या स्थानीं बसून आपल्यास आतां लाखों रुपयांचें सोनें तयार करून मिळणार, त्या स्थानांत गेल्यानेंच काकासाहेबांस किती तरी आनंद झाला! मनुष्य एकटा असला आणि कांहीं तरी जबर सुखाच्या आशेनें बद्ध असला ह्मणजे मग त्यास दुसरें कांहींच सुचत नाहीं. तो आपला त्या विचारांत गर्क झालेला असतो. अशी स्थिति असतां त्याच्या मनांत मनोराज्याचा विस्तार केवढा तरी होत असतो त्याला कांहीं पारावारच नाहींसा होतो. काकासाहेब मनाच्या याच स्थितींत होते. त्यांना हेंच वाटत होतें, कीं आतां आपण जहागिरदार तर आहोतच; परंतु लक्षाधीश झालों, म्हणजे सोन्याचा व्यापार करावयास लागूं, किंवा सोनें हलके हलके सगळें विकून टाकून कांहीं गिरण्यांचा लग्गा साधला तर पाहूं एखादी दुसरी गिरणी सबंधच्या सबंध मिळाली तर पाहूं आणि मुंबईचे इतर मोठे व्यापारी जसे आहेत, तसेच आपणही एक मोठे व्यापारी होऊं. असा मनोराज्याचा विस्तार स्वारी करीत असतां एकाएकीं त्यांचे मनांत एक अजब कल्पना आली. या बिंदुमाधव पांड्यास आणखी थोडी रक्कम देऊन त्याचेकडून हें किमयेचें सगळें इंगितच करून घेतलें तर! त्याला चार दोन हजार रुपये आणखी दिले, तर तो कांहीं नाहीं म्हणायचा नाहीं. त्याची युक्ति त्याच्याजवळ राहून आपल्यालाही ती सांगितली, तर त्याचें नुकसान नाहीं. नाहीं तरी तो आपल्याला इतक्या रुपयांवर लाखों रुपयांचें सोनें देणारच. मग त्याची भट्टीच काय आहे ती त्यानें सांगण्याला काय हरकत आहे? शिवाय आपल्यावर त्याचा जबर लोभ आहे. त्या लोभाप्रमाणें ह्मटलें ह्मणजे तो आप-

त्यास सांगण्याला मुळींच ना म्हणणार नाहीं. अशाही तऱ्हेचे विचार त्या लोभी ज्ञाताऱ्याच्या डोक्यांत वावरूं लागले, पुनः विचार असा उभा राहिला कीं, त्यानें यदाकदाचित् चार दोन हजाराला कबूल केलें, तरी उपयोग काय ? आतां एकदम पैसे कोठले आणणार ! पैसे कोठले आणणार ! हा विचार येतांच थोडासा विचार करून त्यांनीं जवळचें होतें नव्हतें तें विकून टाकून पैसे करूं, असें मनास सांगून मनाचें समाधान करून घेतलें. अशा तऱ्हेनें कोणीकडून तरी आतां आपण एकदम लक्षार्धाश होणार या विचारानें आनंदित होऊन स्वारींनीं मनांत विस्तृत असें साम्राज्य निर्मिलें व त्यांत वाटेल त्या रीतीनें वावरत असतां त्यांचे परम मित्र पांड्ये हे तेथें आले. त्यांचा आवाज कानीं पडतांक्षणींच काकासाहेब बाहेर येऊन त्यांस म्हणतात, काय महाराज, मी रक्कम घेऊन आल्याला कितीतरी वेळ झाला, आणखी तुमचा तर कुठें पत्ता नाहीं, अशा महत्त्वाच्या बाबतींत असं कसं करतां बोआ !"

पांड्ये तें ऐकून थांबून ह्मणतात, "अहो, आह्मांला कांहीं तेवढाच का उद्योग आहे ! आणखी पुष्कळ उद्योग आहेतना ! रोगी लोक कितीक आमच्या नांवाचा जप करीत पडलेले असतात, त्यांची कांहीं तजवीज पहायला पाहिजे का नको ? द्रव्यदानापेक्षां जीवदान हें कितीतरी श्रेष्ठ आहे ! शिवाय तुह्मी तरी कुठें बोलल्या बोलाला येतां ! तुह्मी केव्हां येतों म्हणून सांगितलं होतं, आणि केव्हं आलां याचा विचार करा. बरं चला, आणा आतां काय रक्कम आणली आहेत ती. आतां तरी पुरी आणली आहेत का ! का मागच्यासारखीच ? त्यांत आणखी गुरुजींकडून आज चिट्ठी आली, कीं आपल्याला लागणारा मसाला हिमालयांत हल्लीं अतोनात दुर्मिळ झाला आहे. आणखी आठ पंधरा दिवसांनीं तो मुळींच नष्ट होईल अशी भीति वाटते. तर काय घ्यायचा असेल तो आतांच घेऊन ठेवला तर मिळूं शकेल; नाहीं तर मिळणार नाहीं. म्हणून म्हणतों कीं, जर तुह्मांला आतां काम करून घ्यायचं असलं, तर संधि आहे. बहार उडवून द्या. पुनः तुह्मी आह्मी एके ठिकाणीं असूं, काम करूं, कोणी पाहिलं आहे! आज मितीला जें घडेल तें करून घ्यावं जितकं ताम्र अधिक घालून व मसालाही अधिक घालून मोठ्या प्रमाणावर भट्टी तयार करावी, तितकं सोनं अगदीं ग्सरशिन बावनकशी बनतं. शिवाय एकदां आतां तुमच्याकरितां आम्ही भट्टीबिट्टी बनवली म्हणजे, पुनः आमची लहर लागेल न लागेल ! आह्मी काय अवलिया प्राणी. जशी मर्जी फिरेल तशी फिरायची; नाहीं असं मनांत आलं, कीं मग अगदीं काय वाटेल तें केलं तरी नाहींच." असा एकंदर बोलण्याचा प्रकार सुरू करून स्वारींनीं आपली पहिली चर्पटपंजरी चालविली आणि रकमेकडे हात केला. काकासाहेबांस वाटलें कीं, आपली नवी इच्छा आपल्या हितकर्त्यांस बोलून दाखविण्यास संधि फार उत्तम आहे. म्हणून ते ह्मणतातः

"वा ! हें काय आपलं भाषण ! मी तर मनांत म्हणतों आहे कीं, आतां आपणाला दुसरी नवीच एक विज्ञापना करावी. ती विज्ञापना एवढीच कीं, आपण ही विद्याच ह्मटलं मला शिकवून टाकावी, ह्मणजे मोठा प्रसाद होणार आहे. माझ्या-

सारख्या संसारी मनुष्यावर एवढा जर अनुग्रह झाला, तर आणखी काय पाहिजे ! आपल्या नांवाच्या सतत...... "

पांड्ये महाराजांनीं तें ऐकतांच उत्तरादाखल फारच मोठ्यानें हास्य केलें, आणि ते ह्मणाले, " वाहवा ! काकासाहेब वाहवा ! अहो, विद्या शिकून येत असते काय ! ही आह्मी विद्या म्हणतों इतकंच. पण ही खरोखर सिद्धि आहे समजलांत ! आणखी ही सिद्धि ज्याची त्याच्यापुरतीच. शिकवून येणारी नव्हे. तसा कांहीं विचार सुद्धां मनांत नका आणूं. तुह्मांला पाहिजे तितकं सोनं पाहिजे तर मी करून देतों. पण याहून जास्त होणं शक्यच नाहीं. आतां असं करा, ती रक्कम इकडे द्या. आणखी हें गुरुजींचं पत्र पहा. त्यांत पाह्यचं आहे काय ह्मणा. त्यांनीं लिहिल्याप्रमाणं मसाला अगदीं दुर्मिळ झाला आहे, करितां ही आपली, पहिली भट्टी संपतांक्षणींच दुसरी भट्टी लावायची इच्छा असली तर तातडतोब रक्कम त्यांचेकडे पाठवितां येईल असें करा पाहूं. ह्मणजे तुह्मांला सोन्यांत गाडून टाकतों गाडून ! पण सिद्धि तुह्मांला होण्याची गोष्ट सुद्धां बोलूं नका. ती सिद्धि अशी सांगून शिकवून प्राप्त होत नाहीं; तर त्याला फार निराळ्या प्रकारचीच तयारी लागते. ती तुमच्यासारख्या संसारांत गढलेल्या माणसाला मिळणं सुद्धां शक्य नाहीं हें पक्कं समजा. आणा, चला, ती रक्कम किती आहे ?" असें म्हणून त्यांनीं रक्कम घेण्यास पुनः हात पुढें केला. काकासाहेबांनीं ती रक्कम त्यांजपुढें केली व ते ती मोजूं लागले. परंतु बिंदुमाधव त्यांस "मोजण्याच्या भानगडींत पडूं नका. तुह्मी तोंडानं सांगा आणखी इकडे द्या. आतां आपल्याला वेळ नाहीं. शिवाय मला गुरुजींनीं आजच्या पत्रांत तातडतोब बोलावलं आहे, तेव्हां मी केव्हां इथून जाईन याचाही नेम नाहीं. तर आतां तुह्मांला कबूल केल्याप्रमाणें तुमच्या पदरांत माप घालून टाकलं पाहिजे. माप काय करायचं आहे. म्हणा—अगदीं बावनकशी शंभरनंबरी लगडीच्या लगडी देतों एकदां तुमच्या अंगावर फेंकूनन् काय विचारतां ? चला चला. आटपा, आतां काय जी असेल ती असेल रक्कम, थोडीबहुत कमी असली तरी हरकत नाहीं. तुमची माझ्या ठिकाणची निष्ठा पाहूनच मी अगदीं संतुष्ट झालों आहे. मी तरी नानाप्रकारांनीं बोलून तुमची मौजच पाहिली, अगदीं निव्वळ परीक्षा पाहिली. दुसरं कांहीं नाहीं. ही परीक्षा तुम्ही खचित पास झालां यांत शंका नाहीं. नाहीं तर दुसरे लोक असतात. आमच्यासारख्या सिद्धापासून वाटेल तशीं कामं करून घेण्याला त्यांना कांहीं वाटत नाहीं. पण आम्हांला लुच्चे म्हणायचं, आम्हांला शिव्या द्यायच्या, आमची निंदा करायची, असा प्रकार त्यांचा अमला, ह्मणून आह्मी काय करतों, कीं जो आमच्या नादीं लागतो, त्याची निष्ठा तरी आमच्यावर आहे किती, हें आधीं पाहतों. ती निष्ठा पाह्यची, ह्मणजे त्याच्याजवळ आधीं पैसे सपाटून मागायचे. पैसे मागायला सुरुवात झाली, कीं तो माणूस बहुतकरून आह्मांला लुच्चे समजायला लागून, आमच्यापासून दूर दूर व्हायलाच लागतो. कारण त्याची समजूत अशी असते, कीं आह्मी सिद्ध, आणखी आह्मांला पैसे मागण्याचा काय संबंध ? पण माणसाची खरी कसोटी पाहायची. तर त्याच्याजवळ पैशाची मागणी

करायला लागावं. अशी मागणी झाली कीं, तो जिरलाच, त्याची भक्ति नाहींशी झालीच म्हणून समजावी. अशी भक्ति नाहींशी झाली, कीं त्याची परीक्षा झाली. तो पुनः आपल्याला त्रास द्यायला येत नाहीं ही खात्री. आणि अशी ज्याची निष्ठा तुटपुंजी ठरेल, त्याच्याशीं व्यवहार करण्यांतही तात्पर्य नाहीं. अर्थातच त्याचा आमचा मेळ कधीं जमायचा नाहीं. अहो, जो आमच्यापासून कांहीं तरी अजब सिद्धि प्राप्त होईल किंवा अपार द्रव्य मिळेल, अशा बुद्धीनं येतो, त्याच्यापाशीं आम्ही एवढेंसें द्रव्य मागितलं, कीं लागलीच आमच्याबद्दल त्याला संशय उत्पन्न होतो ! अशी कांहीं दुनियेची मजा आहे ! असो. पण आपली निष्ठा फार दृढ. ती पाहून मी अत्यंत तृप्त झालों. आतां माझ्या मनांत खरोखर असं सुद्धां आलं आहे, कीं आपल्यावर कृपा करून आपल्याला ही सिद्धि प्राप्त करून द्यावी. पण आमच्या गुरुजींची आज्ञा घेतल्याखेरीज मला तसं करतां येत नाहीं. तरी आतां तुह्मांला निरिच्छ करून सोडतों. उद्यांची भट्टी सबंदची सबंद तुमच्या स्वाधीन करतों, आणखी मग मी एकदा आमचे गुरुजी हिमालयांत आहेत तिकडे येण्याबद्दल त्यांची आज्ञा झाली आहे, त्याप्रमाणं जाऊन येतों. तेव्हां त्यांची आपल्याला सिद्धि दान करण्याला आज्ञाही विचारून येतों. इतकं झाल्यावर मग तर कांहीं हरकत नाहीं ? आतां रक्कम ठेवून तुह्मी जा. कर्मधर्मसंयोगानें उद्यांचाच दिवस, तिसरा प्रहर फार उत्तम आहे. आतां तुमचं काम झालं. उद्यां तुह्मी लाखों रुपयांच्या सोन्याचे मालक झालां. अगदीं काळजी करूं नका. मात्र एवढं करा कीं, उद्यां दुपारीं बारा वाजल्याबरोबर इथं या. आलांत कीं काम झालं. चार घटका आंत बसूं, आणखी करून टाकूं काम. आपला माल उचलान् घरीं जा. आतां जा. आतां मला काम आहे."

असें ह्मणून त्यानें काकासाहेबांस लावून दिलें. काकासाहेब अत्यंत आनंदित होत्साते मनःसाम्राज्यांत अगदीं पूर्णपणें गढून कल्पनातीत द्रव्याचा कसा कसा उपयोग करावयाचा, यांत तो सबंध दिवस रात्र व दुसरे दिवशीं बारा वाजेपर्यंतचा वेळ घालवून पुनः शौंडीरशाळेंत आले तों काय ? शौंडीरशाला तेथें मुळींच नाहीं !

काकासाहेब किती हुरुपानें येथें आले आणि त्यांचा हिरमोड किती झाला, हें वर्णन करून सांगणें केवळ अशक्य आहे ह्मटलें तरी चालेल. ते आले त्या वेळीं त्यांचे पायांत जणूं काय विजेची शक्ति आली होती आणि विजेच्या शक्तीनें चालू केलेलें यंत्र ज्याप्रमाणें ती शक्ति काढून घेतांच अगदीं बंद पडतें, त्याप्रमाणेंच नंतर त्यांच्या शरीराची अवस्था झाली. शौंडीरशालेजवळ येऊन जिना चढून जातांच तेथें त्या जागेला कुलूप लागलेलें पाहून त्यांचें मन गोंधळून गेलें. त्यांस कांहीं सुद्धां सुचेना. वेड्यासारखें झालें, म्हणून ते इकडे तिकडे पाहूं लागले. तों तेथें त्यांस आणखी एक चमत्कार दृष्टीस पडला. शौंडीरशालेची एक खिडकी उघडी होती. त्या खिडकींतून त्यांची दृष्टि सहज आंत गेली, तों आंतलें स्वरूप अगदींच भिन्न झालेलें ! त्या शालेंतील सर्व औषधें कोणीकडे अदृश्य झालेलीं ! जिकडे तिकडे केर व गदळ पडलें असून घाणच घाण ! औषधाची कुपी एकही

नाहीं. तेव्हां हा प्रकार आहे तरी काय ? शौंडीरशाला जरी लागलेली असली, तरी हा प्रकार काय हा ! शालेंतल्या वनस्पति कोठें गेल्या ? कुप्या कोठें गेल्या ! नेहमीं येथें कोणी माणूस असावयाचा तोही येथें नाहीं, याचा अर्थ काय ? असे अनेकविध प्रश्न काकासाहेबांच्या मनांत उभे राहिले व तर्कवितर्क उद्भवूं लागले. काल अगदीं वनस्पतींनीं आणखी कुप्यांनीं खचून भरलेली जागा आज अगदीं धुऊन नेल्याप्रमाणें दिसत होती. याच्यावरून समजावें तरी काय ? असें त्यांनीं आपल्या स्वतःला पंचवीस वेळां विचारलें आणि जसा एखादा वेडा असावा, त्याप्रमाणें त्यांचें वर्तन सुरू झालें. खिडकी आणि दार यांमध्यें चार हातांचें सुद्धां अंतर नसेल. परंतु स्वारीनें त्या दारापासून खिडकीपर्यंत यावें आणि खिडकीपासून दारापर्यंत यावें असें एकसारखें चाललें होतें. दारापाशीं आले, कीं त्यांनीं त्या दाराच्या फटींतून पांच चार ठिकाणीं वांकवांकून आणि डोळे ताणताणून पाहावें; नंतर एकदां कुलूप हलवून पाहावें. कुलूप निघत नाहींसें दिसलें, कीं सुसकारा टाकावा आणि खिडकीकडे धांवत जावें. तेथें त्या खिडकीच्या गजाला कपाळ टेंकून डोळे वटारून आंत पाहावें आणि आंत नुसतें गदळ मात्र आहे, बाकी औषधें वगैरेंचा पत्ता नाहीं असें पाहिलें, कीं हें गौडबंगाल आहे तरी काय ? असें आपल्याशींच अगदीं निराश होऊन म्हणावें. त्यांस काय करावें हें सुचेना. एक मन सांगे, कीं कांहीं तरी दगा झाला आहे. दुसरें मन सुचवी कीं, फारा दिवसांत त्या जागेचा केर वगैरे काढला नसेल, म्हणून आज काढण्याचें पांड्यांच्या मनांत आलें असावें दुसरें कांहीं नाहीं. पण लागलीच पहिलें मन सांगे, कीं आज जर इतकें विलक्षण महत्त्वाचें काम होतें आणि त्यांनीं मला बोलावलें होतें, तर तें असें कसें करतील ? तेव्हां तें कांहीं शक्य नाहीं. कांहीं तरी दगाच असावा. आपण सर्वस्वी कोणा तरी भामट्याच्या हातांत सांपडलों आहोंत, त्याच्या भाषणास भुलून आपण आपले पैसे गमावले. हा विचार त्यांच्या मनांत वारंवार वारंवार उभा राहून त्यांस दुखवीत होता. पण मौज ही कीं, पूर्ण निराशा होण्याला कितीं जरी कारण झालें, तरी मनुष्य आपल्याकडून आशा करीतच असतो. अमुक नाहीं झालें, हरकत नाहीं, तमुक होईल. तमुक नाहीं, अमुक होईल, असें करून पण आशेपासून होणारें मिथ्या सुख कायम ठेवण्याकडे त्याची प्रवृत्ति असतें, एवढी गोष्ट खरी. काकासाहेबांची अवस्था अशीच झाली होती. त्यांच्या मनाचा अंतस्थ भाग त्यांस असेंच सांगत होता कीं, आपण कांहीं तरी भयंकर गोत्यांत आलों आहोंत. परंतु दुसरा विचार असाही येई कीं, " नाहीं, असें नाहीं, पांड्यांना कांहीं कारण झालें असेल म्हणून त्यांनीं येथून शाळा दुसरीकडे नेली असेल, किंवा जागा स्वच्छ करण्याकरितां सामानसुमान उचललें असेल. आतां येतील, मग येतील. पण येतील येतील करतां करतां जवळ जवळ एक तास गेला. कांहीं कोणी येईना आणि जाईना. शेवटीं त्या घराच्या मालकाला जाऊन विचारावें असा त्यांनीं मनांत विचार केला. तेव्हां लागलीच स्वारी त्या घरांत दुसरी मंडळी कोणी कोणी दिसली त्यांजवळ त्यांनीं चौकशी केली. तों असें कळलें कीं, काल दुपारपासूनच तेथील सामान वाहून नेत होते आणि सकाळीं

उरलें सुरलें तें उचलून गाडींत घालून तें व त्यांचा माणूस कोणीकडे निघून गेले कांहीं ठाऊक नाहीं. तें एकतांक्षणींच काकासाहेब फार गोंधळले. मला बाग वाजतां इथें बोलावून आपण निघून गेले, तेव्हां खाचित खाचित तो बिंदुमाधव मोठा लुच्चा असावा, असा त्यांचा ग्रह झाला. आणि ते आपल्याशींच म्हणतात, एकून भामट्यानें आमच्या द्रव्यतृष्णेचा असा दुरुपयोग केलान्. आतां ते चार आठ हजार रुपये त्याला दिले, त्यांतली एक दिडकीसुद्धां आपल्या दृष्टीस पडणें शक्य नाहीं. हे रुपये आपण कशाला, आणखी कां दिले याबद्दल जगांत कळलं, तर आपली केवढी बेअब्रु ! छे ! छे ! काय आतां करावं ?" असें म्हणून त्यांनीं आणखी चौकशी करण्यास सुरुवात केली, तों त्यांस माहिती लागली ती अधिकाधिक पश्चात्तापास कारण झाली ! घराच्या मालकापर्यंत स्वारी गेली, तों त्यांस असें कळलें कीं, घरवाल्याच्या हातावर सुद्धां भाड्याचे बाबतींत त्या गृहस्थानें तुरीच दिल्या आहेत ! असें झाल्यावर मग तर काय विचारतां ? त्यांच्या तोंडचें पाणीच पळालें. त्यांच्या मनाची खात्री झाली, कीं आपण सर्वस्वी मूर्ख बनून आपणास त्या भामट्यानें फसविलें. आतां काय करावें ? पोलिसांत वर्दी द्यावी, कीं कसें काय करावें ? वर्दी द्यायची तर काय द्यावी ? आपण कशाकरितां त्या माणसाला रुपये दिले म्हणून सांगावें ? जर आपण खरें सांगितलें, तर आपला सगळ्या जगभर फजीतवाडा होणार यांत संदेह नाहीं. हा फजितवाडा करूनही रुपये आपले परत येतील ही आशा व्यर्थच आहे, असेंही पण त्यांच्या मनास पक्कें वाटलें. तेव्हां त्यांनीं तो विचार कांहीं वेळ दूर सारून आतां आपण मुंबईंत न राहतां चार दिवस आपल्या गांवची वाट धरावी, वसूल अधिकउण्या भक्तीनें करून एकदांचे रुपये ज्याचे त्याला भरून आपले दागिने परत आणावे, एवढाच आतां शहाणपणाचा मार्ग त्यांस दिसला; परंतु आशा कोठें अजीबाद नष्ट होते आहे ! आशेनें अद्यापि त्यांस आपल्याशीं जखडून धरलें होतें. यामुळें ते संध्याकाळपर्यंत त्या शौंडीरशाळेच्या आजूबाजूला घिरट्या घालीतच राहिले. कांहीं केल्या त्यांचे पाय तेथून हलतात. कोणीना कोणी तरी अजून येईल आणि आपल्याला आपल्या पांड्येमहाराजांचा पत्ता सांगेल असें त्यांच्या मनास वाटत होतें. शेवटीं अगदीं संध्याकाळ झाली, तेव्हां त्यांची अगदीं निराशा झाली आणि ते तेथून निघून आपल्या बिऱ्हाडाकडे जाण्यास निघाले. त्याच रात्रीं आपण आपल्या गांवीं निघून जावें असा त्यांचा बेत ठरला. बेत करणें मनुष्याधीन, पार पाडणें देवाधीन !

ते रस्त्यावर येतात तों त्यांस त्यांचे धनको सराफ मित्र भेटले. त्यांनीं यांस पाहातांच जणूं काय त्यांच्यावर हल्लाच केला. "काकासाहेब, काकासाहेब, फार नामी ! आपण अशा तऱ्हेनें दगलबाजी कराल ही कल्पनासुद्धां आम्हांला कधीं झाली नाहीं ! आतां या घटकेस आपला तो खोटा माल परत नेऊन माझे रुपये मला एक महिन्याच्या व्याजासकट द्या, नाहीं तर आपल्यावर विश्वासघाताची फिर्याद लावतों !" असें मोठ्यानें ओरडला !

काकासाहेब कोळेकर पडले !

# प्रकरण ६६ वें.

## रक्कम कशी भरणार?



**काकासाहेबांस** हा धाक वाटत असलाच पाहिजे होता, असें त्यांच्या वर्तनावरून दिसलें. दागिने त्यांनीं स्वतः डब्यांतून काढून हातावर घेऊघेऊन पाहिले, तेव्हांच त्यांना कसेसेंच वाटलें होतें, परंतु एकाद्या अंध मनुष्याची स्थिति होते त्याचप्रमाणें त्यांची स्थिति झालेली होती. त्यांस तूर्त पैसे पाहिजे होते, ते कसे मिळवावे या विचारापलीकडे कशाचाही विचार करण्यास त्यांस अवकाश नव्हता, किंवा मनाची प्रवृत्ति नव्हती. एकदां पैसे केव्हां मिळतील आणि आपण ते पांड्यांना नेऊन देऊन त्यांचेपासून लाखों रुपयांचें सोनें केव्हां करून घेऊं, या विचारापलीकडे कशाचाही विचार त्यांचे मनांत आला नाहीं. विनाकारण तर काय, परंतु मोठें महत्वाचें कारण दाखविलें, तरीसुद्धां ज्याच्या हातून कधीं कोणास एक कपर्दिक नीटपणें मिळावयाचा नाहीं, तो माणूस केवळ एकदम श्रीमंत होण्याच्या बुद्धीनें व लोभानें एकदम वाटतील तितके पैसे अगदीं अनोळखी अशा मनुष्यास देण्यास तयार झाला, ही तरी मनुष्यस्वभावाची एक मौजच आहे. परंतु द्रव्यलोभ कोणाला कसा पछाडतो, याचें मुळींच कधीं कोणास कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. काकासाहेब इतके वृद्ध, इतके दुराग्रही, परंतु या लोभास बळी पडून केवळ अंध झाले होते आणि अंधत्वाच्या सपाट्यांत त्यांनीं त्या सराफाशीं तो व्यवहार केला. एकवार त्यांच्या मनांत थोडीशी शंका वाटली, मन कचरलें; परंतु अशी शंका वाटून तिनें मनास माघारीं ओढण्यापेक्षां लोभाच्या जोरानें तें पुढेंच ओढलें गेलें. जरी यदाकदाचित् एखाद्या दागिन्यांत कांहीं कमीपणा असला, तरी आपण आठ पंधरा दिवसांत आपले पैसे देऊन दागिने परत आणल्यावर त्याची चौकशी करतां येईल; सध्यां त्याचा विचार नको, असें त्यांनीं आपल्या मनास सांगून त्यांस तूर्तचा व्यवहार करून घेण्यास सिद्ध केलें. परंतु आतां सराफदादांनीं जेव्हां का ताव देण्यास सुरुवात केली, तेव्हां त्यांची अगदीं पांचावर धारण बसली. रस्त्यांत तमाशा सुरू होऊन आपली बदनामी होऊं नये अशाविषयीं आतुर असलेले काकासाहेब त्यास, "हो हो. अशी घाई करूं नका. चला, मी तुमच्या घरीं येतों. आणखी तुमचं काय ह्मणणं आहे तें ऐकून काय तें तुह्मांला सांगतों," असें अगदीं सौम्यपणानें म्हणूं लागले. परंतु हातचे पैसे जाऊन खोटे नखलादू दागिने गळ्यांत पडलेले पाहून संतापलेला सराफ अशा सौम्यपणानें ऐकतो! यांच्या या

सौम्यपणाचा उलटाच परिणाम झाला. “ मला फसवूनच्या फसवून वर आणखी सौम्यपणाचं आणखी सभ्यपणाचं केवढं ढोंग दाखवतां ! आतां मी कांहीं ऐकत नाहीं. विश्वासघाताची पोलिसांत फिर्याद करतों. दुसरा इलाज मला दिसतच नाहीं. हे दागिने खोटे आहेत, हैं तुह्मांला पक्कं ठाऊक होतं. माझी अगदीं बालंबाल खात्री आहे. तुम्हीं मला फसवून माझ्यापासून रक्कम काढून पुढें रुपये परत करते वेळीं हे दागिने माझे नव्हत असं उलटून पडून मला सफई बुडवायचा तुमचा विचार, यांत शंका नाहीं. इथले मोठमोठाले सावकार तुमचे स्नेही, पण तुम्ही त्यांच्याकडे न जातां माझ्याकडे आलां, तेव्हांच मला तो शंका आली. पण वेळ आहे, वखत आहे. पडते माणसाला जरूर, तेव्हां आलां असाल, असं समजून माझ्या जवळ रक्कम नव्हती, तरी दुसऱ्याच्याकडून आणून मी तुम्हांला दिली. त्या सगळ्याचं तुम्हीं फार उत्तम बक्षिस दिलं. ठीक आहे. पण आतां मी त्याच्याबद्दल तुह्मांस बक्षीस भोगायला लाविल्याखेरीज राहाणार नाहीं. मीं वकिलाची संमति घेतली आहे. त्यांनीं सांगितलं आहे कीं, तुम्ही बेलाशक विश्वासघाताची फिर्याद लावा. पण विचार केला, कीं आधीं मुकाट्यानं जर आपसांत झालं तर काय होईल तें पहावं; नाहींच जुळलं, तर मग जें होईल तें होणारच. तेव्हां आतां तुम्ही घरींबिरीं येण्याच्या भानगडींत पडूं नका. मीच तुमच्या बरोबर कुठें म्हणाल तिथें येतों. पण माझी मला रक्कम द्या. मी तुमचा पिच्छा सोडणार नाहीं. एकदां दृष्टीआड झालां कीं, पुनः आतां मला तुम्ही भेटाल ही आशाच नको. आज दोन दिवसांचा अनुभव आहेच कीं नाहीं!...... ”

सराफसाहेबांच्या दूर शब्दागणिक काकासाहेबांचें चित्त व्याकुळ होऊन, ते इकडे तिकडे पाहात होते. भीति ही, कीं दुसरें कोणी हें सर्व ऐकतें आहे कीं काय ? परंतु मुंबईस कोण कोणाच्या भानगडींत पडतें आहे ? जो तो आपापला उद्योग करण्यांत निमग्न एवढें एक बरें होतें. काकासाहेबांनीं त्यास हलके बोलण्याविषयीं व आपण फार चमत्कारिक संकटांत पडलों असल्याविषयीं नानाप्रकारांनीं सांगण्याचा यत्न केला,परंतु त्याच्या मनावर त्याचा मुळींसुद्धां परिणाम झाला नाहीं. शेवटीं त्यानें घरीं जाऊन त्यांचें ह्मणणें ऐकून घेण्याचें कबूल केलें, एवढेंच काय तें. परंतु तेथें गेल्यावर अद्वातद्वा बोलण्यास त्यानें यत्किंचितूही मागें पुढें पाहिलें नाहीं. काकासाहेबांना तें सर्व मुकाट्यानें ऐकून घेण्यापलीकडे दुसरा मार्गच नव्हता. सराफाच्या शिव्यांचें सगळें पर्यवसान एवढ्यावरच होतें, कीं तुह्मी या घटकेस आपल्यापासून नेलेले सर्व रुपये, एक महिन्याचें दोन रुपये शेकड्याप्रमाणें व्याज आणि निवळ दोन हजार रुपये वर इतकं जर ताबडतोब दिलं नाहीं, तर आपण क्षणाचासुद्धां विलंब न करतां फौजदारींत फिर्याद ठोकणार. आपण मागेंपुढें पाहणार नाहीं. काकासाहेबांनीं त्यास आपण मोठ्या अडचणींत आहों, एका लुच्चयानें आपणास फसविलें आहे, वगैरे पुष्कळ सांगून त्याच्या चित्तास पाझर आणण्याचा यत्न केला, पण व्यर्थ. त्यानें उलट त्यांस ह्मटलें, “ एका लुच्चयानं तुह्मांला फसविलं म्हणून तुम्ही लुच्चे बनून आम्हांला फसवीत होतां वाटतं ! पण मी फसतों काय ? आतां जास्त बोलण्यांत

अर्थ नाहीं. मी म्हणतों यांत एक पैसुद्धां कमी घेणार नाहीं. तुम्हांला फार तर एक दिवसाची मुदत देतों. मला ठाऊक आहे; तुमचे पुष्कळ श्रीमंत सावकार स्नेही आहेत. पण तुम्हांला मी मोकळं बरीक सोडणार नाहीं. तुमच्या बरोबर राहीन. तुम्हीं पळून गेलांत तर मी तरी काय करणार ? मला बरोबर घेऊन चला. त्याखेरीज मी गप्प बसणार नाहीं. तुम्ही फसलां असाल. असं मला कांहीं वाटत नाहीं. "

काकासाहेबांस फार पंचाईत पडली. काय करणार ? या चमत्कारिक स्थितींत आतां करणार काय ? दुसरा कांहींच उपाय नाहीं. शेवटीं नाइलाज होऊन त्यांनीं त्याच्या हातीपायीं पडून तेवढा दिवस मागून घेतला. त्याच्या काकुळत्यांनीं सराफदादांसही असें वाटलें कीं, कांहीं तरी या ब्राह्मणाची विलक्षण स्थिति झाली आहे आणि त्यामुळें तो इतका काकुळती येत आहे, तेव्हां यास एक दिवसाची मुदत द्यावी. दुसरें दिवशीं संध्याकाळचे आंत तो ह्मणत होता तेवढी रक्कम आणून देण्याचें त्यांनीं कबूल केलें. मीं स्वतः जरी आलों नाहीं, तरी मी आपला माणूस मात्र तुमच्या पाठीमागें ठेवीन, असें त्यानें काकासाहेबांस बजावलें. काकासाहेबांस त्या गोष्टीस कबूल होण्यापलीकडे दुसरा मार्गच नव्हता.

इतकें सगळें होऊन, तेवढ्या दिवसापुरती काकासाहेबांची सुटका झाली खरी, परंतु पुढें काय ? पांड्यांस रक्कम भरण्याच्या वेळीं जी त्यांना अडचण पडली होती तिच्याहीपेक्षां या वेळची अडचण फार भयंकर होती. पांड्यांस देतों म्हणून कबूल केलेली रक्कम भरली नसती, तरी कांहीं हरकत नव्हती; परंतु आतांची ही रक्कम जर वेळींच भरली गेली नाहीं, तर आपली सगळ्या जगांत केवढी छीः थूः होणार याचेंच नव्हे, तर विश्वासघात करून दुसऱ्यास फसविल्याचा घाणेरडा आरोप येऊन तो कोर्टांत सिद्ध झाल्यावर जी शिक्षा होईल, तिचेंही पण चित्र यांच्या डोळ्यासमोर राहिलें नाहीं असें नाहीं. आणि तें उभें राहिल्या कारणानेंच त्यांची अगदीं पांचावर धारण बसली. ज्या स्नेह्यांनीं आपणास चार दिवसांपूर्वी आपल्याजवळ रक्कम नाहीं म्हणून सांगितलें, त्याजवळ आतां पुनः त्या रकमेपेक्षांही अधिक रक्कम मागावयाला गेलों, तर ते देणार नाहींत हें तर त्यांस अगदीं स्पष्टपणें दिसतच होतें. तथापि आशा सुटली आहे थोडीच ! ते तितक्या सगळ्यांकडे पुनः " परवां आपल्या हाताशीं रक्कम नव्हती, पण आतां आज आली असली तर द्या. आठ पंधरा दिवसांत परत करतों, " असें त्यांनीं अगदीं विनवून सांगितलें, पण व्यर्थ ! कोणी एक हजार रुपयेसुद्धां त्यास देईना, आणि त्यांना तर ही अशी विलक्षण अडचण. तेव्हां आतां करणार काय ! सकाळ सगळी अशी वायफळ प्रयत्नांत गेली. फक्त दुपार राहिली. पण नुसती दुपार काय करावयाची ? पैसे मिळतील असें ठिकाण कांहीं कोठें त्यास दिसेना. शेवटीं लाचार होऊन कोणा तरी स्नेह्याजवळ आपला सगळा मूर्खपणाचा पाढा वाचून व आपल्याला किती पश्चात्ताप झाला हें सांगून कांहीं तरी जुळलें, तर पहावें असें त्यांच्या मनांत आलें. परंतु जावें कोणाकडे ! त्यांचे फार फार जुने स्नेही, यांस कांहीं तरी नाद लागला आहे, तेव्हां यांना पैसे न देण्यांतच शहाणपणा आहे असें समजून यांस वाटाण्याच्याच अक्षता लावणार, हें त्यांना

पक्कें ठाऊक. शिवाय आजपर्यंत या स्वारीचें ज्याच्यात्याच्याशीं अत्यंत मूर्ख-पणाचें वर्तन; कधीं कोणाला यांनीं बरें म्हटलें नाहीं; कधीं कोणाशीं स्वारी गुण्या-गोविंदानें राहिली नाहीं. नेहमीं आपल्या तोऱ्यांतच असावयाची. अर्थातच यांच्या उपयोगीं पडावयाचें कोणाचे मनांत कशाला येईल ? ज्यानें त्यानें यांच्याबद्दल मुळींही सहानुभूति न दाखवितां नाहीं म्हणून त्यांस निरोप देण्याचा उपक्रम केला. शेवटीं आतां या कचाट्यांतून सुट-ण्यास कांहीं तरी इस्टेट गहाण टाकल्या-खेरीज गत्यंतर नाहीं, असा अत्यंत खेदाचा विचार त्यांचे मनांत आला. आणि ते अत्यंत खिन्न होऊन बसले. करणार काय ? हा विचार मनांत येतांच त्यांच्या अंगावर जणूं काय शहारे उभे राहिले. खराखरा प्रकार काय झाला आहे, आणि आपण कोण्या कचाट्यांत सांपडलों आहों, हें जर विश्वासानें त्यांनीं आपल्या एखाद्या मित्रास सांगितलें असतें, तर केवळ त्यांस कोणीं मदत केली नसती असें नाहीं. परंतु तसें सांगून आपल्या तोंडून आपली पर्वा करून घेण्याचें त्यांच्या मनांत येईना. तशी पर्वा करून घेण्याचें धैर्य त्यांस होईना. अर्थातच यांनीं नुसतें " जरूरी आहे, कृपा करून गरज भागवा, " असें म्हटलें म्हणजे यांस नवीन नाद लागला आहे, त्या पायीं बुडविण्यासाठींच ही रक्कम पाहिजे असेल, असें ज्याला त्याला वाटून, त्यानें नकार उच्चारावा, असें झालें.

संध्याकाळ झाली. सराफदादांस कबूल केलेली वेळ येऊन ठेपली. आतां त्यास उत्तर काय द्यावें ही पंचाईत पडली. ही पंचाईतशी काय, पण आतां त्याला चार पांच दिवस तरी मुदत कोणत्या तोंडानें मागावी असें झालें. मुदत मिळणार नाहीं, हें त्यांस दिसत होतें. शेवटीं मुदत भर-तांच अगदीं नेमल्या मिनिटास तो त्यांच्या-पुढें येऊन उभा राहिला, आणि रक्कम मागूं लागला. यांनीं पुनः आपल्या अड-चणीचा पाढा त्याचेपुढें वाचला. शेवटीं त्यानें त्रागा करून मी आतां वकिलाकडे जाऊन पुढची तजवीज करून टाकतों असें निक्षून बोलून दाखविलें. काकासाहे-बांस हें सर्व दिसतच होतें. परंतु अडच-णींत सांपडलेल्या माणसास कांहींना कांहीं तरी युक्ति सुचते. काकासाहेबांनीं पाहिलें कीं, हा माणूस पैशाचा लालची दिसतो. यास शें दोनशें रुपये अधिक दिल्यास आपल्यास आठ पंधरा दिवस मुदत खचित देईल. तेव्हां त्यास ती लालूच दाखवून आपण मुदत मागवून घ्यावी. दुसरा कोण-ताही मार्ग त्यांस आतां शक्य नव्हता. अर्थातच त्यांनीं आतां त्याप्रमाणें त्याचे-जवळ बोलण्यास सुरुवात केली. प्रथमतः सराफदादांनीं त्यांस अगदीं नकारच केला; परंतु दुसरा आला, तर आपला हात सा-धला, अशा तत्त्वांनीं तो गृहस्थ वागणारा असल्या कारणानें त्यानें त्याजपासून एक हजार रुपये आणखी काढावयाचा निश्चय केला. गृहस्थ मोठा, इनामदार, आणि अशा वेड्यावांकड्या अडचणींत सांपड-लेला, मग काय विचारतां ! निघेल तेवढें काढावयाचेंच असा त्याचा निर्धार झाला. काकासाहेबांचा अंतरात्मा तिळतिळ तुटून ते शंभर रुपये दर पाळीला वाढवीत गेले. शेवटीं पांचशेंपर्यंत येऊन त्यांनीं सराफ-दादांची अगदीं काकळुत चालविली, पण व्यर्थ. एक हजार रुपयांत एक छदामसुद्धां कमी घेणार नाहीं; बाजार चत्राई क-रीत बसूं नका, असें त्यानें त्यांना स्पष्ट

सांगितलें. आपण रक्कम घेतली, त्याच्या दुप्पट रक्कम आपल्याला भरावी लागत आहे, हें पहातांच स्वारींचें चित्त अत्यंत खिन्न झालें. पण काय करणार? बिचाऱ्यास अद्यापि ते दागिने खोटे झाले कसे, याबद्दल चौकशी करण्याससुद्धां एक क्षणभरही फुरसत झाली नाहीं. प्रथम सराफदादांच्या घरीं रक्कम आणण्याला गेले, तेव्हां त्यांस दागिन्यांत कांहीं तरी वेडेवांकडें आहे, अशाबद्दल शंका घेण्यास कारण झालें. परंतु त्या वेळीं त्याच्या डोळ्यांवर निराळीच धुंदी होती. ती धुंदी असल्याकारणानें त्यानें आपला हा खटा व्यवहार झाला कीं, मग त्याच गोष्टीच्या छड्यास लागूं, अशी त्यानें आपल्या मनाची समजूत घातली; कारण दुसरें कांहीं करण्यास त्याला वेळच नव्हता, आणि तसला कांहीं विचार करण्यास योग्य अशी त्याच्या मनाची स्थितिही नव्हती. तसा विचार करण्यास व त्या कामाच्या पाठीस लागण्यास आतां वेळ होता, परंतु या सराफदादांचें झेंगट लागलेलें! यांतून सुटेपर्यंत व ते दागिने आपल्या ताब्यांत येईपर्यंत कोणच्याही मार्गाला लागण्यास त्याला कांहीं शक्य नव्हतें. अशा स्थितींत तो काय चौकशी करणार? त्याच्याशीं हुजत घालीत बसून शेवटीं पंधरा दिवसांची मुदत देण्याचें सराफानें कबूल केलें आणि सराफापासून घेतलेल्या रकमेपेक्षां तीन हजार रुपये अधिक देण्याचें स्वारीनें कबूल केलें. ती मुदत मिळतांच काकासाहेबांनीं पहिला विचार हा केला कीं, आपण आतां मुकाट्यानें गांवीं जाऊन ही तोहमत दूर करावी, आणि ती दूर झाली आणि ते दागिने आपल्या हातांत आले ह्मणजे मग त्यांच्याबद्दल चौकशी करण्यास सुरुवात करावी. आजमितीस एक तर चौकशी करण्याला वेळही नव्हता, आणि यदाकदाचित् असता, तरी दागिने जर हातांत नाहींत, तर चौकशी होणार कशी? दागिने ह्मणजे मुद्देमाल, तो मुद्देमाल त्या सराफाजवळ; त्यांनीं मागितला, परंतु सराफदादा आपल्या हातून तो माल काय ह्मणून जाऊं देतील? त्यांनीं एकदम काकासाहेबांस सांगितलें कीं, "तुह्मी तो माल माझ्याजवळ मागूं लागलां, म्हणजे खरोखर तुमच्या प्रामाणिकपणाबद्दल मला शंका वाटते. मला वाटतें कीं, तुमच्या मनांतून माझ्या हातून तेवढा मुद्देमाल काढून घेतला, कीं खुशाल मला धाब्यावर बसवून आपण नामानिराळं व्हावं. पण मी बोळ्यानं दूध पीत नाहीं हो! तुह्मी पक्कं समजून रहा. तुम्हीं माझे कबूल केलेले रुपये पदरांत टाका, मग खुशाल तो माल पदरांत घेऊन तुह्मी आपल्या घरची वाट धरा." असें सराफदादांनीं उत्तर दिल्यानंतर मग स्वारींचें काय चालतें? मुकाट्यानें बसावेंच लागलें.

पंधरा दिवसांची मुदत मिळतांच स्वारींना पुनः थोडीशी आशा सुटली. लागलीच आपल्या गांवीं जाऊन रक्कम गोळा करण्याचें मनांत न आणतां त्यांनीं पांड्याचा पुनः एकवार शोध करावा, आणि शोध लागला, तर त्यास पोलिसांच्या हवालीं करण्याचा वगैरे धाक घालून त्याच्या घशांतून आपली रक्कम तेवढी काढावी असें त्यांच्या मनांत आलें; आणि त्याप्रमाणें त्याचा शोध लावण्यास त्यांनीं त्याच्या त्या शौंडीर शाळेकडे हेलपाटा घातला; परंतु हेलपाटा मात्र पडला व दिवस वायां गेला यापेक्षां दुसरें कांहीं

सुद्धां त्यापासून निष्पन्न झालें नाहीं. वाटेंतच त्यांस पोस्टाचा शिपाई भेटला, त्यानें त्यांस एक दोन वेळां पांड्यांच्या शाळेंत पाहिलें होतें यामुळें पांड्ये कोठें गेले तुह्मांस माहीत आहे काय? त्यांचीं पत्रें व मनीआर्डरी आज दोन दिवस तर आणून परत नेतों आहें, असें ह्मटलें. अर्थातूच यांस त्याला 'मला ठाऊक नाहीं. मीही त्यांच्याच शोधाकरितां इथें दोन दिवस हेलपाटे घालतों आहें,' असें सांगावें लागलें. पांड्यांचा शोध लागत नाहीं हें पाहून स्वारीला अत्यंत वाईट वाटलें व आतां एकदां दागिन्यांबद्दल तरी शोध करावा म्हणून त्यांनीं आपल्या कुटुंबास बोलावून आणून नुसती चौकशी करण्याचा विचार केला. परंतु तो शोध करण्यास कुटुंबास बोलावणें पाठविण्याची मुळींच जरूर नाहीं, आपल्या दागिन्यांत भर घालण्यासाठीं यजमानांनीं दागिने नेले, त्यांचें पुढें काय झालें, कोणच्या दागिन्यांत किती भर घालविण्याचें ठरविलें आहे, हें कळण्याविषयीं उत्कंठित झालेल्या त्यांच्या कुटुंबानें एकदोन दिवस मोठ्या कष्टानें काढले व तिसरे दिवशीं सकाळीं उजाडलें नाहीं तोंच स्वारी त्यांचेकडे येऊन माझ्या दागिन्यांचें काय झालें? त्यांत भर घालणार ती केव्हां? असें विचारूं लागली. काकासाहेबांनीं त्या त्यांच्या प्रश्नास सरळ उत्तर देण्याचें सोडून 'दागिने कुठें होते? कोणाला दिले होते कीं काय? हे इतके चकचकित कसे दिसूं लागले?' असे प्रश्न विचारण्याची अगदीं गर्दी करून सोडली. त्याबरोबर यजमानीणबाईची तब्यत अगदीं गरम झाली व त्या ह्मणाल्या, "भर घालण्यासाठीं ह्मणून दागिने एवढे मागून आणले, त्यांत भर घालायच्या गोष्टी बोलायच्या सोडून तुम्ही हें काय विचारतां? कुठें होते म्हणजे? नानाच्या जवळ होते. आणखी कुठें असावयाचे? नवेसे दिसतात ह्मणजे काय? या विचारण्याचा अर्थ तरी काय?"

"विचारण्याचा अर्थ दुसरा तिसरा कांहीं नाहीं. त्यांनीं ते दुसऱ्या कोणाच्या घरीं नेऊन ठेवले बिवले नव्हतेना? तसं विचारण्याला कारण झालं म्हणून विचारतों. खरं कांहीं तुम्हाला ठाऊक असलं तर सांगा. तुझ्या नकळत नेऊन ठेवले तर तुला तरी काय ठाऊक? पण दागिन्यांत कांहीं तरी घोंटाळा आहे."

काकासाहेबांच्या तोंडून हीं शेवटलीं अक्षरें बाहेर पडण्याचा अवकाश, यजमानीणबाईचा एकेक डोळा एवढाला झाला आणि "माझ्या नानाच्याबद्दल का तुम्हीं संशय घेतां आहां?" असें कर्कशपणें त्या ओरडल्या.

तिन्हाईताच्या घरांत तमाशा होण्याची पाळी आली.

# प्रकरण ६७ वें.

## ब्यांकेच्या डायरेक्टरांचीं धाबीं धडाडलीं!



दी बॉम्बे विंग् बघल ब्यांकिंग् ब्यूरो आतांशा फार भरभराटीस आल्याचें जिकडे तिकडे प्रसिद्ध होत होतें. नव्या प्रॉस्पेक्टसच्या हजारों प्रती निघून त्यांत असें प्रसिद्ध झालें होतें कीं, या ब्यूरोचे मूळचे सर्व शेअर खपून येत्या वार्षिक सभेच्या वेळीं कमींत कमी तरी शेंकडा पन्नास इतका नफा विभागला जाणार आहे; वांटावयास सांपडेल असा नफा एकंदर वस्तुतः शेंकडा पाऊणशें झाला होता, परंतु हल्लींच्या डायरेक्टरांची भागीदारांस अशी विनंति होती कीं, आपण इतका नफा एकदम वांटून न घेतां शेंकडा पन्नास रुपयेच घ्यावेत व बाकी पंचवीस उरले, त्यांत वीस रिझर्व्ह फंडाला ह्मणून ठेवावे आणि पांच केवळ धर्मादाय ह्मणून एक निराळा फंड ठेवून त्यांत घालावे. हिंदुस्थानासारख्या देशांत अवर्षण, अग्नि, रोगराई वगैरेपासून भय फार व यांस फार लोक बळी पडून त्यांची फारच दुर्दशा उडते; करितां वेळोवेळीं अशा संकटांत सांपडलेल्या लोकांच्या मदतीला ह्मणून या धर्मादाय फंडांतून सर्वानुमतें रकमा दिल्या जाव्यात. डायरेक्टर मंडळींच्या या सूचनेप्रमाणें फंड ठेवण्यास प्रथमतःच जवळ जवळ वीस हजार रुपयांची पुंजी होती; आणि धर्मादायाचें नांव काढल्यावर व तोही धर्मादाय नफ्याच्या अत्यल्प भागानें करावयाचा, तेव्हां कोणीही भागीदार कोणत्याही तत्त्वानें आड येणार नाहीं, अशी डायरेक्टर लोकांनीं पूर्ण आशा दर्शविली होती. ज्या सभेपुढें ब्यूरोचा सरसालाचा रिपोर्ट वाचून ब्यालन्स् शीट पुढें ठेऊन नफ्याचा भाग किती वांटला जाणार हें प्रसिद्ध केलें जाणार होतें, ती सभा सुमारें महिन्यावर होती. परंतु हें त्या सभेपुढें येणाऱ्या हिशोबाचें एकंदर मोठें मोहक स्वरूप नव्या प्रसिद्धिपत्रकाच्या रूपानें बाहेर पडतांच जिकडे तिकडे अगदीं गडबड उडून गेली. इतक्या थोड्या अवकाशांत ब्यांकेनें मोठें विलक्षण नांव केलें! मोठें विलक्षण यश मिळविलें! दोन वर्षांत मूळची रक्कम पदरांत पडून थोडेंसें व्याज पदरांत पडलें, तर काय बहार होणार आहे! असा या ब्यांकेनें व्यापार तरी काय केला, आणि इतका नफा तरी कसा मिळविला, हे प्रश्न ज्याच्या त्याच्या मुखीं झाले! आणि ज्यांनीं आजपर्यंत विनाकारण शंका घेऊन शेअर विकत घेतले नव्हते, त्यांनीं आतां तरी पटकन् शेअर घेऊन टाकावे असा बेत केला. आपल्याला ब्यांकेंतून शेअर मिळाला तर बरा, नाहीं तर पांचशेंचा शेअर सातशें अगर साडेसातशें रुपयांपर्यंत मिळाल्यास सुद्धां घेण्याची कित्येकांची

उत्सुकता दिसली. बरोबरच आहे. या सालीं फार तर आपणास नफा मिळाला नाहीं असें काय तें होईल. आणखी काय होणार ! परंतु शेअर मिळताहेत कोठें ! ज्या ब्यांकेंन इतक्या लवकर शंभराला पन्नास रुपये नफा देतां आला, ती आतां काय अशी तशी ब्यांक म्हणून गणली जाणार ! तिचे शेअर विकायला निघणार कोण ! ब्यांकेंत तर शेअर विकत मिळण्याविषयीं अर्जांचीं बिडाळींच्या बिडाळी दर डांकेला येऊं लागलीं ! शिवाय ब्रोकर लोक तर अगदीं झटून पडूं लागले. परंतु शेअर्स आहेत कोठें ! शेवटीं "दी बॉम्बे बिग बबल ब्यांकिंग् ब्यूरोनें" वर्तमानपत्रांत नोटीस देऊन असें जाहिर केलें कीं, आतां ब्यांकेचे सर्व शेअर संपले, कोणी ते मागण्याकरितां अर्ज वगैरे पाठवूं नये; शिवाय ब्यांकेच्या भागीदारांपैकीं कोणी आपले भाग विकावयास तयार आहेत का असा तपास करतां तसेंही कोणी दिसत नाहीं, असें दिसून आल्याचेंही त्याच नोटिशींत प्रसिद्ध केलें होतें. त्या नोटिशींत मुख्य भाग होता तो हा—"ब्यांकेच्या शेअरांकरितां एकंदर १७१३५ लोकांनीं आमचेकडे मागणी केली आहे. बरोबर डिपॉझिट् रकमाही पाठविल्या आहेत; परंतु इतक्या सगळ्यांस निराळीं पत्रें पाठवून नकारात्मक उत्तरें कळविण्यापेक्षां एकदम सरसहा नोटीस दिली असतां बरें असें वाटून ही नोटीस देण्यांत येत आहे." हें वाक्य खूप जाड टाइपांत छापलें होतें आणि त्या जाड्या टाइपापेक्षांही जाड्या टाइपांत खालीं दिलेल्या अर्थाचें वाक्य होतें. "या १७१३५ मागणी करणारांत कित्येक लोक—जवळ जवळ हजार लोक—शेअराची चौपट किंमत देण्यास तयार आहेत ! यावरून ब्यांकिंग् ब्यूरोची आजमितीस किती भरभराटीची स्थिति आहे हें समजून येईल !" वर्तमानपत्रांत अशी नोटीस आणि नफा वांटला जाणार असें जाहिर केलेला नवीन प्रास्पेक्टस ! मग काय विचारतां ! जिकडे तिकडे ब्यांकिंग् ब्यूरोच्यासंबंधानें पुनः लोकांत गडबड उडाली ! ज्याला त्याला असें वाटूं लागलें कीं, आपण कसेंही करून एकवार एखादा तरी शेअर विकत मिळवावा. परंतु चौपट किंमतींनें शेअर विकत घेऊं इच्छिणारांस जर शेअर मिळत नाहीं, तर मूळ किंमतीला विकत घेऊं इच्छिणारांचीं केवढी त्रेधा ! तथापि मनुष्याची आशा बलवत्तम असते. ब्यांकिंग् ब्यूरोचे शेअर खपून गेले, आतां चौपट किंमत दिली तरी ते मिळत नाहींत, अशी भुमका एकवार उठली मात्र तों जो तो त्या ब्यांकेचे शेअर मिळाल्यास पाहिजेत म्हणून धांवाधांव करून ब्रोकर लोकांच्या दारोदार हिंडूं लागला. पहिले शेअर होल्डर्स कोण आहेत, त्यांजला गांठून त्यांचेपासून अधिक किंमतीची लालूच दाखवून शेअर मागावे असें चाललें होतें; परंतु कोठें कोणी शेअर विकण्यास तयार होईना. मागें एकवार वाचकांस सांगितलेंच आहे कीं, ब्यांकिंग् ब्यूरोच्या व्यवहारासंबंधानें एका दैनंदिन पत्रांत फार अनुकूल असे प्यार आले होते, त्या पत्रांत यंदां तर अगदीं ब्यूरोवर व ब्यूरोच्या डायरेक्टर एजंटादिकांवर स्तुतीचा नुसता वर्षाव झाला होता. इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका यांतील उत्तमोत्तम अशी जी ब्यांकिंग् पद्धति, तिच्या अनुरोधानें आणि तिच्यांतील जो कांहीं उत्तम भाग त्याला अनुसरून, या डायरेक्टरमंडळींनीं सर्व व्यवस्था ठेविली आहे. खर्च अतोनात काटकसरीनें

करून व्यापार फार दक्षतेनें केला. कोणा-सही पैसे देतांना पुरें तारण पाहिल्याखे-रीज अगर शहाजोग जामीन घेतल्याखे-रीज रकमा दिल्या नाहींत. अति व्याजा-च्या आशेनें धोक्याचा व्यापार बिलकुल केला नाहीं. यांनीं आपल्या पोटशाखा ब्रह्मदेश वगैरे दूर देशांतही घातल्या आहेत. या मंडळीची हिशेबप्रवीणता सर्व जगांत आज मशहूर झाली आहे, यांत नवल नाहीं खुद्द इंग्लंडमध्यें जी मुख्य संस्था आहे, त्या संस्थेंत कित्येक वर्षे ज्यांनीं हिशेबनविसाचें काम केलें, त्यांनीं येथें येऊन एकदम ही संस्था चांगली नांवालौकिकाला आणून तिला यशस्वी करावें, यांत नवल काय ! आम्हांस या ब्यांकेस येणाऱ्या यशाचें पूर्व स्वप्नच पडलें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं आणि म्हणूनच मंडळीबद्दल व एकंदर या ब्यांके-बद्दल आह्मी वेळोवेळीं फार अनुकूल असे लेख लिहीत आलों. दुसरा कांहीं फसवा-फसवीचा व्यवहार या ब्यांकेंत आहे असा नुसता संशय जरी आम्हांस आला असतां, तरी आम्हीं त्या ब्यांकेचें सर्व वर्म बाहेर काढून लोकांस जागें केलें असतें. परंतु लिहिण्यास अत्यंत आनंद वाटतो कीं, अगदीं तेल घालून काकदृष्टीनें पाहिलें, तरीसुद्धां आम्हांस ब्यांकेच्या हिशेबांत किंवा कोणत्याही कागदपत्रांत कोठें कांहीं वैगुण्य दिसलें नाहीं आणि म्हणूनच आम्ही ब्यांकेच्या वर्तीनें अनुकूल असे लेख लिहिले. यत्किंचित् वैगुण्य दिसतें किंवा दोष दिसता, तरीसुद्धां कोणाची परवा न करतां स्पष्टपणें आम्हीं लिहिलें असतें. आमचा बाणा 'सत्य' आणि आमचें ब्रीद 'दंभपरिस्फोट;' कोठेंही असत्य आणि दंभ हीं आम्हांस अणुरेणुही कधीं खपावयाचीं नाहींत !' असें सदर दैनिकांत या लेखास लिहिलें होतें.

ब्यांकेचा असा चोहोंकडून जयजय-कार चालला होता. कित्येक दलाललोकही ब्यांकेच्या चोख व्यवहाराबद्दल निर्वाळा देत होते.

अशी ब्यांकेबद्दल सगळ्या गांवांत गड-बड उडाली असतां सभेच्या पूर्वी सुमारें पंधरा दिवस फार गुप्त अशी एक सभा ब्यां-केच्या एजंटांच्या ऑफिसांत भरली होती. या सभेंत एकंदर पांचच मंडळी जमली होती ती येणेंप्रमाणें:—

मि. हाईप् मनीमॉंगर.

मि. कुवनफुट् ऑलमॉश्

मि. एम्. नोव्हेअर

मि. डल्लावाला ( सीनिअर )

मि. सोकरजी बाबुलजी

ही मंडळी आंत बसली होती आणि दारावर मास्तर बसले होते; कोणी आलें तर मास्तरांनीं आंतल्या मंडळीस इशारत द्यावी अशी व्यवस्था होती. इतका बंदो-बस्त ज्या अर्थी केला होता, त्या अर्थी मंडळीचें कांहीं तरी फारच मोठें गूढ खलबत चाललें होतें. वेळ रात्रीची. अर्थात् ब्यांकेच्या कारकुनांपैकीं वगैरे कोणी नव्हतें. इतर कोणास कांहीं समजूं नये ह्मणून ही वेळ रात्रीं अकरा वाजल्या-नंतरची त्यांनीं मुद्दाम निवडून काढली असावी हें उघड होतें. सर्व मंडळी जमल्या-नंतर मि. हाईप् मनीमॉंगर यांनीं सर्व मंडळीस उद्देशून ह्मटलें:—

"मी इंग्लंडाहून मुद्दाम आलों आहें हें आपल्याला ठाऊकच आहे. आपण सगळ्यांनीं ब्यांकेला फार मदत केली याबद्दल आमची होम डायरेक्टर मंडळी आपली फार आभारी आहे. आणखी

आपली त्या बुइलांच्या संबंधांत फारच छान मदत झाली. आतां मला कांहीं वाटत नाहीं, कीं त्या बाबतींत कोणाला कांहीं हात घालायला येईल, किंवा कांहीं बाहेर काढतां येईल असं. या कामीं जी मिळकत होईल, तीही सर्वत्रांना वाटली जाईल यांत मुळींच शंका नसावी. एकदां हा सभेचा फार्स झाला, कीं मग सगळंच आपल्या मनाजोगं होणार आहे. येथ-पर्यंत चांगली बहार झाली. आतां आप-ल्याला जें काय करायचं तें प्रॉक्सीबद्दल. सगळ्या प्रॉक्सी आपल्यापैकीं कोणाच्या ना कोणाच्या तरी नांवाच्या येतील अशी कांहीं तजवीज करावयाची. दुसरें कांहीं करावयास नको. जितक्या सरळ येतील तितक्या सरळ याव्या आणि आल्या म्हणजे ठीकच; नाहीं तर बेलाशक तयार कराव्या. आपले कित्येक शत्रु दुसरी कांहीं गडबड करतील, तर त्यांची मात्रा चालूं नये एवढं लक्ष्यांत ठेवलं पाहिजे. प्रॉक्सी–खऱ्या खोट्या–आपल्या बाजूला असल्या, कीं आपलं काम झालं. ब्यालन्स् शीट तयार आहे, त्यावर ऑडि-टरांच्या सह्या झाल्या आहेत, तेव्हां आतां ती लडथड कांहीं राहिली नाहीं. आतां चिंता काय ती दोन दिवस सुरळीतपणें पार पड-तील एवढ्याचीच. बोला, सोकरजी, तुम्ही किती प्रॉक्सी तयार करतां ? डह्यावाला, तुमच्यावर आमचा फार भरंवसा, तेव्हां तुमची मोठी मेहनत पाहिजे; अन् ती असणार याबद्दल आपल्याला तर कांहीं शंका नाहीं. ''

सोकरजी आणि डह्यावाला, या दोघां-नीही अगदीं मनापासून माना डोलाविल्या. डह्यावाला तर लागलीच इंग्रजींत म्हणतात, " ती तुम्हांला काळजी नको. आपण ज्यांत पडलों त्यांत चिंता तर मुळींच कोणी करूं नये. मी पारशीभाई, पण तुमच्या हिंदूंतून किती प्रॉक्सी घेऊन येईन पहा ? पण आमच्या कमिशनची तर कांहीं अजून तुम्ही बरोबर गोष्ट करीत नाहीं. सगळ्या कामांत आम्ही इतकी मदत करून शेवटीं जर तुम्ही आम्हांला फसवायला पहाल, तर आमच्या हातांत अगदीं कांहीं नाहीं असं आपण समजूं नये. आम्ही तरी व्यापार करतों, व्यवहार करतों, तों कांहीं हेतूनंच करतों. उगीच करीत नाहीं. माझी मदत जर या बाब-तींत नसती, तर आपली ब्यांक कशी काय चालती तेंही पण दिसलं असतं. मध्यें घोटाळा जो झाला तो कोणामुळं बचला, त्याचा विचार करा. मी ए... दिवस हें सगळं स्पष्टपणानं बोलण्यासाठींच थांबलों होतों. आपलं कमिशन जर आता मिळेल, तरच आपण गप्प बसणार, नाहीं तर आपण गप्प बसणार नाहीं. गप्प काय म्हणून बसावं ? "

डह्यावाल्याचा सूर दर वाक्यास अधिक अधिक होत चालला. फार दिवस मनां-तल्या मनांत कोंडून ठेवलेल्या सगळ्या तक्रारी त्यांच्यापुढें ओतण्याला ते अगदीं उत्सुक झालेले दिसले. त्यांचा स्वर जस-जसा उंच होत चालला, तसतशी इत-रांची भीति वाढत चालली व एकामागून एक मंडळी त्यांना, 'गप गप,' 'मोठ्यानें बोलूं नका,' असें म्हणूं लागली. परंतु मनुष्य आपल्या भरांत आला, म्हणजे मग त्याला कसलेंही भान राहात नाहीं. तशीच त्यांची अवस्था झाली होती. त्यांना असें वाटत असावें असें दिसलें, कीं आपण आतांच सर्व बोलून घेऊन आपल्या म्हणण्याप्रमाणें करावयास

लावलें, तर तें साधणार आहे, नाहीं तर साधत नाहीं; अशा समजुतीनें त्यांनीं त्यांची भीति जशजशी पाहिली तसतशी यांच्या सुराची तार चढत चालली, आणि त्यांनीं आपलें बोलणें पुढें चालविलें. मंडळींत मि. हार्डप् मनी–मॉंगर हे मात्र अत्यंत शांत होते. त्यांनीं आपल्या चेहऱ्यांत यत्किंचितही बदल होऊं न देतां ह्मटलें, " तुमची जी योग्य मागणी आहे, तिचा अवश्य विचार केला जाईल. पण तुह्मी अशा मोठमोठ्यानें बोलून आह्मांला घाबरवायला पाहाल, तर त्याचा कांहीं उपयोग होईल असं समजूं नये. त्यापासून कांहीं सुद्धां फायदा होणार नाहीं. सर्व गोष्टी शांतपणें घेतल्या पाहिजेत. व्यवहार सगळ्यांचा आहे. आमचा आहे आणखी तुमचा नाहीं, अशी तुमची समजूत असेल, तर ती चुकीची आहे. अशी समजूत घेऊन बसूं नका, यापेक्षां अधिक मी काय सांगणार ! "

मि. हार्डप् मनी-मॉंगर यांनीं हें सर्व बोलणें इतक्या शांतपणें केलें, कीं त्यांच्या त्या शांतपणाचाच डल्लावाल्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला असला पाहिजे असें दिसलें. कारण त्यांच्या आवाजांत किंचित् नरमाई आली, व ते लागलीच ह्मणतात, " जर तुमचा आमचा व्यवहार एक म्हणतां, तर आह्मांला सारखा भाग कां मिळूं नये ? आमच्या कमिशनची गोष्ट निघाली, कीं ऑलवॉश आणखी नोव्हेअरसाहेबांनीं आह्मांला धुडकावून देण्याचा कां आतांशा यत्न करावा ? आपण आलां आह्मांत आणखी ही संधि आहे म्हणूनच आम्हीं हा प्रश्न आज काढला. नाहीं तर मीं आपल्यांतलाच आहें. आपण आह्मांला आणखी आह्मी आपल्याला आहोंत. आपल्या सगळ्यांवर डोळा आहे. आणखी कोण्या वेळीं संकट आलं, तर आह्मी सुटूं, आपण मात्र पकडले जाल, असा थोडाच प्रकार आहे ! पण संकटाला बरोबर, तर फायद्यालाही पण बरोबर असायला पाहिजे, ही गोष्ट विसरतां कामा नये. इतकी गोष्ट तुह्मी विसरलां नाहीं, आणि मला आपण आपल्या बरोबरीनं शेअर दिलात, तर मी आपली कमिशनची सुद्धां गोष्ट काढणार नाहीं. हें आपण अगदीं मनांत पक्कं धरावं. पण दोन्हीकडून मला फसवूं पहाल, तर मात्र मलाहीं तिसाला विचार करावा लागणार. "

अशा तऱ्हेचें डल्लावाला यांचं बोलणं होतांच पुनः मंडळींनीं त्याला 'गप्प गप्प,' 'कांहीं नाहीं,' 'कांहीं नाहीं,' असें म्हणून गप्प केलें. सर्वांचें समेट झालें आणि जें कारस्थान जसें बनवावयाचें होतें, तसें तें बनविलें गेलें. प्राक्सीज् कशा आणावयाच्या, काय करावयाचें, कोणत्या बाबतींत कसें रिकार्ड ठेवावयाचें, वगैरे सर्व गोष्टी अगदीं शांतपणें झाल्या.

मध्यंतरीं कोणी कोणास कांहींसुद्धां बोललें नाहीं, किंवा कांहीं कारस्थानांत बिघाड होण्याजोगें घडलें नाहीं. सर्व कांहीं जसें व्हावें असें त्यांस वाटत होतें, तसेंच झालें. मंडळी आतां अगदीं निर्धास्त झाली. मास्तरांस कांहीं काम पडलें नाहीं. आपल्या बेताप्रमाणें सर्व बार झाला, कीं आपल्या इच्छेप्रमाणें होऊन पुढचा मार्ग खुला झाला, असें ज्याचें त्याचें मत पडलें. सर्वांचा सलोखा झाला, तो सलोखा दृढ होण्यास कादंबरीरसपानाचें पाठबळ मिळालें. मग काय विचारतां ? इतका वेळ मास्तर आंत येऊन बसले नव्हते, परंतु

कादंबरीचा बहर आंत सुरू होतांच मग त्यांस आपलें काम कसचें सुचतें? तेही दारास कड्या लावून आंत आले, आणि मंडळींत मिसळले. परंतु मास्तरांनीं आंत पाऊल टाकतांच बाहेर कडाक्याची थाप पडली आणि काय असेल तें असो, ती थाप ऐकून आंतील मंडळींचीं धाबींहीं धडाडलीं.

# प्रकरण ६८ वें.

## मास्तरांसही घेरलें!



त्यांकँत जमलेल्या डायरेक्टरांचीं धाबीं धडाडण्याचीं कारणें काय बरें असावींत? कादंबरीरससेवनांत निमग्न झाल्यावर असल्या बारीकसारीक गोष्टींत वस्तुतः कांहींही लक्ष्य त्या मंडळींचें जाऊं नये; परंतु ज्यांचीं अंतःकरणें निश्चित असतील, त्यांची तशी गोष्ट. या मंडळीचीं अंतःकरणें तशीं निश्चित कोठलीं? त्यांनीं तो दार ठोठावल्याचा आवाज ऐकताक्षणींच जणूं काय त्या ठोठावण्याच्या ध्वनीच्या शतपट ध्वनि त्यांच्या अंतःकरणांत उठला आणि एकदोघांच्या हातून ओंठापाशीं गेलेले ग्लासही खालीं पडले. अगदीं निश्चित व बेफिकीर असे गृहस्थ काय ते मंडळींत दोघेच दिसले. एक मि. हाईपू-मनीमाँगर आणि दुसरे डल्लावाला. त्यांतही मनुष्याच्या स्वभाववैचित्र्याप्रमाणें फरक होता. मि. मनीमाँगर अगदीं शांतपणें बसले होते. त्यांच्या चर्येवर भीतीच्या विकाराची अणुरेणुइतकी सुद्धां छाया दिसली नाहीं; आणि त्यांच्या तोंडून एक अक्षर सुद्धां उच्चारलें जात नव्हतें, जणूं काय ते अगदीं शांतपणें तो आवाज कसला व कोठून आला असावा याचें, किंवा हा आवाज आला म्हणून तरी काय? आपण कोणाला कशाची भीक घालणार आहोंत? याचें मनन करीत आहेत. डल्लावाला यांची गोष्ट तशी नव्हती. आपणास कशाचीही भीति किंवा परवा नाहीं, असें ते स्पष्टपणें आपल्या मित्रांस शब्दांनीं मशहूर करीत होते. बाकीचे दोघे चौघे अगदीं भेदरल्याप्रमाणेंच दिसूं लागले होते. ते तीनतीनदां त्या ठोठावल्या जाणाऱ्या दाराकडे कानोसा घेतल्याप्रमाणें करीत आणि पुनः एकमेकांकडे पहात. त्यांतल्या त्यांत नोव्हेअरसाहेब आपल्या उपनांवाप्रमाणें होतां आलें, तर कांहीं साधन पहाताहेत असें दिसलें. सोकरजी तर आपल्याशींच "ही साली आतां पंचात आली" असें वारंवार पुटपुटत होते. मास्तर वास्तविक या मंडळीच्या कारस्थानांत कधींच नसावयाचा; परंतु त्यास माहिती सर्व गोष्टींची

आणि यथास्थितपणें होती. शिवाय त्यानें त्याच दिवशीं दुपारीं कांहीं एक प्रकार पाहिला होता, तो त्यास आठवला व तो लागलीच सोकरजीला त्याचवेळीं त्यानें सांगितला. तो हा कीं, प्रोफेसर ड्यांडी एका युरोपिअन डिटेक्टिवाबरोबर हिंडत असून त्यांत ब्यांकेंतल्या मंडळीबद्दल नांवें घेऊन घेऊन कांहीं बोलत होता. त्यांत सोकरजीचें नांव आपण विशेष ऐकलें असेंही पण त्यानें सांगून दिलें. तरी पण सोकरजींनीं आपण डगमगल्याचें कांहीं दाखविलें नाहीं. आतां डगमगण्यांत काय अर्थ आहे! असें म्हणून त्यांनीं उलटा इतर मंडळीस धीर देण्याचा आव घातला. आणि शेवटीं आतां आपले हे कागदपत्र उचलून ठेवावे, असें त्यांनीं सुचविलें. इकडे दाराचें ठोठावणें चाललेंच होतें. अगदीं रस्त्यावरच्या दारावरला रखवालदार भय्या कोणाशीं तरी, "अंदर कोई नही, क्या खाली सताते हो!" असें ह्मणून त्यांना लावून देण्याचा यत्न करीतच होता. अशा स्थितींत आंतील मंडळींत दरवाजा कोणी उघडावा याबद्दल वाद सुरू झाला. दार उघडण्यास आपण जातों असें ह्मणणारा प्राणी एक डब्बावाला तेवढाच होता; परंतु म्हणण्यापलीकडे त्याचे हातून कृति झाली नाहीं. तोंडानें मात्र, "हो, मी उघडीन पण उघडा काय म्हणून? आम्ही आपल्या हपिसांत आम्ही राजे नाहीं काय?" असें भाषण चाललें होतें. दुसरी मंडळी कोणी उठतही नव्हती आणि बोलतही नव्हती. सोकरजी बिचाऱ्या मास्तराला मात्र ह्मणत होता कीं, कोण आहे, काय आहे, हळूच कानोसा घेऊन ये आणि मास्तर मागें मागें घेत होता. अशा स्थितींत किती वेळ निभावणार? मास्तरास कानोसा घेण्यासाठीं पुढें जाण्याखेरीज गत्यंतरच नाहींसें झालें. सोकरजी त्याजवर थोडेसे रागावून त्यांनीं त्याला जाऊन काय आहे, कोण आहे तें पाहून ये ह्मणून दरडावून सांगितलें. गेला नाहींस, आणि कांहीं संकट आलें, तर कांहीं तरी करून तुझ्या गळ्यांत धोंगडें आणीन, असा धाकही पण त्याला घातला. मग बिचारा करतो काय? तो सोकरजीचा अगदीं अंकितच होता, यामुळें पुढें झाला. परंतु दोन पावलें पुढें सरसावें, पुनः एक पाऊल मागें यावें, असें करतां करतां एकदांचा अगदीं पुढल्या दाराजवळ जाऊन तो कानोसा घेऊं लागला. तों बाहेर कोणी तरी दोघे बोलत असून त्यांत आपलें नांव निघालें असें त्यास दिसलें. त्याबरोबर मग काय विचारतां! त्याची अगदीं चमत्कारिक स्थिति होऊन गेली. आपलें नांव काढणारा हा कोण? मास्तरनीं अधिक कानोसा घेतला, तेव्हां तो आवाज त्यांनीं ओळखला. तो आवाज प्रोफेसर ड्यांडींचाच होय. आणि दुसरा आवाज कोणातरी साहेबाचा हीही पण त्याची खात्री झाली. इतक्यांत त्याला पुढील शब्द ऐकूं आले. प्रोफेसर ड्यांडी त्या रखवालदारास आपल्या मोडक्या तोडक्या हिंदुस्थानींत म्हणत होते, "अरे, साहेबांच्याजवळ विनाकारण छपवाछपवी करूं नको. तुझ्या हातांत बिड्या पडतील. आंत मंडळी कोण आहेत, काय आहेत, आम्हांला म्हणजे साहेबांना अगदीं बरोबर माहिती आहे. ती मंडळी आहेत कीं नाहीं इतकं पाहण्यालाच आम्ही इथें आलों होतों. आणखी त्यांतल्या एका माणसाला आम्हांला भेटायचं आहे. आह्मी आतां आंत

जात नाहीं. तूंच हांका मारून दार उघडवून जा, आणखी मास्तरला फक्त एवढें सांग कीं, तुझ्याकडे कोणी आलं आहे. त्यांना सांग कीं, आम्ही त्यांना भेटण्यासाठीं आलों आहोंत. फार जरूरीचं काम आहे. बस. जा. नाहीं तर हकनाक तूं सुद्धां तुरुंगांत पडशील जा, आम्ही त्या पलीकडच्या इमारतीच्या पायऱ्यांवर जरा अंधारांत बसतों. तिथं त्यांना घेऊन ये. त्यांना म्हणावं घाबरूं नका. " हें बाहेर दारापाशीं चाललेलें बोलणें ऐकून मास्तरांची फारच तिरपिट उडाली. घाबरूं नका असा निरोप येत होता, परंतु त्या बिचाऱ्याची आंतल्याआंतच गुडाखू वळली. आज पांच सात दिवस आधींच त्यास असें कळलें होतें कीं, आपल्या बँकेवर कांहीं तरी कड्याळ येणार आहे, तेंच आज आलें. त्या कड्याळापायींच हें धरणें दिसतें आहे. अशी एकदां मनाची समजूत झाल्यावर मग आणखी काय पाहिजे. आपण आतां येथून पळून जाण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. दुपारीं आपण प्रोफेसर ड्यांडीस एका युरोपियन डिटेक्टिवाबरोबर हिंडतांना पाहिलें, आपल्या व या ब्यांकेबद्दलच कांहीं बोलतांना ऐकिलें आणि प्रोफेसर ड्यांडी यांनीं आपल्याकडे बोट दाखविल्याचाही त्यांस भास झाला होता. तेव्हां तें सर्व आठवून त्यांस असें वाटलें कीं, प्रथमतः आपल्यावरच कांहीं तरी लचांड येणार आहे. तेव्हां आपण या सगळ्यांतून निसटून जाण्याला एकच मार्ग. तो हा कीं, आतांच्या आतां कोठें तरी यःपलाय करावें आणि तसें करण्यास हीच वेळ फार चांगली असें त्यांच्या ममांत आलें. त्यांनीं असा विचार केला कीं, त्या रखवालदारानें आतां दार उघडण्यासाठीं हांका मारल्या, कीं आपण हळूच दाराची कडी काढून दार उघडून दाराआड लपावें. आणि आपल्याला पहाण्यासाठीं, मंडळी बसली आहे तेथें तो गेला, कीं आपण दार ओढून घेऊन सूं बाल्या हांकावा. मास्तरांनीं इतका आपला विचार पूर्ण करायला, आणि त्या रखवालदारानें दार खोलण्याकरितां पुकारा करण्याला एकच गांठ पडली. तेव्हां त्यांनीं मुकाट्यानें त्या दाराचा बोल्ट काढला. आणि एक दार सताड उघडून त्याचे आड स्वारी उभी राहिली. दार उघडलें, पण दारांत तर कोणी नाहीं, असें पाहतांच प्रथम शिपायास अर्थातच आश्चर्य वाटलें. परंतु वर जाण्याचा जिना अगदीं दाराशींच असून वांकणाचा होता. तेव्हां त्यावरून कोण तें वर गेलें असेल, असें समजून त्यानें विशेष विचार किंवा शोध न करितां तो ज्या खोलींतून मंडळींचा आवाज विशेष येत होता, तिकडे गेला.

इकडे मास्तरांनीं आपल्या बेताप्रमाणें सूं बाल्या हांकण्याच्या उद्देशानें दाराबाहेर पाऊल घातलें. पण जे आपणासाठीं आले आहेत, त्यांच्या नजरेस आपण पडूं नये म्हणून त्यांनीं आधीं इकडे तिकडे पाहिलें. हेतु हा कीं, त्या मंडळींच्या तावडींत सांपडूं नये. ती मंडळी "त्या पलीकडल्या इमारतींत अंधारांत बसतों" म्हणून म्हणाली, परंतु ती इमारत म्हणजे कोणची ? या बाजूची कीं त्या बाजूची ! हा प्रश्न राहिलाच. आपण ज्या बाजूस जाऊं तीच इमारत ती असली, आणि आयतेच आपण त्यांच्या कचाटींत जाऊन पडलों, म्हणजे मग फारच विचित्र होईल. पण ती वेळ उगीच वायफळ विचार करण्याची नव्हती. मुख्य उद्देश तेथून

निसटण्याचा होता. तो साधला पाहिजे, असा विचार करून त्यांनीं एकवार सभों-वतालीं दृष्टि दिली आणि पाहिलें, तों एका इमारतीच्या बाजूस दोन माणसांची हाल-चाल आहे असें त्यांस दिसलें. तींच माणसें आपल्यास भेटण्यास आलेलीं माणसें असावीं, तेव्हां आपण ती बाजू टाळून दुसऱ्या बाजूनें निघून जावें, असा बेत करून त्यांनीं त्या इमारतीच्या बाहेर पाऊल घातलें. आणि नितंबबिंबास टांचा लागेपर्यंत वेग करून स्वारींनीं पलायन आरंभिलें. पण त्यांचा तो सर्व खटाटोप व्यर्थ गेला. जी बाजू त्यांनीं टाळली होती, त्याच्या दुसऱ्या बाजूसच त्यांस पाहूं आलेले त्यांचे परमस्नेही बसले होते. त्यांपैकीं प्रोफेसर ड्यांडीची काकदृष्टि त्यांचेवर गेली आणि त्यांनीं, " तो पहा गुलाम चालला आहे. ए मास्तर! अरे, पळूं नको. तुझ्याकरितां आम्ही आलों, आणखी आम्हांला टाकून पळतोस कुठें! चल ये, " असें म्हणून ड्यांडीसाहेब त्यास आडवेच झाले. अर्थातच त्यांचा नाइलाज झाला. करणार काय? त्यांतल्यात्यांत मास्त-रांच्या मनांत इतकी गोष्ट आलीच कीं, ड्यांडीसाहेबांस एक लफडाक लगावून कोलमडवून आपण पुढें चालतें व्हावें. कारण प्रोफेसरसाहेबांची ताकद काय होती, हें त्यांस पक्कें ठाऊक होतें. परंतु प्रोफेसरसाहेबांस त्या वेळीं दुसऱ्या कोण्या व्यक्तीच्या ताकदीचा आश्रय होता, ही गोष्टही त्याला विसरतां येईना. त्याचा नाइलाज झाला, आणि तो " कोण प्रोफे-सर ? आपण का ? . वा ! आपण माझा शोध करीत आलां आहां असं मला कळतं, तर मी केव्हांच आपल्याला भेटलों असतों. वाहवा ! आज जरा हापिसांतलं—आपल्या ब्यांकेच्या हापिसांतलं—काम फार राहलं होतं, आणखी आतां वार्षिक मीटिंग आपली शेअरहोल्डरची आली, तेव्हां म्हटलं आपलं काम आटपून टाकावं म्हणून मी एकटाच आलों होतों हापि-सांत. तों इतक्यांत भय्या आला सांगा-यला, कीं तुम्हांला भेटायला कोणी आले आहेत. बाहेर येतों तों कोणी नाहीं. समोरून कोणी पळत चालला आहे असा भास झाला म्हणून ताबडतोब त्याच्या पाठीमागें पळत सुटलों. वाटलं कीं कोणी लुच्चा असेल, तर त्याला पकडून त्याची खोडकी मोडून टाकावी. वा! आपण आलां असं भय्या सांगता तर आप-ल्याला वरच बोलाविलं असतं, हापिसांत मी एकटाच होतों......... "

" आपण हापिसांत एकटेच होतां का आणखी कोणी मंडळी होती, ती माहिती आतांच तुह्माला कोणी विचारीत नाहीं. ती राहूं द्या. आणखी केव्हां तरी ती माहिती तुह्मांला विचारूं आणखी मग सांगा. सध्या आमच्याबरोबर आह्मी नेऊं तिकडे चला. आपण स्वस्थ बसूं आणखी मग काय तुह्मांला माहिती आहे काय नाहीं विचारूं तुम्ही सांगालच. तुमचा स्वभाव मोठा परो-पकारी आहे, आम्हांला ठाऊक आहे. तुम्हांला आम्ही ठाऊक नसूं, पण आह्मांला तुम्ही पुष्कळ ठाऊक आहां. " असें प्रोफे-सर ड्यांडी यांचे स्नेही फार शांतपणानें ह्मणाले व शेवटीं अतिशय घसट असल्या-प्रमाणें करून त्यांनीं त्यांच्या खांद्यावर आपला हात ठेविला.

प्रोफेसर ड्यांडीचे सोबती मास्तरांनीं दोन प्रहरीं पाहिलेले डिटेक्टिव साहेबच होते. त्यांनीं त्यांच्या खांद्यावर हात टाकतांच आप-ल्या खांद्यावर वज्र पडल्याचाच त्यांस भास

झाला. मास्तरसाहेबांचा स्वभाव फारच नाजूक होता. त्यांचे अंगावर तें वज्र पडतांच त्यांचें मन भेदरून गेलें. इतकें कीं, त्यांस काय बोलावें आणि काय करावें हें कांहीं सुचेना. परंतु त्यांतल्यात्यांत बोबडी वळलेल्या जिभेनें ते म्हणतात, "मम माझा तुतुमचा ककाय ससंबंध मीमी मी गगरीब ककक क्लार्क्.........

परंतु साहेबांनीं त्यास अधिक कांहीं बोलूं दिलें नाहीं. "तुम्ही असे काहीं घाबरूं नका. तुम्हाला वाटतं आहे तुमचा आमचा संबंध नाहीं म्हणून; पण तुमचा आमचा संबंध फार मोठा. तुमच्यासारख्याच्या मदतीवांचून आमचं एक पाऊल सुद्धां पुढें पडणार नाहीं. अशी जर स्थिति आहे, तर आपला आणखी आमचा संबंध नाहीं असं होईल कसं ? आपल्यासारखे, प्रोफेसरसाहेबांसारखे गृहस्थ जर या मुंबई शहरांत नसते, तर आमचा धंदा मुळींच चालताना. आपली तर आम्हांला सर्वस्वी मदत. आपल्यावर तर आमचा सर्वस्वी भार तेव्हां असं म्हणूं नका. आपण आम्हांला मदत कराल, तर आपल्यालाही फायदा होणार. आमचाही फायदा आहे. आतां आजची रात्र आपल्याला आमच्यासाठीं तसदी घेतली पाहिजे. आणखी आपण आम्हांला मदत केली पाहिजे. नाहीं तर विनाकारण आपल्याला भलतीच तसदी दिल्याचं आमच्या दुर्दैवीं येणार आहे."

इतकें बोलून साहेबांनीं आपल्या हातांतील कांहीं जिन्नस खळूकन् वाजविला—किंवा कदाचित् तो सहजही वाजला असेल. पण त्या जिन्नसाचा आवाज होतांच मास्तरांच्या जीवाचा आणि त्या बरोबरं शरीराचाही थरकांप झाला. तो जिन्नस पटकन् आपल्या हाताावर कड्यांप्रमाणें बसतो कीं काय, असें त्यास एकदम भय वाटलें. आणि तो कावराबावरा होऊन म्हणतो, "नाहीं साहेब, तसं नाहीं. आपण मदत मागितली आणखी आम्हीं दिली नाहीं असं कसं होईल ! छे. छे. सांगाल ती कामगिरी बजवायला आम्ही तयारच आहों. त्याबद्दल आपण अगदीं सुद्धां मनांत किंतु आणूं नये. आमच्या गरिबाची आपल्याला काय मदत होणार !" असें म्हणून आपण फार चांगलें भाषण केलें असें त्यास वाटूनच काय, तो साहेबांच्या तोंडाकडे पाहूं लागला.

साहेबांनीं त्यास लागलीच म्हटलें, "माझी खात्री होती, आणखी या तुमच्या मित्रांनीं निर्वाळा देऊन माझी खात्री केलीही होती कीं, तुम्ही अगदीं पूर्णपणें आमच्या उपयोगी पडाल, आम्हाला वाटेल ती मदत कराल. आणखी म्हणून तर आम्ही एवढ्या रात्रीं आपला शोध करीत करीत इथें आलों. विश्वासाचीं कामें विश्वासाच्या माणसांवांचून कशीं व्हावीं ! व्हायचीं नाहींत. तुम्ही मोठे विश्वासू म्हणूनच तुम्हाला तरी तुमच्या ब्यांकेच्या डायरेक्टरांकडून एकट्यादुकट्याला हापीस उघडून बसावयला परवानगी मिळाली, यांतच आपल्यावर त्यांचा विश्वास किती आहे, हें उघड दिसतं आहे. जसा त्यांचा आपल्यावर विश्वास आहे, तसाच आमचाही पण असला, तर त्यांत नवल काय ! कां प्रोफेसरसाहेब खरं कीं नाहीं ! आम्हीं जसा आतां आपल्यावर विश्वास टाकणार तसा आपणही आमच्यावर टाकून खुल्या मनानें सर्व कांहीं बोला म्हणजे झालं. दुसरं कांहीं नाहीं. आमच्यासारख्यावर विश्वास टाकला, तर त्यांत

कधीं नुकसान व्हायचं नाहीं, नेहमीं फायदाच व्हायचा. आमच्या या मित्रांचा किती फायदा झाला आहे यांनाच विचारा; तसा फायदा आपला होईल. आपण अगदीं सुद्धां शंका धरूं नये. चला आतां आमच्याबरोबर. आपण फार फार काम करून थकलां असाल; तेव्हां एखादी चांगली विक्टोरिआ करून खूप लांब असे हिंडायला जाऊं. समुद्रकांठची हवा लागून तुमचं डोकं शांत झालं म्हणजे मग आम्हांला मदत करायलाही आपल्याला चांगली हुषारी येईल. चला. आतां उगीच उशीर नको."

"तें खरं, पण मला ब्यांकेचे दरवाजे तरी लावून किल्ली घेऊन येऊं द्या," मास्तरसाहेब गुळमुळूं लागले. परंतु साहेब त्यांस लागलीच म्हणतात, "जाऊं द्याहो ब्यांक उघडी पडली तर पडली, तिचे आतां उघडे पडायचेच दिवस आले आहेत. मग तुम्ही किती कुलुपकिल्ल्या लावाल! आहे रखवालदार, तो तरी तुमच्या पूर्ण विश्वासांतलाच आहे कीं नाहीं! दिसतोच आहे. तुम्ही आंत असून त्यानं जेव्हां आह्माला एक घंटाभर दाद लागूं दिली नाहीं, तेव्हां तो तुमच्या विश्वासांतला अगदीं आज्ञाधारक असा असला पाहिजे हें उघडच आहे. तो ब्यांक बंद करील, त्याच्याबद्दल आतां नको तुह्मांला काळजी. काळजी घेणारेही कदाचित् आंतून निर्माण होतील. नाहीं कशावरून! चला आतां. तुह्मी आतां आपले आमच्याबरोबर चला. दुसरं कांहीं नाहीं. स्वस्थ चांगले हिंडूं आणि गप्पागोष्टी करीत आह्माला काय विचारायचं तें विचारूं. दुसरं कांहींसुद्धां नाहीं. चला." असें ह्मणून त्यांनीं त्यांस ओढून आपल्याबरोबर नेलें.

# प्रकरण ६९ वें.

## पहिलें दिव्य!



गाडींत पाऊल घातल्यापासून तर कमलेच्या अंतःकरणाची स्थिति फारच चमत्कारिक झाली. आपण करितों आहोंत हें बरें काय, हा विचार जाऊन आतां, आपण केलें हें बरें काय, असें तिला वाटूं लागलें. परंतु पुनःपुनः ती आपल्या मनाचें समाधान करी कीं, आपण केलें हें वावगें नाहीं. जर आपल्या नवऱ्याच्या चित्ताप्रमाणें आपल्यास वागावयाचें, जर त्याच्याकडे पहावयाचें, तर आपल्याला दुसरा मार्गच नाहीं. आपण स्वीकारला हाच मार्ग. इतर चार सुखी स्त्रियांप्रमाणें आपणही आज सुखांत असतों, निदान आपण सुखी असूं असें आपल्याला वाटत होतें, परंतु काळाच्या वक्रगतीनें किंवा आपल्या दुर्दैवानें असे कांहीं प्रसंग आले कीं, आपण ज्यामुळें

सुखी होऊं असें आपल्यास व आपल्या वडील माणसांस वाटलें, त्याच योगानें आपल्या सुखांत माती कालविली गेली. पण तेवढ्यानें आपण डगमगून हताश होऊं नये. आज कांहीं कारणानें आपल्या बापाच्याबद्दल आपल्या नवऱ्याच्या मनांत आढी उत्पन्न झाली, नसताच कांहीं तरी संशय उत्पन्न झाला; परंतु तो संशय दूर करावा हें आपलें कर्तव्य. आपण होऊन सर्वथैव त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें वागलों, तर आज नाहीं उद्यां आपण त्यांच्या मनांतील सर्व संशय काढून टाकूं. आपला बाप किती उत्तम माणूस आहे, याबद्दल आपण आपल्या नवऱ्याची खात्री करूं. आणि आतांचे चार दिवस जरी असे संशयांत, काळजींत व दुःखांत गेले, तरी पण अखेरीस आपण त्यांच्या मनांतील सर्व संशय दूर करून सर्व आढी काढून टाकूं. हा तिच्या ठिकाणचा दृढ विश्वास आपण करतों आहोंत यांत लोकदृष्टीनें सुद्धां कांहीं वावगें असेल, ही कल्पना सुद्धां तिच्या मनास शिवली नाहीं, तिच्या मनाची तयारीच अशी कांहीं चमत्कारिक झाली होती कीं, त्या वेळीं तिला कांहीं सुद्धां वावगें दिसणें शक्य नव्हतें. तिच्याबरोबर असणाऱ्या मनुष्याशीं ती एक शब्द सुद्धां बोलली नाहीं. तो तिच्याकडे अगदीं मुकाट्यानें पहात होता. त्याच्या मनांत काय विचार येत असतील ते त्याचे त्यासच ठाऊक. तोही अगदीं मुखस्तंभच होता. एक दोन वेळां त्याच्या तोंडावरून असें दिसलें, कीं त्याच्या मनांतून कांहीं बोलवयाचें आहे. त्याचे ओंठ सुद्धां त्याप्रमाणें हालले, परंतु कांहीं बोलवेना, किंवा काय बोलावें हें त्यास सुचेना म्हणून तो स्वस्थ बसला असावा. गाडींत फारच थोडी मंडळी होती. इतक्या उशिराच्या गाडींत फार मंडळी नसावयाचीच, तथापि मुळींच नव्हती असें नाहीं. मुंबईच्या लोकल गाड्या अगदीं रिकाम्या अशा कधीं असणें संभवनीयच नाहीं. शहरवासी लोक-मुंबसारख्या बकाली व अफाट शहरांतील रहाणारे लोक स्वभावतःच इतरांविषयीं अगदीं निष्काळजी असतात. जो तो आपापल्या कामांत, विचारांत वगैरे गर्क असतो. आपल्या स्वतःच्या कामाखेरीज त्याला कांहीं दिसत नाहीं, ऐकूं येत नाहीं. आपल्या स्वतःच्या विचाराखेरीज त्याचें कशाकडेही लक्ष्य जात नाहीं. गेलें तरी तें फार वेळ टिकत नाहीं. एखाद्या आरशासमोरून हजारों पदार्थ किंवा व्यक्ति गेल्या, तरी त्या आरशावर ज्याप्रमाणें कशाच्याही प्रतिबिंबाची कांहीं खूण उरत नाहीं, त्याप्रमाणेंच या स्वकार्यैकमग्न लोकांच्या मनाची स्थिति असते. त्यांना स्वतःखेरीज कांहीं दिसत नाहीं. कांहीं पहाण्याला वेळ नसतो. त्यांच्या अंतःकरणांत दुसऱ्या कशाला जागाच नसते, इतकें तें त्यांच्या त्यांच्या स्वतःच्या कार्यांनीं व्यापृत असतें. अर्थातच आपापल्या घरोघर जाऊन एकदां अंथरुणाला पाठ लावूं केव्हां असें ज्यांस झालें आहे, अशांच्या मनाची स्थिति विशेषतः काय असेल? तशाच स्थितींतले लोक या उशिरां जाणाऱ्या गाड्यांतून असावयाचे, परंतु या गाडींत या वेळीं एक गृहस्थ असा होता कीं, त्याचें लक्ष्य चहूंकडे होतें. रात्रीची वेळ. वास्तविक माणसें पेंगावयाची आणि मुंबईस ज्याप्रमाणें सर्वच गोष्टी अगदीं तांतडीच्या, त्याप्रमाणें तेथील लोकांच्या झोंपाही अगदीं तांतडीच्या. दोन

स्टेशनें जरी जावयाचें असलें, तरी मंडळी तेवढ्यांतल्या तेवढ्यांत एक दोन वेळां पेंगून झोंप काढावयाची; त्याचप्रमाणें हा गृहस्थ अगदीं पेंगल्याप्रमाणें करीत होता. परंतु त्यास खरोखर झोंप येत असावी असें मुळींच दिसलें नाहीं. त्याची झोंप अगदीं आपली नुसती बतावणी करण्याजोगी असावी असें दिसलें. त्याचें लक्ष्य या दोन व्यक्तींकडे असावें असें दिसलें. ही मुलगी कांहीं तरी संकटांत सांपडली असावी. हिच्या बरोबरीचा मनुष्य हिच्या ओळखीचा नसावा. हिच्या आणि याच्या बरोबर जाण्यांत कांहीं तरी गूढ असावें असेंही त्याला वाटलें असावें. हीं दोघें गाडींत शिरून पांच मिनिटें झालीं असतील नसतील तेव्हांच ही त्यास शंका आली असावी. परंतु प्रथम त्यानें आपलें झोंपेचें सोंग घेऊन तिकडे लक्ष्य दिलेंसें दिसलें नाहीं. परंतु दोन स्टेशनें जातांच त्यानें आपल्या खिशांतून दोन विड्या व काड्यांची पेटी काढून कमलेच्या बरोबरच्या गृहस्थाच्या पुढें एक विडी केली. तों त्यानें त्यास "माफ करा, मी अशी विडी ओढीत नाहीं, नेहमीं सिगारेट् ओढतों" असें उत्तर दिलें. त्या नवीन गृहस्थानें किंचित् स्मित केलें, आणि दुसऱ्या बाजूच्या खिशांत हात घालून "असं का? तीही असेल माझ्याजवळ" असें ह्मणत एक कागदी प्याकेट काढलें व त्यांतून एक सिगारेट् काढून त्या गृहस्थापुढें धरली. आमच्या गृहस्थांनीं मान हलवून व थ्यांक्स म्हणून ती घेतली. आगपेटींतून एक काडी काढून फर्र करून ओढली व सिगारेट् पेटवून धुराचे लोट मुखांतून सोडण्यास सुरुवात केली. कमला त्याच्यासमोरच बसली होती. तिच्या तोंडावर तो लोट जातांच तिला किळस येऊन ती अंग चोरून पलीकडे सरकूं लागली. तेव्हां नवीन गृहस्थ आमच्या गृहस्थास ह्मणतो, "अहो त्यांना तुमच्या सिगारेट्पासून त्रास होतो; तुम्ही असे या दुसऱ्या बाजूस या." तें ऐकतांच आमचे गृहस्थ ह्मणतात, 'ओ नो, त्यांना कांहीं त्रास तो नाहीं. ती सुधारकाची मुलगी, सुधारकाची बायको, आणखी आतां सुधारणेसाठींच आमच्याबरोबर चाललेली आहे," असें बोलून तो हंसला. तें त्याचें हंसणें इतकें चमत्कारिक, अगदीं हिडिस होतें कीं, तें कानीं पडतांच कमलेला कसेंसेंच वाटलें. ती अगदीं चकित झाली. हा गृहस्थ बोलतो आहे तरी काय, असें तिला होऊन ती चमत्कारिक तऱ्हेनें त्याच्याकडे पाहूं लागली.

दुसऱ्या गृहस्थानें तें ऐकून त्यालाही थोडें चमत्कारिक वाटूं लागलें असावें असें दिसलें. परंतु तो शांतपणें आमच्या गृहस्थास ह्मणतो, "आपली बहीण वाटतं? म्हणून असा विनोद करितां आहां."

"बहीण! छे. छे. छे. माझी बहीण असती तर अशी!..."

गृहस्थ तितकेंच बोलणें थांबवून स्वस्थ बसला, अधिक बोलेना. तेव्हां तो परकी गृहस्थ त्याला म्हणतो, "मग आपला संबंध काय आणखी चाललां कोठें?"

"इथें दादराला जातों. आतां आलंच ह्मणायचं. पण कायहो, तुह्मी एवढी चौकशीशी करितां? तुमचा आमचा तसा कांहीं बोआ परिचय असता तर असो?"

"परिचय? परिचयाला किती वेळ लागतो! आतां आपण ऐका ठिकाणीं धूम्रपान केलं, आणखी आपल्याला हर-

कत नसली, तर आपण आणखी कांहीं सहपान करूं. आपल्याला कदाचित् हरकत असेल म्हणून मीं काढलं नाहीं. पण आपल्या एकंदर बोलण्यावरून कांहीं हरकत दिसत नाहीं. घ्या तर मग!" असें म्हणून त्यानें खिशांतून एक लहानशी चपटी बाटली काढली. ती बाटली पहातांच आमचे गृहस्थ अगदीं जिभाळ्या चाटूं लागले. तोंडानें "छे. हो. नको हो. तसं नाहीं बोआ. त्यांत सोडा बिडा कांहीं नाहीं," असें ह्मणत पण त्यांनीं हातांत बाटली तशीच घेतली आणि डोकें खाजवीत एक घोट तर घेतला, त्या घोटानें ह्मणा, किंवा बाटलीच्या नुसत्या दर्शनानें ह्मणा, पण तरुण गृहस्थाची कळी उमलली आणि ते एकदम ह्मणतात; "स्नेहसंबंध वाढायला हें एक मोठं साधन आहे बोआ. पहा, आतां जर आपण मला ही सिगारेट् आणखी आपलं 'हूं हूं' दिलं नसतं, तर आपण कांहीं इतके फ्री झालों नसतों. अहो, थोडे दिवसांपूर्वी मला यांपैकीं कांहींसुद्धा माहिती नव्हती. परंतु आमचे स्नेही, कदाचित् आपल्याला ते ठाऊक असतील, ते प्रोफेसर ड्यांडी ह्मणतात त्यांना, त्यांनीं मला हातीं धरून या मार्गास घातलं. यामुळं आपल्या सारख्या चार लोकांचा सहज परिचय होतो, आणखी वाटेल त्या कंपनींत जायला सांपडतं. आजकाल मी कोणत्याही कंपनींत गेलों, तरी, 'या सोन्याबापू!' ह्मणतात; आणखी अगदीं बरोबरीच्या नात्यानं वागवितात. आमचे वडील असेच थोर थोर मंडळींत जायचे. आपल्याला ठाऊक असतील आमचे वडील. ते म्हणजे कोणाला ठाऊक नाहींत असं नाहींच. मोठे ऑर्थोडाक्स बरं का! काय त्यांची पूजाम् अर्चा चालते आहे ह्मणतां! पण ती घरीं हो, आणखी बाहेर पार्टीला गेले कीं मग कांहीं विचारूं नका. आणखी मला नेहमीं शिव्या देतात. पण मी कुठें ऐकतों आहें! मी आपला होतां होईल तों आतांशा घरीं नसतोंच. प्रोफेसर ड्यांडीच्याबरोबर असतों. त्यांच्याबरोबर असलं कीं, वाटेल त्या मंडळींत जायला सांपडतंना, आणखी कसल्या लोकांच्या गांठी पडतात ह्मणतां! बस बस. एक माणूस आहे तो. आज तरी मी काय, त्यांच्याचमुळं इकडे हिला न्यायला आलोंना ?......"

गाडी जर एका स्टेशनावर येऊन त्या वेळीं उभी न रहाती, आणि तितक्यांत आणखी पांच चार मंडळी आंत शिरूं लागली असतां, "इकडे लेडी आहे, आमची लेडी आहे" असें ह्मणून त्यांच्याशीं हुजत घालण्याची लहर सोन्याबापूस न येती, तर त्यांचें चऱ्हाट किती वेळ तरी चाललें असतें. इतक्या वेळचा त्यांचा मुग्धपणा आतां अजीबात नाहींसा झाला. त्यांची जिव्हा आगगाडीच्या वेगापेक्षांही खूप जलद चालू झाली. लोक आंत यायचे ते आलेच, परंतु यांची बडबड चालूच राहिली. मूर्खावर मार खाण्याचा प्रसंग आला असता, परंतु त्या दुसऱ्या गृहस्थानें थोपवून धरून त्यास एकीकडेस बसवून ठेवलं. तो सर्व प्रकार पाहून आणि त्याची ती बडबड ऐकून बिचाऱ्या कमळेची काय बरें अवस्था झाली असेल ? आपण फसलों तर नाहींना ? आपल्याला कोणी फसवून तर इकडे आणलें नाहींना ? आपण असा कसा अविचार केला ? नुसत्या पत्रावर कसा भरंवसा ठेवला ? आपल्या वडिलांना सर्व पत्रें दाखवून त्यांच्या अनुमतानेंच सर्व का

नाहीं केलें! असे अनेक प्रश्न तिच्या मनांत उभे राहिले. परंतु मनुष्याच्या मनाच्या विवक्षित स्थितींत अशा प्रकारच्या शंकापेक्षां आशेचेंच प्राबल्य अधिक होतें, व शंकापूर्ण प्रश्न तिच्या मनांत उभे राहिले खरे; परंतु तसें कांहीं नाहीं; आपल्याला आपल्या पतीनेंच पत्रें पाठविलीं, आपणासाठीं तोच दादरच्या स्टेशनावर वाट पहात बसला असेल, आपल्यासारख्या गरीब मुलीला फसवायला कोण उगीच उद्युक्त होईल! आपण कोणाचें काय वाईट केलें आहे, तर तो आपल्यास खोटीं नाटीं पत्रें लिहून फसवील? अशीं उत्तरें आपल्या मनांत तयार करून आपलें समाधान करून घेत होती. गरीब बिचारी! तिला अद्यापि जगांतील खडतर व दुष्ट मार्गांचें ज्ञान तर लांबच राहिलें, परंतु असे कांहीं मार्ग असतील व त्या मार्गांवरच राहून आपली उपजीविका करणारे लोक असतील, ही कल्पना सुद्धां नव्हती. अर्थातच अशा विकट प्रसंगांत, सोन्यासारख्या हलकट माणसाच्या तावडींत सांपडली असतांही आपण कांहीं विकट प्रसंगांत सांपडलों आहों हें तिला समजेना.

आणखी थोडा वेळ गेला आणि दादरचें स्टेशन आलें. त्याबरोबर गाडी उभी राहिली आणि कमला पटकन् प्लॅटफार्मावर उतरली व इकडे तिकडे पाहूं लागली. सोन्याबापूंची तंद्री लागली होती. यामुळें त्यास गाडींतून उतरण्याचें सुद्धां भान राहिलें नाहीं. तेव्हां त्या दुसऱ्या गृहस्थानें त्यास हातीं धरून उतरविलें आणि तो आपणही तेथेंच उतरला. गाडी पुढें निघून गेली. आतां मात्र कमलेस पंचाईत पडली. आपला पति आपल्यास उतरण्यासाठीं स्टेशनावर उभाच असेल. त्याच्यासाठीं आपण आपल्या बापाचा सुद्धां मुलाजा न ठेवतां त्याच्या लिहिण्याप्रमाणें आलों, हें पाहातांच त्यास अत्यानंद होऊन तो आनंदानें आपलें स्वागत करील, आपण येतों केव्हां याबद्दल अगदीं उत्सुक असेल, असे अनेक आशापरिपूर्ण विचार तिच्या मनांत चालले होते. परंतु पद्माकरपंत तर कोठेंही दिसेना आणि आपण आतां काय करावें हेंही तिला सुचेना. बरें, ज्याच्याबरोबर ती आली, ती स्वारी आतां अगदीं चहकल्याप्रमाणें झाली, आणि त्याला तो नवा गृहस्थ कसा तरी सांवरून धरीत होता. काय विलक्षण प्रसंग तिजवर आला होता? तो प्रसंग किती विलक्षण होता, याची पुरी कल्पनासुद्धां तिला नव्हती. ती अगदीं गोंधळून जाऊन आपण मुर्खपणा केला, आपल्याला कोणी तरी माणसानें फसवलें, असें तिला खास वाटूं लागलें. इतक्यांत तिच्यापुढें दुसरा एक गृहस्थ येऊन उभा राहिला आणि. "कमलाबाई, तुम्हांला पद्माकरपंतांनीं बोलावलें आहे. ते त्या पलीकडल्या बंगल्यांत आहेत, चला, गाडी येऊन बराच वेळ झाला, तरी तुमचा ठिकाण नाहीं. तेव्हां त्यांनीं मला पाहण्याला पाठवलें," असें म्हणाला. त्या माणसाचे ते शब्द ऐकण्याबरोबर कमलेस आनंद व आश्चर्य दोनही झालीं असें दिसलें. आनंद कां झाला हें अर्थातच वाचकांनीं ताडलेंच असेल. आपणांस कोणी तरी फसवून आणलें नाहींना, असें वाटून जें तिला अत्यंत वाईट वाटूं लागलें होतें तें एकदम गेलें. आपण आतां आपल्या पतीस खास भेटणार असें वाटलें आणि आश्चर्य वाटण्याचें कारण एवढेंच कीं, हा नवीन आलेला गृहस्थ आपल्या नवऱ्याचा स्नेही

राजाराम असावा असें तिला वाटलें. आपल्या ओळखीचें कोणीही नाहीं, आणि आपण अतिशय मोठ्या संकटांत पडलों आहों असें वाटून मनुष्य घाबरून गेला असतां एकाएकीं एखादें ओळखीचें माणूस भेटलें म्हणजे त्या माणसाला केवढा धीर येतो ? त्या वेळीं हें ओळखीचें माणूस आपल्या संकटाचें निवारण करण्यास आलें आहे, कीं त्यांत भर घालण्यास आलें आहे, हा प्रश्न सुद्धां मनांत येत नाहीं. तें आपणास आपल्या अडचणीच्या वेळीं भेटलें आहे, त्याअर्थी आपणास त्याच्यापासून मदतच होणार असें तो गृहीत धरतो. तशीच कमलेची स्थिति या वेळीं झाली. त्यांतून राजारामानें तिच्या नवऱ्याचें नांव घेऊन तिला त्याच्याकडे चलण्यास सांगितलें. तो आपल्याला भेटण्याला उत्सुक आहे असें सांगितलें आणि आपण तिला त्याच्याकडे नेण्यासाठींच आलों आहों असेंही पण सांगितलें. अर्थातच तिला फार आनंद झाला आणि ती त्याच्याबरोबर जाण्यास निघाली, इकडे सोन्याची स्थिति पाहून तर राजारामास आश्चर्य वाटलें व तो त्यास शिव्या हांसडून म्हणतो, " लेंका, तुला कामाला पाठवला तिथें कांहीं तरी प्रताप उधळलेस का ! " असें म्हणून त्याचा हात धरून त्यानें त्यास फरफटत आपल्या पाठोपाठ चालवलें. त्याच्याजवळ दुसरा माणूस होता. त्याच्याकडे एक दृष्टिक्षेप टाकला असेल नसेल; तोही गृहस्थ अगदीं मुकाट्यानें उभा होता—जणूं काय, काय काय मौजा चालल्या आहेत त्या पाहण्यासाठींच तो तेथें उभा होता. तोंडानें त्यानें एक अवाक्षरसुद्धां काढलें नाहीं. मुकाट्यानें त्या स्टेशनच्या बाहेर पडणाऱ्या दारीकडे पाहात राहिला; व ती मंडळी दूर गेली असें पाहून आपल्याशींच म्हणतो, " काय असेल तें असो, या मुलीवर कांहीं तरी भयंकर प्रसंग या गुलामांनीं आणलेला आहे असं दिसतं. ज्या इसमावर डोळा राखण्यासाठीं आपल्याला सांगितलं आहे, तो इसमही आतां तिला घेऊन जाण्यासाठीं आलेला इसमच दिसतो. ज्या गुन्ह्यासाठीं त्याच्यावर डोळा ठेवायला आपल्याला सांगितलं आहे, त्यांत तो सांपडो न सांपडो पण तो खास आतां कांहीं तरी अशाच गुन्ह्यांत सांपडणार आहे. आणखी जर आतां तो अशाच गुन्ह्यांत सांपडला, तर आपली केवढी शिफारस होईल ? आपणही जरा आतां विशेष नजर ठेवून काम केलं पाहिजे. निदान आपली बहादुरी होवो न होवो, पण या गरीब पोरीवर जर कांहीं दुर्धर प्रसंग असला, तर त्यांतून तिला सोडवूं तरी, एवढं तरी पुण्य पदरीं गांठूं. बिचारी गरीब सालस दिसली. तिला कांहीं तरी गोत्यांत घालण्याचा या चांडाळांचा बेत दिसतो आहे. पण जर मी आतां इथें आहें, तर तसं मुळींच होऊं देणार नाहीं. तिला सोडवीन, या गुलामांना पकडीन, यांचा पुरता फजितवाडा करीन. "

अशा तऱ्हेचे उद्गार काढीत तोही गृहस्थ स्टेशनाच्या बाहेर पडून त्याच मंडळींच्या मागोमाग चालला. त्या मंडळीवरून दृष्टि चळूं नये ही त्याची जबरदस्त इच्छा. परंतु स्टेशनापासून जवळच कोठल्या तरी बंगल्यांत ती मंडळी गेली असल्यामुळें त्यास कोठें उभें राहून कसें काय निरीक्षण करावें, याची थोडा वेळ मनांतल्या मनांत भवति नभवति करून तो आपल्या नैसर्गिक चाणाक्षपणानें

नेमका एका बंगल्याजवळ जाऊन उभा राहिला, आणि बेताबातानें आंत काय चाललें होतें त्याची टेहळणी करण्यास सांपडेल काय, आंतलें कांहीं ऐकूं येईल काय, अशा आशेनें या बंगल्याच्या सभों-वतीं सभोंवतीं हिंडत राहिला.

इकडे राजाराम, सोन्या व कमळा हीं तिघेंही त्या बंगल्याकडे जात असतां कमळा अत्यंत आतुरतेनें पावलें टाकीत होती. किती दिवसांनीं आपला पति आपल्यास भेटणार व आपण त्याच्या मर्जीप्रमाणें तातडीनें कोणासही न कळ-वितां निघून आलों, म्हणून त्यांस अत्यानंद होईल; आजपर्यंत त्यांच्या मनांत बस-लेली आढी निघून जाईल आणि थोडेच दिवसांत आपल्या बापाच्यासंबं-धानें जें त्यांच्या मनांत उगीच कांहीं तरी वाईट आलें आहे तेंही काढून टाकीन. अशा उमेदीनें ती पावलें टाकीत चालली होती. आपली निष्ठा किती आहे, हें पाह-ण्यासाठींच आपल्या पतीनें अशा तऱ्हेनें आपणास बोलाविलें नाहीं म्हणून तरी कशावरून! असाही पण एक तर्क तिच्या मनांत उभा राहिला. आणि जों जों त्या बंगल्याच्या जवळजवळ ती गेली, तों तों तो तिचा तर्क तिला विशेषच संभवनीय वाटूं लागला. आणि जसजसा तो तर्क संभवनीय वाटूं लागला, तसतसें तिला असेंही वाटूं लागलें, कीं आपण या कसास उतरलों असें पाहून आपला पति आनं-दितच होणार. आपण त्याच्या आज्ञे-करितां आईबाप वगैरे कोणाची परवा करणार नाहीं, अशी त्याची खात्री होईल. शिकलेल्या आणि सुधारलेल्या आई-बापांच्या मुली पतिनिष्ठ नसतात असा जो त्यांच्यावर एक आक्षेप असतो, तो आपल्यावर तरी आपल्या पतीला ठेवतां येणार नाहीं, आणि आपल्यावर ठेवतां आला नाहीं म्हणजे इतरांवरही लोक उगीच कुत्सित बुद्धीनेंच ठेवतात असेंच त्यांना वाटेल, असेंही पण तिच्या मनांत आलें. एकंदरींत तिच्या मनाची स्थिति मोठी उल्हसित झाली होती.

ती मंडळी त्या बंगल्याजवळ गेली, कंपाउंडांत शिरली. राजारामानें त्या आच-रटास आंत ढकललें आणि कमळेस "चला कमळाबाई, आतां थोड्यावर आलं आहे," असें म्हटलें आणि तीही कंपाउंडांत शिरली. कंपाउंड लहान होतें. थोड्याच वेळांत तें संपून मंडळी त्या बंगल्याच्या पायऱ्यांवर गेली. कमळेनें पायरीवर पाय दिला असेल नसेल, तोंच तिच्या कानीं पुढें दिलेले अत्यंत कठोर असे शब्द पडले:—" चांडाळणी! मी आजपर्यंत नुसतं ऐकत होतों. आज डोळ्यांनीं पहातों आहे. आतां शंका कसची! हे ह्याम्लेटचे आणि ऑथेल्लोचे दिवस असते, तर या हातांनीं तींच प्रत्यक्ष नाटकं केलीं असतीं. पण आज स्वस्थ बसून पाहावं लागत आहे!" तो अत्यंत कठोर व क्रोधकर्कश शब्द कोणाचा हें कमळेनें क्षणार्धांत ओळखलें व आपण जिवंत आहोंत कीं मृत आहोंत, याचेंच तिला भान नाहींसें झालें! ती साफ मूर्छित पडली.

जसा एखाद्याच्या मस्तकावर आघात बसावा, आणि त्याचें एकदम भान नाहींसें व्हावें, सर्व विश्व त्यास शून्यवत् व्हावें, तद्वत् कमलेची स्थिति झाली. ते शब्द वज्राच्या आघाताप्रमाणेंच तिच्या कानीं पडले. प्रेमानें ओथंबलेले आणि मंजुळ-पणें उच्चारलेले शब्द आपल्या कानीं पड-तील अशा आशेनें ती आली होती हें

उघडच आहे. "तूं आलीस! येशील असं मला वाटलं नव्हतं. तुझी परीक्षा पाहाण्यासाठींच मुद्दाम अशा प्रकारचीं पत्रं वगैरे पाठविण्याची योजना केली. परंतु त्या परीक्षेस तूं उतरलीस!" असे किंवा अशा प्रकारचे मोठ्या मनोभावानें उच्चारलेले शब्द आपल्या कानीं पडतील आणि मग आपण कांहीं तरी त्या समयास योग्य असें उत्तर देऊं, असें मनोराज्य करीत पावलांपुढें पावलें टाकीत आलेल्या त्या बिचारीला असल्या तऱ्हेचें पारितोषिक आपल्यासाठीं तयार होऊन राहिलें असेल, ही कल्पनासुद्धां नाहीं. एखाद्या संगमरवरी पुतळीप्रमाणें ती क्षणभर अगदीं पांढरीफटक व निस्तेज होऊन उभी राहिली. आणि एखाद्या अशा सुंदर पुतळीवर विजेचा आघात होऊन ती जशी उमद्रून पडावी, त्याप्रमाणेंच कमलाही तेथें निश्चेष्ट पडली. मागील प्रकरणीं अखेरीस दिलेले शब्द, कीं ज्या शब्दांनीं त्या बिचारीचा एवढा घोटाळा केला, ते शब्द कोणीं उच्चारले असावे याची कल्पना वाचकांनीं बहुतांशीं बरोबर केलीच असेल. ते शब्द कमलेचा पति पद्माकर यानेच उच्चारलेले होते. तोच त्या वेळीं त्या ठिकाणीं उभा होता. हा येथें कसा आला आणि असे शब्द त्यानें कां उच्चारले वगैरे गोष्टींचा उलगडा आतां थोड्याच अवकाशांत होऊन, कमला त्या ठिकाणीं निश्चेष्ट पडली असतां त्याच्या मनाची पहिली प्रवृत्ति पटकन् पुढें होऊन तिला सांवरून धरावें अशीच होती, परंतु अगदीं स्वभावतः पुढें गेलेले हात त्यानें निष्ठुरतेनें मागें ओढले. त्याच्या शिक्षणानें व शीलानें एखादी हताश स्त्री अशा विपन्नावस्थेंत पडलेली दृष्टीस पडली असतां तिच्या मदतीस धांवावें हें साहजिक होय, आणि त्याप्रमाणें तें झालेंही. परंतु कोणा तरी दुष्टाच्या कपटजालांनीं त्याच्या नेत्रांवर अंधारी आल्याप्रमाणें झालें असल्याकारणानें जें नैसर्गिक तेंच त्यास करूं नये असें वाटून तो मागें सरला, आणि एकदम तेथें त्याच्याजवळच उभे असलेल्या एका गृहस्थास म्हणतो, "वडील माणसांचें व शहाण्या लोकांचें न ऐकतां तारुण्याच्या जोरांत आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसें वागण्याचा परिणाम यथायोग्यच झाला! मी तरी मला पुनः आशा उत्पन्न होऊन दूर गेलेला परत कशाला आलों!" असें कांहीं तो बोलत असतां दुरून आणखी एकदोन माणसें आपल्याकडे येत आहेत असें त्यानें पाहिलें. परंतु ती कोण असावीं, इकडे कां येताहेत, याची चौकशी करण्याचें त्यास कांहीं प्रयोजन नव्हतेंच. अर्थातच आपली फजिती— त्याच्या दृष्टीनें ती फजिती—आणखी कांहीं व्यक्तींच्या देखत होऊं नये असें मनांत येऊन तो तेथून निघून जाऊं लागला. परंतु कमलेला तशा अवस्थेंत तशीच निश्चेष्ट टाकून जाणें जणूं काय त्यास थोडेंबहुत कष्टप्रद वाटलें असावें, म्हणूनच त्याचें पाऊल तेथून उचलेना, परंतु जिला आपण अत्यंत सुंदर— अंतर्बाह्य सारखीच सुंदर—सर्व गुणांची व प्रेमाची केवळ खाण असें समजून आईबापांचा, इष्टमित्रांचा पूर्णपणें अनादर करून वरिलें, ती आपल्या देखत अशा प्रकारें केवळ कुलटा बनलेली पहावी आणि पापकर्म करीत असतां अशा अचानकपणें सांपडल्याकारणानें घाबरून जाऊन झीट येऊन पडली असतां पुनः तिला आपणच आपल्या हातांनीं शुद्धीवर आणण्यासाठीं खटपट

करावी हें त्याच्या मनांतसुद्धां येईना. किंबहुना तें अगदीं सर्वथैव अनुचित असेंच त्याला वाटलें; आणि त्या तशा मनाच्या स्थितींतच तो तेथून जाण्यास निघाला. दोन पावलें पुढें जातो न जातो तोंच एक माणूस त्याचे पुढें येऊन त्यास ह्मणतो, " राजाराम कोठें आहे? अतिशय जरूरीचें काम असल्यामुळें त्याची गांठ घेण्यासाठीं मी शोध काढीत काढीत येथें आलों आहे आणि त्याच्याबरोबर आपलीही जरूरी आहे. " पद्माकरानें त्या माणसाकडे चमत्कारिक दृष्टीनें क्षणमात्र पाहिलें, आणि लागलीच ह्मटलें, " माझी जरूरी? माझी जरूरी आतां या दुनियेंत कोणाला नाहीं, आणि मलाही कोणाची जरूरी नाहीं. आतां या जगांत एकाच गोष्टीची जरूरी. ती प्राप्त करून घेण्यासाठीं दाही दिशा मोकळ्या आहेत. माझ्याजवळ कोणाचें कांहीं काम असणें शक्य नाहीं. राजाराम मला आज कित्येक दिवसांत भेटला नाहीं. तो आज येथें येणार होता, पण आला आहे कीं नाहीं, मला ठाऊक नाहीं. तुम्हांला जरूर असली, तर या बंगल्यांत एक दोन मंडळी आहेत त्यांना विचारा. कदाचित् तोही आंत असेल; मला आतां कोणालाही भेटण्याची इच्छा नाहीं. " असें म्हणून तो पुढें जाऊं लागला. परंतु त्या गृहस्थानें पुनः त्यास हटकलें, " मला तुमची जरूरी आहे—तुह्माला माझी नसली तरी मला तुमची आहे. आपलीशीं काय, परंतु आपल्या सगळ्या कंपूचीही जरूरी आहे. आपल्या कांहीं मित्रांसाठीं मजजवळ अगत्याची अशी सरकारी निमंत्रणचिठ्ठी आहे. आपल्यासाठीं तशी चिठ्ठी नाहीं, परंतु आपल्याला घेऊन जाणें फार जरूर आहे. निमंत्रणचिठ्ठीवांचून यायचेंच नाहीं, असा मानीपणा आपल्या अंगीं असल्यास नाइलाजास्तव ती मुद्दाम आणावी लागेल. "

या त्याच्या बोलण्यानें पद्माकर आश्चर्यचकित होऊन त्याचेकडे पाहूं लागला आणि त्या गृहस्थाच्या बोलण्याचा अर्थ काय असावा याबद्दल मनांत संशय घेऊन तो आपल्याच ठिकाणीं चरकून गेला. आपले स्नेहीसोबती कोण आणि त्यांस सरकारची निमंत्रणचिठ्ठी काय म्हणून, हें त्याच्या कांहीं सुद्धां लक्ष्यांत येईना, सबब तो पुनः त्या गृहस्थास ह्मणतो, " तुम्ही कांहीं तरी गैरसमजुतीनें मला बोलतां आहां. तुम्हाला कोण मंडळी पाहिजे असतील, त्यांचा माझा कांहीं सुद्धां संबंध नाहीं. तुम्हांला ज्यांची जरूरी, अशांचा व माझा संबंध असणें शक्यच नाहीं; आणि तसली मंडळी येथें या बंगल्यांत असतील; असेंही पण मला वाटत नाहीं. "

तो गृहस्थ त्यावर तावडतोब म्हणतो, " असतीलसें तुम्हाला वाटत नाहीं आणि आहेत अशी माझी खात्री आहे. मग आतां तुमच्या वाटण्याप्रमाणें मी करूं, कीं माझ्या खात्रीप्रमाणें करूं? आतां जास्त वेळ तेथें बोलत बसूं नका, मजबरोबर चला. तुमचा स्नेही राजाराम कोठें आहे, तें तावडतोब सांगा; त्याशिवाय तुह्माला दुसरा मार्गच नाहीं. " कांहीं तरी विचित्र प्रसंग घडून येणार आहे, परंतु या गृहस्थाच्या बोलण्यावरून हा जर पोलिस अधिकारी दिसत आहे, तर याच्याशीं अधिक प्रसंग आपण करूं नये, असा विचार करून तो त्याचेबरोबर त्या बंगल्यांत जाण्यास परत फिरला.

इकडे कमला तशीच निश्चेष्ट पडली होती, परंतु ज्यास उठविण्यास कोणीच पुढें होत नाहीं, त्यास दैवच आपोआप उठवितें, या न्यायानें त्या दोघांचें पलीकडे भाषण चाललें असतां कमला त्या निश्चेष्टावस्थेंतून जागृत झाली. एक क्षणभर आपण कोठें आहोंत, काय करीत आहोंत, अशा कोठें येऊन पडलों, याचें तिला स्मरण होईना; परंतु दुसऱ्याच क्षणीं विजेच्या चमकेप्रमाणें आतांपर्यंत घडून आलेल्या सर्व गोष्टींची परंपरा एकदम तिच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. कोणाच्या तरी दुष्ट काव्यानें आपण फसून मृगजलाच्या पाठीमागें धांवत आलों, आतां तेथें उभें राहण्यांत किंवा वाट पाहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. भरीं आपण नाहींशा झालों, हें पाहण्याबरोबर बाबांस काय वाटलें असेल, ते आतां आपल्यास काय ह्मणतील इत्यादि विचार तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तिच्या मनांत उभे राहिले. परंतु तिच्या मस्तकाची स्थिति फार विलक्षण झाली होती. येथून जावें—जिकडे वाट फुटेल तिकडे जावें, आतां पुनः कोणाही आपल्या माणसास तोंड दाखवूं नये, असा निश्चय करून ती तेथून निसटली. पद्माकर व तो दुसरा गृहस्थ या दोघांना पुरतेपणीं ती दिसली असेल कीं नाहीं, इतक्या झपाट्यानें ती तेथून निघून गेली.

---

# प्रकरण ७० वें.

## दुसरें दिव्य.



वाचकहो ! कल्पना करा. बिचारी कमला या वेळीं कोणत्या भयंकर दिव्यांत सांपडली होती. मनुष्य एखाद्या विकाराच्या स्वाधीन होऊन जेव्हां कांहीं एखादी गोष्ट करण्यास पुढें होतो, तेव्हां त्या विकाराच्या कमीअधिक उद्रेकावर त्याच्या विचाराचा कमीअधिकपणा अवलंबून असतो. जसजसें विकाराचें प्राबल्य अधिक, तसतसें त्याचें विचारदौर्बल्य अधिक, आणि विकाराची परमावधि झाली ह्मणजे विचाराचा पूर्णाभाव होतो. विकाराचा अतिरेक झाला, कीं एक प्रकारें आंध्यच येतें. मग त्यास सुविचार म्हणून सुचतच नाहीं. आपण जी गोष्ट करण्यास उद्युक्त झालों आहों, तेवढीच गोष्ट करणें आपल्यास उचित, तीच गोष्ट करणें आपलें कर्तव्य, ती न करणें ह्मणजे आपण आपल्या कर्तव्यास चुकणें, असेंच वाटूं लागतें. कमलेच्या नवऱ्याचीं—निदान हीं आपल्या नवऱ्याचींच असें तिला पक्केपणें वाटणारीं—पत्रें तिला आलीं, त्या वेळीं तिच्या मनानें पक्केपणें असें घेतलें कीं, आपण या पत्रांत सांगितल्याप्रमाणें अक्षरशः वागणें ह्मणजेच आपलें कर्तव्य करणें होय. याप्रमाणें वागलों नाहीं, तर आपण

अगदीं चुकणार आहों, आणि नवऱ्याचें व आपलें पुनः जुळण्याचा प्रसंग आला असतां केवळ हट्टामुळें, दुराग्रहामुळें टाळला असें होणार आहे, असें तिच्या मनानें घेतलें. त्या भरांत तिनें कशा तऱ्हेनें वर्तन केलें, तिनें कोणत्या प्रकारें आपल्या मनाची समजूत केली आणि किती कष्टानें परंतु त्वरितपणें ती बाहेर पडली, हें वाचकांस माहिती आहेच.

परंतु आतां ! आतां त्याच्या अगदीं उलट स्थिति होती. इतकी उलट, कीं आतां तिचें पाऊल तिला उचलत नव्हतें. प्रत्येक पावलागणिक आपण आतां पडूं काय, आपल्याला घेरी येते काय, असें तिला होत होतें. अद्यापि पुरती पहाटसुद्धां झाली नव्हती. पहाटचा वारासुद्धां सुटला नव्हता. त्या तिच्या मस्तकाची स्थिति अशी आणि ती एकटी. अपरात्रीं मुंबईजवळच्या दादरासारख्या गांवांत एकटी स्त्री हिंडते आहे, हा प्रसंग तरी काय ! आपण आतां जाणार कोठें ! करणार काय ! कांहीं कांहीं सुद्धां तिच्या मस्तकांत कल्पना येईना. एक मात्र विचार तिच्या मनांत पूर्णपणें अधिष्ठित झाला, कीं आपण आतां परत घरीं जाऊं नये. घरीं जावें कोणत्या तोंडानें ! आणि कोणाकडे ! आपल्या वडिलांना काय सांगावें ! त्यांस काय वाटेल ! लोकांस काय वाटेल ! लोक काय ह्मणतील आणि लोक जें ह्मणतील तें बाबांनीं ऐकिलें म्हणजे बाबाही काय ह्मणतील, ते आपल्यास आतां घरांत पाऊल तरी घालूं देतील काय ! कसचे घालूं देणार ! आणि त्यांनीं काय म्हणून घालूं द्यावें ! आज आपण त्यांचा केवढा अपमान केला ! त्यांना चार लोकांत खालीं मान घालावी लागेल अशी किती भयंकर गोष्ट केली ! त्यांनीं लोकमताला न जुमानतां सगळ्या समाजाविरुद्ध केवढी थोरली तरी एक गोष्ट केली आणि त्या त्यांच्या कृतीचा परिणाम विपरीत करण्याला आपण कारण झालों, अशा स्थितींत ते आपणास आपल्याजवळ घेतील काय ! कसे घेतील ! त्यांनीं घ्यावें अशी अपेक्षा तरी आपण कशी करावी ! कोणत्याही संकटसमयीं आपण त्यांना विचारावें, त्यांची सल्ला पडेल—नव्हे त्यांची आज्ञा होईल—त्याप्रमाणें वर्तन करावें, तें टाकून आपण आपल्या हातांतच सर्व गोष्टी घेतल्या. आपल्या करण्यानें त्यांना काय वाटेल, लोक काय ह्मणतील, लोक अद्वातद्वा बोलूं लागले ह्मणजे बाबांना काय वाटेल, त्यांस किती खालीं पाहावें लागेल, आपल्यासारख्या शिकलेल्या एकंदर सर्व मुलींच्या संबंधानें आधींच लोकांचा किती वाईट ग्रह, आणि त्यांत अशा तऱ्हेनें आपलें उदाहरण—त्याला वाटेल तसें विद्रूप देऊन, व राईचा डोंगर करून दाखविण्याचा प्रसंग आला असतां—ते किती आतुरतेनें पुढें धांवतील, हे सर्व विचार आतां तिच्या मनांत आले. जे विचार घराच्या बाहेर पाऊल टाकण्यापूर्वीं तिच्या मनांत आले असते तर तिजवर हा प्रसंग आला नसता, आणि ते तेव्हां तिच्या मनांत आले नाहींत; बापास काय वाटेल याबद्दलचे विचार आले, परंतु ते आपल्या नवऱ्याबद्दलच्या प्रेमांधत्वानें टिकले नाहींत. त्यांना त्या वेळीं तिच्या अंतश्चक्षूंपुढें क्षणभरही थारा मिळाला नाहीं. परंतु आतां ते कांहीं केल्या जाईनात. आतां जणूं काय ते आपल्या पूर्वींच्या उपेक्षेमुळें संतापून तिजवर सूड उगविण्यासाठीं दुप्पट जोरानेंच तिच्या मनांत घुसून तिच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभे

राहून तिचा सूड घेऊं लागले आणि तिला एकसारखें असें वाटूं लागलें, कीं आतां या दुनियेंत आपण राहूंच नये, आपण आतां आत्महत्या करावी. आपल्या बापानें आतां आपला परित्याग केला–आणि आपण आतां त्याच्याकडे गेलों तर तो करणारच–तर आपली अवस्था किती कठिण! सर्व जन्मभर आपलें आयुष्य कसें–किती हीन व दीन स्थितींत जाणार! किती वाईट अवस्था आपल्याला येणार! त्यापेक्षां एकदम कांहीं तरी साहस करून प्राणघात केला ह्मणजे सर्वच ग्रंथ आटपला.

हा आत्मघाताचा भयंकर विचार तिच्या मनांत आला मात्र आणि तिला कसेंसेंच होऊन गेलें. अंधारांत धडपडत असणाऱ्या एखाद्या पतंगाच्या नजरेस एखाद्या तेजस्वी दिव्याची ज्योत एकदम पडतांच त्याची जी अवस्था होते, तीच अवस्था या वेळीं कमलेच्या मनाची व या विचारांची झाली. वारंवार वारंवार तिनें तो भयंकर विचार आपल्या मनांतून दूर सारण्याचा यत्न करावा आणि त्यानें दुप्पट जोरानें येऊन पुनः तीस पछाडावें, असा प्रकार सुरू झाला, आणि मग काय विचारतां? आत्मघाताच्या राक्षसी विचारानें एखाद्या कोंवळ्या मनास पछाडण्याचाच अवकाश असतो, तो त्यास पूर्णपणें आपलेंसें करून घेतल्याखेरीज राहातच नाहीं. त्यास कितीही दूर सारा, त्याचे तावडींतून सुटण्यासाठीं कितीही धडपड करा, त्याच्या तावडींतून सुटणें केवळ दुरापास्त, केवळ अशक्य होतें. त्या पतंगास जशी त्या दिव्याची लालसा उत्पन्न होते, तशीच लालसा या विचारांत उत्पन्न होऊन दुर्बळ मनास तो आपलेंसें करून घेतो, कधीं सोडीत नाहीं. त्यांतून अबलांच्या मनास हा आत्मघातविचार किती जलद पछाडतो, आणि त्यांचे हातून आपल्याला कृतीचें स्वरूपही किती लवकर पावतो, याचा अनुभव कोणास नाहीं! विरुद्ध पक्षाचे लोक आतां, आपल्या या एकाएकीं, बापास सुद्धां न कळवितां कोणीकडे तरी जाण्याचें, काय काय करून दाखवितील, केवढाले निंद्य असे आरोप आपल्यावर आणतील, केवढालीं कौटाळें त्याच्यावर रचतील, आपल्या बापासंबंधानें, आईसंबंधानें आपल्यासारख्या सुधारकांसंबंधानें, आपल्यासारख्या शिकलेल्या मुली व बायकांसंबंधानें किती नीचपणानें लिहितील आणि तसें त्यांनीं लिहिलें ह्मणजे आपल्या बाबांस व काकांस आणि इतर मंडळीस किती वाईट वाटेल! किती खालीं पाहावें लागेल! एक ना दोन, हजारों विचार–असलेच मनाची स्थिति वाईट करून टाकणारे विचार–तिला घेरूं लागले व दर पावलास आतां आत्महत्येखेरीज या सगळ्यांतून सुटण्यास दुसरा कोणताही आपल्यास मार्ग नाहीं, असें तिच्या मनानें घेतलें. परंतु तें आतां अंमलांत कसें आणावयाचें? आतां आपल्यास या जगांत जिकडे जाऊं तिकडे छीः थूःखेरीज दुसरें कांहीं नाहीं. तेव्हां जगांतून नाहींसें झालें तरच त्यांतून सुटणें शक्य, असें तिला वाटलें आणि आत्महत्येचा तिचा निश्चय तर ठरला. परंतु एखादा नुसता निश्चय होऊन काय उपयोग! तो निश्चय पार पाडावयास साधनें लागतात, त्या साधनांची प्राप्ति कशी व्हावी? एवढ्या रात्रीं एवढा थोरला जीव–तो कांहीं ढेंकणासारखा नव्हे, तर सहज पायाच्या आंगठ्यानें चिरडून टाकला–नष्ट करण्यास तसेंच कांहीं तरी साधन पाहिजे. परंतु आपण ज्या स्थितींत

आहोंत त्या स्थितींत साधन काय असणार? रात्रीची वेळ, अशा वेळीं कोठें अफू मिळणें शक्य नाहीं, कोठें विहीर पहावी तर ती तरी अशा परक्या ठिकाणीं आपणास सहजगत्या कोठें दिसणार? कोणाच्या बंगल्याच्या कंपाउंडांत वगैरे असेल! इतकीं घरें, इतके बंगले या दादरांत आहेत, पण त्यांच्या आवारांत जावें कसें आणि कसें करावें? असे अनर्थापात विचार तिच्या मनांत येऊं लागले. इतक्यांत गाडीची शीट मोठ्यानें वाजलेली तिच्या कानीं पडली आणि ती जागी झाल्याप्रमाणें होऊन वर पहाते, तों आपण स्टेशनाच्या अगदीं जवळ आलों आहों. तिला अतिशय आश्चर्य वाटलें. आपण इतका वेळ चाललों होतों आणि त्या बंगल्यापासून— ज्या बंगल्यांत जाण्यासाठीं आपण इतकें साहस केलें—त्या बंगल्यापासून स्टेशनापर्यंत चालत आलों, याचेंसुद्धां तिला फार आश्चर्य वाटलें. स्टेशनावर आल्याबरोबर तिच्या मनांत एकदम एक भयंकर विचार आला. आपण आपला प्राण देण्यासाठीं जो विचार करीत होतों, त्यास साधन शोधींत होतों तें आयतेंच आपल्यापुढें उभें राहिलें, असें तिला वाटलें. आगगाडीच्या रुळांवर पडून अगर आगगाडी भरधांव चालली असतां डब्याचें दार उघडून उडी टाकून जीव देणें फार सोपें. अशा साधनानें कित्येकांनीं जीव दिल्याचें वर्तमानपत्रांतून तिनें वाचलें होतें, आणि आज आपणावर तसाच जीव देण्याचा प्रसंग आला असतां आपण त्या साधनाच्या अगदीं जवळ येऊन ठेपलों आहों, आतां आपण उशीर कां करावा? आपल्या सध्याच्या स्थितींत हेंच साधन उत्तम आणि त्याचा आतां चटकन् उपयोग करून घेऊन आपल्या या अल्पचरित्राचा आणि त्या अल्पचरित्रांत आपल्यावर आलेल्या अनेक संकटांचा निकाल करून टाकावा, असें तिच्या मनानें घेतलें. अशा वेळीं मन इतकें कांहीं विलक्षण अधु झालेलें असतें, कीं आपलें इष्ट साधण्यासाठीं जें काय सुचेल तें तेव्हांच अंमलांत आणावेंसें वाटतें. त्याप्रमाणेंच तिची या वेळीं स्थिति झाली. आपली दुरवस्था दूर करून यांतून सुटण्यास हाच प्रसंग चांगला, हेंच साधन चांगलें, दुसरें कोणतेंही साधन असें चांगलें व अशा अनायासानें मिळावयाचें नाहीं; असें तिला वाटलें आणि ती कोणत्या उपायानें जीव द्यावा—आगगाडीच्या कंपाउंडांत शिरून कोणास न कळत रुळांवर आडवें पडून राहून जीव द्यावा, कीं आगगाडींत डब्यांत जाऊन बसून गाडी चालू झाल्याबरोबर दार उघडून उडी टाकून जीव द्यावा; कोणतें सोपें जाईल, कोणतें सहज होईल, याच्याबद्दल भवति न भवति मनांत चालली आणि प्रथम ती रुळांवर जाण्यास रस्ता पाहूं लागली. परंतु सगळीकडे कंपाउंड दिसलें. त्यांतून आंत शिरणें शक्य दिसेना. अर्थात् दुसरा उपाय—अशा रात्रीं तरी तोच उपाय—जास्त श्रेयस्कर असें तिला वाटलें आणि तिनें स्टेशनावर जाऊन तिकिट काढून गाडींत डब्यांत बसून मग आपला विचार मनांत आणावा; असाच विचार तिनें कायम केला आणि ती स्टेशनांत गेली. रात्रीच्या गाड्यांतून फार गर्दी नसावयाची. आपण गर्दी नाहीं अशा एका कंपार्टमेंटमध्यें बसलों, तर गाडी चालू होतांच आपल्याला काय करावयाचें

तें चट्कन् करतां येईल, कांहीं अडचण पडावयाची नाहीं, असें तिला वाटलें आणि तेंच तिच्या मनानें घेतलें आणि ती स्टेशनावर गेली. मुंबईकडून येणाऱ्या किंवा मुंबईकडे जाणाऱ्या गाड्या रात्रीं थोड्या, व बऱ्याच अंतरानें जाणाऱ्या असतात. हिला आतां अमक्याच गाडीनें जावयाचें असें नव्हतेंच. जी कोणची गाडी प्रथम येईल, तींत बसावयाचें, आणि आपला कार्यभाग करावयाचा एवढाच विचार खास ठरलेला. तिनें शांतपणें स्टेशनावर जाऊन आतां गाडी केव्हां आहे त्याचा शोध केला. तिला कळलें, कीं गाडीला अद्यापि जवळजवळ एक तास अवकाश असून ती मुंबईकडेच जाणारी गाडी आहे. मुंबईकडे जाणारी नसती, तर तिला बरें वाटलें असतें. आतां तिला मुंबईचा अतोनात तिट्कारा उत्पन्न झाला होता. पुनः त्या मुंबईचें दर्शनसुद्धां नको, असें तिच्या मनास वाटूं लागलें होतें; परंतु आतां काय ? मुंबई काय आणि दुसरें कोणतेंही ठिकाण काय, तिला सर्वच सारखें होतें. आतां आणखी तासा सवातासांत ती या जगास सोडून जाणार होती. परलोक आणि हा लोक यांमधील अंतर आतां तिला एका तासाच्या वर नव्हतें. तेव्हां मुंबईस जाणारीच गाडी प्रथम येणार हें ऐकून प्रथमतः जें वाईट यातलें, तें फार वेळ टिकलें नाहीं. टिकणें शक्यच नव्हतें. तिची तंद्री आतां परलोकाकडे लागली होती. परलोकाकडे लागली होती, असें ह्मणण्यापेक्षां इहलोक केव्हां एकदां सोडीन या विचाराकडे लागली होती, असें ह्मटलें तर विशेष बरें. ती विषण्णचित्त होऊन एका बांकावर बसली. टिकिटें काढण्यास सुद्धां अजून बराच अवकाश होता. टिकिट मास्तर आपली खिडकी लावून तेथेंच टेबलावर घोरत पडला होता. बाहेरचें जग त्यांस त्या वेळीं नाहींसेंच होतें. ती स्वस्थ बसली. स्वस्थ ? स्वस्थ कशी बसणार ! आतां तिला स्वस्थता कोठून येणार ? आतां तिच्या दृष्टीनें तिला एकाच उपायानें स्वस्थता. तो उपाय करण्यास आणखी एक तासाचा अवधि होता. तो तास कसा जाणार ! ती तेथें त्या बांकावर बसल्याबरोबर तिच्या मनांत किती तरी विचार आले–तिच्यासारख्या अल्पवयाच्या मुलीच्या मस्तकांत कधींही कोणाच्याही ठिकाणीं आले नसतील–आपल्या अल्पवयांत आपल्यावर किती अनर्थापात प्रसंग आले व आपण त्यांतून आतांपर्यंत आपल्या आईच्या जिवावर कशा निभावलों; आई वारली, तेव्हां आपण काय काय निश्चय केले, आपल्या सुखास आपण पूर्णपणें आंचवलों, तरी आतां आईच्या पश्चात् आपण आपल्या बापास सुखांत ठेवण्यासाठीं काय काय विचार केले; आपल्या लहान भावाला आईचें फार वेड, त्याला आपण आईच्या जागीं होऊं आणि त्यास आईचें स्मरण सुद्धां होऊं देणार नाहीं, असें वारंवार आपल्या मनाला सांगून आपण त्या दोघांच्याही सुखासाठीं किती प्रकारचे बेत केले, तें सर्व तिला आतां आठवलें. आपण केलें हें फार विचित्र साहस, आपल्या वयांतल्या मुलींनीं कोणत्याही प्रसंगीं केवळ आपल्या एकट्याच्या मतानें कांहीं करूं नये, वडील मंडळींना विचारल्याखेरीज कोणतीही गोष्ट केली, तर पश्चात्तापास कारण होते. त्यांतून आपले बाबा इतर मंडळीप्रमाणें नव्हेत. जगांतील इतर चार बाप आपापल्या मुलींना वाढवितात त्याप्रमाणें आपल्यास त्यांनीं वाढविलेलें

नव्हे. त्यांनीं आपल्यास फार निराळ्या तऱ्हेनें वाढविलें. त्यांच्याशीं मुळींही प्रतारणा करणें आपल्यास रास्त नव्हतें; परंतु आपण दुसऱ्या कांहीं कारणानें आंधळे होऊन तशी प्रतारणा केली. ज्यानें आपण लहान असून आपल्याशीं कधीं प्रतारणा केली नाहीं, ज्यानें आपल्यास जीवाच्या पलीकडे मानलें, आपल्याकरितां वाटेल तीं दुःखें सोसिलीं, त्याच्याशीं आपण प्रतारणा केली, तेव्हां झाली ही शिक्षा योग्यच झाली. नव्हे, आपण आतां त्या शिक्षेची परिपूर्णता करून घेण्याचें मनांत आणलें आहे, तेंच बरोबर आहे. अशा आपल्या पित्याशीं कृतघ्नता करणाऱ्या पातक्यास आत्मघाताखेरीज दुसरें प्रायश्चित्तच नाहीं. तेंच प्रायश्चित्त आपण घेतलें पाहिजे. आपण आपल्या योग्य कर्तव्यास जागलों नाहीं, भलतेंच कार्य आपलें कर्तव्य समजून, योग्य कर्तव्यास दूर सारून दुर्विकाराच्या स्वाधीन झालों. पुरता विचार केला नाहीं. कसाही प्रसंग येवो, कसेंही संकट येवो, आपण आपल्या बापाच्या जवळ होतों, तर त्यालाच विचारून काय करावयाचें तें करावयास पाहिजे होतें. परंतु दुर्विचारांनीं आंधळी झालें, विकारांनीं व्याप्त झालें, जें कर्तव्य नव्हे तें कर्तव्य समजलें, माणिक समजून निखारा हातीं घेतला; तर आतां हात भाजला म्हणून रडत बसण्यांत काय अर्थ आहे ? आपण आपल्या वडिलांस खाईंत लोटलें ज्या हातांनीं त्यांची सेवाचाकरी करून त्यांच्या उतारवयांत त्यांस दुःखापासून अत्यंत अलिप्त ठेवण्यासाठीं झटावयाचें, आपल्या सत्कृत्यांनीं त्यांस क्षणोक्षणीं आनंद द्यावयाचा, त्यांस अभिमान उत्पन्न होईल आणि आपण आजपर्यंत जगाच्या आधारांस सोसून कंठिलेल्या दिवसांचें चीज झालें म्हणून त्यांस परमानंद होईल असें करावयाचें, त्याच हातांनीं आपण त्यांस दुःखार्णवांत लोटलें, त्यांच्या अंगावर निखाऱ्यांचा वर्षाव केला. त्यांच्या तोंडास काळें लावलें, लोकांनीं त्यांच्या उतारवयांत त्यांची छीः थूः करावी असें काम केलें, असें तिच्या मनांत येऊं लागलें. तिचें मन तिला अतोनात खाऊं लागलें. तिची अत्यंत निर्भर्त्सना करूं लागलें. जगांत आपल्याइतकी पातकी आपल्यापूर्वीं कधीं कोणी झाली नाहीं, हल्लीं कोठें अस्तित्वांत नाहीं आणि पुढें कधीं होणार नाहीं, असें तिच्या मनानें पक्कें घेतलें. नवऱ्याचीं पत्रें येऊन अपरात्रीं घर सोडतांना तिनें आपण करितों यांत कांहीं वावगें नाहीं. त्यावेळेपुरतें कांहीं वावगें दिसलें, तरी अखेरीस तें सर्व ठीकच होणार; आपणास त्याबद्दल कोणी कधीं नांवें ठेवणार नाहीं, असें जितक्या जोरानें तिला वाटलें व त्यावेळीं तसें मनास वाटण्यास जितक्या वेगानें त्या बाजूचे विचार तिच्या मनांत येत होते, त्याच्यापेक्षां दुप्पट जोरानें त्याच्या अगदीं उलट विचार आतां तिच्या मनांत उद्भवूं लागले. एकदां पाणी सळसळूं लागलें, म्हणजे त्यांत उत्पन्न होणारे बुडबुडेसुद्धां इतक्या वेगानें येत नसतील, इतक्या विलक्षण वेगानें आतां तिच्या मनांत आत्मनिंदापर व आत्मघातास उद्युक्त करणारे विचार येऊं लागले. त्यावेळीं दुसरें तिसरें कांहीं नाहींच. आपण अत्यंत वाईट कर्म केलें, आतां त्याचें प्रायश्चित्त भोगावयाचें, तर तें देहांतप्रायश्चित्तच शक्य, दुसरें प्रायश्चित्त शक्यच नाहीं, असें तिच्या मनानें घेतलें आणि तिनें त्यासंबंधीं विचारांत आपणास

गर्क करून घेतलें. आपण आपलें काळें तोंड घेऊन परत आपल्या बापाकडे जावें, त्यांनीं दया करून जरी आपल्यास पुनः आपल्या पंखांखालीं घेतलें, तरी काय! लाजिरवाणें जिणेंच नव्हे काय! आपल्याला एकट्यालाच लाजिरवाणें नव्हे तर सर्वांना लाजिरवाणें. बाबांना स्वतःला, सगळ्या त्यांच्या मंडळींना लाजिरवाणें! असलें लाजिरवाणें जिणें ठेवून करावयाचें काय? त्यापेक्षां त्याचा एकदांचा अंत केलेला काय वाईट? एकदांचा अंत करूनच टाकावा. जो प्रकार खरोखर झाला तो कधींच कोणास खरा वाटणार नाहीं. ज्यांच्याकरितां तो केला, त्यांनीं तर काय कठोर शब्द उच्चारले, त्यांनींच त्याचा निकाल झाला. आपल्या निरपराधीपणाबद्दल, आपल्या निर्मलत्वाबद्दल त्यांची आतां खात्री होणार कशी? त्यांची खात्री झाली नाहीं. नाहीं, आपण अत्यंत पापी अशी त्यांची उलट खात्री झाली असतां इतरांना तरी आपला निर्मलपणा कसा दिसणार? तो आपण त्यांच्या निदर्शनास कसा आणून देणार? तें कांहीं नाहीं. जन्मभर लाजिरवाणें तोंड घेऊन राहण्यापेक्षां, आणि आपल्याबरोबर इतरांनाही सारा जन्म लाजिरवाण्या स्थितींत घालविण्यास लावण्यापेक्षां आपण नष्ट व्हावें हेंच उत्तम. चार दिवस आपल्या बाबांस, आपल्या भावास, कदाचित् आपल्या इष्टमित्रांस वाईट वाटेल, परंतु लागलीच, झालें तेंच बरें झालें, असें त्यांस वाटेल. अनेक प्रकारें आपल्या अत्यंत करुण निश्चयाला अनुकूल असे विचार करीत तिनें तो तास घालविला. घालविला कसचा, गेला! लोक तिकिटें घेण्यास उठले. ती सावध होऊन तिनेंही मुंबईचें तिकिट घेतलें, आणि ती बायकांच्य डब्यांतील एका रिकाम्या कंपार्टमेंटमध्यें शिरून पलीकडल्या दाराशींच बसली.

---

# प्रकरण ७१ वें.

## नको त्याचेच पाय धरावे लागले!



आमची नायिका त्या डब्यांत बसली, तेव्हां तिचें पुढें काय झालें हें जाणण्याची वाचकांस इच्छा होणें साहजिकच आहे! परंतु तिच्या हकीकतीशीं संबंध असणाऱ्या दुसऱ्या एकदोन पात्रांची हकीकत त्या वेळेपर्यंत आणून मिळविल्याखेरीज तिची पुढची हकीकत सांगतां येत नाहीं. सबब वाचकांनीं कृपा करून धीर धरून आमचेबरोबर थोडें पाठीमागें चलावें; म्हणजे कांहीं हकीकत त्यांचे नजरेस आणावयाची ती आणून पुनः त्यास कमळेच्या त्या डब्यांत आणून सोडूं.

काकासाहेबांची पत्नी आणि काकासाहेब यांचा दागिन्यांचे बाबतींत झगडा सुरू झाला आणि तिन्हाइतांच्या घरांत

तमाशा होण्याची पाळी आली, हें वाचकांस आठवत असेलच. दागिन्यांबद्दलचा आरडाओरडा आतां जर झाला, तर आपलें सगळेंच भांडवल बाहेर पडून आपली रिकामी फजिती होईल; तेव्हां हें कांहीं चांगलें नव्हे, आपण आपल्या श्वशुरांकडे जाऊनच काय बोलावयाचें तें बोलावें, इथें तिऱ्हाइताच्या घरीं बोलल्यानें सर्व फजितवाडा होईल, असा विचार करून त्यांनीं आपल्या कुटुंबास शांत करण्यासाठीं "कांहीं नाहीं. उगीच मला शंका आली, त्यांनीं कांहीं केलं नसेल; पण त्यांनीं कुठें नेऊन वगैरे ठेवलं असेल, तर तिथें लबाडी झाली असेल, अशा शंकेनं विचारलं. त्यांत रागावण्याचं कांहीं कारण नाहीं. तुला विचारण्यापेक्षां त्यांनाच प्रत्यक्ष विचारणं तें चांगलं, पण त्यांच्यापर्यंत जाण्यापूर्वी उगीच छडा काढावा म्हणून विचारलं."

"ह्मणे रागावण्याचं कारण नाहीं!" त्यांचें कुटुंब त्वेषानें ह्मणतें. "मग असं कशाला विचारावं? त्यांनीं कुठें ठेवले होते का? अजून तुमचे दागिने नेऊन ठेवून त्यावर पैसे आणून खाण्याइतकी त्यांना नाहीं आली स्थिति बरं कां! त्यांना पगार मिळतो आहे. श्रीमंतांच्या घरीं मुलगी कधीं देऊं नये, असं ते नेहमीं माझ्या लग्नाच्या आधीं ह्मणत, तें अगदीं सुद्धां खोटं नाहीं. आपल्या पैशाच्या जोरावर ते कोणावर काय आळ घेतील आणखी काय नाहीं; दुसऱ्या कोणाचे इथें दागिने ठेवले होते कीं काय, असं कांहो तुह्मी विचारलंत? कांहीं दागिने बदलले आहेत का त्यांत कांहीं कमी भरले? झालं तरी काय? गरीब आईबापं असलीं तर आपलं वाटेल तसं त्यांना बोलायंनू वाटेल तें कुभांड त्यांच्यावर रचावं!"

"अग हो! हो! पण नुसतं विचारलं, तर झालं काय! लागलीच कुभांडन् बिभांडन् ह्मणायला काय झालं? कांहीं तरी पाणी मुरतं आहे, खाई त्याला खवखवे असंच खरं. जर त्यांनीं कुठें नेऊन ठेवले नव्हते, तर तुला इतकं एकदम संतापायला काय झालं?"

"काय झालं ह्मणजे? माझ्या बाबांबद्दल धडधडीत जर तुम्ही असल्या शंका घेऊन वाटेल तसं बोलाल तर मी बरीं ऐकून घेईन? काय झालं आहे? तुह्माला काय शंका आली आहे मला सांगा, म्हणजे मी तुह्माला त्यांतलं सगळं सांगतें. वन्सांच्या ताब्यांत हे सगळे दागिने होते. त्यांचंनू त्यांच्या शास्त्रीबोआंचंच हें सगळं कृत्य असेल; नाहीं तर माझ्या माहेरीं कांहीं कोणी दागिन्यांला तुमच्या हात सुद्धां लावला नाहीं. वन्सांना दोनदां तीनदां मीं त्या शास्त्रीबोआंच्याजवळ दागिने देतांना पाह्यलं, त्यांचंच संगनमत होऊन कांहीं तरी हें झालं आहे."

आपल्या कुटुंबाचें भाषण ऐकतांच, विशेषतः आपल्या बहिणीचें नांव ज्या तऱ्हेनें उच्चारलें गेलें, तें ऐकतांच त्यांस कसेंसेंच झालें. ती आपली बहीण असें कांहीं दागिन्याच्या बाबतींत करील अशी त्यांची मनोदेवता मुळींच सांगेना; आणि आपली बायको आपल्या बहिणीवर असला विलक्षण आरोप करते आहे, हें पहातांच त्यांस संताप येऊन ते एकदम म्हणतात, "पुरे. पुरे. आतां शहाणपणाचे तारे फार तुटूं लागले, बरं. आतां माहेरीं रहाणं पुरे झालं का नाहीं? का अजून कांहीं दिवस राहण्याची इच्छा आहे? मी तर परवांच्या दिवशीं येथून जाणार."

"जाणार तर जावं. माझ्या नानां-

त्याबद्दल तुम्ही असं कां विचारलं तें आधीं मला सांगा. त्यांनीं माझं लग्न करून दिलं तें कांहीं अशीं त्यांच्यावर कुभांडं याचीं म्हणून का काय ? काय बाई चमत्कार तरी, सगळा वेळ दागिने दागिनेन् पैसा पैसा ? आतांशा पैसा कसान् कोणीकडे जातो आहे, तें माझ्या कानीं आलं आहे. आपल्याला वाटत असेल, कीं मी लहान आहे, मला कांहीं समजत नाहीं, माझ्या कांहीं कानीं येत नाहीं म्हणून; पण तसं नको वाटायला; मला सगळं समजतं, आणखी सगळीकडे माझं लक्ष्य असतं. त्याखेरीज का मी वन्सांचं थोतांड सगळं बाहेर काढलं तें ! काय झालं आहे दागिन्यांचं ? आणखी तुह्मी मला कां विचारलंत, नानांनीं दुसरीकडे कुठें दागिने ठेवले होते का म्हणून ? तें कांहीं मला ठाऊक नाहीं, पण जर कांहीं अफरातफर झाली असली, तर ती माझ्या माहेरीं नानांच्याकडून झाली नाहीं. आपल्या त्या होत्या ना बहिणाबाई, त्यांनींच गुंड-शास्त्र्यांच्या नादानं केली असेल. अगदीं-सुद्धां शंका नको. मी पाहिजे तश्शी खात्री करून देईन. आणखी आपल्या बहिणीचं कृत्रिम लपवून माझ्या नानांवर जर उगीच तुह्मांला नांव घ्यायचं असलं तर मी कांहीं गप्प बसायची नाहींन् नुसतं ऐकून घ्यायची नाहीं. होय तशी जाय ? का कोणाला ठाऊक आतांशा आपल्यालाच कशाला तरी हजारों रुपये लागताहेत, ते काढायला कुठें गहाण टाकून तिथें कांहीं झालं ! " आपल्या पत्नीची ती कल्पकता पाहून काकासाहेब अगदीं थंडगारच पडले. आपण भलत्याच ठिकाणीं हा प्रश्न विचारला, याबद्दल त्यांस पूर्णपणें पश्चात्ताप होऊन त्यांनीं मोठ्या मिनतवारीनें हो हो करून कसें तरी पत्नीक्रोधास शांत केलें आणि परत माहेरीं लावून दिलें.

परंतु दागिन्यांच्या संबंधानें त्यांच्या अंतःकरणांत तळमळ राहिली ती राहिलीच. त्या तळमळीनें त्यांस दुसरे दिवशीं अर्थातच स्वस्थ बसूं दिलें नाहीं. पत्नीनें जरी एवढें अकांडतांडव केलें, तरी आपण एकवार सासऱ्यापर्यंत जाऊन कायतो निकाल करूनच घ्यावा, असा त्यांनीं निश्चय केला, व ते तिसरे दिवशीं प्रातःकाळींच नाना म्हणजे त्यांचे सासरे यांजकडे जाऊन आपण दागिने मध्यंतरीं कोणाजवळ ठेवावयास दिले होते काय किंवा गहाण वगैरे टाकिले होते कीं काय, असें स्पष्टपणें विचारलें. तें त्यांनीं विचारलें मात्र आणि त्यांच्याभोंवतीं जो का म्हणतां भडका उडाला आहे ! चोहों बाजूंनीं वणवा पेटून मध्यें एखादें सावज सांपडावें त्याप्रमाणेंच आमच्या काकासाहेबांची अवस्था झाली. एकीकडून सासरे, एकीकडून सासू, एकीकडून मेहुणे आणि एकीकडून बायको, अशा चार तोफांचा भडिमार त्यांच्यावर सुरू झाला. सगळ्यांनाच मी तोफांची उपमा दिली, हें बरोबर नव्हे; कारण त्यांपैकीं एक विजेच्या कडकडाटाप्रमाणें—किंबहुना डायून्यामाईटप्रमाणें त्यांची दुर्दशा उडवीत होती, ती त्यांची पत्नी होय. दादासाहेबांस छळण्यांत अगदीं अग्रगण्यत्व घेणारे व सगळ्या गांवांत दुष्टाचार्य ह्मणवून घेऊन ज्याला त्याला अगदीं तुच्छ करून टाकून अहंपणाची कमाल करून सोडणारे काकासाहेब, इतक्या नम्रपणानें ती सरबत्ती सोसून घेतील ही कल्पनासुद्धां कोणास होणें शक्य नाहीं. पण त्यावेळीं तो प्रसंग प्रत्यक्ष घडलाच होता. तो पहाण्यास त्यांचे गांवचा

कोणी असता, तर त्यास आपल्या गांवचे दुर्वासाचार्य काकासाहेब हेच, असें वाटलें सुद्धां नसतें. आणि गुंडशास्त्री किंवा तसेच दुसरे कोणी आश्रित यांनीं तर शपथेवरच असें म्हटलें असतें, कीं आमचे काकासाहेब ते हे काकासाहेब नव्हतच. ते काकासाहेब लय पावले. कसेंही जरी त्यांनीं म्हटलें असतें, तरी एवढी गोष्ट खरी, कीं काकासाहेब अगदीं गरीबपणें सर्व भडिमार सोसून घेत होते. कदाचित् त्यांस बोलण्याची इच्छा होत असेल, परंतु त्यांस बोलण्यास वावच मिळण्याचा संभव दिसला नाहीं. चार माणसें एकदम कडकड कडकड बोलूं लागलीं, म्हणजे त्यांचा सामर्थ्यैकरून जो शब्द होतो, तो लिहून दाखविणें केवळ अशक्य, यामुळें चौघांचीं चार वाक्यें लिहून देतों. पण एवढेंच लक्ष्यांत धरावें, कीं हीं वाक्यें एकें वेळीं वर सांगितलेल्या चार व्यक्तींनीं एकदम काकासाहेबांवर सोडलीं.

सासरेः—लोक मला नको म्हणत असतां मी आपल्याला मुलगी दिली, त्याचं आज सार्थक झालं. आपण चोर म्हटल्यावर आणखी काय पाहिजे ! कांहीं विचार करून तरी यायचं होनंत !

सासूः—हो ! हो ! तर दागिने गहाण टाकले, मोडले, विकले आणखी आम्ही आपलीं पोटं भरलीं. श्रीमंत म्हाताऱ्याला मुलगी द्यायची कशाला नाहीं तर ? काय चमत्कार तरी बाई !

मेहुणाः—बेअब्रूची फिर्याद करून कोर्टांत तुमच्या प्रश्नाचं उत्तर दिलं पाहिजे. पण नाना पडले गरीब, तेव्हां मला बोलतां येत नाहीं, नाहीं तर मेव्हणा बिव्हणा कांहीं मनांत नसतं आणलं. आपणच किमयाच्या पायीं घरदार बुडवून आतां इथें आलां आहां मला ठाऊक नाहीं का ?

बायकोः—काल सांगितलंना मीं, तुम्ही असलं बोलूं नका म्हणून ! पण आलांतच पुनः बोलायला. तुमच्या बहिणीनं त्या गुंडशास्त्र्याला दागिने देऊन कांहीं तरी अफरातफर केली समजलांत ? जा तिच्याजवळ आणखी त्याच्यापाशीं शोध करा...............

ही वाक्यपरंपरा उगीच मासल्याला दिली. कित्येक वाक्यें याच्यापेक्षां इतकीं कठोर व कडक होतीं कीं विचारूंच नये ! आणि एवढ्या मोठ्यानें एकंदर भाषणें चाललीं होतीं, कीं चाळींतली सर्व मंडळी दाराच्या भोंवतीं भोंवतीं गोळा होऊं लागली. काकासाहेब कांहीं कमी माणूस नव्हे, पण त्याला बोलायला फुरसतच मिळेना; आणि कांहीं शब्द त्यानें उच्चारलेच तर ते त्या चौकडीच्या आवाजांत पार बुडून जात, बाहेर उमटेचनात. ते शब्द म्हणजे जर बंदुकांच्या गोळ्या किंवा तितक्या सुऱ्या असत्या, तर बिचाऱ्या काकासाहेबांच्या अंगाला भोंकें पडून त्यांच्या अंगाचें एक गांधिलमाशांचें पोळेंच बनलें असतें; अथवा राई राई एवढाले सर्वांगाचे तुकडे झाले असते, कांहींसुद्धां शिल्लक राहिलें नसतें. परंतु त्यांच्या सुदैवानें ते शब्द हे शब्दच होते, गोळ्या नव्हत्या किंवा सुऱ्याही नव्हत्या. त्यांस काय बोलावयाचें होतें, तें सुद्धां त्यांस बोलावयाला सवड झाली नाहीं. आतां आपण येथून जाण्यापलीकडे आपल्याला कांहीं करतां येणार नाहीं अशी त्यांच्या मनाची खात्री झाली; आणि त्यांनीं हळूहळू आपला पाय काढण्याचा विचार केला. पुनः एकवार कांहीं बोलण्याचा यत्न त्यांनीं केला, परंतु एक शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडतो न पडतो, तोच त्यांची

राळ उडाली. शेवटीं त्यांनीं तेथून पाय काढलाच. पाय काढण्यापूर्वी त्यांनीं, "मी आज नाहीं तर उद्यां गांवीं जाणार, यायचं असलं तर या, नाहीं तर मला जरूर नाहीं. पण माझे दागिने घेऊन आलीस तरच घरांत घेईन, नाहीं तर घरांत पाऊल सुद्धां घालूं देणार नाहीं." असें पत्नीस उद्देशून ह्मणण्याचें धैर्य केलें. पण त्याला उत्तर काय येतें हें ऐकण्यास थांबण्याचें कांहीं धैर्य नव्हतें. तेवढें तें बोलून त्यांनीं यःपलायतेच केलें. दुसरें काय करणें त्यांस शक्य होतें!

काकासाहेब सर्वथा नडले. सराफानें पंधरा दिवसांची मुदत दिली. त्या मुदतींत जर रक्कम गोळा झाली नाहीं तर कसें होईल, या विचारापेक्षां दागिन्यांत जी लुच्चेगिरी झाली आहे, ती कोणी कोठें केली, तें शोधून काढून लुच्चास शिक्षा देऊं इकडेच त्यांचें लक्ष्य गुंतलें. दोन तीन दिवसांनीं एकदां रस्त्यांतच त्यांस सराफ भेटला, तेव्हां त्यानें मी पंधरावे दिवशीं विश्वासघाताची फिर्याद लावल्याखेरीज राहणार नाहीं बरं. त्यांतले तीन दिवस गेले. तुह्मी म्हणाल, मी आणखी मुदत देईन तर तें स्वप्नांत सुद्धां आणूं नका. तुमच्यासारख्या प्रतिष्ठितांना मोकळं सोडलं, तर अगदीं वाईट. मी तेव्हांच पोलिसांत वर्दी देणार होतों, पण ह्मटलं जाऊं द्या. आपली रक्कम येते आहे, तर अगदींच निष्ठुरपणा कशाला करा? पण तुम्ही अजून इकडे तिकडेच हिंडतां आहां, तेव्हां मला वाटलं मला तो प्रसंग येणार. शिवाय, तुमच्यासारख्यांना दोन चार हजार रुपयांसाठीं पंधरानू वीस दिवसांची मुदत कां लागावी? आणखी मुंबईसारख्या शहरांत! छे, छे, आपण इथल्या आपल्या श्रीमंत स्नेह्यांना अशाच तऱ्हेनं फसवलं असेल, म्हणून असा प्रसंग आला दुसरं काय. असे त्याचे वाग्बाण त्यांस मुकाट्यानें सहन करणें भाग पडलें. फक्त "आपण आम्हांला पंधरा दिवसांची मुदत दिली आहे. तिच्या आंत आपण म्हणतां तितकी रक्कम आपल्या पदरांत जर पडली नाहीं, तर बोला महाराज! सध्याच कां उगीच बोलतां?" असें ओशाळवाण्या तऱ्हेनें बोलून स्वारी त्याचेपासून निसटली. इतकें गळ्याशीं लागलें होतें, तरी त्या दागिन्यांच्या बाबतींत आपणास कोणी फसवलें, हें छेडून काढून त्यास शिक्षा करण्याची आशा त्यांस सुटली नाहीं. आणि मुंबईस जरी आपणास रोख रक्कम आज मिळत नाहीं, तरी आपण आपल्या गांवीं गेलों म्हणजे आपल्या गांवच्या मारवाड्याकडून चार घटकेंत पांच सात हजार रुपये आणूं; दुसरी मंडळी आहेत, आपण त्यांचेजवळ उगीच तोंड उघडण्याचा अवकाश, ही घमेंड स्वारीस होतीच. यामुळें त्यांनीं दिवसगत चालविली. इकडे दागिन्यांच्या बाबतींत मुळींच कांहीं शोध लागेना. तिकडे आपणास ज्यानें इतक्या रकमांस फसविलें व ज्याच्या नादीं लागल्यानें इतके आपण बुडालों व या स्थितीला आलों, त्या बिंदुमाधव पांड्याचाही कांहीं पत्ता लागेना. बायकोला त्यांनीं आपण परवां जाणार म्हणून सांगितलें, पण त्यावर दोन परवां झाल्या. 'मला कोणी घरांत येऊं देत नाहीं, का मीच कोणाला घरांत येऊं देत नाहीं, तें पहा,' असें ह्मणून बायको त्यांस नकळत आपल्या आईस घेऊन गांवीं जाऊन राहिली. शेवटीं पंधरा दिवसांपैकीं सहा दिवस राहिले. म्हणजे

जाऊन एक दिवस राहून खटपट करून रक्कम परवून घेऊन परत येण्याइतकेंच, किंबहुना एखादा दिवस अधिक इतकाच अवकाश राहिला. तेव्हां त्यांस तो सराफ आणखी एकवार भेटून त्यानें आणखी एकदां त्यांची इज्जत केली आणि वारंटानें पकडण्याचें चित्र त्यांचे पुढें उभें केलें. तेव्हां स्वारी घाबरून आपल्या गांवीं गेली.

स्वारी घरीं जाते, तों कचाकची उभी होतीच. परंतु आतां त्या कचाकचीकडे लक्ष्य देण्यास त्यांस सवड नव्हती. त्यांच्या अंतःकरणांत रकमेसंबंधानें एका बाजूनें खात्री, आणि एका बाजूनें धाकधूक वाटत होती. आपल्या पत्नीच्या आधीं येण्यानें आणि कारकुनाच्या मूर्खपणामुळें सगळ्या गांवभर लोकांत काय चर्चा झाली होती याचें त्यांस स्वप्नही नव्हतें. प्रथम तर असें वाटलें, कीं मोतीचंद गुजरास, पंथाराम वाण्यास किंवा आणखी कोणास निरोप पाठवून बोलावून आणून रकमेची थोडे दिवस जरूर आहे एवढें सुचविलें कीं पुरे, रक्कम आलीच. पण त्यांतल्या त्यांत "न जाणों नच आली तर!" असेंही त्यांच्या मनास वाटे. पण हें वाटवणारा ध्वनि इतका सूक्ष्म होता, कीं त्या ध्वनीचें त्यांस कांहींसुद्धां वाटलें नाहीं. शेवटीं त्यांनीं एका गुजरास निरोप पाठविला व तो आला. तेव्हां त्याजवळ रकमेची गोष्ट काढली. तेव्हां पहातात, तों त्यानें चटकन्, "हो आतां आणून देतों!" असें ह्मणण्याच्या ऐवजीं थोडें घुटमळून, 'काय करावं, कालच संध्याकाळीं मी नवा माल आणण्यासाठीं भरणा केला. आतां जवळ रुपये १०० सुद्धां शिल्लक नाहींत,' असें त्यानें उत्तर दिलें. "आपला मोठा भरंवसा वाटला होता. मला कधीं गरज लागायची नाहीं, पण लागली, आणखी आपल्याजवळ मी शब्द टाकायचा नाहीं, तो टाकला. त्याला हें उत्तर येईल असं वाटलं नव्हतं," असें काकासाहेबांनीं म्हणून दाखविलें. परंतु त्या खमंग गुजरानें अगदीं काकुळतीची वाणी काढून दिलगिरी दाखविण्यापलीकडे कांहींसुद्धां भाषण केलें नाहीं! थोड्याच वेळांत दुकानांत कोणी नाहीं म्हणून उठूनही गेला!

काकासाहेबांनीं एकामागून एक सर्व गुजरांना, मारवाड्यांना व आणखी ज्या कोणाजवळ रक्कम असेल असें वाटलें होतें, त्यांना बोलावून आणून रकमेची गोष्ट काढली. परंतु काकासाहेब कांहीं तरी वेड्या नादाला लागले आहेत, आपण रक्कमच दिली, तर आपली रक्कम गुंतून पडेल, परत येणार नाहीं, अशी सर्वांची गांवांत पक्की समजून झाली असल्याकारणानें काकासाहेबांस कोणी ह्मणून 'हो' कार दिला नाहीं! आतां काय करणार? सहा दिवसांपैकीं दोन दिवस अशांत गेले. आतां फक्त चार दिवस राहिले. एकानें तर एखादा इनाम गांव गहाण ठाल, तर रक्कम कोठून तरी आणून देतों असें सुचविलें. काकासाहेबांच्या स्वाभिमानाला त्या त्याच्या सूचनेनें केवढा थोरला तरी धक्का बसला! ते लाल झाले. पण नुसतें संतापून किंवा अगदीं इंगळाप्रमाणें लाल होऊन थोडेंच काम होत असतें! आपल्याशींच चरफडून मग गिळावे लागले. त्यांनीं त्या माणसास पुष्कळ शिव्या दिल्या, 'पैशाला मी अजून इतका महाग झालों नाहीं, शब्द टाकीन तिथून पैसे काढीन, गांवच्या लोकांची उगीच परीक्षा पाहिली,' असें ह्मणून त्या गृहस्थास

तेथून लावून दिलें. अशांत आणखी एक दिवस गेला. आतां तीनच दिवस उरले. काय करणार ! जर आतां रक्कम न उभी राहिली, तर आपल्यावर केवढा प्रसंग येणार आणि काय अवस्था होणार याची कल्पना होईना; नव्हे भयंकर कल्पना होऊं लागली. शेवटीं कांहीं तरी गहाण टाकून पैसे काढण्यासेरीज दुसरा मार्ग नाहीं, हें त्यांना स्पष्ट दिसूं लागलें परंतु आपल्या इस्टेटीपैकीं कांहीं भाग गहाण टाकावयाचा, हा विचार मनांत येतांच त्यांच्या अंगावर शहारे आले. त्यापेक्षां काय वाटेल तें दुसरें हीन कर्म केलें तरी हरकत नाहीं, असें त्यांच्या मनांत आलें. हे विचार त्यांच्या मनांत चालले असतां संध्याकाळचा समय झाला होता. ते आपल्या वाड्यांत खिडकींत बसले होते. अशा स्थितींत त्यांची नजर रस्त्यावर गेली, तों दादासाहेब देवदर्शन घेऊन परत आपल्या बिऱ्हाडाकडे जातांना त्यांस दिसले. या म्हाताऱ्याजवळ खूप पैसा आहे. यांच्याजवळ गोष्ट काढण्याला तरी काय हरकत आहे ? असा प्रश्न त्यांच्या मनांत येऊन त्यांच्या निर्लज्ज मनानें, 'कांहीं हरकत नाहीं, व्यवहार करावयाचा. मागतील तें व्याज द्यायचें-मागावें' असा निश्चय करून ते त्यांजकडे जाण्यास उठले. ज्यांस आपण छळलें, त्यांच्याजवळ मदत मागण्यास जाण्याबद्दल फार तर क्षणभर त्यांच्या चित्तानें अनमान केला असेल नसेल. गरजू काकासाहेबांस लज्जा व अभिमान यांनींही त्या वेळीं सोडलें !

---

# प्रकरण ७२ वें

## पुन्हां तेंच !



गरज नसेल तेव्हां एखाद्यावर दुगाण्या झाडाव्या आणि गरज लागली कीं जाऊन त्याचे पाय धरावे, हा काकासाहेबांचा नेहमींचाच कुळाचार. परंतु ज्यांस आपण परोपरीनें छळलें, ज्यांचा मोठेपणा सहन न होऊन आपण धार्मिकपणाच्या मिषानें आपण ज्यांचा उपमर्द केला व करविला, जे आपल्यावर फिर्याद करण्यास उठले असें ऐकतांच आपलें धाबें दणाणून जाऊन, आपण त्यांच्या मागोमाग मुंबईस आलों, जे केवळ मनाच्या थोरपणामुळें आपल्यावर फिर्यादभर्यादि कांहीं करीत नाहींत, असें कळलें असतां ज्यांना आपण नामर्द ठरविलें, त्यांच गृहस्थाकडे आपण आज आपल्या गरजेच्या वेळीं जाण्याचें मनांत आणतों आहों, हें आहे तरी काय ! हा प्रश्न काकासाहेबांच्या मनांत आला नाहीं, असें जर मी म्हटलें, तर काकासाहेबांच्या इतका निर्लज्ज प्राणी

या जगावर दुसरा कोणीच नाहीं असेंच ज्यास त्यास वाटेल; परंतु तसें नव्हे. काकासाहेब इतका निर्लज्ज नव्हता. दादासाहेबांकडे जावें हा विचार मनांत आल्यानंतर दुसरा विचार मनांत येण्यापूर्वी आपण त्यांच्याकडे गेलों असतां ते आपल्याशीं कशा तऱ्हेनें वागतील ? ते आपल्यास मदत करतील काय ? असे विचार त्यांच्या मनांत आल्याखेरीज राहिले नाहींत. परंतु विचार किंवा प्रश्न उभे राहिले, ते "आपण कोण्या तोंडानं जावं ?" "त्यांनीं आपल्याशीं सभ्यपणानं वागावं असं आपलं त्यांच्याशीं वर्तन झालं काय ?" असे नव्हते, एवढें मात्र ध्यानांत घेण्याजोगें आहे. "आपण गेलों असतां, आपल्याशीं ते नीट बोलतील काय ?" "आपल्याला मदत करतील काय ?" एवढेच प्रश्न त्यांच्या मनांत उभे राहिले आणि त्याच्याबद्दल कांयती विवेचना त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. परंतु विवेचनेला त्यांनीं फारसा वेळ दिला नाहीं. आपण दादासाहेबांच्या घरीं जाण्यापेक्षां त्यांसच आपल्या येथें बोलावून आणून विचारावें म्हणजे अधिकउणें बोलण्याचें त्यांच्या मनांत आलेंच, तरी ते माझ्या घरीं असल्याकारणानें बोलणार नाहींत, असा विचार करून त्यांनीं आपल्या एका कारकुनास "धांवत जाऊन दादासाहेबांस मी जरा बोलावतों आहें म्हणून सांग," असें म्हटलें. त्या त्यांच्या सांगण्यानें त्या कारकुनास सुद्धां अत्यंत आश्चर्य वाटलें व आपल्या यजमानांनीं सांगितल्याप्रमाणें करण्यापूर्वी तो आपले नेत्र विशेष विस्तृत करून त्यांजकडे पाहूं लागला. तेव्हां यजमान एकदम अंगावर येऊन "असा पाहतोस काय भ्रांतिष्टासारखा !. पहातोस काय माझ्याकडे ! ते तितके लांब जातील-ना ! जा पळ आणखी ते जर गुटमळायला लागले, तर त्यांना सांग, कीं 'मीच कांहीं फार महत्त्वाच्या खासगी कामाकरितां आपल्याकडे येणार होतों; परंतु जिन्यांतून उतरतांना सकाळीं माझा पाय एकाएकीं लचकून फार दुखूं लागल्यामुळें मला येतां येत नाहीं. आपण अनमान करूं नये.'—जा. जा. बावळ्यासारखा माझ्याकडे पहात उभा राहूं नको. ते आपल्या घराशीं पोहोंचले असले—नाहीं घरांत गेले असले—तरी त्यांना हा निरोप जाऊन सांग." असें जोरानें सांगितल्यानंतर अर्थातच त्या कारकुनाला जावें लागलें. परंतु तो अत्यंत आश्चर्यचकित झाला होता आणि आपले यजमान आज महिना दोन महिने येथें नव्हते, त्यामुळें सुखांत राहिलेल्या दादासाहेबांस पुनः आतां छळूं लागणार, कीं ज्या गरजेसाठीं आतांपर्यंत गांवांतल्या सगळ्या सावकारांस बोलावून आणिलें, त्याच कारणानें दादासाहेबांसही बोलावून आणीत आहेत, याचा त्यास क्षणमात्र उलगडा पडला नाहीं. पण पैशाची एवढी ओढ असतां स्वारी दादासाहेबांस त्रास देण्याचें मनांत आणील, हें कांहीं संभवनीय नाहीं; गांवांत आतां कोणा दुसऱ्याकडून आपली गरज भागत नाहीं, तेव्हां आतां यांच्याजवळ मागायाला कांहीं हरकत नाहीं, असा विचार करूनच स्वारींनीं दादासाहेबांस बोलाविलें असलें पाहिजे; आपल्या गरजेचे वेळीं काकासाहेब वाटेल तें करतील, असाच त्याच्या मनाचा विचार होऊन तो आपल्या यजमानांनीं सांगितलेल्या कामास गेला. पांच मिनिटांपूर्वीपर्यंत पाय लचकल्याची कांहीं सुद्धां वार्ता नव्हती, आणि आतां इतक्यांत आपल्या यजमानास सकाळीं पाय

लचकल्याचें स्मरण कसें झालें, याचेंहि त्यास आश्चर्य वाटलें ! परंतु तो तसाच पुढें गेला. आपले यजमान पैशासाठीं बहुत-करून दादासाहेबांचे पाय धरणार, अशी त्याची पक्की खात्री झाली.

दादासाहेब पुढें गेले होते. कारकून काकासाहेबांच्या घरांतून बाहेर पडतो, तों ते दिसेनात इतक्या लांब गेले होते. परंतु वरून खिडकींतून काकासाहेबांनीं आपल्या कारकुनास, "धांव, धांव, असा काय वेंधळ्यासारखा इकडे तिकडे पाहतो आहेस ? ते आपल्या बिऱ्हाडाकडेच गेले असतील. आणखी कुठें जातात ? कुठें पृथ्वी सोडून जातात कीं काय ? जा," असें ओरडून सांगितल्यामुळें अर्थातच तो त्यांच्या देखत तरी धांवला.

दादासाहेब अगदीं आपल्या घराशीं येऊन उंबऱ्यांत पाय ठेवणार, तोंच कारकूनसाहेब तेथें जाऊन पोंचले आणि एकदम "काकासाहेबांनीं आपल्याला उभ्या उभ्या घरीं बोलाविलं आहे," असें धापा टाकीत ह्मणाले.

काकासाहेबांनीं आणखी आपल्याला आपल्या घरीं बोलाविलं आहे, हें ऐकल्या-बरोबरच दादासाहेबांस किती आश्चर्य वाटलें ! "तुह्मी कोण ? चुकत असाल, दुसऱ्या कोणाला बोलवायला त्यांनीं तुह्मांला सांगितलं असेल. मला ते कशाला बोलावितील ? मी त्यांच्या घरीं जाण्याइतका माझा त्यांचा संबंध नाहीं. ......" असें दादासाहेब त्यास सांगूं लागले, तों तो कारकून मध्येंच म्हणाला, "तें सगळं खरं, पण त्यांनीं आपल्यालाच बोलवायला सांगितलं, आणखी त्यांनीं अशी विनंति करायला मला सांगितलं आहे कीं, आपण येण्याला अनमान करूं नये, ते स्वतःच इकडे आपल्या घरीं येणार होते, पण त्यांचा कायसा आज सकाळींच जिन्यांत कुठं पाय मुडपला आणखी लचकला, त्यामुळं त्यांना जरा चालण्याची पंचाईत पडते आहे. तेव्हां जरी त्यांचं स्वतःचं थोडं खासगी काम आपल्याकडे आहे, तरी त्यांनीं आप-ल्याला तिकडे येण्याबद्दल विनंति केली आहे. आपली ते अगदीं मार्गप्रतीक्षा करीत आहेत. चलावंच."

दादासाहेब क्षणमात्र घुटमळले. आपण "येत नाहीं," असाच निरोप पाठवावा असा विचार क्षणमात्र त्यांच्या मनांत आला आणि ते त्याचप्रमाणें उत्तर देणार, तोंच त्यांस असें वाटलें कीं, त्या गृहस्थास जर खरोखर तसेंच कांहीं काम असलें, तर आपण तरी असें उत्तर कां द्यावें ? गेल्यानें आपलें काय बिघडतें ?

मृत्यु हा भिन्न भिन्न लोकांच्या मना-वर भिन्न भिन्न तऱ्हेचे परिणाम करितो. जो अतिशय भित्रा असेल, त्यास क्वचित् धीट करतो. जो अत्यंत अभिमानी असेल, त्यास अभिमानहीन करून सोडतो. जो फार उद्धट असेल, त्याचे अंगीं नम्रता आणतो. ज्यास कशाचीच दिक्कत वाटत नसते, त्यास तो सगळ्या-चीच दिक्कत वाटावयास लावतो. जो सर्वांशीं बेपरवा असतो त्याचे अंगीं लीनता उत्पन्न करतो. जो धर्महीन व कर्मनष्ट—निदान उदासीन—त्यास अत्यंत श्रद्धावान्, कर्मनिष्ठ व धार्मिक बनवितो. दादासाहेब अत्यंत धार्मिक, कर्मनिष्ठ, श्रद्धावान्, असा होता; परंतु त्याचे अंगीं अभिमान आणि ताठा हीं इतकीं भरलीं होतीं कीं, त्यांनीं त्याची मूर्ति धरून अवतारच घेतला होता कीं काय, असें वाटे. परंतु अत्यंत आश्च-

याची गोष्ट कीं, मुंबईस आपल्या मुलाची मृत्युवार्ता ऐकून ते परत आल्यापासून, त्यांची सर्व अहंता, त्यांचा सर्व अभिमान हीं पार गळलीं. त्यांचा कोपिष्टपणा पार नाहींसा झाला. घरांतील मंडळींना असें वाटूं लागलें कीं, हे दादासाहेब पूर्वीचे नसून मुंबईहून अगदीं नवे बनून आले. कोणत्याही बाबतींत त्यांनीं कधीं संतापाचा शब्द उच्चारला आहे असें मुळींच झालें नाहीं. जो कोपिष्ट म्हातारा आपल्या मर्जीविरुद्ध कोणी इकडचा जिन्नस तिकडे ठेविला तर संतापावयाचा आणि अगदीं लाल होऊन जाऊन त्या अपराध्यास कडक शिक्षा–निदान शब्दांची तरी–केल्याखेरीज कधीं राहावयाचा नाहीं, तो आतां अगदीं गाईपेक्षांही गरीब झाला. कधीं कोणास क्रोधाचा शब्द आज महिन्या दोन महिन्यांत त्यांच्या तोंडून निघाला नाहीं.कधीं एखाद्या प्रसंगीं पहिल्या सवयीस्यास राग आला ( पूर्वीचा संस्कार अगदीं एकदम विनष्ट कसा होतो ? ) तरी ते अत्यंत लवकर आत्मसंयमन करीत आणि मौन धरीत. त्यांच्या मनांत एखादी गोष्ट करावयाची नसली आणि घरांतून कोणी ती करावी असें सुचविलें, तर कधीं त्यांनीं नकार केला नाहीं. सारांश, दादासाहेब मुंबईहून आले, ते पूर्वीचे राहिले नव्हते, इतकेंच नव्हे तर त्यांची स्थिति पहिल्याच्या अगदींच उलट झाली होती. तेव्हां काकासाहेबांनीं बोलाविलें आहे तर त्यांच्या घरींही आपल्यास जाण्यास काय हरकत आहे ? जावें, असा विचार त्यांनीं केला, तर त्यांत नवल वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांनीं तसा विचार केला इतकेंच नव्हे, तर त्यांनीं तो लागलीच अंमलांत आणण्यासाठीं ताड फिरविलेंही. आपण त्यांच्या घरीं जातों आहोंत, पण त्यांनीं कांहीं बोलून आपला अपमान केला तर, असाही प्रश्न त्यांच्या मनांत उभा राहिला. परंतु केला तर त्यांचा मोठेपणा त्यांचेजवळ; आपण मुकाट्यानें नमस्कार करून उठून येऊं, असें उत्तर आपणच त्या प्रश्नास देऊन ते त्या कारकुनाबरोबर काकासाहेबांकडे जाण्यास निघाले.

वाटेनें त्यांनीं कारकुनास एक शब्दानें सुद्धां कां बोलाविलं आहे ? काय काम आहे ? असें कांहीं विचारलें नाहीं. तें विचारावें, असें त्यांच्या मनांत सुद्धां आलें नाहीं. अलीकडे त्यांचें लक्ष्यही ठिकाणावर नसे. कांहीं एक मंत्र त्यांनीं आपणच निवडून काढला होता आणि तो आपल्याशींच ते नेहमीं जपत असत. एखाद्या महासाधु पुरुषाप्रमाणेंच त्यांची वृत्ति झाली होती. त्या कारकुनाच्या मनांत आपल्या यजमानाला पैसे मिळूं नयेत अशी इच्छा फार. अशी इच्छा करण्यांत त्याचा हेतु चांगलाच होता. मध्यंतरीं दागिन्यांची जी भानगड झाली आणि आपल्या धन्याच्या गळ्याशीं जें भयंकर लचांड आलें होतें, तें त्यास मुळींच ठाऊक नव्हतें. यामुळें त्यास अजून असेंच वाटत होतें, कीं आपले यजमान त्या लफंग्या बिंदुमाधवाच्याच जाळ्यांत असून, त्यालाच नेऊन देण्यासाठीं रक्कम जमा करीत आहेत; तेव्हां जर तेवढ्याचकरितां रक्कम पाहिजे असेल तर यांच्याकडून ती त्यांना मिळूं नये, हें सर्व दादासाहेबांस सुचवावें म्हणून कारकून त्यांजवळ हलकेंच म्हणतो, " आपण इथून गेलांत त्याच्या पाठोपाठच काकासाहेब गेले. आणखी लागलीच परत यायचे, पण कांहीं फसगतींत सांपडले. मला वाटतं कांहीं पैशाचं नुकसान झालं. त्यांचं

त्या फसगतीमुळं कांहीं अंगावरयू आलंसं दिसतं. कदाचित् अजूनयू फसतच असतील. आपल्याला कांहीं कळलं का त्यांतलं? सगळ्या गांवांत लोकांच्या तोंडीं झालं आहे कीं, कांहीं कोणा किमयागाराच्या नादीं लागून स्वारी फसली आणखी आतां...... ''

दादासाहेबांनीं ऐकलें तेवढ्यांतच त्यांना हा कारकून आपल्या यजमानाच्या विरुद्ध बोलतो आहे, त्यांचीं कांहीं छिद्रें उघडीं पाडूं पहातो आहे, हें पाहून सपाट्यासरसा राग आला; परंतु ते जर पूर्वींचेच दादासाहेब असते, तर अशा आपल्या धन्याशीं कृतघ्नपणा करणाऱ्या कारकुनास जोड्यापाशीं सुद्धां उभें करूं नये म्हणून त्यास भररस्त्यांत शिव्या देऊन हांकून देते. परंतु आतां त्यांनीं आपला क्रोध जिंकला होता, त्यामुळें ते शांतपणें त्यास म्हणाले, ''बाबारे, आपल्या यजमानाचीं छिद्रं बाहेर कोणाला सांगणं म्हणजे नोकराचा कृतघ्नपणा होतो. उलट त्यांच्यावर पांघरुणं घालून मदत करावी. माझ्याजवळ एक अक्षरसुद्धां बोलूं नकोस कसा! जा, पुढं जा. आणखी मी येतों आहें म्हणून त्यांना सांग, जा. वेडगळ कुठला! आपल्या यजमानाबद्दल असं का कुठें बोलावं? त्यांची फसगत झाली, तर त्यांचे ते समर्थ आहेत त्यांतून आपली सुटका करायला, नाहीं तर आपण त्यांची सुटका होईल असा कांहीं उपाय योजावा, का आमच्यासारख्या तिऱ्हाइताजवळ बभ्रा करीत सुटावं? जा. जा. अगदीं त्यासंबंधानं बोलूं नको कसा! जा. ''

''त्यांची त्यांतून सुटका व्हावी, याच हेतूनं मीं आपल्याजवळ ही गोष्ट सांगितली,'' एवढें तरी बोलावें असें त्या कारकुनाच्या मनांत आलें, परंतु दादासाहेबांच्या त्या भव्य चेहऱ्याकडे, विशेषतः त्यावर या वेळीं जी छाया दिसत होती, ती छाया पाहून ते त्याचे शब्द जिभेच्या जिभेवर आणि विचार मनांतल्या मनांत जिरून गेले. इतकेंच नव्हे, तर दादासाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें तो पुढेंही झटकला. या गृहस्थाच्या जवळ आतां आपण राहिलों, तर हा आपली कांहींच बाकी ठेवणार नाहीं, असें त्यास वाटलें असावें. त्यानें पुढें जाऊन, ''दादासाहेब आपल्या घरीं गेले होते. मीं त्यांना त्यांच्या दारांतच गांठलं आणि आपला निरोप कळविला, तेव्हां ते त्याच पावलीं परतले. इकडे येताहेत—आलेच!'' असें काकासाहेबांस सांगितलें. तें ऐकतांच काकासाहेबांस सकृद्दर्शनीं तर थोडेंसें आश्चर्यच वाटलें. त्यांच्या मनाला असेंच वाटत होतें कीं, दादासाहेब बहुतकरून येणार नाहींत; परंतु तें वाटणें व्यर्थ होऊन ते आले असें पाहतांच त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें कीं, आपण गांवांतले विशेष थोर गृहस्थ, तेव्हां आपल्याशीं वांकडें राहण्यांत तात्पर्य नाहीं, असा विचार करून ते आले असावे. कोणाचेंही अंतःकरण स्वभावतः फार थोर असेल, ही कल्पनाच काकासाहेबांस नसे. ज्याप्रमाणें आपलें प्रत्येक कृत्य स्वार्थसाधक हेतूंनीं युक्त असतें, त्याचप्रमाणें इतरां सर्वांचें असतें, अशी त्यांची पक्की समजूत!

दादासाहेब वर येण्याबरोबर काकासाहेबांनीं बसल्या बसल्याच उत्थापन दिलें. कारण आपला पाय लचकला आहे अशी थाप मारली होती, ती उघडकीस येऊं नये, अशी त्यांची जबर इच्छा. दादासाहेब बसल्यानंतर त्यास काका-

साहेबांनीं कुशल प्रश्न विचारले. त्यांचे चिरंजीव वारले त्याबद्दल दुखवट्याचे चार उद्गार काढले. दादासाहेबांनींही त्यांस "होणारापुढें कोणाचा इलाज बरं! आपली प्रकृति कशी काय आहे? आपण बरेच दिवस मुंबईस राहिलां?" वगैरे बोलून आणखीही कुशल प्रश्न विचारले. नंतर हलकेच "कां पाचारण केलं होतं?" असा प्रश्न विचारून त्यांच्या उत्तराची अपेक्षा करीत बसले.

काकासाहेबांनीं त्यावर हळूच हंसत हंसत उत्तर दिलें, "कांहीं नाहीं; सहज. वास्तविक माझं काम होतं, तेव्हां मींच आपल्याकडे यायचं; पण काय करावं! या पायानं मी सकाळपासून अगदीं बेजार झालों आहे. नाहीं तर आपल्याला तसदी दिली नसती. आपण देवदर्शनाहून इकडे जाऊं लागलां म्हणजे इथल्या इथेंच बोलवावं, असा विचार होता; परंतु मी आपल्याला इकडून येतांना पाहिल्याबरोबर कोणाला तरी आपल्याला इकडे येऊन जाण्याबद्दल विनंति करायास माणूस पाठविणार तों आपण पुढें गेलां, यामुळें आपल्या मागोमाग कारकुनाला पाठविलं. आपल्याला व्यर्थ तसदी दिली. बरं, तें असो. अरे गोविंदराव, तुम्ही जरा खालीं जा बरं, आणखी वर कोणालाही येऊं देऊं नका. मला दादासाहेबांपाशीं कांहीं एकांतांत बोलायचं आहे."

लागलीच कारकून "कोणी आला आहे" असें म्हणून तेथून गेला; आणि दादासाहेबांकडे वळून काकासाहेब म्हणतात: "दादासाहेब, दुसऱ्या कांहीं धर्मसमजुतीच्या बाबतींत आपला आणखी आमचा मतभेद होऊन जे कांहीं प्रकार झाले, ते आतां या वेळीं मनांत आणायचे नाहींत, एवढी आधीं विनंति करून मग काय बोलायचं तें मी बोलतों. व्यवहाराच्या वेळीं दुसऱ्या कांहीं गोष्टी मनांत न आणतां आम्हाला मदत कराल, आपली दानत तशी आहे, निदान माझी तशी आहे, त्यावरून आपली तशीच असेल, असं समजून मी आपल्याला तसदी दिली आहे. व्यवहार आणखी धर्मसंबंधीं मतभेद यांचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. व्यवहार आपण वाटेल त्याच्याशीं करतां, परंतु धर्माच्या बाबतींत पुष्कळांपासून अगदीं अलिप्त रहातां, आपल्याला माहीतच आहे. तेव्हां तें आपण विसरा. ते जे काय आपले दोन हात झाले—आतां त्याचें मूळ कारणच नाहींसं झालं, तेव्हां—त्याचा विचार तरी कशाला करावा? कांहींच करण्याची जरूरी नाहीं. तेव्हां तो आतां मी मुद्दाम सोडून देतों. दुःखावर डागण्या कशाला देऊं? तें माझं ब्रीद नव्हे. इकडे पहा, दादासाहेब, मला थोडी एक गरज आहे. गांवांत आज पन्नास असामी आहेत कीं ज्यांच्यावर मी शब्द टाकला, कीं गरज भागणार आहे. कित्येक तर आज कित्येक वर्षें मनीषा धरून बसले आहेत, कीं काकासाहेबांनीं आपल्याकडे एकदां कांहीं तरी गरजेनं यावं, पण मी अगदीं फटकून वागतों. कारण या लेकांशीं व्यवहार नको. तेव्हां आज मला गरज तर विशेष आहे, आणखी या लोकांच्याकडे तर जायचं नाहीं. अभिमानाची गोष्ट झटली, म्हणजे कशी असते हें तुम्हांला ठाऊकच आहे. एकदां कोणाशीं आपलं कांहीं कर्तव्य नाहीं असं ठरलं कीं ठरलं, मग प्राणावर बेतेना, तें नाहींच! मनांत विचार केला, कीं जवळजवळ आपल्याच बाण्याचे आणखी ब्रीदाचे एकच गृहस्थ आहेत, त्यांच्याजवळ आपल्याला

कांहीं गोष्ट काढा… हरकत नाहीं; बेलाशक काढावी. ते जरी आपल्यासारखे सरदारी पटांतले नाहींत, तरी दुर्जा तोच, तेव्हां केला विचार आणखी दिली आपल्याला तसदी. कां ! मी ह्मणतों हें खरं कीं नाहीं ! "

" हो. हो. आपल्यासारख्यांना मदत करण्याचा प्रसंग तरी आह्मांला कधीं यायचा ? आपण बेलाशक सांगावं काय असेल मनांत तें. माझ्या हातून मदत होण्याजोगी असेल, तर मी अगदीं जरूर करीन. याबद्दल आपल्याला संशयच नको. आपल्याला अशी काय गरज आहे ? "

" गरज ह्मणजे कांहीं विशेष नाहीं. ती इतकी क्षुल्लक आहे, कीं गांवांत कोणाही मारवाड्याला बोलावून आणून मी शब्द काढण्याचा अवकाश, कीं तो अगदीं उलथाच्या पालथा होऊन चार पांचच काय, परंतु पंचवीस हजार रुपये आणून ओतील. पण मला या माणसांशीं अगदीं संबंध नको. दुर्जनः परिहर्तव्यः खरं कीं नाहीं ! मला गरज म्हणजे एवढीच, कीं एक पांच हजार रुपये सुमारं आठ पंधरा दिवस पाहिजे आहेत. कुळांच्याकडून अजून वसूल आला नाहीं. मामलेदाराला पैसे चारल्याखेरीज मामलेदार कांहीं मदत देत नाहीं; तथापि मी कलेक्टरसाहेबांकडे मामलेदाराच्याविरुद्ध अर्ज केला आहे. आतां मदत मिळून चटाचट वसूल होईल, पण मला परवांचे दिवशीं भरणा केला पाहिजे आहे. तेव्हां तेवढी गरज आपण भागवावी. दुसरं कांहीं मोठं महत्त्वाचं काम नाहीं. "

" एवढंच का ? मग त्याची आपण एवढी काळजी कशाला करतां ? तितकी रक्कम मी आपल्याला देतों, आणखी आपण महिना नाहीं, दोन महिने राहूं द्या. पण अडचण एवढीच आहे, कीं माझ्याजवळ रोकड रक्कम नाहीं. मुंबईंत आमचे स्नेही आहेत, त्यांच्याजवळ माझ्या प्रामिसरी नोटा आहेत. त्यांतल्या पांच हजारांच्या विकून टाकून मी आपल्याला रक्कम देतों. आपण बिलकुल काळजी करूं नये. "

काकासाहेबांना फारच आनंद झाला; इतका कीं तो पोटीं मावेना, परंतु तो तसाच दाबून ते ह्मणतात, ' दोन महिनेनू महिना करायचे आहेत काय ? तुंबलेला वसूल मामलेदारांकडून मदत मिळाली कीं होईल, त्या दिवशीं आपला निकाल करून टाकीन. पण सध्या पंधरा दिवस जरा पंचाईत आणि त्यांतच ही अडचण आली. बरं आहे. मग आपण त्या आपल्या स्नेह्यांना हुंडी देत असाल तर मला रकम भरायची आहे मुंबईंतच. तेव्हां रात्रीं मी जाईन. आपले स्नेही म्हणजे कोण ? "

" ते अण्णासाहेब...... "

" ते का ? अरेरे. त्यांना न कळत जर गोष्ट झाली, तर बरं होईल. आपली माझी इच्छा कीं तसं त्यांना न कळतां व्हावं. आमच्यासारख्यांनीं दुसऱ्यापासून कर्ज होतां होईतों घेऊं नये. घेतलं, तर तें कानाच्या कोपऱ्याला कळूं नये. तेव्हां अशी तजवीज आपल्याकडून झाली. तर फार उत्तम; नाहीं ह्मणजे मग आह्मांला आज जरूरीच आहे तेव्हां नाइलाज आहे. आपण तेवढ्या नोटा त्यांच्यापासून घेऊन याव आणखी कोणाच्याही मार्फत विकायला येतील. आपली आमची इच्छा कायती आपल्याला कळविली. "

दादासाहेबांनीं किंचित् वेळ विचार केला आणि नंतर लागलीच ह्मणाले, " कांहीं हरकत नाहीं, आपल्या इच्छेप्रमाणें

सर्व होईल अशी तजवीज मी करतों. त्यांना अगदीं नकळत करायचं म्हणजे मला मुंबईला यावं लागेल झालं. दुसरं काय ? नाहीं तर आपल्या स्वाधीन नोटा देवविल्या असत्या. पण त्यांच्यावर माझ्या सह्या पाहिजेतना" "दादासाहेब, एवढी आपण तसदी घ्याच. माझी जरूर फार आहे. आणखी अवधि तर मुंबईस जाण्यापुरताच आहे."

त्याच रात्रीं काकासाहेब व दादासाहेब गंगापुरावरून मुंबईस जाण्यास निघाले व दुसरे दिवशीं सकाळीं तेथें पोंचले. काकासाहेब दुसऱ्या कोठें उतरले. दादासाहेब आपल्या मित्राच्या येथें उतरले. तिसऱ्या प्रहरीं दादासाहेबांनीं आपल्या नोटा मागून घेऊन तयार असावें आणि काकासाहेबांनीं सांगितल्या पत्त्यावर दादासाहेबांनीं त्यांचेकडे जावें. काकासाहेबांनीं एक दलाल तेथें बोलावून आणून बसवून ठेवावा असें ठरलें, त्याचप्रमाणें दादासाहेबांनीं आपल्या स्नेह्याजवळ नोटी मागितल्या. आपण मध्येंच कां आलां, नोटींची इतकी जरूरी कां असें त्यांनीं सहजच विचारलें, तेव्हां दादासाहेबांनीं त्यांना अत्यंत सरळपणें, "मी कांहीं जरूरीच्या कामामुळें आलों आहे. काय काम आणि नोटी कशाला पाहिजेत, हें आपल्याला मला सांगतां येत नाहीं. तेव्हां आपण मला विचारूं नये." असें उत्तर दिलें. दादासाहेबांचा स्वभाव त्यांचे स्नेह्यास पूर्णपणें ठाऊक, तेव्हां त्यांनें मुकाट्यानें त्यांस नोटी दिल्या. अधिक कांहीं विचारलें नाहीं. भोजन होतांच दादासाहेब काकासाहेबांच्या बिऱ्हाडीं गेले. तेथें दलाल आलाच होता. नोटी वगैरे पाहून त्यानें मी आपल्याला संध्याकाळच्या आंत रुपये आणून नोटी घेऊन जातों. तें काम त्या दिवशींच्या त्या दिवशीं करण्याबद्दल आपलें कमिशन थोडेंसें जास्त पडलें तरी हरकत नाहीं, असें काकासाहेबांनीं सांगितलें. दादासाहेबांनीं काकासाहेबांस, "आपले नांवें मी नोटी करून देतों, आपण त्या विकाव्या. म्हणजे मला आतां मुंबईत राहण्याची जरूरी नाहीं." असें ह्मटलें; परंतु आपण नोटी विकल्या, नोटी विकण्याची आपणास (काकासाहेबांस) जरूरी पडली असें दिसूं नये, म्हणून जो घेईल, त्याचेच नांवच्या नोटी करून द्याव्या. आमच्याकरितां एक दिवस आपण तसदी घ्यावी असें ह्मटलें. यामुळें दादासाहेबांचा नाइलाज झाला. त्यांनीं बरें म्हणून कबूल केलें. दलालानें संध्याकाळच्या आंत निकाल करण्याचें कबूल केलें होतें. बोलतां बोलतां दलालाचें राहण्याचें ठिकाण काकासाहेबांनीं विचारून घेतलें होतें. पुढें संध्याकाळ झाली, दलालाचा पत्ता नाहीं. संध्याकाळचे सहा वाजले. आतां तो येत नाहीं असें काकासाहेबांस वाटलें. काकासाहेबांस तर पैशाची अशी नड कीं विचारूं नये. आतां फक्त एकच दिवस उरला होता. तेव्हां पुनः काकासाहेबांनीं कांहीं केविलवाणीनें व कांहीं आढ्यतेनें असें सुचविलें कीं, दलाल दादरास राहतो, तेथें दादासाहेबांनीं आपल्याबरोबर येऊन त्याची गांठ घ्यावी. जर तावडतोब काम झालें तर ठीकच, नाहीं तर काकासाहेबांच्या नांवें नोटा करून देऊन आपण गंगापुरास परत जावें. तेंही दादासाहेबांनीं नाइलाजास्तव कबूल केलें. आणि अण्णासाहेबांकडे (दादासाहेबांच्या मित्राकडे) दादासाहेबांस परत येण्यास थोडा उशीर होईल असा निरोप पाठवून दोघेही एका लोकलनें दादरास गेले. तेथें त्या दलालाचें घर सांपडण्यास बराच वेळ

लागला. शेवटीं तें सांपडलें तों असें कळलें कीं तो घरीं नाहीं! तो रात्रीं नऊ-विसाच्या गाडीनें येतो? अर्थात् तितका वेळ त्याची वाट पहात बसावें लागलें. पुढें पहातात तों तीही गाडीची वेळ निघून गेली. तरी हे आपले वाट पहात बसलेच. शेवटीं तो साडे अकराच्या गाडीनें आला. आपल्याच कामाकरितां त्याला उशीर झाला आहे, तर आपण बसूंच या, म्हणून दादासाहेबांस त्यांनीं तोंपर्यंत थोपवून धरलें! शेवटीं तो येतांच त्यानें यांस पाहिल्याबरोबर म्हटलें, "बोआ, मी पुष्कळ गिऱ्हाइकांच्याकडे गेलों, पण आज कांहीं कोणी मिळाला नाहीं. मी नेहमीं आठ साडेआठ वाजतां परत येतों, परंतु आपल्यासाठीं आतांपर्यंत मुंबईंत होतों. आतां उद्यां कोणी तरी खास गांठतों, आणखी तुमच्याकडे आणतों." काकासाहेबांस कोण घाई, पण करतात काय? ते त्या दलालास टाकून बोलले, "तुमची आमची ओळख म्हणून मी तुमच्या भरंवशावर बसलों. वाटलं कीं चार दोन आणे कमिशन जायचं तें तुम्हाला जाईना, पण तुम्हीं असं केलं. आतां आम्ही वाटेल तो दुसरा दलाल पाहूं. तुमचीच ही कशाला पाहिजे!"

त्या दलालानेंही त्यांची तशीच छानदार उडविली. पण काकासाहेबांना गरज, तेव्हां त्यांनीं पुनः सांवरून घेतलें. दादासाहेबांनीं तो सर्व प्रकार पाहून काकासाहेबांस म्हटलें, "काकासाहेब, आतां मजवर एक कृपा करा. मलाही इकडे जा, तिकडे ये अशी दगदग आतां होत नाहीं. तुमच्या गरजेकरितां मीं इतकी दगदग केली. आतां त्या नोटी सध्या आपल्या नांवानें करून घ्या आणखी उद्यां आपणच विका. मला या मुंबईंत आतां विनाकारण राहण्याची इच्छा नाहीं. थोडीशी गैरसोय आपल्याला होईल, पण तेवढी आपण सहन करून घ्यावी. मुंबईस माझ्या चित्ताला फार त्रास होतो." असें म्हणून त्यांनीं आपल्या खिशांतून नोटी काढल्या. शेवटीं काकासाहेबांनीही तें त्यांचें म्हणणें मान्य केलें. पांच हजारांच्या नोटी दादासाहेबांनीं काकासाहेबांच्या नांवें करून दिल्या आणि आपल्याला गरजेपुरती रक्कम झाली कीं, बाकीची आपण मजकडे परत करा असें सांगितलें. त्या दलालानेंही दुसरे दिवशीं मी कोणी तरी गिऱ्हाईक खचित् गांठून आणतों म्हणून आश्वासन दिलें. इतकें सगळें होण्यास एक दीड वाजण्याचा सुमार झाला. त्या दलालानें त्यांस आतां येथेंच कांहीं दूध वगैरे घेऊन रात्र काढा म्हणून सांगितलें परंतु दादासाहेब ऐकेनात. तेव्हां काकासाहेब व दादासाहेब दोघेही तेथून उठून स्टेशनावर आले. ते स्टेशनावर आले तेव्हां गाडीस चांगला दोन तास अवकाश होता, म्हणून ते वेटिंगरूमांत बसले. थोड्या वेळानें गाडी आली तेव्हां हे तीन शिरले.

याच गाडींत त्या रात्रीं आपल्या प्राणावर उदार झालेली कमलाही होती.

# प्रकरण ७३ वें.

## अपघात.



या**प्रमाणें** सासरा व सून एकमेकांला न कळत त्या आगगाडींत त्या विलक्षण रात्रीं एकदम होतीं. प्रत्येक उतारू त्यांत्याच प्रमाणें कांहीं जरूरीच्या कारणामुळें, आपली विश्रांति गमावून मुंबईच्या आसपास कोठें तरी जाण्यासाठीं तींत शिरून बसला होता. जे कांहीं काळजी उत्पन्न करणाऱ्या कामामुळें त्यावेळीं तींत होते, ते अर्थातच त्या संबंधानें आपल्या मनांत विचार करीत होते. जे केवळ आनंदाच्या कार्यासाठीं दादरासारख्या ठिकाणीं येऊन आतां परत मुंबईस जात होते, ते आपापल्या आनंदाच्या प्रकारांचें स्मरण करून परस्परांशीं तत्संबंधीं बोलत, हंसतखेळत चालले होते. जे कोणी विनाकारण कांहीं तरी लचांड उपस्थित होऊन तेवढ्या रात्रीं कोठें तरी जाण्याचा प्रसंग येऊन त्याची कांहीं तरी व्यवस्था लावून परत जात होते, त्यांचे विचार एकपरीचे होते; आणि आमच्या नायिकेप्रमाणें जीवावर उदार होऊन केवळ आत्महत्या करण्याच्या बुद्धीनें ज्या व्यक्ति त्या गाडींत शिरल्या होत्या, त्या आपला हेतु सिद्ध करण्यास काय उपाय योजावे, या विचारांत निमग्न होत्या; इतक्या अनेकविध व्यक्ती त्या आगगाडींत होत्या, परंतु त्या आगगाडीला किंवा तिच्या इंजनाला काय ! त्यांतला एक लवभर तरी गंध ! मुळींच नाहीं. दैवाच्या गतीप्रमाणें त्यांची गति अगदीं अकुंठितपणें चालली होती. आंतील माणसांच्या विचारांकडे तिचें मुळींच लक्ष्य नाहीं. एखाद्या फार प्रचंड अशा प्राण्याच्या फुसकाऱ्याप्रमाणें फुसकारे टाकीत, आपल्यापुढें काय आहे काय नाहीं, याचा विचार आपल्यास शिवूं सुद्धां न देतां दैवदुर्विपाकाप्रमाणें तें इंजन धापधाप धापा टाकीत एका स्टेशनावरून दुसऱ्या स्टेशनावर चाललें होतें आणि हृदयाची धाप चालत असली, ह्मणजे त्याच्या जोरावर ज्याप्रमाणें शरीर चालतें, त्याप्रमाणें त्या इंजनाच्या मागें लावून दिलेल्या डब्यांची मालिका शिस्तीनें चालली होती. सुमारें पांच चार स्टेशनें झालीं, आपल्या विचाराप्रमाणें आतां करूं, क्षणाभरांत करूं, अमुक प्रकारें करूं कीं तमुक प्रकारें करूं, असा विचार कमलेच्या मनांत एकसारखा चालून तो आतां अगदीं दार उघडून आपलें शरीर लोटून द्यावयाचेंच; असें जर केलें नाहीं तर आपल्याला जन्मभर अंधारांत तोंड घालून लपून बसावें लागेल. आपण आपल्या बापाच्या नांवाला आणि आईच्या नांवाला काळोखी लाविली, असा आरोप आतां आपल्यावर येणार आणि त्या आरोपाचें निरसन

करणें आपल्यास तर शक्य नाहीं; अशा स्थितींत जिवंतपणीं मेल्यापेक्षांही मेल्याप्रमाणें जगण्यापेक्षां अशा तऱ्हेनें आत्महत्या करणें अगदीं योग्य विहित, असा विचार करून ती आपल्या इच्छेला कृतीचें स्वरूप देण्याच्या तयारीस लागली. वर सांगितल्याप्रमाणें कांहीं स्टेशनें गेल्याबरोबर तिनें एकवार इकडे तिकडे पाहिलें. कोणी आपल्याकडे पहातें आहे कीं काय, आपण काय करणार याचा कोणास संशय तर आला नसेलना? आपल्या या कंपार्टांत कोणी नाहीं पण शेजारच्या कंपार्टांत असलेल्या व्यक्तींची दृष्टि आपल्यावर नाहींना? नाहींच. आपल्यावर तशी दृष्टि असण्याचें काय कारण? जो तो आपापल्या व्यवसायांत, अगर त्यांतल्या त्यांत येईल तशी पेंगपेंगुन झोंप घेण्यांत गुंतला होता. ती आपल्या त्या कंपार्टमेंटांत एका बाजूच्या कोपऱ्यांत अगदीं दारांत जाऊन बसली होती. हेतु हा कीं, गाडी सुरू होऊन थोडासा वेळ झाला नाहीं तों आपल्याला आपली इच्छा तृप्त करून इहलोकची रजा घेऊन आपल्या निर्मलांतःकरणाच्या प्रेमळ जननीकडे परलोकीं जावें. पुनः या दुःखप्रद व असत्यमय जगाचा स्पर्शसुद्धां नको. असा विचार करून ती उठली आणि तिनें वांकून त्या दाराची अट काढण्यासाठीं बाहेरची मूठ धरून फिरावली, नंतर खालची अट काढण्यासाठीं खिडकींतून वांकली आणि तिनें तीही काढून, आपल्या अंगावरची शालजोडी दूर सारली. ओचापदर बांधलेलाच होता. गाडी जोरानें चालली होती. ती तशी चालतां चालतां आतां कमला आपल्या कंपार्टमेंटाचें, दार उघडून धरून उभी राहिली तिनें आपल्या आईचें स्मरण केलें, तिला वंदन केलें, तिची पवित्र मूर्ति चित्तांत आणून डोळे मिटले आणि आतां तें दार सोडून देऊन आपलें अंग लोटून देणार, तों, काय झालें कोण जाणे, तिला असा भास झाला कीं, कोणी तरी आपणास मागें ओढीत आहे. तें कोण हें पहाण्यासाठीं ती मागें वळली, तों आपल्या आईची प्रतिमा तिच्या डोळ्यांसमोर दिसली. कदाचित् तो भास म्हणजे केवळ तिच्या मनाचा खेळ असेल, परंतु तो भास झाला खरा, आणि मागें कोणी तरी आपणास ओढीत आहे असें वाटून तिनें मागें पाहिलें खरें; व पाहिलें तेव्हां आपली आईच आपल्या पाठीमागें आहे असा तिला भास झाला; परंतु ती त्या भासामुळें घाबरली नाहीं. आपल्याला आपली आई बोलावण्यालाच आली आहे, या दुष्ट जगांत तूं आतां राहूं नकोस, असें सांगण्यालाच आली आहे. तिनें आपल्यास मागें ओढलें हा मात्र केवळ भास, आतां आपण त्वरा करावी, नाहीं तर सर्वच बेत फसून मग पुनः असली संधि येणार नाहीं, आज अशा तऱ्हेनें आपला अंत करून घेतल्यास लोकापवाद तरी टळेल, असा विचार करून ती पुनः दाराकडे वळली. आतां समोर बराच अंधकार होता. मुंबईच्या नजीक नजीक असणाऱ्या वसत्या दुतर्फा असल्यामुळें त्यांतून चमकणारे दिवे काय ते यावेळीं मधून मधून दिसत होते, आणि हिच्या त्या कम्पार्टमेंटांतला दिवा होता. या दिव्यामुळें बाहेरचा काळोख विशेष काळाकुट्ट दिसत होता. सुदैवाची गोष्ट कीं, इतर कम्पार्टमेंटांत कोणी तिच्या चलनवलनाकडे पहात नव्हतें. निदान कोणी पहात नाहीं

अशी तिच्या मनाची समजूत होती. अशा स्थितींतच आतां आपला इष्ट हेतु साधला तर साधेल; फसला तर त्यासारखें दुर्दैव कोणतेंच नाहीं, असा विचार करून तिनें दार सताड उघडें टाकलें आणि आपला एक पाय पुढें करून आतां शरीराचा झोंक पुढें टाकणार, तोंच पुढलें इंजन एकदम मोठ्यानें शीळ फुंकूं लागलें. जणूं काय हा प्रकार होतो आहे, हा किती तरी अनिष्ट आहे, असें वाटूनच तें किंकाळी फोडूं लागलें. त्याबरोबर दचकून कमलेचा पाय मागें होऊन, तिचा झोंक डब्याच्या आंतल्या बाजूसच गेला. अर्थात् त्याबरोबर तें दारही लागलें. शीळ झाली ती फारच मोठ्यानें. इतक्या मोठ्यानें कीं, आजपर्यंत इतक्या मोठ्यानें आगगाडीची शीळ वाजल्याचें कोणाच्या अनुभवांत नव्हतें. शीळ मोठ्यानें वाजण्याबरोबर निरनिराळ्या डब्यांतून पेंगणारी मंडळी भानावर आली, आणि कित्येक चटकन् काय आहे तें पाहण्यासाठीं माना बाहेर काढून इंजनाच्या बाजूकडे पाहूं लागले. शीळ वाजून तिचा आवाज उतारू मंडळीच्या कानांत घुमतच असेल, तों एकदम गाडी थांबली आणि पुनः शीळ फारच जोरानें, पहिल्यापेक्षांही विलक्षण जोरानें वाजूं लागली. लोक एकमेकांस काय आहे, काय नाहीं, याची पुसतपास करतात न करतात, तों एकदम मोठ्यानें तोफ वाजल्याप्रमाणें आवाज झाला, आणि ही गाडी पार हादरून कांहीं डबे निसटून रुळाच्या बाहेर पडले; व कांहीं डबे एकमेकांवर चढून त्यामुळें आंतील उतारूंचाही एकच हलकल्लोळ झाला. जिकडे तिकडे हाहाःकार सुरू झाला. समोरून दुसरें इंजन सांधा चुकून याच रुळावर आलें. बरें तर बरें, आमच्या या उतारूंनीं भरलेल्या गाडीचा इंजनवाला बेसावध नसल्यामुळें त्यानें आपली गाडी थांबवून मोठ्यानें शीट दिली; परंतु त्या शिटीनें कांहीं उपयोग झाला नाहीं. समोरचें इंजन अतिशय जोरांत येत होतें, तें अगदीं बेफामपणें धडक मारणाऱ्या प्रचंड रेड्याप्रमाणें किंवा हत्तीप्रमाणें धाडदिशीं या गाडीच्या इंजनावर येऊन धडाडलें. आणि त्यामुळें वर सांगितल्या प्रकारची भयंकर स्थिति झाली. काय आहे म्हणून पहाणारांचीं डोकीं दारावर धडाधड हापटून कित्येकांस फार मोठ्या जखमा झाल्या, कित्येक डबे कलांडून त्यांत बसलेले आघातांमुळें जखमी झाले. जे एक दोन डबे इंजनाच्या अगदीं जवळ होते, त्यांतील उतारूंची तर अवस्था विचारूंच नका. अशा स्थितींत चमत्कार हा कीं, आमच्या कमलेस सडकून धक्का बसून ती घाबरून बेशुद्ध पडण्यापलीकडे काहींही दुखापत झाली नाहीं. थोड्याच वेळांत त्या बेफाम इंजनाची शक्ति कमी झाली. जें व्हायचें तें होऊन पण तें थांबलें. आणि ज्या मंडळीस विशेष कांहीं दुखापत झाली नव्हती, ती मंडळी आपापल्या कंपार्टमेंटांचीं दारें उघडून भराभर खालीं उतरली. मागल्या मागल्या डब्यांत अशी न दुखापत झालेली किंवा अगदीं क्षुल्लक दुखापती झालेली मंडळी बरीच होती. परंतु पुढल्या डब्यांची फारच दुर्दशा झाली होती, त्यांतील माणसांची फारच भयंकर स्थिति झाली होती. आणि काय चमत्कार कीं, या भयंकर दुर्दशा झालेल्या डब्यांतच आमचे काकासाहेब व दादासाहेब होते. दादासाहेब जरेनें इतके थकले नव्हते, परंतु गेल्या महिन्या दोन महिन्यांतल्या चिंतेनें, दगदगीनें, त्रासानें व उद्वेगानें

फार क्षीण झाले होते. इतके कीं, त्यांस पहिला धक्का बसण्याबरोबरच बेशुद्धि येऊन पार. आणि त्यानंतर झगडाझगडींत तर त्यांच्या सर्वांगास इतक्या दुखापती झाल्या कीं, त्या वर्णन करून सांगणेंच शक्य नाहीं. हा अपघात घडला, तें ठिकाण ग्रांटरोड स्टेशनच्या जवळ जवळ अगदीं वस्तीला लागून होतें. अर्थातच त्या जवळच्या बंगल्यांतून राहाणारी मंडळी धांवत तेथें आली. ज्या ठिकाणीं बायकांचा डबा आला होता, त्या ठिकाणच्या समोरच जो एक बंगला होता, त्यांतून दोघी तिघी बायका व पांच चार पुरुष बाहेर आले आणि आयत्या वेळीं काय सुचल्या त्या युक्त्या करून कंपाउंडाच्या रेलिंगावरून रुळाच्या बाजूस ती मंडळी उतरली. बायका होत्या, त्या आधीं बायकांच्या डब्याकडे गेल्या. तेथें पहातात तों डब्यांत फार बायका नसून एका कंपार्टमेंटांत एकच तरुण मुलगी अगदीं बेशुद्ध होऊन पडली आहे असें दिसलें. सजातीयांचा समाचार घेणें आणि त्यांस मदत करणें हा नियम सृष्टींत नेहमीं दिसतो. त्याप्रमाणें त्या बायांपैकीं दोघीजणी पटकन् आंत शिरून त्यांनीं त्या मुलीस शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न चालविला ही मुलगी ह्मणजे कमला होय. वर सांगितलेंच आहे कीं, तिला विशेष अशी दुखापत कांहींच झाली नव्हती. केवळ आकस्मित अपघात झाल्या कारणानें व थोडेसे जे धक्के बसले, तेवढ्यानें घाबरून जाऊनच ती बेशुद्ध पडली होती. या बायां आंत जाण्याबरोबर त्यांनीं तिला शुद्धीवर आणण्याचे उपाय चालविले. त्यांपैकीं एक तर या असल्या कामांत मोठी कुशल दिसली. तिनें आपल्या मैत्रिणींच्या साहाय्यानें कमलेस जागृत केलें. काय चमत्कार आहे पहा ! जी आपल्या जिवावर उदार होऊन प्राण देण्यासाठीं योग्य वेळ पहावी आणि शरीर झोंकून द्यावें म्हणून दार उघडून उभी राहिली, ती असल्या प्रचंड अपघातांतून कांहींसुद्धां दुखापत न होतां–किंवा अगदींच क्षुल्लक दुखापत होऊन–सुरक्षित राहिली ! आणि तिचा सासरा जागेवरून हालला नाहीं, तरी त्याला अतोनात दुखापत होऊन तो बेशुद्ध पडला !

कमला शुद्धीवर येऊन डोळे उघडून त्या बायांकडे पाहून एकदम ह्मणते " मी या सगळ्या संकटांतून मुक्त होण्यासाठीं प्राण देत असतां मला कां तुह्मी माघारी ढकललीत ! मी मरून पडलें असतां मला कां पुनः या मृत्युलोकीं आणलेंत ? काय चमत्कार आहे पहा, माझ्या सारख्या हतभागीला सुखाचें मरणसुद्धां नाहीं. तेथें सुद्धां कोणीना कोणी तरी येऊन अडथळा करून जातें... " ती आणखीही कांहीं बडबड करीत राहती, परंतु तितक्यांत त्या बायांनीं तिला बोलूं न देण्याबद्दल प्रयत्न केला, आणि तिनेंही आतां पूर्णपणें शुद्धीवर येऊन आपण 'काय बोललों !' असें तिला होऊन ती गप्प बसली. त्या बायांनीं तिला खालीं उतरविलें. आणखी इतर कम्पार्टमेंटांतून कोणास कांहीं लागलें संवरलें कीं काय हें पहाण्यास त्या बाया गेल्या. त्या अशा तऱ्हेनें चालत बोलत कीं, जणूं काय अशा प्रसंगीं सर्वांस मदत करणें हें आपलें मुख्य काम, आणि तेंच त्या आतांपर्यंत करीत आल्या आहेत असें दिसलें.

इकडे पुरुष मंडळी होती, ती अर्थातच पुरुषांच्या डब्यांकडे गेली. त्या मंडळींत एक चांगला शिकलेला डॉक्टर होता, तो

आल्यामुळें तेथील उतारूंस फार मदत झाली. ज्यांस विशेष लागलें नव्हतें, अशांचा नुसताच गर्गशा चालला होता. पोलिस तेथें आलेच. त्यांनीं रिकामटेंकड्या लोकांचा गोंधळ कमी करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. डॉक्टरांनीं फार मेहनत घेऊन पुष्कळ दुखावलेल्या लोकांची तपासणी केली. होतां होतां ज्या डब्यांत वृद्ध दादासाहेब होते त्या डब्यांत ते आले. म्हातारा अद्यापि अगदीं निश्चेष्टच पडला होता. पोलिस इन्स्पेक्टर हजर होता, त्यास डॉक्टरांनीं म्हाताऱ्याची अवस्था कठिण आहे, येथल्या येथें उपाय होणें शक्य नाहीं. या गजांच्या पलीकडे दिसणाऱ्या त्या बंगल्यांत आमचा धर्मार्थ दवाखाना आहे; तेथें पांच चार रोगी रहाण्याचीही आम्हीं तजवीज केली आहे; हा वृद्ध गृहस्थ येथून इस्पितळांत नेण्याजोग्या स्थितींत नाहीं; नजीकच्या नजीक नेऊन ताबडतोब कांहीं उपाय झाला, तरच वांचण्याचा संभव आहे; आपली हरकत नसली, तर रोग्यासाठीं आम्हीं एक लांब खुर्ची केली आहे ती आणवून आम्ही यांना तेथें नेऊन उपचार करतों, अशी विनंति केली. इन्स्पेक्टरांसही त्यांची ती तत्परता पाहून बरें वाटून त्यांनीं तसें करण्यास अनुमोदन दिलें. लागलीच डॉक्टरांनीं आपल्यापैकीं एकास पाठवून वर सांगितलेली रोग्यांच्या करितां मुद्दाम तयार केलेली खुर्ची आणविली आणि तात्पुरतें देण्यासाठीं आणलेलें औषधही पाजून त्या म्हाताऱ्यास आपल्या त्या बंगल्यांत नेण्याची तयारी केली; आणि त्यास अलगत धरून उचलून कंपाउंडाच्या पलीकडे त्या खुर्चीवर ठेविलेंही. त्या वृद्ध गृहस्थाच्या बरोबर कोणी होतें काय, असलें तर त्यानें त्याच्याबरोबर तेथेंच रहावें, त्याची शुश्रूषा करावी, अशा हेतूनें पोलिसांकडून शोध करविला; परंतु कोणीही त्यांच्याबरोबर होतों असें कबूल करीना. काकासाहेब त्या गर्दींत होते, त्यांस डोक्याला पांच चार टेंगळें येण्याइतकें लागलें होतें. बाकी कांहीं विशेष दुखापत नव्हती. आपण दादासाहेबांच्या बरोबर आहोंत असें सांगून पुढें होणें हें त्यांचें वास्तविक कर्तव्य, परंतु ते यावेळीं पुढें येईनात. आपण पुढें झाल्यास उगीच आपण अडकून पडूं, त्यापेक्षां इथून निसटून गेल्यावर मग आपण त्यांच्या घरच्या मंडळीस तार करूं, असेंच त्यांनीं योजलें होतें. सध्या आपण नुसती माहिती सांगितली, तरी सुद्धां आपल्यास अडकून पडावें लागेल, त्यापेक्षां आपण अलिप्त रहावें, बोलूं नये हेंच चांगलें, असा 'पोक्त' विचार स्वारींनीं केला व तेथून निसटण्यास केव्हां सांपडतें याच विचारास ते लागले. इतकेंच नव्हे, तर इन्स्पेक्टरांनीं त्यांचें नांव गांव पत्ता टिपून घेतल्यानंतर त्यांस फार काम आहे, जरूरीचें काम आहे, या सबबीवर सोडून दिलें. त्या क्षणींच त्यांनीं तेथून पोबारा केला.

इकडे बायकांत विशेष कोणास लागलें नाहीं, असें पाहून त्या बंगल्यांतून आलेल्या बायका त्या दुसऱ्या दोन तीन बायकांस व कमलेस तुम्ही आमच्याबरोबर चला, घटकाभर विश्रांति घ्या व मग जेथें तुम्हांला जायचें तिकडे पोंचविण्याची तजवीज करून देऊं असें सुचविलें. परंतु इतर कोणी बायका आल्या नाहींत, कारण त्यांचें कोणीना कोणी तरी त्या गाडींत होतें; परंतु कमलेस दुसरें कोणी नव्हतें, ती एकटी आणि आतां जावें कोठें

हा प्रश्न। तेव्हां तिनें त्यांचेबरोबर जाण्याचें कबूल केलें आणि त्यांचेबरोबर त्या बंगल्यांत गेली.

या बाया कोण आणि अशा संकट-समयीं पुढें येऊन इतक्या परोपकारी स्वभावानें सर्वांबद्दल काळजी कां दाखवितात? यांचे अंगीं एवढा धीटपणा कसा आला? त्यांच्या पोषाखावरून त्या दक्षिणी ब्राह्मणाच्याच दिसताहेत; असें असतां अशा तऱ्हेची यांची वागणूक कशी? अशा प्रकारचे अनेक प्रश्न तिनें आपल्या मनास विचारले. या बाया ख्रिस्ती मिशनरी तर नसतीलना? असा सुद्धां प्रश्न तिच्या मनांत उभा राहिला. परंतु तिघींपैकीं दोघींच्या कपाळीं ठळक असें कुंकू दिसलें, तेव्हां तिचा तो संशय दूर झाला. आणि मनांतल्या मनांत प्रश्नोत्तरें करीत, ती त्यांचेबरोबर चालली. आतां त्या कंपाउंडाच्या वरून गेल्या नाहींत. ज्या जागीं अपघात झाला तेथून सुमारें दोनशें पावलांवर फाटक होतें, त्या फाटकानें जाण्यास निघाल्या. चालतांना साहजिकच त्यांपैकीं एकीनें, जिच्या कपाळीं कुंकू नव्हतें तिनें कमलेस तुम्ही कोठें असतां, असा प्रश्न विचारला. तेव्हां आतां उत्तर काय द्यावें हा मोठा बिकट प्रश्न कमलेस येऊन पडला. या प्रश्नाचें उत्तर द्यावें काय? आपल्या बापाचा पत्ता सांगावा, तर अर्थातच इष्ट नव्हे, कारण मग आपल्यास त्यांच्याकडे जावें लागेल, आणि तसें जाणें तर आतां आपल्यास अगदीं अशक्य. आपण आतां कोणत्या तोंडानें त्यांच्या पुढें जाऊन उभ्या राहणार? आणि त्यांस काय सांगणार? आपण एकाएकीं निघून जाऊन त्यांच्या तोंडाला काळीमा लावला. तो धुऊन टाकीपर्यंत आपण त्यांच्याकडे जाणार कशा? हे सर्व प्रश्न तिच्या मनांत एकदम उभे राहून ती अगदीं स्तब्ध होती. आपल्या प्रश्नास ती मुलगी उत्तर देत नाहीं हें पाहून त्या स्त्रीसही फार चमत्कारिक वाटलें, परंतु कमलेस प्रथमतः त्या बायांनीं शुद्धीवर आणलें तेव्हांचे तिचे पहिले उद्गार तिला आठवून तिला एकदम वाटलें कीं, ही मुलगी कांहीं तरी संकटांत सांपडलेली असावी. निदान हिचें एकंदर वर्तन कांहीं तरी गूढ कारणांनीं प्रेरित असावें. तेव्हां आपण आतां हिला ज्यास्तीकसती न विचारतां आपल्या बंगल्यांत न्यावें, आणि मग स्वस्थपणानें तिच्याशीं मायेनें बोलून, तिच्या पोटांत शिरून तिची हकीकत काय आहे ती काढून घ्यावी, असा विचार करून तिला घेऊन त्या चालल्या, आणि थोड्याच वेळांत त्या आपल्या बंगल्यांत जाऊन पोंचल्या. कमला व तिच्याशीं बोलणारी बाई या दुसऱ्या बायकांच्या बऱ्याच पुढें आल्या होत्या.

त्या बंगल्यांत जातात, तोंच एका गृहस्थानें कुंकू नसलेल्या त्या बाईस म्हटलें, "ताई, चला, चला, चला, डॉक्टर तुह्मांला हांका मारीत आहेत. त्या वृद्ध गृहस्थांची शुश्रूषा जर उत्तम प्रकारें ठेविली, तर ते खास जगतील. त्यांच्या शरीरांतील कोणत्याही जीवनेंद्रियाला धक्का लागलेला नाहीं. मस्तकावर मात्र फार मोठे आघात बसलेले आहेत. त्यामुळें ते शुद्धीवर येण्यास किती दिवस लागतील, याचा नेम नाहीं, तर तुह्मी चला."

तें एकण्याबरोबर ती "ताई" या नांवानें संबोधिलेली स्त्री झटकन् बंगल्यांत शिरून उजवे बाजूस लांबचे लांब दालन होतें तिकडे गेली. कमलाही सहजगत्या तिच्या

मागोमाग गेली. दुसऱ्या दोघी बायका थोड्या मागें होत्या हें वर सांगितलेंच आहे. ताई गेल्या त्या नेमक्या एका खोलींत गेल्या. खोली ह्मणजे त्या दालनांतच मध्यें मध्यें कापडाचे पडदे लावून केलेली होती. ताई तेथें जातांच दादासाहेबांच्या जखमा पुसून धुऊन बांधीत असलेल्या डॉक्टराजवळ गेल्या व पटकन् त्यांस मदत करूं लागल्या. कमला तशीच तेथें उभी राहिली, इतक्यांत तिची दृष्टि त्या वृद्ध गृहस्थाच्या चेहऱ्यावर जाऊन तिला नकळत तिच्या तोंडून "अगबाई, मामंजी!" असे उद्गार निघाले.

# प्रकरण ७४ वें.

## आजाऱ्याची शुश्रूषा.



कमलेच्या तोंडून ते उद्गार निघतांच त्या खोलींत काम करणाऱ्या डॉक्टराला आणि ताईंना फार आश्चर्य वाटून त्यांनीं थबकून वर पाहिलें. नंतर ताई शांतपणें कमलेस ह्मणते, "बाई, आजारी माणसाच्या खोलींत जाऊन गडबड करूं नये. तुह्मी तिकडे जा. मी येथलं हें काम आटपून तुमच्याकडे येतेंच."

परंतु ताई काय बोलल्या, तें कमलेस मुळींच ऐकूं आलें नाहीं. तिचें सर्व लक्ष्य त्या ह्माताऱ्याकडे होतें. हे या ठिकाणीं कसे आले? आणि जर या अपघातांत सांपडले आहेत, आणि आपण त्यांच्याबरोबर आहोंत, तर आपण त्यांची शुश्रूषा करणें हें आपलें कर्तव्यच आहे, परंतु ती वेळ कर्तव्याकर्तव्याच्या घटवटनेची नव्हे, हें जाणून ती धीटपणानें पुढें गेली व लागलीच पुढें जाऊन ताईस ह्मणाली, "ताई, मी आपल्याला मदत करतें, आपण सांगाल तें काम करण्यास मी तयार आहें." तें ऐकून डॉक्टर चमत्कारिक दृष्टीनें तिजकडे पाहूं लागला. परंतु ताई शांतपणें तिजकडे पाहून ह्मणाल्या, "कांहीं चिंता नाहीं. आह्मांला माणसांची जरूरीच आहे. तुम्ही राहिलां तर फारच उत्तम होईल. पण सध्या तुह्मी इथें नका बसूं. रोग्याला गडबड होते. मी तुमच्या पाठोपाठ येतेंच." असें म्हणून ताईंनीं एका नौकरास हांका मारून 'यांना माझ्या खोलींत नेऊन पोंचव' ह्मणून सांगितलें. तेव्हां नाइलाजास्तव ती तेथून निघून गेली.

ताईच्या खोलींत गेल्यावर तिला दुसऱ्या एका स्त्रीनें "आपण आतां येथेंच प्रातर्विधि करून थोडा उपहार करून, मग कुठें जायचं तें जा; मग आपल्याला एक गाडी आणून देववूं" असें सांगितलें. कमलेला इतका वेळ आपण आहोंत कोठें आणि ही मंडळी कोण, याचा विचार

करण्यास मुळींच वेळ सांपडला नव्हता. परंतु आतां तो चांगलाच सांपडून ती आपल्या सभोंवार पाहूं लागली, तों तिला हें दिसून आलें कीं, येथली मंडळी-स्त्रिया व पुरुषही–विशेष प्रकारचा पोषाख घालतात. सगळ्या पुरुषांचा पोषाख सारखा आणि सगळ्या स्त्रियांचाही सारखाच आहे, व त्यांत भगव्या रंगाची विशेष आवड. तेव्हां हें स्थान कोणाचें ? आणि येथें काय करतात ? हें जाणण्याची तिला साहजिकच जिज्ञासा झाली. एक तर तिला असें वाटलें, कीं ही मंडळी खिस्ती तर नव्हेत, परंतु त्या प्रश्नाचा निकाल एका क्षणार्धांतच लागला. कारण तिच्या समोरच्या द्वाराचे वरचे बाजूस "ॐ तत्सद् ब्रह्मणे नमः" अशीं अक्षरें मोठमोठालीं व शोभिवंत अशीं काढलीं होतीं. तेव्हां मंडळी तर खिस्ती नव्हे खास, असें तिला पक्कें दिसलेंच. विचार करितां करितां तिला एकदम असें आठवलें कीं, 'भावानंद' नांवाच्या कोणी एका गृहस्थानें ब्रह्मचर्यव्रत धारण करून व आपल्या दुर्दैवी बहिणीला व दुसऱ्या एक दोन पुरुषांना व स्त्रियांना आपल्या मताचें अनुकरण करावयाला लावून मठ स्थापिले आहेत, तर हा मठ नव्हे ? असा प्रश्न मनांत येतांच तिनें विशेष दृष्टीनें चहूंकडे पाहिलें. भावानंदाविषयीं आपण काय काय ऐकिलें होतें, तें सर्व ती मनांत आठवूं लागली. होतां होतां तिला असें आठवलें, कीं त्या भावानंदाची एक बहीण त्याच्याच पंथांत शिरली होती. शिवाय जी त्याची पत्नी झाली असती, ती यानें ब्रह्मचर्याचें व्रत स्वीकारण्याबरोबर त्याचीच अनुयायिनी बनून आपणही ब्रह्मचर्यमतानें राहून सत्कार्यांत काल घालविण्याचा तिनें निश्चय केला आणि त्याच्याचजवळ राहिली. पुढें तो भावानंद वारला, तरी त्याचे एक-दोन शिष्य त्यानें स्थापिलेल्या मठांत राहून काम करूं लागले आहेत. हें जों जों आठवूं लागलें, तों तों तिला आपण खास त्याच मंडळींत आलों आहों असें वाटूं लागलें. आणि ती मग निराळ्या दृष्टीनें सभोंवार पाहूं लागली. संसाराच्या बंधनांत न पडतां, किंबहुना कोणच्याही बंधनांत न पडतां. आपल्या देशाच्या राजकीय व सामाजिक उन्नतीकरितां झटण्यासाठीं अशी कांहीं मंडळी निघाली आहे असें तिनें एकवार ऐकलें होतें. त्यांचें एक "नवे विचार" नांवाचें वर्तमानपत्रही निघत असतें, त्याचे कांहीं अंक तिनें पाहिले होते. परंतु तिच्या बापाचे परमस्नेही जे गणपतरावकाका, त्यांचें या मठाविषयीं व तें स्थापन करणाऱ्या भावानंदाविषयीं चांगलें मत नसल्याकारणानें, त्यांनीं तें वर्तमानपत्र घेऊं नये. कोणी तरी टारगी मंडळी कांहीं थोतांड माजवून कांहीं तरी करीत आहेत, असें आपल्या स्नेह्यांस सांगितलें होतें. तेंच अर्थात् त्यांच्या वचनामुळें बळवंतरावाच्या व त्यांच्या कुटुंबाच्या मनांत ठसलें व त्यामुळें या मठाचें व त्या वर्तमानपत्राचें नांवसुद्धां बळवंतरावांच्या घरांत निघत नसे. पण आज कमलेनें तो मठ प्रत्यक्ष पाहिला आणि तिचे मनावर कांहीं विलक्षण परिणाम झाला. आपल्या तर्काप्रमाणें भावानंदाचा मठ जर हाच असेल, तर काकांनीं रागावून शिव्या देण्याइतकें यांत काय असावें ? तिच्या डोळ्यांसमोर तर कांहींसुद्धां वावगें दिसलें नाहीं. बंगल्यांत टापटीप म्हणजे अगदीं मूर्तिमंत उभी आहे कीं काय असें वाटावें, अशी जिकडे तिकडे लख्ख व्यवस्था. कोणी

कोणाशीं वायफळ बोलत बसलेलें, किंब-हुना मोठ्यानें बोलत असलेलेंसुद्धां कोठें कोणी दिसत नाहीं. जो तो अगदीं हलके दुसऱ्याजवळ काय बोलायचें तें बोलून आपलें कार्य झालें कीं, आपण आपल्या कामास जावयाचें. असा एकंदर प्रकार पाहून कमला आपलें सर्व दुःख विसरली. आपण विलक्षण संकटांत सांपडलों असतां, जेव्हां आतां कोठें जावें हीच पंचाईत आपणास पडली होती अशा वेळीं केवळ अपघाता-मुळें या विलक्षण स्थानीं यावें, याचेंच तिला अतिशय आश्चर्य वाटलें. लागलीच तिच्या मनांत असेंही वाटलें कीं, आप-णही या स्त्रियांप्रमाणें येथेंच राहून काल-क्रमणा कां करूं नये ? आतां आपण आ-पल्या बापाकडे परत जाणें शक्य आहे काय ? ते आपल्यास पुनः आपल्या कृपा-छत्राखालीं घेतील काय ? असे प्रश्न तिच्या मनांत उभे राहूं लागले आणि आतां आ-पण परत जाण्यांत मुळींच तात्पर्य नाहीं. जमल्यास येथेंच राहावें, असाही विचार तिच्या मनांत आला. ज्या संस्थेविषयीं आपले काका आपल्या वडिलांजवळ नेहमीं तिरस्कारानें व तुच्छतेनें बोलत असतात, तीच संस्था ही असली, तर तो त्यांचा तिरस्कार केवळ अनाठायीं होय, असें तिच्या मनानें घेतलें व कोणी तरी आपल्याशीं बोलायला येईल तर मग त्याच्यापासून सर्व हकीकत विचारून घेऊं, असा तिनें बेत केला. कोणी तरी येईल केव्हां, आणखी मी त्याच्यापासून सर्व हकीकत विचारून घेईन केव्हां, असें तिला होऊन गेलें होतें. तिचें मुखमार्जन वगैरे झाल्यावर तिला एका स्त्रीनें दुसऱ्या एका त्या मंडळीच्या जेव-णाच्या खोलींत नेलें व तिला थोडेंसें दूध आणून दिलें. आणि तें घेण्याविषयीं आग्रह केला. ती होय नाहीं म्हणणार, तोंच तिकडून ताई आल्या आणि त्यांनींही तिला आग्रह केला. तेव्हां तें तिनें मुका-ट्यानें घेतलें. नंतर ताईनींही तिला "आतां तुह्मांला कुठें जायचं ?" म्हणून विचारलें. हा प्रश्न केव्हां तरी येणार हें तिचें तिला ठाऊकच होतें. प्रश्न येण्याबरोबर उत्तर काय द्यावें हें तिला सुचेना. ती स्तब्ध बसली व तटस्थपणें ताईकडे पाहूं लागली. ताईनाही तिच्या या वर्तनाचा अर्थ समजेना. इतक्यांत त्यांस असा भास झाला कीं, आपल्या समोर उभ्या राहि-लेल्या या तरुण मुलीचे डोळे पाण्यानें भरून आले. त्याबरोबर ताईच्या मनास असें वाटलें कीं, या मुलीवर कांहीं तरी संकट आलें असावें. कदाचित् तिला आपण येथेंच अधिक प्रश्न विचारले, तर ते अश्रु गळूं लागतील, तर तिला एकी-कडे नेऊन बसवून तिचें समाधान करून काय आहे, काय नाहीं विचारावें. असें मनांत येतांच तिनें कमलेस, "चला, आपण माझ्या खोलींत जरा स्वस्थ बसूं, आणखी मग आपल्याला जेथें जायचं तेथें गाडींतून एक माणूस बरोबर देऊन पोंचवून देऊं." असें म्हणून तिचा हात धरला व तिनें तिला दुसऱ्या बाजूच्या दालनांतील एका लहानशा खोलींत नेलें. त्या खोलींत जातांच तिनें तिला एका खुर्चीवर बसविलें व त्या तिला म्हणतात, "अपघातांतून तुह्मी वांचलांत ही केवढी आनंदाची गोष्ट ! एवढ्या थोरल्या अप-घातांत चार दोन माणसांस फार, आणि दोन तीन माणसांसच थोडें लागावें हें आश्चर्य आहे नव्हे !"

कमला तें ऐकून आपल्या डोळ्यांचें पाणी पुसून म्हणते, "खरंच, पण त्या

वृद्ध गृहस्थांस–माझ्या सासऱ्यांस–किनपत लागलं आहे ? त्यांच्या जीवाला तर कांहीं भीति नाहींना ? ते अगदींच बेशुद्ध पडले आहेत म्हणून ह्मणतें, " असा प्रश्न केला. तेव्हां ताईनीं ह्मटलें, " आतांच डॉक्टरांनीं त्यांच्या जखमा वगैरे बांधून तपासणी केली. त्यावरून त्यांना असं वाटतं, कीं ह्मातान्याच्या मेंदूस बराच मोठा धक्का बसला आहे. त्यांतून शुद्धीवर येण्यास त्यांस किती अवधि लागेल तें सांगतां येत नाहीं. बाकी दुखापत कांहीं विशेष म्हणण्याजोगी नाहीं. मात्र त्यांना येथून हलवतां येणार नाहीं आणि अहोरात्र डोळ्यांत तेल घालून शुश्रूषा केली पाहिजे, तरच ते यांतून पार पडण्याचा संभव आहे. आणि तशी शुश्रूषा आम्ही इथें करूं, तुम्हांला त्याची काळजी नको. "

" छे. छे. मला कसली काळजी ? पण इच्छा एवढीच आहे कीं, माझ्या हातून शुश्रूषा घडावी आणि त्यांतून ते वांचून आपल्या घरीं जावे. तुमची हरकत नसली, तर मला तुह्मी येथेंच ठेवून घ्या. मी त्यांची अगदीं मनापासून सेवा करीन. मला तरी आतां–" परंतु तिच्या तोंडून पुढें एक अक्षरसुद्धां निघेना; किंवा आपण काय बोलत होतों, तें बोलूं नये असें वाटून तिनें तितक्यांच जीभ चावली. हें सर्व ताईंच्या लक्ष्यांत आलें. तथापि त्यांनीं तसें कांहीं न दाखवितां कमलेस ह्मटलें, " काय ? मला तरी आतां–असें म्हणून थबकलां कां ? मला सांगण्याजोगं असलं, तर बेलाशक सांगा. "

ताईनीं एवढें ह्मटलें मात्र आणि कमलेला एकदम भडभडून आलें. ताईंच्या त्या दृष्टिक्षेपांत, आपणास जिची फार अवश्यकता ती सहानुभूति पूर्णपणें भरली आहे, असें तिला वाटलें. दुःखाचा पहिला उद्रेक किंचित् शांत झाल्यावर ताईनीं तिच्या खांद्यावर हात टाकून व प्रेमपूर्ण आणि सहानुभूतीनें युक्त अशा नेत्रांनीं तिजकडे पाहिलें. नंतर एकदां तिला जवळ ओढलें आणि ह्मटलें, " घाबरूं नका. धीर सोडूं नका, जर तुम्ही कोणच्या संकटांत असलां, तर तुह्मांला त्यांतून निभावून नेण्याचा पुष्कळ प्रयत्न केला जाईल. अगदीं घाबरूं नका. या मठांत असणारे प्राणी पूर्वी बहुतेक दुःख भोगूनच तावूनसुलाखून येथें आले आहेत. " हें बोलत असतां ताई कमलेच्या पाठीवरून हात फिरवूं लागल्या. आपली आईच आपल्यास अशा तऱ्हेनें कुरवाळून आपलें समाधान करीत आहे काय, असा कमलेस भास झाला. तेव्हां तर तिला फारच रडूं आलें. ताईनीं तिला कांहीं वेळ तसेंच रडूं दिलें. शोकास आरंभ होतांच तो आवरून धरण्याचा प्रयत्न केला असतां त्यांत बहुतकरून यश येत नाहीं. त्याचा पहिला वेग ओसरूं दिला, ह्मणजे त्याच्या पुढच्या वेगास वाटेल तसा बंधारा आपल्यास घालतां येतो. असा विचार करून त्यांनीं तिच्या पाठीवर नुसता हात ठेवून प्रेमार्द्र दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें. नंतर थोड्या अवकाशानें त्या तिला ह्मणाल्या, " तुमच्याप्रमाणं दुःखी प्राण्यांचीच ही जागा आहे. तुम्ही अगदींसुद्धां शोक करूं नका. जर कांहीं सांगण्याजोगं असलं, तर तुह्मी संकोच न करितां मजजवळ सांगा. जर नसलं, तर सांगूं नका. तुह्मांला जेथें जायचं असेल तेथें जा. पण कधीं काळीं कांहीं कामांत कोणाची मदत तुम्हांला पाहिजे असेल, तर तुम्ही अगदीं संकोच न धरतां

येथें या. मी तुह्मांला यथाशक्ति मदत करीन," असें म्हणून त्या तिजकडे पहात बसल्या.

इतक्यांत एका गड्यानें एक मराठी वर्तमानपत्र आणून टाकलें. तें बाहेर कोणी तरी उघडून पाहिलें असावें असें दिसलें. मजकुराची बाजू उलटलेली होती. विलक्षण योगायोगानें असें झालें कीं, तें वर्तमानपत्र कमलेच्या पुढेंच त्या गड्यानें टाकलें. 'लोकल' या सदराचा कालम मध्येंच होता. कमला शून्यदृष्टीनें पहात होती. "आपण आतां आपली सगळी हकीकत या बाईस सांगावी कीं कसं काय," याचा तिच्या मनांत विचार घोळत होता. विचार चालतां चालतां सहज तिच्या हातांनीं तें वर्तमानपत्र उचललें लोकल कालमांत पहिलाच प्यारा तिच्या दृष्टीस पडला तो असाः—

"येथील एका अट्टल सुधारकाची पुनर्विवाहित स्त्रीपासून झालेली मुलगी घरांतील मंडळीस न विचारतां काल रात्रीं कोठें नाहींशी झाली आहे. थोडे दिवसांपूर्वीं एका बी. ए. उपाधी धारण करणाऱ्या सुधारक तरुणानें हिचें पाणिग्रहण केलें; परंतु लागलीच कांहीं कारणानें त्यानें तिचा त्याग करून देशांतरीं गमन केलें. आह्मी आतांच यासंबंधानें कांहीं लिहूं इच्छीत नाहीं; परंतु हल्लींचें स्त्रीशिक्षण, प्रौढ वयापर्यंत मुलगी ठेवणें आणि तीही एक प्रकारें अनुचित विवाहापासून झालेली मुलगी, मग जें झालें याखेरीज दुसरें कांहीं झालें असतें तर आश्चर्य! जें झालें त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं! यासंबंधानें आणखी माहिती लागतांच आह्मी ती वाचकांस सादर करूं. कारण अशा उदाहरणांचा चांगला परिस्फोट करून सुधारकांची फटूफजिती केल्याखेरीज त्यांची बंडाळी मोडणार नाहीं."

तो प्यारिग्राफ वाचतांच तिच्या अंगावर शहारे येऊं लागले. सर्वांग थरारलें, मस्तक फिरूं लागलें आणि तिच्या हातचें तें वर्तमानपत्र गळून पडून ती एकदम बेशुद्ध पडली.

ताईनीं आपल्याकडून खूप प्रयत्न करून तिला शुद्धीवर आणलें व "सध्या तुम्ही कांहीं बोलूं नका, कांहीं वेळ स्वस्थ निजा म्हणजे तुमचं डोकं उतरेल; मग काय बोलायचं तें बोलूं." असें म्हणून ती नको नको म्हणत असतां त्यांनीं तिला आपल्या अंथरुणावर निजविलें. आणि तिला लवकर झोंप यावी म्हणून त्या तिचें क्षुब्ध व तप्त मस्तक हळूहळू चेंपीत बसल्या. कमलेनें डोळे मिटले होते, परंतु तिच्या मस्तकांत विचार चाललेच होते. ताई वयानें तिच्या आईइतक्या प्रौढ नव्हत्या, परंतु त्यांची एकंदर वागणूक व प्रेमळपणा हीं अगदीं तिच्या आईप्रमाणेंच तिला भासलीं; इतकेंच नव्हे, तर ती डोळे मिटून पडली असतां तिला असा भास झाला कीं, आपली आईच या असल्या दुर्घट प्रसंगीं आपल्याजवळ बसून आपलें सांत्वन करित आहे. आपली आई जिवंत असती, तर एक तर आपण ज्या अविचारानें वागलों, त्या अविचारानें वागलों नसतों. तसें वागणें शक्यच नव्हतें. परंतु जरी यदाकदाचित् वागलों असतों, तरी तिच्याजवळ पुनः परत जाऊन झालेला अपराध कबूल केला असता तर तिनें आपल्यास परत आपल्या छत्राखालीं खचित् घेतलें असतें. असा विचार येऊन पुढें तिला असेंही वाटलें कीं, ताई या आपल्या आईप्रमाणेंच विश्वासयोग्य व मायाळू आहेत. दुःख अति झालें, म्हणजे

त अति अन्नाप्रमाणें एकदां केव्हां पोटां-तून काढून टाकूं असें होत असतें. त्याप्रमाणेंच कमलेची अवस्था होऊन ती एकदम मध्येंच उठून बसली आणि ताईच्या गळ्याला मिठी मारून तिनें, आपण कोण व काय कारणानें अशा येथें आलों तें सगळें यत्किंचितूही संकोच न धरतां त्यांना सांगितलें. ताईनीं तें शांतपणें ऐकून घेतलें आणि त्याही एकदम गहिंवरून कमलेस म्हणतात, "मुली, तुझ्यासारखी दुर्दैवी व दुःखी तूंच आहेस असें समजूं नकोस. तुझ्याहीपेक्षां अधिक दुर्दैवी आणि दुःखी माणसं या जगांत आहेत. त्यांच्याकडे आपण पहावं म्हणजे आपल्या दुर्दैवाचं व दुःखाचं आपल्याला तितकं कांहीं वाटत नाहीं. माझी जन्मकथा जर तूं ऐक-शील, तर तुला आपल्याहीपेक्षां दुर्दैवी प्राणी आहेत हें समजून येईल. तेव्हां तूं आतां उगीच आपल्या मनास दुःख देत बसूं नको. आपल्या सारख्यांना परसेवे-सारखं दुसरं कोणचंही उत्कृष्ट कार्य नाहीं. माझा अत्यंत प्रियकर भाऊ अकालीं वारला, त्यानं ही संस्था स्थापन केली आणि मी व त्याच्या मित्रांनीं ती नेहमीं चालवावयाची असा पक्का निश्चय केला आहे, व त्याप्रमाणं लोकांच्या दुराक्षेपांस न जुमानतां आजपर्यंत दोन चार वर्षं तर आम्हीं आपलं धैर्य डगमगूं दिलं नाहीं. तूं आतां इथेंच रहा आणि तुला जरा बरं वाटूं लागलं, म्हणजे आम्हाला मदत करूं लाग. तुझ्या सासऱ्याचीच शुश्रूषा कर-ण्यास प्रारंभ कर. मायेच्या माणसाची आज त्यांस फार जरूर आहे."

# प्रकरण ७५ वें.

## तिसऱ्या दिव्यास सुरुवात !



कमला उठून बसली होती, परंतु ताईनीं तिला आग्रह करून पुनः निजविलें, तरी तिचे विचार सुरू झाले. आपल्या सासऱ्याची आपण शुश्रूषा करावी आणि येथेंच आतां रहावें, कोठें जाऊं नये, हा विचार तिला फार चमत्कारिक वाटला. ही संस्था काय आहे, हें अधिकाधिक समजून घेण्याची तिला इच्छा झाली. आज चार वर्षेपर्यंत ही संस्था असून आपण कधीं कांहींच हिच्यासंबंधानें ऐकलें नाहीं हें कसें ! असें तिला वाटून ती स्मरण करून पाहूं लागली, तों तिला अंधक अंधक असें आठवलें कीं, कोणी एक तरुण गृहस्थ थोडे दिवसांपूर्वी आजन्म ब्रह्मचर्यव्रतानें रहावयाचें असा निश्चय करून संन्यास ग्रहण करून गांवोगांव हिंडण्यास व तेथें व्याख्यानें देण्यास लागला होता खरा. त्याचें कोणा मुलीशीं लग्न व्हावयाचें

ठरलें असून, ऐनवेळीं केव्हां उपरति होऊन त्यानें विवाहाचा विचार सोडला आणि ब्रह्मचर्यव्रत आचरण्याचा निश्चय केला. त्याची विधवा बहीण व त्याची भावि बायको याच त्याच्या प्रथम शिष्यिणी झाल्या आणि आणखी कांहीं तरुण गृहस्थ–निरनिराळ्या कॉलेजांतून–त्यांना मिळाले; परंतु तो मूळ गृहस्थ एकाएकीं वारला. अशाबद्दल अनेकवार आपले वडील व आपले गणपतरावकाका हे बोलत असें तिला स्मरलें. परंतु त्याच्या-बद्दल असेंही पण स्मरलें कीं, आपल्या गणपतरावकाकांचें त्या संस्थेबद्दल चांगलें मत नव्हतें. ते त्या गृहस्थास फाजील व माथेफिरू म्हणत. तेव्हां तीच ही संस्था असेल काय! ताई या त्या गृहस्थाची बहीण असाव्यात आणि दुसरी एक तरुण मुलगी दिसली, ती कदाचित् त्या गृहस्थाची भावि पत्नी असेल, असा तिनें तर्क केला. तेव्हां घरदार सोडून निघालेल्या आपल्या-सारख्या निराश्रित मुलीस येथें रहाण्या-खेरीज दुसरा मार्ग काय! आतां आपण आपल्या वडिलांस तोंड दाखविण्यास कशा जाणार! ते आपल्यास आपल्या छत्राखालीं घेतील! आपण त्यांना काय सांगणार! जी हकीकत झाली, ती सांगणार काय! येथपर्यंत तिचे विचार ठीक होते आपण त्यांस भेटून झालेली सर्व हकीगत सांगावी, तीं पत्रें दाखवावीं, म्हणजे सर्व कांहीं ठीक होईल, असें तिच्या मनांत आलें. परंतु हें किती वेळ टिकलें! लागलीच तिच्या मनांत दुसरा एक प्रश्न उभा राहिला, आणि त्या प्रश्नानें तिला समूळ निराश करून सोडलें. आपण हें सर्व सांगितलें आणि पत्रें दाखविलीं, म्हणून आपल्या हकीकती-वर व त्या पत्रांवर बाबांचा भरंवसा बसेल काय, हा प्रश्न तिच्या मनांत उभा रहाण्या-बरोबर 'हो, बसेल तर काय झालं! त्यांचा आपल्यावर गैरभरंवसा होण्याला कार-णच नाहीं.' असें उत्तर तिच्या मनांत आलें, परंतु तें क्षणभर सुद्धां टिकलें नाहीं. लागलीच असें वाटलें, कीं भरंवसा बसे-लच म्हणून काय सांगावें! त्यांना तरी त्या दुष्ट वर्तमानपत्रांत ध्वनित केलेली शंका कां येऊं नये! काय बाबांनाच शंका येईल! ती कां यावी? या शेवटल्या प्रश्नास उत्तर तिला सुचेना आणि एकदम तिला असें वाटूं लागलें, कीं तीच शंका त्यांस येईल आणि आतां ते आपला अंगिकार करणार नाहींत. अंगिकार करा म्हणून म्हणायला त्यांच्यापुढें आपण पुनः जाण्याला आतां आपल्याला तोंडच नाहीं. आपला ते तिरस्कार करतील, आपल्यास काय वाटेल तें बोलतील, आणि आपण तें मुकाट्यानें सहन करून स्वस्थ बसलें पाहिजे. असे अनेकविध विचार तिच्या मनांत उभे राहून तिला एकदम रडूं कोस-ळलें आणि ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. ताई तिच्याजवळ बसल्या होत्या. त्यांनीं आपल्याकडून तिची अनेकप्रकारांनीं सम-जूत घातली. तूं जरा स्वस्थ हो, मग तुला आपल्या वडिलांकडे जायचें असेल तर तिकडे पोंचवून देऊं, अगर त्यांना तूं इथें आहेस हें कळवून इकडेच बोलवायचें असलें, तर तसें करूं. पण कालच्या साऱ्या दगदगीनें आणि या विलक्षण प्रसंगानें तूं फार अस्वस्थ झाली आहेस, तर तूं अगदीं स्वस्थ पडून रहा. झोंप आल्याखेरीज तुला शांतता वाटा-यची नाहीं. तुला झोंप येईल असें कांहीं तरी औषध देतें. असें म्हणून ताई उठूं लागल्या; परंतु यांनीं

आतां आपल्यापासून उठूं नये, आपल्याजवळ बसावें, आपल्या कपाळावरून हात फिरवावा, आपल्याशीं बोलावें असें कमलेला वाटूं लागलें होतें. आपली आईच पुनः बरीच तरुण होऊन, आपल्यास आपल्या या संकटांत मदत करण्यास आली आहे, असें तिला वाटूं लागलें, या श्रद्धेनें ती ताईकडे–ताईच्या प्रत्येक चलनवलनाकडे–पाहूं लागली. त्या कल्पनेनें तिच्या मनावर पूर्ण स्वामित्व केलें. आपल्या आईच्या अभावीं हीच आपल्यास आई, हिच्याच सांनिध्यानें व उपदेशानें आपलें हित होणार, आपण हिलाच आतां चिकटून रहावें, असें तिच्या मनानें पक्कें घेतलें, व वस्तुतः पहातां आपला बाप पुनः आपल्यास आपल्या छत्राखालीं घेईल कीं नाहीं, आपल्यावर भरंवसा ठेवील कीं नाहीं, याबद्दल शंका घेण्यास तिला मुळींच कारण नव्हतें. परंतु मनुष्याच्या स्वतःच्या हातून विलक्षण चूक झाली असली म्हणजे त्याबद्दल क्षमा होणार नाहीं असेंच त्याला वाटूं लागून, आपल्या आपल्याच विचारांनीं व कल्पनांनीं तो आपल्या आपल्या ठिकाणीं मृतवत् होतो. तीच अवस्था यावेळीं कमलेची झाली. तिला असें पक्कें वाटलें कीं, आतां आपले वडीलही–न जाणों–आपल्याबद्दल भलतेच कुतर्क करतील. विचार अति विलक्षण, किंबहुना भयंकर, परंतु तो विचार एखाद्या पिशाचाप्रमाणें–दुष्ट ग्रहाप्रमाणें–तिच्या मनास ग्रासून बसला. आणि त्यांत त्या वर्तमानपत्रांतील पॅरिग्राफानें चांगलीच भर घातली होती; किंबहुना त्या वर्तमानपत्रांतील पॅरिग्राफानेंच त्या प्रश्नास तिचे मनांत जन्म दिला!

ताई आपला दुसरा सर्व उद्योग सोडून तिच्याजवळ बसून राहिल्या. त्यांच्या मनांत तिच्याबद्दल वात्सल्य उत्पन्न झालें. या अशा वयांत नवरा चांगला मिळाला असतां त्यानें त्याग करावा, आणि त्या त्यागानें वेडावून जाऊन कांहीं कारणानें अविचार झाला असतां असला दुर्धर प्रसंग यावा, यासारखें कोणतेंही दिव्य नाहीं असें त्यांसही वाटलें. त्यांनींही एकंदर सर्व गोष्टींचा विचार करून त्यांस असें वाटलें कीं, या मुलीचा बाप फारच विचारी असल्याखेरीज त्याला सुद्धां हिचें भाषण खरें वाटायचें नाहीं. आणि त्याला जर का खरें वाटलें नाहीं, असें एकदां हिच्या निदर्शनास आलें, तर हिच्यासारखी दुर्दैवी व दुःखी हीच. परंतु हिला जरा बरें वाटलें, म्हणजे हिच्याकडून त्यांना एक सविस्तर पत्र पाठवूं अगर त्यांना येथें बोलावून सर्व हकीकत सांगून त्यांचे मनांतील किंतु काढून टाकूं, असें त्यांच्या मनांत आलें. इतकेंच नव्हे, तर त्याप्रमाणें आपण करूं म्हणजे बहुतकरून सर्व कांहीं तुझ्या मनाप्रमाणें होईल, असें ह्मणून त्यांनीं कमलेचें समाधानही केलें. तेवढ्यानें अल्पस्वल्प समाधान झालें म्हणून म्हणा, किंवा तिच्या मेंदूस आतां विश्रांतीची विलक्षण अवश्यकता असल्यामुळें स्वभावतःच ह्मणा, तिला किंचित् गुंगी आली. इतकेंच नव्हे, तर थोड्या वेळांत निद्राही लागली. हें एका तऱ्हेनें फारच चांगलें झालें असें वाटून ताईही मोठ्या आस्थेनें तिच्याजवळ बसून कौतुकानें तिजकडे पहात राहिल्या. त्यांच्याही मनांत त्यावेळीं आपल्या स्वतःच्या चरित्रांतील कित्येक गोष्टी उभ्या राहून त्यांचें मन पूर्वेतिहासांत गुंतून राहिलें. नंतर सहजच त्यांस असेंही वाटलें, कीं न जाणों, आमच्यासारख्यांवर अशा

तऱ्हेचे प्रसंग येण्यांतच परमेश्वराची कांहीं तरी इच्छा असेल!

कमलेस झोंप लागल्यानंतर ताई हलकेच उठून त्या म्हाताऱ्याकडे गेल्या. त्याच्या जखमा वगैरे बांधून त्यास औषधपाणी करूनच त्या इकडे आल्या होत्या. म्हातारा मुळींच शुद्धीवर नव्हता. त्या म्हताऱ्याकडे पुनः पाहून त्यांच्या मनांत कमलेची हकीकत उभी राहिली व सासरा आणि सून दोघेंही काय चमत्कारिक प्रसंगानें एकदम आपल्या या मठांत यावीं हा काय चमत्कार आहे! असें वाटून पुढें असेंही वाटलें कीं, न जाणों या चमत्कारिक योगायोगामुळेंच पुढें ह्या मुलीचें कल्याण होणार असेल.

त्यांनीं जाऊन म्हाताऱ्याच्या उशागिर्‍या नीट केल्या, औषधाची वेळ होतांच त्याला औषध पाजलें आणि त्या आपल्या दुसऱ्या कामाला निघून गेल्या. ताई त्या संस्थेंतली उत्साहदेवताच होती.

कमलेस चांगली एक प्रहरभर झोंप लागली. ती आपण होऊन जागी होऊन उठेपर्यंत तिला कोणीही उठविण्यास आलें नाहीं. ताई मात्र दोन तीन वेळां अगदीं गुपचिपपणें तिचें कसें काय आहे, हें पहाण्यासाठीं येऊन गेल्या, प्रत्येक खेपेस त्या तिच्या उशाशीं जात आणि अगदीं स्तब्धपणें उभ्या रहात. सुप्तावस्थेंत असतांनाही दुःखमय अशी दिसणारी त्या दुर्दैवी मुलीची चर्या पाहून त्यांस तिची फार कींव येई. आपण एक निराळ्या प्रकारांनीं वाढल्याकारणानें आपणावर निराळे प्रसंग आले, परंतु या मुलीचें पहिल्यापासून सर्व यथास्थित असून तिजवर दुर्दैवानें काय प्रसंग आणला पहा, असें वाटून त्यांस एकवार तर गहिंवरच आला, आणि त्यांचें चित्त तिच्या ठिकाणीं फार जडलें.

वर सांगितल्याप्रमाणें कमला सुमारें प्रहरभर निजली. नंतर ती कांहीं विलक्षण स्वप्नच पडून जागी झाली] असें दिसलें. ती जागी झाली, तेव्हां तिच्याजवळ कोणीच नव्हतें. तिनें घाबरत घाबरत डोळे उघडून ती तटकन् आंथरुणावर उठून बसली; आणि जणूं काय आपल्याला जें दिसत होतें तें आतां कोठें आहे, अशा हेतूनें सभोंवार पाहूं लागली; तों सभोंवार कांहीं नाहीं.! आपण [एका आंथरुणावर खाटेवर निजलों आहों, आपल्या जवळपास कोणी] नाहीं; आणि आजूबाजूला ओळखीचें असेंही कांहीं नाहीं. तेव्हां आपण आहों कोठें, होतों कोठें, हें लक्ष्यांत येण्यास तिला थोडासा वेळ लागला. जणूं काय त्या मधल्या झोंपेंत ती मध्यें झालेला सर्व प्रकार अगदीं विसरून गेली होती.—जर खरोखर विसरून जाती, तर आणखी काय पाहिजे होतें!—परंतु ही स्थिती कोठपर्यंत राहणार! जागेपणा येऊन जसजसा वेळ जाऊं लागला, तसतसा तिचा स्मृतिपटही जणूं काय उलगडून तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागला. पुनः पूर्ववत् सर्व विचार परत आले, आणि आतां आपण काय करावें हा पूर्व प्रश्न तिच्या समोर उभा राहिला. तितक्यांत तिला आपल्या सासऱ्याचें स्मरण झालें आणि इतर मंडळी त्यांची अशा प्रसंगीं शुश्रूषा करीत असतां आपण स्वस्थ निजणें अगर नुसतें काय करूं, कसं करूं, असें करीत बसणें ह्मणजे बरें नव्हे. जें व्हायचें असेल तें होईल, आपल्या बाबांस ताईनीं सांगितल्याप्रमाणें आपली काय हकीकत झाली ती कळवूं. त्यांचा भरंवसा बसला, तर ठीकच, नाहींपेक्षां आपण आतां ज्या संस्थेंत येऊन पडलों आहोंत, त्या संस्थेंतच मिळून आपलें

पुढलें आयुष्य क्रमण करावें यासारखें दुसरें कांहीं नाहीं, असा तिनें विचार करून एक दीर्घ उसासा टाकण्याला, आणि ताई तिची काय हालहवाल आहे ती पहाण्यासाठीं येथें येण्याला एकच गांठ पडली.

कमलेच्या शांत चेहऱ्यावरून ताईंनीं तेव्हांच ताडलें कीं, हिला लागलेल्या झोंपे-मुळें एकंदर बराच चांगला परिणाम झाला असून हिचें चित्तही आतां शांत झालें असावें. त्या त्यांच्या विचारास जणूं काय पुष्टि आणण्याकरितांच कमला एकदम त्यांस म्हणाली, "ताई, ताई, मी आतां इथेंच राहणार. तुम्ही आपलीं जीं कामं करणार, त्याच कामांत तुम्ही मला घेतलं पाहिजे, शिकविलं पाहिजे. तुम्ही ह्मणा-लांत त्याप्रमाणं मला शिकवा. मी आ-पल्या मामंजींच्या शुश्रूषेला लागणार. अहोरात्र जागत बसावं लागलं तरी मी जागेन—मला आजारी माणसांची शुश्रूषा चांगली करतां येईल. मला ती संवय आहे. माझ्या आईची शुश्रूषा मींच केली. तुम्ही मला एकदां सर्व कांहीं दाखवून द्या ह्मणजे झालं." तिचा तो उत्साह पाहून ताईंस फार आश्चर्य वाटलें, आणि त्यांनीं तिला "ठीक आहे मी तुला शिक-वीन" असें ह्मटलें.

झोंपेच्या तीन तासांत जणूं काय कम-लेच्या अंतर्यामीं निश्चय झाला आणि जागी होण्याबरोबर तिनें तो निश्चय कृतिरूपांत आणण्यास सुरुवात केली, असेंच एकंदर दिसलें. ती लागलीच उठली आणि ताईच्याबरोबर गेली. ताईनींही तिला लागलीच तिच्या सासऱ्याच्या खो-लींत नेलें आणि तेथें बसून काय काय केव्हां केव्हां करायचें हें सांगितलें. सध्या आतां वेळ भरली कीं औषध घालण्या-पलीकडे कांहींच करावयाचें नव्हतें. फक्त रोगी केव्हां शुद्धीवर येऊन कांहीं मागेल किंवा हालचाल करील, तर तावडतोब डॉक्टरांना अगर ताईला कळवावयाचें, एवढेंच काम आतां होतें. त्याप्रमाणें सर्व समजावून घेऊन कमला दादासाहेबांच्या अंथरुणापाशीं बसली. बसतां बसतां तिच्याही मनांत कालाच्या विचित्रतेचा विचार आल्याखेरीज राहिला नाहीं.

कमला निश्चयानें तेथें बसली आणि आपल्या पतीबरोबर आपण आनंदानें रहात असतांसुद्धां असा प्रसंग आपल्यास सांपडला नसता, हेंही तिच्या मनांत आलें. मनुष्य एकटेंच बसलें म्हणजे त्याच्या मनांत काय वाटतील ते विचार येत अस-तात. त्या विचारांना त्याच्याकडून आळा घालणें शक्यच नसतें. कित्येक वेळां तर तो आळा घालण्याची इच्छाही होत नाहीं. त्या विचारांतच निमग्न राहून काळ घाल-विण्यांत सुख वाटतें. कमलेची सद्यः-प्रसंगीं तशीच स्थिति होती. ती तेथें बसून राहिली, परंतु तिचें मन कांहीं तेथें नव्हतें; तें अनेक ठिकाणीं जाऊन अनेक प्रसंगांचें चिंतन करीत होतें. कमला तेथें बसल्यानें एक विशेष गोष्ट झाली. दादासाहेबांस सरकारी इस्पि-तळांत नेण्यासाठीं सरकारी माणसें आलीं होतीं. सकाळीं दादासाहेबांस तेथें आणलें हें केवळ या संस्थेच्या जवळपणामुळेंच तेथें त्यांस ठेवण्यांत आलें होतें. परंतु ज्यांस कोणी नाहीं अशा अपघातांत सांप-डलेल्या लोकांस सरकारी इस्पितळांतच नेलें पाहिजे, म्हणून पुनः मंडळी आली असतां कमलेनें आपण त्या आजारी गृह-स्थाची सून, आपली इच्छा त्यांना येथेंच ठेवावें अशी आहे असें सांगितलें व तेथें

व्यवस्थाही उत्तम असल्याबद्दल प्रत्यक्ष दिसत होतें, शिवाय रोगी हालविण्याच्या स्थितींत नव्हता. इतक्या सगळ्या गोष्टींचा विचार होऊन रोग्यास तेथेंच राहूं देण्याबद्दल अनुकूलता मिळाली. हें मध्येंच काय होतें असें कमलेस वाटलें होतें. कांहीं झालें, तिकडच्या इस्पितळांत जरी नेलें, तरी आपण त्यांच्याबरोबर जाऊन तेथें त्यांची शुश्रूषा करूंच, असें तिनें मनांत ठरविलेंच होतें. परंतु येथल्या येथेंच राहिलें असतां ताईचा सहवास हें एक आतां विशेष होतें. तेव्हां त्याचीही तिला अतोनात लालसा झाली. सर्व ठीक झालें. कमला आपल्या श्वशुराची शुश्रूषा अगदीं मनोभावानें करूं लागली. या शुश्रूषेंत आपण बाकी सर्व विसरून जाऊं आणि अखेर तेही बरे होऊन गेल्यानंतर आपण याच संस्थेंत काळ कंठूं. ज्यांच्याशीं सगळा जन्म घालवावयाचा त्यांनाच भलता संशय येऊन त्यांनीं आपला त्याग केला, त्यांचा संयोग म्हणून आपण पुनः यत्न केला असतां कांहीं तरी भलतेंच घडलें आणि पूर्वीपेक्षांही आपली दुःस्थिति झाली, यासारखें दुर्दैव कोणतें! तेव्हां अशा दुर्दैवी माणसांनीं अशा संस्थेंत आपलें तोंड लपवून बसावें आणि लोकांच्या अपवादाचे आघात मुकाट्यानें सहन करावे, याखेरीज दुसरें काय शक्य आहे? असा तिनें आतां आपल्या मनाशीं विचार केला. अशा स्थितींत सुमारें सात दिवस गेले.

दादासाहेबांच्या मस्तकास जबरदस्त आघात झाला असला पाहिजे. त्यांच्या जखमा बऱ्या होत आल्या, परंतु शुद्धि मुळींच नाहीं. तोंडांत कोणी काय घालील, तेवढेंच त्यांनीं गिळावें एवढीच कायती शुद्ध असावी, किंवा तो व्यापार कदाचित् नैसर्गिकपणेंही होत असेल. कसेंही असो, परंतु त्यांनीं अद्यापि डोळे उघडून टक्‌टकांतपणें पाहिलें नाहीं. मधूनमधून ते किलकिले डोळे करीत; परंतु जशी एखाद्याच्या डोळ्यांवर झांपड येऊन पडावी तशी त्यांचे डोळ्यांवर झांपड येऊन पडली असावी असें दिसत होतें. अशी स्थिति असल्यामुळें कमलेस मोठ्या आस्थेनें त्यांचे जवळ बसावें लागे आणि सर्व प्रकारें त्यांची सेवा तिला करावी लागे व तिनें ती आनंदानें केलीही. आपण तरी यांच्याजवळ आहोंत हें किती चांगलें आहे, असें मनांत येऊन त्यांतल्या त्यांत तिला समाधान वाटे! आपल्या बापास पत्र पाठवून सर्व हकीकत कळवावी, असें वारंवार तिच्या मनांत येई; परंतु तिचा हात पत्र लिहिण्यास धजेना. न जाणों, आपलें पत्र वाचल्याबरोबर आपला बाप संतापेल. त्याला त्यांतलें एक अक्षरसुद्धां खरें वाटणार नाहीं आणि तो आपलें नांव सोडून देईल, असा भीतिप्रद विचार प्रत्येक वेळीं तिच्या हातास थांबवून धरी. आपण अगदीं आंधळ्याप्रमाणें त्या रात्रीं घरांतून निघून स्टेशनावर आलों आणि जो कोणी भेटला त्याच्याबरोबर दादरास गेलों. आपण करतों आहोंत काय, आपल्याबरोबर आहे कोण, याचा कांहींच विचार केला नाहीं. एकदिलानें एकविचारानें चाललों होतों. परंतु दुसऱ्या कोणी—अनेकांनीं—आपणास पाहिलें असेल, त्यांच्या मनांत काय आलें असेल? आपल्याला कोणी तरी दुष्टांनीं फसविलें हें खास. तोच दुष्टांपैकीं कोणी तरी मिलाफी आपल्याबरोबर असला पाहिजे, आणि त्यास ज्यांनीं आपल्याबरोबर पाहिलें असेल, त्यांनीं आपल्याबद्दल काय तर्क

बांधले असतील ! आपणास अशा तऱ्हेनें मध्यरात्रीं असल्या हलकट माणसाबरोबर जातांना ज्यांनीं पाहिलें असेल, त्यांनीं जर वेडेवांकडे वर्क केले असले, तर त्यांच्याकडे त्याचा काय दोष ! आणि त्यांच्यापैकीं कोणी आपल्या बापाला जाऊन जर सांगितलें असलें कीं, तुमची मुलगी अमक्या अमक्या हलकट माणसाबरोबर मध्यरात्रीच्या सुमारास आगगाडींत बसून जातांना व पुढें दादरच्या स्टेशनावरून उतरून जवळच्या बंगल्यांत जातांना पाहिली, तर त्यांनीं तरी काय समजावें ? सकाळच्या प्रहरीं मी घरांत नाहीं असें पाहण्याबरोबर त्यांचें काळीज चर झालें असेल, त्यांनीं आपल्यासाठीं अनेक ठिकाणीं शोध केला असेल. परंतु त्यांस शोध लागला नसेल, आणि मधेंच कोणी आपणास अमुक अमुक ठिकाणीं असें असें पाहिलें म्हणून सांगितलें असेल, तेव्हां त्यांच्या मनाची काय स्थिति झाली असेल. त्यांना किती वाईट वाटलें असेल आणि त्यांना किती खालीं पहावें लागलें असेल, हे सर्व विचार तिच्या मनांत उभे राहिले. गेल्या सात दिवसांत कितीदां तिनें कागद व लेखणी हातीं घेऊन पत्र लिहिण्यास सुरुवात केली असतां तिचा हात एक अक्षर सुद्धां काढण्यास धजेना. दर दिवस गेला, त्यांत कोणी आपला शोध काढीत आलें नाहीं, निदान प्रभाकर तरी यायचा, तो सुद्धां नाहीं, तेव्हां आपल्या बाबांचा आपल्याबद्दल पूर्णपणें गैरसमज झाला. आतां आपण कांहीं जरी लिहिलें, तरी त्यांस खरें वाटणार नाहीं. तेव्हां आपण आतां येथें राहून कधींकाळीं प्रसंग येईल तेव्हां आपली हकीकत कळवावी. तोंपर्यंत "आलिया भोगासी असावें सादर। देवावरि भार घालूनियां " असाच तिनें कायमचा निश्चय केला. तो निश्चय चालविण्यास तिला दिवसानुदिवस सोपेंही जाऊं लागलें. कारण तिच्या सासऱ्याकडे अधिकाधिक लक्ष्य देण्याची अवश्यकता उत्पन्न झाली.

वर सांगितल्याप्रमाणें सातवे दिवशीं त्यानें चांगले डोळे उघडले, आणि एकवार सभोंवार पाहिलें. कमळा जवळ होती आणि ताई उशाशीं उभ्या होत्या, त्यांच्याकडेही पाहिलें आणि आगगाडीच्या डब्यांतून पडतांना किंवा एखाद्या गाडींतून पडतांना मनुष्य अगदीं घाबरून ज्याप्रमाणें कशाचा तरी आधार धरतो, त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या खाटेला धरण्याचा यत्न केला. ते त्याच वेळीं प्रथम शुद्धींत आले यांत शंका नव्हती, परंतु ती शुद्धि फार वेळ नव्हती. थोड्याच वेळांत ते पूर्ववत् निपचित पडले. परंतु डॉक्टरांनीं त्या दिवशीं त्यांची नाडी पाहून व एकंदर लक्षणें पाहून " कमलाबाई, तुम्ही आपल्या अविश्रांत मेहनतीनें यांना काळाच्या दाढेंतून ओढून काढलेंत, आतां त्यांना फार थोड्या दिवसांत बरें वाटेल. उद्यां परवां ते चांगले शुद्धीवर येतील. मात्र त्यांना चार पांच दिवस जागचें हलूं देतां उपयोगी नाहीं, " असें म्हटलें. कमलाबाईला दुःखांत सुख तेवढेंच वाटलें.

परंतु तिला तेवढें सुखही स्वस्थपणें मिळूं द्यावें असें देवाच्या मनांत नव्हतें.

# प्रकरण ७६ वें.

## वर्तमानपत्रांतील लेख.



दादासाहेब अद्यापि शुद्धीवर आले नव्हते किंवा ते शुद्धीवर असले, तरी ते तसे आहेत असें दिसण्याजोगी त्यांची हालचाल नव्हती. ते डोळे मिटून स्वस्थ पडून होते. यांची सर्व शुश्रूषा आतां कमलाच करीत होती. सर्व शुश्रूषा या शब्दांत किती अर्थ येतो, याची वाचकांनींच कल्पना करावी. ती सर्व वर्णन देऊन येथें उभी करण्याची अवश्यकता नाहीं. ते या वेळीं स्वस्थ पडून राहिले होते; कदाचित् त्यांस झोंप लागली असेल. कमला त्यांच्याजवळ स्वस्थ बसली होती. तिच्या अंतःकरणांत नानाप्रकारचे विचार येत होते. आपण जर सुस्थितींत असतों, तर आज आपण कशा स्थितींत असतों, आणि आपण आहोंत ही स्थिति कशी आहे, या दोहोंचा विरोध तिच्या मनांत उभा राहिला आणि मन अतिशय उद्विग्न झालें. इतकें कीं, आतां तिला एकदम रडूं येतें कीं काय, असें दिसलें. तितक्यांत तिच्या मनांत आणखी एक चमत्कारिक विचार आला. आपण आतां आपल्या सासऱ्याची शुश्रूषा करतों आहों, परंतु त्यांना शुद्धि आल्यानंतर ते आपल्याला अशी शुश्रूषा करूं देतील काय? आपल्या ह्यातींत गैरसमजुतीनें हे आपल्या येथें आले होते, त्या वेळीं मी कोण हें समजतांच जसा त्यांस संतापवायु झाला, त्याप्रमाणें तर यांनीं मला पुनः ओळखतांच होणार नाहींना? तसें झालें, आणि पुनः जर यांचें दुखणें आपल्यामुळें वाढलें, तर आपण काय करावें? यांना शुद्धि येतांच त्यांनीं आपणास पाहण्याच्या आधींच आपण येथून निघून जावें काय? पण निघून जाणार तरी कोठें? आपल्यास आतां जगाच्या पाठीवर ये म्हणून जवळ घेण्यास कोणी तरी उरलें आहे काय! कोणी नाहीं. मग आपण तरी आतां कोठें जाणार? आपला शोध आतां कोण काढणार आहे? आज आठ दिवसांत कोणी काढला? मुंबई शहर केवढेंही मोठें असलें, म्हणून काय झालें, मनुष्य शोधच करायला लागलें, तर शोध लागल्याखेरीज कसा राहील? बरें. आपला शोध एक कोणी केला नसेल, परंतु दादासाहेबांचा—आपल्या श्वशुरांचाही—शोध कोणीं करूं नये! त्यांचीं तर माणसें आहेत. तीं माणसें काय उगीच बसलीं असतील? हे अमुक ठिकाणीं पडले आहेत, हें वर्तमानपत्रांतून कोणासच समजलें नाहीं? हें मोठें आश्चर्य आहे. अशा तऱ्हेनें आपल्याशीच नानाप्रकाच्या कल्पना करीत, विचार करीत व आपणच उत्तरें देत ती बसली असतां, एक नोकर डोकावला. तो ताईस पाहण्यास तेथें आला होता. ताई

येथें नाहींत असें कमलेनें त्यास सांगितलें व तो मागें फिरणार, इतक्यांत त्याच्या हातांत एक वर्तमानपत्र होतें, तिकडे कमलेचें लक्ष्य गेलें. त्याचें नांव तिला दिसलें. आणि लागलीच तिनें तें त्याच्यापासून मागून घेतलें. तीं आल्या दिवशींच तिच्या हातीं जें वर्तमानपत्र पडलें होतें, त्याचाच हा ताजा त्या दिवसाचा अंक होता. तो पाहण्याबरोबर आपल्याबद्दल त्यांत आणखी कांहीं आहे काय, हें पहाण्याविषयीं तिला साहजिकच उत्कंठा झाली. आपल्याविषयीं बरें असें कांहीं नसणारच हें तर तिला उघड दिसत होतें; परंतु जें काय वाईट असेल, तें तरी किती वाईट असेल तें पहावें अशी तिला इच्छा झाली. आणि त्याच उत्सुकतेनें तिनें तें त्या नोकरापासून मागून घेतलें. तें तार्जेच आलेलें होतें. अजून त्याची घडीही कोणी उलगडलेली नव्हती. ती उलगडतांना तिचे हात थरथरां कांपूं लागले. आपणाविषयीं किती वाईट आहे आणि किती नाहीं, असें तिला होऊन गेलें. अनिष्ट, अत्यंत अनिष्ट कां होईना, परंतु एकवार काय असेल तें आपल्याला कळावें असें एखादास होऊन जातें त्यांतलीच त्या बिचारीची अवस्था झाली होती. शेवटीं तिनें तें उलगडलें. एकवार दूर कालमावर तिनें दृष्टि फेंकली, तों ज्या आगगाडीच्या अपघातांत आपण सांपडलों होतों, त्याची सविस्तर हकीकत दिलेली दिसली. "तींत कोठेंही नांवें नव्हतीं. फार मंडळीस दुखापत झाली नाहीं. ज्यांस झाली, ती मंडळी इस्पितळांत आहेत." असें लिहिलें होतें. तिचें स्वतःचें किंवा तिच्या सासऱ्याचें नांव मुळींच नव्हतें. पुनः एकदां इकडे तिकडे तिनें दृष्टि फिरविली, तों तिला आपल्याबद्दल कोठें कांहीं असलेलें दिसलें नाहीं. अशा पत्रांत कांहीं नाहीं. हें पहाण्याबरोबर अर्थातच तिला एक प्रकारें थोडें समाधान वाटल्याप्रमाणें झालें. इतक्यांत एका नांवाकडे तिचें लक्ष्य गेलें. तें नांव पहातांच तें कशा कारणानें आलें आहे तें पहाण्याची तिला साहजिकच इच्छा झाली, व तिनें तो मजकूर वाचण्यास सुरुवात केली. तों त्यांत असें लिहिलें होतें कीं, "पद्माकरपंत—ज्यांच्या विवाहाचे वेळीं एवढा मोठा विजयदुंदुभि सुधारकपत्रांनीं वाजविला ते लवकर एका चमत्कारिक गुन्ह्यासंबंधानें जगापुढें येणार आहेत. यांच्या विवाहाची व वधूची व्यवस्था काय झाली हें दुसरीकडे दिलेंच आहे." तो मजकूर वाचतांच तिच्या अंगावर शहारे उभे राहिले आणि थरथरणाऱ्या हातांत तें वर्तमानपत्र कसें तरी धरून ती आपले अश्रुपूर्ण नेत्र त्या कालमांवरून पुनः फिरवूं लागली तों एका ठिकाणीं "सुधारणेचा कळस" या सदराखालीं तिच्या स्वतःबद्दलची वेडीवांकडी हकीकत दिलेली दिसली. ती अशीः—"आम्ही आपल्या मागील अंकीं कळविल्याप्रमाणें येथील सुप्रसिद्ध सुधारकांची सुधारलेली मुलगी खरोखरीच कोठें निघून गेली आहे व ती कोठें गेली कां गेली, यासंबंधानें तिनें आपल्या वडिलांस मुळींच कांहीं कळूं दिलेलें नाहीं. परंतु ज्याच्याबरोबर ती गेली त्यानें मात्र त्यांस एक निनांवी पत्र पाठविलें आहे. तें चार पांच दिवसांनीं त्यांचे हातीं आलें. तें पत्र आम्हांस पाहण्यास सांपडलें नाहीं, परंतु त्यांत त्या सुधारक वडिलांचें अंतःकरण फाटून जावें असा कांहीं तरी मजकूर असावा. कारण तें पत्र हातीं आल्या दिवसापासून त्यांनीं सर्व

शोध बंद करून आपल्या घरांत आपणा स्वतःस कोंडून घेतलें आहे. आम्हांस त्या गृहस्थांची अत्यंत कीव येते, परंतु आपण लाविलेल्या विषवृक्षाचीं फळें आपणासच बाधूं लागलीं, तर त्यापासून होणारी बाधा सोसून जगाला सावध करण्यापलीकडे आपला उपयोग काय? जसें करावें तसें भोगावें, हाच न्याय आहे. अशा प्रकारची प्रजा चांगली निपजली तर त्यांत आश्चर्य. झालें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. आतां या बाबतींत आमचे सुधारणाभिमानी बंधु काय लिहितात हें पहाणें आहे. आह्मांस तर या गलिच्छ गोष्टीचा वीट आला आहे!"

या पॅरिग्राफावरून कमलेनें आपले डोळे कसे फिरविले असतील, आणि तिला तो मजकूर कसा वाचतां आला असेल, हें तिचें तिलाच माहिती. तिचे हातपाय लटलट कांपत होते. तिच्या सर्वांगास घाम सुटला होता. प्यारा संपतांच तिच्या हातून तें वर्तमानपत्र गळून पडलें आणि ती विजेनें भाजून मेलेल्या शवाप्रमाणें दिसूं लागली. तिच्या मनाचे व्यापारही जणूं काय बंद झाले. आपल्या बापास पत्र पाठविलें कोणी? आपल्या शत्रुत्वावर इतका कोण आहे? आपला सर्वस्वी नाश व्हावा, यापलीकडे त्या दुष्टाचा दुसरा हेतूच नसावा. बाबांना आतां आपल्याविषयीं काय वाटत असेल? आपण आतां त्यांस लिहिण्याचें मनांत आणलें, तरी काय लिहिणार? आपण जें लिहूं तें त्यांस खरें तरी कसें वाटणार? आपण किती फसलों? केवढा अविचार केला? अपरात्रीं बाहेर पडलों, आपल्याबरोबर कोण आहे, आपण कोणाबरोबर जातों आहोंत, कोणी आपल्याला पत्रें लिहिलीं, कोठें बोलाविलें, आणि आपण कोठें चाललों आहोंत, याचा कांहीं सुद्धां विचार आपण केला नाहीं. केवळ एकाच गोष्टीकडे लक्ष्य देऊन वाटेल तशा वागलों, परंतु त्यांतलें रहस्य, त्यांतला आपला निर्मळपणा कोणास तरी खरा वाटेल काय? आतां आपण आपल्या वडिलांना अगदीं सर्व खुलाशाचें पत्र लिहिलें, तरी त्यांस तरी खरें वाटेल काय? आपण कोणाच्या तरी नादीं लागून घर सोडलें—(हें वाक्य तिच्या मनांत उभें राहतांच तिच्या सर्वांगावर शहारे उठले आणि ती थरथर कांपूं लागली) आणि आतां त्यानें फसविल्यामुळेंच कांहीं तरी खोटें नाटें बनवून लिहून पुनः आपल्याला ही फसवूं पहाते आहे, असें त्यांच्या मनांत येईल. आणि ते आपल्यास तुच्छ करतील, झिडकारतील, तुझें मला दर्शन नको असें ह्मणतील, तर त्यांत त्यांचेकडे काय बोल? आपण सर्व प्रकारें असेंच वर्तन केलें आहे कीं त्याचें स्वरूप लोकांना भयंकर वाटावें; तें तसें भयंकर नाहीं, असें दाखविणें आतां केवळ दुरापास्त, नव्हे अशक्यच आहे. आपण अत्यंत निर्मळ असतां—केवळ पातिव्रत्यधर्मानें वागूं गेलों असतां—आपल्यावर असा विलक्षण प्रसंग यावा ना? लहानपणापासून आपण किती दुर्दैवी! आपल्या जन्मकाळीं तरी कोणास सुख झालें कीं नाहीं कोण जाणे! पुढें आपल्या लग्नाची व शिक्षणाची बाबांनीं, आईनें आणि काकांनीं किती काळजी वाहिली! आपण विचारांनीं किंवा कल्पनांनींही पाप करूं नये, म्हणून आईनें आपल्यास किती परीनें उपदेश केला! आपला जन्म जगाच्या दृष्टीनें दूषणीय आहे, म्हणूनच कोणालाही भूषणच होईल अशा प्रकारानें

आपणास वागलें पाहिजे, आपला सर्व वर्तनक्रम जग अगदीं डोळ्यांत तेल घालून पहात राहणार, तेव्हां त्याला खोडी काढायला इतका सुद्धां अवकाश आपल्याकडून मिळतां कामा नये, असें आपली आई वारंवार आपल्यास सांगत असे. वारंवार आपल्याला योग्य मार्ग कोणचा तो सांगत असे. परंतु नशीब इतकें वाईट कीं, तीही आपल्यास सोडून गेली. ती असती, तर आपल्या हातून असा अविचार झाला असता काय ? आपण आपल्या भावास आईच्या ठिकाणीं होऊन त्यांचें संगोपन करणार होतों, त्याची सर्व काळजी वाहणार होतों, आपल्या वडिलांविषयीं आपल्या पतीच्या मनांत जो विनाकारण गैरसमज झालेला होता, तो दूर करून सर्व पूर्ववत् ठीक करून टाकणार होतों. तें सर्व एकीकडेच राहून आपल्यावर हा काय प्रसंग आला ! एक वेळां आपण विधवा झालों असें वाटून किती तरी दुःखाविष्ट झालों. ती स्थिति किती तरी भयंकर वाटली ! पुढें अगदीं अचानकपणें तें वैधव्य खोटें असें कळून आपण आनंदलों आणि त्या आनंदामुळें मागलापुढला विचार न करितां केवढा तरी भयंकर प्रसंग आपण आपणावर ओढून घेतला ! कायावाचामनानें नखशिखांत निर्मळ असतां किती भयंकर कलंक लावून घेतला ! तो कलंक तरी एकदोघांच्या दृष्टीनें ! स्वतःच्या बापाच्या दृष्टीनें सुद्धां आपल्या बापास आतां आपण अगदीं निष्कलंक आहों असें कितीही सांगितलें, तरी त्यांस तें खरें वाटेल काय ? आपल्याला ते जवळ तरी उभें करतील काय ? आपण पाठविलेलें पत्र ते हातीं तरी धरतील काय ? धरणार नाहींत. कां धरावें ? आपल्यावर विश्वास त्यांनीं ठेवावा असें आपण केलें आहे तरी काय ? आपणास त्यांनीं आतां लोटून दिलें, जवळ उभेंसुद्धां केलें नाहीं किंवा दर्शनसुद्धां घेतलें नाहीं; किंबहुना आपण पत्र पाठविलें असतां तें न उघडतां परत पाठविलें, किंवा न फोडतां फाडून टाकलें, तर त्याचा बोल त्यांचेकडे कसला आला आहे ? आपलें दैव—नव्हे आपला अविचार, आपण जाणूनबुजून अविचार करून दैव दैव म्हणून तरी कां म्हणून म्हणावें ? असा एकसारखा विचार करतां करतां तिची दृष्टि त्या वर्तमानपत्रावर पुनः गेली आणि ज्या पारिग्राफांत पद्माकरपंतावर कांहीं गुन्हेगारींत असल्याचा आरोप येणार असें ध्वनित केलें होतें तोच पारिग्राफ तिच्या नजरेस आला. पुनः तिच्या छातींत धस्स् झालें. आपला त्याग करणारा नवरा जरी असला, तरी त्याजवर कांहीं संकट आलें आहे असें पहातांच कोणा हिंदु स्त्रीचें काळीज चर्र होत नाहीं, तिनें तो पारिग्राफ पुनःपुनः वाचला. आपला नवरा खरोखर कधींही गुन्ह्यांत सांपडावयाचा नाहीं, कोणा तरी दुष्टाच्या दुष्टपणानें व फसवणुकीनें तो फसला असला पाहिजे. तशी स्थिति असेल, तर आपण यावेळीं त्यांस काय मदत करूं शकूं ? असा विचार तिच्या मनांत आला आणि लागलीच ती अत्यंत खिन्न होऊन आपल्याशींच म्हणते, “ पण आपण तरी याला काय मदत देणार ? ते आपल्याला वाऱ्यास तरी उभें राहूं देतील काय ? त्यांच्याही दृष्टीनें आपण सर्वथा त्याज्य झालों आहों. जगांत आतां आपल्याला शुद्ध व निर्मळ असें कोणी सुद्धां मानणार नाहीं. सर्वांच्या दृष्टीनें कलुषित, आपल्या बापाच्या दृष्टीनें

व नवऱ्याच्या दृष्टीनें जी कलंकित ती जगांत कोणाच्या दृष्टीनें निर्मळ असणार? अशा स्थितींत जगण्यांत तरी काय तात्पर्य!" असें वाटून तिचें अंग पुनः थरथर कापूं लागलें. सर्वांगास घाम सुटला आणि एकदम ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. तिचा शोक तिला आवरेना. आपण आहोंत कोठें याचें तिला भानच राहिलें नाहीं. अति झालें, म्हणजे तेथें कसलें भान आणि कसलें काय? आपण आत्महत्या करण्यास तयार असतां तेथेंसुद्धां दैवानें आड येऊन आपल्यास जिवंत ठेवावें, किंबहुना तेथेंसुद्धां अपघात करून आपल्याला मात्र जणूं काय, "तूं अशी कशी सुटतेस! असला अपघात झाला, तरी त्यांतून तूं जगणार, तुला या जगात अजून किती तरी संकटें सोसायचीं आहेत! तुझे अजून किती तरी हाल व्हायचे आहेत!" असें ह्मणून तें आपला छळ करीत आहे, असें वाटून तिनें रडण्यास सुरुवात केली, नव्हे तें रडें कोसळलेंच. आणि तिला अगदीं अनावर होऊन ती वर सांगितल्याप्रमाणें ओक्साबोक्शीं रडूं लागली. तें इतक्या मोठ्यानें कीं, त्यावेळीं त्या दारावरून जाणाऱ्या सुंदराबाईस ऐकूं जाऊन त्यांनीं दार उघडून डोकावून पाहिलें, तों कमला अगदीं धाय मोकलून रडत आहे. त्या लागलीच आंत गेल्या, आणि त्यांनीं 'तिला काय झालें; अशा एकाएकीं रडूं कां लागलां,' म्हणून विचारलें. सुंदराबाईच्या चर्येंत व आवाजांत नेहमींच एक प्रकारचें विलक्षण मार्दव असे व त्यांच्याजवळ आपण आपलें मन उघडें केलें असतां त्यांस खरोखर आपली सहानुभूति खचित् होईल असें कोणासही सहज वाटे. त्या आपण होऊन कोणाशीं कधीं फारशा लगट करायला बोलायसंवरायला जात नसत. त्यांची चर्याच सदा खिन्न, परंतु आपल्यासारख्याच ज्या ज्या कोणी दुःखित असतील, त्यांच्याविषयीं समदुःखी म्हणून कींव दाखविणारी असे. आपल्या येथें आपल्या संस्थेंत आलेल्या या पाहुणीस खरोखर अत्यंत दुःख झालें असून कोणी तरी समाधान करण्याची फार जरूरी आहे, असें वाटून त्या तेथेंच थबकल्या, पुढें झाल्या व त्यांनीं तिला उचलून आपल्या पोटाशीं घट्ट धरून, "कमलाबाई, अशा तुह्मी सगळ्या दिवसभर दुःख करीत बसाल, तर कसं चालेल? तुमच्यासारखेच दुःखी प्राणी या जगांत थोडे आहेत काय? आमच्या हकीकती ऐकून तुह्मांला तसं वाटूं नये. आज एकाएकीं तुह्मांला असं काय झालं! बोला. मन मोकळं करून बोला. त्याखेरीज आतां तुमच्या मनाला हलकं वाटायचं नाहीं." सुंदराबाईनीं हे शब्द इतक्या मनःपूर्वक उच्चारले कीं, जणूं काय त्यांचें अंतःकरण प्रत्यक्ष उठून त्यांच्या शरीरांतून निघून कमलेच्या अंतःकरणांत जाऊन मिळालें. कमलेची त्यावेळीं अशीच स्थीति झाली होती कीं, आपलें अंतःकरण ओकण्याला कोणी तरी पात्रच पाहिजे होतें. पात्र मिळतांच तिनें आपलें शोकाचें कारण आपल्या नव्या मैत्रिणीस सांगितलें, आपणास आतां जगाचे आघात अगदीं विनाकारण सोसावे लागणार. आपण अणुरेणुमात्र योग्य मार्गापासून न चळतां आपल्यावर अत्यंत अशुद्धतेचा आरोप येणार—नव्हे आला—आतां आपल्यास त्यांतून रक्षण करून पुनः पूर्वस्थितीला आणणारें कोणीही नाहीं, असें मनांत

येऊन आपल्यास रडूं आलें म्हणून तिनें सांगितलें. आणि दुःखाच्या भरांत येऊन तिनें आपल्या जन्माची सर्व कथा–आपला विवाह कशा स्थितींत झाला, विवाहानंतर यःकश्चित् कारणानें पतीची गेरसमजूत कशी झाली, ते आपल्यास सोडून कसे गेले, नंतर आपल्या आईचें दुखणें कसें वाढत चाललें, मध्यंतरीं आपली व आपल्या श्वशुरांची–ज्यांची शुश्रूषा करण्याचा प्रसंग आपल्यावर आला आहे, त्यांची व आपली चमत्कारिक तऱ्हेनें गांठ कशी पडली, आपण कोण, हें त्यांना कळतांच त्यांची काय अवस्था झाली, त्यांना आपला तिटकारा कसा आला, आपली आई कशी निवर्तली, आपल्याला दुसरी दुष्ट वार्ता कशी समजली, नंतर तीही खोटी ठरण्याला आपल्या एकट्याला काय कारणें झालीं, आपल्याला आपल्या पतीचीं म्हणून पत्रें आलीं, तीं खरीं समजून त्यांतील मजकुराप्रमाणें पतीच्या आज्ञा अक्षरशः पाळण्याकारितां आपण आपल्या बापाशीं कसें वर्तन केलें, आपण घरांतून कशा बाहेर पडलों, आपल्यास आपल्या पतीच्या पत्राखेरीज दुसरें कांहीं सुद्धां दिसेनासें झाल्यामुळें आपण किती गोष्टींकडे दुर्लक्ष्य केलें, शेवटीं भलत्याच जागीं भलत्याच वेळीं आणि भलत्याच माणसांबरोबर आपणांस पाहिल्याकारणानें आपल्या पतीनें काय उद्गार काढले व आपल्यास टाकून ते तेथून कसे निघून गेले; नंतर आपणही निघून स्टेशनावर कशा आलों, नंतर आत्महत्या करण्याखेरीज आतां आपल्यास या जगांत दुसरा मार्ग उरला नाहीं, असें पक्कें वाटून आपण डब्यांतून उडी टाकून प्राण देण्याचा कसा बेत केला, परंतु त्या बेताच्याही आड दैवानें येऊन 'तुझा भोग अजून किती तरी आहे! अशी कशी सुटायला पहातेस!' असें म्हणूनच आपल्याला तसल्या अपघातांतूनही बचावून येथें कसें आणलें वगैरे सर्व गोष्टी कमलेनें अत्यंत हृदयद्रावक रीतीनें सुंदराबाईस सांगून ह्मटलें, "सुंदराबाई, मला या सर्व दुःखांचं कांहीं सुद्धां वाटलं नसतं. पण मी कायावाचामनानं रतिभरही पापाचरण केलं नाहीं. कधीं दुष्ट विचार मनांत माझ्या आला नाहीं, असं असून तिकडच्या दृष्टीनं, बाबांच्या दृष्टीनं आणि अर्थातूच सगळ्या जगाच्या दृष्टीनं कशी दिसणार! तें मनांत येऊन माझ्या जीवाचा थरकांप होतो. वाटतं कीं, एकवार अग्नींत उडी घालून तूं आपली शुद्धता सिद्ध कर असं ह्मटलं, तर मी तसं करण्याला एक क्षणभरसुद्धां कचरणार नाहीं. तें दिव्य मी फार सोपं समजेन. पण कांहीं कारण नसतां, मी नखशिखांत अंतर्बाह्य–शुद्ध असतां ज्यानं त्यानं महारोग्याप्रमाणें मला धिक्कारावें–इतकंच नव्हे, तर त्या रोग्याची जशी कोणाच्या मनांत कींव येते, तशी कींव सुद्धां न येतां–मला धिक्कारावं, यासारखं भयंकर दिव्य मी आतां कसं पार करूं! मला कोणाचा आधार! तुह्मांला जर माझी खरी कींव येत असेल, तर मला कांहीं तरी विष द्या, म्हणजे मी जगांतून नाहींशी होईन; आणि मग–आणि मग–जग मला विसरेल–त्यांच्या आज्ञेचं मुळींच उल्लंघन करूं नये म्हणून मीं हा सारा अविचार केला, तेही मला विसरतील. त्यांच्यावर कांहीं गुन्हेगारी आली आहे असं या पत्रांत लिहिलं आहे, पण तें मला खरं वाटत नाहीं, त्यांच्या हातून कधीं कांहींसुद्धां गैर होणार नाहीं, असा माझा पूर्ण व दृढ विश्वास आहे. माझ्यावर

त्यांचा नाहीं, पण त्यांच्यावर माझा आहे. तेही मला विसरतील. हे माझे सासरे देखील एक दोन दिवसांत शुद्धीवर आले, म्हणजे माझा तिटकारा करतील--माझ्या शुश्रूषेनं त्यांस मी जगण्याच्या पंथाला आणलं एवढंच मला आज सुख आहे. ते शुद्धीवर आले म्हणजे त्यांनीं माझा तिरस्कार केला, तर तो मला पहावयास नको. त्याच्यापूर्वी मला हा लोक सोडून जाऊं द्या. अशा तऱ्हेनं जाण्यांत मला मदत केलीत, तर त्यांत तुह्माला पुण्य लागेल, पाप लागणार नाहीं." असें बोलून ती अगदीं स्तब्ध बसली. तिनें आपलें डोकें खालीं टेंकलें. तिच्या डोळ्यांत अश्रू मुळींच राहिला नाहीं. सुंदराबाईनीं तिला नुसतें आपल्या पोटाशीं धरलें. ते वेळीं तसेंच करणें ठीक होतें.

पण इकडे हें चाललें असतां रोग्यानें एकाएकीं डोळे उघडून क्षणमात्र त्या दोघींकडे पाहिलें आणि आपलें डोकें चोळून पुनः डोळे मिटले.

# प्रकरण ७७ वें.

## सर्वांचा शोध.



आपल्या अंतःकरणांतलें सर्व दुःख, अगदीं मोकळेपणें सांगण्याची सवड मिळाली व त्यांत आपल्याशीं सहानुभूति असणारा श्रोता मिळाला ह्मणजे त्या आपल्या दुःखकथनानेंच माणसास किती तरी बरें वाटतें! कमलेचें मन यावेळीं तिला आतांपर्यंत सहन कराव्या लागणाऱ्या दुःखानें इतकें कांहीं उद्विग्न झालें होतें कीं, अशा प्रसंगीं तिला जर कोणी कळकळीचें माणूस न भेटतें, तर तिला वेडच लागलें असतें. ती अत्यंत प्रेमळ स्वभावाची असून एकदम तिचीं सर्व प्रेमस्थानें तिला नाहींशीं झालीं. आई वारली, नवरा भलतेंच कांहीं तरी डोक्यांत भरवून घेऊन बेलाशक तिला सोडून चालता झाला. पुढें तो मृत झाल्याचीच बातमी आली. पुढें पुनः तो परत आला तेव्हां त्याच्या आज्ञेप्रमाणें अक्षरशः करण्यास गेलें असतां भलताच कांहीं प्रकार घडून पतीचें प्रेम तर पूर्णपणें नष्ट झालेंच; परंतु बापाच्या प्रेमासही आपण मुकलों. सारांश, आतां या जगतितलावर आपलें असें ह्मणण्याला किंवा आपली म्हणून कुरवाळून घटकाभर पाठीवरून हात फिरविण्यासही आपल्यास कोणी नाहीं, अशी स्थिति झाली. अशा स्थितींत अगदीं परकी कां होईनात; परंतु आपल्या दुःखानें दुःखित होणाऱ्या अशा दोन तीन स्त्रिया आपल्याला मिळाल्या यांतच तिला समाधान मानून घेण्यास जागा झाली. आणि आपण आपलें दुःख ओकून टाकून कांहीं तरी सहानुभूति अनुभवावयास येथें या परोपकारार्थ निर्मिलेल्या स्थानांत आपणास अशी

विभूति मिळाल्या, यानेंच तिला एक प्रकारें, नव्हे पूर्णपणं बरें वाटलें. निदान मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें ती निश्चेष्ट पडलेली जेव्हां शुद्धीवर आली, तेव्हां तरी तिला आपण या स्थानांत येऊन पडलों हें केवढें आपलें भाग्य असें वाटलें.

सुंदराबाईनीं तिला सांवरून धरून बराच वेळ त्या अगदीं स्वस्थ बसल्या. तिचा तो शोकावेग किंचित् ओसरला असें पाहिल्यानंतर तिचें समाधान करण्यासाठीं त्यांनीं तिला ह्मटलें, "कमळाबाई, जगांत या संबंधांत तुमच्यासारख्या तुम्हीच दुःखी, तुमच्या इतकं दुःख कधींच कोणाला झालं नाहीं, असं मुळींच समजूं नका. तुमच्याहीपेक्षां ज्यांना विचित्र दुःखं अनुभवावीं लागलीं असे प्राणी या जगांत आणखीही आहेत. आत्महत्येचा विचार मनांतसुद्धां आणूं नका. सोसावं लागेल तें मुकाट्यानं सहन करण्यांतच काय तें खरं शौर्य आहे. हल्लींचा हा काळच असा आहे कीं, जो कोणी कांहीं रूढीविरुद्ध गोष्ट करायला जाईल, त्याला इतर लोकांपासून त्रास व्हायचा. तो मुकाट्यानं सहन करून आपण आपल्या मार्गानं जाण्यांतच खरा सहनशीलपणा आहे. जें आचरण आपल्या हातून कधींही घडलं नाहीं, किंवा घडणं संभवनीय सुद्धां नाहीं. तें घडल्याबद्दल आपल्यावर आरोप येतो, आणि तो आरोप स्पष्टपणं खोटा ह्मणून सिद्ध करण्याचीं साधनं नसल्याकारनं, निमूटपणं तो आरोप सहन करून घ्यावा लागतो. अशा तऱ्हेनं सर्व कांहीं आरोप, सर्व प्रकारच्या लोकनिंदा, सर्व प्रकारचे उपहास सहन करून आपलं काम जर आपण धीरानं करीत राहिलों, तरच आपण कांहीं तरी केलं असं होणार आहे. निदान आपला यत्न तरी चालला आहे. आमचा हा मठ स्थापन झाला त्याचीं तत्त्वं हींच कीं, लोकनिंदेला किंवा सरकारी अधिकाऱ्यांच्या धमकावण्यांना न भितां समाजांतले दोष आणि राज्यकारभारांतले दोष बाहेर काढण्याकरितां झटावयाचं. मी तुम्हांला केव्हां तरी या आमच्या मठाची मूळपीठिका सांगेन, म्हणजे तुम्हांला आम्ही कोण, येथें असणाऱ्या इतर स्त्रिया आहेत त्या कोण, जे डॉक्टर आहेत ते कोण आणि भावानंद म्हणून जें नांव अनेक वेळां मंडळींच्या तोंडून ऐकूं येतं तें कोणाचं, हें सर्व कळेल, आम्ही येथें असलेल्या बायका, तुमच्याचप्रमाणं दुःखी आहों. तुमच्याचप्रमाणं आह्मांला जगाचे आघात सोसावे लागत आहेत. आणि मागं याच्यापेक्षां फार धीरानं सोसावे लागले. परंतु आम्हीं एकमेकांनीं एकमेकांना धीर देऊन आतांपर्यंतचा काळ कंठला आणि पुढंही कंठूं. तुम्हाला आतां कोणी नाहीं, तर तुम्हीही आमच्यांत येऊन मिळून लोकनिंदा साहून लोकसेवा करा. तुम्ही इथें राहिलां तर तुमच्याही हातून कांहीं तरी लोकसेवा घडेल. प्रथमतःच, तुम्ही अगदीं दृष्टिसमोर नको, अशा रीतीनं तुमचा तिरस्कारा करणाऱ्या, तुमच्यासारख्या सच्छील अशा स्त्रीला शिव्याशाप देणाऱ्या सासऱ्याच्याच आपत्काळीं त्याची सेवा करण्याची पाळी आली, हा आरंभच ह्मणा. तुम्ही यांची सेवा आज आठ दिवस करून यांस परलोकांतून परत आणलंत त्यांचे प्राण वांचविलेत, तेव्हां सुनेनं आपले प्राण वांचविले असं तरी त्यांचे मनास वाटेल."

"सुंदराबाई, तें तसं त्यांचं त्यांना वाटो

न वाटो, पण मी त्यांची सून आणि अशा प्रसंगीं मीं यत्किंचित्‌सुद्धां मागं पुढं न पाहतां त्यांची सेवा यथास्थितपणं केली, यांतच मला आनंद आहे. आणि मी एकदां आत्महत्येचा प्रयत्न केला असतां तो परमेश्वरानं निष्फळ केला, तेव्हां त्याच्या मनांत नाहीं असं जाणूनच मी आतां तुमच्यांतच रहाणार. इतरांप्रमाणं तुम्ही मात्र माझ्याबद्दल आतां दुजाभाव राखूं नका. मला आपल्यांतली म्हणा. काय जें करणं असेल तें मला सांगून करून घेण्यास मुळींसुद्धां मागं पुढं पाहूं नका. जशा तुम्ही या परोपकाराच्या कामाला वाहिल्या आहां, तशीच मी आपल्याला वाहून घेईन. दुसरं मला काय शक्य आहे? तुम्हांविषयीं तुमच्या जिव्हाळ्याच्या माणसांना तरी कधीं शंका नाहीं; पण माझी गोष्ट त्याच्या अगदीं पलीकडली. माझा बाप मला आतां काय समजेल? माझा भाऊ काय समजेल? भावापेक्षांही अधिक असा प्रभाकर काय म्हणत असेल? याची कल्पना मनांत आणायची म्हटलं, तर माझ्या अंगावर शहारे येतात. माझी वागणूकच जर तशी झाली आहे, तर त्यांच्याकडे काय बोल! फार तर काय, पण ज्यांचीं पत्रं आलीं असं समजून मी इतकी आंधळी झालें, आपल्या जावाकडे न पाहतां, अपरात्रीं कुठें जावं याचा विचार न करतां कोणीकडे वाटेल तिकडे गेलें, त्यांना सुद्धां जर माझ्याबद्दल भलताच संशय आला, तर आतां अशा दुर्दैवाच्या पलीकडे आणखी कसं दुर्दैव असणार? त्या दुर्दैवाची निंदा करीत मी आपली तुमच्यांत रहातें. बरी ही तुमची मठसंस्था अगदीं एकीकडे आहे, जें काय लोकसेवेचं काम पडेल तें करून रहाण्याचा आतां मीं निश्चय केला आहे........."

कमलेचें चित्त अगदीं ठिकाणावर नव्हतें असें म्हटलें, तर केवळ अतिशयोक्ति होणार नाहीं. ती काय बोलत होती आणि कशा तऱ्हेनें बोलत होती, याचें घटकाभऱ्यानें स्मरण करून दिलें असतें, तर तिला आपण अमुक बोललों होतों असें सुद्धां तिला आठवलें असतें कीं नाहीं कोण जाणे! तितक्यांत तिला दादासाहेबांच्या औषधाच्या वेळेचें स्मरण झालें व लागलीच ती उठून त्यांचें औषध घेऊन येण्यास उठली. तिनें त्यांस औषध देण्यासाठीं त्यांचे जवळ नेलें व आपल्या मृदु हातांनीं त्यांची हनुवटी धरून त्या तोटीदार पेल्यांतून त्यांस औषध घालण्यासाठीं तें त्यांचे तोंडाजवळ नेलें. इतक्यांत त्यांनीं डोळे उघडून पाहिल्यासारखा भास झाला. आतांपर्यंत त्यांनीं डोळे उघडून पाहिलें नव्हतें. तेव्हां हे आतां शुद्धीवर आले काय, असा प्रश्न साहजिकपणेंच तिच्या मनांत उभा राहिला. आणि ती पुनः ते डोळे उघडतात कीं काय, हें नीटपणें पहाण्यासाठीं स्वस्थ उभी राहिली, पण तसें कांहीं झालें नाहीं. निदान होण्याचीं चिन्हें कमलेस दिसून आलीं नाहींत. तेव्हां त्यांना औषध पाजण्यासाठीं तिनें त्यांच्या तोंडांत नळी घातली व त्यांनींही औषध घ्यावयाचें तसें घेतलें. परंतु कमलेस आतां एक नवीनच आणि फार बिकट असा प्रश्न येऊन पडला. आपण इतके दिवस सेवा केली, यांस मृत्यूच्या मुखांतून बाहेर काढलें, निश्चेष्ट स्थितींत असतां त्यांनीं आपल्या हातचीं औषधें घेतलीं तशीं ते आतां घेतील कीं नाहीं? कीं त्यांच्या दृष्टीस आपण पड-

त्याबरोबर आपणास येथून निघून जाण्याची पाळी येईल ! निदान आपल्या येथें असण्यानें नाहीं, पण आपण समोर असल्यानें यांना त्रास होऊन दुखणें उगीच लांबतें असें जर वाटलें, तर आपण येथून निघून जावयाचें, असा तिनें आपल्या मनांत कृतनिश्चय केला. तो कोणास बोलून मात्र दाखविला नाहीं. काय काय होतें, तें पाहण्याचा बेत करून ती बसली. ती औषध देण्यास उठल्यानंतर थोड्याच वेळांत "तुह्मी अगदीं स्वस्थ असा. तुह्मांला आह्मी आपली बहिणीच मानूं, अगदीं सुद्धां काळजी नको" असें म्हणून सुंदराबाई तेथून गेली आणि कमला तशीच तेथें स्वस्थ बसली. स्वस्थ बसली याचा अर्थ अर्थातच शरीरापुरता घ्यावयाचा. स्वस्थता मनाची तिला बिचारीला कोठली आली आहे !

इकडे चमत्कार असा झाला होता, कीं सुंदराबाईचें आणि कमलेचें भाषण चालू होण्याच्या पूर्वीच दादासाहेबांस आज इतके दिवस नष्ट झालेली शुद्ध थोडीबहुत परत येऊं लागली होती. तें बोलणें चाललें असतां एकदां कमलेचें लक्ष्य त्यांच्याकडे नसतां त्यांनीं डोळे उघडून आपण कोठें आहोंत हें समजण्यासाठीं सभोंवार पाहण्याचा यत्न केला होता. त्याचप्रमाणें कमलेचे दुःखोद्गार संपून ती निश्चेष्ट पडली तेव्हांही त्यांनीं तसेंच एकदां डोळे उघडून पाहिलें; परंतु त्यांस कांहीं आठवेना; आणि आपल्या शेजारीं बसलेल्या या सुंदर मुलीचा चेहरा आपण कोठें तरी पाहिला होता, परंतु कोठें तो आठवत नाहीं, असें वाटून की काय, किंवा आपण होतों कुठें, आहोंत कुठें याचा विचार करण्याकरितां त्यांनीं पुनः डोळे मिटून घेतले. त्याचप्रमाणें एकवार मध्यें असेंही वाटलें, कीं त्या दोघींचें बोलणें चाललें असतां, त्यांनीं आपण कांहीं बोलण्यासाठीं प्रयत्न केला; परंतु तो मुळींच साधला नाहीं. त्यांच्या जिभेवर त्यांच्या इच्छाशक्तीचा परिणाम होण्याइतके ते अद्यापि बरे झाले नव्हते. तथापि जें काय त्यांच्या कानीं पडलें (त्या दोघींचें भाषण झालें त्यांतला बराचसा भाग त्यांच्या कानीं पडला, इतकेंच नव्हे, तर त्याचा अर्थबोधही त्यांस झाला.) त्यानें त्यांच्या त्या रुग्णस्थितींतही त्यांच्या विचारास कांहीं चमत्कारिक दिशा दिली. आपण ज्या आपल्या सुनेचा इतका तिरस्कार करून शिव्याशाप देण्यापर्यंत आलों होतों, तिनेंच आपली या वेळीं सेवाचाकरी करून आपल्याला मृत्युमुखांतून बाहेर काढलें काय ! आपण अशा स्थितींत कशानें आलों, हें आठवण्यास त्यांना प्रथम थोडा त्रास पडला. बराच वेळ मेंदूला त्रास देऊन एवढें काढलें कीं, दादरावरून आपण काकासाहेबांच्या बरोबर परत येत असतांना जो आगगाडीचा अपघात झाला, त्या अपघातांत आपण सांपडून कोठें तरी आपणास इस्पितळांत आणून ठेवलें आहे, इतकी शुद्धि त्यांस आली. आणि मनास वाईटही वाटलें. पण शुद्धीवर येण्याबरोबर दुसऱ्या तिसऱ्या कसल्याही बाबतींत अजून शक्ति आली नव्हती. त्यामुळें स्वस्थपणें पडून औषधपाणी घेण्यापलीकडे कांहींसुद्धां त्यांचे हातीं राहिलें नव्हतें. त्यांस त्यांत आणखी असेंही आश्चर्य वाटत होतें, कीं आपल्या घरचें कोणीच कसें शोध करीत आलें नाहीं ! पण तें आश्चर्य करीत बसण्यापलीकडे त्याही बाबतींत त्यांच्या हातांत कांहीं नव्हतें हें उघडच आहे.

परंतु चमत्कार हा कीं, हळूहळू कमलेचें सान्निध्य हें त्यांच्या सुखास एक फार अवश्यक कारण, असें त्यांस फार वाटूं लागलें. शुद्धीवर आल्यानंतर ती औषध देण्यास किंवा कांहीं इतर सेवा करण्याकरितां जेव्हां जेव्हां येई, तेव्हां तेव्हां ते डोळे उघडून तिच्याकडे पहात व ती काय करील तें करून घेण्यास त्यांनीं मुळींसुद्धां अनिच्छा दर्शविली नाहीं. ही स्थिति दुसरे किंवा तिसरे दिवशीं तर फारच स्पष्टपणें अनुभवास येऊं लागली. ती दुर्दैवी परंतु कर्तव्यतत्पर कमला जर एक क्षणभर त्यांच्याजवळून दूर झाली, तर ते तिच्याकरितां सभोंवार पाहूं लागत. आणि दुसरें कोणी आलें व कांहीं औषधपाणी करूं लागलें, तर त्याच्या हातून तें घेण्यास थोडीशी अनिच्छा दर्शवूं लागले. त्यांच्या मनांत बोलावयाचें असून त्यांस बोलावयास कां येत नाहीं, याबद्दल कमलेनें डॉक्टरांस विचारलें असतां डॉक्टरांनीं सांगितलें कीं, " पांच चार दिवसांत बोलण्याला येऊं लागेल. तुह्मी आजपर्यंत त्यांची सेवा केली, तशी नीट चालू राहूंद्या, आतां कांहीं त्यांना भय नाहीं. ते आतां जगत्या मार्गाकडे आले आहेत. "

पण आतां त्यांस येथेंच सोडून आपण आपल्या कथानकांतील इतर पात्रांकडे वळूं.

बळवंतरावास खरोखरीच त्या वर्तमानपत्रांत ह्मटल्याप्रमाणें निनांवी पत्रें आलीं. तुमची मुलगी अशी गेली, तशी गेली, असें कोणी त्यांत लिहिलें होतें; आणि कमलेवर जरी त्यांचा अगदीं पूर्ण भरंवसा होता, तरी त्या पत्रांनीं त्यांच्या मनाची चलबिचल झाली. आतां आपण शोध करण्यांत तरी काय अर्थ आहे, यदाकदाचित् शोध केला तरी, जर आपत्याला कांहीं भयंकर दिसलें, किंवा तिनें आपल्यास वेडेंवांकडें उत्तर दिलें, तर काय करणार? त्यापेक्षां स्वस्थ बसून मुकाट्यानें सगळें सहन करावें, यांतच आतां मोठेपणा आहे, असा त्यांनीं आपल्या मनाशीं विचार करण्यापलीकडे काय शक्य होतें? त्यांच्यासारख्याच्या स्थितींत असणाऱ्या मनुष्याखेरीज इतरांस त्याची कल्पना येणार नाहीं. आपल्या मुलीच्या शिक्षणाकरितां आपण किती प्रकारें श्रम केले, किती काळजी घेतली, आणि त्याचा शेवट असा व्हावा काय? आपल्या सगळ्या सद्हेतूंचा शेवट अशा प्रकारें झाला, ही किती दुःखाची गोष्ट! आपली पत्नी आपल्यावर असा प्रसंग येण्यापूर्वीं वारली हें किती चांगलें झालें! आजचा हा तोंडाला काळोखी लागणारा प्रसंग तिच्या हयातींत आला असता, तर ती त्या धसक्यानें तरी वारलीच असती. आजपर्यंत आपण नीतिमत्तेच्या जोरावर, सत्याच्या आधारावर, सर्वांच्या मताला एका बाजूस सारून, आपलें अंगीकृत कार्य पुढें सारीत होतों; परंतु आतां आपल्या प्रतिपक्षानें जर आपल्यावर अत्यंत वाईट शब्दांनीं, आपली व आपल्या सर्व सुधारणा कार्याची निंदा केली, तर त्यांना आपण आपल्या सत्कार्याचें फळ म्हणून काय दाखवणार? असे प्रश्न त्यांच्या मनांत उभे राहिल्याखेरीज कांहीं राहिले नाहींत. तो गृहस्थ अतिशय धिमा, परंतु या प्रसंगानें त्याची अगदीं कंबर खचली, त्याच्या अंगांत अगदीं सुद्धां त्राण राहिलें नाहीं. शोध करण्यास त्याच्या अंगांत शक्ति राहिली नव्हतीच. परंतु वर सांगितलेल्या दुष्ट पत्रांनीं तर त्याचें प्रत्येक इंद्रिय अगदीं निर्बल करून टाकलें. गोपाळा

त्यांच्याजवळ आला, तरी ते त्याजवळ बोलत नसत. प्रभाकर मात्र आला, ह्मणजे तो त्यांना धीराच्या गोष्टी सांगून कांहीं तरी बोलावयास लावी. परंतु प्रभाकराला स्वतःलाच या प्रसंगीं काय बोलावें आणि काय बोलूं नये हें समजेनासें झालें होतें. तेव्हां तो जरी आला, तरी कांहीं फारसा उपयोग होत नसे. गोपाळानें व त्यानें एक दिवस वाट पाहून गणपतरावास तार करून आणवूं काय, असें विचारतां बळवंतरावांनीं त्यास निक्षून नको म्हणून सांगितलें, त्यापुढें त्या दोघां मुलांचें काय चालणार ?

अशा स्थितींत एके दिवशीं प्रभाकर आला व बळवंतरावास घाबऱ्या घाबऱ्या ह्मणतो, "काका, काका, इतके दिवस मला शंका होती, पहिल्यानं तुह्मांला सांगितलं तेव्हां खात्री नव्हती, पण आज खचित् मीं आतां पद्माकराला पाहिला तो...... ..."

"काय ! काय ! खचित पाहिला ह्मणतोस ! स्वप्नांत कीं जागेपणीं पाहिलास ? परवां तूं सांगितलंस मी तुला कागदही दाखविला, परंतु त्याचं पुढं कांहींच नाहीं तेव्हां मी समजलों कीं तें सर्व स्वप्नांतच !"

"काका, अगदीं जागेपणीं मी ... ... शोध करायला हिंडत असतांना एका व्हिक्टोरिआंत तो, एक पोलिस शिपाई, आणि राजाराम असे जातांना पाहिलं. मी त्यांच्या मागोमाग व्हिक्टोरिआंतूनच गेलों. तों ते एका बंगल्याच्या तेथें उतरले. तेव्हां त्यांना आंत जातांना पाहण्यासाठीं पुढं झालों. स्पष्टपणं पाहिलं. पद्माकरच असं ओळखलं. त्यानं मजकडे ओळखल्याप्रमाणं पाहिलं आणि नंतर जरा क्रूर चर्या करून पुनः टौकारून पाहून पाहून, त्या शिपायाबरोबर ते दोघेही गेले. जो नष्ट झाला असं आपण समजत होतों, तो स्पष्ट पाहिल्याबरोबर माझ्या मनाची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली, आणखी मी धांवत तुह्मांस सांगायला आलों. मीं अगदीं खचित् त्याला पाहिला. मला कांहीं त्याबद्दल शंका नाहीं."

प्रभाकर हें सांगत असतांना आपल्याच भरांत नसतां बळवंतरावाच्या चर्येकडे जर अणुरेणुमात्र लक्ष्य देता, तर त्यास त्यांचा चेहरा एकाएकीं किती काळवंडून गेला हें सहज दिसलें असतें; परंतु पद्माकर जिवंत असून मुंबईत आहे हें पाहिल्यापासून त्या तरुण पोराची मनोवृत्ति इतकी विलक्षण झाली कीं, दुसऱ्या कोणच्या गोष्टीकडे लक्ष्य जाणें त्याला कांहीं वेळ केवळ अशक्यच झालें. कमला नाहींशी झाली आहे आणि आतां पद्माकर तिला शोधण्याला आला, तर बळवंतरावांनीं काय उत्तर द्यावें किंवा ती कोठें आहे असें आपल्यालाच त्यांनीं विचारलें तर आपण तरी काय उत्तर देणार ? हा सहज उत्पन्न होणारा प्रश्नसुद्धां त्यास त्या वेळीं सुचलेला दिसला नाहीं, जो आपला मित्र आपण नष्ट झाला म्हणून समजत होतों, तो नष्ट झाला नसून जिवंत आहे आणि आपण प्रत्यक्ष पाहिला एवढ्या प्रसंगानेंच त्याचें चित्त क्षुब्ध होऊन गेलें.

बळवंतरावांच्या कानीं त्याचे ते शब्द पडल्याबरोबर त्यांचे मनावर फार निराळा परिणाम झाला. तो जिवंत आहे हें ऐकून त्यांस वाईट वाटलें असें मुळींच नाहीं, परंतु आपल्यावर जो प्रसंग आला आहे, त्या प्रसंगामुळें होणाऱ्या दुःखांत आतां केवढी भर पडली ! हाच जर आठ

चार दिवस आधीं येऊन आपल्या बायकोस घेऊन जाता, आणि सुखानें रहाता, तर किती उत्तम झालें असतें! आतां जर तो आपल्याकडे आला आणि आपली बायको कोठें आहे म्हणून विचारूं लागला, तर आपण काय त्याला उत्तर देणार? काय उत्तर देणें शक्य आहे? आतां होतां होईतों त्यानें आपल्याकडे येऊं नये, असा उपाय योजावा, असेंच त्यांच्या मनांत आलें, काय करणार बिचारा! त्यांचें मन अत्यंत चमत्कारिक होऊन गेलें. त्याला नको म्हटलें असतांही प्रभाकर आणि गोपाळा यांनीं गणपतरावास तार पाठवून बोलावण्याचें काम केलेंच आणि ते ज्या गाडीनें येणार असें त्यांस वाटलें त्या गाडीला जाऊन त्यांनीं त्यांना घरांत आणून सोडलें होतें आणि ते आल्या दिवसापासून कमलेचा शोध अधिक उत्साहानें होऊं लागला होता. परंतु शोध कोठेंही त्यांस लागला नाहीं. सर्व ठिकाणें त्यांनीं शोधलीं. मात्र ज्या ठिकाणीं ती आपल्या सासऱ्याची सेवा करीत होती. तें ठिकाण शोधावें, किंवा तेथें ती असेल तर पहावें, असें त्यांच्या मनांतसुद्धां आलें नाहीं. उगीच कांहीं तरी थोतांडें चार उत्पन्न होतात, त्यांतलेंच हें एक थोतांड असेल झालें, असें समजून फारसें कोणी त्या संस्थेकडे लक्ष्य दिलें नव्हतें आणि त्यांतल्या त्यांत गणपतरावाचें त्या संस्थेच्या संस्थापकाबद्दल व त्याच्या उपदेशाबद्दल त्याचप्रमाणें त्याच्या अनुयायांबद्दल फारसें चांगलें मत नव्हतें. इतकेंच नव्हे तर त्यांची तो आपल्या भाषणांत टरच उडवीत असे! यामुळें तिकडे जाऊन शोध करण्याचें त्यांच्या मनांत सुद्धां आलें नाहीं. अर्थातच त्यांस कांहींच शोध लागला नाहीं, शेवटीं कोणा तरी डिटेक्टिव गांठून तिचा शोध काढावयाचा असा त्यानें बेत केला व बळवंतरावांस त्याप्रमाणें त्यानें सुचविलेंही. परंतु बळवंतरावांस ती त्याची सूचना बिलकुल आवडली नाहीं. आपण अधिकाधिक चौकशी करूं आणि आपल्याला भलतेंच कांहीं कळलें तर, असें मनांत येऊन तो अगदीं थरथर कांपे. त्यास डिटेक्टिवाकडून बातमी काढणें अगदीं अयोग्य वाटलें. आपण होऊन गेलेली मुलगी सन्मार्गाला राहिली नाहीं. तशांत त्या पत्रांत स्पष्टपणें तसेंच लिहिलें आहे. आतां आणखी आणखी शोध करून उगीच अधिक अधिक उद्वेग कां करून घ्या? जें आपल्याला दिसतें आहे, कळलें आहे, त्याहून भयंकर कांहीं तरी आपल्या नजरेसमोर येण्यापेक्षां मुळींच शोध न करणें बरें, असें त्यांस वाटूं लागलें होतें. त्यांचें मन अतोनात क्षीण झालें होतें. मूळचा धीराचा माणूस, पण या अनपेक्षित व आकस्मिक संकटानें-जिच्यावर आपण आपल्या जीवापेक्षांही अत्यंत प्रेम केलें, त्या मुलीच्या अशा वागण्यानें त्यास अगदीं निराळाच दुर्बळ व हताश असा माणूस केला. त्यानें गणपतरावांच्या कोणच्याही सूचनेला मोडताच घालावा, त्यांतून डिटेक्टिवमार्फत शोध आणण्याच्या या सूचनेला तर त्यांनीं फारच मोडता घातला. परंतु गणपतराव तसें ऐकणारा माणूस नव्हता. आपण आपल्या मनांत येईल ती युक्ति करून शोध आणविला पाहिजे. पोरीला कोणी तरी फसविली असावी, ती स्वतःसिद्ध वाईट मार्गास कधींही जाणार नाहीं, हा त्याचा पूर्ण विश्वास-दृढ विश्वास. द्वारकाताईची मुलगी अशी नादान होणें शक्यच नाहीं, ही त्याची पक्की समजूत.

द्वारकाताईविषयीं त्याचा आदर ह्मणजे एखाद्या देवीविषयीं असावा तसा आदर. आणि तिची मुलगी अशी कांहीं निघेल हें त्यास संभवनीयच वाटेना. परंतु ज्या कांहीं गोष्टी दिसत होत्या त्या अशा चमत्कारिक होत्या कीं, त्यांपासून बळवंतरावांच्या ह्मणण्याखेरीज दुसरें कांहींच अनुमान करतां येऊं नये. अशा पंचाइतींत गणपतराव होता. पण त्यानें असा निश्चय केला होता कीं, आपण त्या पोरीला भेटून बोलल्याखेरीज कांहीं रहाणार नाहीं. त्यास त्यांच्या या निश्चयांत कितपत यश आलें तें वाचकांस लवकरच कळेल.

काकासाहेब व दादासाहेब गेल्या दिवसापासून दादासाहेबांचें त्यांच्या घरीं पत्र नाहीं कीं कांहीं नाहीं, यामुळें सर्वत्रांना अतिशय काळजी लागली. काकासाहेब व ते बरोबर गेले असल्याकारणानें त्यांनीं त्यांच्या घरीं शोध केला. तेव्हां काकासाहेबांचेंही पत्र आलें नव्हतें, आज उद्यां दोघांचींही पत्रें येतील म्हणून पांच चार दिवस त्यांनीं वाट पाहिली, तरी दोघांचाही पत्ता नाहीं, तेव्हां मंडळी घाबरली. इतक्यांत काकासाहेबांच्या घरीं त्यांचें एक पत्र गेलें, त्यांत आह्मी खुशाल आहों, काम होतांक्षणींच येतों. आतां फार दिवस लागणार नाहींत असें होतें. त्यांत स्पष्टपणें दादासाहेबांची प्रकृति बरी आहे, किंवा तेही आपल्याबरोबर येणार आहेत असें कांहीं लिहिलें नव्हतें. तेव्हां मंडळींना पुनः शंका आली. पण लवकरच काकासाहेबांनीं आह्मी येतों म्हणून लिहिलें आहे. तर ते दोघेही येत असतील असें समाधान करून घेऊन आणखी दोन दिवस काढले. पण कांहीं केल्या त्यांचें मन कसें स्वस्थ राहावें? राहीना. तेव्हां त्यांनीं पुनः काकासाहेबांच्याकडे शोध केला. तों त्यांचें पुनः पत्र आलें त्यांत असेंच होतें कीं, "आमची प्रकृति बरी आहे. आह्मी लवकरच येऊं. अजून ज्या कामाकरितां आलों तें झालें नाहीं." पुनः मंडळी बुचकळ्यांत पडली. घरच्या कारकुनास वगैरे मुंबईस पाठवावें, तर दादासाहेब काय म्हणतील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. तेव्हां तसें करण्याची कोणासच छाती होईना. तथापि जवळ जवळ आठ दिवस झाले, तरी सुद्धां कांहीं पत्ता नाहीं. हें पाहतांच त्यांनीं दादासाहेबांचें नेहमीं उतरण्याचें घर जें अण्णासाहेबांचें, तिकडे पत्र पाठविलें. त्याबरोबर त्यांना असें पत्र आलें कीं, "दादासाहेब आले त्याच्या दुसरे दिवशीं कोठें बाहेर गेले. पुढें त्यांचा काकासाहेबांबरोबर निरोप आला, कीं आपण कांहीं कारणामुळें परस्पर गांवीं जातों. काकासाहेब मागून येणार आहेत त्यांचे बरोबर आपलें सामान पाठवून द्यावें. त्याप्रमाणें काकासाहेबांनीं चार पांच दिवसांपूर्वीं सामान नेलें. आतां आपलें असें पत्र येतें. तेव्हां काय घोंटाळा आहे, कांहीं कळत नाहीं. आतां मी ताबडतोब काकासाहेबांकडे जाऊन सगळा शोध काढतों, आणि तार करितों. काळजी नसावी."

इतकी स्थिति आली. तेव्हां अण्णासाहेबांनीं दादासाहेबांच्या शोधास प्रारंभ केला. काकासाहेबांची गांठ घेण्याचा प्रयत्न केला. तर दोन दिवसांत त्यांची गांठ पडली नाहीं. अण्णासाहेबांस इतका सुद्धां संशय आला कीं, हे आपली गांठ घेण्याचें टाळीत असावे! परंतु प्रत्यक्ष गांठ घेतल्याखेरीज दुसरा मार्ग काय

होता ? दादासाहेब त्या गाडीच्या टकरींत सांपडून कोठें तरी आजारी पडले असतील ही कल्पनासुद्धां त्यांस झाली नाहीं. पण दादासाहेबांचें मध्यंतरीं झालें तरी काय हेंही समजेना. शेवटीं एकदां काकासाहेब भेटले; ते भेटले त्याबरोबर त्यांची पहिली इच्छा हीच होती कीं, " आपण व दादासाहेब दादरास त्या रात्रीं गेलों होतों व येतांना तेनू आम्ही त्या अपघातांत सांपडलों असतां त्यांस दुखापत होऊन पोलिसबिलिस त्यांस इस्पितळांत नेत होते, आणि आपण तेथून निघून आलों " वगैरे खरी हकीकत सांगावी. परंतु ती इच्छा उत्पन्न होतांच, " आपण कोणास कांहीं कळवलं नाहीं, याबद्दल लोक आपल्याला काय म्हणतील, किती तरी दोष देतील " असें मनांत येऊन त्यांनीं " दादासाहेब आले त्याच्या दुसरे दिवशींच 'मला बोआ मुंबईत क्षणभर सुद्धां रहायला नको. माझ्या प्रकृतीला बरं वाटत नाहीं, मी आतांच्या आतां जाणार' म्हणून बोरीबंदरावर आम्ही कामाला गेलों असतां मी नको नको ह्मणत असतां गाडींत बसले. सामान आपल्याकडे आहे तें तुह्मी आणा म्हणून आपल्याला सांगितलं," अशी बात ठोकून दिली. अण्णासाहेबांस फार आश्चर्य वाटलें, आणि ते आतां शोध कसा करावा या विचारास लागले.

---

# प्रकरण ७८ वें.

## शोध लागला.



मोठ्या शहरांत हीं एक विलक्षण गोष्ट असते, कीं कोणाचा कोणास पत्ता लागणें मोठें दुरापास्त होतें. महासागरांत पडलेला एखादा जिन्नस ज्याप्रमाणें शोधणें अतिशय कठिण व सांपडणें त्याच्याहीपेक्षां कठिण, तीच स्थिति मोठ्या शहरांत हरवलेल्या माणसाच्या शोधाबद्दल व सांपडण्याबद्दल होय. कोणच्या बाजूनें शोध करावयाचा आणि कसा करावयाचा याची दिशा ठरविणेंच जेथें मुष्किलीचें, तेथें शोधास प्रारंभ करितांनाच अडचण पडावी, यांत नवल काय ? अण्णासाहेबांची अशीच चमत्कारिक स्थिति झाली. काकासाहेबांनीं त्यांस असें सांगितलें, कीं ते आपल्या देखत स्टेशनावर गाडींत बसून गांवीं निघून गेले; परंतु काकासाहेबांच्या सांगण्यांत कांहीं तरी लपंडाव आहे असें, त्यांच्या त्या सांगण्याच्या झोंकावरूनच त्यांस वाटलें. पण एवढ्या थोरल्या गृहस्थास " तुह्मी सांगतां तें खरं दिसत नाहीं; कांहीं लपवून ठेवीत असाल, तर तें ठेवूं नका, " असें स्पष्टपणें कसें ह्मणावें ? असें मनांत येऊन

ते काकासाहेबांस सोडून निघाले. अण्णासाहेबांचा व दादासाहेबांचा फार स्नेह हें वाचकांस माहिती आहेच. तेव्हां काकासाहेबांच्या सांगण्यांत कांहीं तरी लपंडाव आहे, असें वाटतांच त्यांना दादासाहेबांबद्दल विशेष काळजी वाटली. दादासाहेब कोठें गेले असतील, याची त्यांस कल्पनासुद्धां होईना. एकदां त्यांच्या मनांत असें मात्र आलें, कीं ते कदाचित् त्रासून वैतागून कोणीकडे तरी तीर्थक्षेत्रीं गेले असतील; परंतु सर्व कुटुंबाला टाकून ते अगदीं एकाएकीं कांहीं वस्त्रप्रावरण सुद्धां न घेतां आपले आगगाडींत बसून चालते होतील, हें त्यांस अगदीं संभवनीय वाटलें नाहीं. तथापि न जाणों, आपली मित्रमंडळी आपणास कदाचित् मोडता घालतील, तर त्यांना न कळवितां मुकाट्यानें आपण आपलें निघून जावें, आणि मग तेथें जाऊन पोंचल्यावर सर्व कुटुंबाला तिकडे बोलावून घ्यावें, असा विचार करून ते एकदम गेले असतील, असाही पण त्यांनीं कयास केला; परंतु कोणत्याही कयासानें अगर तर्कानें त्यांच्या मनास समाधान होईना. जी गोष्ट करावयाची म्हणून एकदां त्यांनीं ठरविलें, त्यांत कोणाच्यानेंही बदल करविणें शक्यच नव्हतें. अर्थात् मित्रांना व इष्टांना भिणारे ते गृहस्थ नव्हेत. तेव्हां ते नकळतच कोठें तरी निघून गेले असतील हें संभवनीय नाहीं. असें जर आहे, तर त्यांचें झालें काय? जर ते कोठें तीर्थयात्रेला गेले नाहींत आणि घरींही गेले नाहींत, तर गेले तरी कोठें ! मुंबईतल्या मुंबईत असतील ! पण आपल्याला नकळत येथल्या येथें रहातील, आणि तेंही इतके दिवस! संभवनीय नाहीं. असे ते अगदीं बुचकळ्यांत पडून दादासाहेबांचा शोध कसा व कोठें लावावयाचा याची त्यांस मोठी पंचाईत पडली. कांहीं अणुरेणूइतकी जरी त्यांस माहिती लागती, तरी त्यांनीं सुतानें स्वर्गास जाण्याची तजवीज केली असती; परंतु तशा तऱ्हेनें जाण्यास सूत तरी हवें कीं नको ! तें सूत त्यांस कोठेंही लागेना. काकासाहेबांनीं स्पष्ट सांगितलें, कीं ते आगगाडींत बसून गांवास परत जातों म्हणून निघून गेले. तेव्हां आतां करणार काय ? अशा विचारांत ते रस्त्यानें हिंडत असतां त्यांस दूर पद्माकर उभा असल्याचा भास झाला. हा असा कसा येथें आला, म्हणून संशय मनांत उभा राहून ते क्षणभर स्वस्थ त्याकडे पाहत उभे राहिले. आपले डोळे आपणास भलताच भास तर करीत नाहींतना ? असें मनांत येऊन ते विचार करीत उभे राहिले. ज्याच्याकडे ते पहात होते, तो कोणा गृहस्थाशीं बोलत उभा राहिला होता; त्यांच्याकडे त्याचें तोंडही नव्हतें. परंतु त्याला अनेक वेळां पाहिलें असल्याकारणानें त्याच्या शरीराचा जेवढा भाग दिसला, तेवढ्यावरूनच तो पद्माकर हें त्यांनीं तत्काळ ओळखलें व क्षणमात्र त्यांस असें वाटलें, कीं त्याला बोलावून दादासाहेबांची हकीकत अशी अशी चमत्कारिक झाली आहे, तर त्यांचा शोध केला पाहिजे, असें सांगावें; परंतु त्याला हांक मारण्यापूर्वीं आपण कांहीं चूक करीत नाहींना, याबद्दल खात्री करून घेऊन मग त्यास हांक मारावी, असा विचार करून त्यांनीं त्याच्या दुसऱ्या बाजूस जाऊन आपल्या मनाची खात्री करून घेतली. नंतर त्यास हांक मारली असतां तो आपल्याजवळ येईल कीं नाहीं याबद्दल त्यांना शंका आली. परंतु मुलानें बापाची कांहीं गोष्ट

कितीही अवज्ञा केली असली, तरी बाप नाहींसा झाला असला, तर त्याचा शोध करण्याकरितां तो अगदीं प्राण टाकल्या-खेरीज राहणार नाहीं, असें त्यांस खात्रीनें वाटलें; आणि त्यांनीं त्यास हांक मारून सर्व हकीकत सांगून दादासाहेबांचा शोध लावण्याला मदत कर, तसा शोध लावणें तुझें कर्तव्य आहे, असें सांगण्याचा विचार केला. इतक्यांत पद्माकर ज्या गृहस्थाशीं बोलत होता, त्याचें व याचें बोलणें संपून दोघे दोन दिशांना जाऊं लागले. तेव्हां अण्णासाहेबांनीं पद्माकर-पंतास हांका मारून त्याचे जवळ गेले. अण्णासाहेबांस पद्माकरानें तेव्हांच ओळ-खलें. यांनीं आपल्यास रस्त्यांत हांका मारिल्या हें पाहूनच पद्माकरास आश्चर्य वाटलें. आपण जो वेड्यासारखा विवाह करून फशीं पडलों—त्या विवाहामुळें ज्या-प्रमाणें आपल्या वडिलांस मुकलों, त्याच-प्रमाणें त्यांच्या जुन्या थोर मित्रांसही मुकलों, असें त्यास अगदीं साहजिकपणेंच वाटत होतें. तेव्हां तो जरा खालीं नजर ठेवूनच त्यांच्यापाशीं उभा राहिला. आपण आपल्या बापाशीं जें वर्तन केलें, त्याबद्दलच हे आपणांस कांहीं तरी बोल-णार असावेत, असें त्याला वाटलें; परंतु अण्णासाहेब तसें कांहीं न बोलतां त्यास म्हणाले, " मला कांहीं महत्त्वाच्या विषया-संबंधानं तुझ्याशीं बोलायचं आहे, तर तूं कृपा करून माझ्याबरोबर घरीं चल. " पद्माकर क्षणमात्र अनमानला, परंतु एवढ्या गृहस्थाची विनाकारण अवज्ञा करूं नये असें लागलीच त्याच्या मनांत येऊन त्यानें त्यांस बरोबर जाण्याला आपण तयार आहों म्हणून दर्शविलें. अण्णासाहेबांनीं लागलीच त्यास आपल्या बंगल्यावर नेलें. वाटेनें त्यांनीं त्यास दादा-साहेब नाहींसे झाले आहेत ही बातमी दिली. " त्यांनीं जरी तुझं नांव घ्यायचं नाहीं असा निश्चय केला असला, तरी तें मनांत न ठेवतां तूं त्यांचा शोध लावला पाहिजेस; हजार कामं असलीं तरी हें तुझं कर्तव्य आहे; घरच्या मंड-ळींना अतोनात काळजी लागली आहे; आज मी त्यांना तार करून दादासाहे-बांची खुशाली कळवितों, असं लिहिलं होतं; परंतु कांहींच तपास लागला नाहीं तर त्याहावं तरी काय ! तूं मुळींच नष्ट झालास अशी आह्मां सगळ्या जणांची समजूत होऊन गेली होती, पण तसं कांहीं नाहीं, ही देवाची खैरच म्हणायची. दादासाहेबांची अशी चमत्कारिक दशा होण्याला कारण तूंच, तेव्हां निदान त्यांची काय स्थिति आहे, आणखी ते आहेत कुठें, याचा तरी शोध लावायला मदत करायला तुला हरकत नसावी. दादासाहेबांसारख्या एकमार्गी आणखी बाणेदार माणसाची अशी स्थिति व्हावी, हे संभवनीयसुद्धां कोणास वाटलं नसतं; परंतु तें आम्ही प्रत्यक्ष पहातों आहोंत, तेव्हां काय म्हणावं ! दैवयोग असा असतो ! "

वास्तविक अण्णासाहेबांच्या मनांतून पद्माकराला अशा तऱ्हेनें लागण्यासारखें बोलण्याची इच्छा मुळींच नव्हती; त्यांतून जो मुलगा वारला तो एकाएकीं जिवंत आहे असें दिसलें असतां त्याला प्रथम दर्शनींच असें बोलावें, असें त्यांस मुळींच वाटलें नाहीं. पण दादासाहेब मूळचे कसे बाणेदार आणि या पोरानें आपल्या मूर्ख व अद्वातद्वा वर्तनानें त्यांची कशी काय अवस्था केली, हें मनांत येऊन—क्षिब-

हुना यानें अशा नऱ्हेनें वर्तन केल्यामुळेंच ते आज कोणीकडे तरी निघून गेले असावे, असेंही वाटून–त्याच्यानें वर सांगितल्याप्रकारचें थोडेंसें छद्मी भाषण केल्याखेरीज रहावेना. मनुष्यस्वभावच असा चमत्कारिक आहे.

पद्माकरानें त्याच्या त्या बोलण्यावर त्यांस तसें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो कांहीं वेळ स्वस्थ बसला व अखेरीस ह्मणतो, " ते इथें कां आले होते, केव्हां आले होते आणखी केव्हां गेले याची सगळी जर माहिती मला द्याल, तर मी त्यांचा शोध खचित् लावतों. माझा स्वतःचा जीव असा चमत्कारिक संकटांत सांपडला आहे; पण त्यांतून मी कसा तरी निसटेन. सध्या निसटलोंच आहे; पण कांहीं असलं तरी दादासाहेबांचा शोध लागल्यानंतर मी त्यांच्या......" परंतु पुढें त्याच्या मनांत काय बोलावयाचें तें नितकेंच त्यानें आपल्या ओंठांतल्या ओठांतच ठेविलें, अण्णासाहेबांनीं त्यांस दादासाहेब एकाएकीं काकासाहेबांबरोबर कसे आले, कां आले तें त्यांनीं कसें सांगितलें नाहीं, नोटी होत्या त्या त्यांना कां पाहिजेत, कशाला पाहिजेत, हें न सांगतां मुकाट्यानें कशा नेल्या, आणि नोटी नेल्या दिवसापासून ते पुनः परत कसे आले नाहींत, वगैरे सर्व हकीकत सांगितली. हे काकासाहेब कोण हें पद्माकरास मुळींच माहिती नव्हतें. यामुळें अर्थातच त्यानें त्यांस त्यांचीही माहिती विचारिली. ती त्यांनीं देतांच, तो त्यांस ह्मणतो, दादासाहेबांनीं मुकाट्यानें नोटा नेल्या, तेव्हां त्या नोटांशीं काकासाहेबांचा कांहीं तरी खास संबंध असावा. त्या नोटा या काकासाहेबांना पाहिजे असतील म्हणूनच त्यांनीं दादासाहेबांपासून त्या घेतल्या असतील. काकासाहेब कोणा किमयागाराच्या नादीं लागले असून त्यांनीं बरीच पैशाची उधळपट्टी चालविली आहे, हें मागेंच अण्णासाहेबांच्या कानीं गेलें होतें, तें या वेळीं त्यांनीं पद्माकरास सांगितलें. यामुळें तर पद्माकराच्या मनाची पक्कीच खात्री झाली, कीं काकासाहेबांनाच पैशाची जरूरी लागून त्यांनीं दादासाहेबांजवळ पैसे मागितले असतील, आणि दादासाहेब भोळे, त्यांनीं नाहीं न म्हणतां मी तुह्मांला नोटी विकून पैसे आणून देतों असें कबूल केलें असावें. ते पैसे देण्यासाठींच ते कदाचित् मुंबईस आले असावे. आणि तेवढ्याचकरितां ते नोटीही घेऊन गेले असतील. हा सगळा तर्क पद्माकरानें बरोबर बांधला. परंतु नोटीही दिल्यानंतर दादासाहेबांनीं परत कां येऊं नये ? परत आले नाहींत तर नाहीं, पण परत घरीं तरी जावें; पण तसेंही कां केलें नाहीं ? मधेंच कोणीकडे गेले ? कीं अजून मुंबईतच आहेत हें सर्व त्या दोघांस गूढच राहिलें. इतक्यांत काकासाहेबांनीं आपल्याला जेव्हां दादासाहेब गांवीं गेल्याबद्दल सांगितलें, तेव्हां त्यांच्या चर्येवरूनच त्यांच्या सांगण्यांत कांहीं तरी घोंटाळा आहे असें आपल्यास वाटलें व त्यांनीं सांगितलें त्यापेक्षां खरोखर कांहीं तरी त्यांना जास्त माहिती आहे असेंही आपल्याला वाटलें, असेंही अण्णासाहेबांनीं त्यास सांगून दिलें. पद्माकर आपल्या ठिकाणीं विचार करतां करतां त्याच प्रकारच्या मथितार्थाला आला होता. पैशाच्या गरजू काकासाहेबानेंच आपल्या वडिलांच्यासंबंधानें कांहीं तरी घोंटाळा केला आहे असें त्यास वाटलें. आणि आतां

त्यांनाच गांठून त्याचा खुलासा केल्याखेरीज गत्यंतर नाहीं, असें मनांत येऊन त्यानें त्याप्रमाणें त्यांची गांठ घेण्याचा निश्चय केला. अण्णासाहेबांपासून त्यांचा पत्ताबित्ताही विचारून घेऊन तुह्मीही शोध करा, मीही करतों, मला पत्ता लागतांक्षणींच, आपल्याला कळवितों, नाहीं लागला तरी मी उद्यां आपलेकडे येतोंच, असें म्हणून तो तेथून काकासाहेबांकडे गेला. काकासाहेब त्याच रात्रीं आपलें काम झालें म्हणून आनंदित होत्साते परत जाण्याच्या विचारांत होते. इतक्यांत पद्माकराची स्वारी तेथें जाऊन उभी राहिली.

काकासाहेब कोण आहेत? मी त्यांच्याकडे आलों आहें, असें त्यानें सांगितलें तें काकासाहेबांनाच सांगितलें; तेव्हां मीच काकासाहेब, काय ह्मणणें आहे, म्हणून त्यांनीं जरा ऐटींत विचारलें. पद्माकरानें मी दादासाहेबांचा मुलगा आणि त्यांचा शोध करण्याकरितां आलों आहें, ते आपल्या गांवीं अजून गेले नाहींत, आपल्याबरोबर ते आले वगैरे हकीकत कळली; पण ते गांवीं गेले असें आपण म्हणतां, आणि ते तर गांवीं गेले नाहींत. तेव्हां हा घोंटाळा काय आहे? अण्णासाहेबांजवळ आपण तर सांगितलें, कीं ते गाडींत बसून निघालेले आपण पाहिले. पद्माकराच्या या बोलण्याला सरळ उत्तर न देतां काकासाहेब अगदीं जंगी आढ्यतेचा आव घालून त्यास म्हणतात, " एकूण ज्याच्यामुळं त्या पवित्र व निर्मळ गृहस्थाची इतकी दुर्दशा झाली, ते त्यांचे चिरंजीव आपण काय? ठीक आहे. आपल्याला आपल्या वडिलांची आतांशी आठवण झाली! सुधारणा बिधारणा सगळी जाऊन कफल्लक होऊनं आतां डोळे उघडले वाटतं!"

पद्माकरास त्यांच्या त्या बोलण्यानें व ते बोलले त्यावेळीं त्यांनीं केलेल्या आविर्भावानें इतका कांहीं संताप आला, कीं चांगलें सणसणीत उत्तर देण्यासाठीं त्याचे ओंठ अगदीं फुरफुरूं लागले. परंतु आतां तो अगदीं पहिला पद्माकर राहिला नव्हता. पहिल्यापेक्षां बरीचशी शांति त्याच्या अंगीं आली होती, यामुळें त्यानें तें बोलणें तितकेंच ठेवून पुनः शांतपणें काकासाहेबांस म्हटलें, " दादासाहेब कुठें आहेत, केव्हां गेले हें जर मला सांगाल, तर फार उपकार होतील. घरच्या माणसांना आणखी इथल्या त्यांच्या सगळ्या मित्रमंडळींना फार काळजी लागली आहे. मला आतांच कळलं. अण्णासाहेबांनीं मला सांगितलं, तेव्हां घाबरून जाऊन मी आपल्याकडे आलों आहें. तेव्हां कांहीं माहिती असेल तर सांगा. नाहीं तर विनाकारण घरची सगळी मंडळी घाबरून इकडे येतील..........."

परंतु काकासाहेब मध्येंच त्यास म्हणतात, "तुम्हाला सुधारकांना बाप कशाला हवा, आणखी घरची मंडळी तरी कशाला हवी? सुधारकांनीं आपल्या बापाची चौकशी केलेली आजच मीं ऐकली बोआ. एकून तुम्ही घाबरून गेलां आहां काय? मला वाटतं, खरंच कांहीं बरं वाईट झालं असलं तर इस्टेटीवर वारसा सांगण्याकरितांच हा घाबरेपणा असेल."

तें ऐकून पद्माकर लांबडा लाल झाला. असले अत्यंत अपमानकारक शब्द सहन करून घेणें त्यास केवळ अशक्यच होतें आणि आतां ते त्याला सहन होईनातच. त्यानें एकदम काकासाहेबांस ह्मटलें, " माझ्या बापापासल्या नोटी उपटण्यासाठींच तुह्मी त्यांना कांहीं तरी करून

कुठें तरी घालवून दिलं आहे. तुह्मी आतां सरळ जबाब दिला नाहींत, तर मी या घटकेस पोलिसांस वर्दी देऊन तुह्मांला अडकविण्याबद्दल अर्ज करितों. मग काय होणार असेल तें होईल." हे शब्द त्यानें अशा जोरानें उच्चारले व हे उच्चारतांना असे हातवारे केले, कीं काकासाहेबांचा सर्व उद्दामपणा जेथल्या तेथें जिरून त्यांचा चेहरा अगदीं काळा ठिक्कर पडला. तो तसा काळा ठिक्कर पडलेला पाहतांक्षणींच पद्माकरास अधिकच संशय आला आणि त्यानें त्यांस अधिकच चेपण्याच्या हेतूनें ह्मटलें, "बोला, बोला. तुम्ही त्या नोटींसाठीं कांहीं तरी कृष्णकृत्य केलं आहे, असं हें तुमचं काळें पडलेलं तोंडच सांगतं आहे. बोला आतां काय असेल तें, नाहीं तर मी एक क्षणभरसुद्धां गय करणार नाहीं. बोला, ते कुठें आहेत? त्यांच्या त्या नोटी कुठें आहेत ?"

हे त्याचे प्रश्न चालले असतां काकासाहेबांची अगदींच घाबरगुंडी झाली. हा जर पोलिसांत गेला, तर आपला सगळाच प्रकार बाहेर पडेल आणखी मग सर्वच कांहीं भयंकर होईल, असें मनांत येऊन त्यानें "सांगतों, बाबा, सर्व सांगतों," असें म्हणून रडतखडत बराचसा भाग लपवून एकदां येवढें सांगितलें कीं, "आह्मी दोघेही दादराहून येत असतां त्या अपघातांत सांपडलों. मी वांचलों. मला कांहीं झालें नाहीं; पण दादासाहेबांस फार लागून पोलिसानें त्यांस कोणच्या तरी इस्पितळांत नेलें. मी घाबरून तेथून निघून आलों. ते कोणच्या इस्पितळांत आहेत आपल्याला ठाऊक नाहीं. ते त्या अपघातांत सांपडण्याला दादरास कां गेले, वगैरे प्रश्न पद्माकरानें त्यांस विचारलेच व त्या तसल्या प्रश्नांचें उत्तर देतां देतां काकासाहेबांचें एकंदर कारस्थान चांगलेंच बाहेर पडलें. पद्माकरास त्या वेळीं त्यांस फजीत करण्यास अवकाश नव्हता. आपला बाप त्या भयंकर अपघातांत सांपडून आज इतके दिवस इस्पितळांत असून कोणास त्याची वार्ता सुद्धां या नरपशूनें दिली नाहीं, म्हणून त्यास अतोनात संताप आला. परंतु हा वेळ व प्रसंग त्याच्याशीं भांडत बसण्याचा नव्हता. लवकर पोलिसांत जाऊन अगर इस्पितळांत जाऊन दादासाहेब कोणच्या इस्पितळांत आहेत त्याचा शोध करणें जरूर होतें, म्हणून तो नाबडतोब त्यांच्या तेथून निघून गेला. तो निघून जातांच त्यांच्या छातीवरला एक मोठा थोरला धोंडाच उचलल्याप्रमाणें काकासाहेबांस झालें; आणि त्यांनीं आतां क्षणाचाही विलंब न करतां आपल्या गांवचा रस्ता पकडला.

इकडे पद्माकरास वर सांगितली इतकी बातमी लागल्यावर आणखी काय पाहिजे होतें ? हां हां ह्मणतां त्यानें दादासाहेब कोठें आहेत त्याचा शोध लाविला आणि तो त्या मठाच्या दारांत जाऊन उभा राहिला.

# प्रकरण ७९ वें.

## राजाराम व इतर मंडळी.



दादरास ज्या बंगल्याच्या दारांतच कमळा पडली व तिला निश्चेष्ट स्थितींत सोडून जातांना पद्माकरास कोणी गृहस्थ भेटला, त्या बंगल्यांत राजाराम व प्रोफेसर डयांडी असे दोघे होते, ही गोष्ट खरी. पद्माकरास ती गोष्ट खात्रीपूर्वक माहित्ती होती असें नाहीं, परंतु या दादरच्या बंगल्यांत एकदां दोनदां राजारामानें त्यास कांहीं कारणानें आणलें होतें, यामुळें येथें तो आजही असेल असें पद्माकरास वाटलें; व त्यावरूनच त्यानें त्या विचारणाऱ्या पोलिस ऑफिसरास राजाराम असला तर तेथें असेल असें सांगितलें. तो त्यावेळीं विलक्षण अस्वस्थ अशा स्थितींत होता, नाहीं तर त्यानें पोलिसास इतकें सरळ उत्तर दिलें नसतें. त्या गृहस्थाच्या बरोबर तो नाइलाजास्तव त्या बंगल्यांत गेला, पहिलें दार ओलांडून स्वारी आंत गेली, तों प्रथम कोणीच दिसलें नाहीं, परंतु पलीकडल्या एका दालनांत कोणी तरी बोलत होता त्याचा आवाज कानीं पडला. हे दोघे पुढें गेले, तों त्यांच्या कानीं पुढील शब्द—किंबहुना पुढें दिलेलें सर्व भाषण पडलें:—

"सोम्या लेकाचा अतिशय पाजी! गाढवानं सगळं हुकवण्याचा रंग आणला होतान्. मी कमळेला पायऱ्या चढायला सांगून तेथून निसटलों म्हणूनच बरं झालं; नाहीं तर त्यावेळीं माझ्यावरच तो उलटता. तरी बेताप्रमाणं प्रभाकर अजून आला नाहीं, तो आला असता, तर त्याच्या मनांत कांहीं शंका ह्मणून रहातीना. पहा, पहा बाहेर कसा डुक्कर पडला आहे तो. त्या पायऱ्यांपासून गुलामाला फरपटत आणावा लागला. त्याच्या पण मस्तकाची काय अवस्था झाली! मी तिथें त्याच्याजवळ उभा आहें, असं समजूनच कीं काय, कोण जाणे, तो बडबडूं लागला. कारण त्याच्याबरोबर कोणी आलं होतं तेंही मला त्या गर्दीत दिसलं नाहीं. झट्कन् या बंगल्याला वळसा घालून त्याला फरपटीत मागल्या बाजूस टाकून देऊन आंत घुसलों, एवढ्यानं बरं झालं. माझी फार इच्छा, कीं तो इथें उभा असतां तितक्यांत प्रभाकरानं तिथें यावं. पण तुझ्याकडूनच कांहीं तरी पत्र टाकण्यांत किंवा दुसऱ्या कशांत चूक झाली, यांत शंका नाहीं."

हें बोलणें कानीं पडतांच पद्माकराबरोबर आलेला तो गृहस्थ तेथेंच थबकला, व पद्माकराचाही हात धरून त्यानें त्यास तेथेंच थबकाविलें. त्याचे मनांतून सर्व भाषण ऐकून घेऊन मग पुढें जाऊन काय करावयाचें तें करावें, असें होतें. तो गृहस्थ पोलिस ऑफिसर होता, या-

बद्दल आतां वाचकांस शंका नकोच. जें काय ऐकावयास सांपडेल तें ऐकून घेतल्यानंतर मग आपल्या गृहस्थास पकडून घेऊन चलावें; तोंपर्यंत यांचें भाषण काय होतें तें आपणास ऐकण्यास सांपडल्यास कांहीं पुरावा जमविण्यास तरी उपयोग होईल, असें वाटून त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें हलकेंच थबकून मग एकदम आंत जाऊन स्वारीस आमंत्रणचिठी देण्याचा विचार केला. आमंत्रणचिठी त्याजेजवळ तयार होती, हें वाचकांस माहीत आहेच.

आतां सांगितल्याप्रमाणें एकाचें भाषण झाल्यानंतर तो ज्याच्याशीं बोलत होता त्याचें उत्तर आलें:—

"एकून पुष्कळच गोष्टी आजच्या आज तुमच्या मनांतून उरकावयाच्या होत्या ह्मणायच्या ! पण आतां तो वेडा पद्माकर संतापून निघून गेला असेल. तेव्हां पुढचा बेत जो तुह्मीं केला होता तो पार पाडणार कीं नाहीं ?"

"पार पाडणार तर ! प्रभाकरालाही इथें आणण्याची खटपट करण्यांत थोडीशी माझी चूक झाली. तो जर येता, तर माझा पुढला बेत पार पडताना. कारण ती त्याच्याबरोबर इथून निघून जाती. तो प्रकार बग झाला नसता. पण आपण तिला बरोबर घेऊन जावं कीं नाहीं, याच्याबद्दल माझ्या मनांत निश्चय झाला नसल्याकारणानं मीं तो प्रकार तसा केला होता. कारण, बाचारे, आपल्याला कोणचीही गोष्ट करायची असली, तरी त्यांत बायकांचा संबंध होतां होईल तों आणूं नये. तो जर आला तर पुष्कळ वेळां त्यांच्याचमुळं आपला घात होतो. पण परमेश्वराच्या मनांत मीं तिला घेऊन जावं असंच दिसतं. त्यान तिला माझ्याचसाठीं निर्माण केली असावी, त्याखेरीज प्रभाकर येण्याचा तरी कां चुकावा ?"

इतकें बोलणें होतें आहे तों दुसरा गृहस्थ त्यास जरा तीक्ष्ण आवाजानें म्हणतो, "अहो महाराज, एवढी मात्र गोष्ट काढूं नका. जर असं बोलाल, तर तुमचं आमचं मुळींच जुळणार नाहीं. मग आमची मदत तुह्माला नाहीं, असंच समजा. तुह्मी एवढा डल्ला मारला त्यांतला भाग आम्हांला फार थोडा देणार; परंतु तें आह्मीं कबूल केलं तें केवळ या आशेवर. असं असतां तुम्ही तीही आमची आशा नाहींशी करून, तोही डल्ला आपणच उपटण्याचा विचार चालविला आहे, तें आम्ही कसं चालूं देणार ?"

तें ऐकतांच तो दुसरा गृहस्थ मोठ्यानें खदखदां हंसून ह्मणतो, "लेका, तीन दमडीच्या गंड्या, तुझ्याकरतां मीं इतका सगळा खटाटोप केला अशी तुझी समजूत आहे काय ? तूं आपली समजूत आपल्याजवळच घेऊन बस. तुला तुझा जीव बचवायचा असेल, तर मुकाट्यानं माझ्याबरोबर माझा नोकर म्हणून ये. आतां अधिकउणं बोलूं नकोस. मी बाहेर जाऊन तिची काय हालहवाल आहे, तीं पाहून येतों. मग्राशीं मी आंत आल्याबरोबर कानोसा घेतला तेव्हां ती तेथेंच निश्चेष्ट पडली आहे, असं जाणलं. पण तो अद्यापि तेथून गेला नसेल, अशा समजुतीनं जरा थांबलों. तिच्याबरोबर येणारांत मी होतों हें त्याला ठाऊकच होतं. प्रभाकराकरितां ती तेथें येणार असून मला त्यानंच तिला स्टेशनावरून आणण्यास सांगितलं, हें सगळं त्याला मीं सांगूनच ठेविलं..."

त्याचें भाषण ऐकणारा दुसरा गृहस्थ एकदम त्याचे अंगावर येऊन ह्मणतो:

"आतां माझ्या हातून कांहीं होणार नाहीं, असं समजून तूं एवढ्या बढाया मारूं लागलास काय? पण संभाळ, अजून तूं निसटून गेलास असं समजूं नको...."

"लेका, तूं काय करणार रे? माझ्या मुंडीला कोणी हात घातला तर तो तुझी मुंडी मुरगळल्याखेरीज ठेवील असं समजूं नको, माझ्या मुंडीबरोबरच तुझी मुंडी जाणार. मी हरतऱ्हेच्या युक्त्या करून त्यांतून निसटून जातों; पण तुला मात्र आपली मुंडी सोडवून पळण्याची अक्कल मुळींसुद्धां नाहीं. मी एक वेळ सुटेन. पण तूं मात्र विनाकारण मरशील. मुकाट्यानं माझ्या तंत्रानंच वागलास तर ठीक आहे, तर तुला जन्मभर मी खायला तरी देईन. माझ्या पदरीं बाळगलेला एक खुषमस्कऱ्या असावा म्हणून तुला मी नेणार."

"एकून आपण आह्मांला आपले खुषमस्करे म्हणून जवळ बाळगणार काय? ठीक आहे! पाहून घेऊं!"

"जा लेका मुर्दाडा. तुझी मला मुळीं सुद्धां जरूर नाहीं. तुझ्याशीं बोलण्यांत व्यर्थ वेळ घालविण्यापेक्षां आतां बाहेर जाऊन त्या छेलछबेलीला उचलून आंत घेऊन येतों. अजूनपर्यंत ती खचित् तिथेंच पडली असेल, यांत शंका नाहीं."

यांतील कांहीं शब्द बाहेरील मंडळीस ऐकूं आले व कांहीं ऐकूं आले नाहींत. कारण तो गृहस्थ वर सांगितल्याप्रमाणें बोलतो आहे तोंच त्याचा प्रतिपक्षी उठून त्यास शिव्या देऊं लागला. त्यानें त्याला उलट "लेका मुर्दाडा—तूं या जन्मांत तर कांहीं यांतून सुटत नाहींस. तुझा सगळा पाढा मीं आधींच पोलिसांत वाचला आहे. आतां तुझा मुडदा सुटेल. तूं सुटत नाहींस" असें ह्मटलें.

तें आपल्या साथीदाराचें मर्मच्छेदक भाषण ऐकतांक्षणीं राजाराम लाल झाला व एकदम पुढें जाऊन त्यानें त्याची नरडी हसडून त्यास खालीं पाडलें, व क्षणोक्षणीं नरडें अधिक दाबीत जाऊन तो त्वेषानें त्यास ह्मणतो, "आरड, आरड. आणखी अर्ध्या पाऊण तासांत तिला आंत आणून तिच्या देखत तिला दहशत बसावी म्हणून तुझा खून करणार होतों, तो आतां आधींच करतों. तुझा मुडदाच तिला दाखविला, तरी पुरती दहशत बसेल; आणि ती माझ्या म्हणण्यास कबूल होईल. तुझा डांबीसपणा आतांपर्यंत मला कळला नव्हता असा तुझा समज आहे काय? जे दिवशीं मला तुझी शंका आली, तूंच पोलिसांत वर्दी देतोस असा संशय मला आला ते दिवशींच सोंग घेऊन त्याची उत्तम बतावणी करून खुद्द साहेबापासून मनाचा संशय फेडून घेतला. पण तुझीं कृत्यं मला माहीत आहेत असं तुला न दाखवतां पूर्वीप्रमाणेच तुझ्याशीं वागलों. मुंबई सोडण्याच्या दिवशीं म्हणजे आज तुला इथं धुलकावून आणून तुझा असा खून करायचा हा त्या दिवसापासूनचा निश्चय आणि तो निश्चय हा बघ पार पाडतों." असें म्हणून त्याचें नरडें त्यानें अधिक जोरानें दाबलें परंतु तितक्यांत आतां अधिक वेळ तेथें उभें राहण्यांत अर्थ नाहीं, पुढें होऊन आपलें कार्य करावें असा विचार करून बाहेरल्या गृहस्थानें एकदम आंत पाऊल घातलें. आणि त्या दोघांसही दरडावून हांक मारून गडबड बंद करण्याविषयीं बजावलें. इतक्यांत बाहेर जाऊन शीळही घातली. तों आणखी पांच चार असामी धांवत तेथें आले. ते पोलिस शिपाई होते. त्यांस पाहतांच बंगल्यांतील दोन्ही व्यक्ती-

पैकीं एक व्यक्ति अगदीं घाबरून जाऊन इकडे तिकडे पाहूं लागली, व दुसरी मोठ्यानें हंसून पहिल्यास म्हणते, "कां पंत, हें काय लचांड मध्येंच उद्भवलं ? तुमची छेलछबेली आधींच पाहतां, कीं हातांत कंडीतोडे घालून नंतर मग तिला उचलायला जातां ? ऐल्या वेळीं मला धुत्कारून देऊन निसटून जायला पहात होतास नव्हे ? आणि आपले खुषमस्करे म्हणून पाहिजे तर आह्मी आपल्या बरोबर यावं, अशी आपली इच्छा, नव्हे ? वा ! राजेसाहेब, आपल्या कोणच्या राजवाड्यांत आह्मी आपले खुषमस्करे म्हणून यायचं ? डोंगरीच्या, ठाण्याच्या कीं येरवड्याच्या ? बोला बोला म्हणजे आह्माला त्याप्रमाणं बरोबर येऊन हजर होण्यास ठीक पडेल !"

हें या गृहस्थाचें चेष्टेचें भाषण चाललें असतां कांहीं वेळ आमचे पोलिससाहेब त्यांचें बोलणें ऐकत उभे राहिले, परंतु फार वेळ तें ऐकण्यांत न घालवितां त्यांनीं त्यांस लवकरच गप बसण्यास सांगून आपण त्या बंगल्याची तपासणी करावयास लागले. कैदीस बरोबर घेऊन बंगला सोडण्यापूर्वी बंगल्याचा नीटपणं तपास केला पाहिजे व चांगला झाडाही घेतला पाहिजे, असा विचार करून त्यांनीं त्यांस तेथेंच सोडून आपण झाडा घ्यावयास गेले. झाड्याकरितां त्या कैदीची चेष्टा करणाऱ्या गृहस्थाची जरूरी होतीच; कारण सर्व माहिती देणारा तोच होता. तेव्हां त्याची चेष्टाही तितकीच राहून त्यांस झाड्याचे कामीं मदत करण्यास जावें लागलें. झाडा घेतांना जें काय म्हणून सांपडलें, तें सर्व घेऊन व त्यांची सावकाशपणें यादी वगैरे करून घेतली, व तेथल्या तेथेंच या मनुष्याची थोडीशी तपासणी करून आणखी कांहीं माहिती गोळा झाल्यास पहावी, निदान याच्या कृष्णकारस्थानांतले आणखी कांहीं साथीदार तेथें येतात कीं काय, हें तरी पहावें असा विचार करून ते एका खुर्चीवर बसले. पद्माकरास त्यांनीं आपल्याजवळ बसण्यास सांगितलें. त्या तिसऱ्या इसमासही आपल्या दुसऱ्या बाजूस बसण्यास सांगितलें आणि कैदीस प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. परंतु कैदीनें एकाही प्रश्नाचें उत्तर ह्मणून त्यास दिलें नाहीं. त्यानें उत्तरें द्यावीं म्हणून प्रथमतः गोडीगुलाबीनें प्रश्न विचारण्यांत आले. नंतर समजावणीच्या गोष्टी सांगण्यांत आल्या. शेवटीं त्याचाही उपयोग होईना, तेव्हां माराच्या धाकास सुरुवात झाली तरीही कांहीं वळत नाहीं असें पाहून प्रत्यक्ष मारास प्रारंभ झाला. परंतु सर्व व्यर्थ. कैदी अतिशय निगरगट्ट. मारास सुरुवात होतांच त्यानें एकच लांबलचक उत्तर दिलें तें असेः–"तुह्मी मला वाटेल तितकं छळा. गळा दाबून पाहिजे तर प्राण घ्या; पण मी येथें एक सुद्धां अक्षर तुमच्याशीं बोलणार नाहीं. मी सांपडल्याचं मला कांहीं वाईट वाटत नाहीं. पण हा पाजी माझ्या हातून निसटला याबद्दल मला अतोनात दुःख होत आहे. याचा खून माझ्या हातून माझ्या इच्छेप्रमाणं झाला असता, म्हणजे मला आनंद होता. आतां तुह्माला वाटेल तें करा. याची समजूत होती, कीं आजपर्यंत मिळविलेला सगळा ऐवज घेऊन इथें आलों आहें, पण तो फसला मी येथें केवळ दोनच हेतु धरून सगळा व्यूह रचला होता. आमचा सगळा विश्वासघात करणारा हा फितूर चोर हें मी मोठ्या शिताफीनं काढल्या दिवसापासून माझा बेत कीं, याला इथें एवढा एकटा गांठायचा. आपल्या हातांनीं ठार करायचा, व तो खून दाखवून तिलाही.... "

परंतु पुढें त्यास काय वाटलें कोणास ठाऊक, तो एकदम थोडासा थांबला. आणि पुनः ह्मणाला, "बस आतां आणखी बोलण्याची आमची तब्यत लागत नाहीं. आतां तुह्माला काय वाटेल तें करा. माझ्या तोंडून एक शब्द निघेल तर शपथ. आजपर्यंत कोणत्याही कामांत मला अपयश आलं नव्हतं. आज या कामांत आलं. तेव्हां मी समजतों, कीं आपला चरित्रग्रंथ संपला."

हें बोलणें झाल्यानंतर त्या मंडळींनीं त्यास नानाप्रकारें छळलें, परंतु त्याचे तोंडून खरोखरीच एकही अक्षर निघेना. त्यानें ऐवज म्हणून जें काय ह्मटलें तो कोठें आहे अशाबद्दल अनेक प्रश्न त्यास विचारिले. परंतु अगदीं व्यर्थ. त्यानें वरील भाषण संपतांच दांतांस दांत लाविले ते पुनः कण्हण्यासुद्धां उचकटले नाहींत. अशा तऱ्हेनें निराश झाल्यानंतर पुन्हा एकदां नीटपणें सर्व बंगल्याचा झाडा घेतला आणि आतां कांहीं पाहण्याचें राहिलें नाहीं; शिवाय दिवसही उजाडून गेला, तेव्हां मंडळी कैदीस घेऊन तेथून निघाली.

अशा तऱ्हेनें राजाराम सांपडल्यानंतर अर्थातच त्यानें जो जो गुन्हा केला होता अशा संशयानें पोलिसानें त्यास पकडलें होतें, तो तो गुन्हा शाबीद करण्यासाठीं चौकशी व पुराव्याची जमवणी सुरू झाली. त्या चौकशीच्या व जमवणीच्या वेळींच राजारामाचीं अनेक दुष्कृत्यें पद्माकराच्या समजण्यांत आलीं. तो मुंबईस परत आल्यापासून त्यास थोडीबहुत शंका येतच असे. परंतु ती शंका इतकी दृढ झाली नव्हती. हा एक मोठा लटपट्या आहे, नेहमीं कांहीं तरी गफलतींत असतो, परंतु मनुष्य हाडाचा गरीब, असें आपलें त्यास वाटत असे. आपल्यास दूरदेशीं पाठवून फसविण्यांत त्याचा कांहीं हेतु नसावा. त्यासही त्या ब्यांकेच्या लोकांनीं फसवलें असेंच त्यास वाटत असे. याच्याबरोबरच आपणास पोलिस कां पकडणार होते, याचा त्यास पहिल्या प्रथम बोध झाला नाहीं. परंतु पुढें त्या ब्यांकवाल्यांच्यासंबंधानें चौकशी सुरू होतांच ज्या कांहीं गोष्टी बाहेर आल्या. त्यामुळें आपणास त्या ब्यांकवाल्या सोनेरी टोळीपैकींच हा एक आहे असें हे समजत असावे असें त्याच्या नजरेस आलें. वस्तुतः पहातां पोलिसानें यास अटकेंतच ठेवावयाचें, परंतु याच्या बोलण्याचालण्यावरून हा माणूस चुकून या मंडळीच्या कारस्थानास बळी पडला असावा, याचे हातून कांहींही गुन्हा घडलेला नाहीं, असें मुख्य साहेबास दिसून आल्यावरून त्यानें यास एवढेंच बजाविलें, कीं मी तुला अटकेंत ठेवीत नाहीं. पण तूं मुंबई सोडून जातां कामा नये आणि दिवसांतून एक वेळां तरी मला भेटलें पाहिजेस. जेव्हां तुझी जरूर लागेल, तेव्हां तुला बोलावीन, तेव्हां तूं हजर झालें पाहिजेस. आणि या भामट्यांना पकडण्यास जी मदत तुझ्यापासून आह्मांला लागेल ती मागितली असतां तूं दिली पाहिजे. या सर्व गोष्टी पद्माकरानें अगदीं अंतःकरणापासून कबूल केल्या व यामुळेंच तो पांचचार वेळां पोलिसांबरोबर बग्गींत हिंडतांना लोकांच्या नजरेस पडला.

राजारामाचीं एक एक कृष्णकारस्थानें त्याच्या नजरेस आणखीही यावीं, परंतु तितक्यांत कर्मधर्मसंयोगानें मागील प्रकरणांत सांगितलेला प्रकार घडला.

इकडे पोलिस जों जों शोध करूं लागलें, तों तों त्यांस राजारामाच्या आणखीही कित्येक कृति नजरेसमोर येऊं लागल्या. त्याचप्रमाणें प्रो. ड्यांडी हे उघडपणें सर्व गोष्टी सांगून त्या प्रत्येकींत राजारामाचा भाग किती होता याबद्दल खुलासेवार माहिती देऊं लागल्याकारणानें राजारामाच्या विरुद्ध वाटेल तितका पुरावा गोळा करण्यास त्यांस मुळींच अडचण पडली नाहीं. वेळोवेळीं आपण बनावट पत्रें कशीं व कोठें लिहिलीं तीं कोणकोणाचे सांगीवरून लिहिलीं, राजारामानें स्वतः खोटीं पत्रें किती व कोणास लिहिलीं; कोणाचेंही मराठी व इंग्रजी अक्षर हुबेहूब त्याच्याचसारखें काढण्यांत राजाराम किती पटाईत होता; त्यास इंग्रजी भाषा चांगली लिहितां वाचतां येत नसे, परंतु कोणाची कशीही इंग्रजी, मराठी, गुजराथी सही असो ती तो बरोबर उठवावयाचाच. कांहीं लिहिण्याचें काम आलें कीं तो आपल्याकडे कसा येई व आपण त्यास कशी मदत करीत होतों; निरनिराळ्या माणसांस फसविण्यांत राजारामानें कसकशा युक्त्या केल्या, हें सर्व, विशेषतः बिचाऱ्या कमलेसंबंधानें अत्यंत वाईट हेतु धरून त्यानें पद्माकराला कसकसें फसविलें, मुंबईतून कसें लावून दिलें, त्याच्या बायकोस खोटीं नाटीं पत्रें कशीं लिहिलीं, वगैरे सर्व हकीकती त्यास जशा व जितक्या माहिती होत्या तितक्या सांगून दिल्या. कर्मधर्मसंयोगानें एवढेंच वाईट झालें, कीं कमलेसंबंधाच्या हकीकती त्यानें सांगितल्या तेव्हां पद्माकर साहेबांचे तेथें नव्हता; व राजारामावर व त्याच्या साथीदारांवर कोर्टांत खटला उभा राहीपर्यंत प्रोफेसर ड्यांडीच्या किंवा दुसऱ्या कोणाच्याही जबानीचा एक शब्द सुद्धां त्यांनीं बाहेर पडूं दिला नाहीं, व आपल्या बकबक्या स्वभावाप्रमाणें प्रो. ड्यांडी स्वतःच कोठें बोलतील, तर त्यांस जबरदस्त धाक घालून ठेविला. काकासाहेबांनीं सराफाचे येथें नेऊन ठेविलेल्या दागिन्यांचे बाबतींतही पोलिसास सुगावा लागून त्यांत राजारामाचा हात कसा काय होता हेंही बाहेर आलें. तेव्हां खटल्याच्या चौकशीसाठीं पोलीसास काकासाहेबांची फार जरूरी आहे, असें वाटून त्यांसही पाचारण गेलें. ते मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें बिचारे गांवीं जाऊन अम्मळ हायसे बसणार, तोंच हें पोलीसपाचारण त्यांचे पुढें उभें राहिल्याबरोबर त्यांच्या उरांत धडकी भरली व नाइलाजास्तव ते पुनः मुंबईस आले. परंतु आतां यासंबंधानें पुढें लवकरच काय काय घडलें तें पाहूं.

---

# प्रकरण ८० वें.

## पद्माकरानें काय पाहिलें ?



शुद्धीवर आल्यापासून चार दिवस दादासाहेबांस झोंपही बरी लागत असे. पहिला त्यांचा अस्वस्थपणा बराच कमी झाला. अंगावर पांघरूण घातलें, तर तें काढून टाकावें, इतकेंच नव्हे, तर तें पायथ्याशींसुद्धां राहिल्यास तें खालीं काढून द्यावें; अंगाखालचें अंथरुण ऊन झालें कीं, लागलीच आपली जागा बदलावी, या कुशीचें त्या कुशीवर किंवा या बाजूचें त्या बाजूवर व्हावें; केव्हां उशी पालटून न्यावी, केव्हां ती मुळींच काढून टाकावी, असा जो प्रकार चालत असे, तो आतां मुळींच कमी झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ते जागृत असले ह्मणजे आतां फक्त एकाच गोष्टीनें त्यांस अस्वस्थता उत्पन्न होत असे. ती गोष्ट म्हणजे कमलेचें असान्निध्य ही होय. कमला जवळ नसली कीं, ह्मातारा इकडे तिकडे अगदीं भ्रांतदृष्टीनें पाहूं लागे आणि तिला हांका मारण्यासाठीं कांहीं तरी प्रयत्न करितो आहे, परंतु शब्द उमटत नाहीं त्यामुळें त्यांचा नाइलाज आहे, असें दिसे. कमला जवळ असली ह्मणजे ह्मातारा जागा असला, तर डोळे उघडे ठेवून तिच्याकडे तासचेतास नुसता पहात राही. त्या नुसत्या पहाण्यांतच त्याला कांहीं तरी समाधान व आनंद वाटतो आहे, असें स्पष्ट दिसलें. कमला कांहीं कारणानें उठून खोलींतल्या खोलींत वावरूं लागली, तरीसुद्धां त्याचे डोळे तिच्या मागोमाग हिंडत. आपला तिरस्कार यांनीं करावयाचा, तो न करतां आपल्या सान्निध्यानें यांना आनंद होतोसें दिसतें, निदान आपण जवळ असावें असें यांना वाटतें असें दिसतें यांतलें गूढ आहे तरी काय, हें कमलेस कांहींच समजेना. यांनीं आपण कोण हें ओळखलें नसल्याकारणानें असें झालें असावें काय ? परंतु आपल्याला ओळखलें नसेल, हें संभवतें तरी कसें ! ओळखलें नसेल हें जसें तिला अगदीं असंभवनीय वाटलें, तितकेंच आपणास यांनीं ओळखलें असून हे आपला तिरस्कार करणार नाहींत, हें असंभवनीय वाटलें; किंबहुना तें अशक्यच वाटलें. आपण आपल्या दुर्दैवाची कहाणी सुंदराबाईजवळ सांगत असतां ती यांनीं ऐकली असून तिच्यामुळें यांचे मनांत आपल्याविषयीं प्रेमभाव उत्पन्न झाला असेल व आपली दया वाटून मूळचा तिरस्कार नष्ट झाला असेल, ही कल्पनाच तिच्या मनांत येणें अशक्य होतें. तिच्या सासऱ्याची तिला पहिली माहिती ऐकून माहीत होती. आपल्या नवऱ्यानें त्यांच्या मर्जीविरुद्ध आपल्याशीं लग्न केलें आणि

त्यामुळें त्यांनीं त्यांचें नांव सोडलें, हें तिला ठाऊक होतें. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या संतापी स्वभावाच्या अनेक गोष्टी तिनें आधीं ऐकलेल्या होत्या. पुढें स्वतः तर तिला विलक्षणच अनुभव आला. तेव्हां तो म्हातारा, आपल्याला ओळखल्यानंतर आपला तिरस्कार न करतां उलट आपल्या सान्निध्यानें त्याला आनंद होईल, हें तिला संभवनीय तर काय, परंतु शक्य तरी कसें वाटावें? तेव्हां अर्थातच तिला तें संभनीय वाटलें नाहीं. तिच्या मनानें असेंच घेतलें कीं, आगगाडीच्या अपघातानें झालेल्या इजेनें जशी यांची वाचा बंद झाली आहे, तशीच यांची स्मृतिही नष्ट झाली आहे. वाचा आली, आणि कोणाच्या बोलण्यावरून किंवा दुसरें कांहीं घडून मी कोण हें एकदां त्यांस समजलें, म्हणजे त्यांचा पूर्वीचा तिरस्कार दुप्पट जोरानें उसळून उठून, आपण त्यांच्या दृष्टीसमोर नको असें वाटूं लागून ते तेथून जाण्याला योग्य अशा स्थितीला येण्यापूर्वींच निघून जाण्याचा आग्रह धरून निघून जातील, कधीं रहाणार नाहींत. इतकें सगळें तिच्या मनांत येई, परंतु त्यांची शुश्रूषा करून आपण त्यांस काळाच्या दाढेंतून ओढून काढलें याबद्दल जें तिला समाधान वाटत होतें, तें समाधानच पुढेंही अधिक अधिक उत्कंठेनें त्यांची सेवा करण्याची इच्छा तिला देई. आपल्या शुश्रूषेनें एकदां त्यांची वाचा नीटपणें परत येऊन ते घरीं जाण्याला योग्य झाले, म्हणजे आपल्या सर्व श्रमांचें चीज झालें असें तिला वाटे. आपल्या दुर्दैवी स्थितीबद्दल अगदीं पहिले दिवशीं तिला अहोरात्र वाईट वाटून दुसरें कांहींच सुचेनासें झालें होतें; परंतु कांहीं चमत्कारिक कर्मधर्मसंयोग होऊन आपल्या सासऱ्याची शुश्रूषा करण्याचें म्हणजे दिवसाच्या चोवीस तासांपैकीं चोवीसही तास ज्यांत मन गढून गेलें पाहिजे असलें काम जेव्हां तिनें अंगावर घेतलें, तेव्हां अर्थातच तिच्या दुःखाचा उद्वेग थोडा थोडा कमी होत चालला. त्यांत सुंदराबाई, ताई आणि त्यांच्याचप्रमाणें ज्यांचीं चरित्रें दुःखमय होतीं, अशा स्त्रियांचीं चरित्रें जसजशीं तिच्य कानीं पडूं लागलीं, तसतसें आपलें दुर्दैव अगदींच दुःसह समजूं नये; अगदीं आपल्याचप्रमाणें जरी नाहीं तरी तसल्याच प्रकारच्या दुःखांनीं गांजलेलीं माणसें जगांत असून तीं आत्महत्या न करितां कांहीं तरी परोपकाराचीं कृत्यें करून आपल्या आयुष्याचा सद्व्यय करीत आहेत; या प्रत्यक्ष उदाहरणानेंच तिच्या मनाला मोठें उत्तेजन आलें. दुःखाविष्ट माणसानें आपल्या दुःखावर विचार करकरून आपणास निरुपयोगी व दुबळें करून घेऊं नये, तर धैर्यानें तें दुःख दूर सारून आपला काळ उपयोगी व परोपकाराच्या कृत्यांत लावावा, म्हणजे त्या दुःखाचेंच सुख होतें, हा बोध प्रथमतः तिला तेथें झाला; आणि दादासाहेबांच्या शुश्रूषेला तिनें आपलें सर्व तनमन लावल्यावर तिला त्याचा अनुभवही आला. तथापि इतरांच्या दुःखांत आणि आपल्या दुःखांत फार मोठें अंतर आहे, असें तिला वाटतच असे. इतरांना कसलींही दुःखें असलीं, तरी त्यांच्यावर आपल्यासारखा भयंकर प्रसंग नाहीं. इतरांच्या संबंधानें कितीही लोकापवाद असले व त्यामुळें त्यांस लोकनिंदा सहन करावी लागत असली, तरी त्यांचे इष्टमित्र, त्यांचे

आईबाप यांना तरी त्याच्याबद्दल कांहीं संशय नाहीं. आपली मात्र स्थिति अति भयंकर आहे. आपल्या हातून अणुरेणुमात्र कायिक, वाचिक किंवा मानसिक पाप न होतां, आपला बाप, आपला नवरा, आपला भाऊ, आणि भावापेक्षांही जास्त असा प्रभाकर या सर्वांच्या मनांत आपल्या शुद्धतेविषयीं संशय ! हा विचार तिच्या मनास नेहमीं जाची. जेव्हां तिचें मन दुसऱ्या कांहीं कार्यांत व्यापृत असेल, तेव्हांच काय घटकाभर हा विचार तिच्या मनांतून दूर होत असेल तो खरा; परंतु मनाला पूर्णपणें व्यापून टाकणाऱ्या कामांत ती गुंतली नसली, ती स्वस्थ बसली असली, कीं तिच्या मनांत तो विचार उभा राहून विंचवानें नांग्या मारल्या असतां वेदना सुरू होतात, तसल्या वेदना सुरू होत; आणि अशा वेदना या कोंवळ्या पोरीच्या अंतःकरणांत सुरू झाल्या म्हणजे तिची वृत्ति फारच चमत्कारिक होऊन जात असे. रात्रीं नऊ वाजण्याचे सुमारास दादासाहेबांस औषधपाणी देऊन त्यांस झोंप लागेपर्यंत त्यांचे उशाशीं बसावें आणि त्यांस झोंप लागली म्हणजे मग आपण त्यांचेपासून कांहीं अंतरावर एका खाटेवर जाऊन निजावें, असा तिचा क्रम होता. दादासाहेबांची वाचा परत येईपर्यंत त्यांचे जवळ कोणीना कोणी अहोरात्र पाहिजे, असें अजून डॉक्टरांस वाटत होतें. मात्र आतां त्या माणसानें जागतच बसायला नको इतकी स्थिति होती. कमलेनें दादासाहेबांस नुकतेंच औषध दिलें होतें. रात्रीचे सुमारें साडेनऊ वाजले होते. दादासाहेबांनीं आज आपलें कपाळ दुखतें आहे, असें खुणेनें सांगितल्यावरून डॉक्टरांनीं कांहीं औषध बदलून दिलें होतें आणि कांहीं औषध डोक्यांस चोळण्यास दिलें होतें. त्याप्रमाणें करण्यासही कमला दादासाहेबांचे उशाशीं बसली होती. प्रथम तिनें तें चोळण्याचें औषध चांगलें चोळलें व नंतर आपल्या मृदु हातांनीं तीं त्यांचें मस्तक चेंपूं लागली. दादासाहेब डोळे मिटून पडले होते. त्यांस त्या चेंपण्यापासून फार बरें वाटत होतें, परंतु त्या मुलीला आपण आतां किती वेळ असें चेंपीत बसवावें, असें मनांत येऊन त्यांनीं तिला, "पुरे आतां, तूं जाऊन नीज जा," अशी खूण केली. परंतु कमलेनें "नको नको. अजून कांहीं फार रात्र झाली नाहीं. आपलं कपाळ दुखायचं राहून आपल्याला झोंप लागली म्हणजे मग मी जाईन. आपण स्वस्थ पडा. कांहीं सुद्धां संकोच करूं नका," असें त्यांस आपल्या निसर्गमधुर वाणीनें उत्तर दिलें, आणि मस्तक चेंपण्याचें काम सुरूच ठेविलें. होतां होतां दादासाहेबांस झोंप लागून गेली. त्यांचा श्वासोच्छ्वास एकसारखा वाहूं लागला. आतां कमला जर उठून जाती, तर त्यांस समजलेंसुद्धां नसतें. परंतु मस्तक चेंपतां चेंपतां कमलेचें चित्त बहकलें. तिला एकाएकीं आत्मस्थितीचें स्मरण झालें. तिला आपल्या आईचें स्मरण झालें आपली आई जर जिवंत असती, तर आपल्यावर असला प्रसंग आला नसता; आपली आई असती, तर आपल्या हातून अविचार झाला नसता, असें मनांत येऊन व आईचे अनेक सद्गुण आठवून तिचें अंतःकरण अगदीं सद्गदित झालें. एकदां ते विचार सुरू झाल्यानंतर मग काय विचारतां ! एकामागून एक सर्व दुःखदायक विचार मनांत उभे राहूं लागले व आपली

स्थिति कि-ी सुखाची होईल, अशी आपली उमेद होती आणि काय भयंकर झालें, याबद्दलचे विचारही एकामागून एक येऊन मन अतोनात दुःखाविष्ट झालें. आपण याच संस्थेंत राहून आपली कालक्रमणा करूं असें म्हणून ती मनाचें शांतवन करी, परंतु तिच्या त्या अल्पवयांत असें शांतवन चिरकाल रहाणें शक्य होतें काय? आपल्या अविचारामुळें–किंवा आपल्या फसगतीमुळें–आपल्याला जो विनाकारण कलंक लागला आहे, तो निदान मिघून तरी जावा; अगाच्या दृष्टीनें तो निघून गेला नाहीं, तरी आपल्या बापाला जें काय वाटलें असेल, तें तरी दूर व्हावें. आपल्या पतीला जें काय वाटले असेल तें दूर झालें तर मग काय पाहिजे? पण असें कोठलें व्हायला? तें दूर करण्यासाठीं म्हणून आपण आपल्या बापाच्या पुढें गेल्याबरोबरच ते आपल्याला, " माझ्या दृष्टीसमोरून दूर हो. मला तुझी आतां मुळींच गरज नाहीं. तूं मला आणि मी तुला आतां मुकलों, " असें म्हणून घालवून देणार नाहींत म्हणून कशावरून? आणि आपल्या पतीपुढें जाऊन आपण अशा तऱ्हेनें आपलें म्हणणें कळविणें तर संतप्त सिंहाच्या पुढें जाण्याप्रमाणेंच तिला अशक्य वाटलें. तिनें एकवार अथेल्लो नाटक पाहिलेलें होतें. यामुळें ती आताशा डेस्डिमोनेची व आपली स्थिति मनातल्या मनांत तुलना करून पहात असे. डेस्डिमोनेप्रमाणें जर आपण आपल्या पतीच्या तावडींत सांपडलों असतों तर तो आपली तिच्याप्रमाणें अवस्था करता काय! अजून आपण तशा स्थितींत त्याला सांपडलों, तर तसें करील काय! त्याला तसें करण्यास सांपडून आपला जीव घेतल्यानंतर, तरी त्याला खरी स्थिति कळून येईल काय, आणि कळून आल्यावर पश्चात्ताप होईल काय? असे विलक्षण विचार या वेळीं तिच्या मनांत येऊं लागले. रात्रीची वेळ आणि अत्यंत एकांत, हीं अशा विचारांचें फार विलक्षण प्रकारानें पोषण करतात. त्या विचारांस कितीतरी फांटे फोडतात, आणि होतां होतां शेवटीं त्यांचें पर्यवसान भीतींत होऊन मनुष्य कावरेंबावरें होऊन जातें. आणि मग थोड्याच वेळांत भीतीचा जोर कमी होऊन कोमल हृदयाच्या माणसास एकाएकीं रडूं कोसळतें. पुष्कळ वेळ मोठ्या कष्टानें दाबून दाबून ठेवलेले अश्रु एकदम बाहेर पडूं लागतात. कमलेची या वेळीं अशीच स्थिति झाली. आपल्यावर डेस्डिमोनेसारखाच प्रसंग जरी आला नाहीं, तरी जो आला आहे, तो काय कमी भयंकर आहे? प्रत्यक्ष मृत्यूपेक्षांही पलीकडचा मृत्यु आपल्याला आला आहे. डेस्डिमोनेच्या नवऱ्याखेरीज बाकी सगळें जग तरी डेस्डिमोना अत्यंत शुद्ध आहे असें समजत होतें, परंतु आपली स्थिति तिच्यापेक्षां किती तरी वाईट. आपल्या अंगीं अणुरेणुभर सुद्धां अपवित्रपणा नसता सगळ्या जगानें, आपल्या आप्तांनीं सुद्धां आपल्याला अपवित्र मानावें आणि तें खोटें ठरविण्याला आपल्या हातीं कांहीं सुद्धां नसावें, यापरतें दुर्दैव तें कोणतें? असें मनांत येऊन तिच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले. आपण दादासाहेबांच्या जवळ बसलों आहोंत, आणि त्यांस झोंप लागली आहे, हें सुद्धां तिच्या ध्यानांत राहिलें नाहीं. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली आणि तिच्या डोळ्यांतून ऊन ऊन अश्रु ओघळून येऊन सहज पांच

रुणाच्या बाहेर निघालेल्या त्यांच्या हातावर पडले. त्या अश्रूंच्या पडण्यानें आणि तिच्या हुंदक्यांनीं दादासाहेब जागे झाले व डोळे उघडून पाहूं लागले. त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसलें, कीं त्यांस तिची अतोनात कींव आली असावी. त्यांचें अंतःकरण अत्यंत कळवळलें असावें. परंतु त्यांस बोलतां येईना यामुळेंच केवळ ते बोलले नाहींत. पण त्यांनीं आपल्या एका हातानें कमलेचा हात धरला व दुसऱ्या हातानें तिला तें रडूं नको, तुला रडायला काय झालें, अशा अर्थाच्या खुणा करूं लागले. नंतर त्यांनीं अंथरुणावरून आपलें शरीर आपोआप उचलून ते जरा टेंकून बसले व अत्यंत प्रेमळ पिता आपल्या प्रियतम कन्येला दुःखित पाहून तिच्या पाठीवरून हात फिरवून तिचें शांतवन करतो, त्याप्रमाणें ते तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागले. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं तिचे डोळेही आपल्या जवळच्या फडक्यानें पुसण्याचा यत्न केला. तें पाहून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें आणि हे आतां आपल्याला इतक्या प्रेमानें कुरवाळीत आहेत; पण मी खरोखर कोण आहें, हें जर यांना आतां कळलें, तर यांना आपला किती तिरस्कार येईल ! यांना आपली ओळख पटली नाहीं म्हणूनच हें चाललें आहे. त्यापेक्षां एकवार यांना स्पष्टपणानें आपण कोण तें बोलूनच कां दाखवूं नये ! असें मनांत आलें. आणि त्या विचाराचें त्या वेळीं तिच्या मनावर इतकें प्राबल्य झालें, कीं ती एकदम, " मी कोण आणखी माझी स्थिति काय झाली आहे, हें जर आपल्याला कळलं, तर आपण माझं समाधान करणार नाहीं. मला आपल्यापासून दूर ढकलाल—मी आपली सून. मी..." असें बोलत ती आपणच तेथून उठूं लागली. तों दादासाहेबांनीं एका हातानें तिचा हात अधिकच घट्ट धरून तिला बसावयाची खूण केली. आणि शांतपणें तिच्याकडे अशा अर्थाच्या मुद्रेनें पाहूं लागले कीं, "आपण तुला ओळखलं आहे, आणि ओळखूनच आपला जीव एवढा तुजकडे लागला आहे" असें स्पष्टपणें सांगत आहेत असेंच तिला वाटलें. त्यावेळीं त्यांच्या चर्येवर स्मित दिसूं लागलें होतें. तें सर्व पाहून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें ! आपल्याला ओळखीत असून आपल्यावर हे इतकें प्रेम करूं लागले असतील ही कल्पनासुद्धां तिला होईना. आणि या सगळ्याचा अर्थ काय ! हें आहे तरी काय ! असें मनांत येऊन ती अधिकाधिकच अश्रु गाळूं लागली. तिला तिचा शोक आवरेना, आणि ती त्या शोकावेशांत खालीं मान घालून बसली. आपल्या शोकानें रोग्याला त्रास होईल हा विचार सुद्धां तिच्या मनांत येईना.

परंतु असा शोक किती वेळ चालणार ! लवकरच ती भानावर आली, आणि तितक्यांत दादासाहेबांनींही तिला 'तूं आतां जाऊन नीज जा' अशी खूण केली. तिला ते बसूंच देईनात, आणि तिलाही आतां अधिक बसणें शक्यच नव्हतें. तेव्हां ती उठून आपल्या अंथरुणावर जाऊन पडली.

परंतु तिला कांहीं केल्या झोंप येईना हें उघडच आहे. विचारांनीं तिचें डोकें अगदीं भणभणून गेलें आणि त्या भणभणण्यानेंच तिच्या मेंदूस थकवा व डोळ्यांवर झांपड येऊन पहाटे सुमारें पांच वाजण्याचे सुमारास तिचा डोळा लागला.

मग ती लवकर कसची उठते ! कितीं वेळ तरी ती उठली नाहीं. तेव्हां तिला उठविण्यासाठीं सुंदराबाई गेली असतां तिला उठवूं नका, म्हणून दादासाहेबांनींच तिला मना केली. तेव्हां दादासाहेबांच्या शुश्रुषेसंबंधानें कदाचित् तिला जागरण झालें असेल असें समजून इतर मंडळींनी तिला उठविलें नाहीं. परंतु सकाळीं साडे-आठ नऊ वाजण्याच्या सुमारास तिला उठविण्याला विशेषच कारण झालें. आज कित्येक दिवस कमलेचा शोध करीत असलेल्या प्रभाकरास सकाळींच कोणी असें सुचविलें, कीं कमला कदाचित् या संस्थेंत गेली असेल, तेथें तूं शोध कर. बळवंतगावास आलेलीं निनांवीं पत्रें जरी प्रभाकरानें पाहिलीं होतीं, तरी त्याच्या मनाची अशी पक्की खात्री, कीं त्या पत्रां-तील एक अक्षर सुद्धां खरें नाहीं, तेव्हां त्याला त्या वर सांगितलेल्या सूचनेमुळें असें वाटलें, कीं कदाचित् ती आतां आपल्या आयुष्याचा व्यय असा तरी कां करूं नये, म्हणून कोणाला नकळत येथें येऊन राहिली असेल. निदान शोध तरी करायला हरकत नाहीं. म्हणून तो तावडतोब या संस्थेंत येऊन कमलेचा शोध करूं लागला. मंडळींनीं प्रथमतः त्याला दाद लागूं दिली नाहीं. कोण माणूस काय सबबीनें येतो आणि काय त्याचा हेतु असतो हें सांगावें ? म्हणून मंडळींनीं त्यास आधीं नानाप्रकारचे प्रश्न विचारले. शेवटीं त्यानें जेव्हां सर्व हकी-कत सांगितली आणि आपण कमलेच्या बापाकडून अरदीं सदूबुद्धीनेंच आलों आहों, अशाबद्दल खात्री करून दिली, तेव्हां मंडळींनीं त्यास "कमला येथें आहे. पण ती निजली आहे. आपण या खोलींत बसा. आम्ही तिला उठवून आपल्याकडे पाठवून देतों," असें म्हटलें. आणि सुंदराबाई बरोबरीच कमलेला उठवायला गेल्या. त्या जातात तों कमला अर्धवट जागी होऊन रात्रीं काय काय प्रकार झाला, तो अणूं काय आठवीत होती. सुंदराबाईंनीं जाताक्षणींच तिला आपल्या मृदु मधुर वाणीनें "उठा, आज किती वेळ निजणार अशा ! वाजले किती आहे का ठाऊक ?" असें विचा-रलें. कमला ते त्यांचे शब्द ऐकून चट्-कन् उठली आणि किती उजाडलें तें समजण्यासाठीं सभोंवार पाहूं लागली. तेव्हां बराच उशीर झाला हें तिला खरें वाटून ती धडपडतच उठली व "मी लवकर उठलं नाहीं असं पाहून मला कां बरं उठवलं नाहींत रोजच्या वेळेवर ?" असें सुंदराबाईस म्हणून ती आपल्या प्रातः-कार्यासाठीं जाणार, तों सुंदराबाईंनीं तिला थांबवून म्हटलें, "कमलाबाई, तुमच्या-कडे कोणी आलं आहे !" कमला प्रथम अत्यंत आश्चर्यानें सुंदराबाईकडे पाहूं लागली व नंतर लागलीच खेदयुक्त वाणीनें म्हणते, "सुंदराबाई, कां माझा विनोद करतां ? आतां या जन्मांत तर माझ्याकडे कोणी येणार नाहीं. आतां कोण मज-कडे येणार ? येणाऱ्यांना मी सोडून निघालें. मग त्यांनींही मला सोडलं, तर त्यांत काय नवल !"

"पण येणाऱ्यापैकींच कोणी आलं असलं तर ?"

"कोणी आतां येणार नाहीं. आणखी कोणी उगीच आलं असलं, तर मला त्याला भेटायचंच नाहीं." असें म्हणून कम-लेनें एक दीर्घ सुस्कारा टाकला.

परंतु सुंदराबाईनें लवकरच तिची सम-

जून घालून तिला, " प्रभाकरास एक वेळां भेटा. तो सद्बुद्धीनेंच आला आहे," असें सांगून तिचें मन वळविलें. तरीसुद्धां "आतां आपण प्रभाकराला कोणच्या तोंडानें भेटावें? डोळा वर करून त्याच्याकडे पहावें तरी कसें? त्याच्याशीं काय बोलावें? त्याला पाहिल्याबरोबर आपली अवस्था काय होईल?" वगैरे विचार तिला मागें मागें ओढीतच होते; परंतु तिनें पाऊल पुढें घातलें; आणि ज्या खोलींत प्रभाकरास बसविलें होतें, त्या खोलीकडे ती गेली. या दोघांच्या प्रथम भेटीच्या वेळीं आपण आंत कशाला जावें, बाहेर उभें रहावें, म्हणून सुंदराबाई बाहेरच उभ्या राहिल्या. कमलेनें आंत पाऊल घालून एकवार प्रभाकराकडे पाहिलें मात्र आणि तिचे हातपाय एकदम गळून ती मटकन् तेथल्या जवळच्या खुर्चीवर बसली व मोठमोठ्यानें स्फुंदस्फुंदून रडूं लागली. खोलीचें दार उघडेंच होतें. सुंदराबाई बाहेर उभ्या होत्या. इतक्यांत आणखी एक तरुण पुरुष त्यांचे पुढें येऊन उभा राहिला. "दादासाहेब म्हणून कोणी..." इतकें तो बोलणार, तों रडण्याचा स्वर ऐकून कोण कोठें रडतें आहे हें पहाण्यास्तव त्यानें त्या खोलीच्या उघड्या दाराकडे पाहिलें. तों खुर्चीवर बसलेली कमला आणि तिच्यापुढें उभा राहिलेला प्रभाकर, दोघें त्याच्या दृष्टीस पडलीं! इतक्यांत सुंदराबाईनें असा देखावा तिऱ्हाइताच्या नजरेस पडूं नये म्हणून खोलीचें दार बाहेरून लावून घेतलें आणि त्या गृहस्थाजवळ येऊन आपण काय विचारांत होतां असें विचारलें.

पण तो गृहस्थ उत्तर देईना. तो संतापानें लाल झालासा दिसला.

---

# प्रकरण ८१ वें.

## बापलेंकाची भेट.



"आपण काय विचारांत होतां? आपण कोणाकडे आलां आहां? आपल्याला कोण पाहिजे?" असे प्रश्न सुंदराबाईनीं त्या गृहस्थास केले; परंतु त्यांपैकीं एकाचेंही उत्तर चटकन् न देतां तो गृहस्थ आपला कावराबावरा होऊन इकडे तिकडे पाहूं लागला. सुंदराबाईस जरा चमत्कारिक वाटलें, परंतु हा गृहस्थ कोण असावा याबद्दल शंका आली नाहीं. कोणी वेडाबिडा तर चुकून येथें शिरला नाहीं, असें सुद्धां तिच्या मनांत आलें. आणि पुन्हा तिनें त्याला "आपण इकडे कोणाकडे आलां आहां? आपल्याला कोण पाहिजे!" असें विचारलें. तरीही तो उत्तर देईना. त्यांनीं लावून घेतलेल्या त्या खोलीच्या दाराकडे त्याचे डोळे लागले होते. इतक्यांत त्या मठांतील एक पुरुष गृहस्थ बाहेर आले. त्यास पाहू-

तोंच सुंदराबाई त्याजकडे वळून म्हणते, "हे गृहस्थ बाहेरून आले आणि कोणी इथें आहेत का असं कायसं विचारीत होते; इतक्यांत मी त्यांना कोण पाहिजे, काय पाहिजे, म्हणून विचारायला लागले, तों उत्तर न देतां संतापानं इकडे तिकडे पहात अगदीं स्तब्ध उभे राहिले आहेत ! काय आहे, तुम्ही तरी विचारा पाहूं मीं चार वेळां विचारलं पण ते उत्तरच देत नाहींत." सुंदराबाईनें असें सांगतांच तो आंतून आलेला गृहस्थही अर्थातच चमत्कारिक दृष्टीनें त्या दुसऱ्या गृहस्थाकडे पाहून त्याचेजवळ गेला व सुंदराबाईनें आतांपर्यंत केलेले प्रश्नच त्यास विचारणार, तों तोच गृहस्थ त्याचेकडे वळून जरा उर्मटपणानें विचारतो, "कायहो ! ही तुमची संस्था ही आहे तरी काय ? परोपकाराच्या नांवाखालीं काय वाटेल तें ... ..." परंतु त्या दुसऱ्या गृहस्थानें त्यास पुढें बोलूं नाहीं. "या संस्थेच्या उद्देशांची माहिती वगैरे हवी असली, तर आपल्याला देऊं. त्या माहितीकरितांच आपण आलां असलां, तर मजवरोबर आमच्या त्या आफिसांत चला आणि शांतपणं बसून माहिती करून घ्या. आपल्यासारख्यांनीं येऊन चौकशी करून माहिती मिळवावी आणि आम्हांला मदत करावी ही तर आमची उत्कट इच्छा आहे. चला आपण माझ्याबरोबर. मीं आपल्याला सर्व माहिती सांगतों." हें उत्तर इतकें शांतपणानें व दृढपणानें आलें, कीं तो रागानें बोलणारा गृहस्थ अगदीं गप्पच झाला. 'क्षणभर त्यास आपण पुढें काय बोलावें हें सुचेनासें झालेंसें दिसलें. नंतर जणूं काय, "कशाला आपण या भानगडींत पडा, आपलं जें काय काम आहे तें करून येथून चालतं व्हावं," असें मनांत येऊन तो त्यांस म्हणतो, "मला सध्या आपल्या संस्थेची माहिती मुळींच नको आहे. आपल्या येथें कोणी दादासाहेब या नांवाचे गृहस्थ नुकत्याच झालेल्या आगगाडीच्या अपघातांत सांपडून दुखापत झालेले आहेत असें ऐकतों, त्यांना पहायला व त्यांची प्रकृति कशी काय आहे तें पहायला मी आलों आहें. तेव्हां त्यांची माहिती काय असेल ती मला द्या म्हणजे मोठी मेहेरबानी होईल. बाकी आपल्या या मठाची मला मुळीं सुद्धां माहिती नको. आजपर्यंत पुष्कळ ऐकली आहे; आणखी आतां प्रत्यक्ष ...... तें जाऊं द्या. पण दादासाहेब येथें आहेत काय ! त्यांची प्रकृति कशी काय आहे ?"

"दादासाहेब या नांवाचे परवांच्या अपघातांत दुखापत झालेले गृहस्थ इथें आहेत. त्यांची शुश्रूषा आमच्या संस्थेकडून होऊन ते आतां बरेही होण्याच्या मार्गाला लागले आहेत. आठ चार दिवसांत खडखडीत बरे होतील."

"मला त्यांना पाहून त्यांच्याशीं चार शब्द बोलायचे आहेत."

"ठीक आहे. पण आपण त्याचे कोण, कोणाकडून आलां वगैरे कळलं, म्हणजे आपल्याला त्यांच्या खोलींत घेऊन जातों. त्यांच्याशीं बोलण्याला मात्र..."

"कां ! त्यांच्याशीं बोलण्याला काय हरकत आहे ?" त्या गृहस्थानें जरा कठोरपणानें विचारलें. "ते आपल्या येथें असले म्हणजे आपण त्यांच्याशीं कोणास बोलूं देणार नाहीं कीं काय !" आपण इतक्या सौम्यपणें बोलत असतां हा गृहस्थ अगदीं घोड्यावरूनच बोलतो आहे हें पाहून त्या मठस्थ गृहस्थास थोडं चमत्का-

रिक वाटलें, पण आपल्या सौम्यपणांत अणुभरही कमी न करतां तो त्यास ह्मणतो, "आपल्याला बोलण्याला मुळींच हरकत नाहीं, पण ते मात्र बोलूं शकणार नाहींत."

"तें कां!" त्या नव्या गृहस्थानें पुनः जरा जोरानें विचारलें.

मदस्थ गृहस्थ त्यांना कांहीं उत्तर देणार तोंच दादासाहेबांस औषध देणारे डॉक्टर तेथें आले. त्यांना त्या गृहस्थानें सर्व हकीकत सांगितली. तेव्हां डॉक्टर त्या बाहेरून आलेल्या गृहस्थास ह्मणतो, "वा! आपण आलांत हें फार चांगलं झालं मला कांहीं माहिती नाहीं, परंतु माझा असा तर्क होतो, कीं आपण दादासाहेबांचे चिरंजीव असावेत. दादासाहेब आज इतके दिवस आमच्या या संस्थेच्या रुग्णशालेंत असतां कोणाला सुद्धां माहिती लागूं नये, कोणी सुद्धां त्यांची वास्तपुस्त करायला येऊं नये, याचा अर्थ काय, म्हणून आह्मी आश्चर्यच करीत होतों. माझ्या तर्काप्रमाणंच आपलं आणखी त्यांचं नातं असलं, तर फार उत्तमच झालं. आपण त्यांना प्रत्यक्ष पहा. आपला त्यांचा संबंध नसला, तर निदान त्यांच्या मंडळींना तरी कळवा. त्यांची प्रकृति आतां पुष्कळ बरी झाली आहे. एक उणीव राहिली आहे ती तेवढी दूर झाली, कीं त्यांची प्रकृति साफ सुधारली म्हणून समजा. मग घरीं जाऊन चार दिवस त्यांनीं स्वस्थ पडावं इतकंच. कांहीं दगदग करूं नये. चला मी आपल्याला त्यांच्या खोलींत नेतों. ते आतांच तोंड वगैरे धुऊन औषधपाणी करून स्वस्थ पडले आहेत. चला." असें म्हणून डॉक्टर पुढें झाले व आमचा गृहस्थ मुकाट्यानें त्यांचे मागोमाग चालला. डॉक्टरांच्या वाणींतच अशी कांहीं अजब मोहनी होती, कीं त्यांच्याशीं उर्मटपणाचीं प्रश्नोत्तरें करावीं अशी बुद्धिच कधीं व्हावयाची नाहीं. तो गृहस्थ अगदीं स्वस्थपणें त्यांच्या मागोमाग चालला. डॉक्टर मागें वळून त्यास ह्मणाले:

"दादासाहेब यांतून वांचतील असं आह्मांला तर कांहीं वाटलं नाहीं. परंतु 'दुर्धर स्थितींतल्याही रोग्याची शुश्रूषा जर अगदीं उत्तम प्रकारानं झाली, तर त्या रोग्यास भय नाहीं, तो वांचलाच पाहिजे' असं जें आह्मां डॉक्टरांचं मत आहे, त्या मताला या दादासाहेबांच्या बरं होण्यानं उत्तम पुष्टीकरण मिळालं हे गृहस्थ केवळ जीवाभावानं त्यांची शुश्रूषा केली गेली यामुळेंच वांचले. आतां त्यांना मुळींसुद्धां भय नाहीं. एक थोडी उणीव राहिली आहे, तेवढी निघाली कीं झालंच. आपण पहाल आतां. जे ते इथें आले त्या दिवशीपेक्षां त्यांच्या प्रकृतींत किती तरी जमीनअस्मानचा फरक आहे. आपण त्यांचे कोण? चिरंजीवच का!" परंतु त्या गृहस्थानें उत्तर दिलें नाहीं. नुसत्या कपाळाला आठ्या घालून दुसरीकडे पहात त्यांचे मागें गेला. त्याचे डोक्यांत या वेळीं किती गोष्टी होत्या आणि कोणत्या गोष्टीचा त्या वेळीं विशेष पगडा होता हें सांगणं मोठें कठीण होतें. होतां होतां ते दोघेही दादासाहेबांच्या खोलींत गेले. तों दादासाहेबांचा डोळा लागला होता. "मी आतां त्यांची विचारपूस करून गेलों त्या वेळीं ते जागे होते. इतक्यांत डोळा लागला. कांहीं हरकत नाहीं. त्यांच्या सध्याच्या स्थितींत त्यांच्या मेंदूला जितकी स्वस्थता मिळेल, तेवढी अवश्य आहे. तर आतां आपण त्यांना उठविण्याचं मनांत आणूं नका.

सकाळीं लागलेली झोंपही कांहीं फार वेळ टिकायची नाहीं. आपण आमच्या हॉपिसांत किंवा इथें घटकाभर वाट पहात बसाल, तर थोड्याच वेळांत आपल्याला त्यांची भेट घेतां येईल. चार दिवस त्यांची प्रकृति बरी होईपर्यंत आपण इथेंच रहाल, तर विशेष बरं होईल नव्हे ! "

डॉक्टर असें बोलले, तरी सुद्धां तो गृहस्थ त्यास धड उत्तर देईना किंवा कपाळाला आंठ्या घातल्यावांचून त्यांच्याकडे पाहीना. परंतु कांहीं वेळ विचार केल्यामागें करून ह्मणतो, " आतां जर दादासाहेबांस येथून दुसरीकडे नेलं, तर कांहीं हरकत आहे का ? तिनकी त्यांची प्रकृति बरी झाली आहे. "

" त्यांची प्रकृति बरी झाली आहे; पण त्यांना सध्या येथून हलविण्याची सल्ला आपण कांहीं देणार नाहीं बोआ. आतां जरी त्यांना ठीक वाटतं आहे, तरी इथली व्यवस्था आणखी इथली शुश्रूषा जर नाहींशी झाली, तर केव्हां कशी प्रकृति उलट खाईल हें कांहीं सांगतां येत नाहीं. पण आपण अशा विचारानं इथें आलां आहां काय ? आपण त्यांचे कोण हेंही अजून मला आपण सांगितलं नाहीं. "

" मी त्यांचा कोणी कां असेना, पण त्यांनीं स्वतःच जर असं म्हटलं, कीं मी आतां इथून जाणार, तर आपण डॉक्टर ह्मणून हरकत कराल कीं काय ? "

" हो. अशी हरकत करण्याची कदाचित् जरूरी पडेल. कारण त्यांची प्रकृति अजून अगदीं इतकी निकोप झालेली नाहीं. तेव्हां त्यांची प्रकृति कदाचित् उलटेल, उलटली तर पुनः ताळ्यावर येण्याला अतिशय कठिण जाईल किंबहुना अशक्य होईल. तेव्हां इथून कांहीं दिवस तरी त्यांना हलवितां कामा नये. "

" पण तुमचं हें कांहीं अगदीं सरकारी इस्पितळ नाहीं. आणखी त्यांनीं स्वतः जर आपण इथून जातों असं ह्मटलं तर ? "

डॉक्टर त्याचें तें बोलणें ऐकून किंचित् हंसले व शांतपणें पुनः त्यास ह्मणतात, " आपला तरी मला मोठा चमत्कार वाटतो. ते इतके दिवस अगदीं अत्यवस्थ पडलेले होते, तर तुमच्याकडचा कोणी माणूस आला नाहीं. कोणी त्यांची विचारपूससुद्धां केली नाहीं. आणखी आज ते जरा बरे होण्याच्या स्थितीला आले, तों तुह्मी येऊन त्यांना न्यायला येतां ! तुमच्या स्थितींत मी असतों, तर मीच इथें राहतों आणखी याच ठिकाणीं ते अगदीं बरे होईपर्यंत त्यांची शुश्रूषा करतों असं ह्मटलं असतं. योग्य गोष्ट ह्मटली म्हणजे ही होय, कीं त्यांना इथून हलविण्याचं तुह्मी मनांत सुद्धां आणूं नये. "

" तें कसंही असो, पण ते आतां जागृत झाले, म्हणजे त्यांनाच या बाबतींत विचारलं तर बरं, मला कांहीं कारणासाठीं असं वाटतं, कीं त्यांना इथून हलवून दुसरीकडे नेलं तर बरं. त्यांना जर नाहीं वाटलं तर....... "

" आपण आतां असं करा, यांवेळीं जा. आतां ते जरी जागे झाले, तरी त्यांचं पथ्यापाण्याचं होऊन पुनः थोडीशी वामकुक्षी होईपर्यंत तरी त्यांच्या मनाची चलबिचल होईल असलं कांहीं करणं इष्ट नाहीं. आपण येऊन त्यांना भेटण्याची आमची मुळींच हरकत नाहीं. पण त्यांचं पथ्यापाण्याचं होईपर्यंत तरी आपण त्यांना भेटूं नये असं मला वाटतं. त्यांच्या मनावर एकदम कांहीं परिणाम होऊन

भलतेंच व्हायचं. आपण पुन्हा येण्यापूर्वी आह्मी पाहिजे तर त्यांना आपण येणार आहां वगैरे सांगून आपल्यास भेटण्याची त्यांच्या मनाची तयारी करतों. मग आपण येऊन काय वाटेल तें करा, परंतु होतां होईतों त्यांना इथून हलविण्याचं मनांतसुद्धां आणूं नका. दुसरं कांहीं आमचं सांगणं नाहीं. एथवर आह्मांला यश आलं आहे, तसंच शेवटपर्यंत आलं म्हणजे बरं असं नाहीं आपल्याला वाटत ?" डॉक्टरांनीं हें भाषण अगदीं शांत व सौम्यपणें केलें आणि ते त्या गृहस्थास आपण असे दुपारीं दोन तीन वाजतां या ह्मणून सांगून तेथून निघून जाऊं लागले. आमचे गृहस्थ आतां आपण काय करावें या बुचकळ्यांत पडले असावे असें दिसलें. आतां वेळेंच आपण येथें बसावें आणि दादासाहेब जागे होतांच त्यांस भेटून दुसरीकडे चलण्याचा विचार त्यांचेजवळ काढावा असें त्यांच्या मनांत येऊं लागलें. न जाणों आपण आतां गेलों, आणि पुनः आलों म्हणजे दारावरच कोणी अडवून आंत येऊं दिलें नाहीं, तर मग आपल्यास काय करतां येईल ? असा विचार त्यांचे मनांत आला. त्यांचें मस्तक चिघडलेंच होतें. मनुष्याला एकदां संशयपिशाचानें पछाडलें ह्मणजे त्याला दुसरें तिसरें कांहीं सुद्धां दिसत नाहीं व सुचतही नाहीं. ज्या कल्पनेनें मनुष्याचें चित्त एकदां व्याप्त होतें, त्या कल्पनेसेरीज मग कोणतीही कल्पना किंवा विचार हीं त्याच्या मनांत थारा धरीत नाहींत. अशाच स्थितींतलें पद्माकराचें मन झालें होतें. वरील गृहस्थ पद्माकरच होय हें वाचकांनीं ताडलेंच असेल. पहिल्यापासून संशयपिशाचिकेनें त्याच्या मनास पछाडलें आणि त्यांत असे कांहीं कर्मधर्मसंयोग आणि प्रसंग आले, कीं दर प्रसंगीं त्याच्या त्या संशयाला भरतीच पडली. थोड्या वेळापूर्वीच कमला आणि प्रभाकर यांस एकत्र पहाण्याचा हा कर्मधर्मयोग किती विचित्र होता ! हें ज्याप्रमाणें पद्माकर आपल्या बापाचा शोध करण्यास अगदीं आकस्मिकपणें त्या मठांत आला, त्याचप्रमाणें जिच्यावर त्याचें भगिनीप्रमाणें अत्यंत शुद्ध प्रेम त्या कमलेची शुद्धि लागतांच तोही तेथें आला. तो येऊन कमलेची व त्याची भेट होण्याला आणि पद्माकर तेथें येण्याला अचानक गांठ पडली. अर्थातच या दोघांची येथें एकांतांत गांठ पडते, आणि तीं दोघें कोणाच्या दृष्टीस पडूं नयेत, म्हणून त्यांची दुसरी सोबतीण चटकन् दार लावते. असा प्रसंग प्रत्यक्ष पाहिल्यावर त्याच्या त्या संशयपिशाचिकेस चेतण्यास आणखी काय पाहिजे ?

एकदां आपण येथून गेलों, कीं आपल्याला कदाचित् कोणी परत येऊं देणारही नाहीं, असें त्यास खात्रीनें वाटूं लागलें. आणि त्याच्या मनानें असें घेतलें, कीं दादासाहेब जागे होईपर्यंत आपण येथेंच वाट पहाणार असें डॉक्टरांस सांगावें. त्याप्रमाणें आपण कोण हें त्यांनीं त्यांचेजवळ कबूल करून असें निक्षून सांगितलें, कीं मी इथें आलों आहें, तर आतां त्यांना भेटल्यासेरीज मी परत जाऊं इच्छित नाहीं. डॉक्टरांनींही त्यांस आपल्या आफिसांत बसण्याची विनंति केली. तेथें नेऊन बसविलें व ते जागे होऊन त्यांचें पथ्याचें होण्याबरोबर आपल्याला कळवितों, ह्मणून सांगून तेही आपल्या कामाला निघून गेले.

इकडे बाहेर एवढा सगळा प्रसंग चालला असतां बिचाऱ्या कमलेस व प्रभाकरास त्याचा गंधसुद्धां नाहीं. तीं दोघें बराच वेळ अश्रुपूर्ण नेत्रांनीं एकमेकांकडे पहात उभीं राहिलीं. एकाच्याही तोंडून एक सुद्धां शब्द बाहेर फुटेना. कमलेला आपण काय विचारावें हें प्रभाकरास सुचेना, आणि प्रभाकरास आपण काय बोलावें हें कमलेस सुचेना, परंतु परस्परांनीं परस्परांच्या नेत्रांकडे पाहिल्यानेंच त्या दोघांच्याही मनाची परस्परांविषयीं किती शुद्ध कल्पना होत्या, याबद्दल खात्री होण्याजोगी होती. प्रभाकराकडे पहाण्याबरोबर कमलेची अशी खात्री झाली, कीं सगळ्या जगानें जरी आपल्याबद्दल कांहीं तर्क-वितर्क केले, तरी याच्या मनांत आपल्या शुद्धतेविषयीं अणुरेणुमात्र शंका नाहीं हें खचित्; आणि प्रभाकरानें कमलेकडे पाहाण्याबरोबर त्याच्या मनाची अशी खात्री झाली, कीं आपण तिला जितकी शुद्ध समजत आलों, तितकी ती खचित् शुद्ध आहे, एक रतिभरसुद्धां किल्मिष तिच्या चित्तांत नाहीं. याप्रमाणें तीं दोघें बराच वेळ उभीं राहिलीं. कोणी बोलण्यास प्रारंभ करावा याचीच जणूं काय दोघांसही अडचण पडली होती. शेवटीं प्रभाकर तिला म्हणतो, "ताई, यावेळीं मला तुझ्याशीं कांहीं सुद्धां बोलवत नाहीं. तुझा शोध लागला एवढ्यानेंच मला इतका आनंद झाला आहे, कीं काय बोलावं आणि काय करावं कांहीं सुचत नाहीं. तुलाही कांहीं बोलवत नाहीं हें उघड आहे. तर मी आतां जातों, पुन्हां येईन. आणखी येईन तो एकटा येणार नाहीं, काकांना घेऊन येईन. तुझा शोध लागल्याची बातमी ऐकण्याबरोबर त्यांना किती आनंद होईल, याची तुला कल्पनासुद्धां होणार नाहीं. ताई, आतां तूं कांहीं बोलूं नको. तूं न बोलतां मला सगळ्या गोष्टी समजल्या आहेत. तुझं अंतःकरण जरा शांत झाल्यानंतर मग सावकाशपणीं बोलतां येईल. सध्या कांहीं न बोलणंच बरं. मी जातोंच. आपण दोघं एकटं फार वेळ बसणं सुद्धां बरं नव्हे."

कमला त्याच्या तोंडचा प्रत्येक शब्द अगदीं अमृतबिंदूप्रमाणें सेवन करीत होती. तिनें चार वेळां बोलण्याचा प्रयत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. शब्द बाहेर उमटेचना अशी कांहीं तिची विलक्षण स्थिति झाली होती.

शेवटीं प्रभाकर अगदीं मुकाट्यानें तेथून निघून गेला. आणखी कांहीं वेळ थांब असें म्हणावयाचें मनांत येऊन सुद्धां कमलेच्या तोंडून ते शब्द बाहेर पडेनात. ती मुकाट्यानें अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्याजकडे पहात होती. प्रभाकर गेलाच. तो गेला तेव्हां पद्माकर बाहेर नव्हता, डॉक्टरांबरोबर आंत गेला होता, एवढें झालें होतें.

इकडे कमला त्या खोलींत बराच वेळ बसली. तिला तेथून कांहीं केल्या बाहेरच पडूं नये, झाल्या गोष्टींवर विचार करीत बसावें असेंच वाटलें. तिचा पाय तिला उचलवेना. परंतु असें किती वेळ चालणार ! थोड्या वेळानें दोन दीर्घ असे उसासे टाकून ती तेथून निघाली. आपला नवरा त्या वेळीं मठांत आला असून सुंदराबाईचें, डॉक्टरांचें व त्याचें बोलणें होऊन तो डॉक्टरांच्या ऑफिसांत बसला आहे, त्यानें आपल्यास प्रभाकराच्या समोर उभी असतांना पाहिलें, वगैरेसंबंधीं कांहीं गंधवार्ता सुद्धां नव्हती. आपण बराच वेळ इकडे बसलों, आधीं उशीरा उठलीं, तेव्हां

आपल्या सासऱ्याची व्यवस्था काय आहे ? त्यांच्या पथ्यापाण्याची तजवीज पाहिली पाहिजे म्हणून ती लागलीच त्यांच्या खोलीकडे गेली. तों दादासाहेब अजून स्वस्थ पडले होते. ते निजले आहेत तों त्यांचें पथ्याचें तयार करावें म्हणून कमलेनें तें तयार केलें. इतक्यांत सुंदराबाई तेथें येऊन त्यांनीं कमलेस सांगितलें, " आज दादासाहेबांनीं पथ्याचें घेतल्याबरोबर तुह्मी मला येऊन सांगा. " आणि कमला कां, वगैरे विचारणार तों सुंदराबाई तेथून निघूनही गेल्या. कमलेला त्यांच्या त्या सांगण्याचा अचंबा वाटला. परंतु तिनें पथ्याचें तयार केलें. इतक्यांत दादासाहेब जागे झाले. त्यांना हिनें पथ्याचें तयार आहे असें सांगतांच त्यांनीं गुळणा करण्यास पाणी मागितलें, तें तिनें त्यांस दिलें. त्यांनीं गुळणा वगैरे केला आणि ताट पुढें करून ती त्यांस पथ्याचें घालूं लागली. तोंच डॉक्टरांच्या आफिसांत बसून बसून कंटाळलेला पद्माकर कोणास न विचारतां आपणच उठून त्यांच्या खोलीच्या दारांत आला. पहातो तों आपली बायको आपल्या सासऱ्यास खाऊं घालते आहे !

---

# प्रकरण ८२ वें.

## वाचा आली !



कमलेचें लक्ष्य दाराकडे प्रथम नव्हतें. ती आपल्या सासऱ्यास पथ्याचें घालण्यांत अगदीं निमग्न झाली होती; परंतु कोणी तरी दाराशीं आलें असावें एवढा मात्र तिला भास झाला. तथापि कोणी सहज आलें असेल असें वाटून किंवा तिचें चित्त एका कार्यांत व्यग्र असल्यामुळें, तिनें कोण आहे तें पहाण्यास दाराकडे दृष्टि वळविली नाहीं. कोणी कांहीं कामासाठीं आलें असेल, तर पुढें येईलच, असें कदाचित् तिला वाटलें असेल. पण " आपली बायको, जी आपल्याला मिळावी म्हणून आपण या आपल्या बापाशीं सुद्धां भांडलों, घरच्या माणसांची पर्वा केली नाहीं, परंतु शेवटीं जी आपल्याशीं बेइमान होऊन अद्वातद्वा वागूं लागली, तीच आपल्या बापाच्याजवळ बसून त्याला या अशा संकटांत गांठून आपल्या हातानें अन्न घालीत आहे. हा एकंदर प्रकार तरी किती विचित्र ! आपलें एकंदर चरित्र तरी किती विचित्र ! आपला बाप किती पवित्र ! आणि त्याला या असल्या कुलटेच्या हातून अन्न खाण्याचा प्रसंग आला ! ही कोण हें जर त्यांना कळलें, तर त्याच्या मनाची काय अवस्था होईल ! त्यांची तामसवृत्ति त्यास

पक्षीं ठाऊक, ती वृत्ति जागृत होऊन किंबहुना ती अतिरेकास जाऊन त्यांस तत्क्षणीं वेड लागणार असें पद्माकराला वाटलें. क्षणापूर्वी त्यानें तिला कोणाबरोबर बोलत असतांना पाहिलें. आणि पुनः पहातो, तों हें काय दृष्टीस पडतें! आतां आपण आपल्या बापास येथून हलविलेंच पाहिजे. ही कोण, काय, हें त्यांना कळूं देतां उपयोगी नाहीं. तें जर कळलें, तर फार भयंकर प्रकार होईल, शिवाय ते जर येथेंच राहिले, तर आपल्याला वारंवार येथें यावें लागेल आणि कोण्या वेळीं आपल्या हातून काय घोर कर्म होईल याचा नियम नाहीं. असें मनांत येऊन तो पुढें झाला. तिला पाहतांक्षणींच त्याच्या त्या अविवेकी व उद्रेकी वृत्तीला सपाट्यासरसें जें वाटलें तेंच तो करता, तर तेथें कांहीं तरी भयंकर प्रसंगच ओढवला असता; परंतु आपण कोठें आहोंत, कशाला आलों आहोंत, याचा विचार मनांत येऊन तो एकदम बापाजवळ जाऊन ह्मणतो, "दादासाहेब, आपण आतां येथून चला. मी आपल्याला नेण्याला आलों आहें..." हे शब्द त्यानें अत्यंत प्रयत्नानें उच्चारले. उच्चारतांना त्याचे ओंठ थरथर कांपत होते, डोळे लाल झाले, सर्वांग संतापानें अगदीं थरारून गेल्यासारखें दिसलें; आपला संताप आवरण्यासाठीं तो अगदीं विलक्षण प्रयत्न करीत असून तो कांहीं केल्या आवरला जात नाहीं असें स्पष्ट दिसत होतें.

त्याचें पाऊल पुढें होऊन त्यानें उच्चारलेला पहिला शब्द बाहेर पडला, त्या क्षणींच कमला चपापून तिच्या हातचा घास गळून ती तशीच तट्कन् उठून उभी राहिली. ती घाबरून गेली. तिचें सर्वांग भयानें एकसारखें थरथर कांपूं लागलें. तिच्या सर्वांगास घाम सुटला आणि आपण आहोंत कोठें व काय करितों आहोंत याचें तिला जणूं काय अगदीं विस्मरण होऊन व काय चाललें आहे तें पहावयास नको म्हणून तिनें आपले डोळे घट्ट मिटून घेतले. तिला सगळें जग फिरतें आहे असें होऊं लागून, आतां आपण पडणार असेंही वाटलें. तिनें दादासाहेबांच्या पलंगास धरून कसे तरी जमिनीवर पाय दाबून धरले असावे असें दिसलें. ती पडावयाचीच, परंतु तेवढ्यानेंच सांवरली. दादासाहेबांनीं वर पाहिलें, तों त्यांची नजर आपल्या चिरंजीवाकडे गेली, त्याबरोबर त्यांच्या कपाळावर आंठ्या चढल्या आणि ते अतिशय तिरस्कारपूर्ण अशा दृष्टीनें त्या आपल्या मुलाकडे पाहूं लागले. इतकेंच नव्हे तर त्यांनीं बोलण्याचाही यत्न केला, परंतु कांहीं केल्या शब्द उमटेनात असें दिसलें.

तेव्हां त्यांचे चिरंजीव त्यांजकडे पाहून पुनः ह्मणतात, "दादासाहेब, आपल्या आज्ञेविरुद्ध, आपली मर्जी मोडून मीं अत्यंत मोठा मूर्खपणा केला, आणखी त्याबद्दल मला खूप भयंकर असं प्रायश्चित्तही पण मिळालें. आतां मला पुरा पश्चात्ताप होऊन मी आपल्या भेटीला आलों आहें. आपल्याला वाटेल तें शासन मला करा, पण या जागीं मी आतां आपल्याला क्षणभर सुद्धां ठेवणार नाहीं. मी आपली शुश्रूषा करीन, आणखी घरचीं मंडळी बोलावितों, पण इथून चला. आपल्याला जर कांहीं वेळानं या घरांत कोण मंडळी आहे आणखी कशा प्रकारची आहे तें कळलं, तर आपण एक क्षणभर

सुद्धां राहणार नाहीं. आजपर्यंत जी गोष्ट झाली ती झाली. परंतु आपल्याला पुढं इथें क्षणभरसुद्धां रहाणं योग्य होणार नाहीं. हा मठ कीं काय याला म्हणतात, तें एक माझ्या दृष्टीनं कुलटा आणखी सोटभैरव यांचें माहेरघरच दिसतें आहे.... ..."

परंतु इतक्यांत पाठीमागून एका स्त्रीचे पुढील शब्द त्याच्या कानीं पडले, "छे, छे, छे. निदान आमच्या या मठांत असेपर्यंत तरी असले उद्गार काढूं नका. याच मठांत आपल्या वडिलांना मृत्युमुखांतून ओढून काढून अशा स्थितींत आणून सोडलं. आपल्याला इथल्या स्त्रीपुरुषांविषयीं वाटेल तसं बोलायचं असेल तर बाहेर गेल्यावर वाटेल तितकी जागा आहे. इथें आमच्या या शुद्ध व शांत स्थानांत तरी असले शब्द उच्चारूं नका. शिवाय रोगी मनुष्याच्या खोलींत त्याच्या मनाला एकदम कांहीं धक्का बसेल असं बोलूं नये. जरासे शांत व्हा. म्हणजे मग तुमचं तुम्हालाच वाटून येईल, कीं आपण हें काय बोललों!" हे शब्द ज्या स्त्रीनें उद्गारले ती अत्यंत तेजस्वी परंतु अगदीं शांत दिसली. तिचे ते शब्द कानीं पडण्याबरोबरच, आपण कोणा तरी असामान्य स्त्रीपुढें उभे आहोंत असें पद्माकरास वाटलें. ताईची एकंदर चर्याच अशी होती, कीं तिला पहाण्याबरोबर पहाणारास तिच्याबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावी. तिला कोणी उलट उत्तर देणें शक्यच नव्हतें. उलट उत्तर यावें असें कोणाच्या मनांत सुद्धां येणार नाहीं. असा तिच्याबद्दलचा आदर ज्याच्या त्याच्या मनांत उत्पन्न होई. तिचे ते वरील शब्द ऐकल्याबरोबर पद्माकराची तशीच अवस्था झाली व तो तिच्याकडे अगदीं तटस्थपणें पहात उभा राहिला. इतक्यांत ताईची दृष्टि कमलेकडे गेली व तिची स्थिति पहाण्याबरोबर त्या तिच्याजवळ जाऊन तिच्या खांद्यावर हात ठेवून त्या तिला कांहीं समाधानानें बोलणार, तों पद्माकर एकदम खडबडून जागा झाल्याप्रमाणें होऊन कमलेकडे कठोर दृष्टीनें पहात हात करून म्हणतो, "तर मग असलीं माणसं तुमच्या या मठांत कां येतात?" हा प्रश्न त्यानें अत्यंत तिरस्कारानें विचारला हें उघडच आहे. परंतु त्यावर ताईनीं सस्मित होऊन शांतपणें उत्तर दिलें, "कारण तीं ज्यांना प्राप्त होतात त्यांना त्यांची योग्यता कळत नाहीं, ते त्यांचं मातेरं करतात आणि आमच्यासारख्यांच्या जवळ त्यांच्या सद्गुणांचं चीज होतं!"

पद्माकर तें उत्तर ऐकून अगदीं स्तब्ध झाला, पण ती त्याची स्तब्धता अगदीं क्षणभरच टिकली. नंतर त्याची पूर्वीची वृत्ति जागृत होऊन तो एकदम म्हणतो, "तें कांहीं असो, पण मला माझ्या वडिलांना येथून दुसरीकडे न्यायचं आहे. त्यांना या कुलटेच्या हातचं आतांपर्यंत खावं लागलं, तेवढं पुरे झालं. ही कोण हें त्यांना कळलं म्हणजे त्यांची प्रकृति इतकी चेनाल होईल कीं कांहीं पुसूं नये. आणखी मलाही पण इथें वारंवार येण्याला कारण राहाणार नाहीं. आजपर्यंत त्यांना कधीं आईनं केलेल्या स्वयंपाकाखेरीज स्वयंपाक आवडला नाहीं. आणखी आज त्यांना आजन्मांत कधीं आवडलं नसतं, अशाच माणसाच्या हातचं नव्हे, तर असल्या कुलटेच्या हातचं........"

परंतु त्याचें इतकें भाषण होतें, तोंच एकदम एक चमत्कार झाला! दादासाहेबांचें सर्वांग एकदम थरथर कांपूं

लागलें, आणि "हा मूर्खा, असल्या रत्नाला कुलटा कुलटा म्हणून तोंड विटाळण्यापेक्षां तूं आपल्याला गाढव, नव्हे चांडाळ कां म्हणून घेत नाहींस ! " असे शब्द त्यांच्या तोंडून एकदम बाहेर पडले. हे शब्द अगदीं सरळपणें दिले आहेत. परंतु ते त्यांचे तोंडून अगदीं तसेच सरळ निघाले नाहींत. अडखळत अडखळत, परंतु अतिशय जोरानें बाहेर पडले.

फार दिवस मंद झालेली वाचा, या वेळच्या विलक्षण क्रोधोद्रेकामुळें एकदम फुटली. एकदां ती पूर्ववत् सुरू होण्याला जबरदस्त प्रयत्नाचीच जणूं काय अवश्यकता होती, तो प्रयत्न संतापामुळें आपोआप झाला. परंतु या प्रयत्नाचा त्यांच्या प्रकृतीवर लागलीच विलक्षण परिणाम झाला. तेवढ्याच श्रमानें व क्रोधोद्रेकानें त्यांस एकदम घेरी येऊन ते धाडकन् खालीं पडले आणि पुनः बेशुद्ध झाले. पद्माकराची अगदीं त्रेधा उडाली. आपला नवरा त्या ठिकाणीं आहे आणि तो आपल्यास अत्यंत वाईट शब्द बोलला हें कमला तत्काळ विसरून जाऊन तिनें दादासाहेबांस सांवरून धरलें आणि ती त्यांजवळ जाऊन बसली. ताई आपल्या डॉक्टरांस हांका मारण्यास धांवल्या. पद्माकर मात्र अगदीं निस्तेज व निर्जीव होऊन स्तब्ध उभा राहिला. एखाद्यावर वीज पडून त्याची जशी अवस्था होते, त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. त्याच्या डोक्यांत कांहीं विचार येईना, जणुं काय डोक्यांतला मेंदू एकदम नाहींसा झाला. आणि फिक्या रंगाचें मेणाचें बाहुलें जसें उभें करावें, तसा तो उभा राहिला. त्याचे डोळे मात्र टकटक करीत पहात होते. पण ते काय पहात होते हें त्यास समजत होतें की नाहीं, याची शंकाच होती. इकडे डॉक्टरांनीं दादासाहेबांची प्रकृती पाहून त्यांस झटकन् कांहीं औषध दिलें नंतर तें औषध केव्हां केव्हां द्यायचें तें कमलेला सांगून ते सगळ्यांकडे पाहून ह्मणाले, "आतां आपण कोणीही इथें राहिलों नाहीं, त्यांना स्वस्थपणें पडूं दिलें, तर ठीक होईल. ते यांतून शुद्धीवर येईपर्यंत मला मोठी काळजी वाटत आहे. मी दूर पंधरा मिनिटांनीं येऊन पहातोंच. त्यांच्या मनास फार जबरदस्त धक्का बसला असावा. ते आधींच अगदीं अशक्त झालेले, आणखी त्यांत हा धक्का. तथापि फार धास्ती वाटायला कारण नाहीं. त्यांचें हृदय ठीक आहे. चला, चला. इथें आतां बिलकूल गर्दी उपयोगी नाहीं. एका कमलाबाईखेरीज दुसरं कोणी इथें उपयोगी नाहीं." असें ह्मणत ह्मणत त्यांनीं पद्माकराच्या खांद्यावर हात ठेवला व त्याला बरोबर आपल्याबरोबर ते घेऊन चालले. लहानसें वासरूं किंवा कुत्र्याचें पिलें जसें ओढून न्यावें, त्याप्रमाणेंच त्यांनीं त्याला बाहेर नेलें व तोही कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें त्यांच्याबरोबर गेला. आपल्याला कोणी बाहेर नेत आहे, येथें उभे राहूं नका ह्मणून सांगतें आहे हें सुद्धां त्यावेळीं त्यास कळलें असेल कीं नाहीं, याची शंकाच होती. इतका तो त्यावेळीं अगदीं निर्बुद्ध झालेला दिसला ! बाहेर गेल्यानंतर डॉक्टरांनीं पुनः त्याला आपल्या खोलींत नेऊन बसविलें. आणि आंत काय झालें; काय नाहीं याबद्दल एक सुद्धां प्रश्न न विचारतां त्यास ह्मणतात, "आपण सकाळपासून इथें आलां आहां, आपल्याला कदाचित् भूकसुद्धां लागली असेल. इथेंच थोडासा उपहार करा आणखी रहाना ! आपली

नीट व्यवस्था राहील. आणखी वडिलांच्या प्रकृतीवरही आपली नजर राहील. आणखी काहीं थोडंबहुत ! संकोच करूं नका. आमची ही संस्था अशाच कार्यासाठीं आहे."

पद्माकर शेवटीं थोडासा शुद्धीवर आला व ह्मणतो, "नको नको, मी आतां जातों. दादासाहेबांची प्रकृति बरी आहे, काळजी करण्याचं प्रयोजन नाहीं असा निरोप घरीं पाठविला पाहिजे आहे. शिवाय दादासाहेब इथें आहेत हें कळल्यावरही त्यांना इथेंच ठेवणं मला बरोबर दिसत नाहीं. त्यांना इथून नेण्याची तजवीज केली पाहिजे. मी जातों आणखी संध्याकाळपर्यंत त्यांची सोय लावून पुनः येतों."

"आपण या, परंतु दादासाहेबांना येथून नेण्यासाठीं याल, तर आह्मांला त्यांना पाठवितां येणार नाहीं. त्यांची प्रकृति बरी होऊन ते आपण होऊन जाण्यास निघण्यापर्यंत फिरून दुसऱ्या कोणाच्या इच्छेवरून त्यांना येथून हालवणं शक्य नाहीं."

"पण ते आपण होऊनच 'जातों' ह्मणाले तर ?" पद्माकरानें आस्थेनें विचारलें, तेव्हां डॉक्टरांनीं शांतपणें उत्तर दिलें. "म्हणतील असं वाटत नाहीं. आणि म्हणाले तरी आज जशी त्यांची प्रकृति आहे तशी असेपर्यंत पाठविण्याचं मनांतसुद्धां आणतां कामा नये."

"पाहूं. पाहूं मी पुनः येतों, नंतर मग त्याचा विचार पाहूं."

असें ह्मणून पद्माकर तेथून निघून बाहेर पडला. त्याचें मन नाना विचारांनीं गजबजलें होतें. इकडे दादासाहेबांस घेरी आली ती बराच वेळ राहिली. डॉक्टरांनीं दिलेलें औषध कमला दहा दहा पंधरा पंधरा मिनिटांनीं त्यांस देत होती, आणि डॉक्टरही नितक्याच अंतरानें तेथें येऊन त्यांची नाडी पाहून जात. होतां होतां सुमारें दोन तासांनीं ते शुद्धीवर आले. डॉक्टर त्या वेळीं तेथें होतेच. त्यांनीं त्यांची नाडी तपासली आणि उल्हास वृत्तीनें पाहून दादासाहेबांस ह्मणतात, "आतां आपल्यास विश्रांतीखेरीज काहीं सुद्धां नको. आपण येथेंच आठ दिवस शांतपणं रहा आणि आतां एक घटकाभर झोंप आली तर घ्या." यावर दादासाहेब काहीं बोलण्याचा यत्न करूं लागले, परंतु त्यांचे तोंडांतून शब्द उमटेना. तेव्हां डॉक्टरांनीं पुन्हां त्यांना म्हटलं, "आपण आतांच बोलण्याची घाई करूं नका. मनाशीं एकदम उद्वेग आल्याकारणानं बोलण्याची बलवत्तर इच्छा आपल्यास झाली व त्या इच्छेच्या जोरानं, हजारीं औषधांचं काम केलं. हजारों औषधांनीं सुद्धां जीं दुखणीं बरीं होत नाहींत, तीं एकदम रोग्याच्या मनोवृत्तींत जबरदस्त फरक झाला असतां त्याच्या इच्छेच्या जोरानं होतात, असे अनेक अनुभव आले आहेत, त्यांतच हा तुमचा एक अनुभव होय. आतां पुनः आपली वाचा जाणार नाहीं. मात्र आपण आतां अगदीं श्रम किंवा विचार करूं नका. डोळे मिटून स्वस्थ पडून रहा. ह्या कमलाबाई इथें बसल्या आहेत. त्यांनीं अजून कांहीं खाल्लं नाहीं. पण मी त्यांना खाण्यासाठीं कांहीं तरी पाठवून देतों. आपल्याला झोंप लागेपर्यंत त्या इथेंच बसतील. झोंप लागल्यावर चटकन्, जाऊन जेऊन येतील." असें म्हणून डॉक्टर निघून गेले. दादासाहेब पुनः कांहीं बोलण्याचा प्रयत्न करूं लागले, परंतु त्यांचा आवाज इतका क्षीण झालेला दिसला, कीं तो कांहीं बाहेर उमटेना. कमलेनें अगदीं कान लावून

ऐकण्याचा प्रयत्न केला, तरी सुद्धां तिला स्पष्ट कांहीं ऐकूं येईना. परंतु त्यांत एवढें मात्र तिला समजलें, कीं आतां शब्द निघतो आहे तो अत्यंत क्षीण असल्या कारणानें आपल्याला ऐकूं आला नाहीं इतकेंच काय तें. तेवढ्यानेंच तिला बरें वाटलें, "आपण बोलूं नका." असें तिनें त्यांना खुणेनें सुचविलें. त्यावर त्यांनीं तिला खुणेनेंच "तूं जा, कांहीं तरी खा. माझी प्रकृति बरी आहे." असें सुचविलें. परंतु ती तेथून उठेना. "आपण स्वस्थ पडा. आपल्याला झोंप लागली म्हणजे मग मी जाईन. तोंपर्यंत आपलें कपाळ वगैरे मी चेपतें," असें म्हणून तिनें त्यांस थोडेंसें दूध पाजलें आणि मग त्यांचे जवळ ती तशीच बसली. थोड्याच वेळांत त्यांचा थोडा डोळा लागला.

जोंपर्यंत सासऱ्याला हें पुनः काय होतें आहे असें तिला वाटत होतें तोंपर्यंत तिचें मन स्वस्थ होतें. परंतु ते आतां बरे आहेत असें वाटण्याबरोबर पुनः तिच्या अंतःदृष्टीसमोर तो सभाचा देखावा उभा राहिला. नवऱ्यानें आपल्यासंबंधानें उच्चारलेले भयंकर शब्द तिच्या कानांत घुमूं लागले. शेवटीं आतां आपण सर्व जगाच्या दृष्टीनें आणि आपल्या नवऱ्याच्या व आपल्या बापाच्या दृष्टीनें कुलटाच ठरलोंना ! असा प्रश्न तिच्या मनांत उभा राहिला. तिच्या सासऱ्यानें तिच्या नवऱ्याला उद्देशून तिच्या स्वतःत्यासंबंधानें जे शब्द उच्चारले, तेही तिला स्मरले आणि क्षणभर त्याबद्दल आनंद झाला; परंतु मनुष्याचें मन एकदां स्वतःत्याबद्दल शंकित आलें, म्हणजे मग त्याला दुसरं कांहीं सुचत नाहीं. कशीही स्वतःला अनुकूल अशी गोष्ट असो, तिच्याबद्दल शंका त्याच्या मनांत उभ्या राहतात ! आपल्याला आपल्या सासऱ्यानें एकदम 'रत्न' म्हणून आपल्या नवऱ्यास निंदिलें, हें पाहून तिला फार आश्चर्य वाटलें. आपल्याबद्दल त्याच्या मनांत इतका आदर आहे हें पाहून तिला आनंदही झाला. परंतु त्या आनंदाच्या मागोमाग तिच्या मनांत आलें, "माझ्या हातून त्यांची शुश्रूषा झाली व असल्या मोठ्या दुखण्यांतून ते उठले, म्हणून कदाचित् त्यांना माझ्याबद्दल बरं वाटत असेल, पण उद्यां माझ्या हातून काय काय झालें तें सगळ्यांकडून कळलें, म्हणजे मग ते मला रत्न कुठलें म्हणायला ! खापरखुंटी म्हणून दूर फेंकून देतील. एकंदरींत आपला जन्म अगदीं व्यर्थ. आपल्या जन्मापासून कोणा म्हणतां कोणासही—आपल्या स्वतःसही—सुख लागायचं नाहीं असेंच दिसतें. इतरांच्या दुःखाला कारण कोणा तरी नातलगाचा मृत्यु असतो, कोणाचा बाप मरतो, कोणी विधवा होऊन अनाथ होते, आणखी त्यामुळें त्या त्या मंडळीला अत्यंत दुःख होतें. परंतु माझ्या आईवेगळ माझी सगळी मंडळी जिवंत असतांना आणखी माझी अशी भयंकर अवस्था झाली आहे ! मी अत्यंत पवित्र असून कुलटा या नांवाला पात्र व्हावं लागलें आहे ! पतिव्रता असून स्वैरिणी बनलें !" हे शेवटले विचार तिच्या मनांत आल्याबरोबर तिचें सर्वांग अगदीं शिरशिरून गेलें. आणि रडून रडून अगदीं नष्टप्राय होत चाललेले अश्रु पुनः एकवटून जोरानें तिच्या नेत्रांत उभे राहून एकामागून एक बाहेर येऊं लागले आणि अश्रूंच्याबरोबर हुंदक्यांनींही बाहेर पडण्याला सुरुवात केली. दादासाहेबांस झोंप लागली होती ती मोडली. त्यांनीं डोळे उघडून तो शोकप्रकार पाहिला आणि एकदम तिचा हात धरून तिला ते आपल्या क्षीण आवाजानें पुनः म्हणतात, "मुली, तूं रडूं नकोस. तुझें कल्याणच होईल. माझा पूर्ण आशीर्वाद आहे."

# प्रकरण ८३ वें.

## याचा अर्थ काय ?



पद्माकर त्या मठांतून निघाला, तो आपल्या वडिलांस तेथून हालवावयाचें, अण्णासाहेब किंवा त्यांचे दुसरे कोणी स्नेही यांचे घरीं नेऊन ठेवून पुढें औषधोपचार करावयाचे, असा आपला निश्चय योजून ठरवून निघाला. परंतु त्या निश्चयाबद्दलच्या विचारांनींच तेवढें त्याचें मन व्यापून गेलें होतें असें नाहीं; किंबहुना त्या विचारांहून अगदीं भिन्न अशाच कांहीं विचारांनीं त्याचें मन अगदीं व्यापून गेलें होतें. दादासाहेबांनीं कमलेच्या संबंधानें जे उद्गार काढले व आपली निंदा केली, त्या उद्गारांनीं व त्या निंदेनें त्यास अगदीं चकित करून सोडलें होतें. आपण जे उद्गार ऐकले, ते आपल्या वडिलांच्या तोंडूनच बाहेर पडले होते काय, कीं दुसऱ्या कोणाच्या तोंडून बाहेर पडले, अशी शंका सुद्धां त्यास आली. कमला ही आपली पत्नी हें त्यांस कळलें होतें कीं नाहीं, याबद्दल आतां शंका घेण्यास कारणच नव्हतें. अर्थातच, जिच्याशीं आपल्या पोरानें लग्न लावूं नये अशाबद्दल आपला अत्यंत कटाक्ष व पुढें जिच्याशीं लग्न लागलें असें ऐकताच, तत्काळ ज्यांनीं आपल्या पोराचें पुनः मुखावलोकन सुद्धां करावयाचें नाहीं असें ठरविलें, तीच मुलगी आज या मठांत राहून आपली शुश्रूषा व सेवा करिते आहे, हें पूर्णपणें जाणून जर त्यांच्या तोंडून हे विलक्षण उद्गार निघाले असले, तर फारच विलक्षण असा चमत्कार झाला, असें त्यास वाटूं लागलें आणि तसा चमत्कार वाटण्याजोगाच एकदम प्रकार झाला यांत शंका नाहीं. कारण दादासाहेबांसारख्या गाल्या तामसी पुरुषाचें एकदम इतका बदल हें कोणासही असंभवनीय वाटण्यास कारण आहे. परंतु दादासाहेबांवर आलेल्या प्रसंगामुळें त्यांस त्या मुलीची खरी योग्यता कळली, आणि ती अशुद्ध किंवा निंद्य आहेत असा समजुतीमुळें कमलेनें आपल्या मैत्रिणीजवळ आपल्या जन्माची कहाणी अगदीं स्पष्टपणें सांगितली, ती त्यांनीं ऐकली असेल आणि तिच्यामुळें आपल्यासंबंधानें त्यांचें मत फार चांगलें झालें आहे, याची कमलेला कल्पनासुद्धां नाहीं. दादासाहेबांच्या मुखांतून या तिच्या स्तुतिपर व पद्माकराच्या निंदेपर जे शब्द निघाले, त्यांमुळें तिला काय थोडाबहुत आनंद झाला तेवढाच. परंतु तो आनंद फार वेळ टिकला नाहीं हें मागील प्रकरणीं सांगितलेंच आहे.

जसा तिचा तो आनंद टिकला नाहीं, त्याचप्रमाणें पद्माकरास वाटलेलें आश्चर्यही फार वेळ टिकलें नाहीं. कारण त्यास लागलीच असें वाटलें, कीं कधींही न

येणारा प्रसंग त्यांजवर आला, त्यांस दुखापत होऊन ते त्या लोकांच्या हातांत सांपडले, अशा वेळीं सर्व प्रकारची शुश्रूषा हिनें केली, तेव्हां ही फार चांगली असें वाटूनच काय त्यांना तिच्याबद्दल बरें वाटलें असेल तेवढें वाटलें असेल; घटकाभऱ्यानें आपण त्यांना तेथून निघण्याविषयीं व दुसरीकडे जाण्याविषयीं आग्रह करण्यास जाऊं तेवेळीं त्यांना जर सर्व हकीकत कळविली, तर त्यांचें तें चांगलें मत क्षणभरसुद्धां टिकणार नाहीं हें उघडच आहे. अशा ज्या पोरी असतात, त्या अशाच लाघवी असतात. तेव्हां प्रसंग पहातांच हिनें रिकामें लाघव करून आपल्या वडिलांचें चांगलें मन करून घेतलें असेल, असाही त्यानें आपल्या मनास एक विचार सुचविला. नंतर आणखी एक प्रश्न त्याच्या मनांत उभा राहिला. ही या मठांत कशी आली ?

या मठासंबंधानें अद्यापि सर्वांस विशेषशी माहिती झालेली नव्हती, आणि जी काय थोडीशी ओरड चालली होती ती त्या मठास विशेषशी अनुकूल नव्हती. अगदीं जुन्या मताचीं पत्रें त्या मठास अत्यंत गर्हणीय अशीं विशेषणें देत व स्त्रिया आणि पुरुष यांची तेथें एकत्र रहाण्याची वहिवाट असल्यामुळें त्यासंबंधानें वाटेल तें लिहिण्यास त्यांस एक कारणच झालें होतें. या मठाकडून निघणारेंही एक "नवे विचार" या नांवाचें पत्र कांहीं दिवसांपूर्वी निघत असे, परंतु पैशाच्या तुटीमुळें तें पत्र कांहीं दिवस बंद ठेवण्याची पाळी आली होती. त्यामुळें लोकांनीं आपणांवर केलेल्या आरोपाचें निरसन करण्यास मठांतील लोकांस कोणत्याही तऱ्हेचें साधन नव्हतें. बरें, जे आपणास गणपतरावांसारखे कट्टे सुधारक म्हणविणारे होते, त्यांचाही या मठासंबंधानें थोडासा दुर्ग्रह होता. याचें कारण त्या मठाच्या संस्थापकांनीं राजकीय व सामाजिक सुधारणा एकदम चालविण्याचा प्रयत्न केला असून सामाजिक सुधारणेस सरकारी मदत मुळींच नको, असें प्रतिपादन केलें होतें. परंतु या सर्व हकीकतीशीं भयंकर दिव्याच्या वाचकांस आजच कांहीं कर्तव्य नाहीं. आज येथें एवढेंच सांगावयाचें, कीं सुधारक आणि जीर्णोद्धारक अशा दोनही मतांच्या लोकांचे मनांत अगदीं भिन्न भिन्न कारणांनीं या मठाबद्दल दुर्ग्रह उत्पन्न झालेला होता; व त्यामुळें दोघांनाही ही संस्था अनिष्टच वाटे. पद्माकर हा जीर्णोद्धारकांपैकीं नव्हता, तो कट्टा सुधारक होता. त्यानें जें काय या मठाविषयीं ऐकलें होतें, गणपतराव, बळवंतराव इत्यादि व इतर कित्येक मंडळींच्या तोंडून ऐकलेलें होतें, आणि तें जें काय ऐकलेलें होतें, तें अर्थातच या मठाच्या अगदीं विरुद्ध असेंच ऐकलेलें होतें, त्यांत आणखी एक दुःखास्पद गोष्ट झाली. आपल्याला जिकडे जायचें तिकडे—अण्णासाहेबांकडे—लवकर जावें म्हणून तो थोड्याशा अंतरावर गेल्यावर ट्रॅममध्यें बसला. आणि कर्मधर्मसंयोग असा विचित्र कीं, त्याच्या पत्नीबद्दल ज्या वर्तमानपत्रांत विशेष कांहीं एकदां दोनदां आलें होतें, त्या वर्तमानपत्राचे तेच एक दोन अंक घेऊन एक गृहस्थ त्याच्या शेजारीं येऊन बसला. त्या गृहस्थानें एक अंक आपल्या हातांत घेऊन वाचण्यास सुरुवात केली आणि दुसरा त्यानें आपल्या मांडीवर ठेवला होता. त्यास पद्माकराचा सहज धक्का लागून तें वर्तमानपत्र

खालीं पडलें. आपल्या हातून खालीं पडलेला जिन्नस आपण उचलून पुनः जेथल्या तेथें ठेवावा असें सहजच त्याच्या मनांत येऊन, त्यानें तो कागद उचलला. तों कांहीं मजकुराकडे त्याची दृष्टि गेली. तो मजकूर आपल्याबद्दल आहे असें वाटण्याजोगें कांहीं त्यांत त्यास दिसलें, आणि जेथल्या तेथें तो ठेवण्याचें एकीकडेसच राहून, तो काय मजकूर आहे तो आपण वाचावा, अशी त्याला इच्छा झाली व त्याप्रमाणें तो वाचूं लागला. तों त्यांत कमलच्या निघून जाण्याची हकीकत थोडक्यांत देऊन पुढें निनांवी पत्रांचा उल्लेख करून शेवटीं त्या मठाबद्दल फारच वाईट शब्दांनीं उल्लेख केला होता. अशा उडून जाणाऱ्या बायकांचें तें आश्रममंदिरच आहे, असें अपरोक्ष रीतीनें म्हटलें होतें. आपल्या बायकोविषयीं पद्माकराचें मन अत्यंत कलुषित झालेंच होतें. त्या मठाबद्दल त्याचें मूळचें मत चांगलें नव्हतेंच आणि त्यांत—त्या तशा मनाच्या स्थितींत—हा असा मजकूर दृष्टीस पडला, मग काय विचारतां? आपण कोणतें पत्र वाचतों आहोंत, त्याच्या लिहिण्याला कितपत प्रमाण धरावयाचें, याचा यत्किंचित्‌सुद्धां विचार न करितां त्याच्या मनाची खात्री झाली, कीं या पत्रांत लिहिल्याप्रमाणेंच या मठाची व्यवस्था असावी. तशांत आणखी एक गोष्ट त्याचे डोळ्यांसमोर उभी राहिली. ती गोष्ट प्रभाकर तेथें दिसला—आणि आपल्या बायकोशीं एकांतांत बोलत असलेला दिसला—ही होय. तो व तो दोघें एका ठिकाणीं असतां आपल्या नजरेस पडूं नयेत, म्हणून त्या दुसऱ्या बाईनें दार लावून घेतलें, तें आपण कोण व आंत असलेल्या त्या मुलीशीं आपला संबंध काय हें ठाऊक असल्यामुळें तिनें लाविलें. असल्या दुराचारी माणसांनीं एकत्र येण्याला हा मठ एक जागाच आहे, असेंही त्याच्या मनांत आलें. कुविचार आणि कुकल्पना यांना लवकर आणि जितके फांटे फुटतात तितक्या लवकर आणि तितके फांटे कशालाच कधीं फुटत नसतील. स्वतःच्या बायकोविषयीं आणि त्या मठाविषयीं कुकल्पना पद्माकराच्या मनांत उभ्या राहिल्या वेळेपासून एकाहून एक विचित्र विचार त्याच्या मनांत उद्भवूं लागले. मठाविषयीं कुत्सित कल्पना आल्यानंतर थोड्याच वेळांत त्याच्या मनांत असेंही आलें, कीं प्रभाकरानेंच आपल्या पत्नीला कुमार्गाकडे वळवून तिला येथें आणून ठेविलें आणि आतां वाटेल तेव्हां येथें येतो. आपला बाप ज्या आकस्मिक कारणामुळें त्या मठांत येऊन अडकून पडला, त्याच आकस्मिक कारणामुळें आपली पत्नीही तेथें आली असेल, हें त्याच्या मनांत सुद्धां आलें नाहीं. कसें यावें? ज्या दिवशीं आपली पत्नी आपणास दादरास भेटली, त्याच दिवशीं आपले वडीलही दादरांत येऊन दोघेंही परत जातांना एकाच गाडींत असून त्याच गाडीला अपघात झाला असेल, अशी कल्पनासुद्धां त्याच्या मनांत उपजली नाहीं. कशी उपजावी? त्याच्या मनश्चंद्रास संशयरूप राहूनें ग्रासलें असून तो ग्रास अधिकाधिक वाढत जावा अशा प्रकारचेच प्रसंग त्या बिचाऱ्या दुर्दैवी कमलेच्या दुर्दैवामुळें तिजवर येत होते! त्याला तिचा बिचारीचा काय उपाय होता! ती संस्था अतिशय वाईट अशी तर पद्माकराची या वर सांगितलेल्या कारणांनीं पक्की खात्री झाली. आणि त्या खात्रीमुळें त्याचा दादासाहे-

त्यास तेथून हलविण्याचा पक्का निश्चय झाला.

इतक्यांत ट्राम गाडी थांबली. त्याची उतरण्याची जागाही तेथून जवळच होती. यामुळें तो तेथेंच उतरला आणि पायीं जाऊं लागला. डोक्यांत विचार चाललेच होते. तों पाठीमागून त्याला मोठ्यानें कोणी हांक मारली असें वाटलें. मागें वळून पहातो तों कोणी साहेबी थाटाचा पोषाख केलेले दोघे मागून आपणास हांका मारीत आहेत, व रुमाल उडवून खुणाही करीत आहेत, असें त्यास दिसलें. पद्माकरानें त्या दोघांस एकदम ओळखलें; प्रोफेसर इयांडी व त्यांचा मित्र सोन्याबापू हीच मंडळी असावी, असा त्यानें तर्क केला, व या लोकांशीं आपल्याला काय करावयाचें आहे, आपण आपल्या वाटेनें जावें, असा विचार प्रथम त्याच्या मनांत आला. परंतु सोन्याबापू आपल्या बायकोच्या बरोबर होता, असें त्याला वाटत होतें. तेव्हां त्याच्याजवळ बोलून आपली बायको कोणाच्या सांगीवरून त्यानें तेथें नेली होती तें समजेल, आणि प्रोफेसर इयांडी भेटल्यानें तिकडे पोलिसांत काय चाललें आहे, आपल्याबद्दल कांहीं विशेष आहे कीं काय हेंही समजेल, असा मागून विचार सुचला. राजारामानें अमुक अमुक केलें आणि त्यामुळें त्यास पकडलें आहे, असें अद्यापि प्रसिद्ध झालें नव्हतें, कांहीं तरी भयंकर गुन्हे त्याच्याकडून झालेले आहेत असें त्यास वाटत मात्र होतें. तेव्हां प्रोफेसर इयांडी भेटला असतां आपणांस त्या प्रकरणाची सर्व हकीकत समजेल अशी त्याची समजूत झाली. प्रोफेसर इयांडी हा पक्का पाजी, हें त्यास ठाऊक नव्हतें असें नाहीं. त्यामुळेंच त्यास असें वाटे कीं, राजारामावर काय प्रसंग आहे तें या गुलामाला ठाऊक असून त्याला धरून देण्याला हाच कारण झाला असावा. तेव्हां एकंदर प्रकरण आहे काय याची एकदां माहिती करून घ्यावी, असें मनांत येऊन तो थांबला, तों खरोखरीच प्रोफेसर इयांडी व त्यांचे असिस्टंट सोन्याबापू त्याच्यापुढें उभे राहिले!

प्रोफेसर इयांडी नेहमींच्या फाजीलपणास शोभे अशा प्रकारें पद्माकरास ह्मणतात, "कां, पद्माकरपंत, आम्हीं म्हटलं तुमची आज त्या इन्स्पेक्टर मर्चलाइट यांच्या घरीं गांठ पडायची, पण आपण आलां नाहीं. त्यामुळें पुष्कळशा गोष्टींचा निकाल लागायचा राहिला. पण आतां कुठें चाललां आहां तुम्ही? तुमचा शोध करायलासुद्धां गाडी पाठविणार होते, पण तुमचा पत्ता लागायचा नाहीं असं वाटून त्यांनीं तो विचार तितकाच ठेविला. तुह्मी आतां भेटल्याबरोबर तुम्हांला सांगणार आहेत, कीं तुम्ही दिवसांतून दोनदां निदान एकदां तरी मला भेटत जा. त्यांना अशी शंका आलेली दिसते, कीं तुम्ही त्यांना टाळून पळून जाण्याच्या विचारांत आहां. पण मीं त्यांची खात्री केली कीं, आपण आलां, मी झालों, कांहीं नशांतले गृहस्थ नाहीं. आपण राजारामासारख्या पाजी माणसाच्या जाळ्यांत सांपडून फसलेले लोक. मुळचे फार सचोटीचे, पण डांबिस माणसाशीं गांठ पडून भलताच प्रसंग आपल्यावर गुदरला इतकंच. कां खरं कीं नाहीं, पद्माकरपंत? या सोन्याला विचारा. तो इन्स्पेक्टर आपल्याबद्दल असा संशय घेऊन बोलूं लागल्याबरोबर, त्याला ऐसा झाडून टाकला आहे कीं कांहीं विचारूं नका. हें पहा, माझं साहेबलोकांत फार

जाणं, येणं, पण मी कोणत्याही बाबतींत लुलुपुतू, करणारा नाहीं हो. आणखी आपल्या मित्रांबद्दल जर कोणी कांहीं बोलूं लागला विरुद्ध, तर बाय जोव्, मी कशा त्याच्या अगदीं चिंधड्यान् चिंधड्या करून टाकतों. यू आस्क् धिस् सोन्या........"

प्रोफेसर इचांडींचें तें बोलणें ऐकून पद्माकराच्या पायाची तिडीक मस्तकाला पोंहोंचली, परंतु पद्माकर तसें कांहीं बाहेर न दाखवितां ओढून ताणून शांतपणा आणून म्हणतो, "तुम्ही हें एवढंच सांगण्यासाठीं मला थांबविलंत काय? कांहीं काम असेल महत्वाचं म्हणून मी थांबलों. परंतु तसं काम नसलं तर मला जाऊं द्या. मी फार जरूरीच्या कामाला चाललों आहे. राजारामाच्याबद्दल ......"

परंतु प्रोफेसर इचांडी एकदम मध्येंच म्हणतात, "मी त्या इन्स्पेक्टर सर्वेलाइट्जवळ आपल्याबद्दल दोन चांगले शब्द बोललों, त्यांचं हें प्रायश्चित्त वाटतं आम्हांला? राजारामाच्या सर्व कामांत तुम्ही साथीदार आहां, त्याच्या सगळ्या चोऱ्यांत तुमची पाती आहे, असं सांगितलं असतं म्हणजे ठीक झालं असतं नाहीं? पण स्नेह्याची अशी उघडीक पाडण्याचं आमचं ब्रीद नाहीं. आणखी म्हणूनच मी गप्प बसलों, इतकंच नाहीं, तर उलट तुम्ही नशांतले नाहीं, तुम्ही अगदीं माझ्यासारखे आहां, अशी तुमची शिफारस केली. तें एकीकडेच राहून तुम्ही आम्हांला अगदीं धुडकावून लावतां काय? त्या राजारामानं नानाप्रकार करून तुम्हांला फसविलं. शेवटीं तुमची बायकोसुद्धां उपटून नेणार होता. तरी तुम्ही त्याचीच चौकशी करतां आहां. अरे, तूं असला भोळा गृहस्थ, तुला त्यानं किती प्रकारांनीं फसविलं याची तुला कल्पना तरी? आणखी पुनः 'राजारामाबद्दल कांहीं बोलूं नका' असं मला सांगतोस? तो तर गुलाम महाबस्माद्, पक्का बिलंद! त्यानं आतांपर्यंत किती लोकांना कशा तऱ्हेनं बुडविलं याची कल्पना तरी तुला? तो सगळा ऐवज घेऊन, आणखी तुझ्या पत्नीला फुसलावून किंवा फसवून तिलाही घेऊन तुझ्या डोळ्यांसमोरून जाण्याचा त्याचा विचार होता. बहुतेक व्यवस्था झाली होती. दहा किंवा पंधराच मिनिटांची चुकामुक. तेवढी जर झाली नसती, तुला तिथें आणून तुझ्या डोळ्यांना फसवून जें काय करायचं तें करायचं अशी जर इच्छा त्यानं धरली नसती, तर त्याचं काम फत्ते होऊन तो तुझ्या हातावर तुरी देऊन गेलाच होता. पुनः तुझी समजूत अशीच झाली असती, कीं मी नाहीं तर या सोन्यानं, नाहीं तर प्रभाकरानं, तुझ्या बायकोला..." परंतु हें बोलतां बोलतांच प्रोफेसर इचांडींचें लक्ष्य पद्माकराच्या चेहऱ्याकडे व उजव्या हाताकडे गेलें. त्याचा चेहरा लालभडक झाला असून हात अगदीं कोणाला तरी मारण्यासाठीं वळवळत आहेत, पण तो मोठ्या मिनतवारीनें मनाचें संयमन करीत आहे असें त्यास दिसलें. अर्थातच हा पद्माकराचा संताप जरी राजारामावर असला, तरी तो आतां या वेळीं जवळ नसल्याकारणानें हाताचा प्रयोग झाला तर आपल्यावरच होणार! तेव्हां आपणच जरा आपला भाषणसमारंभ आंखडता घ्यावा हें बरें, असें मनांत येऊन प्रोफेसरसाहेबांनीं आपला तो पोक विचार ताबडतोब अंमलांतही आणला. परंतु सोन्याबापूस तितका दूर विचार नसल्याकारणानें त्यास आपले महागुरु प्रोफेसरसाहेब बोलतां

बोलतां एकदम थांबले याचें आश्चर्य वाटून व त्यामुळें त्यांचें भाषण आपण पूर्ण करावें असें मनांत घेऊन ह्मणतात, "अहो, मला, मला त्यानंच पाठविलं होतंना ग्रँट-रोडच्या स्टेशनावरून तिला दादरावर घेऊन यायला ? आपण वाट पहातां आहां, लवकर चला, असं बोलून तिला दादरास घेऊन यायला मलाच राजारामानं पाठविलं होतं. आणखी मीं जाऊन बतावणी केली आपण अमुक ठिकाणीं आहां, तिकडे तुम्हांला बोलाविलं आहे असं सांगितलं. त्याबरोबरच त्यांनीं कांहीं आढेवेढे न घेतां गाडींत पाऊल घातलं. मी जर कां बतावणींत चुकलों असतों, तर राजारामाच्या बेताप्रमाणें कांहीं तरी झालं असतं काय ? पण आपण कधीं असल्या बतावणीच्या कामांत चुकायचेच नाहीं. असं त्याचं काम केलं असून लेकानं मलामुद्धां फसविलं कीहो. तो पाजीच. बरं तर बरं, अजून कांहीं कुठल्या गुन्ह्यांत माझं नांव नाहीं घेतलंन् गुलामानं, कीं मीही त्यांत होतों ह्मणून, ह्मणजे मिळविली ! बाकी प्रोफेसर जोंपर्यंत मला सोडवायला आहेत तोंपर्यंत मला कांहीं त्याची भीति नाहीं म्हणा; पण उगीच. पण त्याची धन्य बोआ. पैसा आणखी ती कमला दोन्ही एकदम पटकावून त्याच रात्रीं त्याचा मुंबईतून काळं करण्याचा बेत होता तो भलत्याच नादीं लागला यामुळेंच केवळ हुकला. जर त्या नादीं न लागता, तर..." पद्माकराच्यानें आतां राहवेना. तो एकदम त्या सोन्यास ह्मणतो, "काय ह्मणतोस ? राजाराम तिला फसवून नेत होता ? आणखी तूं त्याच्या वतीनं तिला घेऊन दादरावर आलास ? त्यानं तुला सांगितलंन् तिला तिथें आणायला ? तूं बोलतो आहेस हें खरं का खोटं ?"

"खरं का खोटं ? ह्मणजे आह्मांला दोघांना खोटं बोलायची आजन्मांत कधीं संवय नाहीं. जें मीं सांगितलं तें अक्षरशः खरं. अगदीं खरं. आणखी काय म्हणतां ? काय चमत्कार आहे पहा, या गृहस्थाला अजून त्या डांबिस माणसाची आम्ही खोटी तालस्ती करतों आहोंत, तो अगदीं सच्चा आहे, असंच वाटतं आहे. पण त्याचीं एक एक कारस्थानं ऐकलींत तर तुमचं तुम्हांला असं वाटेल कीं, हा कोणी राक्षस आहे का कोण आहे ! त्याच्या इच्छेच्या आड कोणी आलं तर त्याला कधीं तो गय करायचा नाहीं छाटून टाकायचा. फार भयंकर माणूस ! तुम्ही काय त्याला भाळलां होतां ! आतां कोर्टांत त्याचीं सगळीं कारस्थानं बाहेर पडतील पहा. तुम्ही त्याला आपला स्नेही समजत होतां, पण त्यानंच तर तुमचा छानदार गळा कापला !"

आपण ऐकतों आहोंत हें काय याचें पद्माकरास कांहीं सुद्धां ज्ञान होईनासें दिसलें ! तो बावळ्याप्रमाणें त्या दोघांकडे पाहूं लागला.

---

# प्रकरण ८४ वें.

## जागृति.



पद्माकराचें मन ठिकाणीं राहिलें नाहीं. आपण आहोंत कोठें आणि कोण आपल्याशीं काय बोलतें आहे, याचें सुद्धां ज्ञान त्यास नसावें असेंच दिसलें. त्याचें मस्तक जणूं काय अगदीं रिकामें झालें होतें. तो अगदीं बावळ्यासारखा त्यांच्याकडे पाहूं लागला. इतक्यांत प्रोफेसर इर्यांडींनीं एका व्हिक्टोरियावाल्याला खूण केली, तों सोन्याबापूनें पुढें होऊन गुजराथी भाषेंत "ए, एँ आव" करून हांक मारली. प्रोफेसर इर्यांडींनीं पद्माकराचा हात धरून, "यू कम वुइथ् मी, सगळं कांहीं त्यांनलं थिंग तुला सांगतों" असें ह्मटलें. पद्माकर एखाद्या पाळींव मेंढराप्रमाणें त्याच्याबरोबर त्या गाडींत बसला. दुसरी कोणती वेळ असती, तर प्रोफेसर इर्यांडींनीं नुसता हात धरतांक्षणींच त्यानें त्यास खडकावून टाकलें असतें. त्याच्या असें करण्यांत आपला अपमानच आहे असें त्यास वाटलें असतें. परंतु आज तो कांहीं सुद्धां बोलला नाहीं. जणूं काय तो कांहीं तरी मादक पदार्थ खाऊन अगदीं भ्रमिष्टाप्रमाणेंच झाला होता. प्रोफेसर इर्यांडींनीं त्याला जेथें बसविलें, तेथें तो बसला. सोन्याबापू समोर बसला आणि प्रोफेसर इर्यांडींनीं मोठ्या थाटानें त्या व्हिक्टोरियावाल्यास सांगितलें, "फोर्टमा." तेव्हां सोन्याबापू म्हणतो, "कोटांत कशाला? आतां तुमच्या रूम्समध्यें जाणार होतांना? तुह्मी तिकडेच चला. उगीच इकडे तिकडे कशाला?" तेव्हां व्हिक्टोरियावाल्याला पुनः हुकूम झाला, कीं गिरगांवांत घे. आतां प्रोफेसर इर्यांडी यांनीं एका बंगल्यांत एक सबंद माडी घेतली होती. तळमजल्यांत दुसरें कोणी नसलेंच चिन्हाड होतें. परंतु ही स्वारी माडीवर रहात असून आतां मागल्यापेक्षां त्यांची रहाण्याची स्थिति फारच विलक्षण होती. पहिल्यापासून त्यांचा साहेबी थाट, पण आतां तर तो थाट अगदीं पक्काच साहेबी झाला होता. ती त्यांची सामानासुमानांनीं अगदीं खचून भरलेली जागा पहाण्याबरोबर कोणासही असें वाटावयाचें कीं, या माणसाला एकदम लाख दोन लाखांची इस्टेट मिळाली असून त्यानें आतां अगदीं साहेबी थाटानें राहण्याचा निश्चय केला असावा. त्यांच्या बंगल्याशीं गाडी जातांच स्वारी थाटानें खालीं उतरली. "कम्, माय् रूम्स् आर हिअर" असें म्हणून पद्माकरास त्यानें उतरण्यासाठीं हात दिला. पद्माकराचें मन इतका वेळ गाढ अशा अंधःकारानें जणूं काय अगदीं व्याप्त झालें होतें. परंतु अगदीं अंधःकारमय अशा स्थानांत हळूच उजेडाचे किरण शिरूं लागले, म्हणजे जशी

अवस्था होऊं लागते, अंधःकार क्षणोक्षणीं नष्ट होत जातो व उजेड त्याची जागा घेऊन एक एक वस्तु स्पष्टपणें दिसेल असें करूं लागतो, तशीच पद्माकराच्या मनाची अवस्था झाली. इतका वेळ त्याच्या अंतःकरणांत कांहीं कांहीं विचार उत्पन्न होऊं लागले होते व त्या विचारांनीं जणूं काय त्याच्या मनावर पसरलेला अंधःकार दूर सारण्याचें काम सुरू केलें होतें. सोन्याबापूनें त्याचे कानाशीं चर्पटपंजरीस आरंभ केलाच होता. "हें पहा. प्रोफेसरांची आतां कांहीं पूर्वींची खोली नव्हे बरं का हां! आतांच्या रूम्स काय विचारतां! त्यांना तो पगार सुरू झाल्यापासून अगदीं त्यांची फारच चैन सुरू झाली आहे. आणखी सर्चलाइट्साहेब यांच्यावांचून एक पान सुद्धां इकडचं तिकडे करीत नाहींत. प्रोफेसर जर अनुकूल नसते, त्यांनीं जर मदत केली नसती, तर सर्चलाइट्च्या हातून काय होणार होतं या राजारामाच्या बाबतींत? तसंच त्या बँकेच्या बाबतींत तरी काय, प्रोफेसर डयांडींनींच सगळ्या चित्तंबातम्या देऊन त्यांचं बिंग बाहेर काढलं. प्रोफेसर डयांडी जर या कामांत सर्चलाइट्ला अनुकूल नसते, तर सर्चलाइट्च्या हातावर तुरी देऊन तो केव्हांच फरारी झाला असता; पण जातो कसा! प्रोफेसर आणखी मी, आह्मांला दोघांना इतकं फसवून जातो कुठें? प्रोफेसरसाहेबांच्यामुळं मलाही कांहीं गोष्टींसाठीं साहेबांनीं बोलावून नेऊन असं सांगितलं, 'तुझ्याखेरीज होणं नाहीं.' मग मीं सांगितलं, 'साहेब, आपल्याला त्याची काळजी नको. तें सगळं माझ्याकडे सोपवा कसं!' आणखी साहेबांनीं पण मला, वाटेल तें काम तुला सांगितलं तरी तूं तें खास करणार, तुझ्या चेहऱ्यावरूनच तुझी धमक काय ती दिसते, असं ह्मटलं. मग काय पाहिजे! त्यांना मीं सांगितलं, कीं माझे "आयडिअल" प्रोफेसर करतील तसं मी करणार. ते सांगतील तसं मी वागणार. ते जातील तिथें मी जाणार. पण, मिस्तर पद्माकर, असे कसेहो तुह्मी अगदीं भोळे! हा राजाराम इतका लुच्चा आहे, पाजी आहे, हें तुह्मांला समजलं नाहीं? त्याला तुह्मीं आपल्याजवळ ठेवून घेतला कसा? तो तुमची किती स्क्यांडल करायचा! आणखी तुह्मांला तो आपला मोठा फ्रेंड वाटायचाना! काय मौज आहे! आमच्या प्रोफेसरसाहेबांनीं पहिल्या दिवशीं मला सांगितलं, कीं हा माणूस डाँबिस आहे. कुठून तरी चोऱ्यामाऱ्या करून मुंबईस आला आहे. दुसरं कांहीं सुद्धां नाहीं. आणखी मींही पण त्याला तेव्हांच ओळखलं. अगदीं तेव्हांच ओळखलं. एकदां तर मला कोणीं असंही पण सांगितलं, कीं तो गोदापुराहून चोऱ्या करून तिथून पळून आलेला माणूस आहे. मला वाटतं, पोलिसांतच असा कोणी तलास काढून आणला आहे. पण पद्माकरपंत, तुह्मी काय फसलांहो! प्रोफेसरसाहेब मला तुमच्या मौजा सांगत होते. मला तरी दुसरी काय माहिती..." इतक्यांत प्रोफेसरसाहेबांची स्वारी त्या आपल्या पट्ट शिष्यावर त्रासल्याप्रमाणें करून ह्मणते, "आय् से, सोन्या होल्ड युअर टंग् नाऊ. पद्माकर चहा मागवूं काय? तूं अगदीं थकलेला दिसतोस. चहा घेतलास तर बरं वाटेल. मला तुला किती तरी गोष्टी सांगायच्या आहेत! माझी तुझ्याशीं आतां पुरी पुरी सिम्पथी आहे. पण तुझ्यावरच या सगळ्या गोष्टी

अवलंबून आहेत. मला ठाऊक नाहीं कीं तुला तो माणूस इतक्या तऱ्हेनं फसवील. तसं ठाऊक असतं, तर मीं तुला केव्हांच जागं करून टाकलं असतं. ओ नो, ओ नो, तो माणूस फार वाईट. त्यानं काय काय युक्त्या करून तुला इथून घालवून दिलं! कां घालवून दिलं? सगळं कांहीं तुला सांगितलं, तर तुला तो आपला स्नेही नाहीं, एक राक्षसच होता असं समजून येईल. त्याची सगळी इच्छा, कीं आपण तुझ्या बायकोला फसवून कसें तरी न्यायची. तुझं लग्न झाल्यादिवसापासून त्याची इच्छा, कीं तूं बिऱ्हाड करून रहावंस, आणखी मग त्यानं कायमचं तुझ्या घरांत येऊन रहायचं. आणखी तसं...पण तें काम करायचं सांगून! तें त्याला साधलं नाहीं. मग त्यानं असं मनांत आणलं, कीं तुला मुंबईच्या बाहेरच नव्हे, तर अगदीं अगदीं लांब घालवून देऊन मग कांहीं तरी युक्ति करून तिला फसवुन आपलं काम साधलं तर पहायचं. त्यामुळं तर त्यानं तुझ्या मनांत मुंबई सोडून जाण्याचं भरवून दिलं, आणखी तुला रवानाही करून दिलं. तिकडे गेल्यानंतर तूं मेलास म्हणून खोटीच बातमी इथें पसरविली. त्या पाजीला कोणाच्याही अक्षरासारखं अक्षर काढायचं म्हणजे कांहींच वाटत नाहीं. तुझं बाळबोध अक्षर तर असं सफाईनं उठवून देतो कीं, कोणाची माय नाहीं त्याली हें तुझं अक्षर नाहीं असं म्हणायची—बॉय्! चा लायाक्या? कितने वखत् साब चा लानेकु बोला—( हें मधलेंच वाक्य आपल्या चहा करणाऱ्या पोऱ्याला उद्देशून होतें हें उघडच आहे.) सोन्या, यू गो ॲण्ड् आस्क् देंट् डेविल् टु ब्रिंग् टी. सोन्या, गो यू फूल. नाहीं तर तूंच करून आण."

प्रोफेसरसाहेबांची आज्ञा होतांच सोन्याजी धांवले. इकडे प्रोफेसर पुनः पश्चाकरास म्हणतात," इकडे पहा, मी सोन्याच्या देखत बोललों नाहीं. पण माझ्याजवळ जर तूं सगळं खरं सांगितलंस, तर तुझ्यावर कांहीं सुद्धां येणार नाहीं. राजारामानं अनेकांना बुडवून कांहीं नाहीं तरी दहा वीस हजारांची रक्कम जमविली आहे खास. त्यानं कुठें ठेविली आहे? मी विचारतों एवढ्याकारितां कीं, जर तुझ्याजवळ दिली असली किंवा कोणाजवळ दिली आहे हें ठाऊक असलं, तर फार छान होईल. पोलिसला सुगावा लागण्यापूर्वीं आपण त्याची वासलात लावून टाकूं. तूं अर्धं घे! मी अर्धं घेईन. म्हणजे तुला आतांच आपल्या लहानसा बंगला घेऊन गाडीघोडा ठेऊन आपल्या बायकोला घेऊन उत्तम सुधारकी थाटानं रहतां येईल. पाहिजे कशाला चाकरीचाकरी दुसरी कसली दगदग! कां, मी म्हणतों हें खरं कीं नाहीं? बोल. तो लेकाचा सोन्या येण्याच्या आंत बोललास, तर बरं होईल. मला आपलं असं वाटतं; कां वाटतं कोणाला ठाऊक? पण वाटतं खरं, कीं तूंन् मी मिळालों, तर पोलिसाला एक छदामसुद्धां मिळूं देणार नाहीं. अहो, त्या चोरांचा काय आहे संबंध? हे सरकारचा बडाबडा पगार घेऊन पुनः आणखी चोऱ्यामाऱ्या करून पैसे मारतात ते निराळेच! त्यापेक्षां आपणच कां नाहीं आपसांत लुंगावलं! त्यानं माझ्या मनांत इंग्लंडांत जायचं आहे कांहीं तरी डिग्रीबिग्री घ्यायला. निदान ब्यारिस्टर तरी होऊन यायला, तेंही साधेल, आणखी तुलाही अगदीं वाटेल तसं मजेशीर सुधारकी थाटानं रहायला सांपडले. ओ! इफ् यू बुड्ल् गिव्ह् मी ए शेअर, आय् शॅल्

म्यारी आ वुइडो. मी पक्का सुधारक आहे. कम्, तुझं आमचं कॉमन् कॉज् करूं. सांग, त्यानं तुझ्याजवळ ठेवलं आहे का? कुठें ठेवलं आहे तें तुला नुसतं ठाऊक आहे? जो तुझी बायको फसवून नेणार होता, त्याचा विश्वासघात करायला कांहीं हरकत नाहीं. अगदीं बिलकुल नाहीं. त्यानं तुझा कमी विश्वासघात केला ?..."

परंतु त्याचे ते शेवटले शब्द त्याच्या गळ्यांतच अर्धवट अडकले असतील नसतील तोंच पद्माकराच्या डोक्यांत एकदम काय आलें तें नकळे! एखादा हिंस्र प्राणी एकदम आपल्या भक्ष्यावर उडी मारतो, त्याप्रमाणें तो प्रोफेसर डयांडींचे अंगावर तुटून पडला. त्यांच्या गळ्यालाच त्यानें हात घातला आणि अत्यंत कठोर अशा आवाजानें त्यांस म्हणतो, " बोल, खरं बोल. तूं मघापासून जें सांगतो आहेस, आणखी तो तुझा सोन्या बकतो आहे, तें खरं का काय तें बोल. बोल. राजारामानं मला मुद्दाम इथून घालवून दिलान् ? त्यानंच सोन्याला माझ्या बायकोला आणायला पाठविलंन् ? ...... "

इतक्यांत सोन्या आंतून धांवत आला. पहातो तों पद्माकरानें आपल्या गुरुवर्यांचें मानगूट धरलें आहे, त्यांचे डोळे पांढरे झाले आहेत आणि पद्माकर त्यांस वरील प्रश्न अगदीं संतप्तवाणीनें विचारतो आहे ! तें पहातांच तो स्वतः पुढें झाला. त्यानें पद्माकराचा हात हिसकला आणि तोंडानें " हो हो. त्यानंच मला ग्रँटरोडवर पाठविलंन्, आणखी मी तुझ्याकडून तिला न्यायला आलों आहें असं सांगून आणखी एक तुझ्या सहीचं मला तिला दाखवायला पत्र दिलं होतं, तें दाखवून तिला घेऊन ये दादरास, म्हणून मला त्यानं सांगितलंन्, त्याप्रमाणं मीं केलं. तूं दादरास आहेस, आणखी आपण जातों आहों तें तुलाच भेटायला जातों आहोंत, अशाच समजुतीनं ती आली. राजारामाचीं इतकीं सगळीं कारस्थानं बाहेर पडलीं, तरी अजून तुला त्याचा विश्वास, आणखी आमचा नाहीं ! आणखी उलटा प्रोफेसरांना मारतोस ! शाबास ! शाबास ! " सोन्या हें इतक्या ऐटीनें म्हणाला, कीं पुसूं नये. पद्माकर अगदीं स्तब्धच झाला. त्याचा तो त्वेष—ज्या त्वेषानें तो प्रोफेसरांच्या अंगावर गेला होता तो त्वेष—अगदीं जागच्या जागींच जिरला.

इकडे प्रोफेसर डयांडी एखाद्या सर्पाच्या मुखांतून निघालेल्या बेडकाप्रमाणें अगदीं निचेष्ट असे एका कोचावर पडले होते. त्यांस काय बोलावें हें सुचेना. ज्या हेतूनें त्यांनीं पद्माकरास गांठून त्याला आपल्या या जागीं आणून एवढें बोलणें चालविलें होतें, तो हेतूच त्याच्या डोक्यांतून पार निघून गेला असावा असें दिसलें आणि ते त्यास बेड्यावांकड्या शिव्या देऊं व धमकीचीं बोलणीं बोलूं लागले. " मी पहा आतां सबलाइटला काय सांगतों तें. मी साफ सांगतों, कीं तूं त्याचा पक्का साथीदार असून तूं निकडून इथें आलास तो आपल्या भागीचे पैसे घेण्यासाठीं आलास. नाहीं तर सर्व पैसे घेऊन दोघेही यःपलाय करण्यासाठीं आलास. त्यानं आपला सगळा ऐवज तुझ्या स्वाधीन केला आहे यांत शंका नाहीं. तुला पकडून चांगली समज दिली, तर तें सगळं बाहेर पडेल. तूं पहिल्यापासूनच त्याचा साथीदार सगळ्या गोष्टींत. काय करायचं तें तूंच त्याला करायला सांगत असस. एक एकसुद्धां गोष्ट आतां मी बोलून टाकल्याखेरीज

राहणार नाहीं. खोस्यानाल्या वाटेल त्या गप्पा सांगेन. तुला एका बाजूला गांठून कांहीं तरी युक्ति करून तूं काय काय बोलतोस, काय काय सांगतोस तें रिपोर्ट कर म्हणून मला सर्चलाइटनेंच मुद्दाम सांगितलं. त्यावरून तर तुला मी गांठून इथें आणला. तूं नाहीं बोलत, तर मी वाटेल तें बनावट करीन, आणखी तें तूंच बोललास म्हणून सांगून देईन. मला काय आतां पर्वा आहे! राजारामानं तें सगळं तुझ्या स्वाधीन केलं आहे आणखी तूंच तें कुठें तरी लपवून ठेवलं आहेस, याबद्दल माझ्या मनाला तर शंका नाहीं. तूं विश्वासांत घेशील; तर मी असा रिपोर्ट करीन, कीं तुझ्याकडे कांहीं नाहीं. तूं अगदीं गरीब, सालस, पण तूं मला कांहीं एक न देतां एकटाच दाबून बसणार असलास, तर मग मीही पाहीन माझ्या हातून काय होतं आहे तें. माझ्या हातांत आज तुझी शेंडी आहे, काय सोन्या, आहे कीं नाहीं गुलामा? पहा, असं शहाणपणाचं काम करावं लागतं. सर्चलाइटचा विश्वास माझ्यावर पुरा आहे. आहे कीं नाहीं सांग सोन्या? सोन्या जाणून आहे, साहेब मला काय आणखी कसे वागवतात तें. अॅक्चुअलि एका टेबलावर बसून खाना खातोंना मी त्यांच्याबरोबर? आम्ही असे तुझ्यासारखे नुसते बोलके सुधारक नाहीं. आयू अॅम् आ पक्का रिफार्मर. पण त्याचं काय आतां? तूं आम्हांला पार्तीत घेणार काय? बोल. जर घेणार असलास, तर मी तुला या राजारामानं तुझ्याशीं कशी आतांपर्यंत वागणूक केली, आणखी कसा विश्वासघात केला, तें सगळं सांगून टाकीन, नाहीं तर वाटेल तें त्या साहेबाला सांगून, तो साहेब काय लेकाचा नंदीबैल आहे, त्याला जें सांगावं तें पटतं आहे, देईन त्याला वाटेल तें सांगून म्हणजे घालील तुझ्या हातापायांत शृंखळा आणखी देईल पाठवून अंदमानला. आणखी काय पाहिजे! मग जें राजारामाला साधलं नाहीं, तें कदाचित् मीच...पण तूं इतक्यापर्यंत गोष्टी कशाला जाऊं देतोस? टाक सांगून तुझ्या स्वाधीन असलं तर. मी एक शब्द सुद्धां त्या नंदीबैलाजवळ बोलणार नाहीं. परवां जसं तुझ्याबद्दल सांगितलं, तसंच सांगेन कीं तूं अगदीं इनोसेंट. तुला त्यांतली कांहींसुद्धां माहिती नाहीं. तूं इथें नव्हतास. तुझाच तो उलटा विश्वासघात करून सत्यनाश करीत होता. अरे आजकाल माझा शब्द म्हणजे नुसता गॉस्पेल आहेना त्या सर्चलाइटला! कारण काय? तर मी या सगळ्या लुच्चयांचीं, या राजारामाचं, या क्यांकवाल्यांचं, आणखी कितीकजणांचीं तरी बिंगं मीच बाहेर काढलींना? उगीच का त्यानं मला अडीचशें रुपयांची ही स्पेशल जागा डिटेक्टिव् ब्रांचमधें दिली! अगदीं मुकाट्यानं पगार मिळतो. बोलणं नाहीं, चालणं नाहीं, आणखी अशा माणसाला तूं गळा चेपून मारायला पहात होतास त्या तुला आतां काय म्हणावं! आपल्या हातीं जर सगळं असलं, तर तूं तरी कां उगीच मला ठकवायला पहातोस? तूं मला ठकवूं शकणार नाहीस. तेव्हां तुम्ही आम्ही भागी करून ताव मारावा तेंच बरं नाहीं का? तुझ्या मनाला जर असं वाटत असेल कीं, राजारामाचा आपण कसा विश्वासघात करावा, तो आपला स्नेही, तर ती मात्र अगदीं चूक आहे. तुझा विश्वासघात करून आपण त्या कमलेला कोठें तरी फसवून नेण्याचा त्याचा बेत तुझ्या लग्नाच्या दिवसापासू-

नचा. त्यांत शंका नाहीं. त्या कामांत मी त्याचा साथीदार. हा सोन्या त्याला मदत करणारा. या सोन्याला त्यानं त्या दिवशीं त्या कामगिरीबद्दल १०० रुपये कबूल केले होते. इतकंही करून आपल्याबद्दल मुळींसुद्धां तुला शंका येऊं नये, म्हणून त्या बिचाऱ्या तुझ्या प्रभाकराचं आणखी तुझं वैमनस्य पाडण्याचा त्यानं खटाटोप चालविला. इतक्या नीचपणाच्या गोष्टी ज्यानं केल्या, त्यानं तरी तुझ्याजवळ मोठ्या विश्वासानं ठेव म्हणून ठेवली तर ती आपण कां गट्ट करूं नये ! त्यांत कांहीं सुद्धां वावगं नाहीं. तूं एक गट्ट केली नाहींस, म्हणून ती कांहीं आतां राजारामाला का मिळणार आहे ? तो आतां चालला अंदमानला. आणखी पोलिस मधल्यामध्यें सगळा ऐवज आयताच गट्ट करील. त्यापेक्षां इतके दिवस तुला त्रास झाला, याबद्दल नुकसानीची रकम म्हणून कां नाहीं मारीत ? मी तुला त्यांत मदत करतों. हा सोन्या आहे. मी त्याच्यापासून लपवायला पहात होतों, पण आतां नाहीं लपवीत. तो आपल्यांतलाच आहे. तीन वांटे करूं. त्याला एक, तुला एक, मला एक...... ''

बिचारा पद्माकर ती सर्व चर्पटपंजरी अगदीं स्वस्थपणें ऐकून घेत होता. ज्या ज्या वेळीं " राजारामानं तुझा विश्वासघात केला, " अशा अर्थाचें कांहीं भाषण येई, तेव्हां मात्र त्याचें चित्त तिकडे अगदीं आकृष्ट होई. एकंदरीत आपल्या हातून ही सर्व चुकीच झाली काय ? आपण आजपर्यंत आपल्या स्वतःला दुःखी करून घेतलें त्याचें कारण आपल्याच ठिकाणीं काय ? आपली बायको दादरास त्या रात्रीं आली ती आपण तिला तेथें बोलाविलें अशा समजुतीनें आली काय ! ती खरोखरीच निष्कलंक असून आपण तिला दूषित समजून तिच्यापासून दूरदूर पळत होतों काय ? हे दोघे पाजी जें काय बोलतात, त्यांत सत्याचा अंश कधीं नसतो; परंतु आजच्या या भाषणांत आहे काय ? आपण त्या मठांत गेलों असतां आपल्या वडिलांनीं एकदम आपल्या बायकोला ' रत्न ' म्हटलें व आपण तिला कुलटा म्हटल्याकारणानें त्यांस संताप येऊन त्या संतापाच्या जोरानेंच त्यांची वाणी परत आली, तो त्यांना तिचा निष्कलंकपणा पूर्ण माहिती म्हणूनच काय ? त्याचप्रमाणें त्या मठांतल्या बाईला आपण " तर मग असलीं माणसं तुमच्या या मठांत कां येतात ? " असें विचारलें असतां " कारण तीं ज्यांना प्राप्त होतात, त्यांना त्यांची योग्यता कळत नाहीं. " असें उत्तर आलें, तेंही तिच्या शुद्ध वृत्तीमुळेंच काय ? असे प्रश्नांवर प्रश्न त्याच्या मनांत उद्भवून त्याचें मनोद्वार बाकी सर्व विचारांना अगदीं बंद झालें. ते दोघे काय बडबडत होते तें त्यास बिलकुल समजत नव्हतें म्हटलें तरी चालेल. दुसऱ्या एखाद्या वेळीं प्रोफेसर ड्यांडीनें त्याला जर असें तुरें करून संबोधलें असतें, तर त्यानें त्याचें कानशीलच झणझणावलें असतें. परंतु आतां दुसरें कांहीं त्यास दिसत नव्हतें. त्याची ती निष्कलंक पत्नी जणुं काय त्याच्याकडे दीन मुद्रेनें ' मला व आपल्या स्वतःला विनाकारण अशा विपत्तींत कोणीं घातलं ? ' असें विचारीत आहे व आपणाजवळ त्या प्रश्नास उत्तर देण्यास कांहीं नसून आपण केवळ शून्य चित्तानें व शून्य दृष्टीनें खालीं पहात आहोंत असेंच त्यास वाटलें.

# प्रकरण ८५ वें.

## पद्माकर आणि प्रभाकर.



परंतु दोघांचीही इच्छा अशी दिसली कीं, दुसरा जर बोलेल, तर आपण बोलावें. या विचाराप्रमाणें ते दोघेही कांहीं वेळ—सुमारें मिनिटभरच—आपापल्या जागीं थबकले. दुसरा आपल्याकडे पहात नसेल, अशा समजुतीनें एकानें दुसऱ्याकडे पहावें आणि दुसऱ्यानें पहिल्याकडे पहावें, असें झालें. बोलावें असें दोघांच्याही मनांत, परंतु आधीं कोणीं सुरुवात करावी, एवढाच काय तो प्रश्न होता. अशा स्थितींत प्रभाकराचे मनांत एकदम कांहीं विचार आला. त्यानें एकवार कपाळावरून हात फिरविला आणि तो एकदम पुढें होऊन पद्माकराजवळ गेला. पण एकदम बोलावें कीं नाहीं, असा विचार त्याच्या मनांत पुनः क्षणमात्र उद्भवला आणि लागलीच पुढच्या क्षणीं त्यानें तो विचार जेथल्या तेथें दाबून पद्माकरास म्हटलें, "आपल्याला माझ्याशीं बोलणंसुद्धां अप्रिय आहे हें मला ठाऊक आहे, पण मला कांहीं फार महत्त्वाची गोष्ट विचारायची आहे. हरकत नसली, तर माझ्याबरोबर या पलीकडल्या रस्त्यानं ब्याकबेवर चला. आपल्या बोलण्यापासून झाला तर फायदाच होईल. नुकसान कांहीं सुद्धां होणार नाहीं." इतकें बोलून प्रभाकर थबकला. त्यानें आपल्या जुन्या मित्राच्या तोंडाकडे पाहिलेंसुद्धां नाहीं. आपलें बोलणें त्यास न रुचून कदाचित् तो कपाळास आंठ्या घालून आपल्याकडे तिरसटपणानें पाहील आणि मग आपल्यास आपण त्याच्याशीं बोलावयाला गेल्याबद्दल पश्चात्ताप होईल, नव्हे अत्यंत खेद होईल, तें उपयोगी नाहीं. असें वाटूनच त्यानें आपली दृष्टि अन्यत्र फिरविली.

पद्माकरानें तें ताडलें असावें. एक क्षणभरच—अगदीं एकच क्षण—त्यानें विचार केला, नंतर आपणच होऊन प्रभाकराच्या खांद्यावर हात ठेवला आणि न बोलतांच आपण तूं नेशील तिकडे येण्याला तयार आहोंत, असें दर्शविलें.

प्रभाकरास त्या त्याच्या वर्तनामुळें आश्चर्य वाटलें, फारच आश्चर्य वाटलें. कांहीं तरी कठोर व मर्मभेदक असें उत्तर आपल्यास मिळेल, अशी त्याची अपेक्षा होती. परंतु ती अगदीं चुकली आणि आतां विलंब करतां उपयोगी नाहीं, असें मनांत आणून त्यानें तेथून ब्याकबेला जाणारा रस्ता धरला.

वाटेनें जातांना दोघेही अगदीं मुकाट्यानें चालले होते. मधूनमधून दुसऱ्याच्या मनांत काय चाललें असावें तें जाणण्यासाठीं एकानें दुसऱ्याच्या चर्येकडे पहावें

आणि आपण पहातों आहोंत असें त्याच्या निदर्शनास येतेंसें वाटलें, कीं पटकन् दुसरीकडे दृष्टि फिरवावी, असें एकसारखें चाललें होतें. जातांजातां तें धक्क्यावर आले, आणि बराच वेळ तेथून जाणाऱ्या पायवाटेनें वर चालून जाऊन एका ठिकाणीं दगडांच्या राशीवर जाऊन बसले.

प्रभाकर आपल्या खिशांत हात घाली, पुनः काढी, पुनः घाली, पुनः काढी. प्रभाकर आतां काय बोलणार, याच्याबद्दल पद्माकराच्या मनांत नानाप्रकारचे तर्कवितर्क चालले होते, आणि आपण आतां जें बोलणार आहों, तें ऐकल्याबरोबर पद्माकर आपल्यास काय म्हणेल, नीटपणें उत्तर देईल कीं आणखी कांहीं विचित्र वर्तन करील, याबद्दल प्रभाकराचेही तर्कवितर्क सुरू होते. दोघेही तेथें बसले. ते कांहीं मिनिटें अगदीं स्तब्ध बसले. मात्र प्रभाकर आपल्या खिशांत हात घालून कांहीं तरी जिन्नस काढूं कीं नको, काढूं कीं नको या विचारांत असावा, असें दिसलें. शेवटीं त्यानें आपल्या मनाचा कांहीं तरी पक्का निश्चय केला व तो एकदम पद्माकरास म्हणतो, " मी काय बोलणार, हें बहुतकरून आपल्याला रुचणार नाहीं हें मी जाणून आहें; पण मी आतां अगदीं नाइलाजास्तव बोलण्याचा निश्चय करून तुमच्याजवळ आलों आहें. मजजवळ कांहीं पत्रं आहेत, तीं मला कशीं मिळालीं, कुठून मिळालीं याबद्दल आपण तेव्हांच तर्क कराल; पण तीं कां मिळालीं याबद्दल कुतर्क न करतां तीं पत्रं पाहून घेऊन तीं कोणाचीं आहेत, एवढं आपल्याला समजलं तर पाहून मला सांगा. त्यापासून कांहीं तरी चांगलंच होणार आहे, असं वाटून, तुमच्या मनांत माझ्याविषयीं द्वेष आहे हें पक्केपणें जाणून मी आपण होऊन बोलायला आलों आहें, तर कृपा करून एवढीं पहा. दाखवूं का नको, दाखवूं का नको, याबद्दल विचार माझ्या मनांत चालला होता, पण शेवटीं दाखवावीं असा निश्चय करून, आपल्याशीं बोलण्याचं धारिष्ट केलं. आतां काय होईल तें होईल..." असें तोंडानें म्हणतां म्हणतांच त्यानें खिशांतील तें पुडकें बाहेर काढलें. दहा पांच पत्रें कांहीं पेन्सिलीनें, कांहीं शाईनें अशीं लिहिलेलीं त्या पुडक्यांत होतीं. प्रभाकरानें तें पुडकें सोडूनच पद्माकरास दिलें. पद्माकरानें अगदीं थरथरणाऱ्या हातानें तें घेतलें आणि त्यांपैकीं एक उलगडून पाहिलें, दुसरें पाहिलें, तिसरें पाहिलें. तीं पहातांच त्याच्या सर्वांगास जणूं काय कांपरें भरल्याप्रमाणेंच झालें. ओंठ तर फार थरथरूं लागले. तें अक्षर पाहिल्याबरोबर आणि त्या पत्रांतील मजकूर वाचण्याबरोबरच त्याला जणूं काय फार संताप आल्याप्रमाणें झालें. सर्वांगास घाम सुटला, आणि आणखी एक पत्र घेऊन त्यानें पाहिलें, तों तेंही अगदीं हुबेहुब आपणच लिहिल्याप्रमाणें दिसलें. तेव्हां पुनः स्वारीला अगदीं दचकल्याप्रमाणें झालें, आणि एकदम त्यानें वर पाहिलें. प्रभाकराची दृष्टि त्याजकडेच होती, परंतु ही स्वारी वर पहाते आहे, असें पहातांच त्यानें आपलें तोंड समुद्राकडे केलें. पद्माकरास तें त्याचें मुद्दाम तोंड फिरविणें समजलें नाहीं असें नाहीं, समजलें आणि आपल्याच मूर्खपणामुळें यानें हें असें केलें असावें असेंही पण त्याच्या मनास वाटलें. क्षणमात्र त्यानें प्रभाकराकडे पाहिलें आणि एकदम त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. त्याच्या

मनांत काय काय विचारांचें तुमुल युद्ध चाललें असेल, तें त्याचें त्यालाच ठाऊक. पुनः त्यानें त्या पुडक्यांतून आणखी एक पत्र काढलें तों तेंही त्याच अक्षराचें. तें अक्षर इतकें त्याच्या स्वतःच्या अक्षरासारखें होतें कीं, आंतील मजकूर न वाचतां नुसतें दुरून जर पाहिलें असतें तर त्यानें तें लिहिलें आपणच असें शपथेवरसुद्धां सांगितलें असतें. परंतु त्यांतील मजकूर इतका चमत्कारिक होता, कीं तो मजकूर आपण लिहिला नाहीं, अशी त्याच्या मनाची अगदीं पक्कीच खात्री झाली. शेवटीं एक दोन पत्रें पाहून व वाचून तर त्याचें चित्त आश्चर्य व खेद यांनीं अगदीं नुसतें भरून गेलें. हें आहे तरी काय ? असें मात्र त्याला आतां वाटण्याचें कारण नव्हतें. कारण प्रोफेसर ड्यांडी व सोन्याबापू या दोघांच्या भाषणसभारंभांत ज्या कित्येक गोष्टी बाहेर पडल्या, त्या गोष्टींशीं या पत्रांचा संबंध होता. किंबहुना प्रोफेसर ड्यांडी व सोन्या यांनीं ज्या कित्येक पत्रांचा आपल्या भाषणांत उल्लेख केला, तीं पत्रेंच हीं असावींत असेंही पण त्यास दिसून आलें असावें. अर्थातच राजारामानें असलीं खोटीं पत्रें लिहिलीं असें कळावयाला आणि तें कळल्यापासून थोड्याच अवकाशाचे आंत तीं किंवा त्यांतलीं कांहीं पत्रें आपल्या नजरेस पडावयाला एकच गांठ पडावी हें त्यास मोठें विलक्षण वाटलें असावें, असेंही दिसलें.

पद्माकराची आतां खात्री झाली, कीं आपण अतिशय मोठ्या भुरळींत पडून भलतींच कृत्यें करण्याच्या भानगडींत पडलों. त्यामुळें आपण आपल्या सुखांत माती कालवून घेतली. हीं पत्रें आपल्या अक्षराप्रमाणें अक्षर काढून राजारामानेंच खचित लिहिलीं. आणि एकीकडे आपणास अत्यंत मित्रभाव दाखवून दुसरीकडे आपला अशा तऱ्हेनें गळा कापण्याचा त्यानें खटाटोप चालविला होता. या खटाटोपामुळें आपण फसलों आणि येथून चालते झालों. सूर्यप्रकाश पडला, म्हणजे सृष्टीवरील अंधकारपटल ज्याप्रमाणें दूर होत जातें, आणि कानाकोंपऱ्यांत सुद्धां थोडाबहुत प्रकाश पोहोंचतो, त्याचप्रमाणें एकदां हा नवीन प्रकाश त्याच्या मनःसृष्टीवर पडण्याबरोबर त्याच्या मनांतील सर्व संशयांधकार जणूं काय नष्ट होत चालला. आपल्याला यानें मुंबई सोडण्याच्या कामीं इतकी जबर मदत कां केली, कोणीकडच्या कोणीकडे दूरदेशीं आपल्याला पाठवून इकडे हे असले नीच धंदे कसे सुरू केले, आणि आपण येथें आल्यावरही आपल्याशीं किती लबाड्या केल्या, आपल्याला किती प्रकारच्या थापा मारल्या, प्रभाकराविषयीं भलभलतें काय सांगितलें, तें सर्व मनांत येऊन त्यास परम खेद झाला. आतां आपणच आपल्या इतके दिवसांच्या दुःखास कारण झालों होतों, याबद्दल त्याला जणूं काय रेंसभरही शंका राहिली नाहीं. सर्व पत्रें त्यानें पाहिलीं, कित्येक पत्रें दोनदोनदां, तीनतीनदां वाचून पाहिलीं आणि शेवटीं सुसकारा टाकून तो खालीं पडत बसला! इतक्यांत त्यास पुनः काय आठवण झाली, म्हणून त्यानें तीं पत्रें पुनः पाहिलीं आणि एक विवक्षित पत्र त्यांतून निवडून घेऊन आपल्याशींच सुमारें चार वेळ वाचलें. नंतर एकवार मान हालविली आणि मोठा सुसकारा टाकून आपल्याशींच म्हणतो, "एकूण मीच मूर्ख, मीच पापी, मीच साऱ्या अनर्थाला कारण."

इतकें आपल्या अंतःकरणांत उद्गारून तो उघडपणें आपल्या पूर्व मित्रास म्हणतो, "प्रभाकर–मीं तुला पूर्वीप्रमाणं आतां मित्रत्वाच्या नात्यानं एकेरी बोलणं रास्त नाहीं, पण मला त्याबद्दल क्षमा कर. मीं तुझ्यासंबंधानं किती नीचपणाचं वर्तन केलं आहे, त्याची माहिती तुला नाहीं. आणखी ती कधीं तुला होऊंही नये. जी गोष्ट झाली, ती झाली. त्याबद्दल मीं आतां खरोखर महाप्रायश्चित्तच घेतलं पाहिजे. माझ्याइतका पढतमूर्ख माझा मीच. मला दुसरा जोड मिळणारच नाहीं. विचारव्यवहार कसा तो माझ्या गांवींही नाहीं. ज्या कल्पनेनं आणखी ज्या विचारानं माझं अंतःकरण व्याप्त असेल त्या वेळीं त्या विचाराचं व कल्पनेचं माझ्यावर वर्चस्व. मीं त्यांच्या सर्वस्वी आधीन. त्यांच्यामुळं मी डोळे असून आंधळा होतों. हा एक मला रोगच जडला आहे. मला वाटतं ह्या रोगाला मी बळी पडणार यांत शंका नाहीं. पण बळी पडेन तेव्हां पडेन; तोंपर्यंत तरी आतां मीं आपलं हें कृष्णवदन कोणाच्या नजरेस पडूं देऊं नये तें चांगलं, असं मला वाटतं. तर आतां...... "

पद्माकर हें बोलणें बोलत असतां त्याच्या दोनही डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या आणि शेवटीं तर त्याचा कंठ इतका सद्गदित झाला, कीं आणखी एक सुद्धां शब्द त्याच्यानें उच्चारवेना. त्याचें अंतःकरण अत्यंत सद्गदित झालें. अशा विलक्षण स्थितींत आतां आपण कोणालाही काय, कसें तोंड दाखवावें, जिला सगळ्या जगानें नांवें ठेवावीं, आणि आपण जिची किंमत जाणून जिला खुश यावें, तिला आपण कुलटा या अत्यंत निंद्य विशेषणानें दूषित केलें आणि बाकी पुष्कळ मंडळी तिची स्तुति करीत आहेत, तेव्हां आपल्या दृष्टीवर केवढी थोरली तरी ही भूल पडली होती ! असें वारंवार मनांत येऊन तो अगदीं रडकुंडीस येई.

मनुष्याची प्रवृत्ति, त्यांतूनही पद्माकरासारख्या विकारमय स्वभावाच्या मनुष्याची प्रवृत्ति, नेहमीं कोणत्या तरी एका बाजूस वहावते. मग त्याला कांहीं सुमारच नाहीं. पद्माकराच्या प्रवृत्तीला आतां उलट बाजूचें वळण लागलें. आपल्या अत्यंत शुद्ध व सरळ बायकोला आपण विनाकारण छळलें. असें त्याच्या मनानें पक्के घेतलें. त्यानें तीं पत्रें पुनःपुनः पाहिलीं. पुनःपुनः त्या आपल्या मित्राकडे पाहिलें. म्हणे काय आपण अशा मित्राबद्दल काय काय विनाकारण संशय घेतले. त्या वेळीं आपली अक्कल कोठें गेली होती ! असें मनांत येऊन त्याचें अंतःकरण त्यास आतां टोंचूं लागलें ! शेवटीं त्यानें आपल्या दोन्ही हातांचीं कोंपरें आपल्या दोन्ही गुडघ्यांवर ठेवून व दोन्ही पंजे हनुवटीखालून दोन्ही गालांवर ठेवून स्वारी खालीं पहात बसली. त्याच्या त्या बोलण्यावर उत्तर काय द्यावें हेंच प्रभाकरास समजेना. तो अगदीं स्तब्ध बसला. आपल्याविषयीं आपल्या मित्राच्या मनांत कांहीं तरी काळें आलें आहे, हें त्यास समजून चुकलें होतें; परंतु तें काळें कशाबद्दल आहे, याचा त्यास पुरासा छडा लागला नव्हता. यामुळें त्याला पद्माकराच्या त्या बोलण्याचें तितकें महत्त्व समजलें नाहीं. आपल्याशीं इतके दिवस अगदीं परक्याप्रमाणें वर्तन केल्यामुळेंच त्याला आतां वाईट वाटलें असावें, आणि आतां

त्या सगळ्या गैरसमजांचा निरास झाल्यामुळें आपल्याशींच इतके दिवस परकेपणाचें वर्तन केल्याचेंही वाईट वाटलें असावें, ह्मणून तो असें बोलला असें मनांत येऊन तो पद्माकरास म्हणतो, " मला तूं पूर्वीप्रमाणं भरे तुरे म्हणशील तरच त्यांत आनंद आहे. या राजारामाच्या कृत्यांनीं तूंचमा काय, पुष्कळ लोक फसले आहेत. तेव्हां त्याच्याबद्दल काय विचार करायचा आहे? मीं तुला पत्रं दाखविलीं, तीं तुला दाखवायच्या हेतूनं आणलींच नव्हतीं. या पत्रांमुळं कमळा केवळ फसून घर सोडून गेली आणि फशी पडली. नंतर एकदम परत घरीं येण्याला तिला लाज वाटूं लागली व मध्यंतरीं त्या मठांत दादासाहेबांकरितां राहण्याचंही कारण झालं, त्यामुळं तिनं तिथेंच राहण्याचा निश्चय केला. पण मीं तिचा सुगावा काढून तिला भेटून तिच्यापासून सगळ्या गोष्टी काढून घेण्यासाठीं नानाप्रकारं तिचीं आर्जवं केलीं तेव्हां शेवटीं तिनं मला आपली हकीकत सांगितली. तुला पाहिल्यानंतर त्यांतलीं कांहीं पत्रं तिला आलीं, त्या पत्रांत बापाला नकळत येण्याबद्दल तिला बजावून बजावून सांगितलं असल्यामुळं तिनं मागलापुढला विचार न करतां दादराचा रस्ता धरला. तीं सगळीं पत्रं, कांहीं तिच्यापासून मीं घेतलीं, कांहीं तिनं घरींच कुठें ठेविलीं होतीं तीं विचारून शोधून काढून तिला दाखवून बळवंतरावांना दाखविण्याबद्दल तिची संमति घेऊन बळवंतरावांकडे चाललों होतों. ते थोडे आजारी आहेत, तर त्यांना हीं दाखवून आपली मुलगी केवळ धुतल्या मोत्याप्रमाणं अंतर्बाह्य निर्मल आहे असं वाटलं, ह्मणजे ते स्वतःच तिच्याकडं जाऊन तिला घेऊन येतील, आणि ते लवकर बरेही होतील. अशा समजुतीनं मी त्यांच्याकडं चाललों होतों. तों वाटेंत तुला पाहिलं, आणि एकाएकीं असं वाटलं, कीं तुलाही तीं दाखविलीं, तर कदाचित् तुझ्याही मनाची तळमळ नाहींशी होऊन तूंही बळवंतरावांप्रमाणं......

परंतु प्रभाकरानं पुढले शब्द उच्चारले नाहींत. तोंडांतल्या तोंडांतच ते राहूं दिले. त्याच्या मनांत काय आलें कोणास ठाऊक! पद्माकर त्याचें बोलणें शांतपणें ऐकत होता. निदान बाह्यतः तरी तो या वेळीं अगदीं शांत दिसला. मग त्याच्या मनांत विचारांचें काय काहूर माजलें असेल तें असो. तो किती वेळ तरी कांहीं एक बोलला नाहीं, परंतु शेवटीं आपणच त्यास ह्मणतो, " प्रभाकर, मी या पाजीच्या तावडींत सांपडून केवळ गाढव बनलों ही गोष्ट अगदीं खरी. आज सकाळपासून माझ्या मनावरला अंधकार एकसारखा नाहींसा होतो आहे. दुष्यंतानं झटल्याप्रमाणं, साप म्हणून सुंदर पुष्पमाला दूर झुगारून देणाऱ्या आंधळ्याप्रमाणंच माझं वर्तन झालं, त्याबद्दल मला आतां मुळींच शंका नाहीं. आतां पुन्हां कोणाला हें तोंड दाखवूं नये असंच मला वाटूं लागलं आहे. आणखी मी आतां तसं करीनही. या राजारामाचा खटला एकदां होऊन गेला, ह्मणजे मी पुनः आपलं तोंड काळं करीन. मीं आजच केलं असतं; पण आज तसं केलं, तर लोकांना खास असं वाटेल, कीं या राजारामाच्या आणखी त्याच्या साथीदारांच्या दुष्कृत्यांत मी मोठा थोरला साथीदार होतों. तेव्हां त्या कामांत तरी निदान आपला माथा मला उजळ करून घेतला पाहिजे.

त्याप्रमाणं मी शेवटपर्यंत सगळं करून नंतर कृतकर्माबद्दल प्रायश्चित्त घेईन. तें प्रायश्चित्त ह्मणजे असं तसं नाहीं, तर..."

प्रभाकर त्यास मध्येंच ह्मणतो, "तें खरं, पण तूं जें प्रायश्चित्त घेणार ह्मणतोस तसं जर प्रायश्चित्त तूं घेतलंस तर दुसऱ्याही लोकांना तें प्रायश्चित्त भोंवेल याचा कांहीं विचार? म्हणजे जें पातक केलंस त्यामुळंही त्यांना दुःख भोगावं लागलं, आणखी तें पातक केल्याबद्दल प्रायश्चित्त म्हणून जें तूं करणार त्याच्याहीमुळं त्यांना दुःख भोगायला तूं लावणार. असंच कीं नाहीं त्यापासून होणार!" प्रभाकर हळू हळू पद्माकराशीं बोलण्यांत धीटपणा करूं लागला होता. आतां याच्या मनाची अशी स्थिति आहे, कीं आपण कांहीं कसेंही बोललों, तरी कांहीं त्याला राग येणार नाहीं, अशी त्याला खात्री वाटूं लागली होती. वरील वाक्यें उच्चारतांउच्चारतां त्यानें आपले नेत्र पद्माकराच्या चेहऱ्याकडे लावून दिले होते. आपल्या बोलण्यांतल्या प्रत्येक शब्दाचा त्याच्या मनावर काय परिणाम होतो, हें आपल्यास तावडतोब समजावें एवढ्याच हेतूनें त्यानें आपली दृष्टि तशी लाविली होती, तें त्याचें बोलणें ऐकून प्रभाकर प्रथम कांहीं बोलला नाहीं. परंतु त्या बोलण्यानें त्याच्या मनावर कांहीं परिणाम झाला हें खचित. आपण पातक केल्याबद्दल जें प्रायश्चित्त घेणार, तें प्रायश्चित्त दुसऱ्यास तापप्रद होणार, हें त्याच्या लक्ष्यांत आलें. परंतु त्यानें त्यावर कांहीं प्रत्युत्तर केलें नाहीं. तो पुनः पुनः आपला त्या पत्रांकडे पहात होता. सकाळपासून एकएक प्रसंग असे येत चालले, कीं त्यास भुकेतहानेचीसुद्धां शुद्धि राहिली नाहीं. सकाळपासून एक एक गोष्टी एकामागून एक घडून आल्या. त्यांचें वरील संभाषण चाललें आहे, तों आणखी एक विलक्षण गोष्ट घडून आली. ती अशी कीं, हे दोघे असेच एकमेकांकडे मधूनमधून पहात व मधूनमधून दुसरीकडे पहात बसले असतां एक पोलिस ऑफिसर, दोन पोलिस शिपाई व त्यांचेबरोबर एक माणूस, अशी चौकडी एकदम ते जेथें बसले होते तेथें आली. दोघेही आपल्या विचारतरंगांत गुंग असतां त्यांना त्यांची चाहूल अगदीं जवळ येऊन उभे राहीपर्यंत कांहीं समजली नाहीं. पण चाहूल लागतांच दोघेही वर पहातात तों तो गृहस्थ कोण? **राजाराम!**

# प्रकरण ८६ वें.

## पद्माकर.



मनुष्य आपणच आपला शत्रु आणि आपणच आपला मित्र होतो. याचा अनुभव जणुं काय त्यास त्या वेळीं येत होता. आपण दूरदेशीं गेलों, त्या वेळीं आपल्याला राजारामानें भर दिला, आपली स्त्री आपल्याविषयीं यत्किंचित्सुद्धां काळजी घेत नाहीं, तिला आपली पर्वा नाहीं, तिचें सर्व चित्त प्रभाकरावर आहे, अशी आपली समजूत दृढ करून देण्यास त्यानें कधीं संधि वायां जाऊं दिली नाहीं, त्याचें कारण एकूण राजारामाची असली दुष्ट बुद्धि होती काय? असे प्रश्न त्याच्या मनांत आतां एकामागून एक उभे राहिले. ही वेळ अंतःकरणाच्या शोधनाची होती. अमुक वेळीं आपणास अशी अशी शंका आली ती आपल्या मनांत उद्भवण्याला कारण काय झालें? असा प्रश्न त्याच्या मनांत उद्भवला, कीं त्यास लागलीच राजारामानें अमुक अमुक गोष्ट आपणास अशी अशी भासविली आणि ती तशी भासावी ह्मणून त्यानें असें असें भाषण केलें, असें त्यास आठवून आपला त्या वेळीं त्या सर्व गोष्टींवर भरंवसा ठेवण्यांत केवळ मूर्खपणा झाला, असेंही मनांत येऊं लागलें. आतांपर्यंत राजारामाच्या ज्या भाषणांचा व कृतींचा त्यास कांहीं विवक्षित अर्थ वाटत होता, त्याच भाषणांचा व त्या कृतींचा अंतस्थ हेतु अगदीं भिन्न व दुष्टपणाचा होता, असें त्यास दिसूं लागलें. जें आपण अमृत ह्मणून प्यालों, तें केवळ विष होतें व जें विष ह्मणून आपण टाकलें, तें खरोखर अमृत होतें, असें त्यास आतां वाटूं लागलें. आपल्या त्या वेळच्या सर्व विचारांचें व आचरणाचें त्यानें मनांत पृथक्करण चालविलें—नव्हे, ज्याप्रमाणें जलाचे घटकावयव काय आहेत तें पहाण्याकरितां एकदां यंत्रसामग्री सिद्ध करून विद्युत्प्रयोग सुरू झाला, कीं आपोआप त्या पाण्याचे घटकावयव भिन्न भिन्न होऊं लागतात, त्याचप्रमाणें आतां त्याच्या विचक्षण बुद्धीचा प्रयोग सुरू होतांच आतां मागील सर्व कृतींच्या मुळारंभीं असलेल्या सर्व घटकावयवांचा स्फोट होऊं लागला; इतकेंच नव्हे तर त्यांचें त्यास चांगलें ज्ञान होऊं लागलें! त्यानें कितीं वेळां तरी उसासे टाकले, कितीं वेळां तरी आपल्या भुंवया वर चढविल्या व कितीं वेळां तरी एखाद्या गोष्टीचा उलगडा होत नाहींसें वाटून कपाळास आंठ्या घालून आपलें कपाळ दोनही हातांत दाबून धरलें. जणूं काय आतां झालेली ही जागृति तरी आपल्या मस्तकांतून निघून जाऊन पुनः आपण भलत्यासलत्या शंकांच्या स्वाधीन सांपडूं नये, अशा उत्कट इच्छेनेंच तो त्याप्रमाणें मस्तक दाबून धरीत होता.

अंतःसंशोधनानें त्याच्या नेत्रांवरलें बरें-चसें पटल दूर झालें, तथापि आपल्याला जीं आपल्या बायकोला पाठविलेलीं म्हणून प्रभाकराचीं पत्रें दुरदेशीं राजारामानें पाठविलीं, तींही खरोखर राजारामानेंच बनावट केलीं होतीं काय ? प्रभाकराचें अक्षर आपल्या पक्कें ओळखीचें आणि राजारामाकडून जीं त्यानें पकडलेलीं प्रभाकराचीं म्हणून पत्रें आलीं, तीं त्याच्या हातचींच होतीं कीं नाहीं याबद्दल आपल्याला शंका सुद्धां येऊं नये. हें कसें ? राजाराम दोन दोन चार चार माणसांचीं अक्षरें हुबेहुब काढूं शकतो कीं काय ? तो इतका बिलंद आहे कीं काय ? असे त्याच्या मनांत प्रश्न उत्पन्न होऊन तो अगदीं बुचकळ्यांत पडला होता. त्यास कांहीं सुचेना. दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं डयांडी व सोन्या यांनीं त्याला रस्त्यांत हांका मारल्या असत्या, तर त्यानें त्यांच्या हांकांस प्रत्युत्तर दिलें नसतें. यदाकदाचित् प्रत्युत्तर दिलें असतें, तरी तो त्यांच्या बोलावण्यावरून त्यांच्याबरोबर कधीं गेला नसता. कदाचित् गेला असता, तरी पांच मिनिटांच्यावर कधीं सुद्धां बसला नसता. परंतु आतां तो इतका सर्वथैव दुर्बल झाला होता, कीं त्यास कांहीं सुद्धां सुचत नव्हतें. तेथून उठून जाण्याचेंसुद्धां त्याच्या मनांत येईना. जेवणाची वेळ होऊन कितीतरी उशीर झाला होता, परंतु त्यास तहानभूक कांहीं सुद्धां आज नाहींसें झालें होतें. जणूं काय तहानभूक हे विकारच अस्तित्वांत नाहींत अशीच त्याची स्थिति झाली होती ! तेथून निघून जाण्यास जर दुसरें कांहीं कारण न होतें, तर तो त्या दिवशीं तसाच तेथें बसून रहाता. परंतु नितक्यांत सोन्या त्यास म्हणतो:

"मग काय, पद्माकरपंत, टाकतांना सगळं सांगून ? अहो, तुमचं तरी काय जातं ? असला नीच माणूस जर आयता मरतो आहे, तर त्याला लवकर मारायला आणखी आपला तळीराम गार करायला आपण तरी काय म्हणून मदत करूं नये ? द्या सांगून झालं, काय असेल तुम्हांला ठाऊक तें ! आणा, चला आणा कुठें असेल तें. घेऊं वांटून तिघे !"

"मला कांहीं सुद्धां माहिती नाहीं बोआ त्याची. मला नशी त्याची माहिती असती, तर मी त्याचा स्नेह केला तरी असता कशाला ?" पद्माकर अगदीं शांतपणें म्हणाला.

"ए: यांत काय अर्थ आहे, पंत ? तुम्हांला त्याची एकंदर माहिती नाहीं का ? हें संभवतं तरी बरं ? नाही पण तुम्हीच सांगा, कीं हें संभवतं तरी का ? तुम्हांला वाटत असेल, कीं आपल्याला माहिती आहे म्हटलं, कीं आपलीं बिंगं बाहेर पडतील; पण त्याची तुम्हांला भीति नको. अगदीं सुद्धां नको. तें अगदीं पोलीस कमिशनरापर्यंत जाऊन ठरलं आहे, कीं प्रोफेसर डयांडी ज्याला सोडा म्हणतील, त्याला कांहीं धरायचा नाहीं. आपला सोडून द्यायचा..........."

प्रोफेसरसाहेब मध्येंच म्हणतात, "अरे चापरे, हें असं कमिशनरसाहेबांकडून कबूल करून घ्यायला किती वेळ आणखी किती खटपट करावी लागली म्हणतो ! कमिशनरसाहेब ऐकत नव्हता, तो म्हणे कोणाला सोडून द्यायचं आणखी कोणाला नाहीं, हें मी ठरवीन. मीं म्हटलं तें तुझं बोलणं चालायचं नाहीं. मी ठरवीन आणखी तुला सांगेन. त्याप्रमाणं करशील, तरच या महत्त्वाच्या खटल्यांत मी तुला मदत करीन,

तो कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं हें आपलं भांडण आपापसांत तुटायचं नाहीं, तेव्हां आपण कोणा तरी मोठ्या माणसाकडे तोडायला नेऊं असं त्यानंच ह्मटलं. इतक्यांत गव्हर्नरचे सिनिअर कौंसिलर आपल्या फेटनींत बसून त्याच्या बंगल्यावरून जात होते, त्यांच्याकडे सहज माझी नजर गेली, (आम्ही खिडकीपाशीं बसलों होतों) त्यांची मजकडे गेली. त्यांनीं मला हात वर करून सलाम केला. मीं तो घेतला न घेतला करून कामिशनरसाहेबांकडे वळून ह्मटलं, "यांना आपण आपल्या या वादांत आर्बिट्रेटर नेमूं." कमिशनर म्हणाला, "त्यांच्याकडे कसं जावं ?" मीं म्हटलं, "मीं त्यांना बोलावतों. माझ्याकरितां ते येतील" कमिशनर नको नको ह्मणतात तों मीं केली खूण त्यांना गाडी थांबवायची, आणखी थांबवली त्यांनीं गाडी. आय् ॲम् क्वाइट् हँड ग्लव् वुइथ् हिम्. ओ ! सर् मिअर् गप्लॉंगयार्न् इज् माय् चम् ! गाडी थांबल्याबरोबर कमिशनर चकित झाला. पण मी कशाला त्याच्याकडे पहातों आहें ? त्याला ह्मटलं चल त्याला रिसिव करावयला. मी त्याला वर बोलावतों. मी तर लागलीच गेलों, मी त्याला वर बोलावूं लागलों. 'मी सिनिअर कौंसिलर, पोलीस कमिशनरच्या घरीं मी कसा येऊं ?' असं तो म्हणावयाला लागला, पण मी म्हटलं, 'मी बोलावतों आहें म्हणून ये.' साहेब लोक काय ? एकदां फ्रेंड म्हटला कीं, काय वाटेल तें त्याच्याकरितां करतातना ! एकदां हें खरं नाणं आहे असं त्यांना कळलं बरीक पाहिजे. झालं. मीं बटनूहोल् धरून ओढलं त्याला. तितक्यांत कमिशनर आला. तो माझी फ्यामिलॅरिटी पाहून चकितच झाला. आणखी एवढा पोलिस कमिशनर पण 'सर, सर, एक्स्क्यूज् सर, प्रोफेसर ड्यांडी, सर......" ह्मे: ह्मे: तोंडांतून गुलामाच्या शब्द निघेना. फ्रेंड आणखी सबॉर्डिनेट् यांत इतकं अंतर असतंच. शेवटीं मीं यांना तें सगळं सांगितलं. तेव्हां, "नो नो, यु मस्ट् पुट् फुल् फेथ् इन् दि प्रोफेसर ऑल्वेज. ही इज् राइट्," असं सर मिअर गप्लॉंग्यार्ननीं सांगितलं. मग आमचा पॅथल्न्न बसला शंख करीत. केलेंन् कबूल माझ्या ह्मणण्याप्रमाणं. नाकबूल करून सांगतो कोणाला ! मीं गव्हर्नरपर्यंत जाऊन त्याचा निकाल लावून घेतला असताना ! आणखी मिअर गपूशीं इतका थिकनेस् पाहतांक्षणीं कमिशनरची खात्रीच झाली कीं, हा लेकाचा काय करील याचा नेम नाहीं. तुला सांगतों, पद्माकर, नथिंग् लाइक् बिईंग् स्ट्रेटफॉरवर्ड वुइथ् दीज् इंग्लिशमेन्. शिवाय माझी एक पिक्युलिअर पोझिशन् आहे. मीं आमच्या लॉजचा आहें वर्शिपफुल ब्रदर. अरे पण तुला आमच्या फ्रीमेसनरीच्या लॉजचं हें वर्शिपफुल ब्रदर ग्रंडमास्तर तें काय ठाऊक ? तूं आपलं हा सोन्या सांगतो आहे तसं वाग. माझा तरी स्वभाव या इंग्लिशमेनसारखा अगदीं स्ट्रेटफॉरवर्ड आहे. तुमच्या नेटिवांसारखा क्याफ्टी नाहीं. त्यामुळें दे लुक् अपॉन मी ॲज् वन् ऑफ् देम्. बरोबर आहे. लॉर्ड फ्यान्सी बॉनिपासून तों तहत पोलिस कमिशनरपर्यंत सगळ्यांना माझ्याबद्दल केवढा रिगार्ड. माझ्याकडे वाटेल तेव्हां यायचे, कार्डा टाकून जायचे, मी घरांत असलों तरी "नॉट् ॲट् होम्" म्हणून पाटी लावून ठेवायचा. त्याच्यामुळं तर मला ही एवढी जागा न् हें सगळं एस्टाब्लिशमेंट ठेवावं लागलं. गव्हर्नर किंवा कमांडर-इन्-चीफ केव्हां येऊन टी माग-

तील याचा नेम नाहीं. ते तरी मोठे गमती असतात ! हा लेकाचा, ह्मणायचे, आमच्या इथें नेहमीं टी घेतो, आपण एकदां याच्या इथें जाऊन याला सरप्राईझ करूं. गव्हर्नरनं अजून कधीं केलं नाहीं. पण हाच सर मिअर गपलॉगयानं चार वेळां असाच टी घेऊन गेला. दॅट्स् व्हाय् आय् टेक् सो मच् लिबर्टी वुइथ् हिम्...वेल् ! पण हें मी तुला कशाला सांगूं ! तुला आपलं सध्या सांगतों एवढं करून टाक. माझ्या हातची गोष्ट आहे. तुझ्यावर कांहीं सुद्धा शेकूं द्यायचा नाहीं मी. पण स्पीक द ट्रुथ् न् कांहीं खरोखरी जरी नसलं, तरी वाटेल तें ठोकून द्या. पण ऐवज वगैरे माझ्या स्वाधीन करा. तो ऐवज जर का त्यांच्या–त्या पोलिसांच्या–ताब्यांत गेला, तर सगळं तुकलंच म्हणून समजा. अगदीं तुकलं ह्मणा. मग आपल्याला एक कवडी सुद्धां दृष्टीस पडायची नाहीं. फार झालं तर चार वांटे करूं. एक वांटा त्या पोलिस कमिशनरला देऊं. काय कुठें आहे बोआ ! उगीच ठाऊक नाहीं असं नका ह्मणूं."

"हें पहा, मी तुझ्या या गप्पा मुकाट्यानं ऐकून घेतों, यावर जाऊं नको अं ! तो तुझी अगदीं चूक आहे. मला कांहीं ठाऊक नाहीं. मला ठाऊक असतं, तर..."

"राजारामाच्या लटपटी खटपटी नसतील ठाऊक, मला कबूल. पण त्यानं सगळं घबाड कुठें तरी तुला ठाऊक आहे अशाच ठिकाणीं ठेवलं असेल, यांत शंका नाहीं तें लपवूं नको. तूं एकटाच गट्ट करून बसालस तर तें मी नाहीं सहन करणार. नाहीं तर मी इन्स्पेक्टर सर्चलाइट्ला सांगून देणार, कीं तुम्ही याला पकडून चांगली समज द्या, म्हणजे सगळं कांहीं यथास्थित होईल. हें पहा, मी तुला कांहीं तो सगळा ऐवज पचूं द्यायचा नाहीं. काय वाटेल तें सांगून तुला तुरुंगांत घालीन. आणखी मागं तुझा ऐवज कुठें आहे त्याचा पक्का शोध लावून तो घेऊन, राजारामाप्रमाणं यत्न करून तुझ्या बायकोलासुद्धां..."

परंतु तितक्यांत पद्माकर उठून उभा राहिला. तो पुढें काय ह्मणणार तें कळूनच काय त्यानें त्याच्या एक श्रीमुखांत देण्याकरितां हात उगारला. तो डर्यांडीच्या लक्ष्यांत आल्याबरोबर तो मागें झाला म्हणूनच वांचला; नाहीं तर पद्माकराच्या हातून त्याचें त्या दिवशीं थोबाड चांगलेंच रंगतें. तितक्यांत पद्माकरासही शुद्धीवर आल्याप्रमाणें झालें. आणि त्यानें नुसतें, "तूं पाजी आहेस हें मी जाणून आहें. तुला काय वाटेल तें कर. सर्चलाइट्ला मला काय सांगायचं असेल तें मीही सांगेन. पाजी तूं, तुला असं वाटतं आहे, कीं सगळं कांहीं तूं बोलतोस तें मला खरंच वाटतं !" असें ह्मणून तो तेथून निघाला. प्रोफेसर डर्यांडीनें त्यास पुनः अडवून धरण्याला पुष्कळ खटपट केली, पण व्यर्थ. आतां तो चांगला शुद्धीवर आला. आपण या पाजीच्या घरीं फार वेळ बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं, निघून जावें तें चांगलें, असें मनांत म्हणून तो तेथून उठला आणि निघाला.

तो रस्त्यांत आला, आणि आतां त्याला आपण जावें कोठें हाच मोठा विचार पडला. जेवणखाणाची त्याला स्मृति सुद्धां नाहींशी झाली. जणूं काय पोट भरलेलेंच आहे असें त्याला वाटत होतें. फक्त विचार काय तो आतां जावें कोठें आणि काय करावें याचाच होता. परत इस्पितळांत जाऊन आपल्या बापाला

कोठें तरी ज्यावें हा विचार त्याच्या डोक्यांतून आतां जणूं काय नाहींसाच झाला. "कोणत्या तोंडानें आपण जाणार? तिथें जाऊन काय बोलणार? या पार्जानीं-दोघांनीं जें काय सांगितलें, तें जर अक्षरशः खरं असलं, तर आपल्याला तिथें जाण्याला तोंड काय? त्यापेक्षां आपण गेलों नाहीं तर तेंच बरं होईल. त्या डॉक्टरांच्याही मनांतून आपल्या वडिलांना इतक्या लवकर सोडायचं नाहीं आणि आपण हमरीतुमरी करून तिथून यांना नेऊं पहाणार. दादासाहेब तरी आपण म्हटल्याप्रमाणं कुठें येणारे आहेत? ते यायचे नाहींत. आपण तिथें जाऊन आपलीच फजिती करून घेणार. काय चमत्कार आहे पहा! जी फार चांगली म्हणून आपल्याला वाटली, आणि आपण मोठ्या धैर्यानं जिच्याकरितां आईबापांना सुद्धां सोडून निघालों, ती आपल्याला अगदीं त्याज्य वाटावी, आणि आपल्या बापानं तिलाच रत्न म्हणून आपल्याला शिव्या देऊं लागावं! या पार्जा माणसांच्या बोलण्यांत आलेल्या सगळ्या गोष्टी खऱ्या असतील काय? राजारामानं नीच हेतु धरून आपला सर्वस्वी घात केला असेल काय? आपण त्याला आत्महत्या करतां करतां वांचविलें, त्याबद्दल त्यानं मोठं कृतज्ञ असावं, तें जाऊन गुलामानं असा प्रकार केला असेल? नाहीं, संभव नाहीं. हा डयांडी लेकाचा डॉक्टर दिसतो. त्याच्याच मनांत कांहीं नीचपणा करायचा असेल, म्हणून त्यानं उद्योग चालविला असेल. राजाराम त्याच्या आड आला असेल, तेव्हां आतां हा त्याच्यावर उलटत असेल. याच्या पलीकडे कांहीं मला दिसत नाहीं. नाहीं तर इतका कृतघ्न कसा माणूस असणार! शक्य नाहीं. आणखी दादासाहेबांना तिच्याबद्दल इतकं चांगलं वाटायला लागलं आहे तें! हं, ती खुबीच आहे. आपल्याला सुद्धां पहिल्या प्रथम कसं वाटलं? आपण कसे फसलों? त्यांतलाच हा प्रकार असला पाहिजे. राजाराम म्हणजे कधीं असा नीचपणा आपल्या बाबतींत करील ही कल्पना सुद्धां होत नाहीं......" अशा प्रकारचे पुनः मनाला घोंटाळ्यांत घालणारे विचार उत्पन्न होऊन तो एखाद्या भ्रांतचित्ताप्रमाणें कोणीकडे जावें आणि कोणीकडे नाहीं अशा विचारांत होता. इतक्यांत दुरून कोणी येतो आहे, असें त्याच्या नजरेस पडलें. त्याला पहाण्याबरोबर आपण त्यास टाळावें, त्याची आपली दृष्टादृष्ट नको, असें एकदम त्यास वाटून तो अगदीं साहजिकपणें अंग चोरून आडव्या गल्लीनें जाण्यास विचार करीत होता. इतक्यांत प्रभाकराची त्याजकडे दृष्टि गेली आणि तोही आपण पद्माकराला टाळावें की काय, या विचारांत पडला असावासें दिसलें. त्याच्या हातांत कांहीं होतें, तें त्यानें चटकन खिशांत मात्र घातलें.

# प्रकरण ८७ वें.

## राजाराम.



राजारामास पहाण्याबरोबर पद्माकर व प्रभाकर दोघांच्याही मनाची काय अवस्था झाली असेल हें वर्णन करून सांगणें मोठें दुरापास्तच खरें. ज्याच्यावर आपण खरोखर कांहीं संबंध नसतां अनेक उपकार केले, जो आपल्या संगतींत अगदीं अचानक आला व अत्यवस्थ आजारी पडला असतां आपण त्याच्या अनेक प्रकारांनीं खस्ता खाऊन त्याचे प्राण वांचविले, तो आपला अशा रीतीनें अकारण वैरी बनेल हें आपल्या स्वप्नींसुद्धां आलें नाहीं. वस्तुतः पहातां या माणसाचा व आपला अर्थाअर्थी संबंध यावयाचा नाहीं, परंतु केवळ आपल्या दयाशील स्वभावामुळें आला, आणि आपण त्याला आत्महत्या करतां करतां वांचविलें, तोच पुढें अशा भयंकर तऱ्हेनें आपल्यावर उलटून आपला सर्वस्वी घात करण्याला प्रवृत्त झाला याला कारण तरी काय? अशा तऱ्हेचे विचार पद्माकराच्या मनांत एकदम उभे राहिले. तितक्यांत एकाएकीं त्याला त्या स्थानाची आठवण झाली. आणि एकदम त्याच्या मनांत लख्ख प्रकाश पडल्याप्रमाणें होऊन तो तिकडे पाहूं लागला. प्रथमतः या चांडाळाचा आपला संबंध आला, तो याच स्थानांत, असें त्याच्या एकदम लक्ष्यांत आलें. होय. ज्या ठिकाणीं आपण बसलों असतां आपल्यास राजाराम प्रथम दिसला, तो आत्महत्या करण्याकरितां जात आहेसें वाटलें तें हेंच स्थान. अगदीं नक्की हेंच ठिकाण. यात शंका नाहीं. दैवाची काय चमत्कारिक तऱ्हा आहे पहा! ज्या स्थानीं प्रथमतः या माणसाबद्दल आपल्याला प्रेमभाव उत्पन्न झाला, त्याच स्थानीं कांहीं दिवसांनीं आपण येऊन बसलों असतां, त्याचा आपल्याशीं वैरभावाबद्दलचा प्रत्यय येऊन त्याचा तिरस्कार उत्पन्न व्हावा! आपण तेथें येऊन असा प्रकार व्हावा इतकेंच नव्हे, तर तितक्यांत त्यानेंही तेथें यावें, हें किती विचित्र आहे! अशा प्रकारचे विचार पद्माकराच्या मनांत एकदम उभे राहिले. पोलिसांच्या ताब्यांत असलेला हा इकडे येईल, अशी कल्पनाही कोणास नव्हती.

राजारामासही त्या दोघांना येथें पाहून अत्यंत आश्चर्य वाटलें! आपण जेथें जातों आहोंत तेथें आपले दोघे मित्र आपल्यास दिसतील, अशी कल्पना त्यालासुद्धां नव्हती. हे दोघे त्याच्याकडे व तो यांच्याकडे असे पहात उभे राहिले. कोणी कोणाशीं बोलेना. इतक्यांत राजाराम आपल्या बरोबरीच्या पोलिस हापिसराकडे वळला व ह्मणतो, "हीच ती जागा. अगदीं माझी पक्की खात्री आहे, याच

ठिकाणीं मी आपल्याला या दुष्कृत्याचा मागमूस नाहींसा करण्याला आलों; परंतु हे दोघे बसले आहेत त्यांना असं वाटलं, कीं मी कोणी तरी आपल्या जिवाला कंटाळून आत्महत्या करून घेण्यास आलों आहें. हे गृहस्थ मला त्यांतून सोडविण्यासाठीं म्हणून धांवत आले. त्या वेळीं त्यांच्या भोळेपणाचं मला हंसूं आलं, परंतु मीं त्यांची गैरसमजूत दूर केली नाहीं. मी जिवाला कंटाळून आत्महत्या करण्यासाठीं आलों होतों असं त्यांना भासवून तुम्हीं मजवर मोठे उपकार केलेत, मी तुमचा मोठा ऋणी आहें, असंच यांना ह्मटलं; अर्थातच यांना तें सर्व खरं वाटून त्यांनीं मला आपल्या चिन्हाडीं नेऊन ठेविलं. माझ्या दुष्कृत्यामुळें माझ्या पाठीमागं पोलिस लागणार हें मला ठाऊक होतंच. तेव्हां या भोळ्या बापड्यांच्या मठींत जाऊन बसलों, तर आपला मागमूससुद्धां लागणार नाहीं. थोडे दिवसांनीं त्यांतूनच कांहीं तरी काढून आपला दुसरा कांहीं तरी धंदा आरंभूं असा विचार केला आणि त्यांना भुरळ पाडून यांच्यांत शिरलों. माझं नशीब थोर, मला तितक्यांत तापानं पछाडलं, तो अंथरूणच धरावं लागलं, त्यामुळं बरेच दिवस घरांतल्या घरांत सगळं कांहीं नीट जुळलं. त्या दुखण्यांत यांनीं माझ्या फार खस्ता खाल्ल्या. परंतुसुद्धां कोणी इतकी काळजी माझी घेतली नसती. असा यांचा उपकार माझ्यावर झाला..."

तें ऐकून तो पोलिसमधला त्याच्याबरोबरचा ऑफिसर ह्मणतो, "पण तुम्हीं त्यांच्या उपकाराची फेड फार उत्तम केलीत ह्मणायची! ज्यांनीं तुझा जीव वांचविला, त्यांचाच जीव घ्यायचा तुझा खटाटोप फार उत्तम बोआ. कशीं अशीं माणसं जगांत उपजतात, याचं राहून राहून आश्चर्य वाटतं बोआ! निदान यांच्याशीं तरी तूं तसा मात्रागमनीपणा करायचा नव्हतास; यांनीं तुझं काय केलं होतं!........" राजाराम त्याच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष्य न देतां पद्माकराकडे पहात उभा राहिला होता. त्याच्या मनांत काय आलें होतें आणि काय बोलावयाचें होतें तें जणूं काय त्यानें मध्येंच थांबविलें आणि म्हणतो: "आतां येथून चला. माझ्या मनांत एकदां या जागेकडे यायचं होतं, त्याचप्रमाणं तुम्हीं मला आणलं. मला हे इथें दिसतील असं वाटलं नव्हतं, पण ते दिसले. आतां माझं इथें कांहीं काम नाहीं. यांच्याशीं एक दहा मिनिटं बोलायला सांपडलं असतं, तर बरं झालं असतं. परंतु आतां ती इच्छा नाहीं. आतां चला. एकदां ती जागा पाहिली. आतां त्या वेळेस जें मीं समुद्रास्तृप्यंतु केलें, त्याचा मागमूससुद्धां लागण्याचा संभव नाहीं. तेव्हां आपल्याला इथें उभं राहून काय करायचं आहे?" असें ह्मणून तो जाण्यास निघाला. पोलिस ऑफिसर पद्माकराशीं कांहीं बोलत होता. दुसरे दोघे होते त्यांस पश्चिमेकडे क्षितिजावर कांहीं आहे तें दाखविण्याच्या मिषानें उजवा हात त्या बाजूस करून राजारामानें आपला डावा पाय उचलून डाव्या हातानें तळपाय खाजविण्याचें मिष केलें. नंतर एकदम तो पाय खालीं ठेवला व पडतां पडतां सांवरल्याचें मिष करून त्यानें पायानेंच खालच्या दगडांची कांहीं उलथापालथ केली. इतक्यांत त्या पोलिस ऑफिसराचें व पद्माकराचें काय बोलणें होत होतें तें संपून तोहीं राजारामास, "चल, तर चल" असें

ह्मणून तेथून जाण्यास निघाले. जातां जातां तो पद्माकरास म्हणतो, "याची आह्मी अनेक तऱ्हांनीं मनधरणी करतों आहोंत याचा हेतु एवढाच कीं, गुलामानं आपल्या त्या टोळीची सगळी हकीकत आह्मांला सांगावी. आज मला इकडे घेऊन चला म्हणाला, हं चल बाबा. तिकडे चला, तिकडे. पण अजून कांहीं ठावठिकाणा नाहीं." इतकें बोलून ती मंडळी निघून गेली. पद्माकर व प्रभाकर त्यांचेकडे पहात राहिले. ज्या जागीं आपण प्रथम याला भेटलों, आणि याच्यावर भरंवसा ठेवून याला आपल्या बिऱ्हाडीं नेलें, त्याच जागीं हा अशा वेळीं अशा दिवशीं, त्याच्याच दुष्टपणाच्या नाना-परिणामांचा विचार करीत असतां त्यानें अचानक यावें आणि कांहीं तरी बोलून जावें याचेंच त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. परंतु राजाराम दगडाशीं पायांनीं कांहीं धडपड करीत असतां प्रभाकराचें लक्ष्य त्याच्याकडे होतें. त्यानें खाजविण्याच्या मिषानें डावा पाय वर करून त्याच्या दोन बोटांच्या बेचक्यांत कांहीं तरी धरून पुनः पाय दगडाकडे नेऊन तेथें दगड उलथापालथा करून त्याच्याखालीं कांहीं ठेविलें असें त्यानें पाहिलें. तें त्यानें आपल्या-करितांच ठेविलें यांत शंका नाहीं, असें प्रभाकरास खचित् वाटलें व आणि त्याचेबरोबरीचे ते पोलिस अंमलदार तेथून जातांक्षणीं हलकेंच पुढें होऊन तो दगड त्यानें उलथून पाहिला. तों त्याच्या-खालीं एक जाडसा लखोटा ! तो पाहि-ल्याबरोबर प्रभाकराची वृत्ति कांहीं चम-त्कारिक झाली. त्यानें तो लखोटा उचलून घेण्याच्या आधीं पद्माकराला हांक मारून तो दाखविला व ह्मणतो, "पहा, पहा. कसा पक्का डांबिस झाला आहे. धडधडीत दोन तीन पोलिस बरोबर असतांना हें पत्र अगदीं त्यांच्या डोळ्यांपुढं त्यानं इथें टाकलंन्. मला वाटतं, तो पहिल्यापासूनच सोनेरी टोळींतलाच खरा पण चुकून आपल्याकडे आला. आपल्याला काय त्यानं थापा मारल्यान् आणखी काय केलंन् त्याचा कांहीं नेमच नाहीं. असो, पाहूं तरी काय एवढं आपल्यापुढं पत्र टाकलं आहे तें ! तें त्यानं आहे आपल्यासाठींच ठेविलेलं, यांत शंका नाहीं. पण आपण इथें येणार हें काय त्याला ठाऊक ! कदाचित् असंही असेल, कीं आज बरेच दिवस त्याच्या मनांतून हें तुला द्यायचं अशा हेतूनं त्यानं तयार करून ठेवलं असेल, आणखी संधि पहात असेल केव्हां तरी तुझ्याकडे पोहोंचतं करण्यासाठीं, ती आज आयतीच आली !"

इतकें ह्मणून प्रभाकरानें तो लखोटा उचलून घेतलाच, आणि वर पहातो तों खरोखरीच पद्माकराचें नांव त्या लखोट्या-वर ! मग कांहीं शंकाच राहिली नाहीं.

तो लखोटा पाहून पद्माकर अतिशय आश्चर्यचकित झाला. इतका वेळ यानें आपल्याला फसविलं, तें काय थोडें झालें ! आतां हा काय आणखी थापा मारून आपणास फांसांत धरूं पहाणार ? असे आपले आपल्यालाच प्रश्न त्यानें केले. पद्माकराच्या मनांत असें कांहीं येईना, कीं आंत कदाचित् पश्चात्तापाचे उद्गार असतील. नाहीं म्हणून कशावरून ? छे. राजारामाच्या आतांपर्यंतच्या कृतींनीं तो इतका पोळला होता, कीं खरोखर एखादें सत्कृत्य त्यानें जरी केलें, तरी सुद्धां त्यास तें कांहीं तरी दुष्ट बुद्धीनें केलेलें दुष्कृत्यच वाटणार, अशी त्याच्या मनाची स्थिति

झाली होती. यामुळें प्रभाकरानें त्याच्या हातीं तो लखोटा दिला तरीसुद्धां त्यानें तो फोडला नाहीं. आंत काय भयंकर असेल आणि काय नाहीं असें त्याला वाटत होतें. 'असूं दे; मग केव्हां तरी मी फोडून पाहीन' असें म्हणून त्यानें तो दूर ठेविला. परंतु प्रभाकराच्या मनांत त्यानें तो वाचावा असें होतें, म्हणून त्यानें त्यास तो वाचण्यास आग्रह केला; परंतु पद्माकरानें आतां मला येथें बसवत नाहीं, सकाळपासून माझ्या पोटांत अन्न नाहीं असें सांगितलें. त्याबरोबर प्रभाकर एकदम चरापून म्हणतो, "काय! तुझ्या पोटांत सकाळपासून अन्न नाहीं! हें तूं म्हणतोस तरी काय! चल, चल, तर आधीं जेवण, मग काय आपल्याला करायचें तें करूं." त्या दोघांचें पूर्वीचें तें प्रेम पुनः उपस्थित झालें. प्रभाकर तर सगळें पूर्वीचें स्मरूं लागला. मध्यंतरीचें सर्व तो विसरला. राजाराम अतिशय दुष्ट मनुष्य असून त्यानें नानाप्रकारांनीं फसविल्याकारणानेंच हा बिचारा फसला अशाबद्दल त्याची खात्री झाली; आणि आतां आपण याला जर कोठें जाऊं न देतां याच्याबरोबर राहिलों, तर पुनः हा पूर्वस्थितीवर येईल अशीही पण त्याच्या मनास खात्री वाटूं लागली, तेव्हां अर्थांतच तो त्याला बरोबर घेऊन, आपण जेथें जेवीत असे तेथें गेला. तेथें त्यानें त्यास आग्रह करून जेवूं घातलें. जेवण झाल्यानंतर पुनः तें पत्र वाचण्याबद्दलची गोष्ट निघाली. परंतु पद्माकर कांहीं केल्या तें पत्र उघडून वाचीना. त्याच्या मनाची तयारीच होईना आणि प्रभाकरासही तो तें पत्र वाचूं देईना. आतांच याची मर्जी मोडून आपण यांलों कांहीं आग्रह करूं नये असें त्याच्या मनानें घेतलें, आतां नाहीं उद्यां, उद्यां नाहीं परवां आपण तें पत्र पाहूं. आतांच पाहिलें पाहिजे असें त्यांत कांहीं असेल असें त्याला वाटलें नाहीं. आतां आपण चार सहा वर्षांच्या फेऱ्यांत सांपडणार. तेव्हां पद्माकरासारख्या आपला जीव वांचविणाऱ्या मित्राशीं भयंकर लुच्चेगिरी व विश्वासघात केल्याबद्दल त्यास पश्चात्ताप होऊन त्यानें त्या भरांत आपलीं सगळीं कृष्णकारस्थानें स्पष्टपणें कबूल केलीं असतील, दुसरें काय त्या पत्रांत असणार! असें वाटून त्यानें तें पत्र वाचण्याबद्दल आग्रह धरिला नाहीं. अतिरेक होऊन आपलें सगळें फसलें असें दिसल्यानंतर कित्येक नितांत दुष्टांसही अत्यंत पश्चात्ताप होतो, तशीच याची अवस्था झाली असेल; आणि त्या पश्चात्तापाच्या भरांत त्यानें तें पत्र लिहिलें असेल, असें वाटून त्यानें तें पत्र वाचण्याचें लांबणीवर टाकलें.

इकडे पद्माकराच्या मस्तकाची अगदीं विलक्षण स्थिति झाली. विचार, विचार, विचार, अगदीं वेड लागून टाकणारे विचार सुरू झाले. मस्तक तापलें, डोळे लाल झाले, आणि जसा एखादा मद्यपी मनुष्य उन्मत्त होऊन पाहूं लागतो, त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. त्या मद्यप्याच्या नेत्रांपुढें ज्याप्रमाणें अनेकविध गोष्टी एका पाठीमागून एक, कधीं संगतवार, कधीं वेड्यावांकड्या दिसूं लागतात, आणि त्यांतच तो अगदीं गुंग होऊन गेलेला असतो, तशीच त्याची स्थिति झाली. आपण आपल्या बापाची अवज्ञा केल्या दिवसापासून आपलें एकंदर चरित्र किती विचित्र झालें, एक वेळां मन मानेल तसें करण्याला पाय पडें घातल्याबरोबर आणि त्याप्रमाणें

केल्याबरोबर, आपण आपल्या इच्छेच्या किती स्वाधीन होत चाललों, आपल्याला अमुक एक गोष्ट अशी व्हावयाला नको असें वाटलें आणि ती झाली असें पाहिल्याबरोबर आपण कसा माथेफिरूपणा केला, आणि त्या माथेफिरूपणाच्या पूर्णपणें स्वाधीन होऊन आपण किती वाहवत गेलों, किती अंध झालों, किती मूर्ख बनलों, कशावर भरंवसा ठेविला, आणि कशावर बेभरंवसा केला, मित्राला शत्रु समजलों व त्याला काठ्या हाणूं लागलों आणि शत्रूला मित्र समजून त्याला मिठ्या मारल्या. हातीं सांपडलेल्या सुखावर आपण होऊन लाथ मारून चालते झालों, एकाहून एक मोठ्या घोड्याएवढ्या चुक्या केल्या. या सर्वांचें इंगित काय? कोणत्या मूळ कारणामुळें आपण एवढे भ्रमिष्ट बनलों, इत्यादि अनेकविध प्रश्न व प्रसंग त्याच्या डोळ्यांपुढें उभे राहिले; आणि प्रसंगांचा भेसुरपणा पाहूनच जणूं काय त्याच्या जिवाचा थरकांप होऊं लागला. तो जात्या इतका धीट, निश्चयी, परंतु आपल्या चुक्यांचा परिणाम फार भयंकर झाला, याला आपणच कारण असें त्याचें त्यासच दिसून आल्याबरोबर त्याचा तो धीटपणा, तो निश्चय हीं सर्व जागच्याजागीं अगदीं जिरून गेलीं. आपण ज्या कृत्यांस हात घालण्याचे बेत केले होते, जें करण्यास आपण फार समर्थ व योग्य आहों असें आपणास वाटत होतें, त्या कृत्यांस खरोखर आपण योग्य नाहीं. आपल्या खुळचटपणामुळें आपल्यावर भयंकर प्रसंग गुदरावयाचा, परंतु आपलें नशीब जोरावर म्हणूनच आपल्यावर त्या प्रसंगाचा पूर्ण दारुणपणा येऊन कोसळला नाहीं. आतां आपण आपल्या पत्नीला कोणत्या तोंडानें पत्नी म्हणावें! तिच्यापुढें जाण्यास आपल्याला तोंड काय? आणि इतर माणसांना तरी आतां आपण कशा प्रकारें तोंड दाखविणार? आपली जगांत केवढी फजिती होणार! आपण सुधारणेचे केवढे दिग्विजय लावणार होतों, कसकसल्या संस्था काढणार होतों, किती मानसिक धैर्याचें प्रदर्शन करणार होतों! आतां तें सर्व कोठें गेलें? इत्यादि इत्यादि अनेकविध विचार त्याच्या मनांत अशा जोरानें घोळूं लागले, कीं त्याला कांहीं सुचेना. जवळ प्रभाकर होता, पण त्याच्याशीं तो एक अक्षरसुद्धां बोलेना. केवळ तारवटलेल्या माणसाप्रमाणें डोळे वटारून तो त्याच्याकडे अगदीं शून्यदृष्टीनें पहात होता. तास दोन तास झाले, आपण बळवंतरावांकडे जाण्यास निघालों असतां सहज हा वाटेंत भेटला, आणखी कांहीं तरी मनांत येऊन याच्याशीं बोलतां बोलतां याला पत्रें दाखविलीं. तीं त्वरित बळवंतरावांना दाखवून त्यांचें मन अगदीं निःशंक करून टाकून कमलेला त्यांच्याजवळ आणून घातली पाहिजे हा त्याचा मूळचा बेत. तो एकीकडेच राहून हें एक मध्येंच कांहीं झालें. झालें तें फार इष्ट झालें. एकट्या बळवंतरावांचें मन निःशंक करून टाकण्यापेक्षां या आपल्या मित्राचें मन निःशंक झाल्यानें किती तरी गोष्टींची सुव्यवस्था झाली. ही गोष्ट खरी, परंतु बळवंतरावांकडे जाऊन त्यांच्या नजरेस तीं पत्रें पाडलीं पाहिजेत. बापाचें अंतःकरण तिळतिळ तुटत आहे, तें एकदां स्थिर झालें म्हणजे ठीक होणार आहे. असें मनांत येऊन तो पद्माकरास तेथेंच बसवून जावें, कीं त्याला घेऊन जावें याचा विचार करूं लागला. पद्माकराच्या मनाची जी स्थिति झालेली

आहे ती स्थिति मनांत आणतां त्यास एकटें टाकून जाणें बरें नव्हे असें त्यास स्पष्ट दिसलें. तो या पश्चात्तापाच्या स्थितींत काय करावयाला जाईल आणि नाहीं, याचा त्यास नेमच वाटेना. त्याचे डोळे आणि त्याची चर्या हीं पाहून त्याला असें वाटलें, कीं तो या प्रसंगीं त्याच्यावर पूर्ण नजर नसली, तर काय वाटेल तें करील. तेव्हां एक दोन दिवस त्याच्या तंत्रानेंच घेऊन मस्तक शांत केलें पाहिजे. तें शांत झालें, म्हणजे आजपर्यंतच्या सर्व गोष्टींचा यथोचित विचार तो करून पुनः पूर्ववत् होईल. त्यांत मग त्याला कांहीं सुद्धां वाटावयाचें नाहीं. असा विचार करून त्यानें ती रात्र तशींच जाऊं द्यावी, आपण यास सोडून जाऊं नये, असाच विचार कायम केला.

पद्माकर अगदीं जशाचा तसा तटस्थ बसला होता. एका श्वासोच्छ्वासाखेरीज दुसरें कांहीं सुद्धां तो सजीव आहे हें समजण्याला कारण दिसत नव्हतें; आणि प्रभाकरानें त्यास यत्किंचित् सुद्धां जागृत करण्याचा यत्न केला नाहीं. एखाद्या समाधिस्थ योग्याच्या समाधीचा भंग होऊं नये म्हणून त्याचे भक्त ज्याप्रमाणें त्याचे आसपास अगदीं जपून वागतात, त्याप्रमाणेंच प्रभाकरानें आपली वागणूक ठेविली. झोंप येऊं लागली तेव्हां सुद्धां त्यानें आपलें अंथरूण टाकून व आपल्या मित्रासाठींही एक अंथरूण टाकून ठेवून त्यास तसेंच बसूं दिलें, असा विचार करून करूनच त्याचें मन स्वस्थ होईल तेव्हां होईल. आपण तें स्वस्थ करण्याबद्दल बोलून किंवा अन्य तऱ्हेनें प्रयत्न करून कांहीं होणार नाहीं, असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें. त्याला स्वतःला तरी स्वस्थपणें झोंप कोठली यावयाला ? तोही असाच तळमळत पडला होता. मधें मधें त्याचा डोळा लागे. परंतु तो तसाच धसक्यानें उठे आणि वर मान करून, पद्माकर निजला आहे कीं जागा आहे तें पाही. तरी पद्माकर आपला जशाचा तसा, जिथें बसला होता तिथें बसलेला. जागचा हलला नाहीं कीं इकडची मांडी त्यानें तिकडे केली नाहीं. अशा स्थितींत मात्र प्रभाकरास असें वाटलें, कीं हा असाच जर बसला, तर याचें मस्तक अतिशय तापून जाऊन हा आजारी पडेल. म्हणून त्यानें हलकेंच त्यास म्हटलें, "पद्माकर, जें झालें तें गेलें. आतां त्याच्याबद्दल इतका विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे ? आतां स्वस्थ नीज. डोक्यावर गार पाणी घाल, आणि अगदीं कांहीं विचार मनांत न येऊं देतां पड, म्हणजे झोंप लागेल. थोडी झोंप लागली, कीं सकाळाला तुझं तुलाच किंवा तरी बरें वाटे ऊठ. असाच बसून राहशील तर खचित् आजारी पडशील. तुझ्या मनांत काय चाललं आहे त्याची मला चांगली कल्पना होते आहे. जगांत आतां आपल्याला काय म्हणतील हा विचार तुझ्या अंतःकरणाला त्रास देत असेल, पण आपल्या हातून होणाऱ्या चुकांबद्दल जें काय कोणी म्हणेल तें निमूटपणें सहन करणं हें सुद्धां एक प्रकारचं दिव्यच आहे. चुका या व्हायच्याच. चुका होतात त्या वेळीं त्या चुका आहेत असं कोणास वाटत असतं ? पद्माकर, आतां खरं धैर्य यांतच आहे, कीं जो उपहास सहन करावा लागेल तो निमूटपणं सहन करावा. अविचारानें जें कृत्य हातून घडेल, त्याचे जे अनेक परिणाम भोगावे

लागतात, त्यांतलाच लोकनिंदेचे आघात हा एक परिणाम आहे, तेही तुला सोसावे लागणार. जो प्रकार झाला याहून अधिक भयंकर कांहीं झालं नाहीं, थोडक्यांत आटपलं, हें काय थोडं झालं ! थोडं झालं नाहीं. त्या भयंकर प्रकारापासून होणारं नुकसान सोसावं लागलं नाहीं यांतच आपलं फार मोठं सुदैव समजून स्वस्थपणें रहावं यांतच आतां खरं धैर्य आहे. मी तुला अशा उपदेशाच्या गोष्टी सांगाव्या हा माझा अधिकार नाहीं. परंतु मला जें वाटतं तें तुला स्पष्टपणानं सांगणं माझं कर्तव्य नाहीं काय ? तुझ्या स्थितींत मी असतों तर तूं मला असंच सांगितलं असतंस. तूं गोंधळून गेला आहेस. त्या मानानं माझं चित्त पुष्कळ स्थिर आहे. तर आतां तूंच जरा शांत होण्याचा प्रयत्न कर. एकवार तूं चित्त शांत केलंस म्हणजे तुझे तुलाच किती तरी चांगले विचार सुचतील. उद्यां सकाळीं आपण दोघेही बळवंतरावांकडे जाऊं, त्यांनाही तीं पत्रें दाखवूं, सर्व हकीकत सांगूं, तिथून तुझ्या वडिलांकडे जाऊं आणि सर्व गोष्टी त्यांना निवेदन करूं. कोणतीही गोष्ट अनिष्ट वाटली, तर तिला भिऊन भिऊन किती दिवस चालणार ? किती दिवस अशा गोष्टी टाळणार ? तूं तें पत्र–राजारामाचं पत्र–अजून उघडून पाहिलं नाहींस. पण न पाहण्यांत काय अर्थ आहे ! त्यांत भिण्याजोगं काय आहे ! तुझं मन अढू झालं आहे. या वेळीं माझ्या ह्मणण्याप्रमाणं वाग. आण. मी तें वाचतों. त्याचा काय नेम ! पश्चात्तापाच्या भरांत त्यानं आपला सर्व नीचपणा कबूल केला असेल. तो वाचून तुझ्या मनांतलं राहिलं साहिलं किल्मिष निघून जाईल. " काय असेल तें असो; पद्माकरही याच वेळीं तें पत्र वाचावें न वाचावें अशा विचारांत होता, आणि त्यांत प्रभाकराचें हें बोलणें ऐकून त्यानें अगदीं निमूटपणें तें पत्र त्याच्यापुढें टाकलें.

# प्रकरण ८८ वें

## काकासाहेबांची पांचावर धारण.



काकासाहेब मुंबईहून आपल्या पत्नीस घेऊन नुकतेच आपल्या गांवीं येऊन हायसे करीत बसले होते. दादासाहेब जर त्या अपघातांतून वांचले नसले, तर बरेंच झालें, त्यांच्यापासून घेतलेले रुपये आपल्याला पचतील असें त्यांच्या मनांत येऊन ते मनाला थोडेंसें काल्पनिक समाधान वाटवून घेत होते तथापि आपले सगळे खरे दागिने जाऊन खोटे दागिने आले याची रुखरुख त्यांचे मनांतून गेली नव्हती, हें उघडच आहे. त्यांनीं आपल्या कुटुंबास रोज रोज बोचबोचून खावें कीं, " तुझ्या बापानं कांहीं तरी लबाडी करून माझे खरे दागिने खाल्ले. व मी आतां तुला न्यायला येईन, तेव्हां दागिने यावे

लागतील, तर कांहीं तरी पुढें करायला पाहिजेत ह्मणून हे खोटे दागिने बनवून दिले! उजळा बिजळा दिल्याच्या या तुझ्या बाता व्यर्थ आहेत. बरं तर बरं, मीच म्हणून एवढं माझं नुकसान झालं, तरी आपला गप्प बसलों आहें. दुसरा एखादा असता तर त्यानं तुझ्या अंगाची चामडी लोळवून, त्या तुझ्या लुच्चा बापाला फरफरा कोर्टांत ओढून तुरुंगांत पाठविलं असतं........"

परंतु काकूसाहेब ऊर्फ वहिनीसाहेब त्यांस अशा तऱ्हेनें पुढें बोलूं देणार! त्यांनीहि आपल्या तोंडाचा पट्टा चालू केला. "माझ्या बापाचं कशाला विनाकारण नांव घेतां? तुह्मांलाच असल्या घालमेली करायला हव्यात. तुम्हींच कांहीं तरी लबाडी करून त्या डब्यांतले खरे दागिने काढून घेऊन हे तकलादू आंत घालून ठेविलेत, आणखी आतां माझ्या बापाचं नांव घेतां! तुमच्या जीवाला कांहीं तरी वाटूं द्या. ते बिचारे कोणाच्या अध्यांत ना मध्यांत. सकाळीं उठले, कीं आपल्या देवपूजेच्या नादांत असतात; देवपूजा झाली कीं, लगे लगे दोन घांस खातात, आणखी चाकरीवर जातात, चाकरीवरून आले कीं संध्याकराळ करून कुठें आपल्या स्नेह्यांसोयऱ्यांच्या इथें जाऊन बसतात. त्यांना कुणाचं एक नको आणखी दोन नको. त्यांचं तुह्मी कां नांव घेतां? तुमच्याच बहिणीच्या ताब्यांत ते दागिने होते. तिनें त्या शास्त्र्याच्या–मेल्याचं नांव घेतलं कीं सचैल स्नान करावं–काय मेल्यांनीं जो घरांत धुडघुस घातला होता तो कांहीं पुसूं नये. पण इथें काय! बहीण आणखी तो शास्त्रीबोआ तुमतीं स्वर्गलोकचीं माणसं वाटत होतीं. अगदीं मी सांगतें. माझे खरे दागिने काढून घेऊन खोटे दागिने त्या डब्यांत भरून ठेवायचं काम त्यांचं आहे. त्याशिवाय का आतां दोघं नाशकास जाऊन अगदीं सुखानं राहिलीं आहेत तीं? अहो, तें लक्षण मला दिसतच होतं, पण मी पडलें लहान, आणखी आपला विश्वास सगळा त्यांच्यावर. आपल्याला गांवांतल्या हजार उठाठेवी करायला पाहिजेत, त्यांत ते बरे आपले आपल्याला उपयोगी पडत, ह्मणून आपण त्यांचं वाटेल तें चालूं देत होतां. पण ते आणखी आपल्या बहिणाबाई आपल्या डोक्यावरून वरवंटा फिरवीत होत्या, हें कुठें आपल्या लक्ष्यांत आलें?"

"बरं बरं, पुरे बडबड. माझी बहीण असलें कधीं करणार नाहीं. तुझ्या बापाखेरीज, नाहींतर तो तुझा भाऊ सोन्या – काय लेकाचा नांव ह्मणे सोन्याबापू — त्यानें डल्ला मारला असेल. त्याच्याखेरीज हे दागिने गेले नाहींत समजलीस? माझा तर्क अगदीं बरोबर होता. त्या पोरानं त्या दागिन्यांवर डल्ला मारला. पुढें मी तुला न्यायला येतोंसं दिसल्याबरोबर बापलेकांनीं एक होऊन हे कांहीं तरी खोटेनाटे दागिने माझ्या गळ्यांत बांधायचा पाट बांधला. मी मूर्ख कीं, तूं दागिने आणलेस तेव्हांच ते तपासून पहायचे, ते पाहिले नाहींत. तूंही त्यांत सामील असशील; नाहीं तरी कोणीं ह्मणावं! तुह्मी सगळीं सगळीं सगळीं अगदीं आह्मांला बुडवायला बसलीं आहां यांत शंकाच नाहीं. मी आपला भोळा तुमच्या हातांत सांपडलों......"

"हो, हो, तर. आपण फार भोळे! माझ्या बापाला बुडवायचं चांगलं कावलं होतं, बरं तर बरं, ते दागिने परत आल्या-

वर तुमचे तुम्हांलाच खोटे का खरे काय ते दिसले. हे जर का माझ्या बाबांनाच दिसते, आणखी त्यांनी तुम्हांला हें काय म्हणून विचारलं असतं, तर तुम्ही त्यांच्यावर फौजदारी करून त्यांना तुरुंगांतसुद्धां घालायला कमी केलं नसतंत. काय बाई तरी उलटा ओरडा ! "

" तुरुंगांत ! तूं काय समजली आहेस ! मी अजून शोध करतों आहें, त्या शोधांत जर कांहीं सुगावा लागला, तर मी त्यांना सोडीन का काय म्हणतेस ? तुझा बाप झाला म्हणून काय झालं ! जर चोर आहे तर त्याला योग्य शिक्षा झालीच पाहिजे......"

" चोर ! कोणाला ह्मणतां तुह्मी चोर ? माझ्या नानांना, माझ्या बापाला चोर ह्मणतां ? जरा विचार करून बोलत जा. मला आतां बोलतां येत नाहीं, नाहीं तर चोर कोण तें तेव्हांच सांगून दिलं असतं इतकं तुमचं ह्मणणं जर असलं, तर चोर कोण तो बाहेर यावाच. ह्मणजे पहातें कशी काय कोणाची घाबरगुंडी उडते ती..."

पण इतकें बाईसाहेबांचें बोलणें होतें न होतें आहे, तोंच एक गडी धांवत धांवत काकासाहेबांजवळ येऊन ह्मणतो, "साहेब, एक मुंबईचा पोलिस नी त्याच्याबरोबर एक गिरस्त आलाय नी तुमाम्ही इचारतोय्. "

मुंबईचा पोलिस आणखी आपल्याला विचारतो आहे, हे शब्द ऐकण्याबरोबर काकासाहेबांची अगदीं पांचावर धारण बसली. " अरे ! अरे ! मला नसेल, तो दुसऱ्या कोणाकरितां आला असेल. मी कसला ? माझा नू मुंबईच्या पोलिसचा संबंध काय बाबा ? जा, त्याला म्हणावं तुह्मांला पाहिजे तो मी नव्हे. नाहीं तर असं सांग कीं, मी घरीं नाहीं. पण तसं नको. त्यांना ह्मणावं तुम्हांला जो गृहस्थ पाहिजे तो मी नाहीं. माझा मुंबईशीं कांहीं संबंध नाहीं. जा, जा, फार वेळ इथें उभा राहूं नकोस. नाहीं तर त्यांना अधिक संशय येईल. जा. म्हणावं मी नाहीं जो तुह्मांला पाहिजे असेल तो ! माझा काय संबंध !"

इतक्यांत तो पोलीस अम्मलदार गड्याच्या मागें होताच. तो पुढें होऊन म्हणतो, " अहो काकासाहेब, संबंध नाहीं कसा ! आपला संबंध पुष्कळ आहे. जरा माझ्याबरोबर मुंबईला चला, म्हणजे सगळा संबंध काय आहे, काय नाहीं तो चक्क समजेल. आपला संबंध किती तरी आहे !"

झालें ! त्या अम्मलदारास पाहतांक्षणींच काकासाहेब काळेठिक्कर पडले. त्या सराफानें शेवटीं आपला गळा कापला. लेकाचे रुपये त्याचे त्याला देऊन आपल्याला मोकळें करून घेतलें असें समजत होतों, तें सगळें व्यर्थच वाटतें ! आतां यांतून निसटावयाला मार्ग काय काढावा ? पोलिसाच्या हातून सुटण्याला काय ? एकच मार्ग. त्या अंमलदाराचा हात जरा ओला केला, तर तो रिपोर्ट करील कीं आपण भेटलों नाहीं किंवा आपण ते इसम नव्हे. काय वाटेल तें. पोलिस हापिसरांनीं जें मनांत आणलें तें होतें आहे, असा विचार मनांत येऊन काकासाहेब त्या पोलिस अधिकाऱ्यास म्हणतात, " तुह्मी अशी विनाकारण धांदल कांहीं करूं नका. काकासाहेब ह्मणतात तो मीच खरा; पण माझा खरोखरी कांहीं सुद्धां कशाशीं संबंध नाहींहो. मी आपला गरीब कधीं तरी कांहीं कामानिमित्त मुंबईस जातों येतों इतकंच. बसा, बसा, अंमळ तंबाखू खा. मग आपण स्वस्थपणानं विचार करा. "

" छे छे, मला आतां बसायला वेळ

कुठला आला आहे? मला या पावलींच माघारीं गेलं पाहिजे. आणखी...आणखी तेंही आपल्याला बरोबर घेऊन. आपल्याला मूळ ह्मणूनच आम्ही आलों आहों!"

त्या पोलीस अधिकाऱ्याच्या तोंडातून ते शब्द ह्मणजे एकेक वज्राचा ठोकाच काकासाहेबांच्या कानांवर पडत होता, ह्मटलें तरी चालेल. तसे ठोके बसले असतां जशी एखाद्याची दुरवस्था व्हावी, तशीच काकासाहेबांची दुरवस्था झाली. बिचाऱ्याचें धैर्य अगदींच गळालें आणि तोंड काळेंठिक्कर पडलें. काकासाहेब दुसऱ्याचा छल करण्याचे कामांत मोठे पटाईत असत, त्याचप्रमाणें दुसऱ्यावर शस्त्र उपसावयाचें असलें तर यांच्या धैर्यास अगदीं सीमा नसे. मग यांच्या मनांत दयेचा एक लवलेश सुद्धां नसावयाचा. कोणी दया करा, असें ह्मटल्यास हे त्याला म्हणावयाचे, 'तुझ्या हातून पुनः असलं कांहीं होऊं नये ह्मणून तुला तुरुंगांत पाठविणं, तुला शिक्षा करणं, ही खरोखर तुझ्यावर दयाच आहे.' दुसरा संकटांत असला तर अस्सल छद्मी बोलणें म्हणजे त्यांच्या अंगचा अगदीं नैसर्गिक गुण. परंतु तीच तसली बाजू आपल्यावर आली, कीं झाली यांची त्रेधातिरपीट. पळालें तोंडचें पाणी. उसनें धैर्य आणूं ह्मटलें, तरी सुद्धां फार मारामार. तीच अवस्था प्रस्तुत प्रसंगीं त्यांची झाली. तरी पण थोडें उसनें अवसान आणून ते ह्मणाले, "वा! वा! मी तुमच्याबरोबर आलं पाहिजे तें काय म्हणून? मी तुमच्याबरोबर काय ह्मणून आलं पाहिजे?"

"मी आपल्याला बोलवायला आलों आहें म्हणून!"

"पण तुह्मी बोलवायला आलों कां? तें सांगाल कीं नाहीं? पोलिसानं मला बोलवायला यावं, असं माझ्या हातून कांहीं सुद्धां झालं नाहीं."

"झालं आहे कीं नाहीं याचं भांडण इथें कशाला भांडतां? मी नीटपणें बोलावतों आहें, आपण चलावं. तसं यायचं नसलं, तर फार अगत्याची अशी आमंत्रणचिट्ठी आणतों. तार केली कीं वारंट. वारंटाला काय उशीर लागतो आहे? पण तितका उगीच उशीर कां लावतां? चला."

वारंटाचें नांव काढतांक्षणीं काकासाहेबांचें धाबें अगदींच हादरलें. आणि ते बावळ्यासारखे इकडे तिकडे पहात आपलें डोकें चोळूं लागले. आपल्या त्या सराफानें बहुतकरून हा घात केला असावा. त्या खोट्या दागिन्यांपायीं आपल्याला काय काय भोगावें लागणार आहे कांहीं नेम नाहीं असें ह्मणून स्वारींनीं आपल्या आंत दाराआडून डोकावून पहाणाऱ्या पत्नीकडे पाहिलें व जवळ जाऊन ह्मटलें, "पहा आतां. आतां मला सगळं खरं काय आहे तें सांगावं लागेल, आणखी मग तुझ्या नानांचीं शंभर वर्षं भरलीं समज. आतां वॉरंट काढून घेऊन इथून जाण्यांत कांहीं शोभा नाहीं. तेव्हां आपला तसाच जातों."

"जातों म्हणजे काय?" वहिनीबाई हलकेच पण मोठ्या तोऱ्यानें ह्मणतात: "उगीच आपलं कोणी बोलवायला आलं, तर जायचं कां काय? अशीं खोटीं सोंगं घेऊन देखील लोक फसवीत नाहींत का? तें कं.ही नाहीं. उगीच कांहीं जाऊं नये. आपण असे गेल्यावर मी एकटी काय करूं इथें?"

"एक दोन दिवस तूं वाट पहा. नाहीं तर मी तुला पत्र पाठवीन. वास्तविक मला

कांहीं जाण्याच कारण दिसत नाहीं; पण त्यानं यादीच आणली असेल माझ्या नांवाची, त्याखेरीज कसा येईल ? "

"पण ती यादी पहाल तर खरी आणली आहे का काय ती ? आणखी असलं कांहीं जरी, तरी माझ्या नानांचं कांहीं नांव घेऊं नका उगीच. तुमचं तुम्हीच काय असेल तें पाहून घ्या. खरे दागिने जाऊन त्यांच्या जागीं खोटे दागिने तुमच्या घरांतच आले; पण त्याच्याशीं पोलिसाचा काय संबंध आहे ? "

"पुरे, पुरे तुझं पांडित्य ! मोठ्यानं बोलूं नको. मला तर गेलंच पाहिजे. त्याखेरीज कांहीं उपायच नाहीं. कधीं आमची गोष्ट सुरळीत झाली आहे, असं होतच नाहीं. तूं घरांत आल्या दिवसापासून हें अस्सं चाललं आहे. दुसरं काय ? जें भोगायचं असेल कर्मांत, तें भोगलं पाहिजे...... "

" आतां मला उगाच संतापवूं नका. नाहीं तर मी......"

परंतु तितक्यांत ते पोलिस गृहस्थ काकासाहेबांस ह्मणतात, " काकासाहेब, उगीच उशीर करण्यांत काय अर्थ आहे ? आपली गाडी चुकूं नये. मला कांहीं माहिती नाहीं. मी ब्राम्हण आपण ब्राह्मण म्हणून इतक्या मवाळीनं घेतों आहे. त्या डांबिस राजारामाला पकडलं आहे, त्यांत दागिन्यांची कांहींएक चोरी सांपडली आहे, त्यासंबंधानं आपलं नांव निघालं म्हणून आपल्याला बोलवायला पाठविलं. त्यांत आपल्यावर कांहीं सुद्धां येईल असं कांहीं मला वाटत नाहीं. पण मला माहिती कांहीं नाहीं. आपले तुह्मी फार घाबरलांसे दिसतां ह्मणून हें सांगून देतों. "

झालें. दागिन्यांची गोष्ट निघतांच स्वारीची फारच त्रेधा उडाली. मागें अनेकवार सांगितलेंच आहे, कीं काकासाहेब जितका बोलण्यांत धीट तितका इतर बाबतींत नेभळा असे. दागिन्यांच्या बाबतींत पोलिसापर्यंत कंत्राट जाऊं नये, म्हणून आपण हरतऱ्हा करून शेवटीं तें प्रकरण पोलिसांत गेलेंच, हें पाहून त्यांच्या मनास असें वाटलें, कीं आतां तो आपला सराफाशीं झालेला व्यवहार आणि इतर सर्व गोष्टी बाहेर पडतील, आणि आपल्यावर शेकेल. आतां या प्रसंगीं मुंबईस जाऊन वकिलाची सल्ला घेऊनच काय तें करावें. दुसरा कांहीं मार्ग नाहीं. या गृहस्थाला हो हो म्हणून त्याचेबरोबर जावें, आणि केव्हां तरी त्याला गुंगारा देऊन आपण आपल्या वकिलाची गांठ घ्यावी. या गांवांत असून यानें वॉरंटबिरंट आणावें, त्यांत कांहीं अर्थ नाहीं. असा पोक्त विचार करून स्वारींनीं त्यास, " मी आपलं सर्व आन्हिक आटपून आपल्याबरोबर येतों. माझी कांहीं हरकत नाहीं. न्यायाच्या कामांत प्रत्येक माणसानं मदत दिलीच पाहिजे. मला जी माहिती आहे, ती मी कोणाची भीडमुर्वत न धरितां स्पष्टपणानं सांगेन. कधीं चुकणार नाहीं. आपल्याला काय ? " असें ह्मटलें व स्वारी उठून आपल्या तयारीला लागली. मनांत एकसारखी भीति वाटतच होती. इकडे वहिनीसाहेबही फार चडफडत होत्याच.

गाडीच्या योग्य वेळीं काकासाहेब निघाले. तेव्हां काकासाहेबांनीं पोलिस गृहस्थास दोन अटी घातल्या. " एक माझे भाड्याचे पैसे तुम्हीं दिले पाहिजेत, आणखी तुम्ही माझ्याबरोबर आगगाडीवर येतां उपयोगी नाहीं. तुम्ही परस्पर स्टेशना-

वर जावें, मी परस्पर जाईन. माझें सेकंड क्लासचें तिकीट काढून मी निराळा बसेन. तुम्ही माझ्याजवळ येतांसुद्धां उपयोगी नाहीं. गांवचे लोक आहेत मोठे चमत्कारिक. तुम्हांला माझ्याबरोबर पाहिलं, म्हणजे उगीच नाहीं नाहीं त्या कंड्या ते लोक उठवायचे. तर एवढ्या गोष्टी जर तुम्हांला कबूल असल्या तर मी येतों. नाहींपेक्षां तुम्ही बेलाशक वॉरंट आणा. मला त्याची भीति नको. तुमच्याजवळ कांहीं पार्डी असली, तर ती दाखवा."

पोलिस गृहस्थ जरासा थबकला. नंतर म्हणतो, "मी तुमचा शोध करीत करीत आलों तेव्हांच जिकडे तिकडे बभ्रा झाला आहे. पण तुम्हांला नको, तर आम्ही तुमच्याबरोबर येत नाहीं, परस्पर जाऊं आणखी तुमचं तिकीटही काढून देऊं. तुमच्यासारख्याला विनाकारण तसदी द्यावी असा आमचा हेतु नाहीं. आणखी आपल्याला तसदी बिलकुल देऊं नये अशाच आम्हांला सांगी आहे. नाइलाज झाला, तरच तसदी द्यायची, नाहीं तर तसदीचं काय कारण! आम्ही जातों. आपण परस्पर स्टेशनावर या" असें म्हणून तो गृहस्थ निघून गेला. आपण जाण्यावेरीज गत्यंतर नाहीं, हें काकासाहेबांस दिसतच होतें. तेव्हां त्यांनीं कांहीं एक कां कूं न करतां स्टेशनचा रस्ता धरण्याचा विचार केला. इतक्यांत वहिनीबाईसही या वेळीं एकाएकीं त्यांच्याबरोबर निघण्याची उत्कट इच्छा झाली आणि त्याही त्यांचेबरोबर निघाल्याच.

त्यांनीं अमुक एक गोष्ट करावयाची म्हटल्यास काकासाहेबांचें आतां कांहींच चालत नसे, हें आतां सांगावयास पाहिजे असें नाहीं.

# प्रकरण ८९ वें.

## सर्वस्फोट.




काकासाहेबांनीं मग आपल्या कारकुनासही बरोबर घेतलें. तें एका अर्थी बरें झालें. कारण काकासाहेबांस पाचारण करण्यास आलेला पोलिस गृहस्थ त्यांस स्टेशनावरून थेट साहेबांकडे चलण्याचा आग्रह करूं लागला. शेवटीं त्यांनीं त्याच्या मर्जीप्रमाणें करण्याचें कबूल केलें व कुटुंबास कारकुनाबरोबर आपल्या उतरण्याच्या ठिकाणीं लावून दिलें.

काकासाहेब मुंबईस येऊन दाखल होतात तों त्यांच्या मनाची मोठी धांदल! काय आपल्याला विचारणार आणि कोण विचारणार, याचा त्यांच्या मनांत कांहींच बरोबर जम बसेना. आधीं आपल्या विरुद्ध काय आहे, याचीही त्यांस कल्पना होईना. सराफाची आपण मनधरणी करून सर्व

कांहीं मिटवामिटव केली असून त्यानें पुनः आपणावर ही घोरपड आणली असली तर त्याच्यासारखा नीच तोच असें म्हटलें पाहिजे, असें म्हणून ते त्यास शिव्या देत होते. दादासाहेब कदाचित् बरे झाले असून त्यांनीं आपल्या नोटांबद्दलची हकीकत सांगून त्यामुळें आपला अप्पलपोटेपणा बाहेर पडला असेल व कोणी तरी आपल्यास कैदेंत नेऊन घालणार असेल, असेंही पण त्यांच्या मनांत आल्याखेरीज राहिलें नाहीं. 'खाई त्याला खवखवे' म्हणतात तशांतलीच स्थिति काकासाहेबांच्या मनाची झाली. जितक्या म्हणून मनाला खाणाऱ्या गोष्टी त्यांच्या हातून झालेल्या होत्या, तेवढ्या आतां मनांत उभ्या राहिल्या, आणि त्यांपैकीं प्रत्येक मनांत आणून, असें तर नसेलना, तसें तर नसेलना, असें म्हणून त्यांच्या डोक्यांत नानाप्रकारचे तर्कवितर्क सुरू झाले. परंतु सराफानें जाऊन सगळी चुगली केली असावी, दुसरें कांहीं नाहीं, हें मात्र वारंवार—नव्हे, तर सतत—त्यांच्या मनाला खात होतें.

'आलिया भोगासी असावें सादर ' या न्यायानें स्वारी उठून त्या पोलिस अधिकाऱ्याबरोबर चालली होती. करणार काय ! त्यांस क्षणभर उसासा टाकण्यास सुद्धां त्यांनीं कांहीं अवकाश दिला नाहीं. काकासाहेब साहेबाचे बंगल्यावर जाऊन पोहोंचले, तेव्हां दुसरा कोणी साहेबाशीं मुलाखत करीत होता; अर्थातच काकासाहेबांस बाहेर बसावें लागलें. "इथें बसून रहा. साहेबांची वेळ झाली, दुसरा कोणी त्यांच्याशीं बोलत बसला आहे तो गेला, कीं साहेब तुम्हांला तावडतोब बोलावतील. तोंपर्यंत मी आमच्या त्या पलीकडल्या हाफिसांत जाऊन रपोट करून येतों. हा अडलों आहेच इथें साहेबानं हांक मारली तर," असें म्हणून त्यांच्या बरोबर आलेला इसम तेथून गेला. काकासाहेब बसले होते तेथून साहेबांची बसण्याची खोली फार जवळ होती. इतकी कीं, आंतील माणसें काय बोलताहेत हें ऐकूं सुद्धां यावयाचें; आणि खरोखरी या वेळीं ऐकूं येतही होतें. मात्र ऐकूं इच्छिणारास ऐकण्याकरितां थोडें सावधान होऊन तिकडे चित्त दिलें पाहिजे होतें. काकासाहेब तसें चित्त देण्यास तयार होते. प्रथमतः तसें चित्त देण्याला त्यांना कारण झालें तें असें कीं, एकवार "माझ्या मुलीचे अंगावरचे दागिने ते हो. दुसरे कुठले नाहींत," असे शब्द त्यांच्या कानीं पडले ! तें भाषण ऐकतांच काकासाहेबांस अत्यंत आश्चर्य वाटलें, आणि ते विशेष कान देऊन ऐकूं लागले. कारण जो कोणी आंत बोलत होता, त्याचा आवाजही ओळखल्याप्रमाणें त्यांस वाटलें. दागिन्यांचीच गोष्ट, आणि बोलणाऱ्याचा आवाज ओळखीचा, मग काय विचारतां ? काय व कशाबद्दल आहे, तें काकासाहेबांनीं अवश्य ऐकलेंच पाहिजे असें झालें. निदान ऐकण्याला सबब त्यांनीं तेवढी काढून अगदीं मन लावून आंत काय चाललें आहे तें शब्दन् शब्द ऐकण्यासाठीं त्यांनीं आपले कान सरसावले. तों खालीं दिल्याप्रमाणें सर्व शब्द त्यांच्या कानीं पडले. तो गृहस्थ म्हणालाः

"काय करूं, साहेब, माझा कारटा इतका वाईट असेल अशी मला कल्पनासुद्धां नव्हती. तो शिकत नाहीं, उडाणटप्पूपणा करितो, हें मला माहीत होतं, पण तो त्या पाजी आणखी हलकट लोकांच्या

नादीं लागला असेल, ही तर मुळींच माहिती नाहीं. काय करणार? अशी जर कारटीं निघालीं तर आम्हीं आईबापांनीं तरी काय करावं? आहे कांहीं दिवस आमचा त्यांचा संबंध तोंपावेतों होईल तितके श्रम करून सगळ्यांना खायला घालावं. नाहीं ते दिवशीं काय वाटेल तें त्यांचं होवो. आतां दुसऱ्याच्या घरीं दिलेली पोरगी! तिचे दागिने तिनं आपल्या-बरोबर आणले, ते कि हो या पोरानं येऊन आपल्या आईला भुलथापा देऊन नेले; आणखी त्या दागिन्यांवर तो ह्मणे, त्या इयांकेंत मोठी थोरली चाकरी मिळविणार होता! आतां काय म्हणतां, साहेब? बोला. लेकानं ते दागिने नेले. पुढं मुलीचा नवरा आला इथें तिला न्यायला, तेव्हां दागिन्यासाठीं हाहा:कार झाला. शेवटीं त्या इयांडीच्या हलकटाच्या पाठीस लागलागून ते दागिने परत आणले. अहो, साहेब, तें काळाच्या जाभाड्यांतूनच दागिने काढलेसे मला वाटलं. पण आतां तुम्ही सांगतां हें भलतंच. ते दागिने खोटे असतील अशी मला शंकासुद्धां नाहींहो आली. मी ते घरीं नेले. दुसरे दिवशीं आमचे जांवई-बोआ आले त्यांनीं ते नेले. त्यांनासुद्धां शंका आली नाहीं. आम्हा भटभाईचा हा असाच अगुद्धाळ व्यवहार. त्यांस कांहीं सुद्धां समजायचं नाहीं. चांगले पिंवळे झगझगीत दागिने असले कीं, उत्तम सोन्याचे! का कोणाला ठाऊक आमच्या जहागीदार जांवयांनींच आम्हांला फसविण्यासाठीं सगळे खोटे दागिने आमच्या-कडे पाठविले होते! आमचे जांवई अगदीं त्यांतल्या कृति करायला मागं पुढं पहाणारे नाहींत."

साहेबः—पण, तुम्हीं मुलीचे दागिने आपल्या जांवयापासून घेतले, तेव्हां पाहून नाहीं घेतले कसे? तो मला चमत्कार वाटतो."

गृहस्थः—चमत्कार कसला साहेब! पोरीचे दागिने दुरून बघायचे आणखी स्वस्थ बसायचं. बरं, त्यांच्यावर कांहीं आपली मालकी असते, का आपल्याला त्यांचा कांहीं उपयोग करून घ्यायचा असतो? कांहीं नाहीं. मग पोरीच्या दागिन्यांची एवढी पुसतपास कोण करितो! पण मला वाटतं, कीं मूळचे दागिने काकासाहेबांकडून आले तेच खोटे व बनावट असले पाहिजेत. अहो, आमच्या-विपक्षींचा त्यांना अगदीं बेभरंवसा. आम्ही कदाचित् खाऊन बसूं. अशा बेभरंवशामुळे त्यांनीं हा खोटा जोड करून ठेविला होता. तो आमच्या घरून आमच्या चिरंजीवांनीं नेला. आणखी जेव्हां तो खोटा आहे असं आढळलं, तेव्हां गुलामांनीं आमचा आम्हांला परत दिला. अहो, आमचे जांवईबोआ फार वस्ताद आहेत. त्यांचंच हें कृत्य मला दिसतं आहे. बाकी तो राजाराम की कोण, तो मला माहीत नाहीं. नांवानं सुद्धां ठाऊक नाहीं. तेव्हां त्यानं हे दागिने केले, असं कसं म्हणावं? आपण आमच्या त्या गंगापुरच्या सन्-इन्-लॉना बोलावून आणून एकदां त्यांचा जबाब घ्यावा. ह्मणजे सर्व कांहीं आपल्याला समजून येईल. ते कांहीं दिवसा-पूर्वी इथें होते, आतां नुकतेच परत गांवीं गेले. त्यांनी आणून विचारलं, कीं अगदीं चक्क काम होईल.

साहेब त्यांस म्हणतातः "ठीक आहे. ती तजवीज आम्हीं केलीच आहे. ते आतां घटक्या अर्ध्या घटकेंतच इथें येऊन

दाखल होतील. त्यांच्यापासून पुष्कळच माहिती मिळणार आहे 'कोइहे ! " साहेबांनीं असें म्हणण्याचा अवकाश लागलीच एक अडली यांच्यापुढें उभा राहिला. त्यास त्यांनीं विचारलें, "अरे, बाहेर कोणी आला आहे ? ते गंगापुराच्या काकासाहेबांना आणायला गेलेले आले काय ! "

त्यानें, "होय, ते आले, आणखी ते गृहस्थही बरोबर आले आहेत. बाहेर बसले आहेत," असें उत्तर दिलें त्यावरोबर त्यांनीं त्याला बोलाविण्यास सांगितलें.

आपले सासरे आपल्याबद्दल काय बोलतात हें ऐकल्या वेळेपासून काकासाहेबांच्या नखपायाची आग मस्तकास जाऊन पोहोंचली. हाच त्यांचा सासरा जर दुसऱ्या कोठें भेटता, आणि असें कांहीं बोलता, तर काकासाहेबांनीं त्यांचे पण वाभाडे काढले असते. परंतु या ठिकाणीं काय बोलतात ? साहेबाच्या अडलीनें त्यांस बोलावून आंत नेतांच त्यांनीं एकवार संतापून त्यांजकडे पाहिलें मात्र. इतक्यांत साहेबांनींही त्यांचा चेहरा पाहिला व त्यांच्या लक्ष्यांत आलें, कीं गृहस्थानें आंत चाललेलें भाषण ऐकलें असावें. तथापि त्या संबंधांत कांहींही न बोलतां त्यांनीं काकासाहेबांस एका खुर्चीवर बसण्याविषयीं विनंति केली. नंतर ते त्यांस म्हणतात, "काकासाहेब, आपल्याला इतक्या त्वरित येण्याची तसदी दिली त्याबद्दल माफी असावी. पण ही दागिन्यांची लटपट काय आहे, एवढं मला जरूर कळायला पाहिजे. आपण त्या सराफाच्या घरीं गहाण ठेवायला नेलेले दागिने आपणच खोटे केलेले होते, कीं आपले खरे घेऊन कोणी तरी आपल्याला बनावट दागिने आणून दिले ? माझ्याजवळ अगदींसुद्धां कांहीं बोलायला आपण संकोच करूं नका. मी आपला पुतण्या आहें, आणखी म्हणूनच आपल्याला काकासाहेब म्हणतों, असं आपण समजा. पण काय खरं असेल तें सांगा. आपण खोटेच मनवून ठेविले होते का ? "

"नाहीं साहेब. हा सदूनाना आमचा सासरा खरा, पण फार लुच्चा. माझ्या घरून याच्या घरीं दागिने गेले, ते अगदीं बरोबर बावन्नकशी सोन्याचे, आणखी उत्कृष्ट हिऱ्यामाणकामोत्यांचे होते. हा स्वतः फार लुच्चा आहे. यानं ते आपल्या घरीं आल्यावर गिळंकृत केले. आणखी खोटे मनवून माझ्या डोळ्यांत धूळ टाकण्याकरितां माझ्याकडे पाठवून दिलेत. मला पैशाची जरूरी लागली म्हणून माझा तो स्नेही सराफ त्याच्याकडे नेले, तोंपर्यंत मला कल्पनासुद्धां नाहीं, कीं हे दागिने माझे बदललेले असतील कीं खरे काढून घेऊन खोटे कोणी आंत भरून ठेविले असतील. त्यांनीं जेव्हां माझ्याकडे येऊन मला छेडलं, तेव्हां तें मीं पाहून लागलीच त्याच्यापासून घेतलेल्या रकमेची कशी तरी भरपाई करून देऊन आपला गळा सोडवून घेतला. साहेब, हा लुच्चा आहेहो. यानं जाणूनबुजून अगदीं हा प्रकार केला यांत शंका नाहीं. आपण याची चांगली कानउाडणी करा, म्हणजे हा तेव्हांच कबूल होईल. मी प्रत्यक्ष याच्या पोरीचा नवरा. असं असून माझ्यावर हा असला खोटा, तुरुंगांत घालण्याजोगा आरोप करतो ! आतां काय म्हणावं ! साहेब, तुम्ही आतां याचा निर्णय करा. "

सदूनाना म्हणजे कांहीं कमी नव्हता, तोही आपल्या जागेवरून उसळला आणि म्हणाला, "पोरीचा नवरा झालास म्हणून काय झालं, तूं जर माझा प्राण घ्यायला

उठलास, तर मी तुला गय करूं काय ? माझी अगदीं पक्की खात्री आहे, कीं तुझ्या घरून आमच्याकडे दागिने आले, तेच मुळीं खोटे होते. नाहीं तर ते परत घेतेना. खरे समजून त्यांनीं नेले, आणखी खरे नाहींत असं वाटलं, तेव्हां ते परत केले. करतात काय ? तुम्हींच आमच्या गळ्याशीं कांहीं तरी घोर आणण्याचा यत्न केला होता. मर्थ हें......"

परंतु काकासाहेब त्यास बोलूं देईनात. मर्धेच त्याच्या अंगावर उसळून गेले. तिकडून तोही उसळला. आणि आपण कोठें आहोंत, काय आहोंत याची जणूं काय स्मृति अजीबाद विनष्ट होऊन ते एकमेकांशीं भांडूं लागले. मि. सर्च-लाईटसाहेब अगदीं खरे पोलिस ऑफिसर होते. मूर्तिमंत धिमेपणा त्यांचे अंगीं होता. त्यांनीं थोडा वेळ त्या दोघांची बाचाबाची मौज होऊं दिली, नंतर सदूनानास तेथून निघून जाण्यास सांगितलें. पुनः मला जरूर लागेल तेव्हां तुला बोलावणें पाठवीन, असेंही सांगितलें. आणि मग एकट्या काकासाहेबांस त्यांनीं प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. सर्चलाईटसाहेबांनीं त्यांस प्रश्न केले, ते अशा प्रकारें केले, कीं जणूं काय आपल्याला त्यांच्या एकंदर हकीकतीची खडानखडा माहिती आहे. आणि आपण केवळ प्रत्यंतर पाहण्यासाठींच त्यांस बोलावून आणलें. काकासाहेब इतर बाबतींत कितीही वस्ताद असले, तरी जेथें सरकारचा किंवा पोलिसचा वगैरे संबंध आला, तेथें अगदीं स्वारीची त्रेधातिरपीट उडावयाची. इतर बाबतींत इतरांच्या समोर कशाही लंबेलंबे गप्पा त्यांनीं मारल्या, तरी प्रस्तुतसारख्या प्रसंगीं, त्यांची अगदीं गाळणच उडून जावयाची. तीच स्थिति या वेळीं होऊन सर्चलाईटसाहेबांनीं जें जें विचारलें, तें तें त्यांनीं अगदीं खुलास मन करून कांहींही मागें न ठेवतां निवेदन केलें. बिंदुमाधव पांडे नांवाच्या इसमानें किमया करण्याच्या मिषानें आपणास किती हजार रुपयांस फसविलें, त्यास आपण कसकशा रकमा दिल्या, त्याच्या औषधामुळे आपण त्याच्या कसे नादास लागलों, आणि शेवटीं त्यानें एके दिवशीं आपणास कशा तुरी दिल्या, शेवटली रक्कम देण्यासाठीं आपण आपले बायकोचे दागिने किती अट्टाहासानें आणले आणि गहाण ठेवून रुपये आणून त्याला भरून एक दोन दिवस जातात, तों त्याचा तो दवाखाना कसा अदृश्य झाला, तो कोणीकडे गेला, आणि सराफानें आपली अवस्था काय केली, वगैरे सर्व हकीकती काकासाहेबांनीं अगदीं इत्थंभूतपणें त्यांना सांगितल्या. साहेबांनींही ती त्यांची सर्व चर्पटपंजरी अगदीं शांत व स्वस्थपणें ऐकून घेतली. नंतर ते त्यास म्हणतात, "हे सर्व ठीक आहे. पण दागिने खोटे कोणीं केले हें तुम्हांला कळलं, म्हणजे तुमचे तुम्हांला सुद्धां फार आश्चर्य वाटेल. दागिने बनावट केले, त्यांत मुख्य अंग तुमच्या बिंदुमाधव पांड्याचेंच. तुमच्या मेहुण्यानें तुमच्या बायकोचे दागिने चोरले. ते ठ्यांकेंत ठेवायला म्हणून नेले ते त्या झ्यांडीनें मधल्या मधें खाले. नव्हे त्याला त्यांतला कांहीं भाग मिळाला. पुष्कळसा भाग त्या दुसऱ्यानेंच—त्या तुमच्या बिंदुमाधव पांड्यानेंच—घेतला. नंतर त्यानेंच ते बनावट दागिने केले, आणि ते दागिने तुमच्या सासऱ्याकडे जाऊन तुमच्याकडे आले. असा त्या

दागिन्यांचा इतिहास आहे. हा चिंदुमाधव पांडे ह्मणजे मुंबईच्या एका मोठ्या गोल्डन ग्यांगमध्यें आलेला एक नवीन माणूस आहे. त्यानं आणखी किती तरी कारस्थानं करून कितीक लोकांचे गळे कापले आहेत. पण तो आतां सांपडला आहे. आणखी त्याच्यामुळें दुसरेही कित्येक सांपडले आहेत. त्यांच्यावर लवकरच खटले होतील, तर तुमची साक्ष दिली जाईल. त्याला आतां आह्मीं पकडून कांहींतरी एक चार्ज त्याजवर आणून बंदींत ठेविलाच आहे. साक्षीपुरावा आतां गोळा होतो आहे. त्यांत त्याचे जीवश्चकंठश्च असे स्नेही पकडले असून त्यांचेकडून नानाप्रकारच्या गोष्टी काढून घेतल्या आहेत. आतां फक्त त्याजवर कोणकोणते चार्ज ठेवायचे तेवढंच ठरवायचं राहिलं आहे, दुसरं कांहीं नाहीं. तेव्हां आतां आपण जा, परंतु मुंबई सोडून जाऊं नका. उद्यां सकाळीं पुनः इथें या. आपली मी एकवार जबानी घेईन. आपल्या साक्षीपासून आह्मांला काय घ्यायचं, काय नाहीं, काय उपयोगी पडेल, वगैरे पाहून मग तुह्मांला वाटल तर गांवीं जाण्याला परवानगी देईन. तोंपर्यंत आपण मुंबई सोडतां कामा नये. मला कायदेशीर अडथळा तुह्मांला करतां येणार नाहीं. वगैरे वकिली सल्ला ऐकून भलतं सलतं कांहीं करूं नका. मी खाडकन् सराफाकडून तुमच्यावर विश्वासघाताची नाहीं तर फसवेगिरीची फिर्याद करवीन आणि तसे अटकेंत ठेवीन. आमच्या समोरून एकदां तुमच्यासारखे लोक गेले, ह्मणजे मग वकिलांविकिलांना भेटून त्यांच्या अकलेला फांटे फुटतात. आणखी मग आह्मांला ते त्रास देऊं लागतात. आह्मांला त्यांच्यापासून काय जें करून घ्यायचं असेल, तें आह्मी करून घेतोंच ह्मणा, कधीं सोडीत नाहीं, पण आमच्या तंत्रानं चाललं, तर जें अगदीं सरळपणानं व्हायचं, तें मग वाटेल तशा गफलती करून आह्मांला आपल्यासारख्याला वांकवून करून घ्यावं लागतं. तेव्हां तसं आतां तुह्मी तरी निदान करूं नये, ह्मणून आपलं तुम्हांला बजावून ठेवतों. याउपर तुमची मर्जी. तुम्ही माझ्या मर्जीप्रमाणं सर्व व्यवस्था कराल, तर तुमच्यावर कांहीं शितोडा येणार नाहीं; इतकंच नाहीं, तर तुमचं जें काय गेलं आहे त्यांतूनसुद्धां बराचसा भाग तुमचा तुम्हांला मिळेल, अशी तजवीज मी करीन."

साहेबानें स्वतः असा धाक घातल्यावर काकासाहेबांची घाबरगुंडी वळल, यांत नवल काय ! सर्चलाईटसाहेबांनीं जें जें म्हणून त्यांस कबूल करण्यास सांगितलें, तें तें त्यांनीं कबूल केलें फक्त एवढेंच विनवून सांगितलें कीं, "कृपा करून मला आपलं माझ्या गांवीं जाऊं द्या. जेव्हां तुमचा मला निरोप येईल किंवा समन्स येईल, तेव्हां मी आपला आपल्यापुढें हजर होईन. पण मुंबईत राहण्याचा मला आग्रह करूं नका. याउपर आपली मर्जी ! "

सर्चलाईटसाहेब त्यास हंसून म्हणतात, "निदान तीन दिवस तरी तुम्हांला असायलाच पाहिजे. त्यानंतर तुम्हांला जाण्याची परवानगी देईन. बाकी तुम्ही इथें रहायला नको म्हणून कां म्हणतां तें आमच्या लक्ष्यांत आलं. तुमच्यावर ज्यानं ऐन प्रसंगीं फार उपकार केले, त्याला मधेंच संकटांत सोडून पळालांत, तें मनाला खातं आहे. पण तसं खायला नको. ते 'गृहस्थ

आतां पुष्कळ बरे आहेत. तुम्हीं त्यांच्यापासून घेतलेल्या नोटा तुम्हांला पचतील, हें संभवनीय नाहीं. आतां तुम्हीं उलटूनच पडलां तुमच्या स्वभावाप्रमाणं, तर नाइलाज आहे. पण तुम्हांला तें काम जितकं सोपं आहे असं वाटतं, तितकं तें सोपं नाहीं, एवढं ध्यानांत धरा. त्यांचे घेतलेले रुपये त्यांना परत द्या. जो व्यवहार फार गुप्तपणानं त्यांच्या व तुमच्या दरम्यान झाला, तो मला अगदीं इत्थंभूत कसा कळला, याबद्दल तुह्मी आतां उगीच आश्चर्य करीत नका उभे राहूं. जा. आणखी जेव्हां मी बोलावीन तेव्हां इथें येत जा. उद्यां सकाळीं आठ वाजतां याच. उद्यां मला तुह्मांला पुष्कळ गोष्टी सांगायच्या आहेत, आणखी पुष्कळ विचारायच्या आहेत. समजलांत ? जा." काकासाहेब तेथून गेले, ते हा साहेब सर्वसाक्षी आहे कीं काय, असें आश्चर्य करीतच गेले.

---

# प्रकरण १० वें.

## सर्वस्फोट [ पुढें चालू ].



पद्माकरानें शेवटीं राजारामाच्या पत्राला हात घातला आणि तें फोडून उलगडून वाचूं लागला. तें फोडतांनाच त्याचे हात थरथरां कांपत होते. ओंठही फुरफुरल्याप्रमाणें करीत होते. त्याच्या चर्येवर कांहीं चमत्कारिक कळा आली होती. आणि नेत्र तर फारच विस्तृत झाले होते. तो वाचूं लागला, आणि जसजसे त्याचे डोळे त्या कागदांवरून फिरूं लागले, तसतसें त्याचें चित्त गढून गेलें. एखादी लहानशी परंतु चित्तंकषा कादंबरी वाचतांना जशी अंतःकरणाची स्थिति होते, तशी त्याची अवस्था झाली. दर ओळींत त्याचें अंतःकरण गुंतलें. जें काय त्यानें वाचलें, तें जसेंच्या तसेंच येथें देतों म्हणजे वाचकांसही त्यांत मौज वाटेल. "पद्माकरपंत, प्रभाकरपंत, मी अटकेंत असतांना मला हें एवढं बाड कसं लिहायास सांपडलं याचं तुम्हांस आश्चर्य वाटेल. कारण कैदेंत माणूस असला म्हणजे त्याच्या प्रत्येक हालचालीवर अतोनात कदर असते. परंतु मी कैदेंत आल्या वेळेपासून मीं आपली ऐट अशी राखून घेतली आहे, कीं जणूं काय मी एक लहानसा संस्थानिकच आहें.

"अशा तऱ्हेनं हे लोक मला वागवीत आहेत. माझी मनधरणी केल्यास मी त्यांना आपला एकंदर कंपूच्या कंपूच सांपडवून देईन, असं वाटत आहे आणि मीही पण खरोखरीच मला जितक्या गोष्टी सांगून टाकायच्या तितक्या सांगून

टाकून आमची सगळी मंडळी थोड्याबहुत प्रसादाला पात्र होतील, असं करणार आहे; परंतु ते एकदम कधींही करणार नाहीं. कारण एकदम केलं, तर हेच लोक माझा कांहींसुद्धां बडेजाव ठेवणार नाहींत. तेव्हां आज एखादी गोष्ट सांगितली, उद्यां एखादी गोष्ट सांगितली, असं मीं चालविलं आहे. काल त्यांना अशी थाप मारली कीं, मी आपलं सर्व चरित्र थोडक्यांत लिहून काढून त्यांच्या स्वाधीन करतों म्हणजे त्यांत सर्व कांहीं येईल. त्यांनींही अगदीं मोठ्या हौसेनं तें सर्व कबूल केलं. मला लागणारी सामग्री दिली. सामग्रींतलेच हे सर्व कागद. त्यांवर ही हकीकत लिहिली. ही लिहिली तेव्हांच ही तुम्हा दोघांकडे पाठवायची, पोलिसाच्या हातांत द्यायची नाहीं, असा निश्चय केला होता आणि लिहून काढली. परंतु हिच्याबरोबर आणखी एक दस्ताभर कागद उगीच खरडून नासून त्यांच्या पुनः चिंधड्या करून ठेविल्या. अर्थातच मीं जें काय लिहिलं, तें सर्व पुनः फाडून टाकलं, असा भास त्यांचा करून दिला. मीं किती कागद लिहिले आणि किती नाहीं, याचा त्यांना मुळींच अंदाज करतां येऊं नये, अशा बेतानं त्या चिंधड्या करून टाकल्या होत्या आणि हे कागद अशा बेतानं झांकून ठेविले, कीं ते मज जवळ आहेत हें कोणासच समजूं नये. वस्तु लपवायची असली म्हणजे कोणीकडे आणि कशी लपवायची, याची शिताफी अगदीं बालपणापासून मला पूर्ण; तेव्हां आतां ती शिताफी मला इतकी नैसर्गिक झाली आहे, कीं तींत विशेष असं मला कांहींच वाटत नाहीं. ती हकीकत लिहिण्याचं कारण काय म्हणाल, तर तें मात्र थोडंसं विचित्र आहे. आजपर्यंत जो विकार कधीं म्हटल्या कधींसुद्धां माझ्या मनास शिवला नाहीं, तो आज एकाएकीं माझ्या मनाला शिवला. केल्या गोष्टीबद्दल पश्चात्ताप आजन्मांत मला कधीं झाला नाहीं. लहानपणीं तरी काय ? जर कांहीं चोरी केली तर आणि ती बाहेर आली व मला तिजबद्दल शिक्षा झाली, तर मला माझ्या चोरीबद्दल कधींच पश्चात्ताप झाला नाहीं; उलट शिक्षा करणाऱ्याबद्दल द्वेष मात्र माझ्या मनांत अगदीं भडकून रहात असे. तीच स्थिति परवां तेरवांपर्यंत होती.

"परंतु परवां ती एकाएकीं बदलली. मला माझ्या कृतकर्मांचा पश्चात्ताप झाला. इतकेंच नव्हे, तर माझ्या दुष्ट कृतीमुळें माझा कांहींएक फायदा न होतां एका अगदीं गरीब, निरुपद्रवी व निरपराधी प्राण्यास विनाकारण लोकनिंदेचे आघात सहन करायास लागून सगळा जन्म व्यर्थ घालविण्याची अत्यंत हीन दीन किंबहुना नीच अवस्थेंत तो घालविण्याची पाळी येते आहे, हें पाहून माझ्या मनाला फार वाईट वाटलं आणि आपण आतां जर काळ्या पाण्यावर जाणार खचित, तर जातां जातां तिला तरी तिच्या पूर्वस्थितींत आणून टाकण्याचा यत्न कां करूं नये ? असं मनांत आलं. आणि तेवढ्या बाबतींत तुला एक सविस्तर पत्र लिहावं, असंही मनानं घेतलं.

"त्यामुळें चरित्र लिहून देण्याची लालूच पोलिस अधिकाऱ्यास दाखविली. तेही त्या फांशांत सांपडून त्यांनीं मला कागद व लिहायचीं सर्व साधनं दिलीं. त्या साधनांचा उपयोग करून घेतां घेतां अशी इच्छा झाली, कीं आपलं सगळं चारित्र्य अगदीं

थोडक्यांत लिहून काढावं. त्या इच्छेनं हा लेख तर तयार करतों आहे. आतां हा लेख तुझ्या हातांत कसा जाईल याची काय ती काळजी. परंतु ती काळजी करण्याचं मला मुळींच प्रयोजन नाहीं. मला अमुक एक गोष्ट अशी व्हावी असं वाटलं, आणि ती झाली नाहीं, असं कधींच झालं नाहीं. यामुळें मी जें काय करतों, तें अगदीं सिद्ध होणारच, अशा दृढनिश्चयानं व श्रद्धेनं करतों. मजवर परमेश्वराची म्हणा किंवा सैतानाची म्हणा, पण कृपा आहे, अशी माझ्या मनाची पक्की खात्री आहे. कांहीं तरी प्रसंग येऊन मला तुझ्या हातीं हे पत्र पावतं करतां येईल असं होणार आहे, त्याप्रमाणं होईलच. मला आतां त्याच्याबद्दल बिलकुल शंका नाहीं.

"मी मूळचा गंगापूरचा राहणारा. माझे वडील लहानपणींच वारले. एकटी आई होती. ती गंगापूर क्षेत्र असल्यामुळं तिथं अनेक सहस्रभोजनं, व्रतांचीं उद्यापनं, श्राद्धं वगैरे होतात व क्षेत्रोपाध्यायांच्या मार्फत लघुरुद्र, महारुद्र वगैरे होतात, त्यांत पोळ्या किंवा स्वयंपाक करून त्यावर जें काय मिळेल तें खाऊन व मला घालून असे. तिची मोठी इच्छा ही कीं, मीं शिकावं आणि मोठा वैदिक ब्राह्मण किंवा शास्त्री बनावं. या हेतूनं तिनं मला शाळेंत जाऊं दिलं नाहीं. एका वैदिक व शास्त्री म्हणविणाऱ्या उपरी भटाच्या घरीं संथा घेण्यास पाठविलं. या भटजींचं ऊर्फ शास्त्रीबोवांचं नांव गुंडभट्ट होतं. या शास्त्रीबोवांचा स्वभाव फार मोठा लटपट्या असे. याच्याइतका लुब्धप्रतिष्ठ असा हाच. सगळे भिक्षुक लोक याची फार निंदा करायचे, त्याला लुब्धभट म्हणायचे. आधीं भिक्षुक म्हणजे किती लुब्ध असतात, त्यांत त्या सगळ्या लुब्धांत लुब्ध म्हणून नाणावलेला हा भटजी असे.

"कोणाच्याही घरांत पुरुषांपेक्षां बायकांकडे याचा वशिला जबर. यामुळें याचं चांगलं चाले. गांवांत कुठें कांहीं हव्यकव्य असलं, तर घरांतल्या आंतल्या वशिल्यानं याला आपलं एक आमंत्रण असायचंच. या गुंडभटाचाच एक भाऊ असे. तो वैद्यकाची शेखी मिरवीत असे. त्याचं नांव कोंडभट्ट असे. तो भिक्षुकीही करी, परंतु त्याचा भर सगळा वैद्यकीवर असे. येत नसे कांहीं. कधीं कोणी रोगी याच्या औषधानं उठला आहे, असं गांवांत कोणाला म्हणून अनुभवाला आलं नाहीं. यामुळें कोंडभट्ट गुंडभट्टाचा जोडा म्हणजे एक गांवांतली थट्टाच होऊन बसली होती. त्यांनीं मला आपल्या हाताखालीं आपलीं औषधं कुटाघोटायला बसवावं, आणि मी हुशार असल्यामुळें कोंडभट्ट व गुंडभट्ट दोघांनींही मला आपल्याबरोबर वगैरे न्यावं, असा प्रकार नेहमीं चाले. एकदां तर गुंडभट्टाबरोबर मी आमच्या गंगापुरांतले मोठे शहाणपणाचे पट्टे काकासाहेब नांवाचे एक लुब्धप्रतिष्ठ व जिथें तिथें पुढें मिरवूं पहाणारे असे गृहस्थ आहेत त्यांच्याकडे गेलों होतों. त्यांचं कुटुंब त्या वेळीं आजारी पडलं होतं आणि आपल्या बंधुराजाचं औषध त्यांना सुरू करा म्हणून गुंडभट्टांनीं काकासाहेबांस आग्रह चालविला होता, व काकासाहेबांकडून "ती आतां मेली तरच बरं, असं वाटायला लागलं, म्हणजे तुमच्या बंधूच्या स्वाधीन करूं. ती लवकर तरी त्या यातनांतून सुटेल," असं त्यांना उत्तर मिळालं. त्यांचं ह्यावर भाषण एक

प्रकारचं लाडझगड्याचंच चाललं होतं; कारण गुंडभटांचा त्यांच्या घरांत फार मोठा वशिला होता. त्या वशिल्यामुळें गुंडभट्ट काकासाहेबांनीं जोडे मारले तरी हंसायचाच ! अशी ही गुंडकुंडांची जोडी होती; आणि आमचं अध्ययन त्यांच्या घरीं त्यांच्या चरणांपाशीं झालं. मलाही पण कधीं कुठें शिकावंसं वाटलं नाहीं. कारण एवढ्या थोरल्या गंगापुरांत रोज दहावीस तरी उपाध्यायांच्या घरीं ब्राह्मण-संतर्पणं असायचीं. त्यांत एखाद्या ठिकाणीं तरी माझी आई पोळ्या करायला किंवा स्वयंपाक करायला जायची. अर्थातच मला जेवायला न्यायची, तेव्हां आमचं दोघांचंही जेवण बाहेर पडायचं, कपडालत्ता असाच मिळवायचा आणखी दक्षणा मिळवून पैसा जमवायचा. प्रथम कोणी दक्षणेचा पैसा पानापाशीं विसरला असला, तर त्यावर ताव मारावा या बुद्धीला सुरुवात झाली. नंतर आईचे पैसे चोरण्याकडे प्रवृत्ति धांवली. त्यानंतर सांपडेल तिथें सांपडेल त्यावर ताव मारण्याला आरंभ झाला आणि अखेरीस वाटेल ती वस्तु वाटेल तिथून उचलून नेण्यांत फारच शिताफी झाली. त्या शिताफीचे निरनिराळे प्रकार सांगूं लागलों, तर तुम्हाला फार आश्चर्य वाटेल खरं; पण मला पांचपंचवीस तास आणि तितके ताससुद्धां पुरायचे नाहींत. तेव्हां त्या भानगडींत मी पडत नाहीं. एक दोन गोष्टी सांगून पुरे करितों. एकदां एका उपाध्यायाच्या घरीं ब्राह्मणांना दक्षणा देण्यासाठीं पैसे एका तबकांत पसरून ठेविले होते. त्या तबकाच्या जवळ एक माणूस राखणीला बसला होता आणि माझ्या मनांत तर आलं, कीं यांतून पांच-चार पैशांवर तरी निदान हात मारला पाहिजे. आतां काय करणार ? कांहीं तरी गडबड करून धांवत जातांना तबक लाथाडून दिल्यामुळें सांपडलेले पैसे भरण्याच्या निमित्तानं वांकून पैसे भरतां भरतां लंगवावे, असं मनांत आलं; पण तेवढ्यानंच साधेल कीं नाहीं, याची शंका वाटली आणि आणखी एक युक्ति मनांत आणली. लागलीच बाहेर गेलों आणि शेवग्याच्या झाडाचा चीक काढून तो पायाला चोळला. नंतर त्या पैशांपर्यंत येईतों त्यावर माती चिकटूं नये म्हणून पाय विस्तवावर पडून भाजला, खालीं टेंकूं देत नाहीं, म्हणून हळहळत लंगडत इकडून तिकडे जाण्याचं मिष करून तें तबक तर लाथाडलं व अर्थातच कांहीं खालीं सांडलेल्या पैशांवर तो चिकट पाय देऊन खालीं वांकून पैसे गोळा करूं लागलों. पायाला पांचसहा नितक्यांत चिकटले. मीं दांडगाईनं पैसे सांडले म्हणून मला तितक्यांत त्या भटजींनीं एक धचका दिला. तो बसनांच आयाई ओयाई करीत मी तिथून पळून गेलों. मला तेंच हवं होतं. ही आपली तुला एक युक्ति सांगितली. जेव्हां मी अगदीं सात किंवा आठ वर्षांचा होतों तेव्हांची ही युक्ति बरं का. यावरून माझ्या भावि कलप्रिमत्तेचं तुला थोडं मूळ सांपडेल.

"अशा प्रकारें आमचं एकंदर बाल्य गेलं. अर्थातच त्या बाल्यांत ज्या बालचोऱ्या होत्या, बाल दुष्ट कृत्यं होतीं, तीं ही मागें पडून आतां आमच्याबरोबरच त्यांना प्रौढपणा आला. कोंडभटांच्या मात्रा चोरीस जाऊं लागल्या. त्या विकून पैसे करायला सुरुवात होते न होते, तोंच कुठें सांपडले तर दागदागिन्यांवरही लाट मारायची इच्छा प्रबळ होत चालली आणि तिच्या

सवलतीबरोबर सफलताही मी तिला देऊं लागलों. मग काय, हां हां म्हणतां आमची कीर्ति त्या लहानशा गांवांत पसरली. तेव्हां चांगला मोठा झालों होतों. कोंडभट वारले होते. गुंडभट्टांचं आणखी काकासाहेबांचं फार जमलं होतं. माझी आईही वारली होती. तेव्हां अशी इच्छा झाली कीं, आतां आपण आपला हा गांव सोडून मुंबई-सारख्या प्रचंड शहरांत धंदा चालविण्यास बरं पडेल. या बुद्धीनं विचार करूं लागतों, तों असं वाटलं कीं, कोंडभट्टांच्या सान्नि-ध्यानं आपलं जें वैद्यकाचं अध्ययन झालं आहे, त्याचा उपयोग मुंबईसारख्या शहरीं फार उत्तम होईल. भटजींच्या औषधी तयार करण्याच्या युक्त्या आपण पाहि-लेल्या त्या तशा तयार करून त्यांना झोंक-दार व लांबलचक नांवें देऊन जाहिराती ठोकाव्या म्हणजे आजकाल पैसा मिळवा-यला कांहींच कठीण नाहीं. शिवाय आपल्या अंगीं जे अनेकविध गुण आहेत, त्यांचं चीज सर्वथा कुठें होईल तर तें एका मुंब-ईंतच. तेव्हां आपण तिकडे जावं हें ठीक, पण तिथें जाऊन थाटाची रुग्णशाला सुरू करायला भांडवल पाहिजे तें कुठून आणावं हा विचार पडला. पण फार वेळ नुसता विचार करणारा माणूस मी नव्हेच. कुठें तरी डल्ला मारला पाहिजे असं ठरलें हा डल्ला मारायचा तो अर्थातच कोणा तरी चांगल्याच्या घरीं मारायला पाहिजे होता, आणि तो मारायला मला संधिही सांपडली. गुंडभटाच्या घरीं मी राहत असतां त्याच्याजवळ एका बाईनं आपला कांहीं दागदागिना आणून ठेविला. बाईचा ऐवज असून शिवाय कांहीं नगदी रुपये होते. सुमारें सातशें साडेसातशें रुपयांचा ऐवज होता, त्यावर मी डल्ला मारला आणि मुंब-ईस निघून आलों. रोख रुपये होते, त्यां-च्यामुळें लागलीच कांहीं सामानसुमान आणून रुग्णशाला स्थापन करण्याच्या विचारांत होतों. सामानसुमान घेतलंही. गुंडभटाजवळ रुपये व दागिने आणून ठेव-णाऱ्या बाइनं चोरून लपवून तो ऐवज आणून ठेविला होता. अर्थात् गुंडभटाला किंवा त्या बाईला त्याबद्दल आरडा-ओरड करणं शक्य नव्हतं. तथापि मी इकडे आल्यावर आपल्याच घरांत चोरी होऊन आपला वहीम माझ्यावर आहे, असं गुंडभटानं पोलिसांत कळविलं व आपल्यास पकडून झाडा घ्यायला पोलि-साला वर्दी आली आहे असं मला कळलं. तेव्हां दागदागिने कुठें तरी पुरून ठेवायला जागा पहात होतों. माझ्या नेह-मीच्या बुद्धीप्रमाणं मला असं वाटलं कीं, अशी जागा शोधून काढावी कीं, तिथें कोणालासुद्धां जाऊन पहाण्याची शंका येऊं नये. अशी जागा कोणती ? तर आमच्या विशालबुद्धीला एकच जागा वाटली, ती जागा म्हणजे समुद्राची वाळवंट ज्यावर भरती ओहोटी येऊन जाते, अशा जागीं कमरेइतका खोल खड्डा खणून त्यांत कांहीं जिन्नस पुरून ठेवून पहावे. जर तो पुनः दुसरे दिवशीं सांपडला, तर ठीक, तशी जागा दुसरी कोणतीच नाहीं. त्याप्रमाणं आदले दिवशीं ओहोटीच्या वेळीं कमरेइतका खोल खड्डा खणून त्यांत एक अगदीं भिनकिमतीच्या जिनसांनीं भरलेली पिशवी पुरून ठेवली आणि दुसरे दिवशीं संध्या-काळीं ती जागा शोधून पाहून तिथें कांहीं गडबड झाली आहे कीं काय तें पहा-ण्यासाठीं तिथें गेलों, त्या जागेच्यावर एक मीं मोठासा धोंडा ठेविला होता. भरतीचीं

वेळ होती, जागा दिसणं त्या वेळीं शक्य नव्हतं. परंतु निदान तो थोडा तरी पायाला लागतो का हें पहावं, अशी इच्छा होऊन इथें लागेल, तिथें लागेल, अशा नादानं मी आपला पावलापावलांनीं चापशीत चापशीत पुढें चाललों होतों. गंगापुरचा रहाणारा मी, मला पोहण्याची कला ह्मणजे अगदीं पूर्णपणें येते, तेव्हां मी बुडेन हें माझ्या स्वप्नांतसुद्धां आलं नाहीं. परंतु मी कोणी तरी जिवाला वैतागून जीव देण्याला चाललों आहें, असं समजून तुम्ही आलां, तेव्हां माझ्या उपजत कुचेष्टाप्रिय स्वभावाला ती एक मौज वाटून मी तुम्हांला तुमचंच म्हणणं खरं असा भास होऊं देऊन, काय गंमत होते, ती पहाण्यासाठीं काय वाटतील त्या थापा मारून दिल्या. नंतर तुम्हीं माझे त्राते अशा अर्थी भापणं करून तुम्हांला चकविलं. तरी आपल्याला धरणं येतं कीं काय, ही भीति मनांत एक-सारखी वाटतच होती. पण तुमच्या तिथें राहिल्यानं माझा पोलिसास पत्तासुद्धां लागण्याचा संभव नाहीं. असं वाटून कांहीं दिवस तुमच्या त्या कंपूंतच काढावे, असं मनांत आलं. इतक्यांत माझ्या सु-दैवानं मी फार आजारी पडलों व मला तिथें ठेवून घेणं तुम्हांला जरूरच पडलं. तुम्हीं माझी सेवाचाकरी फार उत्कृष्ट प्रकारें केली. प्रत्यक्ष आपल्या भावाचीसुद्धां इतकी कोणी करणार नाहीं, अशी केली. त्यामुळें माझं मन चांगलं व्हावं, आणि तें तसं होतही असे. परंतु तें तेवढ्यापुरतंच. माझा स्वभाव जात्या अतिशय दुष्ट. त्या दुष्टपणामुळें मला तुमचा दोघांचा अत्यंत निर्मळ व प्रेमळ स्नेह खपेना, आणि तशा रुग्णस्थितीतही तुझा दोघांचा बेबनाव करावा ही इच्छा होऊन मीं त्या कृत्यास सुरुवात केली. तुमच्या अशा प्रकारच्या संशयी व भोळ्या स्वभावामुळें त्या कृत्यास मला चांगलंच यश आलं. पुढें मी तुमच्या तिथून निघून गेलों, तेव्हां एकदां मीं कम-लेला पाहिलं आणि तेव्हांपासून मला तिच्याबद्दल लोभ उत्पन्न झाला. एखादी गोष्ट मला हवीशी वाटली, किंवा अमुक तऱ्हेनं ती तशी घडवून आणण्याकरितां अमुक एक करायला मागें घेईन हें संभव-नीयच नाहीं. त्यांतलेंच माझं या वेळीं झालं. आतां माझ्या पाठीमागें गुंडभट्टाच्या घरीं चोरी केल्याचा आरोप येऊन जें शुक्लकाष्ठ लागतंसं वाटलं तें गेलं. आतां ते दागिने विकून वगैरे काय करायचं तें करून आपला एकंदर व्यवहार सुरू करा-यास मुळींच हरकत नाहीं, असं झालं होतं. अर्थातच मी त्या दागिन्यांबद्दल आतां बेफिकिर राहिलों. इतक्यांत आमची व आमच्यासारखेच दुसरे एक महाठक यांच्या गांठी पडून मी अगदीं त्यांच्यांत सामील झालों. आतां मला साधायच्या गोष्टी दोन होत्या. पहिली गोष्ट, रगडसा पैसा जमा करायचा. दुसरी गोष्ट, कम-लेचा अपहार करायचा. या साधण्या-साठीं भी वाटेल तें करण्यास तयार झालों, तूं माझी सेवाचाकरी केलीस, मला आजारांतून वांचविलंस, तेंसुद्धां मीं मनां-तून काढून टाकलं आणि तुला मार्गांतून दूर कसं करावं ह्या खटपटीस लागलों. कांहींतरी कांहींतरी बोलून तुझं मन उद्विग्न केलं होतं, त्यांत आणखी आणखी खोट्यानाट्या चुगल्या सांगून तुला तिथून काढून लावलं. "

# प्रकरण ९१ वें.

## सर्वस्फोट [ पुढें चालू ].



अगदीं लहानपणापासून मला असा नाद कीं, दुसऱ्याच्या अक्षरासारखें अक्षर काढावयाचें, दुसऱ्याच्या सह्या गिरवावयाच्या. त्यानें लिहिलेला कागद घेऊन त्याप्रमाणें अक्षर काढावयास प्रयत्न करावयाचा. उपजत अंगस्वभाव म्हणतात तोच प्रकार माझा होता. प्रथम प्रथम या गुणाचें इतरांनीं मोठें कौतुक केलें; परंतु पुढें पुढें जो तो असेंही म्हणूं लागला कीं, हा पोऱ्या मोठा मिस्किल होणार. एक वेळां तर गुंडभट्टाचें म्हणून पत्र दाखवून मीं कोंडभट्टासही पांच रुपयांना फसविलें. कांहीं कारणानें मी आणि गुंडभट्ट बाहेर गेलों होतों. गुंडभट्ट दुसऱ्या कोठें कामास गेले, त्यांनी मध्येंच मला "तूं जा परत. ज्याकरितां तुला मी नेणार होतों तें काम आतां होणार नाहीं," असें ह्मणून परत लावून दिलें. परत येतां येतां मला कल्पना आली कीं, "पांच रुपये पाठवून द्यावे" अशी चिठ्ठी कोंडभट्टाच्या नांवची गुंडभट्टांनीं लिहिली आहे अशी तयार करून कोंडभट्टाजवळ द्यावी, आणि पांच रुपये मिळतात कीं काय पहावें. अक्षरासारखें अक्षर काढण्याच्या माझ्या गुणाचें पहिल्यानेंच बीज होतें कीं नाहीं, हें जाणण्याच्या बुद्धीनें प्रयत्न केला. लागलीच एका मित्राच्या घरीं जाऊन दऊत लेखणी घेऊन गुंडभट्टाच्या अक्षरानें चिठ्ठी लिहिली. पहिलाच प्रयत्न, परंतु खास सफल झाला. ती चिठ्ठी घेऊन धापा टाकीत टाकीत घरांत गेलों. कोंडभट्ट ओसरीवर कांहीं झाडाचा पाला ओरबडीत बसले होते. मी धाबऱ्या धाबऱ्या व जणूं काय बऱ्याच लांबून धांवत आलों आहें अशा दमछाकीच्या आवाजानें ह्मटलें: "काकांना पांच रुपये पाहिजे आहेत. ही चिठ्ठी त्यांनीं दिली आहे. लवकरच द्या. मला पुनः त्यांनीं अगदीं पळत बोलावलं आहे." कोंडभट्टानें फक्त एकवार आपल्या चष्म्याच्या वरून त्या चिठ्ठीकडे पाहिलें, नंतर मजकडे पाहिलें. मला वाटलें त्यांना शंका आली, पण तसें दिसलें नाहीं. त्यांनीं चटकन् कनवटीस लाविलेल्या चंचीपैकीं पांच रुपये काढून दिले. मीं घेतले आणि ते पुढें कांहीं बोलणार तों मीं सूं केलें. पुढें तें प्रकरण फार वेळ टिकलें नाहीं. कर्मधर्मसंयोगानें गुंडभट्ट लवकरच घरीं आला. त्याला कोंडभट्टांनीं "पांच रुपये इतक्या गर्दीनें कशाला मागितले!" म्हणून विचारलें. त्याबरोबर माझें भांडवल बाहेर फुटून माझ्या गुणाचा उपयोग मी भामटेगिऱ्या करण्याच्या बाजूला करूं लागणार • असें सर्वांनीं भाकित केलें. हा असें करणार, हा तसें करणार, हा मोठा चंडखोर होणार, पक्का रामोशी बनणार, लोकांच्या घरावर दरवडे

घालणार, असें जों जों लोक माझ्याबद्दल म्हणूं लागले, तों तों मला ती एक बहादुरीच वाटावयास लागून, मी आपल्या मार्गांत अधिक अधिक शिरूं लागलों. शेवटीं गंगापूर काय कारणानें सोडलें हें वर सांगितलेंच आहे.

मुंबईस आल्यावर त्या चोरीचा तपास लाविण्यासाठीं आतां कांहीं कोणी येत नाहीं, असें एकदां करून येतांच मीं आतां काय धंदा करावा याचा विचार केला. पण तो विचार करण्यास मला फार वेळ लागला नाहीं. कारण कोंडभट्टांच्या अंतेवासित्वामुळें मला औषधांचा–निदान औषधें म्हणून वांटकर, शेण, माती यांचा–खप कसा करून घ्यावा, हें फार उत्तम समजलें होतें. ते वर्तमानपत्रांतून जाहिराती देत. त्यांच्या नकला मजकडून करवीत. मुंबईस आल्यावर आणखीही तसल्याच प्रकारच्या वैद्यांचे दवाखाने मीं पाहिले. तेव्हां या सर्वांच्यावर ताण करून सोडावी, अशी महत्वाकांक्षा धरून दुकान–नव्हे दवाखाना–थाटला. आपलें नांव हिंदुस्थानी बनशीप्रमाणें ठेविलें. बिंदुमाधव पांडे नांव केल्यानंतर काशीच्या बनशीचा पोषाख–म्हणजे दोन पैशांची टोपी, अगदीं झिरझिरित पण स्वच्छ पांढऱ्या कापडाचा सदरा, गळ्यांत एक अगंजाची माळ, गळ्यापाशीं सदऱ्यास केशर लागून किंचित् पिवळसर झालेलें, कपाळीं केशरमिश्रित चंदनाचें कोरीव दुहेरी आडवें गंध, कांखेंत एक पांढऱ्या पण सुती बुटीदार अशा उपरण्याचा बोळा, आणि एका हातांत एक काठी–असा थाट तर बनवला. जें काय धन गंगापुराहून आणलें होतें, त्या धनानें दवाखान्याची सर्व सामग्री तयार करून राहिलेल्या पैशाचा बराचसा भाग वर्तमानपत्रांत जाहिराती देण्यांत खर्च केला. हँडबिलें काढलीं. आमचे गुरु कोंडभट्ट, परंतु आमच्या सध्याच्या सोंगाला तें त्यांचें नांव अगदीं निरुपयोगी, म्हणून त्यास रूपांतर दिलें. कांहीं तरी विजातीय नांव द्यावयाचें, तेव्हां असा विचार मनांत आला कीं, गुंडकुंडशास्त्री आपले गुरु सध्या हिमालयांत आहेत असें म्हणावें असें वाटलें. पण गुंडकुंड हें नांव जरा चमत्कारिक वाटून लोकांचे मनावर चांगलासा परिणाम व्हावयाचा नाहीं, तेव्हां गुंड यांचें गंगा करावें असें मनांत योजून मीं एक काल्पनिक 'गंगाकुंडशास्त्री' बनविले व त्यांचे नांवानें सर्व कांहीं करावयाचें. महत्त्व काय तें त्यांना आणि त्यांच्या हिमालयावरील स्थानाला देत असें. मग काय विचारतां ? वाटेल तो वेडावांकडा श्लोक तयार करून म्हणावा आणि 'चरकांतला आहे,' 'सुश्रुतांतला आहे' अशा थापा माराव्या. कोणी त्यांतला जाणता आहे असें दिसलें, तर हल्लीं 'चरक' 'सुश्रुत' ग्रंथ उपलब्ध आहेत, हे कांहीं खरे नव्हेत, दोनही ग्रंथांच्या अत्यंत प्राचीन प्रती हिमालयांत कोणा साधु पुरुषानें आमच्या शास्त्रीबोआंस दिल्या त्यावरून शास्त्रीबोआंनीं पढविलें, असें तसें बोलून अगदीं छत उडवून दिलें म्हणजे त्या आमच्या गिऱ्हाइकमंडळांत आमची बडेजाव होऊन विद्वानांची टरच उडत असे. दवाखान्यांच्या व औषधांच्या जाहिराती फडकतांक्षणींच वार्धक्यकुठार, तारुण्यशतपुटी, केशरंजनी इत्यादि औषधांवर लोकांच्या नुसत्या मागण्यावर मागण्या येऊं लागल्या. त्यांत कित्येक मूर्ख प्रत्यक्ष येऊन त्यांनीं औषधांविषयीं व त्यांच्या गुणाविषयीं खात्री करून घेण्याचें

मनांत योजिलें. असले मूर्ख फार त्वरित दुसऱ्या कांहीं फांसांत आपण धरूं शकूं, असें मनांत योजून किमयाच्या थापांस सुरुवात केली. या थापांमुळें कांहीं नाहीं तरी सहा थेरडे मीं लुबाडले. पैकीं मोठी संतापाची गोष्ट ही कीं, आमच्या गंगापुरच्या काकासाहेबांस किती तरी लुबाडलें! त्याच्याइतका गाढव तोच, पण आपल्याला केवढा छट समजतो! त्याच्या कारकुनानें मला एकदां ओळखलें असा मला भास झाला. तेव्हांपासून त्यांनीं त्याला आपल्याबरोबर आणूं नये किंवा आपल्या या किमयाच्या बाबतींत त्याला कांहीं कळूं देऊं नये, असें बजावून, नाहीं तर सर्व कांहीं सोडून देतों, असा धाक घालून त्याचें येणें बंद केलें. मग माझा त्या थेरड्यास लुबाडण्याचा क्रम पुनः यथास्थितपणें सुरू केला.

परंतु एवढा एकच धंदा मीं सुरू केला असें नाहीं. माझ्या हुबेहूब अक्षर काढण्याच्या गुणाचें कांहीं कोठें चीज झालें तर पहावें म्हणून मला महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली व त्याप्रमाणें प्रयत्न करावयास लागणार, तों अचानक एका इसमाची गांठ पडली. त्यांनीं एक पोकळ ब्यांक काढण्याची वाटाघाट चालविली होती. हे गृहस्थ जातीचे कोण हें त्यांना पाहिल्याबरोबरच मी समजलों, पण ते आपल्यास इंग्रज म्हणवीत. त्यांची जात मी ओळखल्याबद्दल त्यांना ओळख दिली नाहीं. त्यांना माझी माहिती कशी लागली असेल तें अजून मला माहीत नाहीं. पण त्यांना माहिती लागलेली खास. त्यांनीं आपण होऊन मला बोलावून नेऊन 'मी तुला ओळखून आहें. तूं आमच्या कंपूंत आलास, तर तझा फायदा होईल' असें बजाविलें. आणि तुझ्या एका गुणाचा फायदा फार होणार आहे म्हणून तुला हुडकीत आलों आहें वगैरे बोलणें बोलून त्यांनीं मी गंगापुराहून कसा आलों, कां आलों, याचीही माहिती दाखविली. तेव्हां मीं त्यांना कबूल केलें, कीं मी त्यांच्या कामांत वाटेल ती मदत करीन. मात्र त्याबद्दल योग्य मोबदला घेईन. त्यांनीं गोष्ट कबूल करून मला कांहीं इंग्रजी, गुजराथी व मराठी सह्या दाखवून त्या घटवून ठेवण्यास सांगितलें. कांहीं सह्या काढवून घेऊन परीक्षाही घेतल्या आणि त्यांचें काम सुरू झालें. मात्र माझी त्यांची ओळख उघड उघड आहे असें कोठेंही दिसतां कामा नये, असें त्यांनीं मला बजाविलें व मला दर वेळेस कांहीं सह्या करून घेतल्या कीं, दरशें शंभर पन्नास रुपये देण्याचा शिरस्ता ठेविला. आजपर्यंत त्यांनीं माझ्याकडून कसकसल्या कागदांवर सह्या करून घेतल्या ह्मणतां! त्या ब्यांकेची भरभराट जर झाली असली, तर ती केवळ माझ्या या गुणावर झाली असेल, असें माझें मन मला सांगतें. किती चेकांवर त्यांनीं माझ्याकडून सह्या करून घेतल्या असतील तें त्यांचें त्यांनाच ठाऊक! पुनः ब्यांकेचा आणखी माझा संबंध नाहीं तो नाहींच! मीं जगेश्वर आतां त्यांचा गळा अधिक अधिक दाबण्यास सुरुवात केली असती, परंतु मला तुझा सत्यनाश करण्याची बुद्धि सुचली. ज्याप्रमाणें आपल्याला आपल्या औषधांच्या वगैरे बाबतींत यश येत चाललें आहे, ब्यांकवाले गृहस्थांकडूनही पैशाची सारखी धार लागली आहे, किमयाच्या भूलथापांनें फसणारे गाढव आपल्या पाठीवर पैशाच्या गोण्या वाहून आणत माझ्या पायापाशीं

ओतूं लागले आहेत; तेव्हां कोणी तरी सुंदर सुशील मुलगीही फसवावी, असा दुष्ट हेतु मनांत आला. आणि कमलेवरच तो प्रयोग करावा ही उत्कंठा झाली. माझ्या डोक्यांत एकदां एखादी गोष्ट भरल्यावर मग आणखी काय पाहिजे ? मग मित्र नाहीं, स्नेही नाहीं, आई नाहीं, बाप नाहीं, कृतज्ञता नाहीं आणि भक्तिमत्ता नाहीं. केवळ स्वार्थाखेरीज दुसरी दृष्टि मला नाहीं. माझ्या मनाला इतकें इतकें सुद्धां कांहीं वावगें न वाटतां मी त्या उद्योगास लागलों. तुझ्यासारखें अक्षर काढून कमलेला पत्रें ल्याहावीं. कमलेसारखें अक्षर काढून तुला पत्रें ल्याहावीं. प्रभाकरानें कमलेला व कमलेनें प्रभाकराला लिहि-लेलीं पत्रें धरून कोणी तरी तुझा हित-कर्ता तुला पाठवीत आहे, असें भास-विण्याकरितां तशीं पत्रें लिहून तयार करून तुझ्याकडे पाठविलीं. प्रत्यक्ष–परोक्ष भाषण करून तुझें मन जितकें कलुषित करणें शक्य तितकें केलें. आणि तूंही पण त्या फांसांत चांगलाच सांपडलास. तुला कित्येक वेळां इंग्रजी पत्रें लिहविलीं तो शुद्ध नंदीबैल ड्यांडी व त्याचा तो सोन्या यांच्याकडून लिहवून कमलेबद्दल गांवांत-सुद्धां बरीच चर्चा आहे असें भासविलें. तुला मुंबईतून लावून दिल्यानंतर हा पत्रांचा प्रकार केला. आधीं कसकसा प्रकार झाला, हें तुझें तुला ठाऊकच आहे. तुला दूरदेशीं पाठविण्यांत मात्र मीं ब्यांके-च्या त्या लोकांची मदत घेतली, त्याबद्दल त्यांना मला धाक घालावा लागला. तूं तेथें गेल्यावर, सगळा भोपळा फुटेल, हें मी जाणून होतों. कारण ब्यांक ह्मणजे सर्व लबाडी आहे असें तुला तेथें गेल्या-बरोबर समजून तूं नोकरी सोडणार हें मी जाणूनच होतों. पण तूं नोकरी सोडून परत येण्याच्या पूर्वींच इकडे तुझ्या मर-णाची वार्ता आणवून कमलेला फसवून, तुझ्याच नांवानें पुनः तिला "मी कांहीं मेलों नाहीं. पण मींच मुद्दाम तशी बातमी पसरविली, कीं खरोखर तूं काय करतेस तें पहावें. आतां माझी खात्री झाली, कीं तूं फार सुशील. तर तूं अमुक दिवशीं मला येऊन भेट ह्मणजे आपण निराळें बिऱ्हाड करून राहूं. कांहीं कारणानें मला तुझ्या आईबापांचें मुखावलोकन नको आहे. तूं आलीस तर ठीक, नाहीं तर माझा मी मार्ग धरीन." अशा मजकुराचें पत्र लिहून फसवून आपला हेतु साधणार होतों, पण माझ्या अजमासाच्या आंतच तूं मुंबईस परत आलास. ब्यांकेचे लोक लबाड, त्यांनीं आपल्याला फसविलें असें ह्मणून त्यांच्याबद्दल तूं तिरस्कारानें व शिव्या देऊन बोलूं लागलास, तेव्हां अर्था-तच मी जणूं काय ब्यांकवाल्यांचीं कार-स्थानें काय चाललीं आहेत हें आपणास कांहीं माहीत नाहीं, त्यांच्या लबाडीचा प्रकार ऐकल्याबरोबर आपल्यासही अतो-नात आश्चर्य वाटतें, नव्हे अंगावर शहारे येतात, असें मीं दाखविलें; त्यांतही तूं फसलास. तरी पण तुझ्या येण्यानें मला आतां थोडी अडचण पडली. त्यांतून तूं एक दिवस तिला व प्रभाकराला खिडकींत पाहिलें वगैरे सांगितलेंस; तेव्हां मला असें वाटलें, कीं अजून आपली हिकमत साधेल. तुला तिनें दृष्टीनें पाहिलें असलें, तर आपलें कार्य तितकें सोपेंच. असें वाटून अधिकउणा विचार न करितां मीं एक दिवस तुझ्या देखत जणूं काय सर्व बार उडवावयाचा असा बेत करून सर्व व्यवस्था केली. सगळीकडून मिळविलेले पैसे एकत्र

केले. त्याच्या नोटी घेतल्या. कमला दादरास येईल अशीं पत्रें वगैरे लिहून ठेविलीं. प्रभाकराकरितां किंवा दुसऱ्या कोणाकरितां रात्रीं अपरात्रीं कमला दादर— माहीम वगैरेकडे जाते. आज तो गाढव दारूबाज सोन्या तिला घेऊन येणार आहे, असें तुला भासवून तुझ्या मनाची खात्री करून देण्याकरितां तुला तेथें बोलावून दबा धरून बसण्यास सांगितलें. आणि मध्यंतरीं त्याच प्रकरणावरून माझ्याशीं भांडलेल्या त्या पाजी ड्यांडीनें आमचा सर्व स्फोट केला, तो जर मला एक दिवस आधीं समजता, तर मीं त्याला सपशेल उडविलेंही असतें. आमच्या आणि ब्यांकेच्या बातम्या फुटतात, असें निदर्शनास आल्या दिवसापासून मी पाळतीवर राहून—वेळीं आपण डिटेक्टिवाचें सोंग घेऊन पोलिससाहेबालाही फसविलें. बातम्या काढल्या आणि त्यामुळेंच आतां आपला गाशा तायडतोब गुंडाळावा असें मनांत योजिलें आणि ब्यांकेच्या लोकांनाही सुचविलें. ड्यांडीला त्याबद्दल चांगलें पारिपत्य करावयाचें असें मनांत आणून तशी योजनाही केली. पण आतां त्याच्या संरक्षणाला कांहीं गुप्त मंडळी आहेत असें दिसून आलें, तेव्हां आपणच आतां मुंबईतून निघून दिल्लीकडे जावें असा विचार केला व जातां जातां दुसरेंही कार्य साधण्याचा निश्चय केला. डिटेक्टिवाचें सोंग घेऊन साहेबाला फसवून त्याच्यापासून माहिती काढण्याचें धारिष्ट केलें. त्या वेळची माझी स्थिति मला ठाऊक ! पण त्या माहितीचा उपयोग झाला नाहीं. कमळेच्या आशेस गुतून मीं दिरंगाई केली. ड्यांडी व सोन्या निवळ मूर्ख, अजागळ, गाढव आहेत असें समजून त्यांचें भय कधीं बाळगलें नाहीं.

त्यांच्या देखत वाटेल तें केलें. पुढें ड्यांडी सुटला; त्याचा विश्वासघातकीपणा माझ्या अनुभवाला आला, तरी सोन्याचा उपयोग मला करून घेणें भाग होतें; इतक्या थोड्या अवधीसाठीं दुसरा कोण माणूस तयार होतो ? म्हणून त्यालाच मुंबईहून कमलेला आणण्याला पाठविलें. आपलें कार्य एकदां होऊन आपण निसटून गेल्यावर मागें कांहीं कां होईना, असा वेडगळ विचार केला, आणि तो फसला. माझे ग्रह पहिल्यांदा उच्चांचे होते, ते आतां अगदीं अनिष्ट होऊन शेवटीं पकडला गेलों. आपण आपल्या कृत्यांबद्दल एक अवाक्षर सुद्धां काढावयाचें नाहीं. पोलिस काय आणखी कमला आपल्यावर पुरावा आणतात हें तरी पाहूं, असें मीं आपल्या मनांत योजिलें; परंतु त्यांतही मी फसणार असें वाटूं लागलें. तेव्हां प्रथम हें सर्व लिहून तुला कळवावें असें मनांत आलें व लागलीच मी त्या तयारीस लागून हा माझा इतिहास तुला लिहून पाठविला आहे. माझ्यासारख्या चेरडाला पश्चात्ताप व कृतज्ञता या दोन गुणांची आजन्मांत ओळख नसावयाची, परंतु, तूं माझ्या आजारांत मला जपलेंस. तेव्हां आतां तरी निदान—आपलें साधत नाहीं असें कळल्यावर तरी निदान—तुझ्याजवळ सर्व सांगावें असें वाटलें आहे, आणि म्हणून प्रथमारंभीं लिहिल्याप्रमाणें युक्ति करून कागद वगैरे मागून घेऊन तुला हा लखोटा देण्याची संधि गाठावी कशी, या विचारांत होतों. तों अचानकच काम झालें. पण माझें हें करणें गुप्तच राहील असें शक्य नाहीं. असें मला दिसून आलें तर मी सर्व गोष्टी पोलिसाजवळही कबूल करून टाकीन. आणि सगळी टोळीची टोळी बाहेर पडेल असें करीन. पण

त्याच्याशीं तुला काय करावयाचें आहे ? तुझ्यापुरतें तुला सांगितलें आहे. त्यावरून तुझ्या सुखांत मीच विष कालविण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत विष नाहीं, तें अमृत आहे असें पक्कें समज आणि त्याचा उपभोग घे एवढेंच तुला सांगतों. या वेळीं मला पश्चात्तापाची लकेर येऊन हें तुला लिहिलें आहे. तुझ्या हातीं जाईपर्यंत जर माझें दुष्ट मन फिरलें नाहीं, तर तूं सुख भोगशील. पण माझें मन केव्हां फिरेल याचा नेम नाहीं. चांगला सद्बुद्धीचा विचार माझ्या मनांत फार अल्प वेळ राहतो. आज तुला मी हकीकत सांगितली ही अक्षरशः खरी. पूर्वी आजारीपणांतून उठल्याबरोबर एक दिवस मोठ्या थाटानें डोळ्यांत अश्रु आणून जें काय सांगितलें तें अक्षरशः खोटें. तें निवळ नाटक केलें होतें.

हें राजारामाचें पत्र वाचण्याबरोबर पद्माकर आणि प्रभाकर दोघेही अत्यंत थकित झाले. प्रभाकरास त्याच्याबद्दल आतांपर्यंत अनेक प्रकारच्या शंका येत असत व शेवटीं शेवटीं या पत्राच्या आधीं त्याच्या त्या शंका दृढही झाल्या. परंतु त्यानें इतके भयंकर दुगावे केले असतील ही त्याला सुद्धां कल्पना नव्हती. बिचारा पद्माकर सर्वस्वीच आंधळा झाला होता. त्याच्या दृष्टीनें पहात होता. तेव्हां आपण किती आंधळे झालों, आपण किती मूर्ख बनलों, याचेंच त्याला आश्चर्य वाटूं लागलें. आपलें सर्व शिक्षण, आपलें सर्व वाचन, आपली सर्व विचारशक्ति हीं या वेळीं कोठें गेलीं होतीं ? जेव्हां आपल्या वडिलांच्या मर्जीविरुद्ध, सोमवलीच्या जहागिरदारांची मुलगी आपल्यासाठीं त्यांनीं ठरविली असतां, त्यांचा शब्द खालीं पाडून आपण मानसिक धैर्य दाखविण्याच्या ऐटीनें जें काय केलें, त्यांत आपलें धैर्य किनपत होतें, अगदीं अल्पबुद्ध माणसानें सुद्धां ज्या चुका करणें शक्य नाहीं, तसल्या ढोबळ चुका करून आपण आपल्या पायांवर धोंड पाडून घेतली. जी आपल्या परिचयापूर्वी बिचारी आपल्या आईबापांच्या सहवासांत अगदीं सुखानें होती, तिला आपण होऊन दुःखसमुद्रांत ढकलली, यांत कोणतें शहाणपणाचें कृत्य केलें ? सगळ्या जगाला मानसिक धैर्याचें उदाहरण घालून देण्याची महत्त्वाकांक्षा धरून आपल्या मानसिक दौर्बल्याचा मात्र तमाशा जगास दाखविण्याचें श्रेय घेतलें. बरें, या माझ्या करण्यांत माझी मात्र मानसिक दुर्बलता दिसती तर एक असो. पण नाहीं, त्याच्याबरोबर कमलेला, तिच्या बापाला, तिच्या आईला— माझ्या या अशा करण्यानेंच तिचा मृत्यु अधिक समीप आला नसेल कशावरून ?— या माझ्या मित्राला व आपल्या स्वतःला किती दुःख दिलें ! अत्यंत यःकश्चित् गोष्टीवरून त्रागा करण्यास सुरुवात केली. पात्रापात्र विचार न पहातां भलत्याच माणसावर विश्वास टाकला आणि ज्याचा स्नेह केवळ बावन्नकशी सोन्याप्रमाणें शुद्ध, त्याला अशुद्ध मानून त्याचा अविश्वास केला—तिरस्कार केला—द्वेष केला—मत्सर केला ! ही माझी स्थिति कशानें झाली ? मनाची चंचलता. दुसरें काय ? हेंच कारण. माझें मन स्वभावतः चंचल असून तें मोठें स्थिर आहे असें समजून व तें स्थिर असल्याबद्दल अभिमान बाळगून नानाप्रकारच्या गोष्टी मोठ्या शहाणपणाच्या म्हणून केल्या. इतका दुर्बल, संशयी व हेकेखोर मी असून, एखाद्या अगदीं

पवित्र, निर्मल, निरामय व कोमल अंतःकरणाच्या मुलीला फशीं पाडण्यांत काय लाभलें? मीं स्वतः काय मिळविलें? कांहीं सुद्धां नाहीं. कां, कांहीं सुद्धां नाहीं असें कां? जगाचें हंसूं केवळ होणार! पण आतां? आतां पुढें काय? पुढें? देशत्याग करून जावयाचें, दुसरें काय? नाहीं तर हें तोंड जगांत कोणाला दाखविण्याची सोयच नाहीं. आतां तोंड दाखवावयाचें कसें आणि कोणाला? वडिलांना दाखवावें, तर ते काय ह्मणतील? कमला स्वतः काय ह्मणेल? तिच्यासमोर आतां मी गेलों, तर मला कोणी खालीं पृथ्वीच्या पोटांत ओढील तर बरें असेंच वाटणार नाहीं काय?

असे नानाप्रकारचे विचार त्याच्या मनांत येऊन तो अगदीं वेडावल्याप्रमाणें करूं लागला. त्याचें मस्तक फार चढलें. चर्या अशी दिसूं लागली, कीं हा आतां बहुतकरून वेडा होणार. दृष्टि अगदीं शून्य झाली. जणूं काय आपण आतां कोठें आहों आणि कोठें नाहीं याचें कांहीं त्याला भान नाहीं असें होतां होतां चटकन् तो उठला. आणि जसा कोणी घाईघाईनें बाहेर जाण्यास निघावा तशी घाई करून तो जाऊं लागला. असें कांहीं तरी होईल, हें प्रभाकर जाणूनच होता. आणि त्याच गोष्टीची तो वाट पहात होता. पद्माकर निघाला तेव्हां यानें त्याच्या खांद्यावर हलकेंच हात ठेविला आणि मोठ्या सौम्यपणें ह्मटलें, "तूं आतां कुठें जाणार? ज्या गोष्टी होऊन गेल्या त्या गेल्याच. पण त्यांपासून झालेल्या परिणामांचं परिमार्जन करणं हें तर आपल्या हातीं आहेना?"

"काय! त्यांचं परिमार्जन करणं आपल्या हातीं आहे! परिमार्जन होणं तरी शक्य आहे? ज्या माझ्या या अत्यंत दुष्ट हातांनीं कमलेचं हृदयकुसुम चुरडून चुरडून नष्ट करून टाकलें, तें पुनः पूर्वीप्रमाणें होणं शक्य आहे? वा! मग माझ्या हातीं एके संजीवनीच आहे ह्मणायची! प्रभाकर, आतां तूं माझ्या नादीं लागूं नकोस. माझं निष्ठुरपणाचं—नव्हे पाजीपणाचं—वर्तन तीं आतां कधीं तरी विसरेल काय? चाचारे, असाध्य जखमा भरून येणं आणि अशा तऱ्हेनं दुखावलेलीं अंतःकरणं पूर्ववत् होणं हें केवळ नाटकाकादंबऱ्यांत आणि तीं लिहिणारांच्या डोक्यांत मात्र शक्य आहेत. त्यांतसुद्धां त्या ग्रंथकारांना त्या जखमांचे वण आणि त्या दुःखकारणांची आठवण हीं आजन्म राहिली असेंच म्हणावें लागतें. मग मी आणि कमला तर काय प्रत्यक्ष हाडामांसांचीं माणसं आहों. कादंबरीकाराच्या कल्पनेचीं नव्हे. हाडामांसाप्रमाणेंच आह्मांला मन आहे, स्मृति आहे, राग आहे, लोभ आहे, क्रोध आहे. मी कितीही यत्न केला, तरी आपल्या हातून असा पाजीपणा होऊन आपण या पारिजातकाच्या कुसुमाप्रमाणें अंतर्बाह्य सुंदर व कोमल मुलीला गांजली. तिला निर्मात्याच्या पलीकडे लेखलें, तिच्या अंतःकरणाचा सत्यानाश केला. ही गोष्ट माझ्या स्मरणांतून जाणार नाहीं. ती स्मृति क्षणोक्षणीं, पावलोपावलीं मला टोंचीत राहाणार. त्याचप्रमाणें माझ्या हातून कसकसे भयंकर प्रकार झाले ते एकदां सविस्तरपणें तिला समजले, ह्मणजे तिलाही माझ्याबद्दलचा तिट्कारा उत्पन्न होईल. मग एक क्षणभरही ती माझ्यासमोर उभी राहाणार नाहीं. आतां मला

एकच उपाय, मी आतां तिच्या दृष्टीस सुद्धां पडूं नये. तिच्याच काय, पण कोणाच्याही दृष्टीस पडूं नये. कुठें तरी निघून जावं. यांतच शहाणपणा आहे. तूं आतां मला व्यर्थ आग्रह करूं नको. मी सर्वांचेच अपराध केले आहेत. कोणाला म्हणजे दुखविलं नाहीं असं नाहीं. अशा स्थितींत मला दुसरं काय शक्य आहे? सर्वांपासून दूर दूर पळावं तें चांगलं. तुझ्यासमोर मी उभा आहें, पण वर तोंड करून तुझ्या चेहऱ्याकडे पहाण्याचीसुद्धां मला शरम वाटते आहे. तर उगीच कांहीं तरी बोलून मला आशा लावूं नको. मी आतां पूर्वीचा पद्माकर नाहीं. अग्नीला हात सहज लागला, किंवा मुद्दाम लाविला तरी भाजल्याखेरीज राहायचाच नाहीं. किंबहुना सहज हात लागला तर मुद्दाम लाविल्यापेक्षां अधिकच सडकून भाजतो. मला त्याबद्दल कांहीं वाटायचं नाहीं. इतःपर जें मी भोगीन तें माझ्या कर्माचं फळ ह्मणूनच भोगीन........."

प्रभाकरानें त्यास येथेंच जरा थांबविलें नसतें, तर किती वेळ त्याचें चऱ्हाट चालू राहातें आणि किती प्रकारांनीं त्यानें तें वळलें असतें याचा नेमच नव्हता. पद्माकरासारखीं माणसें जिकडे वाहवतील, तिकडे वहावतच जावयाचीं; तीं योग्य मार्गाला लागलीं, कीं त्या मार्गाला धूमधडाका जावयाचीं; बरें, त्यांच्या नशिबानें तो मार्ग न लाभून, तीं दुसऱ्या मार्गानेंच गेलीं, तर त्याही बाजूला खोल खोल घसरळत जावयाचीं. एक मात्र मुख्य तत्त्व असतें, कीं त्यांच्या दृष्टीनें जें सत्य ह्मणून त्यांनीं पकडलें, त्याला ते कधीं सोडावयाचे नाहींत. पद्माकराच्या मनानें आतां पूर्णपणें घेतलें, कीं आपल्या हातून अगदीं अक्षम्य असे अपराध घडले. त्या अपराधांबद्दल आपण कोणाजवळ क्षमा मागावयाला गेल्यास, ती आपणास न मिळतां आपल्याला अपमानकारक शब्द मात्र ऐकावे लागतील. यामुळें ही वेळ मोठी कठिण होती. त्याचें मन बदलून आतां पुनः, "तूं कमलेकडे जाऊन तिच्या सुखाला आपला आयुःक्रम अर्पण करणं हेंच तुझं कर्तव्य, आणि हें कर्तव्य केलं तरच झालेल्या गोष्टींचं परिमार्जन होईल," असें त्याच्या मनांत भिंबविण्याचें अवघड काम प्रभाकरापुढें उभें राहिलें. आणि तें त्यानें पद्माकराच्या मनावर भिंबविण्याचा यत्न केला. तेव्हां पद्माकरानें त्यास म्हटलें, "प्रभाकर, माझं कर्तव्य काय हें मला समजलं. पण तें बजावणं आतां मला शक्य आहे काय? मी बजाविण्याला सिद्ध झालों, यत्न केला, तरी पण कमला व बळवंतराव माझ्यापासून तें कर्तव्य करून घेतील काय? माझे अपराध खरोखर अक्षम्य. त्यांनीं जरी क्षमा केली--कमलेनं जर क्षमा केली,--जर सर्व गोष्टी ती विसरून गेली, तर तर मी..........."

"पद्माकर, तूं अजून तिला ओळखलं नाहींस. तूं आपले सर्व संशय विसरून पुनः तिचा स्वीकार करायला आलास हें कळतांच तिला पुनर्जन्म झाल्याप्रमाणें आनंद होईल. पूर्वजन्माचं जसं आपल्याला कांहीं स्मरण राहत नाहीं, तसंच तिला आतांपर्यंतच्या सर्व गोष्टींचं पूर्ण विस्मरण होईल. न व्हाव्या त्या गोष्टी झाल्या, ह्मणून काय त्याच जन्मभर कोणी उगाळील? गेल्या गोष्टी विसरून जा. तूं नुसता तिच्यासमोर चल. बोलूं नकोस, चालूं नकोस. तुझ्या नुसत्या सान्निध्यानं तिला तुझ्या मनाची स्थिति समजेल, ती आपण होऊन तुला मागल्या

गोष्टी काढायच्या नाहींत असं ह्मणेल. आणि तुलाही त्या सर्व गोष्टी विसरण्यास लावून पुनर्जन्म झाल्याप्रमाणें करील. ती एका पूर्ण सुशील, पवित्र व निर्मल अशा साध्वीची तितकीच सुशील, पवित्र व निर्मल अशी कन्या आहे. तुला हें ठाऊक नाहीं असं नाहीं; पण तुझं मस्तक या वेळीं ठिकाणावर नाहीं ह्मणून मी सांगतों आहें. माझं ऐकशील तर तूं आतां माझ्याबरोबर त्या मठांत चल. मी तिची व तुझी गांठ घालून देतों. आणि मग मी बळवंतरावांकडे जाईन."

पद्माकर त्यावर कांहीं बोलला नाहीं. अगदीं स्तब्ध उभा राहिला. प्रभाकराचें बोलणें त्यास खरें वाटलें. परंतु सर्व गोष्टी त्याप्रमाणें होतीलच असें कांहीं केल्या त्याचें मन त्यास सांगेना. तथापि आपल्या मनास काय वाटतें, तें त्यानें त्याला बोलून दाखविलें नाहीं. फक्त एवढेंच त्यानें त्यास ह्मटलें, "प्रभाकर, माझं मन स्वस्थ नाहीं. त्याला एक दिवसाची विश्रांति पाहिजे. आजचा दिवस मला इथें अगदीं स्वस्थ पडूं दे. माझ्या विचारांना कांहीं तरी सुसंगतपणा येऊं दे. मस्तकांतल्या अगदीं चिंध्या उडून गेल्या आहेत. तूं आतां जा. मला एकटं सोडून कसं जावं अशी शंका घेऊं नको. मी कुठें जायचा नाहीं. तुला वचन देतों. पण आज मला आतां कुठें नेऊं नको. माझ्या मेंदूंत जणूं काय कोणी मोठा धोंडा घातला आहे, अशी माझी अवस्था झाली आहे. याच्यापुढें तुला काय सांगूं!"

प्रभाकरानें त्याचें बोलणें ऐकून घेतलें. नंतर एकवार त्याच्याकडे मोठ्या अर्थपूर्ण नजरेनें पाहून ह्मटलें, "ठीक आहे. तसं करायला कांहीं हरकत नाहीं. तूं ह्मणतोस तें कांहीं खोटं नाहीं. पण मी आतां जातों. तिकडे काकांकडेही जातों, आणि तेथून मठांतही जातों."

इतकें बोलून प्रभाकर तें राजारामाचें पत्र घेऊन निघून गेला. सर्व गोष्टींचा असा निकाल लागतो आहे हें पाहून त्याला अत्यंत आनंद झाला. कमलेवर त्याची फार भक्ति. ती त्याला आपल्या सख्ख्या बहिणीपेक्षांही पलीकडे वाटत होती. तिला आतां सुखाचे दिवस येतील ही कल्पनाच त्याला कितीतरी आनंददायक होती. बळवंतरावांस तो आपल्या वडिलांप्रमाणें मानीत असे-नव्हे तशी त्यांचे ठायीं त्याची भक्ति होती. अर्थातच तो केवळ धावत त्यांच्याकडे गेला. पहातो तों बळवंतराव एकटे नाहींत, त्यांचे स्नेही गणपतराव हे त्यांचें समाधान करण्याकरितां व कमलेच्या शोधाकरितां आले आहेत. त्यांस पहाण्याबरोबर प्रभाकरास एकदम कसेंसेंच झालें. आपल्या स्नेह्याबद्दल, पद्माकराबद्दल गणपतरावांचें मत चांगलें नाहीं. आपण या वेळीं त्याच्यातर्फेचें कांहींही बोललों, तरी हे त्याच्यासंबंधानें अगदीं अनिष्ट व अयोग्य असेंच बोलतील. पद्माकराचा एक तऱ्हेनें, तर या गणपतराव काकांचाही स्वभाव दुसऱ्या तऱ्हेनें फार एककल्ली व दुराग्रही आहे, हें त्यास अनुभवानें ठाऊक होतें. त्यामुळें आपण आतां कांहीं काढलें, तर हे त्याच्याविरुद्ध कांहीं तरी बोलतील. तेव्हां आपण कमला अमुक ठिकाणीं आहे, तिचा मला तपास लागला आहे, तिच्याकडे चला व तिला घरीं घेऊन या एवढेंच बळवंतरावास ह्मणावें, आणि मग कांहीं तरी निमित्तानें त्यांना एकीकडे गांठून सर्व हकीकत सांगावी असा त्यानें

विचार केला. त्यास पहातांच बळवंतरावांनें व गोपाळानेंही प्रभाकराकडे अत्यंत उत्कंठित नेत्रांनीं पाहिलें व "कांहीं बातमी ?" असा प्रश्न शब्दांनीं करण्यापेक्षांही सुव्यक्त असा त्यांच्या त्या पहाण्यांतच प्रभाकराच्या मनास दिसला. प्रभाकरानें लागलींच कांहीं एक मागेंपुढें न पहातां कमला कोठें आहे, कां आहे, तिला तेथें जाण्याचा प्रसंग कां आला वगैरे सर्व सांगितलें. आणि ज्या पत्रांनीं इतका घोंटाळा केला तीं पत्रेंही त्यांचेपुढें टाकलीं. एखादा मनुष्य अगदीं थक्क व्हावा त्याप्रमाणें, किंबहुना एखाद्या बांधराप्रमाणें बळवंतराव नुसते प्रभाकराच्या तोंडाकडे पहात राहिले. त्यांच्या मनांत आपल्या शब्दांचा अर्थ शिरतो आहे कीं नाहीं, हें सुद्धां त्यांच्या चेहऱ्यावरून त्यास दिसून येईना. त्यांचें बोलणें संपण्याच्या बेताला त्यानें पाहिलें, तों बळवंतरावाचे डोळे आपल्या मृतपत्नीच्या त्या तसबिरीकडे एकसारखे लागले आहेत. आपल्या पोरीनें आपल्या पवित्र मातेच्या नांवाला कलंक लावण्याजोगें वर्तन करणें शक्य आहे असें आपल्यास एकवार वाटलें, ही केवढी चूक आपल्या हातून झाली असें वाटूनच ते एकसारखे त्या तसबिरीकडे पहात होते. इकडे गणपतरावांनीं प्रभाकराच्या हातून तीं पत्रें मागवून घेतलीं आणि वाचलीं. व अशा पत्रांवर आणि राजारामासारख्या माणसावर भरंवसा ठेवणारी मंडळी अगदीं गाढव. अतःपर त्या पद्माकराचें खरोखर तोंडसुद्धां पाहूं नये. आपल्या मूर्खपणामुळें त्यानें पोरीचें अंतःकरण करपवून टाकलें. तिचा सर्व जन्म नासून टाकला. त्याला तिची किंमत कळली नाहीं. कमळेला हा अगदीं अयोग्य वर आहे, असें मला प्रथमपासूनच वाटत होतें वगैरे बडबड चालू केली. बळवंतरावांचें बराच वेळ तिकडे लक्ष्य गेलें नाहीं. त्यांचें लक्ष्य नाहीं तोंपर्यंत आपण आपल्या मित्राच्या वर्तीनें कांहीं बोलण्यांत, किंवा त्याला आतां पश्चात्ताप झाला असून तो आतां फारच गरीब झाला आहे असें सांगण्यांत कांहीं तात्पर्य नव्हतें. तसलें कांहीं बोलल्यानें किंवा सांगितल्यानें, गणपतरावांचें समाधान मुळींच न होतां, उलट ते पद्माकराचें मन अधिक अधिक दुखवेल अशाच प्रकारें बोलतील, हें प्रभाकर पूर्णपणें जाणून होता, आणि त्यामुळेंच त्यानें नुसतें त्यांचें बोलणें ऐकून घ्यावयाचें असें मनांत ठरविलें.

थोड्या वेळानें बळवंतरावाचें अंतःकरण शांत झालें, आणि ते एकदम प्रभाकरास म्हणतात, "तिची आई असती, तर असा प्रकार झाला नसता. तिनं आपल्या आईला सर्व कांहीं सांगितलं असतं, दाखविलं असतं, आणि तिनं तिला योग्य मार्ग दाखवून दिला असता. पण माझ्याजवळ तिला हें सर्व सांगतां आलं नाहीं. माझ्यापासून तिनं आपले विचार व बेत लपवून ठेवले, पण याबद्दल दोष तिच्याकडे नाहीं. कदाचित माझ्याकडेच असेल; पण इतकं सगळं होऊन ती पूर्ववत् माझ्या नजरेस पडणार, हें पाहूनच मला अतोनात आनंद होतो आहे. जा, तूं सरस्वतीवहिनीला आपल्याबरोबर घेऊन जा. आज तिची वार्ता यायला, आणि आज त्याही इथें यायला एकच गांठ पडली हें एक बरं झालं. त्या तिच्याशीं बोलून तिचं मन स्वस्थ करतील. मी तिकडे येणं शक्य नाहीं. माझं मन खचलं आहे. मी माझ्या कर्तव्यांत चुकलों म्हणूनच असा

प्रसंग आला असं मला वाटायला लागलं आहे. कदाचित् तेंच खरं असेल. नाहीं कशावरून? जा त्यांना घेऊन जा, ती कुठें आहे तिथून आली तर तिला घेऊन ये. जातांना वाटेंत त्यांना सर्व गोष्टी सांग–जरूर तेवढ्याच सांग. बाकीच्या योग्य वेळीं कळतील. जा."

गणपतरावही कमलेला घेऊन येण्याविषयीं फार उत्कंठित होते. त्यांनींही त्याचप्रमाणें त्यास घाई केली. तेव्हां प्रभाकरानें एक गाडी आणून तो सरस्वतीबाईस बरोबर घेऊन मठाकडे गेला.

प्रभाकर कमलेला भेटून गेल्यापासून तिचें चित्त अगदीं द्विधाच झालें होतें. तो आतां सर्व हकीकत त्यांना सांगेल, आणि मग ते कदाचित् घेतील. पण आपण सांगितलेली हकीकत त्यांना खरी वाटेल काय? आपण कांहीं तरी उच्छृंखलपणा करून आतां मात्र कांहीं तरी सबबी सांगतों आहोंत असें वाटून त्यांना आपला तिटकारा तर नाहीं वाटावयाचा, अशी भीति तिच्या मनास वाटे. पुढें काय होतें, आणि काय नाहीं, असें मनांत येऊन तिच्या जिवाचा थरकांप होई. आपल्या बाबांस आपला निर्मळपणा कायम आहे, आणि आपण केवळ फसून गेलों असें कळलें ह्मणजे झालें. ते आपल्यास परत घेऊन जाण्यास आले नाहींत तरी चालेल. आतां आपलें शेष आयुष्य पतिसेवेंत जाणें शक्य नाहीं, तर अशा मठासारख्या पवित्र कार्यांत तरी वेंचावें; मात्र त्यांचा गैरसमज राहूं नये एवढीच तिची इच्छा होती. आजच्या दिवसांत काय तें कळेल असें वाटून प्रभाकराची एकसारखी मार्गप्रतीक्षा ती करीत बसली होती. दादासाहेबांकडे पांच चार वेळां ती गेली होती. तिनें त्यांना औषधपाणी वगैरे दिलें. आधींच्या मनःक्षोभानें त्यांना बरीच दुर्बलता आली होती. परंतु त्या दुर्बलतेमुळें कोणत्याही प्रकारें त्यांच्या प्रकृतीवर अधिक अनिष्ट असा परिणाम झाला नाहीं. ती दुर्बलता केवळ क्षणिक आहे. संध्याकाळला ते पूर्ववत् होतील आणि सकाळीं मनाच्या क्षोभाच्या उद्रेकांत शब्दोच्चार झाला त्याच्यायोगानें, शब्दोच्चाराला काय अडथळा झाला होता तो दूर झाला. आतां पांच चार दिवसांनीं त्यांनी परत जाण्यास हरकत नाहीं असें डॉक्टरांनींही सांगितलें. तेव्हां आतां त्यांच्या प्रकृतीला कांहीं अधिकउणें होईल हें भय नव्हतें. त्या मनःक्षोभामुळें त्यांस ग्लानि मात्र येऊन ते पडले होते. त्यांचेजवळ आतां कोणी एकसारखं बसण्याची मुळींच अवश्यकता नव्हती.

प्रभाकर काय निरोप आणतो आणि काय नाहीं याविषयीं भयभीत होऊन कमला आंत बाहेर खेपा घालूं लागली. जसजसा अधिकाधिक वेळ जाऊं लागला, तसतसें तिचें मन निराश होऊं लागलें. प्रभाकर जाईल, आपल्या बापास सर्व हकीकत सांगेल, पत्रें दाखवील आणि तशीं तीं पत्रें दाखविलीं म्हणजे बाबांचें अंतःकरण थोडें-बहुत कलुषित झालें असलें तरी तें स्वच्छ होऊन ते आपल्यास परत घेतील; निदान परत घेण्यास आले नाहींत, तरी आपल्याविषयीं त्यांच्या मनांत कांहीं राहणार नाहीं असें तरी तिला वाटत होतें, यामुळें तर ती फारच उतावीळ झाली होती. पण प्रभाकराचा मुळींच ठिकाण नाहीं, तेव्हां मात्र ती अगदीं निराश होऊन आतां आपलें जीवित असेंच कष्टमय स्थितींत जावयाचें असें ह्मणून ती स्वस्थ बसण्याचा प्रयत्न करून त्यांत कांहीं सिद्धि मिळाली

तर पहात असतां एकदम प्रभाकर, ताई आणि सरस्वतीबाई तिच्यापुढें उभ्या राहिल्या. त्यांना पाहतांच कमलेला एकदम तिच्या आईचें स्मरण झालें, आणि धांवत जाऊन तिनें त्यांना मिठी मारिली. आपण या वेळीं येथें उभें राहणें रास्त नाहीं, हें जाणून तेथून बाहेर जाऊन प्रभाकर गोपाळाजवळ उभा राहिला.

कमला किती वेळ तरी सरस्वतीबाईस घट्ट मिठी मारुन स्फुंदस्फुंदून रडत होती. ताई व सरस्वतीबाई दोघींनींही तिला बराच वेळ मनमुराद रडूं दिलें व तिचा उमाळा जेव्हां बराच कमी झालासें दिसलें, तेव्हां मग त्यांनीं हलकेच तिला, "आम्हांला सर्व गोष्टी समजल्या आहेत. भावजींनाही समजल्या आहेत. तुझ्याबद्दल कोणाला कांहीं सुद्धां वावगें वाटत नाहीं. तूं घरीं केव्हां येशील असं सगळ्यांना झालं आहे. गोप्या तर तुला नेण्यासाठींच आमच्याबरोबर आला आहे. पण मीं त्याला मुद्दाम बाहेर उभं केलं आहे. बोलाव म्हणत असशील, तर बोलावतें," असें म्हटलें. कमलेचा शोकोद्वेगही आतां थोडा कमी झाल्याकारणानें तिनें आपल्या भावास आंत बोलाविलें. त्याला पहातांक्षणीं पुनः एकदां उमाळा आला व तो ओसरल्यावर घरीं जाण्याविषयीं गोष्टी निघाल्या. परंतु कमला कबूल होईना. "मामंजी इथें आहेत, ते जाईपर्यंत मी इथून हलायची नाहीं. जागे झाल्याबरोबर मी कुठें आहें, म्हणून विचारतील. ते पोटच्या मुलीपेक्षांही माझ्यावर अधिक प्रेम करतात. त्यांचा तो मागला सगळा राग गेला आहे," असें तिनें म्हटलें.

परंतु "तूं जाऊन पाहिजे तर परत ये, तोंपर्यंत ते उठत नाहींत. उठले, तरी तूं आपल्या वडिलांना भेटण्यासाठीं गेली आहेस असं सांगूं, आणखी तुला बोलावणं पाठवूं," असें आश्वासन ताईनीं देऊन तिला मोठ्या मिनतवारीनें जाण्यास सिद्ध केलें. एकवार मामंजी उठले आहेत कीं काय हें पाहून तरी येतें, असें म्हणून कमला तेथून त्यांच्या खोलीकडे गेली. अद्यापि ते गुंगींतच आहेत, तर तासा दीड तासांत जाऊन यावयाला कांहीं हरकत नाहीं, असें वाटून ती निघाली. एकवार वडिलांस भेटून, त्यांचे मनांत आपल्याविषयीं कांहीं किल्मिष नाहीं असें प्रत्यक्ष पाहून पुनः परत येऊन आपल्या या मठांत रहावयाचें, असा तिच्या मनाचा कृतनिश्चय झालाच होता. पद्माकरपंत प्रभाकराला भेटले असून आपल्याबद्दल त्यांच्या मनांत कांहीं फरक झाला असेल ही कल्पनाच तिला अद्यापि नव्हती. बापाचें तरी मन आपल्याविषयीं शुद्ध झालें, एवढ्यानेंच तिला फार आनंद झाला. एवढें तरी प्रभाकरानें घडवून आणलें, म्हणून ती त्याच्याकडे मोठ्या कृतज्ञपणें पाहूं लागली. नंतर ती चारही मंडळी गाडींत बसून बळवंतरावांच्या घराकडे गेली.

# प्रकरण १२ वें.

## पद्माकर व कमला.



द्माकरानें प्रभाकरास माझ्या चित्तास स्वस्थता पाहिजे, कोठें जावयाचें तें उद्यां जाऊं, झाल्या प्रसंगानें मन फार भ्रांत झालें आहे तें थोडें ताळ्यावर आलें ह्मणजे कांहीं करतां येईल, असें ह्मणून लावून दिलें खरें; परंतु त्याच्या चित्ताला आतां शांति किंवा स्वस्थता कोठली ? वारंवार वारंवार त्याच्या मनाला पश्चात्तापाचे उद्रेक येत होते. आणि त्यांत प्रभाकर जें जें बोलला, तें तें त्याला आठवून खरें वाटूं लागलें. इतक्या सर्व गोष्टी समजून येईपर्यंत आपल्या मूर्खपणामुळें तिला त्रास झाला आणि आतां त्या समजून ती निष्कलंक आहे असें कळल्यानंतरही आपण तिच्यापासून दूर जाऊन तिचा छळ करावयाचें मनांत आणतों याचा अर्थ काय ! तिच्या पुढें जाण्याला आपल्याला तोंड नाहीं, ती क्षमा करणार नाहीं, असें भय वाटतें आहे ह्मणून आपण दूर राहण्याचा विचार करणें ह्मणजे आपल्या अभिमानीपणानें आतां तिला त्रास देणेंच नव्हे काय ! आजपर्यंत आपला संशयखोरपणा आणि आतां आपला अहंपणा दोहोंचाही परिणाम तिला सारखाच भोगावयाला लावणें, यासारखें नीचपणाचें काम कोणतेंही नाहीं, असें आतां त्याच्या मनांत येऊं लागलें. आणि आतां आपण होऊनच त्या मठांत जाऊन तिला भेटून आपली चुकी कां कबूल करूं नये, असेंही पण वाटूं लागलें. पुनः मनांत येई, न जाणों, आपल्या काल्च्या वर्तनानें आपल्याला कोणी आंत जाऊंच दिलें नाहीं, किंवा तिला भेटूं दिलें नाहीं तर ? हा प्रश्न मनांत उभा रहातांच अर्थातच त्याला थोडें वाईट वाटलें. परंतु आतां त्याची न्यायबुद्धि जागृत होऊन अभिमान थोडा थोडा कमी होत चालला होता. तसा प्रसंग आला, तर आपण त्यांचेपाशींही आपला मूर्खपणा कबूल करूं, त्यांच्या देखत आपण तिला अमंगल विशेषण दिलें होतें, तें परत घेण्याला व क्षमा मागावयालाच आपण आलों आहोंत, असें तेथल्या त्या मंडळींना सांगणें आपलें अगदीं कर्तव्यच आहे, असेंही त्यानें आपल्या मनास सांगितलें. आणि आतां अगदीं तडक त्या मठांत जाऊन आपल्या बापाला, बायकोला, आणि इतर मंडळी जी आदले दिवशीं तेथें होती, त्यांनाही आपल्या संशयनिवृत्तीची मातील हकीकत सांगून आपण परिमार्जन करण्याच्या बुद्धीनें आलों आहों म्हणून सांगूं, असा त्यानें बेत केला. जों जों अधिक विचार होऊं लागला, तों तों त्याला असें वाटूं लागलें कीं आतांपर्यंत आपण तिचा व्यर्थ छळ

केला, आणि तो छळ विनाकारण झाला, आपली चूक झाली असें दिसून आल्यावर तेवढें स्पष्टपणें कबूल करण्याचें सुद्धां जिवावर येतें, हा आपला केवढा कमीपणा, असें दर क्षणीं अधिकाधिक जोरानें त्यास वाटत जाऊन एकदम तिकडे मठांत जाण्याची त्याच्या मनाची तयारी झाली. मनाची तयारी झाल्यावर शरीराची तयारी होण्याला फारसा अवकाश लागत नाहीं. कित्येकांना तर मुळींच लागत नाहीं. पद्माकर या दुसऱ्या वर्गापैकींच होता, हें वाचकांस नव्यानें सांगण्यास पाहिजे असें नाहीं. त्यानें लागलीच बाहेर जाण्याची तयारी करून उंबऱ्याबाहेर पाऊल ठेवलेंच इतकी त्याच्या मनाची तयारी होण्याला कांहीं थोडा वेळ लागला असें नाहीं, फार वेळ लागला. तितक्याच वेळांत तिकडे प्रभाकरानें बळवंतरावांस हकीकत सांगून सरस्वतीबाईला बरोबर घेऊन मठांत जाऊन कमलेला बरोबर घेऊन मंडळी मठाच्या बाहेर पडली. ती मंडळी गाडींत बसून एका बाजूनें वळली आणि दुसऱ्या बाजूनें पद्माकर या मठाच्या दारांत येऊन उभा राहिला. अर्धे किंवा एक मिनिट जर तो आधीं येता, तर त्यास ती मंडळी गाडींत शिरतां शिरतांच भेटली असती. परंतु तितकें अंतर पडलें. तो पुढें झाला. कमला तेथें आहे का, असें विचारण्याचें त्याच्या मनांत आलें. परंतु त्यानें ते ओंठावर आलेले शब्द मागें नेले आणि मी दादासाहेबांचा मुलगा, वडिलांना भेटावयाचें आहे, एवढेंच तो ह्मणाला. यानें असें ह्मणण्याला आणि तिकडून मुख्य डॉक्टर येण्याला एकच गांठ पडली. त्यांनीं त्याला ओळखलें आणि त्याच्या पहिल्या भेटीपासून आतापर्यंतच्या अवधींत त्यांना ताईकडून त्याची व कमलेची हकीकतही कळली होती, त्यामुळें त्याचें तें बोलणें ऐकून ते हंसले व ह्मणतात, "या, आंत या. आपल्या वडिलांना भेटायला आपल्याला कोण नाहीं ह्मणेल ! चला, त्यांची प्रकृति कशी आहे, काय आहे तें तुह्मांला सांगतों. आपण बोलतों आहोंत तोंपर्यंत कोणाकडून तरी ते काय करताहेत त्याचा शोध आणवतों आणखी मग आपण त्यांच्याकडे जाऊं. पण आपल्या भेटीचा त्यांच्या प्रकृतीवर परिणाम मात्र होतां कामा नये ही गोष्ट लक्ष्यांत धरली पाहिजे. काल त्यांना फार अशक्तपणा आला. आजारी माणसाचं मन किती अधु असतं, हें आपल्याला माहीत नाहीं. हे साहेब डॉक्टर रोग्याला होतां होईतों कोणाला भेटू देत नाहींत, याचं कारण काय ? हेंच. आह्मी तितका निर्बंध इथें ठेवीत नाहीं. कारण समजावून सांगितलं ह्मणजे मंडळी ऐकतात. आपण समजूतदार असून आपल्या हातून ते दिवशीं चूक झाली. कांहीं हरकत नाहीं. पण आपल्याशीं मला कांहीं बोलायचं आहे. आपली हरकत नसली तर बोलतों. ज्या विषयाबद्दल बोलायचं आहे, तो विषय फार नाजूक आहे. पण तुम्हास पाहिल्यापासून व तुमचा इतिहास कानीं आल्यापासून मला तुमच्याशीं बोलावं असं वाटतं आहे. बोला म्हणाल व विचारीन त्याचं शांतपणें उत्तर द्याल तर बोलतों."

"बोला. बोला. मी इथें तेवढ्याचकरितां आलों आहें," पद्माकरानें झटकन् जरा आवेशानें उत्तर दिलें.

डॉक्टर नुसते हंसले व त्याच्याकडे सस्मित पाहून ह्मणतात, "कमलाबाई या आपल्या पत्नी. त्यांची योग्यता आपल्याला माहीत

नाहीं, आणि आपण भलताच संशय मनांत येऊन त्यांचा त्याग केला, ही गोष्ट..." परंतु डॉक्टरांस त्यानें पुढें बोलूंच दिलें नाहीं. आपण एकदम म्हणालाः

"गोष्ट अगदीं खरी. परंतु माझा संशय मूर्खपणाचा होता. ज्याला स्नेही समजत होतों अशा एका नीच माणसानं माझ्या मूर्खपणाचा फायदा घेऊन भलभलते कुतर्क माझ्या मनांत उभे केले, आणि मला तिचा त्याग करून जाण्यास उत्तेजन दिलं. मी आंधळा, मला चांगलं तें वाईट दिसलं, अमृत तें विष दिसलं आणि विष तें अमृत वाटलं. अमृताचा मीं त्याग केला आणि विषाचा पेला अमृत समजून त्यांतून घटके घेऊं लागलों. सन्मित्र होता, त्याचा संशय घेतला, त्याचा द्वेष आरंभला, आणि नीचाला मिठ्या मारूं लागलों. परंतु येथून गेल्यापासून आतांपर्यंत एकावर एक पुरावे—माझ्या मूर्खपणाचे, भोळसटपणाचे पुरावे—पुढें येऊन माझ्या डोळ्यांत उजेड पडला. संशयाची निवृत्ति झाली. आणि म्हणून इथें—ज्या ठिकाणीं येऊन तों अत्यंत श्रेष्ठ असं आपलं कर्तव्य करीत असतां आपल्या सासऱ्याची, माझ्या वडिलांची सेवाचाकरी करीत असतां—येऊन तिला अमंगल भाषणं बोललों; अर्थात् आतां उजेड पडल्यावर त्याच ठिकाणीं येऊन त्याच मंडळींच्या देखत त्याचं परिमार्जन करणं जरूर म्हणून आलों आहें."

पद्माकराची विलक्षण मनःपूर्वकता व आतुरता पाहून डॉक्टरांस फार मौज वाटली, आणि ते त्याला म्हणतातः

"या एक दोन दिवसांतच पुनः तुमची खात्री झाली, कीं आपले सर्व संशय व्यर्थ म्हणून! तुमचे संशय आणखी त्यांची निवृत्ति हीं अगदीं फारच सोपीं आहेत तर मग म्हणायचीं! पण असेच संशय घडोघडीं यायला लागले म्हणजे मोठी पंचाईतच नव्हे का? जरी त्या संशयाची निवृत्ति अगदीं अल्पशा कारणावरून झाली, अगदीं लवकर झाली, तरी पण तुम्हांला स्वतःला, आणखी तुमच्यावर अवलंबून असणाऱ्या माणसांना, त्यांच्यापासून सुख म्हणून कधींच अंगीं लागणार नाहीं. थोडं कांहीं झालं कीं संशय, त्याची निवृत्ति होईपर्यंत अगदीं अकांडतांडव, आणखी दुसरं थोडं कांहीं झालं कीं त्या संशयाची निवृत्ति, असा प्रकार काय उपयोग! पद्माकरपंत, तुमच्यासारख्यांनीं असल्या संशयनिवृत्त्यांत गोते खात रहावं हें बरं का? तुम्हीच विचार करा. जितका अवधि तुम्हीं आपल्या संशयांत आणि त्या संशयामुळे उपस्थित केलेल्या संकटांत घातलात, तितका वेळ जर एखाद्या चांगल्या कृत्यांत घालविला असतात, तर कितीतरी काम झालं असतं! आणि संशय तरी कोणाबद्दल? तर जी अगदीं मूर्तिमंत साध्वी आहे तिच्याबद्दल! तुम्हाला अशा तऱ्हेनं बोलण्याचा मला अधिकार नाहीं, तुमचा माझा परिचय नाहीं, परंतु तुमच्यासारख्या तरुणांनीं असले हे अविचाराचे मार्ग सोडून द्यावे, आणि कांहीं तरी मोठं कृत्य हातीं घेऊन कायावाचामनानं तें सिद्धीस न्यावं यांतच विशेष आहे. असल्या अविचारानं कितीं कर्तृत्वशक्तीचा, विचारशक्तीचा वगैरे अपव्यय होतो! आणि आपलं व आपल्यावर असणाऱ्या इष्टांचीं अंतःकरणं किती करपून जातात! आपण कॉलेजांत असतां, तेव्हां आपले विचार किती तरी भराऱ्या मारीत असतात! आपल्या

देशासाठीं आपण हें करूं, तें करूं, इकडचा डोंगर तिकडे ठेवूं, आणि तिकडचा डोंगर इकडे ठेवूं; परंतु कॉलेज सुटण्याच्या वेळीं पहावं, तों ते सारे विचार कोणीकडच्या कोणीकडेच जाऊन आपण भलतीकडेच वाहवतों. किंवा आपल्या विचारांप्रमाणं झटूकन् करायला गेलोंच, तर अविचाराच्या भरांत कांहीं तरी करून भलतंच कांहीं होतं. आणि तुमच्या हातून जें भलतंच झालं, तें तर सगळ्या जगाच्याही व्यतिरिक्त ! असो, पण थोडक्यांत सांवरलांत. आतां दुसऱ्या टोंकाला मात्र जाऊं नका. आपल्या पत्नीची क्षमा पुष्कळशा शब्दांनीं मागण्यापेक्षां पुढच्या कृतींनीं मागा. आणि कोणतंही करायचं तें कधीं अविचारानं करीत जाऊं नका. "

पद्माकर डॉक्टरांचें बोलणं अगदीं स्वस्थपणें ऐकून घेत होता. आपल्याशीं या गृहस्थाची ओळख सारी दोन दिवसांची सुद्धां नाहीं, आणखी तितक्यांत हा अशा तऱ्हेनें कां बोलतो ? असा प्रश्न पद्माकराच्या मनांत उभा राहिलाच. परंतु त्यासंबंधानें अधिक बोलण्याचें अवसान या वेळीं त्यास नव्हतें.

डॉक्टर पुढें त्यास म्हणतात, "तुम्ही आज दोन दिवस इथें येतां आहां. पण ही आमची संस्था काय आहे, हिला आम्ही मठ कां म्हणतों, याची चौकशी करावी, असं तुमच्या मनांत आलं का कधीं ? या आमच्या संस्थेंत तुमच्यासारखे ग्रॅज्युएट आहेत. आणखी कांहीं तरी हेतूनंच ते या संस्थेंत आले आहेत. आणखी मंडळी त्यांत यावी, अशी आमची उत्कट इच्छा आहे. ज्याला ज्याला—ज्या ज्या व्यक्तीला—मग तो पुरुष असो वा स्त्री असो—म्हणून आपल्या देशासाठीं कांहीं काम करावं अशी इच्छा असेल, त्याचा त्याचा समावेश यांत होतो. तेव्हां कोणी नवीन होतकरू गृहस्थ असला आणि त्याला आत्मत्याग करण्याची बुद्धि झाली, तर त्याच्या इच्छेनुरूप व शक्तीप्रमाणं त्याला काम करण्याला आमच्या या संस्थेंत मार्ग आहे. आमची मठसंस्था जितकी वाढेल तितकी वाढावी अशा इच्छेनं मी कोणी भेटला, कीं त्याच्याजवळ ही गोष्ट काढतों. आमच्या या संस्थेची हकीकत सांगतों. तिच्या मूळ उत्पादकाचं चरित्र दाखवितों. त्यांत या संस्थेचे हेतु काय आहेत तें दिसून येतं. तुम्हांलाही तें सगळं सांगावं अशी इच्छा आहे. तुमचं चित्त इकडे लागलं, तर विशेष कांहीं तरी होईल, अशी मला एकाएकीं काल स्फूर्ति होऊन तुम्ही पुनः इकडे आलांत, तर तुमच्याजवळ ही गोष्ट काढायची असा निश्चय केला होता आणि तुम्हांला आज इथें पहाण्याबरोबर अर्थातच कांहीं तरी निमित्त काढून तुम्हांला सांगतों आहें. आम्ही जे कोणत्या तरी कार्याला वाहून घेतों, हे खरोखरी वेडेच होतों, यांत शंका नाहीं. आम्हाला त्या आपल्या कार्याखेरीज दुसरं कांहीं दिसत नाहीं. कोणी दिसलं, कीं हे आपल्याला आपल्या कार्यांत कितपत उपयोगी पडण्याचा संभव आहे हा विचार ! तेव्हां मीं आपला तुमच्या भानगडींत शिरून तुम्हांला बसवून घेऊन ही सगळी चर्पटपंजरी केली. ही अगदीं अस्थानीं झाली असं माझं मला सुद्धां वाटतं. पण वेळ आली, कांहीं विचार मनांत आला, कीं मग कांहीं रहावत नाहीं. तरी आतां मी अधिक नाहींच बोलत. पुढं मागं यासंबंधानं बोलूं. "

डॉक्टरांचें इतकें बोलणें होतें आहे, तों

दादासाहेब जागे झाल्याबद्दल कोणी येऊन सांगितलें. डॉक्टरांनीं पुनः एकदां पद्माकराला बजाविलें कीं, "आपण नुसता समाचार घ्या, अधिक उणं कांहीं बोलूं नका. त्यांच्या सध्यांच्या स्थितींत त्यांना थोडासुद्धां चित्तक्षोभ फार अपायकारक होतो."

पद्माकर त्यांचें बोलणें ऐकून घेऊन मान हलवून आपल्या वडिलांच्या खोलीकडे गेला. त्या महालाच्या दारांत पाऊल घातल्या वेळेपासून त्यानें अनेक वेळां सभोंवतालीं दृष्टि फिरविली कीं, आपली पत्नी कोठें तरी आपल्या दृष्टीस पडेल. ती कोठें दृष्टीस पडली नाहीं. शेवटीं आतां दादासाहेबांच्या खोलींत तरी असेलच, आपण तेथें गेलों ह्मणजे ती भेटेल, असें त्यानें आपल्या मनाचें समाधान केलें. तेथें जाइपर्यंत त्याला खूप धैर्य होतें. आपली बायको व आपले वडील दोघेही आतां एकदम दृष्टीस पडलीं असतां आपण काय करूं, काय बोलूं, याबद्दल त्यास अतोनात विचार पडला. तो दाराशीं तसाच उभा राहिला. दार ओढण्यासाठीं त्यानें हात घातला, परंतु दाराचा कोयंडा तसाच धरून उभें रहावें, आंत जाऊं नये असें वाटूनच कीं काय तो थबकला. परंतु असा किती वेळ उभा राहणार! जरा भीत भीत त्यानें दार उघडलें. एकवार त्या पलंगाकडे पाहिलें. तेथें दादासाहेब होते, परंतु त्याची पत्नी उभी नव्हती. त्याची बरीचशी निराशा झाली. आसपास कोठें ती आहे काय, ह्मणून त्यानें भीत भीत इकडे तिकडे पाहिलें तों कोणी नाहीं. मग विशेषच निराशा झाली आणि थोडेंसें बरेंही वाटलें. दादासाहेबांचें लक्ष्य त्याच्याकडे गेलें आणि एकदम त्यांच्या कपाळावर आंठ्या चढल्या, ते त्रासून तुटकपणानें त्याला कांहीं बोलणार, तोंच त्याला एकदम उमाळा आल्याप्रमाणें होऊन त्यानें त्यांचे पाय घट्ट धरले! 'माझी सगळी चुकी माझ्या लक्ष्यांत आली' एवढे शब्द त्याच्या तोंडांतून कसे तरी अडखळत अडखळत बाहेर पडले. ते शब्द कांहीं सगळे दादासाहेबांस ऐकूं गेले नाहींत, पण कांहीं तरी पश्चात्ताप होऊन हा बोलतो आहे एवढें त्यांच्या ध्यानांत आलें. त्यांच्या ओंठावर जे तिरस्काराचे शब्द आले होते, ते त्यामुळें जेथल्या तेथेंच जिरले. आणि ते कांहीं वेळ स्तब्ध राहिले. मुलगाही त्यांच्या पायांजवळ अगदीं गप्प व मान खालीं घालून बसला. त्याच्या तोंडून शब्द उमटणेंच शक्य नव्हतें इतका त्याच्या मनाचा गोंधळ झाला होता. दादासाहेबांचा राग तर आतां अगदीं ओसरला, तिरस्कार विरला आणि आपल्या मुलाच्या स्थितीबद्दल दया त्यांच्या मनांत उद्भवली. तेव्हां ते हलकेंच ह्मणतात:

"पद्माकर, जी गोष्ट करूं नये असं मला वाटत होतं, ती तूं केलीस. मी कर म्हणत होतों ती गोष्ट केली नाहींस. तुला ती अनिष्ट वाटली. पण तुला जी इष्ट वाटली ती तरी दृढपणानं धरून बसायचं होतंस! त्या गोष्टीपासून तरी जें पूर्ण सुख मिळायचं तें घ्यायचं होतंस. पण लहान पोराप्रमाणें हातीं आलेलं रत्न फेंकून देऊन—त्याचासुद्धां अव्हेर करून तूं चिखलांत लोळायला गेलास, त्या तुला आतां काय म्हणावं? बाबा, अशीं रत्नें वारंवार आणखी वाटेल तशीं लाभत नाहींत. तिच्या जन्मसंसर्गाचाच कांहीं दोष असेल तो निराळा, पण त्या दोषाचें तुला जर कांहीं वाटत नाहीं, तर तिचा अव्हेर करण्यांत केवढा मूर्खपणा

केलास ! तिच्यावर काय आणखी अरिष्ट आलीं तीं मला अगदीं अचानक समजलीं. ती माझी सेवा करण्याकरितां इथें बसली असतां मला झोंप लागली आहे, मी शुद्धीवर नाहीं, अशा समजुतीनं तिनं आपल्या इथल्या एका मैत्रिणीला सगळी हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकूनच मला तिच्याबद्दल अतोनात प्रेम वाटूं लागलं. आणखी तुझ्याबद्दलचा तिटकारा दुणावला. पोरा, तुझं सुख ज्यांत आहे असं वाटून तूं जो मार्ग पत्करलास, तो मार्ग पक्का तरी धरायचा होतास ! जिच्या ठिकाणीं आपलं सारं सुख आहे असं तुला वाटलं, तिला आणि आपल्याला तरी सुख लावून घ्यायचं होतंस ! माझी तिनं आज इतके दिवस शुश्रूषा केली त्यांत मीं तिचं एकंदर वर्तन पाहिलं, माझी पोटची मुलगी—तुझी बहीण असती, तरी सुद्धां इतकी काळजी तिनं घेतली असती कीं काय याची शंकाच वाटते. [illegible] नखशिखांत सगळे उत्तम गुण—नवऱ्याच्या सुखाला कोणालाही सुखी करण्याला लागणारे गुण—पूर्णपणें भरले आहेत. तुझ्या मनाची अन्य तऱ्हेनं खात्री होऊन तूं शुद्धीवर आला असलास, तर ठीकच आहे, नाहीं तर ती अगदीं निष्पाप, निष्कलंक, निर्मळ आहे, असं मी तुला सांगतों. तेवढ्यावरच तूं तिचा पुनः स्वीकार कर, आणखी स्वस्थ चित्तानं रहा. कांहींसुद्धां मनांत शंका आणूं नको. मी इथून गेलों म्हणजे मला [illegible]च्या इथें येऊन रहातां येणार नाहीं. [illegible] जन्मसंसर्ग जो काय आहे, तो अग[illegible]ष विसरणं माझ्यानं होत नाहीं. शास्त्राच्या [illegible]द्ध गोष्ट आहे हें मला दिसतं आहे. [illegible]त्काळीं मला संसर्ग घडला, त्या संस[illegible] काहीं नाहीं, हेंही मला दिसलं आहे, पण मनाची तयारी तितकी होत नाहीं. तिला मी आपली सून समजतों, लेकीपेक्षांही माझं प्रेम तिच्यावर अधिक आहे; पण माझ्या मनावरचे आजपर्यंतचे संस्कार मला अगदीं स्वच्छपणें तुह्मांला जवळ घेऊन रहाण्यांत हरकत नाहीं असं वाटूं देत नाहींत, त्याला इलाज नाहीं. पण माझा तुह्मां दोघांना पूर्ण आशीर्वाद आहे. कोणतीही मदत लागली, तरी ती मी करीन. तूं माझा मुलगा ती माझी सून—तूं मुलगा ह्मणण्याला तुझ्या या असल्या वेडगळ वर्तनानं मला एक वेळ जरा खेद वाटेल, पण ती माझी सून असं म्हणण्याला मला अभिमान वाटेल, असं तिचं वर्तन आहे. याउपर तूं आपल्याला व तिला दुःख करून घेशील, तर तुझ्यासारखा मूर्ख तूंच ! तिच्या तंत्रानं वागशील तर तुझ्या संचितांत सुखाखेरीज कांहीं नाहीं असं समज. आतांपर्यंत तिच्याच हातून मीं पथ्याचं घेतलं, पण आपत्ति ह्मणून घेतलं. ती जवळ असली ह्मणजे मला आनंद वाटतो, जवळ नसली कीं असमाधान वाटतं. पण पूर्वापार मनःसंस्कारामुळं, तिची जन्मकथा मनांत आली, कीं खेदही वाटतो. तुझ्या मतानं त्यांत खेद वाटण्याला कांहीं कारण नाहीं, मग तुला आनंदाखेरीज दुसरं कांहीच असूं नये. मी उद्यां इथून जाणार. तूं आज मला भेटलास फार चांगलं झालं. तूं अशा तऱ्हेनं तिचा त्याग केलास आणि पोरगी तर अशी उत्तम, तेव्हां हिला दुःखांत टाकून कसं जावं, असं वारंवार मला वाटे. आतां ती चिंता निवारण झाली. मी आतां निर्धास्तपणें इथून जाईन. हा नवीन प्रेमपाश उत्पन्न झाला आहे, तो तोडावासा वाटत नाहीं, पण धरावासाही

वाटत नाहीं. तो दूर ठेवणंच मला अवश्य आहे. याहून मी तुला अधिक काय सांगणार? ती आज इथें नाहीं. आपल्या बापाकडे गेली आहे, असं मला कोणीं सांगितलं. आली, तर एकवार मी तिच्याशीं बोलेन. आणि उद्यां याच मंडळीकडून कोणी तरी बरोबर घेऊन गंगापुरास जाईन. उद्यांच्या पुढें मी इथें रहात नाहीं. हें स्थान चांगलं, त्यांत वावगं कांहीं नाहीं. अकालीं वैधव्य पावले-ल्या दुर्दैवी बायांच्या हातून अशीं कामं झालीं तर वावगं कांहीं नाहीं. पण माझ्या मनाला या असल्या संसर्गांत बरं वाटत नाहीं, त्याला इलाज नाहीं. या मंडळीमुळं मी ब्राह्मणांत तरी राहिलों. जर कोणच्या जनरल् इस्पितळांत मला नेलं असतं, तर कोणाला ठाऊक कोणी कोणी काय काय घातलं असतं! यांचे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं. मला यांनीं पुनर्जन्म दिला. परंतु पूर्वजन्मींचे संस्कार जसे पुढच्या जन्मीं आपला गुण करणारच, याचप्रमाणें पूर्वींचे संस्कार आजही माझ्या मनावर आपला गुण केल्याखेरीज रहाणार नाहींत. मला त्यांतच सुख वाटतं. पुनः मला तुला सांगायचं तें इत-कंच, कीं आपळं मन चंचल गवताच्या काडीसारखं राहूं देऊं नकोस. वारा आला, कीं आपली ती काडी जशी वांकते, तसं आपलं मन यत्किंचित् कारणांनीं वांकूं देऊं नये. कोणता तरी एक मार्ग आधींच विचार करून धरावा आणि मग काय वाटेल तें झालं तरी तो सोडायचा नाहीं, असा करारीपणा ठेवावा. तूं माझ्या मर्जीविरुद्ध लग्न केलंस यांत करारीपणा राखलास खरा, पण पुढें—आतां त्याचा कशाला उच्चार करूं? पुनः असा प्रकार होऊं नये अशाबद्दल जप. आजपर्यंत इतक्या संथपणानं मी तुझ्याशीं—कोणा-शींच बोललों नाहीं, पण या दुखण्यानं मला शांतपणा शिकविला. जें व्हायचं तें होणारच असं मला प्रत्ययास आणून दिलं. पहा हींच तुझी बायको. मीं हिला पाहिलीही नव्हती, तेव्हां तिचा मीं तिर-स्कार केला. तुझं तिचं लग्न होऊं नये म्हणून त्रागा केला. लग्न झाल्यावर तुझं तोंड पहाणार नाहीं म्हटलं, परंतु काय कर्मधर्मसंयोग! हींच मुलगी अण्णा-साहेबांच्या इथें मी असतांना, दुःखी कष्टी अशी माझ्या नजरेस पडून माझं चित्त तिच्याकडे ओढलं. पुनः ती कोण हें कळतांच मीं तिचा फार कठोरपणानं तिरस्कार करून तेथून चालता झालों. तों पुनः कर्मधर्मसंयोग मी गंगापुराहून मुंबईस येऊन दादरास जाऊन परत येतांना ती त्याच गाडींत असून असा अपघात होऊन मी इथें येऊन तिच्या-कडून माझी सगळी शुश्रूषा व्हायची होती! तेव्हां भवितव्यतेच्या मनांतून माझ्या मनांत तिच्याविषयीं प्रेमच असावं, तिर-स्कार राहूं नये, असंच आहे असं म्हण-ण्याला काय प्रत्यवाय आहे? आतां माझ्या मनांत तिरस्कार नाहीं, प्रेम आहे. तिच्याविषयीं अतोनात प्रेम आहे, पण मी आतां तिला अतिशय जवळ करीत नाहीं. माझ्या धर्मकर्माला तें विघातक आहे अशी माझी समजूत, त्याला इलाज नाहीं."

इतकें लांबलचक बोलणें बोलून त्यांनीं दीर्घ उसासा टाकला. पद्माकर अगदीं मुकाट्यानें ऐकत होता. त्याला त्यांच्या बोलण्याचें फार आश्चर्य वाटलें. आपले वडील या चायतींत इतके उदार विचा-राचे होतील हें त्याच्या स्वप्नींही नव्हतें.

परंतु आपल्या बायकोच्या वर्तनानें हा फरक झाला, ह्मणून त्याला अभिमान वाटला. आणि त्याबरोबर आपण मात्र उगीच डोळे मिटून आंधळेपणा धरून तिची किंमत जाणली नाहीं, याबद्दल त्याला खेद व लाज हीं वाटलीं.

दादासाहेबांच्या खोलींत जाऊन त्यांच्या मुलास फार वेळ झाला, अद्यापि तो बाहेर येत नाहीं, तेव्हां कांहीं तरी त्यांचा चित्त-क्षोभ होण्याजोगीं भाषणें होत आहेत कीं काय, असें पहाण्याच्या उद्देशानें डॉक्टर दाराशीं येऊन त्यांनीं दार ठोठा-वलें आणि उघडलें तों कांहीं नाहीं. सर्व शांत आहे. दादासाहेब शून्य दृष्टीनें पहात होते. डॉक्टरास पहातांच त्यांनीं त्यांना म्हटलें, " डॉक्टर, उद्यां मी जाणार. आतां मला इथें राहूं नयेसं वाटायला लागलं. आतां कांहीं अडथळा न आणतां मला जाऊं द्या. मी जायचं ह्मटलं कीं जाय-चाच, उद्यां सकाळीं मला अण्णासाहे-बांकडे, मी सांगतों त्या रस्त्यावर पोंहोंच-वून द्या. तिथून मी गंगापुरास जाईन. आतां अगदीं कांहीं यांत व्यत्यय उप-योगी नाहीं. जाणार म्हणजे जाणारच. तुमचे मजवर अत्यंत उपकार झाले, ते मी कधीं विसरणार नाहीं. माझ्यानं जी मदत तुमच्या या संस्थेला होईल, ती मी करीन. पुरे आतां, माझ्या घशाला कोरड पडली. फार बोललों. माझ्या इच्छेप्रमाणें करा ह्मणजे झालं. " , असें म्हणून त्या दोघांकडे त्यांनीं पाठ केली. „

डॉक्टर व पद्माकर दोघेही तेथून निघून बाहेर आले. पद्माकर आपल्या विचारांत गुंग होता. आपल्या वडिलांत इतका फरक पडलेला पाहून त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. थोड्या वेळानें त्यानेंही आपण जातों म्हणून विचारलें. कमला येईपर्यंत थांबतों व तिला भेटून मग जाईन, असें त्याच्यानें ह्मणवेना; इतकेंच नव्हे, तर कमळा केव्हां येणार आहे किंवा येणार आहे कीं नाहीं, हेंसुद्धां त्याच्यानें विचार-वेना. अतिशय विषण्ण व निराश चित्तानें तो जाण्यास निघाला. दारापाशीं आला तों एक गाडी बाहेरच्या दरवाजापाशीं थांबून तींतून एक स्त्री खालीं उतरली. दुसरा कोणीतरी, उतरूं उतरूं ह्मणत असून, ही स्त्री ' नको. तूं जा ' असें त्याला ह्मणत आहे असें दिसलें. नंतर ती स्त्री एकटीच पुढें आली. जवळ आल्याबरोबर त्यानें तिला ओळखलें. ती कमलाच होती. तिचें लक्ष्य याच्याकडे गेलें नाहीं. हा ज्या दारा-पाशीं उभा होता तेथें ती आली. हा बाजूला झाला. ती सरळ पाहून आंत चालली. तिला हांक मारावी अशी याला इच्छा झाली; परंतु तोंडांतून शब्द निघेना. हांक मारली तरी आपण बोलणार काय हें सुचेना. तितक्यांत संधि गेली. आपल्या सासऱ्याचें काय झालें असेल, ते उठले असतील काय, त्यांना कांहीं लागलें सव-रलें असेल काय, या विवंचनेंत ती पुढेंच गेली. हा निराश होऊन बाहेर गेला.

दुसरे दिवशीं आपल्या निश्चयाप्रमाणें दादासाहेब तेथून गेले. जाते वेळीं त्यांनीं कमलेला एवढेंच म्हटलें, " मुली, तूं आपल्या सासऱ्याची मनोभावानें शुश्रूषा केलीस, त्याचं चांगलं फळ तुला तत्काळ मिळेल. केव्हांही कांहीं संकट आलं तर मला कळव. मी आतां जातों, दोघं सुखानें रहा. त्याच्या चित्तावरला पडदा आतां दूर झाला आहे. " इतकें म्हणून ते गेले. आपल्या पतीच्या चित्तवृत्तींत कांहीं—पण त्यांचें शेवटलें वाक्य—त्याच्या चित्तावरला

पडदा आतां दूर झाला आहे, असें ते ह्मणाले त्याचा अर्थ काय? फरक झाला आहे काय? झाला असला, तर तो कशामुळें झाला असेल? असले प्रश्न तिच्या मनाला आतां त्रास देऊं लागले. त्यांत आणखी प्रभाकरही अशाच प्रकारचें कांहीं बोलला होता, परंतु त्या वेळीं तिनें दीर्घ सुस्कारा मात्र टाकला. बाबांचें चित्त संशयरहित झालें एवढेंच मोठें भाग्य असें विचारांस वाटलें. पण आतां तिच्या सासऱ्यानेंही जेव्हां तशाच प्रकारचें भाषण केलें, तेव्हां तिला आशा उत्पन्न झाली आणि क्षणोक्षणीं कांहीं तरी अद्भुत घडून आपण सुखांत जाऊन पडणार असें तिला वाटूं लागलें. या विचारांत ती दादासाहेबांस पोंहोंचविल्यावर दारांतच उभी राहिली होती. इतक्यांत वर्तमानपत्र आलें तें उघडून पहातां सहज '**राजाराम**' हीं अक्षरें तिनें पाहिलीं. त्याबरोबर काय तें वाचण्याची उत्कंठा होऊन ती सहज शेजारच्याच कोणासही भेटण्याच्या खोलींत तें वाचीत बसली.

पद्माकर आदले दिवशीं आपल्या बापास भेटून त्या दवाखान्यांतून बाहेर पडला, तो आतां आपण कोठें जावें या विचारांत पडला. आतां आपल्याला आपल्या बायकोची भेट होण्याची संधि केव्हां येईल, असें त्याला वाटलें. परत जावें आणि धिटाईनें तिला भेटून आपली चूक तिच्यापुढें कबूल करून तिची क्षमा मागावी हा एक प्रकार. किंवा प्रभाकराकडून तिला आधीं सर्व हकीकत कळवून मग काय तें करावें हा दुसरा प्रकार. कोणता मार्ग आपण स्वीकारावा हें त्याला समजेना, आणि त्यामुळें त्याच्या मनाची फार विलक्षण स्थिति झाली. आतां आपण तिला भेटल्याखेरीज प्रभाकराकडेसुद्धां जाऊं नये असें एकवार त्याला वाटलें. आणि त्या हेतूनें तो पुनः परतून मठाच्या दारापर्यंत गेला; पण असें करणें बरें नाहीं, असें म्हणून पुनः परत फिरला. आणि शेवटीं तो प्रभाकराच्या बिऱ्हाडीं गेला. प्रभाकर बाहेर गेल्याबरोबर आपण कोठें गेलों, काय केलें, हें त्यानें त्याला सांगितलें नाहीं. त्यानें विचारलें, तरी उडवाउडवीचें उत्तर देऊन वेळ मारून नेली. आपण अशा आशेनें गेलों होतों आणि आपली अशी निराशा झाली, हें सांगण्यास त्याला लाज वाटली. रात्र कशी तरी त्यानें काढली. सकाळ होतांच पुनः त्याच्या मनांत आलें, कीं आपण त्या मठाकडे जावें. नाहीं होय, नाहीं होय, करतां करतां तो एकटाच घराच्या बाहेर तर पडला. प्रभाकरानें मुद्दाम तो कोठें जातो याची चौकशी केली नाहीं. त्याचें मन स्वस्थ झालें, म्हणजे तो आपोआप सर्व कांहीं आपल्याला सांगेल, असें त्यानें मनांत ह्मटलें. कांहीं एका अवधीच्या पलीकडे ज्याचें त्याला मोकळें सोडणेंच श्रेयस्कर होय.

पद्माकर निघाला तो तडक मठाकडे गेला नाहीं. हजार वेळां हजार विचार त्याच्या मनांत आले. व कितीकदां तो मठाकडे वळला आणि कितीकदां तो परत फिरला. परंतु सरतेशेवटीं बऱ्याच वेळानें त्यानें मनाचा निश्चय कायम केला. आपला बाप तेथून आज आतां सकाळीं जाणार आहे, तर आपण त्याला पोंहोंचविण्यासाठीं ह्मणून जाऊं आणि आपल्या हेतूप्रमाणें भेट झाली तर पाहूं, असा बेत करून तो तेथें गेला. दादासाहेब केव्हां जाणार म्हणून त्यानें एका नोकरानें विचारलें, तों ते आतांच पांच मिनिटें झालीं गेले, असें

त्यानें सांगितलें. त्याबरोबर पद्माकरास चमत्कारिक झालें. आतां अधिक कांहीं न बोलतां परत जावें असें मनांत आलें. पण पुनः "नाहीं, आतां या वेळीं तिची गांठ घेण्याचा यत्न करूं. काय होईल तें होईल" असें त्याच्या मनानें घेतलें. आणि ताई किंवा डॉक्टर यांपैकीं कोणाला तरी भेटून यांचेकडून आपल्या कुटुंबाची भेट घ्यावी असें मनांत योजून त्यानें त्या नोकरास त्या दोघांपैकीं कोणाला तरी बोलाव, आपलें काम आहे, असें सांगितलें. ठीक आहे, आपण या खोलींत बसा असें ह्मणून तो नोकर आंत गेला व पद्माकर त्या खोलीजवळ जाऊन त्यानें दार उघडलें तों आंत कोण ? कमला ! ती वर्तमानपत्र पुढें घेऊन शून्यदृष्टीनें त्याकडे पहात होती. तिला पाहतांच हा किंचित् दचकला. आणि मागें सरणार, तों एकदम तिचीही दृष्टि त्याच्याकडे गेली आणि ती झटकन् उठून उभी राहिली. तिचें सर्वांग थरथर कांपूं लागलें. इतकें कीं आतां आपण पडतों कीं काय, असें तिला वाटूं लागलें. तितक्यांत पद्माकरास धैर्य येऊन तो पुढें झाला. तिच्या अगदीं जवळ गेला व "झाल्या गोष्टी विसरून ... ..." असें अर्धवट कांहीं पुटपुटतो तों कमलेच्या तोंडून इतका वेळ दाबलेला हुंदका एकदम बाहेर पडला व जणूं काय त्यानें पुढें बोलूं नये ह्मणूनच तिनें आपले हात वर केले. पद्माकरानें तें जाणून तिला ओढून आपल्याजवळ घेतलें. त्या वेळीं दार उघडें होतें व गडी कोणाला तरी बोलवायला आपणच पाठविला, हें सुद्धां पद्माकराच्या लक्ष्यांत राहिलें नाहीं. ताईनीं तेथें येऊन तो प्रकार पाहून स्मित करून मुकाट्यानें दार लावलें व आपण तेथेंच बाहेर उभ्या राहिल्या, हें सुद्धां या दोघांच्या लक्ष्यांत आलें नाहीं. किती वेळ तरी झाला. कमलेचे हुंदके एकसारखे चालले होते व पद्माकराच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या. परंतु असें किती वेळ चालणार ? थोड्याच वेळांत पद्माकरास स्मरण झालें, कीं आपण ताईना किंवा डॉक्टरांना बोलाविण्यासाठीं माणूस पाठविला होता. तेव्हां ती मंडळी आली तर काय म्हणतील, असें मनांत येऊन त्यानें कमलेस आपण तेथें आलों, तेव्हां ताईस बोलावण्याला माणूस पाठविला तेव्हां डॉक्टर किंवा ताई आतां येतील असें ह्मटलें. त्याबरोबर तीही चटकन् दूर होऊन उभी राहिली. तिनें आपले केंस सावरले, लुगडें आवरलें आणि "तर मग मीच जाऊन ताईना घेऊन येतें, त्यांना हें पाहून फार आनंद होईल," असें दार उघडीत उघडीत म्हटलें; तों ताईही हंसत हंसत म्हणतात, 'होईल कशाला ? झालाच आहे. पद्माकर आणखी कमला यांचा संयोग झालेला पाहून कोणाला आनंद होणार नाहीं ! '

कमला तें ऐकून इतकी लाजली, कीं किती वेळ तरी ती खालीं मान घालूनच उभी होती.

ताईनीं आपल्या खुबीदार बोलण्यानें कमलेस अगदीं लज्जित करून सोडल्यावर लवकरच तेथील सर्व मंडळींना तो त्यांच्या संयोगाचा मजकूर समजला व त्या सकाळीं तेथेंच जेवून दोघांनींही एका गाडींत बसून बळवंतरावांकडे जावें असें ठरलें. त्याप्रमाणें जेवणें वगैरे होऊन गाडी आणून हीं दोघें आंत बसलीं. तोंच पद्माकराचा शोध करण्यासाठीं आलेला प्रभाकर त्यांच्यापुढें आला व त्यास पहाण्या-

बरोबर आनंदानें हंसून पद्माकरास ह्मणतो, " वा ! माझी वाट तरी पहायची होतीस ! कमलाताई, इतका वेळ माझी गरज होती. पण आतां !" कमला कांहीं बोलली नाहीं. लज्जितमुख होऊन आपल्या पतीकडे आपल्या उजव्या डोळ्याच्या कोंपऱ्यानें पाहूं लागली. पद्माकरासही मागचें सर्व आठवून ओशाळल्यासारखें झालें, तथापि तें झांकून तो मोठ्यानें प्रभाकरास म्हणतो, " बरं बरं. आतां चला आमच्याबरोबर बळवंतरावांकडे. "

परंतु प्रभाकर म्हणाला, " वाहवा ! आतां दोघांत तिसऱ्याची मुळींच जरूर नाहीं. आतां आपणच जा. आह्मी येऊं पाठीमागून. "

परंतु त्याचें हें ह्मणणें कोण ऐकतो ! त्याला त्यांच्याबरोबर जावें लागलें. मात्र त्या विक्टोरियांतल्या पुढच्या संकोचित जागेवर बसण्याचा त्यानें आग्रह धरला आणि त्या दोघांस आपल्यासमोर बसविलें.

बळवंतरावांकडे गेल्यानंतर त्यांस किती आनंद झाला व त्यांच्या कुटुंबाचें स्मरण होऊन त्या आनंदांतच सर्वत्रांस किती वाईट वाटलें, याची कल्पना ज्यानें त्यानें आपल्या ठिकाणीं करावी.

आपल्या स्वभावाप्रमाणें गणपतराव पद्माकरास कांहीं निष्ठुर भाषणें बोलले असते, परंतु बळवंतरावांनीं त्यांस वेळींच दाबलें.

त्या रात्रीं गौरीच्या प्रारंभींच्या रात्रीप्रमाणेंच कमलेनें पेटी वाजवून गाणें गावें ह्मणून प्रभाकरानें आग्रह धरला आणि गणपतराव, सरस्वतीबाई वगैरेंनीं त्याला दुजोरा दिला. तेव्हां कमलेनें तेंच सुंदर पद ह्मटलें:—

## पद.

**या हो गाऊं ध्याऊं जाऊं शरण प्रभुवरा ।**
**उत्सवदिन आजि खरा हर्ष मनिं धरा ॥ ध्रु० ॥**
**कथन भजन मनन करुनि अळवुं प्रियकरा ।**
**पापताप हरुनि देई चरणिं आसरा ॥ या हो० ॥ १ ॥**
**विघ्न करुनि भग्न सुखनिमग्न पामरा ।**
**ठेवि मग कृतघ्नपणें कां हो आचरा ॥ या हो० ॥ २ ॥**

परंतु पहिले दिवसाच्या आवाजाच्या निर्मळ मधुरतेंत आतां करुणस्वराची छटा मारूं लागली, हें सर्वांस स्पष्टपणें दिसून आलें.

---

# प्रकरण १३ वें.

## इतरांची वारासार.



कथाकार आणि चित्रकार यांचा धंदा सारखाच. दोघांच्या धंद्यांचीं मूलतत्त्वें एक. एक लेखणीनें शब्दचित्र काढतो, दुसरा कुंचलीनें वर्णचित्र काढतो. एक विवक्षित व्यक्ति घेऊन त्यांच्या चरित्राचा विवक्षित भाग विविध विकारविचारांच्या वर्णनानें वाचकांच्या अंतश्चक्षूंपुढें उभा करतो. दुसरा तशाच प्रकारचा विषय अधिक मर्यादित असा घेऊन प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढें व त्यांच्या द्वारें त्यांच्या अंतःकरणांत उतरवितो. मुख्य विषयाला उठवून खुलवून दाखविणारा परिसर तयार करण्यासाठीं एक तदनुषंगिक विविध व्यक्ति उभ्या करून त्यांचें थोडथोडें व सूचक असें वर्णन देतो. दुसराही त्या परिसरांतील कांहीं नजीकचा भाग अगदीं ठळठळित, त्याचपाहून दूरचा थोडा अंधुक, त्याच्या पलीकडला फारच अंधुक असा दाखवितो. हेतु हा कीं, मुख्य विषयाखेरीज दुसरीकडे वाचकांचें किंवा प्रेक्षकांचें अंतःकरण वेधूं नये. जितक्यास तितकेंच त्या त्या भागांचें महत्त्व रहावें.

हें ध्यानांत ठेवूनच वाचकांनीं आतां हा उपसंहार पहावा. वर्णचित्रकाराप्रमाणें शब्दचित्रकारास चित्र उठवितां आलें असतें, तर त्याला उपसंहार करण्याची मुळींच जरूर नव्हती. परंतु शब्दचित्रकारास त्याखेरीज गत्यंतर नाहीं. मुख्य नायकनायिकांचें काय झालें, तें समजल्यानें वाचकांची उत्कंठा तृप्त झाली, तरी इतरांचेंही काय काय झालें त्याबद्दल जिज्ञासा त्यांचे मनांत जागृत असतेच; म्हणून पद्माकर व कमला यांच्या संयोगानंतर इतरांचें काय काय झालें हेंही सांगणें अवश्य आहे. मात्र वर्णचित्रांतल्याप्रमाणें परिसराचा कांहीं भाग स्पष्ट, कांहीं थोडा अंधुक व कांहीं अगदींच अंधुक असा असल्यास त्याबद्दल वाचकांनीं दोष देऊं नये. तर आतां नायकनायिकांस मागील प्रकरणीं ज्या ठिकाणीं सोडलें तेथून पुढें त्यांचें काय झालें हें सांगण्यापासूनच प्रारंभ करतों.

कमलेच्या निसर्गमधुर स्वरांत आतां नवीन आलेल्या करुणस्वराच्या छटेचा उत्पादक जो राजाराम, त्याच्यावर पोलिसानें अनेक खटले करण्याचा प्रयत्न केला. त्यानें कबूलजबाब द्यावे म्हणून यत्न झाले, परंतु अगदीं खात्रीलायक शिक्षा होईल असा खटला करण्यास त्यांना फारच अडचणी येऊं लागल्या. खोटे दस्तैवज केल्याची माहिती मिळे, परंतु पुरावा कोठें ! त्याला जरब दाखवून काढावे तर तो एखादे वेळेस सगळें कांहीं सांगितल्याचा आव आणी आणि घटकाभरानें दुसरेंच कांहीं तरी सांगून पहिलें

सगळें खोटें पाडी. असा पोरखेळ त्यानें घालविला असल्यामुळें पोलिसानें त्याजवर एकच खटला करून त्याची शाबिदी करून त्यास दोन वर्षें तुरुंगांत अडकाविण्याची तजवीज केली. तो खटला सदूनानाच्या मुलीचे दागिने चोरून ते खोटे करून विश्वासघात केल्याचा. यांत मुख्य साक्षीदार कोण, तर प्रोफेसर ड्यांडी. यांनीं असें सांगितलें कीं, "सोन्यानं हे दागिने गहाण ठेवण्यासाठीं आईबापांच्या परवानगीनं आणले, ते आपल्याजवळ ठेवायला दिले. राजाराम आपला स्नेही म्हणून आपण रातोरात्र त्याच्याजवळ ठेवायला दिले, आणखी सकाळीं मागायला गेलों, तर अगदीं उलटून पडला. पुढें पुष्कळ नेट लावला, तेव्हां खोटे दागिने हुबेहुब करून आणून दिलेन. मी भोळा, फसलों. तेच मूळचे दागिने असं समजून जिकडच्या तिकडे नेऊन टाकले. पण पुढें पहातों तों खोटे ह्मणून ओरड आली. तेव्हां याला जाऊन विचारतां, उलट हा मलाच शिव्या द्यायला लागला. मग पोलिसांत वर्दी दिली."

झालें. या साक्षीला आणखी पुरावे मिळाले. एका सोनाराचा पुरावा झाला. एका मुलामा देणाराचा झाला. दागिन्यांच्या मालकांच्या साक्षी झाल्या. आणखी काय पाहिजे? प्रोफेसर ड्यांडींनीं राजारामाच्या दवाखान्याच्या जागेंत झाडा नेऊन थोडा मुद्देमाल सांपडवून दिला! शिक्षा ठोठावण्याला आणखी तो काय पुरावा पाहिजे! पुरावा होऊन शिक्षाही झाली!

पण पोलिससाहेबांच्या मनांतून राजारामाच्या साहाय्यानें ब्यांकवाल्या लोकांवर कांहीं आणून गोल्डन ग्यांगची ग्यांग बाहेर ओढावयाची होती, ती कांहीं बाहेर आली नाहीं. एक पुरावा मिळाला, तर त्याला जोडपुरावा मुळींच नाहीं. त्यांत आणखी मौज अशी झाली कीं, डिटेक्टिव्ह एकसारखे पाठीवर असतां ब्यांकवाल्या मंडळीचे मुख्य दोन इसम ऑलूबॉश आणि नोव्हेअर व तिसरे मास्तर हे पार फरारी झाले. कोणी ह्मणत ते गोंव्यास गेले व कोणी ह्मणत ते निजामाच्या मुलुखांत गेले. कोणी ह्मणत ते दोघेही पारशी होते व कोणी म्हणत दोघेही युरेशियन होते. राजारामानें पद्माकरास लिहिलेल्या पत्रावरून ते साहेब नव्हते हें खास. राजारामास तुरुंगांत नेलें,तेव्हां तो एका चिठ्ठीची गुंडाळी करून तोंडांत घालून गिळण्याच्या विचारांत असतांना दिसला. मग ती चिठ्ठी धरली व त्या चिठ्ठींत पाहतात तों "तू वरस दोन वरस जायेल तो फकर नाय करेल. परत एल तो आपला काम चालू होएल. परंतु बोल मत. पोलिसचे बाप आमी होऊनशी बसलाय्."

या चिठ्ठीबद्दल—ती कशी आली, कोठून आली याबद्दल—राजारामास पुष्कळ विचारलें, पण व्यर्थ. तो अक्षर बोलेना.

दोन मुख्यच पळाल्यावर सोकर बाबुलर्जी, डल्लावाला वगैरे मंडळी असून नसून सारखीच. म्हणून पोलिसांनीं त्यांच्यावर नजर मात्र ठेविली आहे. ब्यांकेचें बबल फुटलें हें उघडच झालें. पण पोलिसाला अजून निराशा नाहीं. त्यांनीं त्या दोघांस पकडण्यासाठीं एक एक हजारांचीं दोन बक्षिसें लाविलीं आहेत. पोलिसला वाटतें, कीं कधीं तरी सांपडून आपण त्यांचा सगळा तांडाच्या तांडाच बाहेर काढूं. पण ते जेथें होते तेथें "अरे साला आमी पोलिसचे बाप होऊनशानी बसला" असेंच ह्मणत असावेत. कधीं काळीं सांपडलेच, तर मुंबईच्या वर्तमानपत्रांतून त्यांचेवरल्या खट-

त्याची सविस्तर हकीकत येईल ती वाचक वाचतीलच.

काकासाहेबांना भय वाटत होतें, कीं आपलें बिंग बाहेर पडून आपल्यावरही कांहीं तोहमत येईल. आणि तसें न होण्यासाठीं त्यांनीं कांहीं कोठें तजवीजही केली. मात्र त्यांच्या किमयेचा इतिहास सगळा बाहेर येऊन त्यांस कोठें तोंड दाखविण्यास जागा नाहींशी होऊन ते गंगापुरास आले. तेथें आल्यावर त्यांना दुसरी एक काळजी उत्पन्न झाली. ती ही कीं, दादासाहेब अपघातांतून वांचून आले. आतां आपले रुपये मागतील. प्रथम दादासाहेबांनीं ते मागितले नाहींत. काकासाहेबांच्या हाताशीं आले, कीं ते देऊन टाकतील असा त्यांचा समज होता. गंगापुराहून दिगंबरपुरास जाण्याचा विचार झाला, तेव्हां त्यांनीं त्या रुपयांबद्दल काकासाहेबांस सूचना केली. तेव्हां काकासाहेबांची धर्मनिष्ठा जागृत होऊन त्यांनीं दादासाहेबांच्या पाठीमागें पूर्वीप्रमाणें त्रास लावण्याची तयारी केली.

कोणत्या का होईना, परंतु दादासाहेब इस्पितळांत होते, तेव्हां गंगापुरास येतांच त्यांना असें वाटलें, कीं एकदां सर्व प्रायश्चित्त घ्यावें. त्याप्रमाणें त्यांनीं तें घेतलें. ते कर्मठ व अगदीं जुन्या मताचे असल्याकारणानें त्यांस तें अवश्य वाटलें, परंतु काकासाहेबांस तें पसंत न पडून त्यांनीं आपल्यातर्फेच्या मंडळीकडून दादासाहेबांस पुनः पूर्ववत् त्रास देण्यास सुरुवात केली. दादासाहेब लवकरच दिगंबरपुरीला गेले आणि तेथें अगदीं एकांतांत स्नानसंध्येंत आयुष्य घालवूं लागले. मुलाचें पत्र त्यांस येई. त्यांचें मुलास जाई. सुनेचें स्मरण त्यांस होई. फक्त एवढेंच वाटे, कीं तिच्या जन्मांत जर कांहीं वैषम्य नसतें, तर तिच्याजवळच सर्व मंडळी राहिलीं असतीं. काकासाहेब त्यांचे रुपये अजून देतानाच आहेत.

प्रोफेसर ड्यांडींनीं वर सांगितल्याप्रमाणें साक्षीपुरावा करून राजारामास तुरुंगांत पाठविल्यावर ते पोलिस कमिशनरच्या पाठीस लागले आहेत, कीं माझ्या मोठमोठ्यांच्या ओळखी आहेत, मी वाटेल त्या मंडळींत जातों, कोठें मला प्रवेश नाहीं असें नाहीं; शिवाय माझा चाणाक्षपणा फारच विलक्षण आहे, तर तूं मला पांच सहाशें रुपयांची एक जागा डिटेक्टिव ब्रँचमध्यें दे. आणखी सोन्याला माझा परसनल क्लार्क कर. साहेब त्याला होय होय म्हणून थापांवर ठेवताहेत. आणि गांवांत ड्यांडीसाहेब आपण पुढच्या मेलनें विलायतेला जाऊन जर्नालिस्ट होऊन येणार असें सांगत असतात, अजून त्यांची मेल मात्र दूर आठवड्याला चुकते आहे. बाकी टाईम्स व चॅंचे ग्याझेट या दोनही पत्रांत लिडर आपले असतात असें आपल्या मित्रांस—अर्थातच जो भेटेल तो त्यांचा मित्र—सांगत असतात. त्यांचें चरित्र फार रमणीय, तें पुनः कोठें तरी वाचकांस सचित मिळेल.

सदूनाना आतां पहिल्यापेक्षांही आपल्या स्नेह्यांसोबत्यांकडेच विशेष असतात. घरीं आले आले, नाहीं नाहीं, त्यांचे जांवई त्यांस दागिन्यांबद्दल नेहमीं शिव्यांनीं भरलेलीं पत्रें लिहीत असतात. सोन्या रोज येऊन उमाकाकूंस थापा मारतोच आहे. प्रोफेसर ड्यांडीस ६०० ची जागा मिळाली कीं आपणांस सरकार त्यांचा पर्सनलक्लार्क नेमणार आणि दीडशें रुपये दरमहा देणार, हें त्याचें रोजचें बोलणें. इतर सर्व मंडळींचा आयुःक्रम आपला नित्याप्रमाणें चालला होता.

समाप्त.